

श्रीसमर्थ

भीमस्वामींच्या तंजावरमठांतील तसबीर

( भारत-इतिहास-संशोधक मंडळ, पुणें )

सुखपृष्ठ )

श्री

# श्रीसमर्थचरित्र



लेखक

ाव खंडो आळतेकर, बी.ए., एल्एल्. बी., कऱ्हाड.

। दासबोध, समर्थ-रत्न-संग्रह, समर्थांची करुणापर, कविता,
समर्थ-सुभाषित, समर्थांचें आत्मचरित्र व
मनोबोध—पुस्तकांचें कर्ते.

ग्र हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण ॥
रें तें सावधपण । सर्वविषयीं ॥ दासबोध ( ११-५-३ )
ा अत्यंत साक्षेप ॥ ( ११-५-४ )

ानें होत आहे रे । आधीं केलेंचि पाहिजे ॥
तो देव जाणावा । अंतरीं धरितां बरें ॥ ११ ॥ समर्थ-स्फुट कविता

तनू त्यागितां कीर्ति मागें उरावी ।
मना सज्जना, हेचि क्रीया करावी ॥
मना, चंदनाचे परी त्वां झिजावें ।
परी अंतरीं सज्जना नीववावें ॥ ८ ॥ मनोबोध

ती २०००] [विजयादशमी शके १८५५

किंमत अडीच रुपये

श्रीसद्गुरुचरणीं प्रार्थना

## श्रीसद्गुरु समर्थमहाराज !

आपलें हृद्गत समजून आपलें यथार्थ चारित्र लिहिण्यास आपल्या सारखाच
हवे. माझी पामराची योग्यता नाहीं. आपल्या ग्रंथांतून
आपलें अंतरंग माझ्या अल्प बुद्धीला कळलें तसें लिहिलें आहे.
हें आपलें चरित्र प्रसिद्ध करतांना या दीनाची
सद्गुरुचरणीं एक नम्र प्रार्थना आहे.

**श्रीशिवछत्रपतिकालाप्रमाणें सर्व महाराष्ट्राकडेच नव्हे तर सर्व
हिंदुस्थान देशाकडे एकदां कृपादृष्टीनें पहा आणि
या पतित राष्ट्राचा उद्धार करा !!**

जय जय रघुवीर समर्थ

ॐ तत्सत्

॥ श्री ॥

श्रीसमर्थ-चरित्र

# —समर्पण—

ज्या कैलासवासी परमपूज्य मातोश्रींच्या नित्य अभंग-पठनानें
आम्हांस अगदीं लहानपणीं साधुसंतांचे पवित्र ग्रंथ
वाचण्याची गोडी लागली, त्या स्वर्गस्थ पुण्यात्मा
मातोश्रींना साष्टांग प्रणिपात करून, हें
'श्रीसमर्थ-चरित्र' त्यांच्या ऋणांतून
अंशतः तरी मुक्त होण्याकरितां,
त्यांना अत्यंत प्रेमादरपूर्वक
समर्पण करीत
आहें.

भाद्रपद शुद्ध चतुर्थी,
शके १८५५

परम आज्ञाधारक बालक
सदाशिव खंडो आळतेकर.

# प्रस्तावना

उत्तिष्ठत ! जाग्रत !! प्राप्य वरान्निबोधत !!!

—कठोपनिषद् ३।१४

उठा ! जागे व्हा !! आणि श्रेष्ठ महात्म्यांकडे जाऊन ज्ञानप्राप्ति करून घ्या !!!

( १ ) वाचक ग्रंथाची प्रस्तावना प्रथम वाचतात, परंतु ग्रंथकार ग्रंथ संपल्यावर ती शेवटीं लिहितात. प्रस्तावनेंत ग्रंथकार कांहीं गोष्टींसंबंधानें लिहितात, त्यायोगानें ग्रंथाचें सामान्य स्वरूप वाचकांना कळून येतें. "प्रयोजनमनुद्दिश्य मंदोऽपि न प्रवर्तते" या प्रसिद्ध उक्तीप्रमाणें ग्रंथ लिहिण्यांत ग्रंथकारांचे कांहीं विशिष्ट हेतु असतात, ते प्रस्तावनेंत प्रायः दिलेले असतात. शिवाय तत्सदृश पूर्वीच्या ग्रंथांत व ग्रंथकारांच्या नवीन ग्रंथांत कांहीं फरक आहे काय ? असल्यास तो कोणता ? नवीन ग्रंथाला पूर्वीच्या कोणत्या ग्रंथांचा आधार घेतलेला आहे इत्यादि व दुसऱ्या अनेक प्रकारच्या गोष्टींसंबंधानें ही थोडक्यांत वाचकांना माहिती देण्याचा ग्रंथकारांचा प्रायः परिपाठ आहे, त्यास अनुसरून आम्ही ही प्रस्तावना लिहीत आहों.

( २ ) श्रीसमर्थ रामदासस्वामींचें चरित्र लिहिण्यांत आमचा मुख्य हेतु, सांप्रत काळीं बहुजन समाजानें समर्थचरित्र वाचून त्यापासून बोध घ्यावा—समर्थांच्या ग्रंथांतील, समर्थांच्या उपदेशांतील, समर्थांच्या संप्रदायांतील व समर्थांच्या चरित्रांतील रहस्य समजून घ्यावें व त्याप्रमाणें सावधपणानें व अत्यंत साक्षेपानें कृति करून राष्ट्राची सर्वांगीण उन्नति करावी, हा आहे. हल्लीं काशीपासून रामेश्वरापर्यंत व कलकत्त्यापासून कराचीपर्यंत हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांतील लोक राष्ट्रोन्नतीच्या गोष्टींची चर्चा करूं लागले आहेत. हिंदुस्थानांतील सर्व धर्मांच्या, सर्व वर्णांच्या, सर्व जातींच्या व सर्व पक्षांच्या लोकांमध्यें राष्ट्रोन्नतीच्या उदात्त भावना उत्पन्न झाल्या आहेत. देशांतील वृद्धतरुण, गरीबश्रीमंत, स्त्रीपुरुष, सुशिक्षितअशिक्षित अशा सर्व लोकांच्या मनांत स्वराज्य मिळावें अशी तीव्र भावना उत्पन्न झाली आहे. राज्यकर्ते ही स्वराज्य देण्याची भाषा बोलूं लागले आहेत. परंतु प्रथम हिंदुमुसलमानांमध्यें एकी करा, जातीजातींतील तंटे मिटवा, अस्पृश्यतानिवारण करा, बहुजन समाजाला शिक्षण द्या, परराष्ट्रांच्या हल्ल्यापासून आपल्या राष्ट्राचें संरक्षण करण्यास पात्र व्हा, म्हणजे क्रमाक्रमानें आम्ही तुम्हांस स्वराज्य देऊं, असें धूर्तपणानें ते व त्यांचे देशबंधु म्हणत आहेत. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे "First deserve and then demand" भावार्थः— "प्रथम स्वराज्य चालविण्यास पात्र व्हा, मग तें मागण्याच्या गोष्टी बोला." अशा अर्थाची

सुरसदेगिरीची भाषा राज्यकर्ते व त्यांचे भाईबंद बोलत आहेत. सुशिक्षित लोकांमध्यें ही स्वराज्य कोणत्या प्रकारचें असावें व तें कोणत्या साधनांनीं मिळवावें यांविषयीं तीव्र मतभेद आहे. "मतामतांचा गलबला । कोणी पुसेना कोणाला ।। जो जे मतीं सांपडला । तयासि तेंचि थोर ।।" ( दासबोध, ११-२-२५ ) अशी सर्व लोकांची स्थिति झाली आहे. शिव-समर्थकालीं ही असाच मतामतांचा गलबला झाला होता. त्या मतामतांच्या गलबल्यांतून कर्तव्यमूढ महाराष्ट्र-जनतेस कर्तव्यदक्ष होण्यास समर्थांनीं योग्य तो उपदेश केला व महाराष्ट्राचें आपल्या हयातींतच आनंदवनभुवन केलें. हल्लीं समर्थ शरिरानें जिवंत नसले तरी ग्रंथरूपानें जिवंत आहेत. समर्थांच्या अंतकाळीं शिष्यमंडळी खेद करूं लागली तेव्हां समर्थ म्हणाले:–" आत्माराम दासबोध । माझें स्वरूप स्वतःसिद्ध ॥ असतां, न करावा हो खेद । भक्तजनीं ॥ १ ॥" तेव्हां हल्लींच्या स्वराज्यभक्तजनांनीं हीं समर्थांसारखा कोणी महापुरुष कर्णधार नाहीं म्हणून निष्कारण वाद माजवून खेद करण्याचें कारण नाहीं. त्यांनीं दासबोधप्रभृति समर्थांचे ग्रंथ वाचावेत, त्यांचें मनन करावें, आणि त्यांतील रहस्य समजून घ्यावें. " मुख्य हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण ।। तिसरें तें सावधपण । सर्वविषयीं ।। ( दा. ११-५-४ ) चवथा अत्यंत साक्षेप ।। ( दा. ११-५-५ )" या चतुःसूत्री शिकवणुकींत समर्थग्रंथांचें रहस्य आलेलें आहे. तें नीट समजून घेऊन हल्लींच्या स्वराज्यप्राप्त्यर्थ प्रयत्नाच्या काळीं परमेश्वरावर विश्वास ठेवून, पूर्ण सावधपणानें व अत्यंत साक्षेपानें परिस्थित्यनुरूप सर्वांनीं राजकारणांत यावच्छक्य भाग घ्यावा म्हणजे इष्ट फलाची प्राप्ती होईल, अशी समर्थ आपल्या ग्रंथांत व उपदेशांत ग्वाही देतात, हें या समर्थचरित्राच्या योगानें महाराष्ट्रजनतेस व तद्द्वारा अखिल हिंदी जनतेस कळवावें हा हें चरित्र लिहिण्याचा मुख्य हेतु आहे.

(३) आजपर्यंत प्राचीन व अर्वाचीन चरित्रकारांनीं समर्थांचीं अनेक चरित्रें लिहिलीं आहेत. त्यांचा त्रोटक उल्लेख आम्हीं 'समर्थांचीं चरित्रसाधनें' या भागांत केला आहे. तेव्हां समर्थांचीं अनेक चरित्रें असतांना आणखी एक नवीन चरित्र लिहिण्याची काय आवश्यकता होती, असें कित्येकांना वाटण्याचा संभव आहे. पूर्वीच्या चरित्रांमध्यें समर्थांचें माहात्म्य, समर्थांचें अलौकिकत्व, विशेषतः त्यांच्या अद्भुत कृत्यांवरून स्थापन करण्याचा प्रयत्न केला आहे. प्रस्तुत चरित्रांत त्यांचें अलौकिकत्व–त्यांच्या पवित्र आचरणावरून, त्यांच्या प्रखर वैराग्यावरून, त्यांच्या अनुपम स्वार्थत्यागावरून, त्यांच्या प्रोत्साहक, उत्तेजक व चैतन्योत्पादक ग्रंथांवरून, त्यांच्या वर उद्धृत केलेल्या त्रिकालाबाधित चतुःसूत्री शिकवणींवरून व त्यांच्या धर्ममूलक विवेकवैराग्यप्रधान प्रयत्नवादावरून स्थापन करण्यांत आलें आहे.

( ४ ) समर्थचरित्र लिहितांना समर्थवाङ्मय व समर्थकालीन एकनाथ, तुकाराम-प्रभृति श्रेष्ठ साधुसंतांचें वाङ्मय वाचून आत्मशुद्धि व्हावी हा ही एक समर्थचरित्र लिहिण्यांत आमचा मुख्य हेतु होता. समर्थांच्या चरित्राची रूपरेखा आंखल्याप्रमाणें

समर्थचरित्र सविस्तर लिहिण्याकरितां समर्थांचीं पूर्वचरित्रें व समर्थवाङ्मय व समर्थशतकांतील संत व कवि यांचीं चरित्रें व त्यांचें कांहीं वाङ्मय मननपूर्वक वाचण्यांत दीड वर्ष आमचा काळ आनंदांत गेला. तीं चरित्रें व तें वाङ्मय वाचण्यांत आम्ही गढून गेलों होतों. आमच्या आयुष्यांतील तो काल सत्कार्यीं लागत आहे असें वाटून आम्हांस अत्यंत आनंद होत असे. श्रीरामदासकथासारामृतकार श्री. भीमराव पारळकर यांच्या पुढील ओंवीप्रमाणें आमची श्रीसमर्थचरित्र लिहितांना स्थिति झाली होती. " मीं निज-निष्ठेचिया गुणें । आदरिलें श्रीसमर्थचरित्रगाणें ॥ श्रीसमर्थचरित्रगुणीं चित्त वेधणें । हें माझें मीच जाणें सुख पूर्ण ॥ " ( श्रीरामदासकथासारामृत १. ११९ ). श्रीसमर्थ-चरित्र लिहितांना श्रीसमर्थ व श्रीशिवाजीमहाराज यांचा अन्योन्य संबंध कळण्याकरितां शिवाजीमहाराजांचीं संस्कृत, मराठी व इंग्रजी चरित्रें व ऐतिहासिक पत्रें व निबंध वाचण्याचा ही सुयोग आला. महाराष्ट्रधर्मसंस्थापक सद्गुरु श्रीसमर्थ रामदास यांचीं अनेक चरित्रें वाचतांना जसा आमचा काळ आनंदांत गेला, तसाच महाराष्ट्रराज्य-संस्थापक सच्छिष्य श्रीशिवाजीमहाराज यांचीं अनेक चरित्रें वाचतांना ही आमचा काळ आनंदांत गेला.

( ५ ) सुशिक्षित महाराष्ट्रजनतेचा वेळ—विशेषतः राष्ट्रोन्नतीच्या पवित्र कार्यांत पडलेल्या सुशिक्षित लोकांचा वेळ, समर्थांचीं मराठी, इंग्रजी—प्राचीन अर्वाचीन—अनेक चरित्रें वाचण्यांत न जातां त्यांना थोडक्या वेळांत समर्थांच्या ग्रंथांतील, समर्थांच्या उप-देशांतील, समर्थांच्या शिकवणुकींतील रहस्य कळावें व त्यांचा बाकी सर्व अमोलिक वेळ तें रहस्य कृतींत आणण्यांत जावा व त्यांनीं स्वराज्यसंपादनाच्या कार्यांत अधिक उत्साहानें, पूर्ण सावधपणानें व अत्यंत साक्षेपानें पडावें हा ही समर्थचरित्र लिहिण्यांत आमचा एक हेतु आहे.

( ६ ) डेक्कन कॉलेजांत असतांना आम्ही तेथील वक्तृत्वोत्तेजक सभेचे चिटणीस होतों, त्या वेळीं कॉलेजक्रम संपल्यावर मराठी भाषेची अल्पस्वल्प सेवा करावी असा आमच्या कांहीं मराठी भाषाप्रेमी वर्गबंधूंबरोबर आम्हीं ही संकल्प केला होता. त्या वेळीं आमच्या वर्ग-बंधूंनीं कांहीं मराठी कवींची वाटणी केली. आमच्या वाटणीस आर्यापति ' मोरोपंत ' आले होते. कॉलेजक्रम संपून वकिली करूं लागल्यावर फावल्या वेळीं आम्हीं पंतांचें महाभारत, केकावली, अंबरीषाख्यान, संशयरत्नमाला इत्यादि कांहीं कविता वाचली. श्रीयुत देव यांनीं समर्थवाङ्मय प्रसिद्ध करण्याचें सुरू केल्यावर पंत-वाङ्मय वाचीत असतां आम्हीं समर्थ-वाङ्मय वाचावयास ही सुरुवात केली. तेव्हां हल्लींच्या काळीं स्वराज्योत्तेजक समर्थवाङ्मया-पासून महाराष्ट्रजनतेस अधिक उपयोग होईल असें वाटलें व वकिली सोडल्यावर बाल-गोपालांना समर्थांचें तेजस्वी व ओजस्वी वाङ्मय सुलभ होण्याकरितां प्रथम सुलभ दासबोध व समर्थरत्नसंग्रह हे छोटे ग्रंथ प्रसिद्ध केले व नंतर बालबोध समर्थवाङ्मयमाला सुरू केली. कॉलेजांत केलेला संकल्प स्वतंत्र ग्रंथ लिहून यथाशक्ति पुरा करावा हा ही एक हें समर्थचरित्र लिहिण्यांत आमचा हेतु आहे.

( ७ ) सुप्रसिद्ध समर्थवाङ्मयभक्त श्रीयुत शंकर श्रीकृष्ण देव यांनीं समर्थवाङ्मय-संशोधनांत २७।२८ वर्षें घालविलीं आहेत. समर्थवाङ्मय व समर्थशिष्य व प्रशिष्यवाङ्मय उत्तम प्रस्तावनेसह प्रसिद्ध करून त्यांनीं साक्षर महाराष्ट्रजनतेस ऋणी करून ठेवलें आहे. तेव्हां समर्थचरित्र लिहिण्यास तेच सर्वथा योग्य आहेत. त्यांनीं समर्थचरित्र लिहावें अशी महाराष्ट्रजनतेची उत्कट इच्छा होती व आहे. परंतु श्रीयुत देव म्हणतातः— "श्रीसमर्थांचें चरित्र लिहिण्याची वेळ अजून आली नाहीं असें मी म्हणतों, तें कांहींतरी नव्हे. चरित्र लिहिण्यास आवश्यक अशी साधनसामग्री अद्याप कितीतरी मिळवावयाची आहे. शके १५९४ ते १६०३ पर्यंतचीं थोडीं तरी पत्रें मिळालीं आहेत, परंतु तत्पूर्वीचीं पत्रें मुळींच उपलब्ध नाहींत असें म्हटलें तरी चालेल. कृष्णातीरीं शके १५६६ पासून शके १५९६ पर्यंत श्रीसमर्थांनीं जो व्याप केला, त्यासंबंधाचीं हजारों पत्रें मिळतील अशी मला अपेक्षा आहे. प्रत्यक्ष श्रीसमर्थशिष्यांपैकीं एखाद्यानें, फार तर काय पण खुद्द श्रीकल्याणस्वामींनीं लिहिलेलें श्रीसमर्थांचें विस्तृत चरित्र कां सांपडूं नये, त्याला कांहीं कारण मला सांगतां येत नाहीं. इतकी सर्व सामग्री मिळावी, त्यांच्या चरण-स्पर्शानें पवित्र झालेलीं सर्व स्थळें पहावीं, त्यांच्या चरणकमलांचा सारखा ध्यास लागावा, कल्पनाशक्ति पूर्ण जागृत व्हावी, त्यांनीं कृपा करावी आणि मग एकाद्या निवांत, निरामय घळींत किंवा स्थळीं राहून त्यांचें चरित्र लिहावें." ( शके १८३८, रामदास आणि रामदासी, भाग १५, पान १६२ ). नंतर शके १८४२ सालीं १७ व्या भागाच्या प्रस्तावनेंत ते पुन्हां म्हणतातः— "हे विषय ( सांप्रदायिक विविध विषय ) म्हणजे पुढेंमागें आपणांस जें श्रीसमर्थांचें साधार व साद्यंत चरित्र लिहावयाचें आहे, त्याचीं साधनें होत. तसें चरित्र लिहिण्याची वेळ आणखी तीन वर्षांनीं यावी असें वाटतें." तीन नव्हे तर बारा वर्षें होऊन गेलीं, तरी श्रीयुत देवकृत साधार व साद्यंत श्रीसमर्थचरित्र महाराष्ट्र-वाचकांच्या हातीं अद्याप पडलें नाहीं. याचें मुख्य कारण श्रीयुत देव यांच्या अपेक्षेप्रमाणें अद्याप समर्थचरित्राची साधनसामग्री त्यांना मिळालेली नाहीं, हेंच असावें असें दिसतें. शिवाय श्रीयुत देव यांना जबाबदारीचीं कामें फार आहेत. रामदासवाङ्मय-संशोधनांत त्यांचा बराच वेळ जातो. 'रामदास आणि रामदासी' या उपयुक्त व भारदस्त मासिकाची सर्व जबाबदारी त्यांच्या वरच आहे. अलीकडे कांहीं वर्षें समर्थांची जन्मभूमि जांब येथील श्रीसमर्थ-मंदिराकरितां त्यांना महाराष्ट्रांत व बृहन्महाराष्ट्रांत दौरा काढावा लागला होता. त्या मंदिराचा उद्घाटनविधि गेल्या वर्षीं श्रीरामनवमीस जांब येथें मोठ्या थाटानें झाला. त्याचें सर्व श्रेय श्रीयुत देव यांनाच आहे. अद्याप ही तेथील कांहीं काम पुरें होण्याचें आहे. त्यांतून मोकळे झाल्यावर श्रीसमर्थांचें साधार व साद्यंत चरित्र लिहून महाराष्ट्र-वाचकांची आकांक्षा श्रीयुत देव लवकरच तृप्त करतील अशी आशा आहे.

( ८ ) श्री. देव यांनीं समर्थांचें चरित्र लिहिण्यापूर्वी चरित्रकारानें कोणत्या गोष्टी कराव्या हें 'रामदास आणि रामदासी' भाग १५, लेखांक २७, यांत त्यांनीं सांगितलें आहे.

चरित्रसाधनाचा शोध कोठें व कसा ध्यावा याविषयीं त्यांनीं सदर लेखांत २५ सूचना केल्या आहेत. श्रीयुत देव यांनीं निर्दिष्ट केलेल्या सर्व ठिकाणीं जाऊन त्यांनीं सुचविल्या-प्रमाणें सर्व प्रकारें आमच्या हातून प्रयत्न झाला नाहीं हें आम्ही प्रांजलपणें कबूल करितों. आम्हीं फक्त पुढील ठिकाणीं जाऊन त्यांपैकीं कांहीं ठिकाणीं चरित्रसाधनाचा अल्पस्वल्प प्रयत्न केला आहे:—समर्थांची जन्मभूमि जांब, तपोभूमि नाशिक व टांकळी, कर्मभूमि चाफळ, समाधिभूमि सज्जनगड, सुप्रसिद्ध अकरा मारुति व तेथील मठ व सातारा जिल्ह्यांतील समर्थसंचारांनीं पवित्र झालेलीं स्थळें. यांशिवाय समर्थांच्या तीर्थयात्रेंतील पुढील स्थळीं जिज्ञासु बुद्धीनें आम्हीं प्रवास केला आहे:—काशी, प्रयाग, गया, अयोध्या, हरिद्वार, द्वारका, मथुरा, वृंदावन, गोकुळ, अवंतिका, सोमनाथ, ओंकारेश्वर, त्र्यंबकेश्वर, पंढरपूर, औदुंबर, कोल्हापूर, पराशरक्षेत्र, परशुरामक्षेत्र, महाबळेश्वर, रामेश्वर व सेतुबंध. दक्षिण हिंदुस्थानांतील तंजावरप्रभृति पुष्कळ महत्त्वाच्या ठिकाणीं आम्हांस अद्याप जातां आलें नाहीं. वरील लेखांतील चवथ्या कलमांतील महत्त्वाची सूचना, "श्रीसमर्थांच्या शिष्यांचे एकोन एक मठ धुंडावे," ही आमच्या हातून पूर्णपणें पार पडलेली नाहीं. समर्थचरित्रलेखनाचें काम हातीं घेतल्यावर कांहीं दिवस चालवून तसें करण्याची आमची इच्छा होती, परंतु संचारप्रतिबंधानें आम्हांस तसें करितां आलें नाहीं. तेव्हां श्रीयुत देव यांच्या म्हणण्याप्रमाणें समर्थांचें चरित्र लिहिण्याची आमची योग्यता नाहीं, असें असतां ही आम्ही समर्थचरित्र लिहिण्यास प्रवृत्त झालों म्हणून श्रीयुत देव व कांहीं समर्थभक्त आम्हांवर रागावतील; परंतु "क्रोधोऽपि निर्मलधियां स्पृहणीय एव" या कविवचना-प्रमाणें त्यांचा क्रोध ही स्पृहणीय मानून आम्हीं हें समर्थचरित्र लिहिण्याचें धाष्टर्य केलें आहे.

( ९ ) श्रीसमर्थचरित्र लिहून श्रीसमर्थांची अल्पस्वल्प सेवा करावी अशी कल्पना केव्हां केव्हां आमच्या मनांत येत असे. आम्हीं 'बालबोध समर्थ-वाङ्मय-माला' सुरू केल्यावर त्या मालेंत समर्थचरित्राचें एक लहान पुष्प गुंफावें अशा सूचना ही कित्येक समर्थभक्तांनीं आम्हांस केल्या होत्या. समर्थचरित्र लिहिण्यास सर्वांत विश्वसनीय साधन त्यांचें ग्रंथांतर्गत आत्मचरित्र असें आम्हांस वाटलें व त्याप्रमाणें आम्हीं वरील मालेंत 'समर्थांचें आत्मचरित्र' हें पुष्प गुंफलें. नंतर समर्थांचें एक सविस्तर चरित्र लिहावें असें आम्हांस वाटूं लागलें. तथापि 'श्रीसमर्थांचें चरित्र केव्हां लिहावें' हा श्री. देवांचा वरील मननीय लेख वाचून आमचें मन साशंक होई. परंतु श्रीयुत देव यांचाच एक आधार आम्हांस हें चरित्र लिहिण्यास पुढें कारणीभूत झाला. श्रीयुत पारळकरकृत 'श्रीरामदास-कथासारामृत' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत श्रीयुत देव म्हणतात:—"श्रीसमर्थांचें चरित्र लिहिण्याची वेळ आली नाहीं हें जरी खरें आहे, तरी तोंपर्यंत सर्वांनीं थांबलेंच पाहिजे असें नाहीं. श्रीसमर्थांच्या प्रत्यक्ष शिष्यांनीं लिहिलेलीं दहापांच लहानमोठीं चरित्रें उपलब्ध व्हावींत, श्रीसमर्थांच्या हृदयाचें आविष्करण करणारीं शेंकडों कागदपत्रें

मिळावींत, श्रीसांप्रदायिक कागदपत्रांचा विपुल संग्रह हातीं यावा, आणि मग एखादें विस्तृत श्रीसमर्थचरित्र लिहिलें जावें असें जरी मला वाटतें, तरी त्या मार्गानें जातांना मुक्कामासुक्कामांच्या ठिकाणीं असल्या चरित्र-ग्रंथांनीं मार्गदर्शकाचें काम करावें हें योग्यच होय." श्री. देवांचा वरील लेख वाचून आम्हांस थोडा धीर आला व समर्थ-चरित्र लिहिण्याच्या उद्देशानें आम्हीं समर्थांचीं प्राचीनअर्वाचीन चरित्रें व सांप्रदायिक व इतर ऐतिहासिक शिवसमर्थकालीन पत्रसंग्रह वाचण्यास सुरुवात केली. परंतु मध्यंतरीं कांहीं वर्षें महाराष्ट्र-प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या कामाकरितां व महाराष्ट्र-खादीप्रचारकसंघाच्या कामाकरितां महाराष्ट्रांत फिरावें लागल्यामुळें समर्थचरित्रासंबंधीं सर्व वाङ्मय संपूर्ण वाचून झालें नाहीं. तो सुयोग गतवर्षीं येरवडा कारागृहांत ऊर्फ स्वराज्याश्रमांत प्राप्त झाला. चरित्रासंबंधीं कांहीं वाङ्मय वाचावयाचें राहिलें होतें, तें वाचण्यास त्या एकांत स्थळीं मुबलक वेळ मिळाला. तें वाङ्मय वाचल्यावर समर्थचरित्राची 'रूपरेषा' आम्हीं **त्या एकांत स्थळींच** आंखली. श्रीयुत देव म्हणतातः—"श्रीसमर्थ-चरित्र एकाद्या नितांत, निरामय घळींत किंवा स्थळीं राहून लिहावें." श्रीसमर्थचरणानें पवित्र झालेली निसर्गरमणीय चाफळनजीकची रामघळ प्रत्यक्ष पाहण्याचा सुयोग जरी आम्हांस आला होता, तरी त्या पवित्र स्थळीं श्रीसमर्थचरित्राची रूपरेषा आंखण्याचें भाग्य आमच्या नशीबीं नव्हतें. तरी महात्मा गांधी व कै. लोकमान्य टिळक यांच्या चरणांनीं पवित्र झालेला एक सुप्रसिद्ध स्वराज्याश्रम आम्हांस श्रीसमर्थचरित्राची रूपरेषा तयार करण्यास मिळाला हें ही एक प्रकारचें भाग्यच आम्ही समजतों.

( १० ) साधुसंतांचें वाङ्मय वाचण्याचा नाद आम्हांस अगदीं लहानपणापासून म्हणजे आमच्या वयाच्या सातव्या वर्षापासून लागला. त्यास कारण आमच्या कैलासवासी परमपूज्य मातोश्री होत. त्या नियमानें दररोज निजण्यापूर्वी श्रीज्ञानेश्वर व श्रीतुकाराम यांचे कांहीं अभंग पाठ म्हणत असत. नित्यश्रवणानें आमचे ते अभंग सहज पाठ झाले व नंतर मराठी शाळेंत व इंग्रजी शाळेंत नवनीतांतील साधुसंतांच्या कविता व अभंग वाचण्याचा आम्हांस नाद लागला. डेक्कन कॉलेजांत गेल्यावर आमचे सहाध्यायी सन्मित्र श्रीयुत ल. रा. पांगारकर यांचें मराठी भाषेचें स्वरूप या विषयावर एक सुश्राव्य व्याख्यान झालें. तें ऐकल्यावर साधुसंतांच्या कवितांप्रमाणें वामन पंडित, मोरोपंतप्रभृति कविश्रेष्ठांच्या ही कविता वाचण्याचा नाद आम्हांस लागला व तो पुढें कॉलेज सुटून वकिली करूं लागल्यावर ही कायम होता. परंतु त्या वेळीं वकिलीचें काम करून मराठी वाङ्मय वाचण्यास विशेष वेळ मिळत नसे. महाराष्ट्र-संत-कवींची कविता मननपूर्वक वाचून मराठी भाषेची अल्प सेवा करावी असा संकल्प केला होता, तो तसाच राहिला. सन १९२१ सालीं महात्मा गांधींच्या असहकार-युगांत वकिली सोडल्यावर तो संकल्प पुरा करण्यास वेळ मिळाला. वकिली सोडल्यावर समर्थ-वाङ्मय मननपूर्वक वाचण्यास आम्हीं सुरुवात केली. आणि शके १८४५ सालीं ( सन १९२३ ) 'सुलभ दासबोध' प्रसिद्ध केला व नंतर शके

१८४७ सालीं ‘ समर्थ-रत्न-संग्रह ’ प्रसिद्ध केला. शके १८४८ सालीं ‘ बालबोध समर्थ-वाङ्मय-माला ’ सुरू केली. त्याच वर्षीं सदर मालेंतील पहिलीं दोन पुष्पें–( १ ) ‘ समर्थांची करुणापर कविता ’ व ( २ ) ‘ समर्थसुभाषित ’ हीं प्रसिद्ध केलीं. नंतर बनारस हिंदु विश्वविद्यालयांत समर्थचरित्रावर एक इंग्रजी व्याख्यान देण्याचा योग आला. त्या वेळीं परमपूज्य पंडित मदनमोहन मालवीय यांनीं:–"Write in English the life of Ramadas Swami, the preceptor of Shivaji —the founder of the Maratha Empire–" "मराठा साम्राज्याचे संस्थापक शिवाजीमहाराज यांचे गुरु रामदासस्वामी यांचें इंग्रजींत चरित्र लिहा" अशी सूचना केली. सन १९२३ सालीं आम्ही कोकोनाडा येथील राष्ट्रीय सभेस गेलों होतों, त्या वेळीं मद्रास इलाख्यांतील एका प्रसिद्ध प्रोफेसरांनीं ही रामदासांचें चरित्र इंग्रजींत लिहिण्यास व दासबोधाचें इंग्रजींत भाषांतर करण्यास आम्हांस सूचना केली होती. महाराष्ट्राबाहेरील प्रांतांतील विद्वान् लोकांना समर्थांचें चरित्र व ग्रंथ वाचण्याची जिज्ञासा आहे हें यावरून व्यक्त होतें. असो. "समर्थांचें चरित्र प्रथम मराठींत लिहिण्याचा प्रयत्न करतों " असें आम्ही पंडित मालवीयजींना सांगितलें व सदर चरित्रास साहाय्यक म्हणून शके १८५१ सालीं ‘ समर्थांचें आत्मचरित्र ’ हें ‘ समर्थ बालबोध-वाङ्मय-मालें’तील तिसरें पुष्प म्हणून प्रसिद्ध केलें व शके १८५३ सालीं चवथें पुष्प ‘ मनोबोध ’ हें प्रसिद्ध केलें. मनोबोधाच्या प्रस्तावनेंत आम्हीं समर्थांचें अल्प चरित्र दिलें आहे. तें अल्प चरित्र वाचल्यावर आम्ही समर्थांचें सविस्तर लिहावें अशा कांहीं समर्थभक्तांनीं सूचना केल्या. त्यास अनुसरून आम्ही चरित्र लिहिण्यास आरंभ करणार, इतक्यांत नवीन वटहुकमी कायद्याप्रमाणें आम्हांस येरवडा येथील कारागृहांत दोन महिने जाण्याचा योग आला. त्या अवधींत त्या शांत व उपाधिरहित स्थळीं समर्थचरित्र लिहिण्यास उपयोगी अशीं पूर्वीं न वाचलेलीं बरींच पुस्तकें आम्हांस वाचण्यास मिळालीं. तीं तेथें वाचून त्या निवांत स्थळींच आम्हीं श्रीसमर्थचरित्राची **रूपरेषा** आंखली व बाहेर आल्यावर राहिलेले समर्थचरित्रोपयोगी ग्रंथ वाचून हें सविस्तर चरित्र लिहिलें आहे.

( ११ ) आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या समर्थचरित्रांची त्रोटक माहिती आम्हीं ‘ चरित्रसाधनें ’ या पहिल्या भागांत दिली आहे. तीवरून कोणतीं चरित्रें किती विश्वसनीय आहेत हें वाचकांना कळून येईल. श्रीयुत अनंत गोपाळ कुडाळकरकृत वाकेनिशी–टिप्पण समर्थांच्या समाधीनंतर चारच दिवसांनीं लिहिलें असल्यामुळें तें विश्वसनीय आहे. त्यासंबंधीं सविस्तर विवेचन ‘ चरित्रसाधनें ’ या भागांत आम्हीं केलें आहे. सदरहू भाग छापून झाल्यावर डॉ. मा. स. केळकर यांनीं ‘ पुरुषार्थ ’ मासिकाच्या ‘ शिवाजी अंकां ’तील ‘ शिवसमर्थ–भेट ’ या लेखांत वाकेनिशी–टिप्पण हनुमंतस्वामींच्या बखरीवरून तयार केलेलें असावें, असें अनुमान काढलें आहे. परंतु डॉ. केळकर यांचें हें अनुमान वाकेनिशी–टिपणांतील शक व गोष्टी व ह. स्वा.च्या बखरींतील शक व गोष्टी ताडून पाहतां मुळींच खरें ठरत नाहीं. वाकेनिशी–टिपणांतील शक व गोष्टी व ह. स्वा.च्या

बखरींतील शक व गोष्टी आम्हीं परिशिष्ट ( ३ ) मध्यें दिल्या आहेत. त्यांवरून डॉ. केळकरांचें अनुमान चुकीचें आहे हें वाचकांस सहज कळून येईल. वाकेनिशी–टिपणापेक्षां ह. स्वा.च्या बखरींत तेरा शक अधिक आहेत. एवढेंच नव्हे तर कांहीं गोष्टींसंबंधानें वाकेनिशी–टिपणांतील शक व मिति ह. स्वा.च्या बखरींतील शक व मितींहून भिन्न आहेत, हें डॉ. केळकरांसारख्या चिकित्सक टीकाकारांच्या लक्षांत कसें आलें नाहीं याचें आश्चर्य वाटतें. ह. स्वा.च्या बखरीवरून जर वाकेनिशी–टिपण तयार केलें असतें तर अफझुलखानचा वध, समर्थांनीं आपली व्यथा दूर होण्याकरितां शिवाजीमहाराजांना वाघिणीचें दूध काढून आणण्यास सांगितलेली गोष्ट, या व अशा महत्त्वाच्या आणखी कांहीं गोष्टी, ज्या ह. स्वा. च्या बखरींत दिल्या आहेत, त्या वाकेनिशी–टिपणकारानें आपल्या टिपणांत स्थान घेतल्या असत्या.

वाकेनिशी–टिपणांत कलम १३, १४, १५, १७, १८, २४, २५, २६, २७, २८ व ३२ यांतील समर्थचरित्रांतील अकरा गोष्टींसंबंधानें सविस्तर चरित्रें अलाहिदा उद्धव गोसावी, बाजीपंत, वेणाबाई, त्रिंबक गोसावीप्रभृति भक्तमंडळींनीं लिहिलेलीं आहेत असा स्पष्ट उल्लेख आहे, परंतु ह. स्वा. च्या बखरीचा मुळींच उल्लेख नाहीं. त्यावरून हें वाकेनिशी-टिप्पण–श्रीयुत अनंत गोपाळ कुडाळकर टिपणांत म्हणतात त्याप्रमाणें–समर्थांच्या समाधीनंतर लागलींच चार दिवसांनीं दिवाकरगोसाव्यांच्या सांगण्यावरून त्यापूर्वीं लिहिलेल्या भक्तमंडळीकृत चरित्रांवरून 'स्मरणार्थ' लिहिलें आहे हें सिद्ध होतें.

वाकेनिशी-टिप्पण कै. इतिहासाचार्य राजवाडे यांना चाफळ येथें श्रीयुत बापुराव उपाध्ये यांच्या घरीं कागदपत्रांच्या गळाठ्यांत सांपडलें. त्यांतील भाषेवरून व मजकुरावरून तें समर्थसमाधीनंतर लागलीच चार दिवसांनीं दिवाकरगोसाव्यांच्या सांगण्यावरून अनंत गोपाळ कुडाळकर यांनीं लिहिलें, हें कोणा ही मनुष्यास सहज कळून येणारें आहे. ऐतिहासिक स्वतंत्र व विश्वसनीय पुराव्यावरून तें ह. स्वा. च्या बखरीनंतर म्हणजे शके १७४० नंतर अमक्या सांप्रदायिकानें, दिवाकर गोसावी, अनंत गोपाळ कुडाळकर, उद्धव गोसावी, बाजीपंत, वेणाबाई व त्रिंबक गोसावीप्रभृति समर्थकालीन मंडळींचीं नांवें टिपणांत घुसडून बनावट तयार केलें, हें सप्रमाण सिद्ध केल्याशिवाय तें ह. स्वा. च्या बखरीवरून तयार केलें असावें असें मोघम अनुमान काढल्यास त्यावर कोणाचा ही विश्वास बसणार नाहीं.

ह. स्वा. च्या बखरींत जे अधिक शक व ज्या अधिक गोष्टी दिल्या आहेत ते शक व त्या गोष्टी हनुमंतस्वामींच्या आज्ञेनें ती बखर तयार करणारे चाफळमठाचे कारभारी रंगो लक्ष्मण व शिवाजीमहाराजांचे सप्तप्रकरणात्मक चरित्रकार मल्हार रामराव चिटणीस यांनीं इतर कागदोपत्रीं पुराव्यांवरून अधिक माहिती मिळवून बखरींत घातल्या आहेत. कांहीं ठिकाणीं ह. स्वा. च्या बखरींत शक व तिथि वाकेनिशीहून भिन्न आहेत याचा ही वरील गोष्टीवरून उलगडा होतो.

( १२ ) वाकेनिशी–टिपण विश्वसनीय आहे तरी त्यास समर्थ-चरित्र म्हणतां येणार नाहीं. पूर्वी लिहून ठेवलेल्या समर्थचरित्रांतील कांहीं महत्त्वाच्या गोष्टींचें तें 'स्मरणार्थ' टिप्पण आहे. समर्थशिष्यप्रशिष्यांनीं व संतविजयकारप्रभृतींनीं लिहिलेलीं चरित्रें शकतिथिवार यथाक्रम नाहींत. ह. स्वा. च्या बखरींत समर्थ-चरित्र यथाक्रम सविस्तर दिलें आहे. अद्भुत गोष्टींवर त्या काळीं लोकांचा विश्वास होता, म्हणून त्या बखरींत त्यांचें अतिशयोक्तिपूर्वक वर्णन केलें आहे, हें ध्यानांत ठेवून वाचकांनीं ती बखर वाचावी अशी आमची त्यांना विनंति आहे. अर्वाचीन काळीं दोनच समर्थचरित्रें सविस्तर व यथाक्रम लिहिलीं आहेतः–(१) श्रीयुत पारळकरकृत 'श्रीरामदासकथासारामृत' व (२) कै. कृ. ना. आठल्येकृत 'समर्थांचें सामर्थ्य अथवा रामदासस्वामींचा लीलानुग्रह.' प्राचीन सांप्रदायिक चरित्रकारांप्रमाणें या दोन्ही चरित्रकारांनीं ही अद्भुत गोष्टींवर विशेष भर देऊन समर्थांचें श्रेष्ठत्व स्थापन केलें आहे. प्रस्तुत चरित्रांत समर्थांचें श्रेष्ठत्व अद्भुत गोष्टींवरून सिद्ध करण्याचा प्रयत्न केला नाहीं हें प्रस्तावनेच्या प्रारंभींच आम्हीं सांगितलें आहे. समर्थ-चरित्र शकतिथिवार यथाक्रम लिहितांना प्राचीन चरित्रांत दिलेल्या अद्भुत गोष्टींचा त्या त्या शकांत समर्थ कोठें होते हें कळण्याकरितां नुसता नामनिर्देश केला आहे व पुढें एका स्वतंत्र भागांत त्या अद्भुत गोष्टी थोडक्यांत दिल्या आहेत. समर्थांप्रमाणें ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ व तुकाराम या साधुसंतांच्या चरित्रांत ही अनेक अद्भुत गोष्टी सांगितल्या आहेत. परंतु त्यांचा मोठेपणा त्यांच्या अद्भुत गोष्टवरच अवलंबून आहे असें आम्हांस वाटत नाहीं.

ज्ञानदेवांनीं रेड्याकडून वेद वदविले म्हणूनच ते श्रेष्ठ साधु नव्हेत, तर त्यांनीं ज्ञानेश्वरीसारखा उत्कृष्ट धार्मिक ग्रंथ लिहिला व सुप्रसिद्ध वारकरी ऊर्फ भक्तिपंथाचा 'पाया रचिला' म्हणून ते श्रेष्ठ साधु होत. नामदेवांनीं आपल्या अनन्यभक्तीनें श्रीविठोबारायास नैवेद्य भक्षण करावयास लावलें म्हणूनच ते थोर संत नव्हेत, तर त्यांनीं भक्तिपर व नीतिपर अभंग लिहून ज्ञानदेवांच्या भक्तिपंथाचा 'विस्तार' केला म्हणून ते थोर संत होत. एकनाथांनीं स्वर्गस्थ पितरांना श्राद्धास भूलोकीं आणिलें म्हणूनच ते अलौकिक संत नव्हेत, तर भागवतरामायणादि धार्मिक ग्रंथ मराठी भाषेंत लिहून ज्ञानदेवांच्या भक्तिमार्गाचा त्यांनीं 'ध्वज उभारिला' म्हणून ते अलौकिक संत होत. तुकारामांनीं आपल्या सिद्धिसामर्थ्यानें शिवाजीमहाराजांच्या सैन्याला भोजन घातलें अगर ते सदेह विमानांतून वैकुंठास गेले म्हणूनच ते संतशिरोमणि नव्हेत, तर त्यांनीं आपल्या अभंग-वाणीनें बहुजन समाजास 'वेदवेदान्त' सांगितला व ज्ञानदेवांच्या भक्तिपंथावर 'कळस' चढविला म्हणून ते संतशिरोमणि होत. त्याचप्रमाणें उद्धवपित्याच्या अंगावर गंगोदक शिंपडून समर्थांनीं त्यास जिवंत केलें, अगर एका मोळीविक्या महाराकडून एका सुप्रसिद्ध पंडिताचा वादांत पराभव करविला म्हणूनच ते थोर विभूति नव्हेत, तर त्यांनीं आपल्या उपदेशानें कर्तव्यमूढ महाराष्ट्रास कर्तव्यदक्ष केलें, ग्रंथराज दासबोधांत परमार्थ व व्यवहार, धर्मकारण व राजकारण यांचें

मधुरमीलन करून बहुजन समाजाचीं अंतःकरणें शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनेकडे वळविलीं, व महाराष्ट्रजनतेस धर्ममूलक विवेकवैराग्यप्रधान प्रयत्नवाद शिकविला म्हणून ते थोर विभूति होत.

( १२ ) मुंबई इलाख्यांत विश्वविद्यालय स्थापन झाल्यावर त्यांतून प्रथम बाहेर पडलेल्या विद्वान पदवीधरांची मराठी भाषेकडे विशेष प्रेमदृष्टी नव्हती. अर्थातच मराठी कवितेकडे त्यांनीं विशेष लक्ष दिलें नाहीं. कै. परशुरामपंत तात्या गोडबोले यांनीं सन १८५८ सालीं 'नवनीत' प्रसिद्ध करून ज्ञानेश्वरापासून तों पेशवाईच्या अखेर कालापर्यंतच्या कवींची कांहीं प्रसिद्ध कविता कवींच्या अल्प चरित्रांसह महाराष्ट्रजनतेपुढें ठेविली. नंतर आधुनिक महाराष्ट्राचे जनक सुप्रसिद्ध कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं निबंधमालेंतील लेखांनीं सुशिक्षित लोकांचें लक्ष मराठी भाषेकडे व मराठी कवितेकडे वळविलें. कै. लोकमान्य टिळक व कै. प्रि. आगरकर यांनीं सुप्रसिद्ध केसरी वर्तमानपत्रांत जोरदार, मुद्देसूद व प्रोत्साहक लेख लिहून मराठी भाषेंत स्वराज्यभावनोद्दीपक लेख लिहितां येतात, हें महाराष्ट्रजनतेच्या निदर्शनास आणिलें. ( ती त्यांची परंपरा श्री. न. चिं. केळकर व श्री. कृ. प्र. खाडिलकर यांनीं अद्यापि चालविली आहे. ) पुढें कै. का. वि. साने, जनार्दन बाळाजी मोडकप्रभृति पदवीधरांनीं 'काव्येतिहाससंग्रह' सुरू करून पूर्वी अप्रकाशित असलेली बरीच कविता टीपा देऊन प्रसिद्ध केली. समर्थवाङ्मयाचा पहिला ग्रंथ 'श्रीरामदासस्वामीकृत रामायण व कांहीं इतर प्रकरणें' हा कै. ज. बा. मोडक यांनीं शके १८०९ सालीं ( सन १८८८ ) काव्येतिहाससंग्रहांतून प्रसिद्ध केला. त्या ग्रंथाच्या आरंभीं त्यांनीं समर्थांचें अल्प चरित्र ही यथाक्रम दिलें आहे. नंतर कै. राजवाडे, कै. वासुदेवशास्त्री खरे, कै. पारसनीस व श्रीयुत गो. स. सरदेसाईप्रभृति विद्वान् गृहस्थांनीं इतिहाससंशोधनास आरंभ करून ऐतिहासिक ग्रंथ लिहून मराठी भाषेची उत्तम सेवा केली. कै. ह. ना. आपटे यांनीं ऐतिहासिक व सामाजिक कादंबऱ्या लिहून मराठी भाषेची अनुपम सेवा केली. श्रीयुत केळुसकर यांनीं मराठी भाषेंत शिवाजीमहाराजांचें पहिलें सविस्तर व साद्यंत चरित्र लिहिण्याचा स्पृहणीय मान मिळविला व सुशिक्षित क्षत्रिय व मराठा समाजास मराठी भाषेची सेवा करण्याचा धडा घालून दिला. त्यांचें अनुकरण आमचे सुशिक्षित क्षत्रिय व मराठा बंधु करतील अशी आम्हांस आशा आहे.

शके १८२५ सालीं कै. राजवाडे यांनीं 'रामदास' हा उत्कृष्ट निबंध प्रसिद्ध केला. नंतर लवकरच श्रीयुत शं. कृ. देव यांनीं समर्थवाङ्मयसंशोधनास व प्रकाशनास आरंभ केला व शके १८२७ सालीं कल्याणस्वामींच्या बाडावरून 'दासबोध' प्रसिद्ध केला. समर्थवाङ्मयसंशोधनाचें त्यांचें स्तुत्य काम अद्याप अव्याहत सुरू आहे. श्रीयुत ल. रा. पांगारकर यांनीं आपला सर्व काल महाराष्ट्र-संत-कवींच्या ग्रंथांच्या अध्ययनांत खर्च करून ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ, मोरोपंतप्रभृति संतांचीं व कवींचीं उत्कृष्ट चरित्रें लिहून व इतर अनेक उत्कृष्ट ग्रंथ लिहून मराठी भाषेची उत्तम सेवा एकसारखी तीस वर्षें चालविली आहे. श्रीयुत

पांगारकर यांनीं शके १८४५ सालीं दत्तात्रयस्वामींच्या हस्तलिखित प्रतीवरून भाषांतरासहित 'दासबोध' प्रसिद्ध केला. त्यांतील प्रस्तावनेंत समर्थचरित्र लिहिण्याचें त्यांनीं आश्वासन दिलें आहे, तें ते लवकरच परिपूर्ण करतील अशी आम्हांस आशा आहे. कै. के. ग. आठले यांनीं 'गूढार्थदीपिके'सह दासबोध तीन वर्षांपूर्वी प्रसिद्ध केला आहे. कै. कृ. ना. आठल्ये यांनीं या दोघांपूर्वीच भाषांतरासहित 'दासबोध' प्रसिद्ध केला होता.

( १४ ) श्री. देव यांच्या समर्थसंशोधनापासून पुष्कळ विद्वान लोकांचें लक्ष समर्थवाङ्मयाच्या अध्ययनाकडे चिकित्सक बुद्धीनें लागलें आहे, ही अभिनंदनीय गोष्ट आहे. श्रीयुत भय्याशास्त्री देव जामखेडकर यांनीं चिकित्साबुद्धीनें सन १९२१ सालांतील जानेवारी व फेब्रुवारीच्या विविधज्ञानविस्तारांत दोन लेख लिहून 'दासबोध' समर्थांचा नव्हे असें म्हटल्यावर महाराष्ट्रांत समर्थवाङ्मय चिकित्सक बुद्धीनें वाचणारे आणखी पुष्कळ विद्वान आहेत असें महाराष्ट्रजनतेस दिसून आलें. खुद्द वि. ज्ञानविस्तारांतच त्याच वर्षाच्या जुलईच्या अंकांत, साताऱ्याचे श्री. ल. य. पुरोहित, मुंबईचे श्री. ना. कृ. गद्रे, महाडचे श्री. स. ज. भागवत, जोधपूरचे प्रो. श्री. ब. ताटके यांनीं व खुद्द संपादकमहाशयांनीं ही श्रीयुत भय्याशास्त्री यांच्या म्हणण्याचें मुद्देसूद रीतीनें व चिकित्सक पद्धतीनें उत्तम खंडन केलें आहे. कऱ्हाडचे चि. श्रीयुत ग. स. आळतेकर यांनीं त्याच वर्षाच्या चित्रमयजगताच्या जुलई, ऑगस्ट, ऑक्टोबर व डिसेंबर या अंकांत श्रीयुत भय्याशास्त्री यांच्या मताचें क्रमशः सप्रमाण खंडन केलें आहे; शिवाय केसरी, मुमुक्षू, रामदास आणि रामदासी प्रभृति पत्रांतून व मासिकांतून ही समर्थवाङ्मय अभ्यासकांनीं व गूढार्थदीपिकेच्या प्रस्तावनेंत श्रीयुत अ. वा. वाळणकर यांनीं ही भय्याशास्त्री यांच्या मताचें मुद्देसूद खंडन केलें आहे.

गेल्या तीनचार वर्षांत शिवसमर्थभेटीचा वाद उपस्थित होऊन बरेच विद्वान पदवीधर समर्थवाङ्मयाचा चिकित्सकबुद्धीनें अभ्यास करूं लागले आहेत. मुंबई येथील सुप्रसिद्ध नवाकाळ या राष्ट्रीय दैनिक पत्राचे सहसंपादक श्रीयुत न. र. फाटक, 'महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास' या उत्कृष्ट पुस्तकाचे कर्ते प्रो. शं. दा. पेंडसे, 'केसरी'चे स्वराज्याश्रमवासी संपादक श्रीयुत ज. स. करंदीकर यांनीं समर्थवाङ्मय चिकित्सक बुद्धीनें वाचून विविधज्ञानविस्तार, लोकशिक्षण व शिवाजी निबंधावली यांमध्यें मननीय टीकात्मक लेख लिहिले आहेत.

( १५ ) हल्लींचा काळ अंधभक्तीनें अद्‌भुत गोष्टींवर विश्वास ठेवून कोणत्या ही विभूतीचा मोठेपणा ठरविण्याचा नाहीं हें आम्हांस मान्य आहे. परंतु चिकित्साबुद्धीनें टीका करितांना थोर विभूतींची व साधुसंतांची निंदा करणारा एक टीकाकारांचा वर्ग निर्माण झाला आहे. त्यायोगानें मराठी वाङ्मयास असभ्यपणाचें वळण लागण्याचा संभव आहे, या गोष्टीकडे साहित्यभक्तांनीं लक्ष दिलें पाहिजे. समर्थवाङ्मयाचे अभ्यासक आमचे एक विद्वान मित्र म्हणतात कीं, "हें तर्कप्रधान चिकित्सक युग आहे." हें

त्यांचें म्हणणें आम्हांस सर्वथा मान्य आहे. परंतु तर्कप्रधान चिकित्सक युगास निंदा-प्रधान टवाळी-युग बनवूं नका अशी आमची त्यांना नम्र विनंति आहे. आमचे वयोवृद्ध व ज्ञान-वृद्ध मित्र सुप्रसिद्ध रियासतकार श्रीयुत गो. स. सरदेसाई हे स्वतः चिकित्साबुद्धीनें टीका करणारे सुप्रसिद्ध इतिहासकार आहेत. चिकित्सक बुद्धीनें टीका करणाऱ्या तरुण लेख-कांच्या नीतिधैर्याची ते स्तुति करीत असतात. त्यांना सुद्धां "या वादांत केवळ टवाळखोर बुद्धीनें निष्कारण रामदासांची निंदा करणारा एक पक्ष निर्माण झाला आहे" हें कबूल करणें भाग पडलें आहे. (लोकशिक्षण, ज्येष्ठ, शके १८५३). वरील अंकांत ते पुढें म्हणतातः— "टवाळकी बाजूस सारून प्रामाणिक भावनेनें जे मुद्दे पुढें येतील, तेवढ्यांचाच चिकित्सक बुद्धीनें खल व्हावा." रियासतकारांचें हें मत आम्हांस मान्य आहे. आमच्या एका विद्वान मित्रांनीं स्वतःच अविश्वसनीय ठरविलेल्या जुन्या चरित्रग्रंथांतन मधलाच थोडासा भाग घेऊन कांहीं अनुमानें काकैकदृष्टीचे लोक काढतील असें म्हटलें आहे. त्यावर वेदवाक्या-प्रमाणें विश्वास ठेवून साधुसंतांच्या चरित्रांवर प्रहसनें होऊन मराठी वाङ्मयामध्यें अश्लील-पणा सुरू होऊं पाहत आहे, म्हणून आमच्या विद्वान मित्रांवर टीका करण्याचें कटु कर्तव्य आम्हांस करावें लागलें आहे. प्रो. भाटे, श्रीयुत गोविंदराव सरदेसाईप्रभृति विद्वान लेखकांनीं समर्थ राजकारणी होते कीं नव्हते याचें विवेचन करतांना चिकित्साबुद्धीनें टीका केली आहे, त्याबद्दल आमचें कांहीं म्हणणें नाहीं. रियासतकार म्हणतात त्याप्रमाणें "एकाचें मत गोष्टींचें आकलन (interpretation of facts) दुसऱ्याशीं जुळतेंच असें नाहीं." (लोकशिक्षण, ज्येष्ठ, शके १८५३) हल्लींचें महात्मा गांधींचें राजकारण सर्वांना पटतेंच असें नाहीं. म. गांधींना राजकारण समजत नाहीं असें प्रामाणिकपणानें म्हणणारे कांहीं विद्वान लोक आहेत. परंतु म. गांधींच्या शुद्ध चारित्र्यावर शिंतोडे टाकण्याचा निंद्य प्रयत्न कोणीं केलेला नाहीं. समर्थांनीं राजकारणांत कोणत्या ही प्रकारें भाग घेतला नाहीं; अगर समर्थांची व शिवाजीमहाराजांची प्रथम भेट महाराजांचें सर्व राजकारण यशस्वी झाल्यावर राज्यारोहणाचे आधीं दोन वर्षें पडली व नंतर त्यांनीं दासबोधांत राजकारणा-वरील दोन समास लिहिले व "मराठा तितुका मेळवावा। महाराष्ट्रधर्म वाढवा॥" असा उपदेश केला, असें निरुत्तर व विश्वसनीय ऐतिहासिक पुराव्यांवरून सिद्ध झाल्यास आम्ही त्या मताचा आनंदानें स्वीकार करूं अगर नवीन ऐतिहासिक पुराव्यांवरून या दोन थोर विभूतींची एकाच जिल्ह्यांत एकाच तालुक्यांत अगदीं नजीक असून ही मुळींच गांठ पडली नाहीं असें सिद्ध झालें, तरी त्याबद्दल आम्हांस विषाद वाटणार नाहीं. कारण या दोन महा-पुरुषांचीं चरित्रें स्वतंत्र रीतीनें इतकीं उदात्त आहेत कीं, दोघांची कधीं ही भेट झाली नव्हती अगर एकानें दुसऱ्यास प्रोत्साहन दिलें नाहीं अगर साहाय्य केलें नाहीं अगर एकानें दुसऱ्यापासून अनुग्रह घेतला नाहीं, असें सिद्ध झालें तरी दोघेही स्वतंत्रपणें आपा-पल्या वैयक्तिक श्रेष्ठ गुणांनीं व कामगिरीनें इतिहासांत अजरामर राहतील इतके ते थोर अलौकिक महापुरुष आहेत.

( १६ ) येरवडा येथील तुरुंगांतून परत आल्यावर देशांतील प्रचलित व प्रज्वलित राजकारणांत सक्रिय भाग घेण्याचें सोडून देऊन घरीं एकांत स्थळीं बसून समर्थचरित्र लिहिण्यांत आम्हीं दीड वर्ष घालविलें म्हणून आमच्या कांहीं जहाल मित्रांचा आम्हांवर रोष झाला आहे. आनंदानें कष्ट सोसून स्वराज्यप्राप्तीकरितां प्रयत्न–राजकीय चळवळ–करणाऱ्या कांहीं देशभक्त तरुण व प्रौढ मंडळींमध्यें भगवंतांचें अधिष्ठान उत्कटतेनें आढळून येत नाहीं असें आमच्या अनुभवास आलें म्हणून " सामर्थ्य आहे चळवळीचें । जो जो करील त्याचें ।। परंतु येथें भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ।। " असा बहुजन समाजास उपदेश करून स्वराज्य मिळवून देणाऱ्या समर्थांच्या चरित्राची रूपरेषा आम्हीं तुरुंगांतच आखली व बाहेर आल्यावर त्यांचें सविस्तर चरित्र लिहिण्यास आरंभ केला. चार महिन्यांत चरित्र संपूर्ण होईल असें आह्मांस वाटत होतें, परंतु प्रकाशित शिव-समर्थ-चरित्रें व चरित्रोपयोगी इतर ग्रंथ वाचून चरित्र संपविण्यास दीड वर्ष लागलें. चरित्रग्रंथास प्रारंभ शके १८५४ चैत्र शुद्ध प्रतिपदेस केला व चरित्रसमाप्ति भाद्रपद शुद्ध चतुर्थी शके १८५५ या दिवशीं झाली. बहुजन समाजाच्या मनांत स्वराज्यप्राप्तीविषयीं धर्ममूलक विवेकवैराग्ययुक्त उत्कट भावना उत्पन्न करण्याकरितां समर्थांसारख्या युगधर्मप्रवर्तक राजकारणी महापुरुषाचें चरित्र लिहिणें हें काम ही स्वराज्यप्रयत्नकाळीं राजकारणांत अंशतः तरी सक्रिय भाग घेण्यासारखें आहे असें आम्हांस वाटतें. समर्थचरित्र लिहितांना राष्ट्रसेवा करण्याचा आमचा उत्साह वृद्धापकाळीं ही द्विगुणित झाला आहे व प्रत्येक नागरिकानें प्रचलित राजकारणांत परिस्थित्यनुरूप थोडातरी भाग घेतल्याशिवाय त्याचा प्रपंचच यथार्थ होणार नाहीं, या समर्थांच्या सिद्धांताचा प्रसार बहुजन समाजांत केल्याशिवाय कोणता ही हिंदमातेचा पुत्र मातृभूमीच्या ऋणांतून मुक्त होणार नाहीं असें आम्हांस वाटतें. तसा प्रयत्न आम्हीं चरित्र लिहीत असतांना ही यथाशक्ति केला आहे व यापुढें अधिक नेटानें करीत राहणार आहों. प्रकृति सुधारल्यावर प्रचलित राजकारणांत हा आम्ही यथाशक्ति भाग घेणार आहों.

( १७ ) या चरित्रांत आम्हीं इसवी सनाचा उपयोग न करितां शालिवाहन शकाचाच उपयोग केलेला आहे. याचें मुख्य कारण ज्या जुन्या चरित्रांतून व कागदपत्रांतून आम्हांस समर्थचरित्राची माहिती मिळाली, त्यांमध्यें शकांचाच उपयोग केला आहे हें होय. शकांत ७८ मिळविले म्हणजे इसवी सनाचें वर्ष होतें हें वाचकांना माहीत आहेच.

( १८ ) कांहीं ठिकाणीं पुनरुक्तीचा थोडासा दोष वाचकांना दिसून येईल. उदाहरणार्थ, कल्याणस्वामीप्रभृति शिष्यांविषयीं सविस्तर माहिती ' मठ-महंत व शिष्य ' या स्वतंत्र भागांत दिली आहे; परंतु समर्थचरित्र यथाक्रम देत असतांना, त्यांच्याविषयीं उल्लेख इतर ठिकाणीं ही आला आहे. असें होणें अपरिहार्य आहे. परंतु दुसऱ्या वेळीं मागील गोष्टींचा उल्लेख करितांना तो संदर्भ समजण्यापुरताच केला आहे. समर्थ-

वाङ्मयांतील महत्त्वाचे कांहीं उतारे निरनिराळ्या भागांत विषयाचें महत्त्व वाचकांना समजून देण्याकरितां क्वचित् प्रसंगीं पुन्हा द्यावे लागले आहेत.

( १९ ) आधारभूत ग्रंथांच्या यादींत आम्ही प्रो. सिजविकप्रभृति कांहीं इंग्रजी प्रसिद्ध ग्रंथकारांचा उल्लेख केला आहे. वस्तुतः श्रीसमर्थचरित्राशीं त्यांचा कांहीं संबंध नाहीं. परंतु समर्थांनीं अगर त्यांच्या शिष्यांनीं सैन्याच्या पलटणी तयार करून सिंहगडासारखा एखादा किल्ला सर करून रणांगणावर शौर्य दाखविलें नाहीं, म्हणून समर्थांनीं राजकारण केलें असें म्हणतां येणार नाहीं, असें विधान एका विद्वान टीकाकारांनीं केलें आहे. तेव्हां सुप्रसिद्ध पाश्चात्य ग्रंथकार आपल्या राजकारणावरील ग्रंथांत कोणत्या अनेक विषयांचा समावेश करितात, हें जिज्ञासु वाचकांना कळावें म्हणून आम्ही संदर्भग्रंथांमध्यें त्यांच्या ग्रंथांचा नामनिर्देश केला आहे. महाभारतांतील शांतिपर्व व कौटिलीय अर्थशास्त्र या ग्रंथांचा उल्लेख ही त्याच कारणाकरितां केला आहे, हें 'समर्थांचें राजकारण' या भागांतील विवेचनावरून वाचकांना कळून येईल.

( २० ) 'मठ-महंत व शिष्य' हा भाग लिहिल्यावर तेलंगमठाचे महंत शिवरामस्वामी हेच इंदूरबोधन मठाचे महंत उद्धवगोसावी असें 'रामदास आणि रामदासी' यांतील संशोधनवृत्तावरून सिद्ध झालें आहे असें श्रीयुत देव यांनीं आम्हांस कळविलें आहे. त्याचप्रमाणें 'समर्थसंप्रदाय' हा भाग लिहिल्यावर मसूरच्या ब्रह्मचर्याश्रमाची जप्त केलेली मिळकत सरकारनें परत त्या आश्रमाच्या चालकांच्या स्वाधीन केली असें जाहीर झालें आहे. हल्लींच्या समर्थ-संप्रदायांत वाईचे सुप्रसिद्ध गोसेवक रामदासी श्री. बाल-कृष्णबुवा ऊर्फ चौंडेमहाराज यांची प्रामुख्यानें गणना करितात. वाईंतील गोरक्षण संस्थेचे ते उत्पादक आहेत. काशी व वाल्हेर येथें त्यांनीं समर्थ-मठ स्थापन केले आहेत. या दोन्ही मठांत प्रवचन देण्याचा आम्हांस सुयोग आला होता.

६ व्या भागांत शिवसमर्थ-भेटीसंबंधांत चार पक्ष आहेत असें आम्हीं म्हटलें आहे. त्या चार पक्षांत थोडीशी गुंतागुंत आहे असें कित्येकांना वाटण्याचा संभव आहे. उदा० चौथ्या पक्षांतील सर्व गृहस्थांचें मत, समर्थांनीं महाराजांना शके १५७१ सालीं अनुग्रह दिला, असें आहे, परंतु वरील गुरु-शिष्यांची प्रथम भेट मसूर येथें रामनवमीच्या उत्सवांत शके १५६७ सालीं झाली या दासविश्रामधामांतील म्हणण्यास स्वतंत्र ऐतिहासिक पुरावा असावा असें कित्येकांचें मत आहे.

'समर्थांचे ग्रंथ' या भागांत 'दासबोधाचा सोलीव अर्थ' हें प्रकरण देण्याचें चुकून राहिलें आहे. 'समर्थसंप्रदाय' या भागांत महर्षि दादाभाई, लोकमान्य टिळक, देशभक्त लजपतराय व महात्मा गांधी हे लाखों लोकांमध्यें कर्तव्यजागृति करून त्यांना राष्ट्रोन्नतीचा योग्य मार्ग दाखविणारे राष्ट्रनायक आहेत म्हणून ते 'समर्थ' पदवीस पात्र आहेत असें आम्हीं म्हटलें आहे. शुद्ध व पवित्र आचरण ठेवून 'भगवंताचें अधिष्ठान'

ठेवून अत्यंत सावधपणानें व अत्यंत साक्षेपानें अहर्निश राजकारणाचें काम करणारे सर्व सुशिक्षित स्वरूपतः समर्थसंप्रदायी नसून ही समर्थ-शिकवणूक तत्त्वतः आचरणांत आणणारे नवीन रामदास-संप्रदायी आहेत असें आम्हांस वाटतें. पंडित मालवीयजी, लोकनायक अणे, कै. दे. मोतीलाल घोष, कै. देशबंधु चि. रं. दास, सुब्रह्मणिया आयर प्रभृति राष्ट्र-नायकांचाही यांत समावेश करतां येईल. "अती आदरें सर्व सेवा करावी" या समर्थांच्या तत्त्वाप्रमाणें वागणारे व अखेर कष्ट सोसून राजकारणांत आनंदानें पडणारे आमचे सहाध्यायी सन्मित्र श्रीयुत विठ्ठल रामजी शिंदे हे ही नवीन रामदासी संप्रदायीच आहेत असें आम्ही समजतों. बी. ए. झाल्यावर नोकरीच्या पाठीमागें न लागतां समाजसेवेचें काम त्यांनीं सतत तीस वर्षे केलें व शेवटीं स्वराज्यप्राप्तीकरतां आनंदानें कारागृहवास पत्करला हें त्यांना अत्यंत भूषणावह आहे. आमचे पदवीधर क्षत्रिय-मराठे बंधु श्रीयुत शिंदे यांचें अनुकरण करतील तर स्वराज्यसूर्याचा उदय लवकर होईल.

'समर्थांचें राजकारण' व 'समर्थांचें कार्य' या भागांत समर्थांच्या व्यावहारिक व राजकारणासंबंधीं कामगिरीचा आम्हीं गौरव केला आहे, तरी समर्थ हे ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकारामांप्रमाणें महान् भगवद्भक्त ज्ञानी सत्पुरुष व निष्काम कर्मयोगी होते; परंतु परिस्थितीच्या उपाधीमुळें त्यांना स्वराज्योत्तेजक राजकारणांत पडावें लागलें असा आमच्या म्हणण्याचा आशय आहे, हें चाणाक्ष वाचकांना सहज कळून येणार आहे.

'अद्भुत गोष्टी' या भागांत कांहीं अद्भुत गोष्टींचा खुलासा करण्याचा आम्हीं प्रयत्न केला आहे, तो कित्येक समर्थ-भक्तांना पसंत पडणार नाहीं. योगाभ्यासानें व तपश्चर्येनें साधुसंत अद्भुत गोष्टी करतात हें खरें आहे, परंतु पुण्याच्या गोष्टीसारख्या अद्भुत गोष्टी त्या कक्षेंत येतील असें आम्हांस वाटत नाहीं. कलियुगांत समर्थ–बिभीषणांची लंकेंत गांठ पडणें हें संभवनीय नाहीं असें म्हटलें म्हणजे समर्थांच्या अलौकिकत्वाविषयीं अगर श्रेष्ठत्वाविषयीं अनादर व्यक्त करणें आहे असें आम्हांस वाटत नाहीं.

१४ व्या भागांत वामन पंडित, रघुनाथ पंडित प्रभृति कांहीं शिवसमर्थकालीन कवींवर महाराष्ट्रांत स्वराज्याकरितां अत्यंत जोराचे प्रयत्न सुरू असतां तटस्थ राहिल्याबद्दल आम्हीं टीका केली आहे. काव्य ही नैसर्गिक देणगी आहे. विशिष्ट हेतूनें प्रेरित होऊनच कवीनें काव्य लिहावें असा निर्बंध असावा असें आमचें म्हणणें नाहीं; परंतु राष्ट्रांतील रथी महारथी स्वराज्याकरितां प्राणांची आहुति देऊन लढत असतां, त्यांच्या अतुल पराक्रमावर वीररसप्रधान काव्य न करणें, बहुजनसमाजास स्वराज्ययुद्धांत पडण्यास प्रोत्साहनपर काव्य न लिहिणें अगर इतर काव्यांत स्वराज्याकरितां लढणाऱ्या वीरांचा गौरवपर उल्लेख न करणें, हें क्षम्य आहे असें आम्हांस वाटत नाहीं.

( २१ ) प्रथम आंखलेल्या श्रीसमर्थचरित्राच्या रूपरेषेंत फक्त तेराच भाग होते. शिव-चरित्र-निबंधावलींतील प्रो. दांडेकर यांचा ' संतांची कामगिरी ' हा निबंध वाचल्यावर ' समर्थ-शतकांतील संत, कवि व त्यांचें कार्य ' हा १४ वा भाग लिहिला आहे.

( २२ ) हें चरित्र लिहितांना आम्ही प्राचीन व अर्वाचीन संस्कृत, मराठी व इंग्रजी शिवसमर्थचरित्रांचा उपयोग केला आहे. त्याचप्रमाणें धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केलेल्या समर्थवाङ्मयाचा व इतर ग्रंथांचा, पुणें येथील भारत-इतिहास-संशोधन मंडळामार्फत प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांचा व इतर विद्वान गृहस्थांनीं प्रसिद्ध केलेल्या अनेक ग्रंथांचा आम्हीं उपयोग केला आहे, त्या सर्वांचे आम्ही अत्यंत ऋणी आहों. सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांचा सर्वांत अधिक उपयोग झाला आहे, हें वाचकांना सहज कळून येणार आहे. सूचि तयार करण्याचें काम कऱ्हाड येथील टिळक हायस्कूलमधील समर्थवाङ्मयभक्त तरुण व होतकरु शिक्षक श्रीयुत गणेश वामन तगारे यांनीं उत्साहानें केलें व मुद्रितें तपासण्याचे कामीं श्रीयुत स. रा. सरदेसाई यांनीं अंतःकरणपूर्वक मदत केली त्याबद्दल त्या उभयतांचे आम्ही फार आभारी आहों. ' सद्गुरुस्तवन–अष्टकें ' लिहून देण्याच्या कामीं आमचा नातु कुमार चि. पुरुषोत्तम गणेश ऊर्फ पंडित आळतेकर यानें साहाय्य केलें आहे. प्रौढ वयांत त्याच्या हातून राष्ट्रोद्धाराच्या कार्यास पूर्ण साहाय्य होवो अशी श्रीरामचंद्रप्रभूपाशीं आम्ही अंतःकरणपूर्वक प्रार्थना करतों.

श्रीसमर्थ-चरित्र अदमासापेक्षां अधिक वाढलें. त्यायोगानें छपाई खर्च दोन हजारांपेक्षां अधिक झाला. श्रीरामपंचायतन, समर्थ, शिवाजीमहाराज, कल्याणस्वामी प्रभृतींचीं चित्रें, कांहीं मंदिरांचीं चित्रें व कांहीं नकाशे घालण्याचें ग्रंथसमाप्तीनंतर ठरलें. त्यायोगें दोनशें रुपये खर्च अधिक लागला. हें समजल्यावर एका ' श्रीमंत ' समर्थ-भक्तांनीं उदार बुद्धीनें दोनशें रुपयांची देणगी दिली, त्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत आभारी आहों.

श्रीसमर्थ-चरित्रांतील चित्रांबद्दल सत्कार्योत्तेजक सभा, धुळें, भारत-इतिहास-संशोधन मंडळ, पुणें, कऱ्हाडचे छायाचित्रकार श्रीयुत ग. वि. फडके, साताराचे छायाचित्रकार श्रीयुत ह. ब. मराठे व इतर कांहीं छायाचित्रकार, शिव-छत्रपतिचरित्रकार श्रीयुत चिं. वि. वैद्य, श्रीसमर्थ-गाथाकार श्रीयुत गोसेवक अनंतदास या सर्वांचे व चित्रांचे ठसे लवकर तयार करून दिल्याबद्दल बालोद्यान कार्यालयाचे व्यवस्थापक श्रीयुत शं. ब. सहस्रबुद्धे यांचे आम्हीं आभारी आहों. अनेक अडचणी दूर करून श्रीसमर्थ-चरित्र लिहिण्याची उत्कट इच्छा पूर्ण केल्याबद्दल श्रीमत्सच्चिदानंद श्रीरामचंद्रप्रभूची अंतःकरणपूर्वक प्रार्थना करून प्रस्तावना संपवून चरित्रग्रंथ वाचकांच्या हातीं देतों ! !

जयजय रघुवीर समर्थ

ॐ तत्सत्

---

# आधारभूत ग्रंथ

## संस्कृत


| ग्रंथ | ग्रंथकार |
|---|---|
| १ महाभारत | श्रीव्यास |
| २ कौटिलीय अर्थशास्त्र | चाणक्य |
| ३ शिवभारत | परमानंद |
| ४ पर्णालग्रहणाख्यान | जयराम |
| ५ राधामाधवविलासचंपू | ,, |


## मराठी


| | |
|---|---|
| १ दासबोध व इतर समर्थवाङ्मय | श्रीरामदास |
| २ तुकारामकृत अभंग ( गाथा ) | श्रीतुकाराम |
| ३ समर्थांच्या अंतकालासंबंधीं ओंव्या | भीमस्वामी ( तंजावर मठ ) |
| ४ समर्थचरित्र | ,, ,, |
| ५ वाकेनिशी-टिप्पण | अनंत गोपाळ कुडाळकर |
| ६ स्वानुभवदिनकर | दिनकरस्वामी |
| ७ समर्थप्रताप | गिरिधरस्वामी |
| ८ श्रीदासबोधाची किल्ली | ,, |
| ९ रामसोहळा | मेरुस्वामी |
| १० समर्थचरित्र | उद्धवसुत |
| ११ भक्तलीलामृत | भीमस्वामी ( शिरगांव मठ ) |
| १२ दासविश्रामधाम | आत्मारामहाराज |
| १३ श्रीरामदासपंथक्रमसार | ,, |
| १४ श्रीरामदासस्वामींची बखर | हनुमंतस्वामी |
| १५ समर्थचरित्र | आत्मारामबुवा चरेगांवकर |
| १६ संतविजय | महिपतबावा |
| १७ भक्तमंजरीमाला | राजाराम प्रसादी |
| १८ सीतास्वयंवर | वेणाबाई |
| १९ मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें | कै. वि. का. राजवाडे |
| २० रामदास | ,, |

| | | |
|---|---|---|
| २१ | महाराष्ट्र-महोदयाचा पूर्वरंग | कै. ना. कृ. गद्रे |
| २२ | श्रीसांप्रदायिक विविध विषय | श्री. शं. श्री. देव |
| २३ | श्रीसांप्रदायिक कागदपत्रें | ,, |
| २४ | महाराष्ट्रसारस्वत | कै. वि. ल. भावे |
| २५ | श्रीतुकारामचरित्र | श्री. ल. रा. पांगारकर |
| २६ | महाराष्ट्र-मंजरी | श्री. द. वि. आपटे |
| २७ | महाराष्ट्र-कवि-चरित्र | श्री. ज. र. आजगांवकर |
| २८ | महाराष्ट्रधर्म | श्री. भा. वा. भट |
| २९ | रामदासस्वामी व शिवाजीमहाराज यांचा अन्योन्य संबंध | ,, |
| ३० | शिवाजी निबंधावली | भारत इ. सं. मंडळ |
| ३१ | शिवपत्रसार-संग्रह | ,, |
| ३२ | कुबडी | हंसराज |
| ३३ | आज्ञापत्र ( मराठेशाहींतील राजनीति ) | श्रीमंत रामचंद्र नीलकंठ पंतअमात्य |
| ३४ | शिवाजीमहाराजांची बखर | सभासद |
| ३५ | श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांचें सप्त-प्रकरणात्मक चरित्र | मल्हार रामराव चिटणीस |
| ३६ | श्रीशिवाजीप्रताप | पु. इ. मंडळी, बडोदें |
| ३७ | मराठी रियासत | श्री. गो. स. सरदेसाई |
| ३८ | श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांचें चरित्र | श्री. कृ. अ. केळूसकर |
| ३९ | श्रीरामदासकथासारामृत | श्री. भी. स. पारळकर |
| ४० | श्रीसज्जनगड व रामदास | प्रो. गो. चिं. भाटे |
| ४१ | समर्थांचें सामर्थ्य | कै. कृ. ना. आठल्ये |
| ४२ | श्रीसमर्थांचा गाथा | श्री. अनंतदास |
| ४३ | श्रीसमर्थसांप्रदायिक नित्यनेमसोपान | श्रीसमर्थदास |
| ४४ | महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास | प्रो. शं. दा. पेंडसे |
| ४५ | महाराष्ट्रीयांचें काव्यपरीक्षण | डॉ. श्री. व्यं. केतकर |
| ४६ | राज्यशास्त्र | श्री. न. चिं. केळकर |
| ४७ | गॅरिबॉल्डीचें चरित्र | ,, |
| ४८ | मॅझिनीचें चरित्र | श्री. स. आ. जोगळेकर |
| ४९ | काव्हूर ( इटलीचा रामदास ) | श्री. वा. मुंडले |
| ५० | राजनीतिशास्त्रपरिचय | प्रो. शं. द. जावडेकर |

५१ वामन पंडित ( चरित्र व काव्य ) — श्री. वा. अ. भिडे
५२ श्रीमंत महाराज भोंसले यांची बखर — कै. वि. ल. भावे
५३ श्रीमंत पंतअमात्य बावडेकर यांचें वंशवृत्त — श्री. रा. म. गोरे
५४ दासबोधाची रूपरेषा — श्री. वा. पु. साठे
५५ श्रीदासबोध–गूढार्थदीपिका — कै. के. ग. आठले
५६ जेधे शकावली — भा. इ. सं. मंडळ
५७ कोल्हापूर–साहित्य–संमेलन — श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड
५८ मासिकें:—( १ ) विविधज्ञानविस्तार, ( २ ) रामदास आणि रामदासी, ( ३ ) चित्रमयजगत्, ( ४ ) लोकशिक्षण व ( ५ ) पुरुषार्थ.

**English**

(1) The Life and Mission of Samarth Rāmadās — Mr. K. S. Thakare
(2) Rāmadās and Rāmadāsi, — Rev. W. S. Demin g
(3) The Rise of the Mar atha Power — Late Mr. Justice M. G. Ranade
(4) Shivāji the Founder of Maratha Swaraj — Mr. C. V. Vaidy a
(5) A History of the Maratha People — Mr. C. A. Cinciad and Late R. B. Parasnis
(6) Shivāji the Great — Dr. Balkrishna
(7) Shivāji and His Times — Mr. Jadunath Sarkar
(8) Shivāji's Escape from Agra — ,, Deshpande
(9) A History of the Marathas — Cap. Grant Duff
(10) History of Indian Philosophy—Rāmadās — Prof. R. D. Ranade
(11) Elements of Politics — Prof. Sidgwick
(12) Introduction to Political Science — Sir John Sealey
(13) Elements of Political Sciences — Mr. Leacock
(14) Grammar of Politics — Prof. Lasky
(15) The Survival of Old Institutions— — Dr. Surendranath Sen
(16) **Magazines**—(1) Fergusson College Magazine, (2) Rajaram College Quarterly.

## संक्षिप्त शब्द

वा =वाकेनिशी.

दा. वि. =दासविश्रामधाम.

ह. स्वा. =हनुमंतस्वामींची बखर.

श्री. वि. वि. =श्रीसांप्रदायिक विविधविषय.

म. इ. सा. =मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें.

म. म. पूर्वरंग=महाराष्ट्र-महोदयाचा पूर्वरंग.

बा. स. वा. =बालबोध समर्थवाङ्मयमाला.

ऐ. ब. =श्री. महाराज भोसले यांची ( ऐतिहासिक ) बखर.

स. प्र. =समर्थप्रताप.

स. गा. =समर्थांचा गाथा, प्रस्तावना.

---

## शुद्धिपत्र

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ६ | ८ | १६६६ | १५६६ |
| १७ | ६ | १६६० | १६१५ |
| ३१ | २० | संपूर्ण | अपूर्ण |
| १२२ | २४ | समर्थ | महाराज |
| १२९ | १४ | १६०१ | १६०० |
| १८८ | २५ | उंचवक्या | कंचुक्या |
| २३६ | १५ | १६६१ | १६५९ |
| २३७ | १६ | पौर्णिमेस | त्रयोदशीस |
| ३२७ | ४ | १५६० | १५७० |
| ३९३ | ११ | समर्थ | शिवाजीमहाराज |
| ४१७ | ११ | कविविपर्यास | कालविपर्यास |
| ४५२ | ३ | चरणज | चरण रुज |
| ४५७ | २२ | गौतती | गौतमी |

---

# अनुक्रमणिका

लक्षणें २५५; गिरिधरस्वामींचा रामदासपंथप्रसार २५६; समर्थांचें अंतरंगावर विशेष लक्ष्य, शिष्य-प्रशिष्यांचें बहिरंगावर विशेष लक्ष्य २५७; समर्थशिष्यांनीं राजकारणाकडे लक्ष्य दिलें नाहीं म्हणून समर्थ राजकारणी संत नव्हते असा आक्षेप–त्याचें खंडन २५८–२६०; समर्थमठांस उतरती कळा कां लागली? राजवाड्यांच्या मताचें खंडन २६०–२६१; हल्लींची मठाची स्थिती–नवीन रामदासी पंथ–मसूर ब्रह्मचर्याश्रम-संस्थापक श्री. विनायकस्वामी, पदवीधर समर्थभक्त राजवाडे, देव, पांगारकर, पोतदार २६३; परिस्थित्यनुरूप समर्थसंप्रदाय राष्ट्रीय करितां येईल २६४; रामदास व जीजस यांची तुलना २६५–२६६; जेसुइष्ट पंथ २६७–२६८; समर्थांची दिनचर्या २६८–२७०; समर्थांची शिस्त २७१; समर्थांची अश्वारोहणकला २७१; समर्थ-प्रतापांतील कांहीं गोष्टी २७२; समर्थसंप्रदायाची उदात्त व श्रेष्ठ नीति २७३; स्त्रियांचा संप्रदायांत प्रवेश–कडक नीतिमर्यादा २७३–२७४; **रामदासी संप्रदायाची पुनरावृत्ति :** २७५–२८०.

भाग १० वा:—**समर्थांचें राजकारण:** राजकारणास प्राचीन ग्रंथांत राजनीतिअर्थशास्त्र म्हणत, शांतिपर्व, कौटिलीय अर्थशास्त्र–२८१–२८२; इंग्रजींत त्यासच Politics म्हणतात, प्रो. सिजविकप्रभृति इंग्रजी ग्रंथकार–राजकारणांत अनेक विषयांचा समावेश–गॅरिबॉल्डी, मॅझिनी व काव्हूर यांचें राजकारण २८२–२८३; स्वराज्यप्राप्तीचे महाराष्ट्रांत प्राचीन प्रयत्न, ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम यांचें कार्य २८३; मॅझिनी, गॅरिबॉल्डीप्रमाणें समर्थ–शिवाजी गुरुशिष्य–केळकर २८४; जावडेकरकृत राजनीतिशास्त्रपरिचय, समर्थमॅझिनींची तुलना २८५; प्रो. लिमये ‘ Ramadas was an agitator in the highest sense of the term. ’ २८६–२८७; वारकरीपंथ व धारकरीपंथ २८७–२८८; रामदास आणि तुकाराम–रामदासांच्या वाङ्मयांत जितकें राजकारण आहे तितकेंच तुकारामांच्या अभंगांत असें एक नवीन मत–त्याचें खंडन २८८–२८९; दासबोधांत ‘ राजकारण ’ शब्द ‘ चातुर्य ’ या अर्थीं उपयोगिला आहे असा एक आक्षेप–त्याचें खंडन २९०–२९१; समर्थवाङ्मयांतील ‘ राजकारण ’ शब्दाचें कोष्टक २९२–२९४; राजकारण शब्दाशिवाय इतर प्रोत्साहक शब्दांनीं स्वराज्यविषयक भावनांची जागृति–राजधर्म–क्षात्रधर्म–संभाजीला पत्र २९५–३००; राजकारणावर समर्थांनीं स्वतंत्र ग्रंथ कां लिहिला नाहीं? कारणें ३०१–३०२; बेकन व रामदास–रियासतकार यांचें मत–त्याचें खंडन, मॅकेव्हिलीविषयीं माहिती–The end justifies the means हें त्यांचें राजकारण, समर्थांचें राजकारण वरिष्ठ दर्जाचें–रियासतकारांच्या आणखी कांहीं आक्षेपांचें खंडन ३०२–३१६; राजवाडे यांचें मत ३१६; रामदासांचें राजकारण रजोगुणात्मक नसून सत्त्वगुणात्मक होतें ३१७; डेमिंग–Yet with all his emphasis on the practical, Ramadas remained to the end of his life pre-eminently a spiritual teacher ३१८; प्रो. भाटे–समर्थांनीं शके १५९४ नंतर राजकारण केलें या मताचें खंडन ३१९–३२०; प्रि. बाळकृष्ण

Ramadas looked upon Shivaji as an incarnation, so he could have no part in shaping the policy of an Avatar—या मताचें खंडन ३२१–३२२; समर्थांस तीर्थयात्रेंत महाराष्ट्रधर्मप्रसाराची प्रेरणा–समर्थ–शिवाजींचें ध्येय एक ३२३–३२५; महाराष्ट्र-धर्म हा शब्दप्रयोग प्रथम सरस्वतीगंगाधरांच्या गुरु-चरित्रांत, रानडे यांचा अर्थ religion-patriotism, राजवाडे श्रुतिस्मृत्युक्त धर्म-स्थापनापूर्वक स्वराज्य–स्थापना, रियासतकारांचें ही मत तसेंच ३२६–३२८; कॅ. मोडक, श्री. देशपांडे यांचीं मतें–समर्थशिष्य व मठ यांचें शिवाजीमहाराजांना साहाय्य ३२८–३३०.

**भाग ११ वा :—उत्तरार्धांतील संचारः** वाकेनिशींत ह. स्त्रा. बखर यांचा आधार ३३१–३७३; या भागांत संचार शकवार दिला आहे. तो पहावा.

**भाग १२ वा :—समर्थांचें कार्य :** समर्थपूर्वकालीन व समर्थकालीन समाज-स्थितीचें वर्णन ३७४–३७६; महाराष्ट्रांत मुसलमानी राज्यें–"–मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्र धर्म वाढवावा ॥–" असा उघडपणें उपदेश प्रथम समर्थांनीं केला ३७७–३७९; "बहुत दिवसांचें हें बंड । म्लेंच्छ झाले उदंड ॥ त्यांचें करूनि दुखंड । राज्य करावें ॥" असा उपदेश प्रथम समर्थांनीं केला ३८०–३८२; राजकारणाशिवाय खरा प्रपंच होत नाहीं असा स्पष्ट उपदेश प्रथम समर्थांनीं केला ३८३–३८४; 'धर्ममूलक, विवेक-वैराग्य. प्रधान प्रयत्नवादा'चा उपदेश करून समर्थांनीं महाराष्ट्राला कर्तव्यदक्ष केलें ३८५–८७.

**भाग १३ वा :—अद्भुत गोष्टीः** प्राचीन अर्वाचीन साधुसंतांच्या चरित्रांत अद्भुत गोष्टी ३८८; समर्थचरित्रांतील अद्भुत गोष्टींचे चार भाग, (१) साक्षात्कार, दृष्टांत, (२) मृतांना उठविणें, (३) सिद्धीच्या बळावर अन्नसंतर्पण, (४) हिंस्र पशूंशीं खेळणें, जमिनींत, पाण्यांत, राहणें इत्यादि. थोडक्यांत विवेचन, ३८९–३९०; समर्थ-चरित्रांतील ३० अद्भुत गोष्टींची संक्षिप्त माहिती ३९०–४०८.

**भाग १४ वा :–समर्थशतकांतील संत, कवि व त्यांचें कार्यः** मालोजी, शहाजीराजे, शिवाजी, संभाजीमहाराज यांच्या कारकीर्दींतील कवि या शतकांत येतात ४०९; एकनाथांपासून रंगनाथांपर्यंत ३६ कवींचीं त्रोटक चरित्रें ४१०–४३३; पांच कवयित्री, ४३३–४३८; एकनाथ व तुकारामांचें श्रेष्ठ कार्य, धर्मजागृति, नीति–उपदेश व भक्तिमार्गानें परधर्मापासून रक्षण–इतर कवींचें कार्य–सनातन धर्माविषयीं अभिमान व संस्कृतांतील ज्ञान मराठींत आणून प्राकृत लोकांना धर्म व नीतीचें ज्ञान ४३९; अर्वाचीन कवि-नाटककार, कादंबरीकार, मनोरंजनाकडे विशेष प्रवृत्ति, स्वराज्यप्रोत्साहक भावना उत्पन्न करण्याचें ध्येय ठेवण्याकडे प्रवृत्ति असावी, श्री. सयाजीरावांचें मत, नाशिक येथील प्रसिद्ध शाहीरकवि गोविंद यांचा स्तुत्य प्रयत्न, प्रो. वा. म. जोशी। यांचा काव्यशास्त्र-विनोद, वाङ्मयभक्तांना विनंति ४३९–४४०; देवगिरीच्या यादवांनंतर बहामनी मुसल-मानी राज्य–पांच शाह्या व हिंदुधर्माचा, देवतांचा व स्त्रियांचा छळ, १४ व १५ व्या

---

# चित्रें

# भाग पहिला

# चरित्र-साधनें

**संतांचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें। काय म्यां पामरें जाणावें हें ।।**

—श्रीतुकाराममहाराज

समर्थचरित्र आम्हीं कोणकोणत्या ग्रंथांच्या आधारें लिहिलें आहे, याचा या भागांत आम्ही खुलासा करणार आहों. समर्थचरित्र आम्हीं तीन गोष्टींच्या आधारानें लिहिलें आहे:–( १ ) समर्थांचें आत्मचरित्र, ( २ ) समर्थकालीन सनदा व पत्रें, व ( ३ ) समर्थांचीं प्राचीन व अर्वाचीन चरित्रें.

या तीन आधारांसंबंधीं या भागांत आतां आम्ही क्रमानें सविस्तर विवेचन करणार आहों.

**( १ ) समर्थांचें आत्मचरित्र:**–समर्थांच्या आत्मचरित्राचा आधार आम्हीं आमच्या समर्थचरित्रास घेतला आहे, असें वाचल्यावर, समर्थांनीं स्वतः आपलें शकतिथिपूर्वक एखादें चरित्र लिहिलेलें आहे, असें वाचकांना वाटण्याचा संभव आहे. सविस्तर आत्मचरित्र लिहिण्याचा प्रघात पाश्चात्य देशांत दिसून येतो. आमच्या देशांत सदरहू प्रघात आढळून येत नाहीं. भवभूतिप्रभृति कांहीं सुप्रसिद्ध कवींनीं आपल्या नाटकांच्या आरंभीं आपलें त्रोटक कुलवृत्त दिलें आहे. कालिदासानें तें ही दिलें नाहीं. समर्थांची गोष्ट तशीच आहे. दासबोध, मनोबोध, रामायणप्रभृति ग्रंथांच्या आरंभीं अगर शेवटीं त्यांनीं आत्मवृत्त मुळींच दिलेलें नाहीं. असें आहे तरी त्यांच्या ग्रंथांत इतस्ततः त्यांच्या चरित्राविषयीं कांहीं थोडी माहिती मिळते व ती त्यांच्या शिष्यप्रशिष्यांच्या व सांप्रदायिकांच्या चरित्रांपेक्षां अधिक विश्वसनीय मानली पाहिजे. समर्थांनीं कोणकोणत्या ग्रंथांचें अध्ययन केलें होतें, याचा कोणत्या ही प्रकाशित ग्रंथांत नामनिर्देश नाहीं. परंतु दासबोधाच्या पहिल्या दशकाच्या पहिल्या समासांत त्यांनीं दासबोधाच्या 'संमतीस' घेतलेल्या अनेक गीतांचा व इतर ग्रंथांचा उल्लेख केला आहे; व प्रसंगविशेषीं त्यांतील श्लोक ही आधाराकरितां उद्धृत केले आहेत. त्यावरून समर्थांनीं त्या ग्रंथांचें अध्ययन केलें होतें हें सिद्ध होतें. दिनकरस्वामीप्रभृति कांहीं समर्थशिष्यांनीं स्वानुभवदिनकरादि स्वकृत ग्रंथांमध्यें आपली गुरुपरंपरा दिली आहे; त्याप्रमाणें समर्थांनीं दासबोध, मनोबोध, रामायणप्रभृति ग्रंथांमध्यें आपली गुरुपरंपरा दिलेली नाहीं; तरी स्फुटप्रकरणांत "हनुमंत आमुची कुळवल्ली ।

राममंडपीं वेली गेली ।। श्रीरामभक्तीनें फळली । रामदास बालिया नांवें ।। १ ।। ” इत्यादि सहा ओंव्यांचें जें स्फुट दिलें आहे, त्यावरून समर्थांचे गुरु श्रीरामचंद्र होते, संप्रदाय ‘ स्वरूप ’ होता व मठ ‘ अयोध्या ’ होता इत्यादि विश्वसनीय माहिती मिळते. आधुनिक आत्मचरित्रकारांप्रमाणें समर्थांनीं आपली दिनचर्या त्या विशिष्ट सदराखालीं म्हणून जरी दिली नाहीं, तरी “ आधीं केलें मग सांगितलें ” असा त्यांचा दंडक होता. म्हणून दासबोधांतील अकराव्या दशकांतील तिसऱ्या समासांत त्यांनीं जें “ प्रातःकाळीं उठावें । कांहीं पाठांतर करावें ।। यथानुशक्ति आठवावें । सर्वोत्तमासी ।। १ ।। ” इत्यादि ‘ शिकवण-निरूपण ’ केलें आहे त्यावरून, ते प्रातःकाळीं उठून कांहीं पाठांतर करीत असत, मग प्रातःस्मरण करून दूर अज्ञात ठिकाणीं बहिर्दिशेस जात असत, नंतर निर्मल पाण्यानें मुखमार्जन करून प्रातःस्नान करीत असत, मग संध्या, देव-पूजा, तर्पण करून वैश्वदेव केल्यानंतर कांहीं फलाहार करीत असत, इत्यादि समर्थांची दिनचर्या होती असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. याचप्रमाणें त्यांनीं आपल्या संप्रदायासंबंधानें जरी दासबोधामध्यें एखादा स्वतंत्र समास लिहिला नाहीं, तरी स्फुट ओंव्यांमध्यें, “ प्रथम लिहिणें, दुसरें वाचणें । तिसरें सांगणें अर्थांतर ।। १ ।।...पंध्रावें लक्षण तें राजकारण । सोळावें तें जाण अव्यग्रता ।। ६ ।। ......विसावें लक्षण रामउपासना । वेध लावी जना भक्तिरंगें ।। १० ।। ” अशा ज्या ओंव्या दिल्या आहेत, त्यांवरून आपल्या समर्थ-संप्रदायाचीं त्यांनीं स्वतः वीस लक्षणें घालून दिलीं होतीं व त्यांत १५वें लक्षण राजकारण असें स्पष्ट सांगितल्यानें समर्थांनीं राजकारणाचा समावेश आपल्या संप्रदायांत केला होता असें सिद्ध होतें असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. दासबोधामध्यें आपल्या शिक-वणीचीं मुख्य चार लक्षणें म्हणून निराळा समास लिहिलेला नाहीं, तरी ११ व्या दशकांतील ५व्या समासामध्यें, “ मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण ।। तिसरें तें सावधपण । सर्वविषयीं ।। १ ।। चौथा अत्यंत साक्षेप ।” असें जें सांगितलें आहे, त्यावरून, ( १ ) हरिकथा निरूपण, ( २ ) राजकारण, ( ३ ) सर्वविषयीं सावधपण व ( ४ ) अत्यंत साक्षेप ( प्रयत्न ) अशी समर्थांची चतुःसूत्री शिकवण होती असें निर्विवादपणें मानण्यास कांहीं हरकत नाहीं. दासबोध, द. ११, स. १०, यांत समर्थ म्हणतात “ उत्तम गुण तितके घ्यावे । घेऊन जनास शिकवावे ।। उदंड समुदाय करावे । परी गुप्तरूपें ।। १८ ।। ” यावरून समर्थांनीं प्रथम आपल्या अंगीं उत्तम गुण आणण्याचा प्रयत्न केला, नंतर बहुजनसमाजास ते गुण शिकविले, नंतर उदंड शिष्य-महंत-समुदाय केले; परी हें सर्व कांहीं गुप्तपणें, म्हणजे अवास्तव गाजावजा न करितां—लोकांमध्यें विशेष बभ्रा न करितां—मोठ्या कुशलतेनें—मुत्सद्दीपणानें—मुरलेल्या राजकारणी पुरुषाप्रमाणें—केलें असें मानण्यास

कांहीं हरकत नाहीं. समर्थकालीन समाजस्थितीचें हुबेहूब वर्णन समर्थग्रंथांत जितकें केलेलें आहे तितकें प्राचीन अगर अर्वाचीन समर्थचरित्रांत कोठें ही केलेलें आढळून येत नाहीं. तेव्हां समर्थकालीन समाजस्थिति समजण्यास ही समर्थ-ग्रंथांचा फार उपयोग होतो.

समर्थवाङ्मयांतील अधिक उतारे देऊन हा भाग वाढवीत नाहीं. वर दिलेल्या थोड्या उतऱ्यांवरून समर्थवाङ्मयांतील कांहीं भाग समर्थचरित्र लिहिण्यास किती उपकारक आहे, हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल. शिवाय समर्थ-समाधीनंतर १०० वर्षांनंतर लिहिलेल्या समर्थचरित्रांवर अतिशयोक्तीचा, आख्यायिकांचा व अद्‌भुत गोष्टींचा जसा आक्षेप घेण्यांत येतो, तसा आक्षेप समर्थ-ग्रंथांतर्गत आधारांवरून लिहिलेल्या चरित्रावर मुळींच घेतां येणार नाहीं. समर्थांनीं आपल्या आत्मचरित्रांत स्वकृत अद्‌भुत गोष्टींचा मुळींच उल्लेख केलेला नाहीं. एवढेंच नव्हे, तर त्यांनीं आपल्या ग्रंथांत अनेक ठिकाणीं अद्‌भुत गोष्टींचा उपहास केला आहे (जन-स्वभाव गोसावी, दासबोध–५–२) तेव्हां समर्थग्रंथांवरून लिहिलेलें समर्थ-चरित्र आधुनिक कालांतील न्यायनिष्ठुर चिकित्सकांच्या टीकेस ही उतरेल असें आम्हांस वाटतें. परंतु समर्थचरित्रांतील ठळक गोष्टींचा काल-निर्णय करण्यास समर्थग्रंथांतर्गत आत्मचरित्राचा कांहीं उपयोग होणार नाहीं. यास एकच अपवाद आहे. दासबोधाच्या सहाव्या दशकाच्या चौथ्या समासांत दासबोधरचनेचा काल पुढील ओंवींत दिला आहे. "चार सहस्र सातशेंसाठी। इतुकी कलियुगाची रहाटी॥ उरल्या कलियुगाची गोष्टी। ऐशी असे॥ ७॥" यावरून दासबोधरचनेचा काल शके १५८१ ठरतो. हल्लीं गतकली ५०३३ आहे. दासबोधरचनाकालीं तो ४७६० होता. ५०३३–४७६०=२७३. म्हणजे दासबोधरचनाकालास २७३ वर्षे झालीं. हल्लीं शके १८५४ आहे, त्यांत २७३ वजा केल्यास शके १५८१ हें साल येतें. तें दासबोधरचनेचें, निदान दशक ६ समास ४ च्या रचनाकालाचें वर्ष ठरतें. या एका अपवादाशिवाय समर्थग्रंथांत विशिष्ट काव्य-लेखन-कालाचा उल्लेख मुळींच नाहीं. कालनिर्णयाच्या कामीं जरी समर्थग्रंथांतर्गत चरित्राचा उपयोग झाला नाहीं, तरी समर्थांचें अध्ययन, समर्थांची दिनचर्या, समर्थसंप्रदाय, समर्थांची शिकवण, समर्थगुरुपरंपरा, समर्थकालीन समाजस्थिति, चाफळच्या राम-नवमीच्या उत्सवाची सविस्तर हकीकत इत्यादि महत्त्वाच्या बाबतींत त्याचा फार उपयोग होणार आहे व त्यावर बखरी व कांहीं शिष्यप्रशिष्यकृत समर्थ-चरित्रें यांच्याप्रमाणें कोणत्या ही प्रकारचा आक्षेप घेण्यास जागा नाहीं, म्हणून साधनांमध्यें समर्थ-आत्मचरित्रास आम्ही पहिला मान देतों.

अर्वाचीन कालीं समर्थग्रंथांपासून समर्थांचें आत्म[illegible] प्रयत्न सुप्रसिद्ध समर्थवाङ्मयभक्त श्री. शंकर श्री[illegible]

श्रीयुत देव यांनीं शके १८२७ सालीं डोमगांव मठांतील कल्याणस्वामींच्या बाडावरून शुद्ध दासबोध प्रसिद्ध केला. त्यास त्यांनीं एक उत्कृष्ट व विस्तृत प्रस्तावना जोडली आहे. त्या प्रस्तावनेचे एकंदर पांच भाग आहेत. त्यांपैकीं पहिल्या भागांत त्यांनीं ‘ श्रीदासबोधांतर्गत श्रीसमर्थचरित्र ’ दिलें आहे. दासबोधांत निरनिराळ्या ठिकाणीं समर्थांनीं जो उपदेश केला आहे, अगर ‘ वर्तायाचे नियम ’ घालून दिले आहेत, त्यांवरून त्यांची शिकवण कोणत्या प्रकारची होती, ते कोणत्या रीतीनें वागत असत, वगैरे ठरविण्यास मुळींच हरकत नाहीं. श्री. देव यांनीं एक नवीन मार्ग घालून दिला आहे व तो उत्तम साधला आहे.

श्री. देव यांचें अनुकरण करण्याचा आम्हीं ही एक अल्प प्रयत्न शके १८५० सालीं केला होता. महाराष्ट्रांतील तरुण पिढीच्या नजरेस समर्थांचें तेजस्वी व ओजस्वी वाङ्मय आणण्याच्या उद्देशानें आम्हीं बालबोध-समर्थ-वाङ्मय-माला शके १८४८ सालीं सुरू केली. त्या मालेंतील तिसरें पुष्प ‘ समर्थांचें आत्म-चरित्र ’ हें आम्हीं शके १८५० सालीं प्रसिद्ध केलें. श्री. देव यांना श्रीदासबोधाची प्रस्तावना लिहावयाची होती, म्हणून त्यांना श्रीदासबोधांतर्गत श्रीसमर्थचरित्र लिहावें लागलें. आम्हीं ‘ समर्थांचें आत्मचरित्र ’ या छोट्या पुस्तकांत सर्व समर्थ-वाङ्मयांतील उतारे दिले आहेत. श्री. देव यांनीं दासबोधांतील समर्थचरित्रां-तील उतारे देऊन त्यांवर विवेचन केलें आहे. आम्हीं तसें न करितां समर्थांचें चरित्र समर्थांच्या भाषेंतच दिलें आहे. असें करण्यांत आमचा प्रधान हेतु शाळेंतील मुलामुलींना समर्थांचें आत्मचरित्र पाठ करण्याचा मार्ग सुकर व्हावा हा होता.

**( २ ) समर्थकालीन सनदा, व पत्रें**:—समर्थचरित्रास दुसरा विश्वसनीय आधार समर्थकालीन सनदा, पत्रें व चरित्रात्मक टिपणें यांचा होय. धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें ‘ रामदास आणि रामदासी ’ या सुप्रसिद्ध व उपयुक्त मासिकाच्या द्वारें श्रीसांप्रदायाचीं कागदपत्रें प्रसिद्ध केलीं आहेत. त्याचप्रमाणें श्रीसांप्रदायिक विविध विषय ही प्रसिद्ध केले आहेत. त्यांचा कोणत्या ही समर्थचरित्रकारास फार उपयोग होणार आहे. वरील ग्रंथांचा व सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केलेल्या समर्थशिष्य-प्रशिष्यकृत चरित्रांचा व समर्थासंबंधीं सभेनें प्रसिद्ध केलेल्या इतर ग्रंथांचा आम्हांला हें लिहितांना फार उपयोग झाला आहे. पुणें येथील भारत-इतिहास-संशोधक [illegible]समर्थासंबंधीं महत्त्वाचे ग्रंथ व कागदपत्रें प्रसिद्ध केलीं आहेत त्यांचा ही [illegible] आहे. सर्व सनदांमध्यें छत्रपति शिवाजीमहाराजांनीं समर्थांना [illegible]न दिलेली सनद अत्यंत महत्त्वाची आहे. त्या सनदेवरून [illegible] संबंध कोणत्या प्रकारचा होता, त्यांची भेट [illegible] महत्त्वाच्या मुद्यांवर चांगला प्रकाश पडणारा

आहे. त्या सनदेसंबंधीं सविस्तर विवेचन आम्ही पुढें योग्य प्रसंगीं करणार आहों. ती समग्र सनद आम्हीं परिशिष्ट ( अ ) मध्यें दिली आहे. श्रीसांप्रदायिक कागदपत्रांमध्यें समर्थांच्या उत्तरार्धांतील कागदपत्रांचा भरणा विशेष आहे. समर्थांच्या पूर्वार्धांतील कागदपत्रें अद्याप संशोधकांना सांपडलेलीं नाहींत. उत्तरार्धांतील जीं पत्रें सांपडलीं आहेत, त्यांचा व संभाजीमहाराज व राजाराममहाराज यांच्या कारकीर्दींतील सनदांचा व कागदपत्रांच ही या समर्थचरित्रांत उपयोग केला आहे. समर्थकालीन पत्रांमध्यें समर्थांनीं शिवाजीमहाराजांना पाठविलेल्या ओंवीबद्ध पत्राचा व तुकाराममहाराजांनीं शिवाजीमहाराजांना पाठविलेल्या अभंगबद्ध पत्राचा ही आम्ही अंतर्भाव करितों. इतिहासशास्त्राच्या कालनिर्णयशास्त्राच्या ( science of chronology ) निकषग्रावेच्या कसास तीं उतरलीं तरच तीं विश्वसनीय मानावीं असें आमचें वाचकवर्गास सांगणें आहे. आमचा कोणत्या ही प्रकारचा आग्रह नाहीं.

समर्थकालीन लेखांमध्यें आम्ही दुसऱ्या एका महत्त्वाच्या लिखाणाचा अंतर्भाव केला आहे. तें लिखाण म्हणजे ' समर्थवाकेनिशी ' होय. वाका म्हणजे हकीकत, वाकेनिशी म्हणजे हकीकतीचें टिप्पण, असा अर्थ होतो. शिवाजीमहाराज हयात असतां समर्थांची दिनचर्या—वाकेनिशी—त्यांच्याकडे नित्य जात असे. ती पाठविण्याचें काम समर्थांचे दरबारी शिष्य दिवाकर गोसावी यांच्याकडे असे. दिनचर्येची एक प्रत दिवाकर गोसावी आपले दप्तरीं ठेवीत. ही दिनचर्या अनंत गोपाळ कुडाळकर यांचेकडून ते लिहवीत असत. समर्थ समाधिस्थ झाल्यावर त्यांच्या चरित्रांतील महत्त्वाच्या गोष्टींचें टिप्पण करून ठेवण्यास दिवाकर गोसावी यांनीं अनंत गोपाळ कुडाळकर देशपांडे यांस सांगितलें. छत्रपति शिवाजीमहाराजांना पाठविलेल्या दिनचर्येच्या आधारें त्यांनीं करून ठेवलेलें समर्थचरित्राचें टिप्पण ' समर्थवाकेनिशी ' या नांवानें प्रसिद्ध आहे. शके १६०३ सालीं माघ कृष्ण नवमी दिवशीं समर्थ समाधिस्थ झाले. नंतर लागलीच चार दिवसांनीं म्हणजे माघ कृष्ण त्रयोदशी दिवशीं अनंत गोपाळ कुडाळकर यांनीं समर्थवाकेनिशी लिहिली आहे. इतिहासाचार्य कै. वि. का. राजवाडे यांना ही वाकेनिशी चाफळ येथें श्री. बापूराव उपाध्ये यांचे घरीं कागदपत्रें पाहत असतां सांपडली. या वाकेनिशीचा प्रारंभ पुढीलप्रमाणें आहेः—

" स्मरणार्थ श्रेष्ठ व समर्थ यांचा जन्म होऊन लीला श्रीगंगातीरीं व श्रीकृष्णातीरीं राहोन अनंत लीला केल्या, तीं चरित्रें भक्तमंडळींनीं लिहून ठेविलीं आहेत, ते वाकेनिशीस लिहिणें म्हणोन दिवाकर गोसावी यांनीं सांगितल्यावरून अनंत गोपाळ देशकुलकर्णी परगणे कुडाळ तेहिं लिहिलें शके १६०३

दुर्मती नाम संवत्सरे माघ वद्य त्रयोदशी सौम्यवासरे तद्दीने लिख्यते." "सूर्याजीपंत यांचा जन्म झाला त्या दिवसापासून चरित्र झालेलें," याप्रमाणें आरंभ करून क्रमवार आंकडे घालून हीं स्मरणार्थ समर्थचरित्राचीं ३९ टिप्पणें समर्थवाकेनिशींत दिलीं आहेत. ३९व्या टिप्पणाच्या अखेर पुढील मजकूर आहे. "दिवाकर गोसावी यांनीं अंताजी गोपाळ वाकेनीस कुडाळकर यास लेहून ठेवायास सांगितलें; त्या प्रतीवरून गोपाळ अंबाजी शहापूरकर यांनीं लिहिलें. मिति फाल्गुन शुद्ध पंचमीस लिहिलें असे." हे गोपाळ अंबाजी, समर्थ तीर्थयात्रेनंतर मसूर-शहापूर येथें शके १५६६त आल्यानंतर लागलीच अनुग्रह घेतलेल्या शिष्यांपैकीं अंबाजीपंत शहापूरकर यांचे चिरंजीव होत. समर्थसमाधिकालीं त्यांचें वय २५।३० वर्षांचें असावें. या वाकेनिशीच्या प्रारंभीं लिहिल्याप्रमाणें तिला आधार समर्थकालीं समर्थशिष्यांनीं लिहून ठेवलेलीं समर्थचरित्रें आहेत हें स्पष्ट होतें. यावरून ही वाकेनिशी पूर्ण विश्वसनीय आहे असें मानण्यास कांहीं हरकत नाहीं. या वाकेनिशीच्या शेवटीं लिहिलेल्या तीन ओळींवरून कै. राजवाडे यांना सांपडलेली प्रत, मूळ माघ वद्य त्रयोदशीस केलेल्या प्रतीवरून फाल्गुन शुद्ध पंचमी दिवशीं म्हणजे सातवे दिवशीं केलेली नक्कल आहे, हें वाचकांस कळून येईल. समर्थशिवाजींच्या भेटीचा अगर समर्थचरित्रांतील इतर कोणत्या ही गोष्टीचा वाद उपस्थित होण्यापूर्वीं (२५० वर्षांपूर्वीं) सदर समर्थवाकेनिशी लिहिली असल्याकारणानें व समर्थसमाधीनंतर चारच दिवसांनीं शिवाजीमहाराजांकडे पाठविलेल्या समर्थदिनचर्येवरून तयार केली असल्याकारणानें ती विश्वासनिय मानण्यास मुळींच हरकत नाहीं. अलीकडे इतिहाससंशोधकांना जे विश्वसनीय कागदपत्र उपलब्ध झाले आहेत, त्यांवरून हीं समर्थवाकेनिशींतील त्रोटक टिप्पणें खरीं ठरत आहेत ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. भारताचार्य श्री. चिंतामण विनायक वैद्य यांनीं सन १९३१ सालीं *Shivaji: The Founder of Maratha Swaraj.* ( मराठी स्वराज्याचे संस्थापक शिवाजी ) या नांवाचें एक पुस्तक इंग्रजींत लिहिलें आहे. त्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत श्री. वैद्य यांनीं एक तत्त्व प्रतिपादन केलें आहे, त्यावरून समर्थवाकेनिशींतील शक, तिथि व नामनिर्देश हीं खरीं ठरतात. सदर प्रस्तावनेंत श्री. वैद्य म्हणतात, "The temptation to exaggerate or falsify is natural to many writers as also the desire to record mere heresay. But events, dates or names cannot be questioned when noted by contemporary writers." ( अर्थः—अतिशयोक्तीनें लिहिण्याची, अगर खोटें ठरवूं पहाण्याची इच्छा, त्याचप्रमाणें केवळ ऐकीव गोष्टी लिहून ठेवण्याची इच्छा पुष्कळ लेखकांमध्यें साहजिकपणें असलेली आढळून येते; परंतु समकालीन लेखकांनीं लिहून ठेवलेल्या घटित गोष्टी ( events ), शकतिथि व नांवें यांच्या सत्यतेविषयीं

प्रश्नच उद्भवत नाहीं; म्हणजे तीं खरीं मानलीं पाहिजेत. ) तेव्हां श्री. वैद्य यांच्या तत्त्वाप्रमाणें समर्थवाकेनिशींतील गोष्टी, शकतिथि व नाम-निर्देश हीं विश्वसनीय ठरतात. या बाबतींत कै. राजवाडे यांचें मत पुढीलप्रमाणें आहे. " ( १ ) समकालीन व्यक्तींनीं समकालीन प्रसंग साक्षात् घडत असतांना परमार्थानें लिहिलेलें अगर लिहविलेलें अस्सल पत्र किंवा त्याची नक्कल सर्वांशीं जातीनें प्रमाण होय. ( २ ) समकालीन व्यक्तींनीं आपल्या हयातींतील गतकालीन प्रसंगांसंबंधीं लिहिलेले लेख किंवा उल्लेख पहिल्या वर्गांतील प्रमाणांच्या प्रातिकूल्याच्या अभावीं जातीनें प्रमाण होत. विषमकालीन व्यक्तींनीं गतकालासंबंधीं लिहिलेले लेख ( अ ) पंचायतीपुढें प्रामाणिक साक्षीच्या रूपानें दिलेले असल्यास आणि ( ब ) बखरी म्हणून योग्य आधारानें लिहिले असल्यास, केवळ स्मृतीवर भरवंसा ठेवून लिहिले नसल्यास व आपल्या कामाचें योग्य शिक्षण मिळून लिहिलेले असल्यास, जातीनें प्रमाण समजावे. या तीन प्रकारांच्या लेखांखेरीज बाकी सर्व लेख कमजास्त प्रमाणानें अविश्वसनीय होत. जो लेख जातीनें प्रमाण असेल त्यांतील मजकूर (१) एकाच ऐतिहासिक प्रसंगाला अनुलक्षून असेल, किंवा ( २ ) अनेक प्रसंगांच्या संततीला अनुलक्षून असेल. प्रथमपक्षीं प्रसंगाचा काल व स्वत: प्रसंग निश्चित झालेला असतो व द्वितीयपक्षीं ही प्रसंग संततीच्या कालाचें पौर्वापर्य व स्वतः प्रसंग निश्चित झालेले असतात. जातीनें प्रमाण जे असतात, त्यांत कालाचें पौर्वापर्य निश्चित असल्यामुळें प्रसंगाची संतती ही निश्चित असते. हा निश्चितपणा बखरींतील मजकुरासंबंधानें खात्रीनें करतां येत नाहीं. इतकेंच नव्हे तर प्रसंगाचें वर्णन ही जसा तो घडला असेल तसें असेलच असें ही सांगतां येत नाहीं." ( राजवाडे, लेखसंग्रह, भाग १ ला, ऐतिहासिक प्रस्तावना, पृष्ठें २४१—२४२ )

कै. राजवाडे यांच्या वर नमूद केलेल्या नियमांप्रमाणें ही अंताजी गोपाळ कुडाळकरकृत समर्थवाकेनिशी समकालीन व्यक्तीनें आपल्या हयातींतील गतकालीन प्रसंगांसंबंधीं लिहिलेला लेख असल्यामुळें विश्वसनीय मानली पाहिजे.

( ३ ) समर्थचरित्रास तिसरा आधार समर्थांच्या प्राचीन व अर्वाचीन चरित्रांचा होय. इंग्रजी अंमलापूर्वी लिहिलेल्या समर्थचरित्रांस आम्हीं प्राचीन चरित्रें व इंग्रजी अंमलानंतर लिहिलेल्या चरित्रांस अर्वाचीन चरित्रें असें सोयीकरितां म्हटलें आहे. प्रकाशित असलेल्या प्राचीन व अर्वाचीन चरित्रांचा नामनिर्देश करून प्रत्येक चरित्राविषयीं थोडी माहिती देऊन टीकात्मक विवेचन करण्याचें आम्हीं योजिलें आहे. त्यावरून कोणतें चरित्र किती विश्वासनीय आहे हें वाचकांस कळून येईल.

**प्राचीन चरित्रें:**—प्राचीन चरित्रांत ( अ ) समर्थशिष्यकृत चरित्र

( आ ) समर्थप्रशिष्यकृत चरित्रें, ( इ ) सांप्रदायिक चरित्रें व ( ई ) स्वतंत्र चरित्रें, असे आम्हीं चार भाग केले आहेत.

( अ ) समर्थशिष्यकृत चरित्रें:—सामान्य विवेचन—ज्ञानदेव, नामदेव, तुकाराम, रामदासप्रभृति अनेक साधुसंत महाराष्ट्रांत होऊन गेले. परंतु इंग्रजी अंमलापूर्वी रामदासस्वामींचे जितके चरित्रकार झाले, तितके इतर साधुसंतांचे झाले नाहींत. याचें मुख्य कारण रामदासांनीं आपला स्वतंत्र संप्रदाय स्थापन केला व त्या संप्रदाय-प्रसारार्थ अनेक मठ स्थापन केले व त्यांच्या हयातींतच 'नभामाजिं तारांगणें' असा त्यांचा शिष्यसमुदाय वाढला होता हें होय. समर्थसंप्रदायापेक्षां वारकरीसंप्रदाय अधिक जुना आहे; व समर्थसंप्रदायाच्या अनुयायांपेक्षां वारकरीसंप्रदायाचे अनुयायी ही अधिक आहेत. चाफळ व सज्जनगड येथील यात्रांपेक्षां पंढरपूर व आळंदीच्या यात्रांना अधिक लोक जातात, असें असून ही इंग्रजी अंमलापूर्वी ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकारामप्रभृति साधुसंतांचीं सविस्तर चरित्रें अधिकारी वारकरी भक्तमंडळींपैकीं कोणीं लिहिलेलीं विशेष आढळून येत नाहींत. ज्ञानेश्वरीचीं भक्तिभावानें पारायणें करणारे हजारों वारकरी होते व आहेत. तुकारामाच्या अभंगांचें पारायण करणारे व नित्य रात्रीं भजनांत भक्तिभावानें त्यांचे अभंग पाठ म्हणणारे हजारों वारकरी होते व आहेत. परंतु मुसलमानी कारकीर्दींत अगर मराठ्यांच्या अंमदानींत ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकारामप्रभृति साधुसंतांचीं सविस्तर व विश्वसनीय चरित्रें वारकरी संप्रदायापैकीं कोणीं लिहून ठेवलेलीं आढळून येत नाहींत. साधुसंतांचीं चरित्रें लिहिण्यापेक्षां त्यांच्या पवित्र मुखांतून निघालेल्या अमृततुल्य वाङ्मयगंगेंत अवगाहन करून ब्रह्मानंदांत तन्मय होण्यांतच वारकरीपंथांतील भाविक लोकांना आनंद वाटत होता. म्हणून इंग्रजी अंमलापूर्वी वारकरीसंप्रदायांतील लोकांनीं आपल्या पंथांतील साधुसंतांचीं सविस्तर चरित्रें लिहून ठेविलीं नसावींत असें आम्हांस वाटतें.

समर्थसंप्रदायाच्या वीस लक्षणांत पहिलीं तीन लक्षणें ( १ ) लिहिणें, ( २ ) वाचणें व ( ३ ) अर्थांतर सांगणें, अशीं आहेत. म्हणून सदर संप्रदायांत साक्षर लोकांचा भरणा विशेष असे. दहावें लक्षण प्रबंध ( लिहिणें ) हें आहे. त्या योगानें समर्थसंप्रदायामध्यें ग्रंथलेखनाची प्रवृत्ति विशेष झाली असावी व शिष्यानें ग्रंथलेखनास आरंभ केल्यावर त्यास आपल्या सद्गुरूचें चरित्र लिहिण्याची प्रवृत्ति होणें साहजिकच आहे. हें एक समर्थसंप्रदायांत समर्थांचे अनेक चरित्रकार झाले याचें कारण आहे.

ज्ञानदेव, एकनाथ, तुकारामप्रभृति साधुसंतांचीं जीं विश्वसनीय सविस्तर व उत्कृष्ट चरित्रें लिहिलीं आहेत, तीं अर्वाचीन काळीं इंग्रजी अंमलानंतर पाश्चात्य

शिक्षणविभूषित ह. भ. प. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, श्री. जगन्नाथ रघुनाथ आजगांवकरप्रभृत्ति भाविक महाराष्ट्रसाहित्यभक्तांनीं लिहिलेलीं आहेत. उलट पक्षीं समर्थांचीं जीं चरित्रें प्रकाशित आहेत त्यांपैकीं बहुतेक सर्व समर्थशिष्यांनीं व प्रशिष्यांनीं समर्थसमाधीनंतर व कांहीं पुढें १०० वर्षांनीं परंतु इंग्रजी अंमलापूर्वी लिहिलेलीं आहेत. हनुमंतस्वामींच्या बखरींत समर्थशिष्यांनीं लिहिलेल्या पुढील आठ समर्थचरित्रांचा उल्लेख आहे:— ( १ ) कल्याणस्वामी-कृत, ( २ ) उद्धवस्वामी-कृत, ( ३ ) तंजावरमठाधिपति भीमस्वामी-कृत, ( ४ ) वासुदेवगोसावी-कृत, ( ५ ) मौनी गोसावी-कृत, ( ६ ) दिवाकरगोसावी-कृत ( ७ ) अंताजीगोसावी-कृत व ( ८ ) कुडाळकर देशपांडे-कृत. यांशिवाय पुढील पांच चरित्रांचा ही उल्लेख आहे:— ( ९ ) गिरिधरस्वामी-कृत समर्थप्रताप, ( १० ) मेरुस्वामी-कृत चरित्र ( रामसोहळा ), ( ११ ) गंगाधरमहाराज-कृत चरित्र, १६४०, (१२) शहापूरकर कुलकर्णी यांचे घरीं जुनी लिहिलेली बखर ( १६३० ) व ( १३ ) परळीवरील चाळीस बंदांची बखर. परंतु दुर्दैवाची गोष्ट ही कीं, वरील समर्थशिष्यांनीं लिहिलेल्या आठ चरित्रांपैकीं फक्त एकच चरित्र उपलब्ध झालें आहे व तें धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें प्रकाशित करून महाराष्टास ऋणी करून ठेवलें आहे. बाकीचीं समर्थशिष्य-कृत चरित्रें अद्याप उपलब्ध नाहींत. कल्याणस्वामींच्या डोमगांवच्या मठांत श्री. देव यांना समर्थग्रंथांचें एक मोठें बाड सांपडलें; उद्धवस्वामींच्या टाकळीमठांत ही त्यांना पुष्कळ ग्रंथ मिळाले. परंतु कल्याणकृत समर्थचरित्र व उद्धवकृत समर्थचरित्र हीं चरित्रें सांपडलीं नाहींत, ही दुर्दैवाची गोष्ट होय. कल्याणस्वामी अनुग्रह झाल्यापासून डोमगांवास जाईपर्यंत म्हणजे शके १५६७ पासून शके १६०१ पर्यंत सतत ३४ वर्षे समर्थांजवळ होते. समर्थांचें हृद्गत त्यांच्याइतकें दुसऱ्या शिष्यांस कळलें नव्हतें. समर्थांनीं शिवाजीमहाराजांना शिंगणवाडी येथें अनुग्रह दिला, त्या वेळीं ते तेथें हजर होते. तेव्हां कल्याणस्वामींनीं लिहिलेलें समर्थचरित्र उपलब्ध झाल्यास समर्थचरित्रांतील पुष्कळ महत्त्वाच्या गोष्टींवर प्रकाश पडणार आहे. असा सुदिन केव्हां येतो तें पहावें. उद्धवस्वामींनीं समर्थचरित्र लिहिल्याचा ह. स्वा.च्या बखरींत उल्लेख आहे. उद्धवस्वामी समर्थांचे पहिले शिष्य. त्यांनीं समर्थांच्या तीर्थयात्रेंतील लीला लिहिल्याचा समर्थवाकेनिशींत उल्लेख आहे. शिवाय पंचवटींत समर्थांजवळ ते आठ वर्षे होते. समर्थांनीं पंचवटींत गीता, भागवत, उपनिषदादि ग्रंथांचें अध्ययन कोणत्या गुरूजवळ केलें, समर्थांचे त्या वेळचे गुरुबंधु कोण होते, तीर्थयात्रेंत समर्थांबरोबर पंचवटींतून कोण कोण गेले होते, हें उद्धवस्वामींइतकें दुसऱ्या शिष्यांस समजण्याचा मार्ग नव्हता. तेव्हां उद्धवस्वामी-कृत समर्थचरित्र सांपडल्यास ही समर्थचरित्रावर चांगला प्रकाश पडणार आहे.

दिवाकरभट गोसावीकृत समर्थचरित्राचा ही ह. स्वा.च्या बखरींत उल्लेख आहे. दिवाकरभटास समर्थ तीर्थयात्रेहून महाबळेश्वरीं आल्यावर लागलीच अनुग्रह झाला होता. ते ही शिवाजीमहाराजांना शिंगणवाडीस अनुग्रह झाला त्या वेळीं हजर होते. शिवाय ते समर्थांचे छत्रपतींच्या दरबारांतील सर्व कामकाज पाहणारे शिष्य होते. रायगडास राजवाड्यांत शिवाजीमहाराजांनीं समर्थांची एकांतांत गाठ घेतल्याबद्दल तत्कालीन एक पत्र उपलब्ध झालें आहे. त्यांत दिवाकरभटांना खंडो बल्लाळ चिटणीसांनीं बाहेर पाटावर बसविल्याचा उल्लेख आहे. तेव्हां दिवाकरभट गोसावीकृत समर्थचरित्र ही उपलब्ध झाल्यास समर्थचरित्रांतील पुष्कळ महत्त्वाच्या गोष्टींवर चांगला प्रकाश पडणार आहे. समर्थांच्या वरील तीन शिष्यांनीं लिहिलेलीं चरित्रें उपलब्ध झाल्यास समर्थचरित्रांतील पुष्कळ महत्त्वाच्या गोष्टी पुढें येऊन कित्येक वादग्रस्त गोष्टींचा निकाल लागेल. संशोधकांच्या प्रयत्नांस यश येऊन सर्व समर्थशिष्यकृत चरित्रें लवकर उपलब्ध होवोत अशी सदिच्छा प्रगट करून समर्थशिष्यकृत चरित्रांविषयीं हें सामान्य विवेचन पुरें करतों.

प्रकाशित चरित्रें:— ( १ ) समर्थशिष्य तंजावरमठाधिपति भीमस्वामीकृत समर्थचरित्र उपलब्ध व प्रकाशित आहे. तें सर्वांत जुनें चरित्र असून त्रोटक असलें तरी विश्वासनीय आहे. कारण भीमस्वामी तंजावरास जाईपर्यंत त्यांचा काल समर्थ-सहवासांत गेला होता. परंतु दुर्दैवाची गोष्ट कीं, त्या अल्प चरित्रांतील पहिल्या नऊ व शेवटल्या सहा ओंव्या व पहिले पांच कडके गाहाळ झाले आहेत. आरंभींचीं व शेवटचीं कांहीं पदें हीं गाहाळ झालीं आहेत. भीमस्वामींनीं समर्थांचें सविस्तर चरित्र कां लिहिलें नाहीं तें समजत नाहीं. त्यांच्या चरित्रांत अद्‌भुत गोष्टींचा उल्लेख नाहीं. भीमस्वामीकृत समर्थ-चरित्र सत्कार्योत्तेजक सभेनें शके १८३२ सालीं प्रसिद्ध केलें. प्रत्यक्ष समर्थशिष्याचें सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केलेलें असें हें एकच चरित्र होय. भीमस्वामी-कृत ‘ श्रीसमर्थांच्या अंतकालचें वर्णन ’ म्हणून ५० ओंव्या रामदास आणि रामदासी, भाग १५, लेखांक २५, यांत सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केल्या आहेत. त्यांत बहुतेक अंतकालचेंच वर्णन आहे. भीमस्वामी समर्थ-समाधीनंतर तीन दिवसांनीं सज्जनगडावर आले, त्या वेळीं तें वर्णन लिहिलेलें दिसतें. चरित्रांतील पहिल्या चार ओंव्या व अंतकालच्या वर्णनांतील पहिल्या चार ओंव्या सारख्याच आहेत. हनुमंतस्वामींच्या बखरींत या ५० ओंव्यांचा ही उल्लेख आहे. व त्या ओंव्यांचा ह. स्वा. बखरींत समर्थांचें अंतकालचें वर्णन देतांना उपयोग केला आहे. भीमस्वामीकृत चरित्राप्रमाणें त्यांच्या अंतकालच्या ५० ओंव्या ही विश्वासनीय आहेत. भीमस्वामींचें चरित्र पुढें ‘ मठ, महंत व शिष्य ’ या भागांत दिलें आहे.

(२) समर्थशिष्यकृत दुसरें त्रोटक चरित्र, तिसगांवमठपति दिनकर-स्वामी यांचें होय. तंजावरमठपति भीमस्वामींप्रमाणें दिनकरस्वामींनीं समर्थांचें निराळें स्वतंत्र असें चरित्र लिहिलेलें नाहीं. समर्थांचे जे शिष्य अत्यंत बुद्धिमान् व विद्वान् होते त्यांत अग्रपूजेचा मान दिनकरस्वामींना द्यावा लागेल. त्यांनीं समर्थांचें समग्र चरित्र लिहिलें असतें तर तें उत्कृष्ट झालें असतें. गुरुचरणीं त्यांची अनन्यनिष्ठा असतां त्यांनीं सविस्तर समर्थचरित्र कां लिहिलें नाहीं तें समजत नाहीं. ह. स्वा. बखरींत दिनकरस्वामीकृत समर्थचरित्राचा उल्लेख नाहीं म्हणून त्यांनीं स्वतंत्र समर्थचरित्र लिहिलें नाहीं असें आम्हीं म्हटलें आहे. दिनकरस्वामींनीं 'स्वानुभव दिनकर' नांवाचा एक उत्कृष्ट ग्रंथ लिहिला आहे (रामदास आणि रामदासी, भाग ६ वा). त्याचे एकंदर सोळा कलाप आहेत. त्यांतील शेवटल्या म्हणजे १६ व्या कलापामध्यें चवथें किरण 'श्रीगुरुपरंपरा' या नांवाचें आहे. त्यांत त्यांनीं त्रोटक समर्थचरित्र दिलें आहे. त्यांत अद्‌भुत गोष्टींचा उल्लेख नाहीं. तें चरित्र त्रोटक असलें तरी विश्वसनीय आहे. दिनकरस्वामींचें चरित्र पुढें 'मठ, महंत व शिष्य' या भागांत दिलें आहे.

(आ) समर्थप्रशिष्यकृत चरित्रें:—(१) समर्थप्रताप—गिरिधरस्वामीकृत 'समर्थप्रताप' हें समर्थचरित्र फार महत्त्वाचें व विश्वसनीय आहे. गिरिधर हे समर्थांचे साक्षात् शिष्य नव्हते, तरी त्यांचा तारुण्यांतील कांहीं काळ समर्थांच्या सहवासांत गेला होता; म्हणून त्यांच्या समर्थप्रतापाची समर्थशिष्यकृत चरित्रांइतकीच योग्यता आहे. 'श्रीस्वामीदर्शन' म्हणून त्यांचा एक ग्रंथ आहे. त्यावरून गिरिधर स्वामींचा कांहीं काल समर्थांपाशीं गेला होता हें सिद्ध होतें. एकदां ते दूर बसले होते, परंतु समर्थांनीं त्यांना जवळ बोलावून कीर्तन करण्याची आज्ञा केली असा त्यांत उल्लेख आहे. त्यांचा जन्मशक निश्चित कळत नाहीं. समर्थसमाधिकालाच्या पूर्वीं ते कीर्तन करण्याच्या वयाचे होते. तेव्हां त्यांचा जन्म शके १५७५ पासून श. १५८०पर्यंत केव्हां तरी झाला असावा. गिरिधरस्वामींचे ४० उत्तम ग्रंथ उपलब्ध आहेत. परंतु त्यांपैकीं एकांत ही त्यांनीं आपली पितृपरंपरा व जन्मतिथि दिली नाहीं. त्यांची समाधि बीड येथें आहे. समाधिमंदिरावर त्यांचा समाधिकाल कोरला आहे. त्यावरून शके १६५१ सालीं वैशाख शुद्ध ८ दिवशीं, शुक्रवारीं, सकाळीं त्यांनीं इहलोकींची यात्रा संपविली असें कळून येतें. हल्लीं बीड येथें दोन मठ आहेत. एक त्यांची कन्या साळूबाई यांच्या वंशजांचा व दुसरा त्यांचे बंधु भीम यांच्या वंशजांचा. सुप्रसिद्ध समर्थशिष्या वेणाबाई यांच्या बाइयाबाई म्हणून एक शिष्या होत्या. त्या संसारांत फार उदा-सीन असत. हातांत ग्रंथराज दासबोधाची पोथी घेऊन त्या अरण्यांत हिंडून काल-क्रमणा करीत असत. त्या विरक्त बाइयाबाईंचे गिरिधरस्वामी हे शिष्य होत.

समर्थप्रतापाशिवाय गिरिधरस्वामींनीं पुष्कळ ग्रंथ लिहिले आहेत. त्यांची एकंदर कविता २४००० भरेल. त्यांचे ४० ग्रंथ उपलब्ध आहेत. त्यांपैकीं ( १ ) श्रीग्रंथभावार्थ, ( २ ) ग्रंथान्वय, ( ३ ) श्रीदासबोध ग्रंथराजभावार्थ, ( ४ ) आत्मानुभव व ( ५ ) निवृत्तिराम, हे ग्रंथ दासबोधाचें यथार्थ ज्ञान होण्यास फार उपयोगी आहेत.

त्यांचा समर्थप्रताप हा ग्रंथ समर्थचरित्रपर आहे. समर्थांचे शिष्य, शिष्यिणी, मठ, महंत यांची सविस्तर माहिती समर्थप्रतापाइतकी इतर समर्थग्रंथांत दिलेली नाहीं. त्याचप्रमाणें समर्थचरित्रांतील पुष्कळ गोष्टी त्यांनीं दिल्या आहेत. त्या विश्वसनीय मानण्यास मुळींच हरकत नाहीं. कारण ते समर्थप्रतापाच्या प्रारंभीं म्हणतात, " समर्थस्वामींचीं चरित्रें । कांहीं देखिलीं ऐकिलीं पुण्यश्रोत्रें ॥ परम पावनें परम पवित्रें । सृष्टीमध्यें विस्तारलीं ॥ ( समास १.५ )." म्हणजे समर्थप्रतापांत गिरिधरस्वामींनीं जें समर्थचरित्र लिहिलें, त्यास आधार दोन गोष्टी आहेत. कांहीं गोष्टी त्यांनीं प्रत्यक्ष पाहिल्या होत्या त्याप्रमाणें वर्णिल्या आहेत व कांहीं गोष्टी त्यांनीं प्रत्यक्ष समर्थशिष्यांनीं सांगितल्या त्याप्रमाणें वर्णिल्या आहेत. म्हणजे त्यांची ऐकीव माहिती देखील समर्थसमाधीनंतर १०० वर्षांनीं चरित्रें लिहिणाऱ्या चरित्रकारांपेक्षां फार अधिक विश्वसनीय आहे. समर्थप्रतापांत एक वैगुण्य आहे तें हें कीं, त्यांत तिथि व शक हीं दिलेलीं नाहींत व घडलेल्या गोष्टी ही कालक्रमानुसार दिलेल्या नाहींत. समर्थांचा जन्मशक व समाधिशकसुद्धां दिले नाहींत व इतर चरित्रांत आढळून येणारें समर्थांच्या अंतकालचें वर्णन ही नाहीं.

समर्थप्रतापाचे एकंदर एकवीस समास आहेत व एकंदर ओंव्या १२३६ आहेत. 'समर्थावतार' या पहिल्या समासांत समर्थांचें जन्मस्थान जांबगांव याचें वर्णन व तेथील तत्कालीन नागरिक यांचें वर्णन देऊन नंतर समर्थजन्मकथा दिली आहे. समर्थप्रतापांतील प्रत्येक समासाच्या शेवटीं गिरिधरस्वामी पुढील ओंवी देतातः--" इति श्रीसमर्थप्रतापग्रंथ । प्रगट चालिला उदासपंथ । सभानायक साधुसंत । आत्माराम परिसती ॥१॥" उदासपंथ म्हणजे समर्थपंथ असें वाटतें. कारण समर्थांच्या अनेक नांवांपैकीं उदास हें एक नांव आहे. ' उदासपंथ ' असें प्रत्येक समासाच्या शेवटीं म्हणण्यांत गिरिधरस्वामींचा विशिष्ट हेतु होता कीं काय ? तसेंच प्रत्येक समासाचे शेवटीं ' सभानायक साधुसंत ' असें म्हटलें आहे, तेव्हां गिरिधरस्वामींनीं समर्थप्रताप ' सभानायक साधुसंत ' यांच्या करितां प्रथम रचला कीं काय ? असे प्रश्न साहजिक उद्भवतात. 'बालचरित्रादिवैराग्य' या दुसऱ्या समासांत समार्थांच्या लहानपणाचे खेळ, शिक्षण व कांहीं गोष्टी देऊन नंतर लग्नसमारंभांतून पळून पंचवटीस गेल्याचें वर्णन आहे. ' समर्थप्रताप ' या तिसऱ्या समासांत समर्थांच्या तीर्थयात्रेचें त्रोटक वर्णन दिलें आहे; नंतर मातृदर्शन देऊन

कृष्णातीरीं आल्यावर अकरा मारुती स्थापन केल्याचें वर्णन आहे. समर्थशिवाजी महाराजांसंबंधीं कांहीं गोष्टींचा व महाराजांनीं कर्नाटक हस्तगत केल्याचा ही या समासांत उल्लेख आहे. 'श्रीराममूर्तिसंस्थापन' या चवथ्या समासांत चाफळ गांवीं श्रीराममूर्ति स्थापन केल्याचें वर्णन आहे. एकदां रामनवमीकरितां पाराशरप्रांतीं पारगांवांत चाफळ मंदिरांतील श्रीराममूर्ति नेल्याचा उल्लेख या समासांत आहे. ऐतिहासिक कागदपत्रांवरून ही गोष्ट खरी ठरते. 'आदिदैवतकृत स्तवन' या पांचव्या समासांत श्रीराममूर्तीची स्थापना झाल्यावर सह्याद्रि पर्वतावरील अनेक देवता चाफळास आल्याचें सविस्तर वर्णन आहे. जानाई, धनाई, ज्ञानाई, यमाई, तुकाई, फिरंगाई, तुळजाई वगैरे अनेक देवता येऊन त्यांनीं समर्थांना विशिष्ट विनंत्या केल्याचें मनोरंजक वर्णन आहे. या समासांत शेवटीं गिरिधरस्वामी म्हणतात, "एवं अनंत ब्रह्मांडाचीं दैवतें आलीं। समर्थांसी सर्व ही स्तविती झालीं ॥ नाना शुभ सन्मानें सन्मानिलीं। स्थानिकांसी[1] धाडिलीं गुरुदेवें ॥ ४१ ॥" हा समास काल्पनिक असावा असें आम्हांस वाटतें. 'गुरुदेवस्तवन' हा सहावा समास आहे. या समासाच्या आरंभीं गिरिधरस्वामी म्हणतातः— "समस्त देवांचें गुरुदेवें आवाहन केलें। समस्त देवीं गुरुपदीं बीजें केलें ॥ समस्त देवांसी गुरुदेवें सन्मानिलें अर्चिलें। आत्मयारामी आरामी ॥ २ ॥" विश्वेश्वर महाकालेश्वरादि बारा ज्योतिर्लिंगेश्वर, व दशावतार येऊन त्यांनीं स्तवन केल्याचें मनोरंजक वर्णन आहे. गिरिधरस्वामी म्हणतात, "ऐसें कृष्णातीरीं पंचक्रोशीं अपूर्व वर्तलें। संतीं देखिलें आम्हीं संतमुखें ऐकिलें ॥ श्रीगुरुमाहिमान गुरुगीतार्थें कथिलें। शिवें सांगितलें पार्वतीप्रति पूर्वीं ॥ ४६ ॥" हा ही समास काल्पनिक असावा असें आम्हांस वाटतें. चाफळ येथें श्रीराममूर्तीची स्थापना झाल्यावर समर्थांनीं अनेक देवतांचें व दशावतारांचें भक्तिभावपूर्वक ध्यान केलें असावें व त्यांच्या दिव्य चक्षूंना त्या देवता दिसल्या असाव्या व तें गिरिधरस्वामींनीं कल्याणवेणाबाईप्रभृति शिष्यशिष्यिणींच्या मुखांनीं ऐकिलें असावें. म्हणून त्यांनीं "संतीं देखिलें आम्ही संतमुखें ऐकिलें" असें वर्णन केलें आहे. आम्हीं जें वर काल्पनिक म्हटलें त्याचा अर्थ सामान्य जनांना केवळ कल्पनागम्य असा आहे. 'सद्‌गुरुचरित्रनाममहिमान' असें सातव्या समासाचें नांव आहे. हें नांव या समासास कां दिलें हें नीटसें कळत नाहीं. चाफळ येथें श्रीरामाची स्थापना केल्यावर समर्थ सुंदर मठांत राहण्यास गेले. नंतर त्यांनीं लोकोद्धाराकरितां अनेक मठ स्थापन केले असें सांगून, गागाभट्टदर्शन, शिवरायांनीं अकरा सहस्त्र होनांनीं समर्थपूजा केली, ते होन समर्थांनीं ब्राह्मणांना वाटले तुळजादेवीला नवसफूल वाहिलें वगैरे गोष्टी सांगितल्या आहेत. नंतर शेवटीं "योगी रमती ज्या स्थानीं। सत्यानंद चिदात्ममनीं ॥ राम परब्रह्म

१. आपापल्या स्थानाप्रत.

अभिधानी । श्रुति गर्जती वाक्यार्थे ॥ ५ ॥ श्रीराम उच्चारितां नाम । सर्व देवांचें होय चित्त आराम ॥ सच्चिदानंदस्वानंदधाम । तारक ब्रह्म ब्रह्मांडीं ॥ ५ ३ ॥ एवं श्रीराम दोनी अक्षरें । निगमागमाचीं सारें ॥ ध्यायती गौरीहरें । मातापितरें विश्वाचीं ॥ ५७ ॥ " असें वर्णन केलें आहे. म्हणून समासास 'सद्गुरु-चारित्रनाममहिमान' हें नांव दिलें असावें असें वाटतें. 'श्रीसमर्थलीला' या आठव्या समासांत, सुंदरमठांत समर्थांनीं दोन पुरुष उंच गणपति केला, श्रीराम-अवताराच्या खेळांत रामाचें सोंग आणलें असतां, समर्थ खेळ संपेपर्यंत उभे राहिले वगैरे समर्थांच्या अनेक गोष्टी सांगितल्या आहेत. 'सज्जनपर्वतनिवास' या नवव्या समासांत समर्थ सज्जनगडास आल्यावर घडलेल्या अनेक गोष्टी सांगितल्या आहेत. त्या या चरित्रांत आम्हीं योग्य प्रसंगीं पुढें दिल्या आहेत. १० वा व ११ वा हे दोन समास फार महत्त्वाचे आहेत. त्यांत 'श्रीसमर्थमहंत' व 'श्रीसमर्थशिष्य' यांची अनुक्रमें माहिती दिली आहे. त्यांचा उपयोग आम्हीं 'समर्थांचे मठ, महंत व शिष्य' या भागांत केला आहे. 'श्रीसमर्थसंप्रदाय' हें बाराव्या समासाचें नांव आहे. त्यांत महंत व त्यांनीं केलेल्या संप्रदायांतील असंख्यात शिष्य कसे वागत होते याची माहिती दिली आहे. 'श्रीसमर्थ-सद्गुरुभोजन' हा तेरावा समास फार गोड व मनोरंजक आहे. एवढेंच नव्हे, तर त्यांत समर्थांविषयीं विश्वासनीय अशी बरीच माहिती सीता-राम-संवादांत दिली आहे. हा समास काल्पनिक असा वाटण्याचा संभव आहे; परंतु त्यांतील हकीकत खरी असल्याविषयीं 'भक्तिवेणी' या साक्ष देत आहेत. ब्रह्मारण्यांत समर्थ माध्याह्न-कालीं भिक्षेस गेले असतां " जयजय रघुवीर समर्थ " म्हटल्याबरोबर त्यांना श्रीराम व श्रीजानकीदेवी यांनीं नैवेद्यास बोलाविलें. समर्थ भोजनास बसले असतां, त्यांच्या-विषयीं अनेक प्रश्न सीतादेवीनें श्रीरामांस विचारिले. श्रीरामांनीं त्यांचीं उत्तरें दिलेलीं या समासांत दिलीं आहेत. उदाहरणार्थ, " जानकी म्हणे महापुरुषाची कोण बो स्थिति । कांते, यांची दिसते आत्मास्थिति ॥ देवा, जी, सांगा यांची परागती । प्रिये, आत्मगती यांची दिसताहे । ( १३-१४ )" १५ ते ३७ ओंव्यां-पर्यंत अशींच मनोहर प्रश्नोत्तरें आहेत. ३७ व्या ओंवींत, समर्थांचा आश्रम कोणता ? असा प्रश्न विचारल्यावर, त्यांचा 'ब्रह्मचर्याश्रम' असें श्रीरामांनीं उत्तर दिलें. तेव्हां सीतादेवीनें " तुम्हीं कां गृहस्थाश्रम स्वीकारला ? " असें खुबीनें विचारलें. तेव्हां " मी गृहस्थाश्रम स्वीकारला म्हणून समर्थांसारख्या योग्य अतिथीला नैवेद्य कर-ण्याचें श्रेय आम्हांला मिळालें. " असें लागलीच प्रत्युत्पन्नमति श्रीरामांनीं उत्तर दिलें. " देवा, तुम्हीं गृहस्थाश्रम अंगिकारिलें ! । कांते, तरी हे समर्थांसी नैवेद्य जाहाले !। स्वामी, ऐसें चि अखंड नैवेद्य पाहिजेत घडले । कांते, सर्वां सर्वंच घड-तील ब्रह्मांडोदरीं ॥ ३८ ॥" हा तेरावा समास वाचकांनीं समग्र वाचावा, म्हणजे

त्यांना त्याची गोडी कळून येईल. चवदाव्या समासास ‘ भोजनवाक्यें ’ हें नांव कां दिलें हें नीटसें कळत नाहीं. कृष्णातीरीं करंजगांव, माहुली, वरुणगांव इत्यादि ठिकाणच्या भोजनसमारंभांची माहिती समासांत दिली आहे. व शेवटीं “ जयास झाली संतसंगती । तयासीच लाभती समर्थपंगती ।। कर्मानुसार प्राणी रंगती । प्रपंचीं अथवा परमार्थीं ।।४७।।” असें लिहिलें आहे. पंधराव्या समासास ‘समर्थभोजन’ असें नांव आहे. यांत वेणाबाई, कल्याणस्वामी, रंगनाथस्वामी, प्रेमळशेटी इत्यादि शिष्यांसमवेत झालेल्या भोजनसंबंधाची हकीकत आहे. सोळाव्या समासास ‘महापुरुष भोजनें ’ असें नांव दिलें आहे व सतराव्या समासास ‘ दुसरी पंगती ’ असें नांव दिलें आहे. आद्य शंकराचार्यांपासून समर्थकालापर्यंत सर्व संत, ग्रंथकार ‘समर्थसदनीं’ भोजनास आले आहेत व प्रत्येकांना त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांच्या ग्रंथांतील रस घालून त्यांची सन्मानपूर्वक पूजा केली, असा कथाभाग या दोन समासांत वर्णिला आहे. वाचकांच्या माहितीकरितां एक ओंवी देतों, तीवरून या दोन समासांची कल्पना येईल. “ मुख्य आचार्यस्वामी ब्रह्मानंदरस जेविती । श्रीधराचार्य गीता-भागवतरसराज सेविती ।। विद्यारण्य मधुसूदन रामानंद मध्वमूर्ति । द्वैताद्वैतरस घेती संपूर्ण हो ।। ( स. १६-१७ )” हे दोन्ही समास इतिहाससंशोधकांना अज्ञात संत व त्यांचे ग्रंथ यांचा शोध लावण्याच्या कामीं फार उपयोगी पडणार आहेत. सोळाव्या समासाचे आरंभीं गिरिधरस्वामी म्हणतात, “ समर्थसदनासी महापुरुष आले । समर्थस्वामींसी स्वानंदें भेटले ।। समर्थें सन्मानिले अर्चिले । आत्माराम सुखमूर्ति ।। १६-१७ ।। ” सतराव्या समासाच्या शेवटीं गिरिधरस्वामी म्हणतात, “ नाना गद्यें पद्यें उत्तम श्लोक । गर्जना करिती स्वानंदें लोक । स्वर्गाहूनि पातले देवलोक । समर्थप्रसाद घ्यावया ।। १७-४० ।। ” या दोन समासांत ‘ महापुरुषभोजनें ’ देण्यांत गिरिधरस्वामींचा प्रचंड ग्रंथ-परिचय व असामान्य बुद्धिचातुर्य हीं दिसून येतात. दोन ही समास काल्पनिक आहेत असें आम्हांस वाटतें. कदाचित् प्राचीन आचार्यांचे, ग्रंथकारांचे व साधुसंतांचे वंशज समर्थसदनास आले असल्यास न कळे. परंतु तसा उल्लेख अन्य समर्थ-चरित्रांत सांपडत नाहीं. अठरा व एकोणीस या समासांना ‘ श्रीसमर्थांचीं गाथा-चरित्रें’ अशीं नांवें दिलीं आहेत. या दोन्ही समासांत समर्थांच्या अनेक गोष्टी दिल्या आहेत. म्हणून समर्थचरित्रकारांना ते फार उपयोगाचे आहेत. ‘ श्रीरामअधिष्ठान’ असें विसाव्या समासास नांव दिलें आहे. त्यांत चाफळमठाच्या श्रीराम-उत्सवाची माहिती दिली आहे. एकतिसाव्या समासास ‘श्रीगुरुसमर्थअधिष्ठान ’ असें नांव दिलें आहे. त्यांत सज्जनगडावरील दासनवमीच्या उत्सवाची माहिती दिली आहे. समर्थप्रताप हा समर्थचरित्रांपैकीं महत्त्वाचा ग्रंथ असल्यामुळें त्याची यथार्थ कल्पना

देण्याकरितां प्रत्येक समासाचें थोडक्यांत तात्पर्य दिलें. वर्णन बरेच लांबलें याबद्दल वाचक क्षमा करतील अशी आशा आहे.

( २ ) समर्थप्रशिष्यकृत दुसरें समर्थचरित्र मेरुस्वामीकृत होय. दिनकरस्वामींप्रमाणें मेरुस्वामींनीं समर्थांचें स्वतंत्र चरित्र लिहिलेलें नाहीं. श्रीरामसोहळा ( रामदास आणि रामदासी, ग्रंथमाला १८ ) नांवाचा ग्रंथ मेरुस्वामींनीं लिहिला आहे. श्रीरामसोहळा हा ग्रंथ मोठा आहे. त्याचे अकरा रुद्र आहेत व प्रत्येक रुद्रांत अकरा उल्हास आहेत. एकंदर ग्रंथसंख्या ९४२७ आहे. परंतु दुर्दैवाची गोष्ट कीं, त्यांत समर्थचरित्राच्या वाट्यास फार थोडा भाग आला आहे. पहिल्या रुद्रांतील ६ ते ११ या उल्हासांत समर्थचरित्र दिलें आहे. परंतु तें फार त्रोटक आहे. व त्यांतहि इतर शिष्यप्रशिष्यचरित्रांत ज्यांचा उल्लेख नाहीं अशा असंभवनीय अद्‌भुत गोष्टी दिल्या आहेत. उदाहरणार्थ, ( १ ) एकदां कडक उन्हाळ्यांत समर्थ डोंगरावर माध्याह्नकालीं विश्रांतीस बसले असतां त्यांची प्राणांतिक अवस्था झाली; तेव्हां धनुर्धारी राम प्रगट झाले व संजीवनी विद्येच्या योगानें समर्थांस उठविलें ( रुद्र १, उल्लास ७–३१–४६ ). ( २ ) श्रीरामाच्या प्रथम उत्सवप्रसंगीं रथास फांदी आडवी आली, ती गोष्ट मसूर गांवीं झाली नसून नारगांवीं झाली व समर्थांच्या प्रार्थनेवरून मारुतिरायानें मोडून टाकली ( रुद्र १, उ. ८–३०–३६ ). यांवरून मेरुस्वामीकृत समर्थचरित्र सर्वस्वीं विश्वसनीय मानतां येत नाहीं. शिवाय पहिल्या रुद्रांतील ११ व्या उल्लासांतील पुढील ओंव्यांवरून ही आमच्या अनुमानास बळकटी येतेः—" समर्थकृपाप्रबोधार्क। अनंत अनुग्रह संपर्क ॥ बाणलें समाधान तें सुतर्क। तर्कितां तर्कवेना ॥ ३२ ॥ रात्रीं दिवसासी सूर्यप्रमाण । तें हें गुरुत्रयअधिष्ठान । समर्थांसि अभिवंदन । निज प्रीतीनें ॥ ३३ ॥" मेरुस्वामी हे समर्थशिष्य अनंतमौनी यांचे शिष्य. अनंतमौनी हे गृहस्थाश्रमी होते. त्यांच्या पत्नीच्या विनंतीवरून अनंतमौनींनीं मेरुस्वामींना अनुग्रह दिला. " सद्गुरु अनंताची पत्नी । परमस्नेहाळ ते माझी जननी । परमार्थस्वरूप मजलागुनी । संभविलें तिनें । मजकारणें स्वामीस प्रार्थुनी । महावाक्य सांठविलें श्रवणीं । परम प्रीतीनें अंतःकरणीं ॥ अर्थ प्रांजळ केला ( रुद्र ९, १. ४५–४६ )" परंतु अनंतमौनींनीं मेरुस्वामींना केव्हां अनुग्रह दिला याचा उल्लेख वरील ग्रंथांत नाहीं. अनंतमौनींचा समाधिकाल शके १६१५ श्रीमुख संवत्सरीं, भाद्रपद नवमी स्थिरवार असा दिला आहे. तेव्हां त्यापूर्वीं कांहीं वर्षें मेरुस्वामींना अनुग्रह दिला असावा. कदाचित् समर्थसमाधिपूर्वीं ही दिला असावा व त्यांनीं समर्थांना प्रत्यक्ष पाहिलें असावें. कारण श्रीरामसोहळ्यांतील प्रत्येक रुद्रांतील उल्लासाच्या प्रारंभीं श्रीरामाबरोबर समर्थांचा उल्लेख करितात व ग्रंथारंभींच्या ओंवींत

" श्रीरामसमर्थ अनंता । विशेषणेसी एकाग्रता ॥ सच्चिदानंद समता । तत्त्वता महावाक्य ॥ ( १. १. १. ) " असा उल्लेख आहे.

मेरुस्वामी कृष्णातटाकीं मेरुलिंग येथील राहणारे होत. ते दक्षिणप्रांतीं तीर्थयात्रा करीत असतां अरुणाचळ येथें गेले. तेथें त्यांची व अनंतस्वामींची गांठ पडली व नंतर कांहीं काळ त्यांचे जवळ राहिल्यावर त्यांना अनंतमौनींनीं अनुग्रह दिला. १६[illegible] या वर्षीं अनंतमौनींनीं समाधि घेतल्यावर मेरुस्वामी मन्यारगुडीमठाचे अधिपति झाले. मेरुस्वामी हे आपल्या गुरुप्रमाणें विद्वान् व व्युत्पन्न होते. त्यांनीं अनेक ग्रंथ केले आहेत. त्यांचीं नांवें:––( १ ) श्रीरामसोहळा, ( २ ) भीमोपदेश, ( ३ ) आत्मसाक्षात्कार, ( ४ ) भगवद्गीता, ( ५ ) स्वानंदलहरी, ( ६ ) मानसपूजा, ( ७ ) अनुभवसार, ( ८ ) मेरुबोध, ( ९ ) तत्त्वपट, ( १० ) समर्थाष्टक, ( ११ ) षोडशफल व ( १२ ) पूर्णामृत. कवि या दृष्टीनें मेरुस्वामींची योग्यता फार मोठी आहे. यांच्या ग्रंथांतील उपमाचातुर्य पाहून ज्ञानेश्वरींतील उपमाचातुर्याची व दृष्टांतपरंपरेची आठवण होते.

(३) समर्थप्रशिष्यकृत तिसरें चरित्र हरिहरस्वामीकृत होय. भालगांवमठाधिपति समर्थशिष्य त्रिंबकराज, यांचे शिष्य हरिहरस्वामी होत. त्यांनीं समर्थांचें एक त्रोटक चरित्र लिहिलेलें आहे. परंतु दुर्दैवाची गोष्ट कीं, सदरहु त्रोटक चरित्र ही सर्व उपलब्ध नाहीं. चरित्र अभंगात्मक असून फक्त सात पानांचें आहे. परंतु त्या सात पानांपैकीं दुसरें, पांचवें व सातवें अशीं तीनच पानें उपलब्ध असून बाकीचीं गहाळ झालेलीं आहेत. शेवटच्या पानावर चरित्रकाराचें नांव दिलेलें आहे. उपलब्ध तीन पानांत समर्थचरित्राविषयीं कांहीं विशेष माहिती नाहीं. समर्थांचे वडील व मातोश्री यांना " ज्ञानसूर्य पिता । चिद्राणी ते माता " असें म्हटलें आहे. समर्थमठांना " ठाणीं " असें अन्वर्थक नांव दिलें आहे. " ठायीं ठायीं ठाणीं बसविलीं । भाविकें लाविलीं भक्तिमार्गी ॥ ( अभंग ७३ ) " शिवरामशिष्य अंबऋषि यांनीं हरिहरस्वामींवर एक आरती केली आहे. तीवरून शके १६८८ सालीं त्यांचा अंत झाला असें कळतें. ते उदास, विरागी, धन तृणवत् मानणारे व दाते होते. कैकटनगरी सोडून ते वनवासी झाले. लहर लागेल तेव्हां भालगांवमठीं येत असत.

( इ ) सांप्रदायिक चरित्रें:—( १ ) हनुमंतस्वामींची बखर. सांप्रदायिक चरित्रांत सर्वांत जुनें व महत्त्वाचें चरित्र चाफळमठाधिपति हनुमंतस्वामीकृत बखर हें होय. इतर चरित्रांपेक्षां वाचकांना व समर्थचरित्रांवर टीका करणाऱ्यांना या बखरीचाच विशेष परिचय आहे. कारण ही बखर, सत्कार्योत्तेजक सभेनें समर्थशिष्यांचीं व प्रशिष्यांचीं चरित्रें प्रसिद्ध करण्यापूर्वींच प्रसिद्ध झालेली होती. ही बखर प्रथम श्री.

गोवर्धनदास लक्ष्मीदास यांनीं शके १७९२ सालीं प्रसिद्ध केली. दुसरी आवृत्ति त्यांनीं वाढवून शके १८१० सालीं प्रसिद्ध केली! तिसरी आवृत्ति श्री. मोरो बाबूराव गोगटे यांनीं प्रसिद्ध केली. त्यांत त्यांनीं स्वतःच्या कल्पनेनें १८ भाग पाडले आहेत. आश्चर्याची गोष्ट ही कीं, प्रस्तावनेंत त्यांनीं पुढील विक्षिप्त विधान केलें आहे. "सदरहू बखर समर्थांचें सर्व चरित्र पाहिलेले त्यांचे शिष्य हनुमंतस्वामी यांनीं समर्थ-समाधीनंतर एका वर्षाचे आंत लिहिलें आहे." संपादकांनीं प्रस्तावनेंत पूर्ण माहितीशिवाय कांहींतरी लिहिलें म्हणजे वाचकांचा विनाकारण गैरसमज होतो. शके १६०३ सालीं, माघ वद्य नवमी दिवशीं समर्थ समाधिस्त झाले. हनुमंत-स्वामींचा जन्म शके १६८९ सालीं झाला व शके १७०५ सालीं ते चाफळमठाधिपति झाले. तेव्हां समर्थसमाधीनंतर एक वर्षाचे आंत हनुमंतस्वामी बखर कशी लिहिणार? व समर्थांचें सर्व चरित्र त्यांनीं स्वत: पहाणें कसें संभवतें? हें संपादक-महाशयांशिवाय इतरांना समजणें कठीण आहे. असो.

हनुमंतस्वामींच्या बखरीच्या हस्तलिखित आठ प्रती सत्कार्योत्तेजक सभेच्या संग्रहीं आहेत. बखरीच्या उपलब्ध सर्व प्रती व आणखी मिळतील त्या प्रती काळजीपूर्वक ताडून पाहून कोणीतरी समर्थभक्तानें शुद्ध व सटीप अशी समर्थांची बखर प्रसिद्ध करावी अशी इच्छा श्री. शं. श्री. देव यांनीं शके १८३७ सालीं प्रदर्शित केली होती. सतरा वर्षे झालीं तरी कोणी समर्थभक्तानें हें काम अद्याप केलें नाहीं. बखरीच्या आठ प्रती सत्कार्योत्तेजक सभेच्या संग्रहीं आहेत. तेव्हां श्री. देवांनींच समर्थांची शुद्ध व सटीप बखर प्रसिद्ध करावी असा श्रीसमर्थसंकेत दिसतो व तसें करण्यास श्री. देवच सर्वतोपरी योग्य आहेत असें आम्हांस वाटतें.

हनुमंतस्वामींची बखर हल्लीं जी प्रकाशित आहे, ती शके १७४० बहुधा-नाम संवत्सरीं आश्विन शुद्ध दशमीस चाफळ मुक्कामीं समाप्त झालेली आहे. परंतु तिची संक्षिप्त पूर्वरेखा शके १७१५ प्रमाथी नाम संवत्सरीं माघ वद्य द्वादशीस सज्जनगड येथें तयार झाली होती. ही संक्षिप्त बखर सविस्तर लिहिण्यास मल्हार रामराव चिटणीस व रंगो लक्ष्मण यांनीं हनुमंतस्वामींची आज्ञा मागितली; त्याप्रमाणें आज्ञा मिळाल्यावर पूर्वींच्या जुन्या बखरींवरून अधिक माहिती मिळवून व स्वतः ह. स्वामींनीं कांहीं अधिक माहिती सांगितली तीवरून, वरील दोघां गृहस्थांनीं शके १७४० ची बखर चाफळ मुक्कामीं हनुमंतस्वामींच्या आज्ञेवरून समाप्त केली. म्हणून ती 'हनुमंतस्वामींची बखर' या नांवानें प्रसिद्ध आहे. परंतु ती बखर खरोखर लिहिणारे मल्हार रामराव चिटणीस व रंगो लक्ष्मण हे होत. तेव्हां हनुमंतस्वामींच्या बखरीवर सरसकट असत्यतेचा छाप मारणाऱ्यांनीं वरील दोघां गृहस्थांना समर्थांचें चरित्र लिहिण्याच्या साधनांची अनुकूलता होती कीं नाहीं याचा विचार करणें जरूर आहे. सविस्तर बखर

लिहिणारे पहिले गृहस्थ छत्रपति शिवाजीमहाराजांची बखर लिहिणारे सुप्रसिद्ध मल्हारराव चिटणीस होत. चिटणीस घराण्याचा छत्रपति घराण्याशीं संबंध शिवाजीमहाराजांपासून आहे. चिटणीस घराण्याचे मूळ पुरुष बाळाजी आवजी यांना समर्थांचा अनुग्रह झाला होता. एवढेंच नव्हे, तर शिवाजीमहाराजांच्या राज्याभिषेकाच्या कामीं त्यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला होता व त्यांच्यावर शिवाजीमहाराजांचा पूर्ण विश्वास असून महाराज त्यांना महत्त्वाचीं कामें करण्यास सांगत असत. तेव्हां त्यांच्या वंशजांतील मल्हार रामराव चिटणीस यांना शिवसमर्थसंबंधींच्या विश्वसनीय गोष्टींची माहिती असणें साहजिक आहे. हनुमंतस्वामींच्या बखरीवर आक्षेप घेणारे प्रो. भाटे यांनासुद्धां मल्हारराव चिटणीस यांच्या अंगीं थोडीतरी चिकित्सक बुद्धि होती ही गोष्ट कबूल करावी लागली आहे (सज्जनगड व रामदास, पा. ९३ ). कै. राजवाडे ही मल्हारराव चिटणीसांना कांहीं अस्सल व विश्वसनीय कागदपत्र उपलब्ध झाले होते असें म्हणतात (ऐतिहासिक प्रस्तावना, खंड चवथा, पान २४१ ). सविस्तर बखर लिहिणारे दुसरे गृहस्थ चाफळमठाचे कारभारी रंगो लक्ष्मण हे होत. ते कारभारी असल्याकारणानें मठांतील सर्व कागदपत्र त्यांनीं पाहिले असले पाहिजेत. समर्थांच्या पूर्वींची २२ पिढ्यांची वंशावळ फक्त हनुमंतस्वामींच्या बखरींतच सांपडते, इतर शिष्यप्रशिष्यांच्या चरित्रांत सांपडत नाहीं, याचें कारण वरीलच होय. समर्थांचे वडील सूर्याजीपंत हे कुलकर्णी असल्याकारणानें त्यांनीं आपले मूळ पूर्वज कृष्णाजीपंत ठोसर बेदर सोडून जांबेस आल्यानंतर सर्व पूर्वजांची वंशावळ जपून ठेवली असली पाहिजे व समर्थांच्या पश्चात् श्रेष्ठांचे नातू गंगाधरस्वामी चाफळमठाधिपति झाले, तेव्हां त्यांनीं जांबेहून सर्व कागदपत्र चाफळास आणले असले पाहिजेत. ते सर्व कागदपत्र हनुमंतस्वामींचे कारभारी रंगो लक्ष्मण यांस सहज पाहण्यास मिळाले. तेव्हां हनुमंतस्वामींची बखर लिहिणारे दोन्ही गृहस्थ कोणीतरी सामान्य गृहस्थ नसून शिवसमर्थकालीन इतिहासाची व कागदपत्रांची ज्यांना माहिती होते असे गृहस्थ होते. तेव्हां बखरींत दिलेल्या तिथि, शक व घडलेल्या गोष्टी यांच्या सत्यतेविषयीं शंका घेण्याचें कारण नाहीं. नवीन मिळालेल्या ऐतिहासिक कागदपत्रांवरून बखरींत नमूद केलेल्या शिवाजीमहाराजांच्या कर्नाटकांतील स्वाऱ्या वगैरेसंबंधीं माहिती खरी ठरत आहे; व बखरींतील बहुतेक तिथि व शक समर्थवाक्येनिशींतील तिथींशीं व ऐतिहासिक कागदपत्रांतील कालाशीं जुळतात. तेव्हां बखरीवर सरसगट असत्यलेखनाचा आरोप ठेवणें योग्य नाहीं.

ह. स्वा. बखरींत अद्भुत गोष्टी व आख्यायिका आहेत व कांहीं वर्णनें अतियोक्तीचीं आहेत ही गोष्ट खरी आहे. परंतु हा दोष बखरकारांचा नसून तत्कालीन समाजस्थितीचा आहे. पाश्चात्यशिक्षणमंडित पदवीधरांइतकी चिकित्सक बुद्धि

त्या वेळीं दिसून न आल्यास तो दोष बखर लिहिणाऱ्यांचा नव्हे. हल्लींच्या सुधारलेल्या युगांत ही अद्भुत गोष्टींवर विश्वास ठेवणारे गृहस्थ युरोपखंडांतसुद्धां दिसून येतात. तेव्हां ह. स्वा.च्या बखरींत कांहीं अद्भुत गोष्टी व आख्यायिका दिल्या आहेत म्हणून ती सर्वथैव अविश्वसनीय मानतां येणार नाहीं. हंसक्षीर न्यायानें आख्यायिका व अतिशयोक्ति यांचा भाग सोडून शक, तिथि व घडलेल्या गोष्टी ( events ) या विश्वसनीय मानण्यास हरकत नाहीं. ह. स्वा. बखरींतील शक व तिथि समर्थवाकेनिशीवरून घेतलेल्या दिसतात व समर्थवाकेनिशी ही शके १६०३ मध्यें समर्थसमाधीनंतर लागलीच लिहिलेली आहे. समकालीन लेखकांनीं लिहिलेल्या तारखा, नांवें व गोष्टी या सत्य मानल्या पाहिजेत हें कै. राजवाडे यांचें व श्री. चिं. वि. वैद्य यांचें ऐतिहासिक तत्त्व आम्हीं समर्थवाकेनिशी-विषयीं लिहितांना मागें दिलेंच आहे. तें ह. स्वा.च्या बखरींतील तेवढ्या भागास ही त्याच न्यायानें लागू पडतें. समर्थशिष्यप्रशिष्यांनीं लिहिलेल्या चरित्रांतसुद्धां समर्थचरित्रांतील माहिती कालानुक्रमानें शकतिथिपूर्वक दिलेली नाहीं. तेव्हां तीं चरित्रें वाचतांना वाचक त्या बाबतींत गोंधळून जातो. परंतु ह. स्वा. बखरींत वाचकांस शकतिथींचा आधार मिळाल्यानें तो गोंधळून जात नाहीं. गुलाबाचें फूल तोडतांना जसे कांटे एका अंगाला सारावे लागतात, तसें ह. स्वा.बखर वाचतांना दंतकथा व अतिशयोक्ति यांना एका अंगास करून ऐतिहासिक गोष्टींचा तेवढा स्वीकार केला पाहिजे.

(२) दुसरें सांप्रदायिक समर्थचरित्र 'भक्तलीलामृत' होय. तें शिरगांव-मठाधिपति भीमस्वामी यांनीं लिहिलें आहे. तें अभंगात्मक आहे. या समर्थ-चरित्राचे एकंदर १२१ अभंग आहेत. सदरहू चरित्र भीमस्वामींनीं अवंती येथें शके १७१९ पिंगळ संवत्सरीं, श्रावण वद्य द्वितीया सोमवारीं समाप्त केलें, असा शेवटच्या अभंगांत उल्लेख आहे. यांतील वर्णनें पाल्हाळिक नाहींत. थोडक्यांत वर्णन करण्याची शैली भीमस्वामींना साधली आहे. समर्थचरित्रांतील गोष्टींच्या शक-तिथि जरी दिल्या नाहींत तरी चरित्रांतील कथाभाग बहुतेक यथाक्रम दिले आहेत. भीमस्वामींना समर्थांची प्रत्यक्ष माहिती नव्हती. कल्याणस्वामींचे धाकटे बंधु दत्तात्रयस्वामी हे गृहस्थाश्रमी होते. त्यांचे पुत्र राघवस्वामी, त्यांचे पुत्र यशवंतस्वामी, यांचे पुत्र भक्तलीलामृतकार भीमस्वामी. शेवटच्या अभंगाच्या आरंभीं भीमस्वामी म्हणतात:– "स्वामींचीं चरित्रें। वडिलीं श्रवण। झालीं तितुकीं जाण। वर्णियलीं ॥ १ ॥" पुष्कळ गोष्टी केवळ ऐकीव माहितीवरून लिहिल्यामुळें हें चरित्र सर्वथैव विश्वसनीय नाहीं. भीमस्वामींनीं वेणाबाईच्या समाधिकालचें सविस्तर वर्णन केलें आहे (अभंग ११७।११८). परंतु समर्थांच्या समाधिकालचें मुळींच वर्णन केलें नाहीं हें मोठें आश्चर्य होय. भक्तलीलामृतांत समर्थचरित्राशिवाय ३७ साधुसंतांच्या त्रोटक

कथा दिल्या आहेत. त्यांत नामदेव, तुकाराम, जनाबाई, गोरा कुंभार, सावंता माळी, चोखामेळाप्रभृति वारकरीपंथांतील साधुसंतांचा समावेश केला आहे. यावरून समर्थसंप्रदाय व वारकरीपंथ यांच्यामध्यें भक्तलीलामृत-लेखनकालीं विरोध नव्हता हें सिद्ध होतें. इतर ओंवीबद्ध समर्थचरित्रांत प्रत्येक अध्यायाच्या आरंभीं सद्गुरुस्तवनांत व अध्यात्मचर्चेंत बऱ्याच ओंव्या गेल्यानंतर समर्थचरित्रास आरंभ होतो व कांहीं गोष्टींचें वर्णन प्रमाणातीत पाल्हाळपणानें दिलेलें आढळतें. तो प्रकार या चरित्रांत आढळून येत नाहीं. माल्यवान् गंधर्वाच्या कथेस कांहीं चरित्रांत तीन तीन अध्याय पाल्हाळिक वर्णनांत खर्चीं घातले आहेत. तीच कथा भक्तलीलामृतांत तीन अभंगांत मार्मिकपणानें थोडक्यांत दिली आहे ( अभंग ३२–३४). परंतु कांहीं आख्यायिकांच्या सत्यासत्यतेविषयीं अगर शक्याशक्यतेविषयीं विचार न करितां त्या दिल्या आहेत. म्हणून सर्व चरित्र विश्वसनीय मानतां येत नाहीं.

( ३ ) दासविश्रामधाम. समर्थांच्या सर्व प्रकाशित चरित्रग्रंथांत दासविश्रामधाम हा ग्रंथ अत्यंत मोठा आहे. याचे एकंदर १२१ अध्याय आहेत. या ग्रंथाचें एक वैशिष्ट्य असें आहे कीं, प्रत्येक अध्यायास नांवें निरनिराळीं दिलीं आहेत. त्यांपैकीं कांहीं:—समास, प्रकरण, मान, पटल, खंड, कांड, स्कंद, सोपान, स्तबक, विसांवा इत्यादि. ग्रंथाची ओंवीसंख्या १६३०२ आहे. म्हणजे हा ग्रंथ दासबोधाच्या दुपटीपेक्षां मोठा आहे. दासबोधाची ओंवीसंख्या ७७५४ आहे. दासविश्रामधामांत वरील ओंवीसंख्येशिवाय चरित्रकारांचे ७४३ अभंग, २२९ पदें व ११७ श्लोक आहेत. शिवाय समर्थांचीं व इतर साधुसंतांचीं पदें, अभंग, श्लोक, भूपाळ्या, दोहरे व आरत्या वगैरे दिलीं आहेत. त्या सर्वांचा निराळा ग्रंथ केला तर बराच मोठा होईल. या ग्रंथाचें दुसरें एक वैशिष्ट्य असें आहे कीं, जेथें जेथें समर्थकृत ग्रंथांचा प्रथम उल्लेख करण्याचा प्रसंग आला आहे, तेथें तेथें ते ग्रंथ मूळ हस्तलिखितांमध्यें सबंध दिले आहेत ! म्हणून मूळ समग्र ग्रंथास श्री. शंकरराव देव यांनीं 'रामदासी संप्रदायाचा विश्वकोश' असें जें नांव दिलें आहे तें पूर्ण अन्वर्थक आहे. सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केलेल्या दासविश्रामधाम या ग्रंथांत समर्थकृत ग्रंथ दिलेले नाहींत, तरी या ग्रंथाचे चार भाग करून छापावे लागले आहेत.

दासविश्रामधाम हा ग्रंथ कल्याणपरंपरेंतील आहे. कल्याणस्वामींचे शिष्य एकेहाळमठाधिपति शिवरामस्वामी, त्यांचे शिष्य रामचंद्रस्वामी, त्यांचे शिष्य प्रस्तुत विस्तृत चरित्राचे लेखक आत्माराजमहाराज हे होत. शेवटच्या सात अध्यायांत आत्मारामहाराजांनीं आपली गुरुपरंपरा, डोमगांव व आपचंदमठांतील संप्रदायप्रसार व त्या मठांतील अनेक कानडी शिष्यांचीं नांवें दिलीं आहेत. हा ग्रंथ सर्व चरित्रग्रंथांत मोठा असला, तरी चरित्रकाराला समर्थांची प्रत्यक्ष कांहीं माहिती नव्हती व प्रत्यक्ष शिष्यांच्या मुखानें ऐकण्याचा ही त्यांना सुयोग आला

नव्हता, हें या प्रचंड चरित्रग्रंथाचें एक वैगुण्य आहे. आत्मारामहाराज समर्थांचे साक्षात् शिष्य असते व कल्याणस्वामींप्रमाणें त्यांना समर्थसहवासाचा लाभ मिळाला असता, तर प्रस्तुत चरित्र सर्वोत्कृष्ट झालें असतें. बॉस्वेल्नें ज्याप्रमाणें डॉ. जान्सनचें विश्वसनीय व सविस्तर चरित्र लिहिलें आहे, त्याप्रमाणें आत्मारामहाराजांचा समर्थ-चरित्रग्रंथ विश्वसनीय व सविस्तर झाला असता. आत्मारामहाराज हे समर्थांच्या प्रशिष्यांचे प्रशिष्य. गुरुपरंपरेंत कर्णोपकर्णीं ऐकलेली माहिती व संतांनीं लिहिलेलीं चरित्रें यांच्या आधारें त्यांनीं समर्थचरित्र लिहिलें आहे ( अध्याय १-१५, १६ ). कल्याणस्वामी शिष्यमंडळी जमवून त्यांना समर्थचरित्रांतील महत्त्वाचे प्रसंग प्रेमानें सांगत. ती माहिती गुरुपरंपरेनें ऐकण्याचा लाभ आत्मारामहाराज यांना मिळाल्या-मुळें प्रस्तुत चरित्रांतील बराच भाग विश्वसनीय आहे. परंतु प्रस्तुत चरित्र कल्याण-समाधीनंतर पुष्कळ वर्षांनीं लिहिलें गेल्यामुळें ऐकीव माहितींत कमीजास्त फरक होण्याचा संभव आहे. खुद्द चरित्रकारांना ही या गोष्टीची जाणीव होती. प्रसंग-विशेषीं आपण लिहितों तें अन्यथा असण्याचा संभव आहे, अमुक एक गोष्ट दुसऱ्याच शिष्यांसंबंधानें झाली म्हणतात असें लिहिण्याची त्यांच्या स्वत:वर पाळी आली आहे ( कांड ५८-६०,६१ ). दासविश्रामधामांत समर्थचरित्रांतील कांहीं गोष्टींचा पुराणांतील कांहीं गोष्टींशीं बादरायणसंबंध जोडण्याचा विक्षिप्त प्रयत्न केला आहे व शिवसमर्थांसंबंधीं कांहीं गोष्टी सत्यासत्यतेचा व शक्याशक्यतेचा विचार न करितां लिहिल्या आहेत. इतर संप्रदायचरित्रांमध्यें न दिलेली 'मोहिनीगर्वनिवारण' कथा या चरित्रांत दिली आहे. म्हणून या चरित्रांतील सर्व भाग विश्वसनीय मानतां येत नाहीं.

दासविश्रामधामांत आत्मारामहाराजांची विद्वत्ता, बहुश्रुतपणा, कविता-चातुर्य, गुरुभक्ति इत्यादि गुण दिसून येतात. परंतु कित्येक ठिकाणीं ओंव्या दुर्बोध व कठीण आहेत. आत्मारामहाराजांच्या कवितेंत बऱ्याच ठिकाणीं 'नारिकेलपाक' रस आढळून येतो. कित्येक ठिकाणीं संस्कृत शब्दांचे समास सामान्य वाचकांना समजण्यास कठीण असे आढळतात:—ईनवंशभूप, इभोद्धारक, उर्विजानाथ, नभजानंदन इत्यादि. संतविजय, भक्तलीलामृत अगर उद्धवसुतकृत चरित्र यांप्रमाणें हा ग्रंथ सामान्य मराठी वाचकांना सहज कळण्यासारखा नाहीं. हें चरित्र वाचतांना सत्कार्योत्तेजक सभेनें अद्याप प्रकाशित न केलेलीं समर्थकृत पदें वाचकांना सहज वाचण्यास सांपडतात. हा या चरित्राच्या वाचनापासून होणारा एक मोठा फायदा आहे.

( ४ ) उद्धवसुतकृत चरित्र:—उद्धवसुत हे समर्थशिष्य मल्हारपंत यांचे नातू व समर्थशिष्य माधवदास यांचे शिष्य केशवस्वामी यांचे शिष्य. उद्धवसुतांनीं आपली वंशपरंपरा व गुरुपरंपरा आपल्या समर्थचरित्राच्या शेवटच्या अध्यायांत

दिली आहे, ती मनोरंजक असल्यानें थोडक्यांत देतों. वऱ्हाड प्रांतांत सुरजी-अंजनगांवांत अगस्तिगोत्री त्र्यंबकपंत नांवाचे भाविक ब्राह्मण राहत असत. मल्हारी नांवाचा त्यांचा एकुलता एक मुलगा होता. मल्हारपंत प्रौढ झाल्यावर त्र्यंबकपंतांनीं त्यांचें लग्न केलें. परंतु त्यांचे अंगीं अकस्मात् वैराग्य भरलें व यात्रेस जातों म्हणून आईबापांना सांगून ते घोडेगांवीं गेले. तेथून भीमातीरीं पेठगांवीं गेले. तेथें समर्थशिष्यांचा मेळा भिक्षेस आला होता, त्या मेळ्याबरोबर सज्जनगडास गेले. तेथें कांहीं दिवस राहून ग्रंथश्रवण केल्यानंतर समर्थांनीं घरची माहिती विचारल्यावर गांव, नांव, गोत्र वगैरे खरें सांगितलें. परंतु 'मज कोणीच नाहीं संसारीं' असें खोटें सांगितलें. समर्थांनीं मल्हारीस अनुग्रह दिला. समर्थांची मल्हारपंतांवर प्रीति बसली. कारण "न सांगतां करी काम। कीर्तनभजन नित्यनेम॥ स्वामीस आवडे परम। जीवाहूनि आगळा॥ (अ. ५१–७)" कांहीं दिवसांनीं मल्हारपंतांचे आईबाप मुलाचा शोध करीत सज्जनगडास आले व त्यांनीं मल्हारपंतांस ओळखलें. समर्थ रागावून म्हणाले, "कां रे तूं म्हणत होतासी। माता पिता नाहीं कैशी॥ हीं धुंडितां देशोदेशीं। तुजकारण कष्टत॥ आतां यांसमागमें जाईं। एक पुत्र झाल्यावर येईं॥ आज्ञा म्हणून ते समयीं। विचार करी जावयाचा॥ (अ. ५१–२९, ४०)" नंतर मल्हारपंत समर्थआज्ञेप्रमाणें घरीं जाऊन प्रपंच करूं लागले. मुलगा झाला, त्याचें नांव उद्धव ठेवलें. नंतर सज्जनगडास जावयास निघाले, तों समर्थ समाधिस्त झाल्याची बातमी समजली. तेव्हां विरक्त होऊन काशीस गेले व संन्यास घेतला. इकडे उद्धव प्रौढ झाल्यावर व्याहीमांडव्यास जाऊन राहिले. ते स्नानसंध्याशील भगवद्भक्त होते. त्यांना एक मुलगा झाला; त्याचें नांव लक्ष्मण. हाच पुढें समर्थचरित्रकार 'उद्धवसुत' या नांवानें प्रसिद्ध झाला. उद्धवसुताचे गुरु केशवस्वामी यांची ही गोष्ट मनोरंजक आहे. केशवस्वामींचे गुरु माधवदास यांची माता सात महिन्यांची गरोदर असतां वारली. स्मशानांत मातेचें पोट चिरून काढलें तों माधव जिवंत निघाला. घरीं आणून वडिलांनीं त्याचें रक्षण करून वाढविलें. सातव्या वर्षीं मुंज केली. बारावे वर्षीं अनुताप होऊन माधव काशीस गेला. वडिलांनीं शोध केला. मुलगा सांपडला नाहीं. म्हणून त्यांनीं शोकानें देह ठेविला. माधव प्रौढ झाल्यावर गंगेच्या कावडी रामेश्वरास घालूं लागले. अकरा कावडी झाल्यावर माहुलीस आले. तेथें समर्थांचा अनुग्रह घेतला. "जोंवरी समर्थ होते। तोंवरी राहिले तेथें॥ मग चालिले अरण्यपंथें। वैराग्यशील॥ (अ. ५१–५७)" वाटेंत केशवाची गांठ पडली व ते माधवदासांचे शिष्य होऊन घरांत न कळवितां गुरूबरोबर हिंडूं लागले. "तंव माधवदास म्हणती। बाबा, तूं जाय गृहाप्रती॥ तुझी माता हांक मारिती। कांता तरुण असे पैं॥ कांहीं केल्यास न जाये। अरण्यांत फिरताहे॥ तो सासूसासरा धुंडिताहे। समागमें मुलीस घेऊनियां (अ. ५१–६३, ६४)" गांठ पडल्यावर

माधवदास म्हणाले, "अरे त्वां लग्न नसतें केलें । तरी मग फिरतां भलें ॥ आतां जरी ईस त्यागिलें । तरी महादोष (अ. ५१–६८)" केशवानें ऐकिलें नाहीं. स्त्रियेस धोंडे मारूं लागला. तेव्हां माधवदास त्यास न कळत उठून गेले. मग नाइलाज होऊन केशवस्वामी स्त्रीसह प्रपंच करूं लागले. फिरत फिरत व्याहीमांडव्यास आले. तेथें उद्धव व उद्धवसुत यांस उपदेश केला. "ऐसा गुरू केशवराज । उपदेश केला मज सहज ॥ अज्ञानपणीं निजगूज । सांगितलें कर्णपुटीं ॥ (अ. ७८)" अशी उद्धवसुतकथा मनोरंजक आहे. उद्धवसुतांना समर्थांची प्रत्यक्ष कांहीं माहिती नव्हती. त्यांचे वडील व गुरु ही समर्थांचे प्रत्यक्ष शिष्य नव्हते. चरित्र ऐकीव माहितीवरून लिहिलें आहे, म्हणून सर्वथैव विश्वसनीय नाहीं. श्रेष्ठांचे नातू चाफळास आल्याची माहिती चरित्रांत आहे. तेव्हां हें चरित्र शके १६३२ नंतर लिहिलें असलें पाहिजे. चरित्रांत तिथि, शक वगैरे दिले नाहींत. ग्रंथरचनेचा काल ही दिला नाहीं. परंतु गंगाधरस्वामींच्या समाधीनंतर तें लिहिलें नसावें. कारण पुढें चाफळमठाधिपति कोण झाले याचा चरित्रांत उल्लेख नाहीं. चरित्राची भाषा सोपी व प्रासादिक आहे. अध्यायाच्या शेवटीं कवीच्या ओंव्या, इतर अभंग व श्लोक किती यांचा उल्लेख आहे. प्रत्येक अध्यायाच्या प्रारंभीं गुरुवर्णनपर बऱ्याच ओंव्या आहेत. या चरित्राचें मुख्य वैशिष्ट्य म्हणजे समर्थांवरील व दासबोधावरील मिळून पांच उत्कृष्ट अष्टकें यांत दिलीं आहेतः—( १ ) नमस्कार माझा गुरूरामदासा, ( २ ) समर्था मला पूर्ण वैराग्य द्यावें, ( ३ ) महाराजया सद्गुरू रामदासा, ( ४ ) तया दासबोधासि वाचीत जावें, व (५) गुरू रामदासासि आधीं भजावें. सदरहू समग्र अष्टकें परिशिष्ट ( ब ) यांत दिलीं आहेत.

( ५ ) समर्थपरंपरेंतील पांचवें चरित्र राजारामप्रसादीकृत 'भक्तमंजरीमाला' हें होय. सदरहू चरित्र शके १७५६ सालीं संपूर्ण लिहून झालें आहे. तें रामदास आणि रामदासींत क्रमशः प्रसिद्ध झालें आहे. राजारामप्रसादी हे मोरोपंतांचे समकालीन होते. मोरोपंत शके १७१६ सालीं वारले. राजारामप्रसादींचा जन्मकाल नक्की कळत नाहीं. मोरोपंत वारले तेव्हां ते २०-२५ वर्षांचे असावेत. समर्थांच्या शिष्यप्रशिष्यांच्या चरित्रांत जन्मशक आढळून येत नाहीं; परंतु राजारामप्रसादींच्या भक्तमंजरीमालेंत तो दिला आहे. तेव्हां समर्थवाकेनिशी अगर हनुमंतस्वामींची बखर यांची माहिती राजारामप्रसादींना असावी असें दिसतें. राजारामप्रसादींनीं समर्थचरित्र समर्थसमाधीनंतर १५० वर्षांनीं लिहिलें आहे. अर्थात् त्यांना समर्थांची प्रत्यक्ष माहिती असणें शक्य नव्हतें.

( ६ ) आत्मारामबुवा चरेगांवकरकृत समर्थचरित्र—या चरित्राचे ७८ अध्याय आहेत. शेवटच्या अध्यायांत चरित्रसमाप्तीचा काल व गुरुपरंपरा हीं दिलीं आहेत. "समर्थीं मज सांगितलें । तेंचि या ग्रंथीं लिहिलें ॥ वांई क्षेत्रीं समाप्त केलें ।

चरित्रासी ।। (७८-५०)" चरित्र शके १७८९ विभवसंवत्सरीं फाल्गुन शुद्ध पक्षांत संपविलें (७८-५४, ५५). गुरुपरंपरा पुढीलप्रमाणें दिली आहे:—श्रीसमर्थ—कल्याण—जगन्निवास—यादव—दत्तात्रय—रामचंद्र ऊर्फ नानामहाराज व त्यांचे शिष्य चरित्रकार आत्मारामबुवा (७८-१३५-१३८). या अध्यायांत आपण चरेगांवचे रहिवासी असें आत्मारामबुवा म्हणतात. पण पांचव्या अध्यायांत, "माझा स्वामी रामचंद्र । कृपेलागीं पूर्ण समुद्र ।। मठ कोयाळ संस्थान भद्र । तेथें राहती ।। (५-९३)" असें आहे. हा कोयाळमठ कोठें आहे? व भद्र संस्थान कोठें आहे? याचा इतरत्र कोठें उल्लेख नाहीं. चरेगांव कऱ्हाड तालुक्यांत पालीजवळ आहे. तेथील आपण रहिवासी असें आत्मारामबुवा म्हणतात. तेव्हां रामचंद्रबुवांच्या समाधीनंतर कोयाळमठाधिपति झाल्यावर आत्मारामबुवा तेथें राहण्यास गेले काय? याचा खुलासा चरित्रांत कोठें नाहीं. या चरित्रास ह. स्वा. बखरीचा आधार असावा असें दिसतें. "तरी ऐका सावधान । हनुमंतस्वामी दयाघन । तेणें कृपा केली पूर्ण । तेव्हां मज कळलें ।। (५-२२)." ह. स्वा. बखरीशिवाय इतर चरित्रांत न सांपडणारीं समर्थांच्या बावीस पूर्वजांचीं सर्व नांवें या चरित्रांत दिलीं आहेत; म्हणून वरील अनुमानास बळकटी येते. संतमालिकेंत महीपतीचा उल्लेख आहे, तेव्हां संतविजयाचा ही या चरित्रास आधार घेतला असावा. सांप्रदायिक चरित्रांपैकीं हें शेवटलें चरित्र आहे. तथापि हें चरित्र इंग्रजी अंमलानंतर लिहिलेलें आहे. सांप्रदायिक चरित्रांबरोबर आम्हीं त्याचा ही अंतर्भाव प्राचीन चरित्रांत केला आहे. या चरित्रावर दासबोधाची छाप दिसून येते. दासबोधाप्रमाणें श्रोते मानून चरित्र लिहिलें आहे. "मागां श्रोतीं प्रश्न । केला होता मज लागून ।। श्रीरामदासचरित्र पूर्ण । सांगावें आम्हांसी ।। (१-१७)" इतर कांहीं अध्यायांत ही दासबोधाप्रमाणें श्रोतेवक्ते यांचा उल्लेख आहे. तेव्हां आत्मारामबुवांचा शिष्यगण अगर श्रोतृगण बराच असावा असें दिसतें. दासबोधाप्रमाणें प्रारंभीं गणेश, शारदा, सद्गुरु, श्रोते व साधुसंत यांचें नमन आहे. प्रत्येक अध्यायाच्या आरंभीं सद्गुरुस्तवनपर बऱ्याच ओंव्या आहेत. अध्यायाचे शेवटीं अध्यायांतील कथासूचक नांव नाहीं. "या ग्रंथाचा कर्ता । एक सद्गुरु दाता ।। आत्माराम तत्वता । म्हणे दासानुदास ।।" अशी सद्गुरुउपकृतिसूचक ओंवी व तीनंतर "इतिश्री भविष्योत्तर पुराणे । श्रीसमर्थांचीं स्तवनें ।। परिसावीं चतुर जनें । अमुक अध्याय ।। १ ।।" असें प्रत्येक अध्यायाचे शेवटीं म्हटलें आहे.

सहाव्या अध्यायांत समर्थकथा सांगण्यास हनुमंतस्वामींनीं आज्ञा दिली असें स्पष्ट म्हटलें आहे. हनुमंतस्वामींचा अंत शके १७४० सालीं झाला व हें चरित्र शके १७८९ सालीं समाप्त झालें. तेव्हां तरुणपणीं हनुमंतस्वामींची गांठ पडली असल्याचा संभव आहे. आठव्या अध्यायांत आपल्या चरित्रास कल्याण, दिवाकर,

वासुदेव, दत्तात्रय, महादेव, भीमस्वामी, उद्धवप्रभृति शिष्यांचा आधार आहे असें म्हटलें आहे. दत्तात्रय व महादेव हे कोण ? त्यांनीं चरित्रें लिहिल्याचा कोठें उल्लेख अद्याप सांपडलेला नाहीं. कांहीं गोष्टी ऐकिव माहितीवरून लिहिलेल्या दिसतात. म्हणून चरित्र सर्व गोष्टींत विश्वसनीय मानतां येणार नाहीं. इतर कोणत्या ही चरित्रांत समर्थ अरबस्थानांत गेल्याचा उल्लेख नाहीं. या चरित्रांत समर्थ अरबस्थानांत गेले व तेथें कांहीं चमत्कार ही करून दाखविले असें वर्णन आहे. या गोष्टीस ऐतिहासिक पुरावा अद्याप कोठें मिळालेला नाहीं. म्हणून ती विश्वसनीय मानतां येणार नाहीं.

( ७ ) नामरहित चरित्र. सांप्रदायिकांतलें सातवें चरित्र जें आतां आम्ही देणार आहों, त्या चरित्रकारानें आपलें नांव दिलेलें नाहीं. सदरहू चरित्र 'श्रीरामदास जन्मकथा' या नांवानें रामदास आणि रामदासी, भाग १५, लेखांक ४७, यांत प्रसिद्ध झालें आहे. डोमगांवमठांत श्री. देव यांना सांप्रदायिकांचीं पुष्कळ बाडें सांपडलीं; त्यांत बाड ३३ यांत ही कथा आहे. कथाकारांनीं आपलें नांव कां दिलें नाहीं तें कळत नाहीं. कथाकारांनीं स्वत: शेवटीं 'इति श्रीदास प्रकरण संपूर्ण अस्तु' असें म्हटलें आहे. चरित्रांत एकंदर १८ श्लोक, ४ पदें, १ सवाई व २६ ओंव्या आहेत. चरित्र त्रोटकच आहे. परंतु कांहीं महत्त्वाच्या गोष्टींत रामदास-जन्मकथाकारांचा अगर प्रकरणकारांचा व इतर चरित्रकारांचा मतभेद आहे.

पुत्रप्राप्तीकरितां सूर्याजीपंत व राणूबाई यांनीं केवळ फळें भक्षण करून पंचवटींत श्रीरामाची तप:श्चर्या केली असें जन्मकथाकार म्हणतात. इतर सर्व चरित्रकार सूर्याची आराधना केली असें म्हणतात. उभयतांना स्वप्नांत श्रीरामदर्शन होऊन दोन नारळ दिले असें या जन्मकथेंत म्हटलें आहे. पहिल्या पुत्राचें नांव राम होतें व पंचवटीनजीक गोदातीरीं तप:श्चर्या करतांना समर्थ नदीतीरावर सूर्यास्तापर्यंत बसून तप:श्चर्या करीत व नंतर आकंठ रामकुंडांत पाण्यांत उभे राहून सूर्योदयापर्यंत श्रीरामाचें ध्यान करीत असत, असें जन्मकथाकार म्हणतात. जन्मकथाकारांचा सर्वांत महत्त्वाचा फरक जांबेंतून समर्थ पंचवटींत केव्हां व कां गेले या गोष्टींत आहे. सूर्याजीपंतांनीं श्रेष्ठांना अनुग्रह दिला, त्या वेळीं समर्थांना अधिकार नाहीं म्हणून अनुग्रह दिला नाहीं. "ऐसें ऐकोनि पितृवाक्यातें । तैसेचि बाहेर निघाले ॥ २४ ॥ प्रहर एक निशा क्रामिली । चालतां गंगा पुढें देखिली ॥ उदकें पूर्ण तटाकें भरली । उडी टाकिली निर्भय ॥ २५ ॥" या शेवटच्या गोष्टीशिवाय बाकीचे फरक विशेष महत्त्वाचे आहेत असें आम्हांस वाटत नाहीं. जांबेंत ही पंचवटी होतीच. श्रेष्ठांचें पाळण्यांतील नांव राम असण्याचा संभव आहे. केव्हां केव्हां एका मुलाचीं अनेक नांवें ही ठेवतात. कांहीं काळ रामकुंडांत राहून ही तपश्चर्या केली

असेल. परंतु शेवटच्या गोष्टीविषयीं मात्र तसें म्हणतां येत नाहीं. श्रीरामदासजन्म-कथाकारांच्या या विधानाचें खंडण पुढें आम्हीं 'पलायन' या भागांत केलें आहे.

( ई ) स्वतंत्र चरित्रः—संतविजय. सुप्रसिद्ध संतचरित्रकार महिपति-बावा ताराहाबादकर यांनीं आपल्या संतविजयग्रंथांत समर्थचरित्र सविस्तर दिलें आहे. प्रथम त्यांनीं भक्तिविजयग्रंथांत समर्थांचें संक्षिप्त चरित्र लिहिलें होतें. संत-विजयाच्या पहिल्या अध्यायांत महिपतिबावा म्हणतात, "ऐका श्रोते चतुर। रामदास मारुति-अवतार ॥ करावया विश्वोद्धार। प्रगटे साचार भूमंडळीं ॥ १३ ॥ त्यांचें चरित्र यथामती । वर्णिलें श्रीभक्तिविजयग्रंथीं ॥ परी ते संकलितकथा निश्चिती। विस्तारस्फूर्ति न केली ॥ १४ ॥ आतां संतवचनांच्या आधारें । कांहीं बोलतों आरुष उत्तरें ॥ आज्ञा केली रुक्मिणीवरें। यास्तव उद्गार न राहे ॥ १५॥" यावरून प्रथम भक्तिविजयग्रंथांत समर्थांचें संकलित चरित्र लिहिल्यावर महिपतिबावांना कांहीं नवीन समर्थचरित्रें उपलब्ध झालीं व त्यांवरून त्यांनीं संतविजयांत सविस्तर समर्थ-चरित्र लिहिलें हें स्पष्ट दिसतें. तीं संतवचनें कोणत्या चरित्रग्रंथांतील याचा उल्लेख केला असता तर बरें झालें असतें. कारण त्यांनीं संतविजयापूर्वीं लिहिलेल्या ग्रंथांत न सांपडणाऱ्या गोष्टी कांहीं ठिकाणीं लिहिल्या आहेत, त्यांस आधार कोणता हें कळलें असतें. संतविजयाच्या तिसऱ्या अध्यायांत समर्थांचें ब्रह्मचर्य नष्ट करण्या-करतां इंद्रानें मोहिनी पाठविली. समर्थांस भुलविण्याचा तिनें पराकाष्ठेचा प्रयत्न केला; परंतु तिला त्यांत यश आलें नाहीं, याचें उत्कृष्ट वर्णन केलें आहे. परंतु या गोष्टीस संतविजयापूर्वीच्या चरित्रग्रंथांत अगर समर्थवाकेनिशींत मुळींच आधार नाहीं, म्हणून ही गोष्ट विश्वसनीय मानतां येणार नाहीं. रामदासजन्मकथा विश्व-सनीय नाहीं, याचें विवरण करतांना आम्हीं 'पलायन' या भागांत पुढील पद दिलें आहे. "उभी राहे रांडे। शब्दचालभांडे ॥ काजळ कुंकू लेवूनि रांडे। किती करिसी नखरा ॥ ५ ॥" इत्यादि. या पदावरून कोणी समर्थभक्तानें, इंद्रानें समर्थांचें ब्रह्मचर्य नष्ट करण्याकरितां मोहिनीस पाठविलें, अशी आख्यायिका प्रसृत केली असावी असें दिसतें. वर उद्धृत केलेल्या पहिल्या अध्यायाच्या १५व्या ओंवींत समर्थचरित्र लिहिण्यास "आज्ञा केली रुक्मिणीवरें" असें लिहितात. तेव्हां महि-पतिबावांच्या काळीं समर्थसंप्रदाय व वारकरीसंप्रदाय यांमध्यें विरोध नव्हता हें स्पष्ट दिसतें. स्वतः महिपतिबावा समर्थसंप्रदायी नव्हते, तरी अस्सल रामदासी-सांप्रदायिकांप्रमाणें भक्तिभावानें त्यांनीं समर्थचरित्र लिहिलें आहे.

संतविजयाचे एकंदर २६ अध्याय आहेत. भाषा सोपी व प्रासादिक आहे. महिपतबावा शके १७१२ सालीं वैकुंठवासी झाले. त्यापूर्वीं त्यांनीं संत-विजय लिहिला. म्हणजे हनुमंतस्वामींची बखर, भक्तलीलामृत, दासविश्रामधाम वगैरे सांप्रदायिक ग्रंथांपेक्षां संतविजय ग्रंथ जुना आहे. महिपतीबावांना समर्थांची

अगर समर्थशिष्यांची प्रत्यक्ष माहिती नव्हती. तेव्हां त्यांना संतवचनांचा ऐकीवच आधार मिळाला असावा असें दिसतें. कांहीं आख्यायिका देण्यांत त्यांनीं शक्याशक्यतेचा विचार केलेला दिसत नाहीं. म्हणून त्यांचा सर्व ग्रंथ विश्वसनीय मानतां येत नाहीं. महिपतिबावांची वर्णनशैली उत्कृष्ट आहे. हुरड्याच्या गोष्टीचें व माल्यवान् गंधर्वाच्या आख्यायिकेचें वर्णन कादंबरीसारखें काव्यमय भाषेंत केलें आहे.

अर्वाचीन चरित्रें:—( १ ) श्रीरामदासकथासारामृत. प्राचीन कालचें शेवटचें चरित्र शके १७८९ सालीं लिहिलेलें आत्मारामबोवा चरेगांवकर यांचें. अर्वाचीन कालचें पहिलें चरित्र शके १८३९ सालीं प्रसिद्ध झालेलें श्री. भीमराव सखाराम पारळकर यांचें होय. अर्वाचीन चारित्रकारानें लिहिलेलें पद्यमय असें हें एकच चारित्र आहे; तें ओंवीबद्ध आहे. बाकी सर्व गद्यांत लिहिलेलीं आहेत. या चरित्राचे एकंदर १८ भाग आहेत. पहिल्या तेरा अध्यायांच्या प्रारंभीं क्रमानें ‘ श्रीराम जयराम जयजयराम ’ या त्रयोदशाक्षरी मंत्राचें पहिलें अक्षर घालून अध्यायास सुरुवात केली आहे व शेवटच्या पांच अध्यायांच्या प्रारंभीं ‘ श्रीरामदास ’ या पंचाक्षरी मंत्राचें पहिलें अक्षर घालून अध्यायाचा आरंभ केला आहे. अध्यायास ‘ प्रसंग ’ असें म्हटलें आहे. श्री. भीमरावांचे गुरु श्रीधर हे होते. त्यांची साग्र हकीकत चरित्रांत दिलेली नाहीं. “ तो आठवतो श्रीधरू । जो पराचाही परू ।। जेणें माझा केला अंगिकारु । समूळ अहंकार घालवूनियां ।। ( प्र. ५-७५ ) ” प्रत्येक प्रसंगाच्या शेवटीं “ श्रीधरचरणीं भीमु विनवीत । निजकृपामृत तुमचें हें ।। ” असा उल्लेख आहे. चरित्रकारांनीं १८ व्या प्रसंगाच्या शेवटीं स्वत:विषयीं थोडी माहिती दिली आहे. चारित्रग्रंथ शके १८३८ सालीं अनल संवत्सरीं, मार्गशीर्ष शुद्ध ११ दिवशीं नागपूर मुक्कामीं संपविला. पारळपासून थोड्या अंतरावर शिऊर नांवचें गांव आहे, तें चरित्रकाराचें मातुलग्राम; त्यांचे मातुल श्रीशंकरस्वामी प्रसिद्ध होते. आईचें नांव श्रीगंगादेवी. चरित्रकार दीड वर्षाचा असतांना त्या वारल्या. वडिलांच्या नांवाचा उल्लेख नाहीं. तेव्हां ते मातोश्रींच्या ही पूर्वी वारले असावेत असें वाटतें. मातोश्रींच्या मरणानंतर श्री. भीमरावांची वडील बहीण सौ. मथुराबाई व मेहुणे श्री. विश्वनाथराव यांनीं त्यांचें पालनपोषण केलें. श्री. भीमरावांस विश्वनाथरावांनीं उमरावतीस शिक्षणाकरितां पाठविलें. श्रीधर-गुरूंचा अनुग्रह झाल्यावर सन १९०९ सालीं श्री. भीमरावांनीं हिमालयाची यात्रा केली. नंतर १९११ सालीं सेतुबंधाची यात्रा केली. श्री. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं समर्थचरित्र लिहिण्यास अनुमोदन दिलें, असें श्री. भीमराव म्हणतात:— “श्रीसमर्थ-गुणीं चित्त वेधलें । श्रीशंकर श्रीकृष्णें अनुमोदिलें ।। माझें प्रेम विशेष दुणावलें । आरंभिलें श्रीचरित्र ।। ( १८–१८ ) ” ग्रंथारंभीं श्रीगणेशशारदा यांच्या नमनानंतर वडीलमातोश्री सखारामपंत व गंगादेवी यांचें नमन केलें आहे. नंतर

श्रीधरगुरूंचें नमन करून कुलगुरु श्रीनरहरीचें नमन केलें आहे. नंतर कुळीचा गुरु काश्यपमुनी यांचें नमन केलें आहे. त्यावरून श्री. भीमरावांचें गोत्र काश्यप असावें असें दिसतें. नंतर श्रीनिवृत्ति, ज्ञानदेव, एकनाथ, तुकारामप्रभृति महावैष्णवांचें नमन करून श्रीरामदासचरणीं 'साष्टांग दंडवत' घालून चरित्रास आरंभ केला आहे. पूर्व-चरित्रकारांची यादी दिली असून तींत (१) हनुमंतस्वामींची बखर, (२) समर्थप्रताप, (३) दासविश्रामधाम, (४) भक्तलीलामृत, (५) उद्धवसुतकृत चरित्र व (६) संतविजय यांचा उल्लेख आहे. वरील चरित्रकारांना वंदन करून भीमराव म्हणतात, "मी आपुल्या मनरंजना। चरित्ररचना आरंभिली ॥ (१–१६)" समर्थांचे ठिकाणीं श्री. भीमरावांची अनन्यभक्ति चरित्रांत आढळून येते. "श्रीसमर्थ-रायाची कथा। संतोष वाटे गातां ऐकतां। तरी सावधान चित्त असावें श्रोता। श्रीसमर्थकथा परिसाया ॥ (१२–११९)." भीमरावांची वाणी अत्यंत प्रासादिक आहे. त्यांना शारदादेवीचा प्रसाद झालेला त्यांच्या काव्यांत दृग्गोचर होतो. त्यांच्या ग्रंथांतील ओंवीरचना दासबोधांतील ओंवीरचनेप्रमाणें सुटसुटीत आटोपशीर नाहीं. एकनाथस्वामींच्या ओंवीची छाप त्यांच्या चरित्रावर दिसून येते. कित्येक ठिकाणीं समर्थप्रताप व दासविश्रामधाम यांची छाया रामदासकथासारामृतावर पडलेली दिसते.

वर नमूद केलेल्या पूर्वचरित्रांवरून भीमरावांनीं समर्थचरित्र लिहिलें असलें तरी, प्रसंगविशेषीं वर्णन करण्यांत आपल्या कल्पनाशक्तीला त्यांनीं यथेच्छ विहार करण्यास परवानगी दिली आहे. माहुली येथें समर्थ स्नानाला गेले त्या वेळीं ब्राह्मणांनीं दक्षिणा मागितली. समर्थांनीं नदींतील दगड उचलून दिले. एकाशिवाय सर्वांनीं ते फेंकून दिले. त्या ब्राह्मणाच्या दगडाचें सोनें झालें. एवढेंच पूर्वचरित्रकाराप्रमाणें सांगून भीमराव स्वस्थ बसले नाहींत. त्या ब्राह्मण-दंपत्याचें वर्णन पुढील-प्रमाणें केलें आहे:—"आतां करीन कांकणपाटल्या। कानीं लेईन बुगड्या बाळ्या ॥ झणीं न फिरवा पंचांग झोळ्या। आनंद उकळ्या स्त्रीपुरुषां ॥ (१५–७५)" या वर्णनांत काव्य आहे, पण सत्य नाहीं. तें स्वकपोलकल्पित आहे. काव्य या दृष्टीनें आधुनिक कालांत इतका चांगला दुसरा चरित्रग्रंथ क्वचितच आढळेल. कादंबरीसारखीं वर्णनें देण्याचा मोह श्री. भीमरावांना बऱ्याच ठिकाणीं झाला आहे. म्हणून चरित्रांतील कांहीं भाग विश्वसनीय मानतां येत नाहीं. समर्थांच्या बाल-पणच्या खोड्या वर्णन करितांना श्री. भीमरावांनीं राणूबाईच्या तोंडीं असभ्य भाषा घातली आहे. "जननी रागेजोनि म्हणों लागली। जे कारटीं उगीच भूभार जन्मलीं। याहूनि जन्मतांच असतीं मेलीं। तरी तीं भलीं म्हणिजे कीं ॥ (५–८४)" श्री. भीम-रावांनीं उल्लेखिलेल्या पूर्वचरित्रग्रंथांत राणूबाई असें बोलल्याबद्दल आधार नाहीं.

(२) सज्जनगड व रामदास. प्रो. गोविंद चिमणाजी भाटे यांनीं शके १८४० सालीं 'सज्जनगड व रामदास' या नांवानें एक छोटें चारित्रात्मक व टीकात्मक

पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. या १२७ पानांच्या पुस्तकांत १७ पानेंच 'रामदासांच्या संक्षिप्तचरित्रा 'च्या वांट्यास आलीं आहेत. पुस्तकांतील पहिले दोन भाग प्रो. साहेबांनीं सज्जनगडचा प्रवास व सज्जनगडचें सद्य:कालीन व पूर्वकालीन स्वरूप यांच्या वर्णनांत खर्च केले आहेत. हे वर्णनात्मक दोन भाग आम्हांस फार आवडले. प्रवासाचें वर्णन करण्यांत प्रो. साहेबांचा लौकिक आहे. त्यास साजेल असे हे दोन भाग आहेत. पुस्तकाचे पांच भाग दासबोधाचें समासवार तात्पर्य देण्यांत गेले आहेत. ११व्या दशकाच्या ९व्या समासाचें तात्पर्य देण्याचें नजरचुकीनें राहिलें आहे असें वाटतें. ५१व्या पानावर १९व्या ओळींत 'सर्वच दशकांत' असें पडलें आहे, तेथें 'अर्ध्या दशकांत' असें पाहिजे. प्रो. भाटे यांनीं दासबोधाचें जसें अध्ययन केलें, तसें दासबोधेतर समर्थग्रंथांचे व समर्थशिष्य व समर्थप्रशिष्य यांच्या ग्रंथांचें अध्ययन केलें नाहीं असें त्यांच्या टीकेवरून दिसतें. पान ७७ यांत प्रो. साहेब म्हणतात, "दासबोधांत, राजकारण हें एक आयुष्याचें ध्येय आहे, असें सांगितलें आहे." समर्थकृत इतर वाङ्मय वाचण्याचे प्रो. साहेबांनीं श्रम घेतले असते तर त्यांना समर्थांनीं दासबोधेतर ग्रंथांतच नव्हे तर शिष्यांच्या पत्रव्यवहारांतही राजकारणाचें महत्त्व प्रतिपादन केलें आहे हें दिसून आलें असतें. त्यांच्या पुस्तकांतील टीकात्मक भाग वाचून आमची बरीच निराशा झाली. "पुराव्यावरून जीं प्रामाणिक मतें बनलीं, तीं मीं दिलीं आहेत, तीं पक्षाभिमानानें किंवा वर्णाभिमानानें प्रेरित होऊन दिलीं नाहींत," असें प्रो. भाटे प्रस्तावनेंत म्हणतात. परंतु पुराव्याचें विवेचन करतांना त्यांचा प्रामाणिकपणाचा दृष्टिकोन कित्येकदां कसा एका बाजूस घसरला आहे हें आम्हीं पुढें 'शिवसमर्थ भेट' व 'समर्थांचें राजकारण' या भागांत सविस्तर दाखविलें आहे. भाग १०, पान ९७, मध्यें प्रो. भाटे म्हणतात, "ऐतिहासिक दृष्टीनें पहातां हनुमंतस्वामींची बखर असत्योक्ति व अतिशयोक्ति या दोषद्वयानें दूषित आहे." अतिशयोक्तीचीं कांहीं उदाहरणें त्यांनीं दिलीं आहेत. असत्योक्तीचा आरोप करतांना असत्योक्तीचीं कांहीं उदाहरणें देणें त्यांचें कर्तव्य होतें. प्रो. भाटे यांचा व आमचा कांहीं गोष्टींत मतभेद असला तरी आपल्या पुस्तकांत समर्थांविषयीं त्यांनीं कोठें ही अनादर दाखविला नाहीं, हें आम्ही प्रांजलपणें कबूल करतों. अलीकडे कांहीं पदवीधर समर्थ-वाङ्मयाचा अभ्यास करूं लागले आहेत. अशा समर्थवाङ्मय-अभ्यासकांपैकीं एका सद्गृहस्थांनीं चिकित्सक बुद्धीनें टीका करण्याच्या पडद्याआड लपून स्वतःस अविश्वसनीय वाटणाऱ्या चरित्रांतील मधलींच कांहीं वाक्यें घेऊन समर्थ-चारित्र्यावर शिंतोडे टाकण्याचा निंद्य प्रयत्न केला आहे. वरील सद्गृहस्थांनीं प्रो. भाटे यांच्यापासून टीकाशास्त्रांतील कांहीं धडे शिकावे अशी आमची त्यांना नम्र विनंति आहे.

( ३ ) महाराष्ट्र सारस्वतांतर्गत चरित्र. सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक कै. विनायक लक्ष्मण भावे यांनीं शके १८४१ सालीं महाराष्ट्र-सारस्वत हा उत्कृष्ट ग्रंथ प्रसिद्ध केला ( आवृत्ती दुसरी ). त्यांत त्यांनीं ज्ञानदेवांपासून मयूर-पंडितांपर्यंत सर्व साधु, संत, कवि व ग्रंथकार यांचीं त्रोटक चरित्रें दिलीं आहेत. त्यांत भाग १२वा ' रामदास ' हा आहे. त्यांत त्यांनीं प्रथम समर्थांचें अगदीं त्रोटक चरित्र देऊन नंतर समर्थग्रंथांविषयीं विवेचन केलें आहे. सूर्याजीपंतांनीं अनुग्रह देण्याचें नाकारलें म्हणून समर्थ पंचवटीस तपःश्चर्येस गेले, या नामरहित चरित्र-कारांच्या कथेवर श्री. भावे यांनीं विश्वास ठेवला आहे. त्याबद्दल पुरावा मात्र त्यांनीं मुळींच दिला नाहीं. " ती ( हकीकत ) मला ज्यास्त स्वाभाविक व खरी वाटते, म्हणून मीं तिचा अनुवाद केला आहे." एवढेंच त्यांनीं म्हटलें आहे. समर्थांविषयीं लिहितांना कै. भावे यांनीं एकेरी भाषा वापरलेली आहे:—" पण टाळांच्या आवाजानें आणि नुसत्या नामाच्या देवघेवीनें देशाची आपत्ति दूर होणार नाहीं, हें त्याच्या तीव्र बुद्धीनें तेव्हांच ताडलें." हें एक उदाहरण झालें. सर्व चरित्रनिबंधांत असाच प्रकार आहे. समर्थांविषयीं पूज्य बुद्धि व आदर त्यांच्या टीकात्मक चर्चेंत पूर्णपणें दिसून येतो. पण भाषा मात्र एकेरी आहे. पूर्वीच्या साधुसंतांनीं बहुजन-समाजास भक्तिमार्गाला लावून परधर्मापासून परावृत्त केलें व अप्रत्यक्षपणें स्वराज्याचा मार्ग सुकर केला, याकडे लक्ष न देतां समर्थांची स्तुती करतांना कै. भावे प्राचीन साधुसंतांवर फार घसरले आहेत. समर्थकार्याविषयीं व ग्रंथांविषयीं त्यांनीं उत्तम विवेचन केलें आहे.

( ४ ) दीक्षितकृत संपूर्ण चरित्र. श्री. कृष्णाजी हरि दीक्षित यांनीं ' दासायन ' लिहिण्यास शके १८४५ सालीं आरंभ केला. सप्तकांडात्मक ' दासायन ' म्हणजे समर्थांचें संपूर्ण चरित्र लिहिण्याची मूळ कल्पना समर्थभक्त श्री. देव यांची. संपूर्ण माहितीच्या आधारें श्री. देवकृत 'पूर्णदासायन' पदरीं पडेपर्यंत ' तूर्त दान महापुण्य ' जेवढें झालें तेवढें श्रीचरणीं अर्पण करीत आहें, असें म्हणून श्री. दीक्षित यांनीं शके १८४५ सालीं 'बालकांड' प्रसिद्ध केलें. शके १८४६ सालीं ' पुरश्चरणकांड ' व शके १८४७सालीं ' तीर्थाटणकांड ' प्रसिद्ध केलें. कांहीं अपरिहार्य कारणामुळें श्री. दीक्षित यांना पुढचीं चार कांडें—४ सुंदरकांड, ५ धर्म-कारणकांड, ६ राजकारणकांड व ७ उत्तरकांड—हीं प्रसिद्ध करून दासायन पूर्ण करितां आलें नाहीं असें दिसतें. श्री. दीक्षित यांनीं प्रसिद्ध केलेल्या तीन कांडां-तील वर्णन त्रोटक आहे. परंतु लहान मुलामुलींना प्राथमिक शाळांत तीं तीन कांडें उपयोगीं पडण्यासारखीं आहेत. श्री. दीक्षित यांनीं पुढील ग्रंथांचा आधार आपल्या ' दासायना 'स घेतल्याचें लिहिलें आहे:—( १ ) दासविश्रामधाम, (२) हनुमंतस्वामींची बखर, (३) गिरिधरस्वामीकृत समर्थप्रताप, (४) रामसोहळा,

( ५ ) भीमस्वामीकृत चरित्र, ( ६ ) श्रीरामदासकथासारामृत व ( ७ ) रामदासी ग्रंथमालेंतील विविधविषय.

( ५ ) समर्थांचें सामर्थ्य. कै. श्री. कृष्णाजी नारायण आठल्ये यांनीं शके १८४६ सालीं समर्थांचें सविस्तर चरित्र लिहिलें आहे. त्यास त्यांनीं 'समर्थांचें सामर्थ्य किंवा श्रीरामदासस्वामींचा लीलानुग्रह' असें नांव दिलें आहे. कै. श्री. आठल्ये हें केरळकोकिळ मासिकाचे संपादक या नात्यानें महाराष्ट्र वाचकांना परिचित आहेत. त्यांच्या भाषानैपुण्याबद्दल त्यांना ' महाराष्ट्रभाषाचित्रमयूर ' ही पदवी मिळालेली आहे. या चरित्रग्रंथाची पृष्ठसंख्या ७५१ आहे. समर्थांच्या गद्य चरित्रग्रंथांत हा सर्वांत मोठा ग्रंथ आहे. सर्व गद्यपद्यग्रंथांत याचा दुसरा क्रम लागेल. 'दासविश्रामधामा'च्या खालोखाल हा मोठा ग्रंथ आहे. पूर्वार्धाच्या पहिल्या भागांत सामर्थ्याचे प्रकार व वाढ यांचें सविस्तर वर्णन केलें आहे. त्यांत ( १ ) शक्तिसामर्थ्य, ( २ ) भक्तिसामर्थ्य, ( ३ ) युक्तिसामर्थ्य, ( ४ ) विरक्तिसामर्थ्य, ( ५ ) बुद्धिसामर्थ्य, व ( ६ ) सिद्धिसामर्थ्य, यांविषयीं माहिती दिली आहे. पहिल्या भागाच्या शेवटीं चरित्रकार म्हणतातः— " रामदासस्वामींच्या चरित्रांत असले अद्‌भुत चमत्कार फारच आहेत. हे सर्व चमत्कार गाळून टाकून चरित्र लिहिणें म्हणजे त्यांचें चरित्र तें काय, हेंच आम्हांस समजत नाहीं. व्यावहारिक गोष्टींचें चरित्र लिहिणें म्हणजे तें कांहीं समर्थांचें चरित्र नव्हे." महाराष्ट्रभाषाचित्रमयूरांचें हें मत आम्हांस संमत नाहीं. योगसामर्थ्यानें सत्पुरुषांच्या हातून अद्‌भुत चमत्कार होणार नाहींत असें आम्ही म्हणत नाहीं; परंतु अद्‌भुत चमत्कार हें कांहीं सत्पुरुषांचें मुख्य लक्षण नव्हे. सत्पुरुषांच्या चरित्रांतील अद्‌भुत चमत्कारांचें अनुकरण बहुजनसमाजाला करणें अशक्य आहे. उलट पक्षीं त्यांच्या नित्य व्यवहारांतल्या गोष्टींतील पुष्कळ भाग सामान्य मनुष्याला अनुकरण करण्यासारखा असतो.

दुसऱ्या भागांत बखरकारांवरील आक्षेपांचें सविस्तर निरसन केलें आहे. पूर्वार्धांतील पुढील सहा भागांत समर्थांचें चरित्र ऊर्फ लीला यांचें वर्णन केलें आहे. चरित्रांतील गोष्टी कालक्रमानें दिल्या आहेत. त्या हनुमंतस्वामींच्या बखरीच्या आधारानें दिल्या आहेत. ह. स्वा. बखरींतील आख्यायिका व अतिशयोक्तींचें वर्णन यांवर कै. आठल्यांनीं भाविक श्रद्धेनें पूर्ण विश्वास ठेवून त्यांचें रसभरित वर्णन केलें आहे.

उत्तरार्धाचे एकंदर सहा भाग आहेत. त्यांत समर्थांच्या ग्रंथांचें सविस्तर विवेचन केलें आहे. दुसऱ्या भागांत दासबोधांतील कांहीं कोड्यांचा उलगडा केला आहे व बरींच सुभाषितें दिलीं आहेत. लीलावर्णनांत व ग्रंथविवेचनांत कांहीं

ठिकाणीं महाराष्ट्रभाषाचित्रमयूरांचा व आमचा मतभेद आहे, तो पुढें चरित्रांत योग्य प्रसंगीं दाखविण्यांत येईल.

( ६ ) अनंतदासकृत चरित्र. वांई येथील गोशाळेचे संस्थापक सुप्रसिद्ध श्री. चौंडेमहाराज यांचे शिष्य गोसेवक श्री. अनंतदास यांनीं 'समर्थांचा गाथा' या नांवाचा एक उत्कृष्ट ग्रंथ शके १८५० सालीं प्रसिद्ध केला. या ग्रंथांत ९०९ अभंग, ८३७ पदें व तीन श्लोक मिळून १७४९ पद्यें, एवढी समर्थकविता प्रसिद्ध केली आहे. या ग्रंथाचें एक वैशिष्ट्य हें आहे कीं, त्याच्या प्रस्तावनेंत श्रीसमर्थचरित्राची ऐतिहासिक चर्चा आणि सद्गुरु-समर्थांचें राजकीय चरित्र असे दोन उत्कृष्ट निबंध दिले आहेत. ११३ पानें समर्थचरित्राची ऐतिहासिक चर्चा झाल्यावर, ३८ पानांत समर्थांचें राजकीय चरित्र दिलें आहे. 'राजकीय चरित्र' असें नांव दिलें आहे, तरी त्यांत बालपण, तपश्चर्या व तीर्थयात्रादिपासून अवतारसमाप्तीपर्यंत समर्थांचें सर्व चरित्र कालक्रमानें थोडक्यांत उत्तम रीतीनें दिलें आहे. समर्थांच्या पूर्वचरित्रकारांचा थोडक्यांत उल्लेख करून त्यांतील भीमस्वामीकृत चरित्र, समर्थवाकेनिशी, ह. स्वा.ची बखर व समर्थप्रताप यांचा मुख्य आधार घेऊन समर्थांचें राजकीय चरित्र लिहिलें आहे. समर्थांचें विश्वसनीय चरित्र थोडक्यांत कोणास समजून घेण्याचें असल्यास त्यांनीं श्री. अनंतदास यांच्या समर्थगाथ्यांतील उत्कृष्ट प्रस्तावना वाचावी अशी आमची शिफारस आहे.

**समर्थकीर्तन.** औंध संस्थानचे पदवीधर व प्रजाहितेच्छु अधिपति श्रीमंत भवानराव ऊर्फ बाळासाहेब पंतप्रतिनिधि यांनीं आपल्या प्रतिसांवत्सरिक 'कीर्तनसुमनहारां'त शके १८५३ सालीं समर्थचरित्राचें एक पुष्प गोंविलें आहे. श्रीमंत बाळासाहेब हे गेलीं २१ वर्षें आपल्या परमपूज्य वडिलांच्या पुण्यतिथि-उत्सवांत भाद्रपद शुद्ध १४ दिवशीं एक आख्यान रचून स्वतः कीर्तन करून पितृचरणीं 'कीर्तनसुमनहार' अर्पण करीत असतात. कीर्तन-चरित्रांत समर्थांचे पूर्वज कृष्णाजीपंत ठोसर शके ८८४ सालीं बंदर प्रांत सोडून बीड प्रांतांत आल्यापासून शके १५४२ त समर्थ लग्नमंडपांतून पळून जाईपर्यंतची माहिती दिली आहे. श्लोक, पदें, दिंड्या इत्यादि एकंदर ८७ पद्यें आहेत. कीर्तन उत्तम साधलें आहे. कीर्तनास मुख्य आधार श्रीमंतांनीं हनुमंतस्वामींच्या बखरीचा घेतला असावा असें दिसतें. बालकांडाप्रमाणें तपश्चर्यादि इतर सहा कांडांवर ही श्रीमंत बाळासाहेब हे चरित्रपुष्पें रचून तीं सांवत्सरिक 'कीर्तनसुमनहारां'त गोंवून पूज्य पितृचरणीं अर्पण करतील तर, अर्वाचीन कालांतील समर्थचरित्रांत एका चांगल्या गद्यपद्यमय चरित्राची भर पडेल असें आम्हांस वाटतें, म्हणून त्याप्रमाणें आम्ही श्रीमंतांना नम्र विनंति करितों.

समर्थांचे ग्रंथ प्रसिद्ध करितांना कांहीं विद्वान् समर्थभक्तांनीं समर्थांचीं
त्रोटक चरित्रें प्रस्तावनेंत दिलीं आहेत:--(१) शके १८४५ सालीं ह. प.
लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांनीं ग्वाल्हेर मठांतील दत्तात्रयस्वामींच्या पोथीवरून
सार्थ श्रीदासबोध प्रसिद्ध केला. त्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत उपलब्ध व प्रकाशित ग्रंथां-
वरून समर्थांचें अत्यंत त्रोटक चरित्र दिलें आहे. 'श्रीदासबोधांतील विषयांचें
समग्र विवरण करण्यास येथें जागा नाहीं. तसा प्रयत्न श्रीसमर्थचरित्रांत करण्याचा
माझा मानस आहे,' असें ह. प. पांगारकर यांनीं प्रस्तावनेंत म्हटलें आहे. समर्थ-
वाङ्मयभक्त श्री. शं. श्री. देव यांच्या चरित्राप्रमाणें ह. प. पांगारकरांच्या श्रीसमर्थ-
चरित्राची महाराष्ट्र-वाचक अत्यंत आतुरतेनें वाट पहात आहेत.

(२) सुप्रसिद्ध प्रो. दत्तात्रय रामचंद्र रानडे यांनीं 'Academy
of Philosophy and Religion' नांवाची एक संस्था स्थापन केली आहे.
तींत इंग्रजी व मराठी तत्त्वज्ञान आणि धर्म या विषयांवर ग्रंथ प्रसिद्ध होत असतात.
मराठीमध्यें त्यांनीं अध्यात्मग्रंथमाला सुरू केली आहे. ग्रंथांक ४ यांत त्यांनीं 'रामदास-
वचनामृत' प्रसिद्ध केलें आहे. त्यांतील प्रस्तावनेंत त्यांनीं थोडक्यांत पण साधार समर्थ-
चरित्र दिलें आहे. शके १६०० आश्विन शुद्ध दशमी दिवशीं शिवाजीमहाराजांनीं
समर्थांस दिलेल्या सनदेवर व शके १६०३ माघ वद्य १३ दिवशीं लिहिलेल्या
समर्थवाकेनिशीवर प्रो. रानडे यांचा इतर चरित्रें व पत्रें यांपेक्षां अधिक
विश्वास आहे.

(३) मल्हारराव चिटणीस यांनीं श्रीशिवछत्रपतिमहाराजांचें सप्तप्रकरणात्मक
चरित्र लिहिलें आहे. त्यांतील द्वितीय प्रकरण 'राज्यआक्रमण व सज्जनसेवन' असें
आहे. त्यांत समर्थ आणि शिवाजीमहाराज यांच्या भेटीचें व अनुग्रहाचें वर्णन आहे.
मल्हारराव चिटणीस हे शिवकालीन बाळाजी आवजी चिटणीस यांचे वंशज.
त्यांना कांहीं महत्त्वाचे कागद सांपडले होते, त्यांवरून त्यांनीं शिवाजीमहाराजांचें
चरित्र लिहिलें आहे. शिवाजीमहाराजांना समर्थांचा अनुग्रह ज्या दिवशीं झाला
त्या दिवशींच बाळाजी आवजी चिटणीसांना झाला होता. तेव्हां मल्हारराव-
कृत श्रीशिवछत्रपतिचरित्रांतील महाराजांना समर्थांचा अनुग्रह झाल्याची हकी-
कत विश्वसनीय मानली पाहिजे.

(४) 'क्षत्रियकुलावतंस छत्रपति शिवाजीमहाराज यांचें चरित्र' हा
शिवाजीमहाराजांचा चारित्रात्मक सविस्तर व साधार ग्रंथ श्री. कृष्णराव अर्जुन
केळूसकर यांनीं लिहिला आहे. इंग्रजी मराठी भाषांतील अनेक ग्रंथ, बखरी, ऐति-
हासिक कागदपत्रें वाचून त्यांनीं हा ग्रंथ लिहिला आहे. ग्रंथाची दुसरी आवृत्ति
सन १९२० सालीं प्रसिद्ध झाली. त्यांत 'सज्जनसेवा' हा २९ वा भाग आहे.

त्यांत त्यांनीं समर्थशिवाजीमहाराजांची भेट व अनुग्रह यांविषयीं विवेचन केलें आहे. कांहीं गोष्टींत आमचा व त्यांचा मतभेद आहे, त्याविषयीं आम्ही पुढें योग्य ठिकाणीं विवेचन करणार आहों. परंतु श्री. केळूसकर यांनीं समर्थांविषयीं लिहितांना वाङ्मयशास्त्रांतील सभ्यपणाच्या कोणत्या ही मार्गाचें उल्लंघन केलेलें नाहीं व शिवाजीमहाराजांची व समर्थांची प्रथम भेट शके १५९४ सालीं झाली, महाराज राजकारणांत समर्थांची सल्ला घेत नसत, स्वराज्यस्थापनेच्या कार्याशीं समर्थांचा कांहीं संबंध नव्हता असें उपलब्ध झालेल्या कागदपत्रांवरून त्यांनीं सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे, तरी समर्थांविषयीं त्यांनीं कोठें ही अनादरबुद्धि प्रगट केली नाहीं; ते विरक्त व सदाचारी सत्पुरुष होते असें म्हणून त्यांनीं समर्थांविषयीं पूज्य बुद्धि प्रगट केली आहे. कांहीं क्षत्रियकुलोत्पन्न, मराठे व ब्राह्मणेतर सुशिक्षित लेखक श्री. केळूसकर यांचें या गोष्टींत अनुकरण करतील तर महाराष्ट्रसाहित्यांत अलीकडे सत्पुरुषांच्या चारित्र्यांवर आधार नसतां शिंतोडा टाकण्याचा जो निंद्य प्रकार केव्हां केव्हां दृष्टोत्पत्तीस येतो तो बंद होईल.

( ५ ) सरदेसाईकृत रियासत. सुप्रसिद्ध इतिहासभक्त श्री. गोविंद सखाराम सरदेसाई यांनीं सन १९१५ सालीं ' मराठी रियासत ( पूर्वार्ध )—सुधारून वाढविलेली नवीन आवृत्ति ' हें पुस्तक प्रसिद्ध केलें. प्रस्तावनेच्या ७।८।९ या तीन पानांत त्यांनीं आधारभूत पुस्तकांची यादी दिली आहे. तीवरून रियासत लिहिण्यापूर्वी शिवाजीमहाराजांच्या सर्व बखरी, चरित्रें, शिलालेख, काव्येतिहास, कै. श्री. पारसनीस, राजवाडे, मावजीप्रभृतींचे ग्रंथ, सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केलेले लेख, संस्थानचे स्वतंत्र इतिहास, ऐतिहासिक पोवाडे इत्यादि विविध व अमूल्य माहितीवरून श्री. गोविंदराव सरदेसाई यांनीं आपली रियासत लिहिली आहे हें स्पष्ट दिसून येतें. तेव्हां त्यांनीं शिवाजी व रामदास या उभयतांसंबंधीं रियासतींत केलेलें विवेचन व प्रतिपादन केलेलें मत यांना महत्त्व दिलें पाहिजे. प्रकरण दोन ' महाराष्ट्रीय संत कवींची कामगिरी ' यांतील ५०-५१ या पानांत समर्थांचें अत्यल्प चरित्र दिलें आहे. प्रकरण ३—७ यांत महाराष्ट्र-धर्माचें विवेचन केलें आहे ( पान १०१-१०५ ). आठव्या प्रकरणामध्यें ( पान १०५—११० ) ' रामदासांची योग्यता ' या विषयाचें उत्कृष्ट विवेचन केलें आहे. त्याच प्रकरणांत ( पान ११०-११६ ) ' शिवाजीच्या राज्यस्थापनेंत समर्थांचा भाग ' या विषयाचें विवेचन केलें आहे. त्यांत ते म्हणतातः—' शिवाजीचा राज्योपक्रम सन १६४५ च्या सुमारास पुरा झाला होता; आणि त्या उपक्रमांत आरंभीं रामदासांचें अंग बिलकुल नव्हतें. ' ही गोष्ट आम्हांस मान्य आहे. परंतु पुढें ते म्हणतातः—' दासबोधांतील राष्ट्रीय विचारांची स्फूर्ति रामदासांना शिवाजीच्या उद्योगानें झाली. ' हें रियासत-

कारांचें मत आम्हांस मान्य नाहीं. त्यांच्या मताचें खंडण पुढें 'समर्थांचें राजकारण' या भागांत केलें आहे.

( ६ ) डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांनीं 'महाराष्ट्रीयांचें काव्यपरीक्षण' या नांवाचा एक लेख विद्यासेवक मासिकपुस्तकांत ( वर्ष ४ थें, अंक ११।१२ ) प्रसिद्ध केला आहे. त्यांत प्रकरण १० वें 'रामदासांचें साहित्यशास्त्र' हें आहे. त्यांत त्यांनीं फक्त रामदासांचे ग्रंथ या विषयाचा काव्य या दृष्टीनें विचार केला आहे. त्याविषयीं विवेचन आम्हीं 'समर्थांचे ग्रंथ' या भागांत केलें आहे.

( ७ ) प्रो. शंकर दामोदर पेंडसे, एम्. ए., यांनीं 'महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास' हा उत्तम ग्रंथ सन १९३१ सालीं प्रसिद्ध केला. त्यांत नववें प्रकरण 'समर्थ रामदास' हें आहे. त्यांत त्यांनीं समर्थांचें वैशिष्ट्य, तत्त्वज्ञान, प्रपंच, परमार्थ, प्रयत्नवाद व समर्थांचें कार्य यांविषयीं मुद्देसूद विवेचन केलें आहे.

( ८ ) इतिहाससंशोधक कै. कृ. वि. आचार्य, कालेगांवकर, यांनीं केलेलें 'समर्थबोधशतक' हें शंभर कवितांचें पद्यात्मक छोटें चरित्र त्यांचे चिरंजीव नारायण कृष्ण आचार्य व नरसिंह कृष्ण आचार्य यांनीं १९३२ सालीं प्रसिद्ध केलें आहे.

अर्वाचीन काळीं वर नमुद केलेल्या मराठी समर्थचरित्रांशिवाय दोन चरित्रें इंग्रजी भाषेंत आहेत.

( १ ) सन १९१८ सालीं श्री. केशवराव सीताराम ठाकरे यांनीं '*The Life and Mission of Samarth Ramadas*' 'रामदासांचें चरित्र व कार्य' या नांवचें एक लहानसें पुस्तक इंग्रजी भाषेंत प्रसिद्ध केलें आहे. या पुस्तकाचे आठरा भाग व १२७ पानें आहेत. प्रो. भाटे यांच्या 'सज्जनगड व रामदास' या पुस्तकाएवढें हें पुस्तक आहे. श्री. ठाकरे हे मुंबईंत 'School of Modern Languages' 'अर्वाचीन भाषांची शाळा' या संस्थेंत मराठी भाषेचे प्रोफेसर होते. त्या वेळीं त्यांना इंडियन सर्व्हिसमधील लोकांना मराठ्यांचा इतिहास शिकवावा लागे. ते लोक श्री. ठाकरे यांना रामदास व शिवाजी यांच्या चरित्राविषयीं कुतूहलतेनें अनेक प्रश्न विचारीत असत. त्यांची जिज्ञासा तृप्त करण्याकरितां त्यांनीं वरील पुस्तक इंग्रजी भाषेंत लिहिलें. श्री. ठाकरे यांनीं कोणत्या प्राचीन ग्रंथांच्या आधारानें तें लिहिलें आहे याचा स्पष्ट उल्लेख त्यांनीं आपल्या पुस्तकांत केलेला नाहीं. 'Religion and Politics' या आठव्या भागांत ते म्हणतातः—

"We have before us indeed a number of political lives and sketches composed by a few contemporary devotees of Ramadas and the fashion of the time and taste of the people have not spared them from being crammed with exaggerations and superstitious.

allegories. But we assure our rational readers that as long as Ramadasa's chief work–Dasbodh–has not become polluted with interpolations or grafted matter, as has unfortunately been the case with our great epic poems--Ramayan and Mahabharat, our way of dealing with his life and mission is clear and free from superstitious brambles. In Dasbodh Ramdas has poured his whole life and even though we elbow aside all other independent biographies we can still collect reliable material from Dasbodh itself to paint his life in the most rational manner suited to the inquisitive taste of the modern mind."

भावार्थः--' समर्थकालीन त्यांच्या भक्तांनीं त्यांचीं कांहीं चरित्रें लिहिलीं आहेत. परिस्थितीप्रमाणें त्यांत अतिशयोक्ति व धर्मभोळेपणा दिसून येतो. रामायणमहाभारतांप्रमाणें दासबोधांत क्षेपक भाग मुळींच नाहीं. दासबोधांत समर्थांचें सर्व चरित्र त्यांनीं दिलें आहे. समर्थांचीं सर्व चरित्रें एका बाजूस टेविलीं तरी दासबोधावरून अर्वाचिन वाचकांची जिज्ञासा तृप्त करण्याइतकें चरित्र आम्हांस देतां येईल. '

श्री. ठाकरे यांनीं आपल्या समर्थचरित्रांत अद्भुत गोष्टी गाळल्या आहेत. बाकीचा भाग त्यांनीं ह. स्वा. बखरीवरून घेतला असावा असें दिसते. समर्थांच्या कार्याविषयीं लिहितांना त्यांनीं फक्त दासबोधाचाच आधार घेतला आहे. दासबोधेतर समर्थवाङ्मय त्यांनीं वाचलें नसावें असें दिसतें. कारण त्यांतील उतारे त्यांच्या चरित्रांत दिलेले नाहींत. दासबोधांतील उतारे इंग्रजींत देऊन त्यांनीं समर्थकार्याचें उत्तम विवेचन केलें आहे. भाग ८ ' Religion and Politics, ' भाग ९ ' Shivaji and Ramadas ' व भाग ११ 'To the End' हे भाग वाचकांनीं अवश्य वाचावेत.

(२) *Ramadas and Ramadasi.* अर्वाचीन कालीं इंग्रजी भाषेत लिहिलेलें दुसरें पुस्तक *Ramadas and Ramadasi* ( रामदास व रामदासी ) हें होय. हें पुस्तक अहमदनगर येथील अमेरिकन मराठी मिशनचे रे. विल्बर एस्. डेमिंग, पीएच्. डी. यांनीं लिहिलें आहे. या पुस्तकाचे एकंदर अकरा भाग आहेत. पैकीं पहिले दहा भाग त्यांनीं पीएच्. डी. ही पदवी मिळविण्याकरितां निबंध ' Thesis ' म्हणून लिहिले होते. ते त्यांनीं अमेरिकेंतील हार्टफोर्ड सेमिनरी फाउंडेशनच्या केनेडी मिशन स्कूलकडे पाठविले होते. सदरहू दहा भागांचा त्यांचा निबंध पसंत होऊन त्यांना पीएच्. डी. ही पदवी मिळाली. ' रामदास व जिजस ' हा अकरावा भाग त्यांनीं मागाहून लिहिला आहे. समर्थचरित्रांतील कांहीं गोष्टींविषयीं

रे. डेमिंग यांचा व आमचा मतभेद असला तरी त्यांनीं ' रामदास व रामदासी ' हें पुस्तक अत्यंत श्रमपूर्वक लिहिलें असून, बहुतेक महत्त्वाच्या गोष्टींविषयीं त्यांनीं समतोलपणानें टीका केली आहे व जेथें अनुकूल व प्रतिकूल असा उभय-पक्षीं पुरावा आहे असें त्यांना वाटलें तेथें ' अखेर निर्णय देणें शक्य नाहीं, ' असें त्यांनीं प्रांजलपणें कबूल केलें आहे. समर्थांचे चरित्रग्रंथ वाचण्याकरितां त्यांनीं मुद्दाम एक पंडित ठेवला होता. त्याच्या साहाय्यानें सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केलेले व इतर उपलब्ध ग्रंथ चिकित्सक बुद्धीनें त्यांनीं वाचले व त्यांच्या साहाय्यानें मराठी चरित्रांतील महत्त्वाच्या गोष्टींचें भाषांतर करून आपल्या पुस्त-कांत दिलें आहे. शिवाजीमहाराजांचीं कांहीं इंग्रजी चरित्रें, हिंदुधर्मावरील कांहीं इंग्रजी पुस्तकें व महाराष्ट्रसंतांचीं कांहीं चरित्रें हीं त्यांनीं समर्थचरित्र लिहितांना उपयोगीं पडण्याच्या हेतूनें वाचलीं आहेत. रे. डेमिंगसाहेबांची टीका करण्याची पद्धति महाराष्ट्रांतील आधुनिक चिकित्सकांनीं सुद्धां अनुकरण करण्यासारखी आहे. रे. डेमिंगसाहेब परधर्मी असतांना ही समर्थचरित्रांतील वादविषयक गोष्टींचें चिकित्सक बुद्धीनें विवेचन करतांना समर्थांविषयीं जो आदर त्यांनीं दाखविला आहे, त्याचें अनुकरण समर्थांचे कांहीं विद्वान् ब्राह्मण व ब्राह्मणेतर लेखक व टीकाकार करतील तर, महाराष्ट्र-साहित्यांत सत्पुरुषांवर टीका करतांना केव्हां केव्हां असभ्य प्रकार दिसून येतो तो नाहींसा होईल. रे. डेमिंग यांनीं आपल्या पुस्तकांत तेरा उत्कृष्ट फोटो दिले आहेत व शेवटीं index ही दिलें आहे. रामदास व जिजस या शेव-टच्या भागांतील त्यांचीं कांहीं मतें आम्हांस मान्य नाहींत व पूर्वींच्या दहा भागां-मध्यें कांहीं ठिकाणीं त्यांचा व आमचा मतभेद आहे; तरी त्यांचें पुस्तक एकंदरींत वाचनीय आहे व इंग्रजी वाचकांनीं तर तें अवश्य वाचावें अशी आमची त्यांना विनंति आहे.

शिवाजीमहाराजांच्या कांहीं इंग्रजी व मराठी चरित्रांत समर्थचरित्राचा त्रोटक उल्लेख केला आहेः—

( १ ) कॅप्टन ग्रँट डफ यांनीं १८२६ सालीं लंडन येथें *A History of the Mahrattas* ( मराठ्यांचा इतिहास ) हें इंग्रजी पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यांत कांहीं ठिकाणीं रामदासांचा उल्लेख आहे. वरील पुस्तकांची नवी आवृत्ति मि. एस्. एम्. एडवर्डस् यांनीं १९२१ सालीं प्रसिद्ध केली. सदरहू एडवर्डस् यांनीं मध्यंतरीं प्रसिद्ध झालेल्या श्री. जदुनाथ सरकारप्रभृति आधुनिक इंग्रजी चरित्रकारांचे ग्रंथ वाचून मूळ डफसाहेबांच्या ग्रंथामध्यें खालीं खुलाशाकरितां टीपा ( foot-notes ) दिल्या आहेत. त्यांचा योग्य ठिकाणीं या चरित्रांत उल्लेख केला आहे.

( २ ) वैद्यकृत ' शिवाजी व रामदास '. भारताचार्य श्री. चिंतामण विनायक वैद्य यांनीं *Shivaji the Founder of Maratha Swaraja* ( मराठा

स्वराज्याचे संस्थापक शिवाजी ( महाराज )—या नांवचें एक पुस्तक इंग्रजी भाषेंत लिहिलें आहे. त्यांतील ३३ वा भाग' शिवाजी आणि रामदास ' असा आहे. त्यांतील पहिल्या भागांत श्री. वैद्य म्हणतात:–" Ramdas was, according to or view, a co-worker with Shivaji in the sacred cause of the deliverance of Maharashtra from the oppression of a foreign rule and religion. " अर्थ—परकी राज्य व धर्म यांच्या जुलमापासून मुक्तता करण्याच्या पवित्र कामांत समर्थ रामदास हे शिवाजीचे सहकारी होते. वरील भागांत श्री. वैद्य यांनीं समर्थांचें अत्यंत त्रोटक चरित्र दिलें आहे. समर्थचरित्रांतील ज्या दोन वादविषयक गोष्टी शिवसमर्थ-भेट व समर्थांचें राजकारण त्यांविषयीं त्यांनीं सविस्तर विवेचन केलें आहे. दुसऱ्या गोष्टीविषयींचें त्यांचें म्हणणें आम्हांस मान्य आहे. पहिल्या गोष्टी-संबंधानें ते म्हणतात कीं, शिवाजीमहाराजांची व समर्थांची पहिली भेट सन १६६० मध्यें अफझुलखानाच्या मृत्यूनंतर झाली ( पान २५८–२५९ ). या गोष्टीसंबंधानें त्यांचा व आमचा मतभेद आहे. त्याचीं कारणें पुढें ६व्या भागांत दिलीं आहेत.

( ३ ) श्री. म. गो. रानडेकृत 'मराठी सत्तेचा उदय.' विद्वद्वर्य कै. ना. न्या. महादेव गोविंद रानडे यांनीं सन १९०० सालीं '*The Rise of the Maratha Power* ' ( मराठी सत्तेचा उदय ) या नांवचें इंग्रजी भाषेंत एक उत्कृष्ट पुस्तक लिहिलें आहे. मराठ्यांच्या इतिहासाचा अभिमान बाळगणाऱ्यांनीं तें पुस्तक मननपूर्वक वाचावें अशी आमची शिफारस आहे. महाराष्ट्रांत शिवाजीमहाराजांनीं जें स्वराज्य स्थापन केलें, त्यास कोणकोणत्या गोष्टी कारणीभूत झाल्या, याचें त्यांत उत्तम विवेचन केलें आहे. श्री. वैद्य यांनीं 'रामदास व शिवाजी ' यांच्या विषयीं स्वतंत्र भागांत विवेचन केलें आहे, त्याप्रमाणें कै. न्या. रानडे यांनीं केलेलें नाहीं. परंतु सदरहू पुस्तकांत ' The Saints and Prophets in Maharashtra,' 'महाराष्ट्रांतील साधु-संत' या आठव्या भागांत साधुसंतांच्या स्वराज्यपोषक कामगिरीचें उत्तम वर्णन केलें आहे. ' मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्र-धर्म वाढवावा ' असा जो समर्थांनीं शिवाजीमहाराजांना उपदेश केला, तो महाराष्ट्र-धर्म म्हणजे काय याचें उत्तम विवेचन सदरहू भागांत केलें आहे. वैदिक, पौराणिक अगर हिंदु धर्म वाढवावा असें न म्हणतां समर्थांनीं महाराष्ट्र-धर्म वाढवावा असें कां म्हटलें ? याची यथार्थ कल्पना कै. रानडे यांच्या पुस्तकांतील सदरहू भाग वाचल्याशिवाय येणार नाहीं. महाराष्ट्रांतील राजकीय सत्तेच्या उत्कर्षाचा महाराष्ट्रांतील धार्मिक उत्कर्षाशीं निकट संबंध आहे व हा धार्मिक उत्कर्ष ( Upheaval ) शिवाजीमहाराजांच्या पूर्वीं चारपांचशें वर्षें ज्ञानदेवाच्या वेळेपासून एकसारखा क्रमाक्रमानें तुकाराम-रामदासांच्या वेळेपर्यंत चालला होता व त्यानें शिवाजीमहाराजांची स्वराज्यभूमिक

तयार करून ठेविली होती व त्या योगानें शिवाजीमहाराजांचें स्वराज्यस्थापनेचें कार्य सुकर झालें, असें कै. रानडे यांनीं प्रतिपादन केलें आहे. पूर्वकालीन साधुसंतांनीं बहुजनसमाजाला भक्तिमार्गास लावून परधर्मापासून परावृत्त केलें. "Roughly speaking we may state that the history of the religious revival covers a period of nearly five hundred years and during this period some fifty saints and prophets flourished in the land." ( page 146 ).

भावार्थः—जवळजवळ ५०० वर्षे धार्मिक उत्कर्षाचें काम चाललें होतें व या कामांत ५० साधुसंत झाले. यांत २५ ब्राह्मण व २५ कुणबी, मराठे, शिंपी, माळी, कुंभार, सोनार इत्यादि जातींचे होते. इतकेंच नव्हे तर कांहीं अस्पृश्य व कांहीं यवन जातींचे ही होते. या सर्व साधुसंतांनीं स्वराज्याची भूमिका अप्रत्यक्षपणें तयार केली. समर्थांविषयीं कै. रानडे म्हणतातः—"Ramadas became Shivaji's spiritual guide and his chief adviser even in secular matters." रामदास हे शिवाजीमहाराजांचे धार्मिक गुरु होते व व्यावहारिक (राजकीय) गोष्टींत देखील महाराजांचे मुख्य सल्लागार होते. कै. रानडे यांचें सर्वच पुस्तक वाचनीय आहे. अधिक उतारे देऊन हा भाग वाढवीत नाहीं.

( ४ ) बंगाल्यांतील प्रसिद्ध इतिहाससंशोधक श्री. जदुनाथ सरकार यांनीं *'Shivaji and His Times'*—'शिवाजी व त्याचा काळ'—या नांवचें एक पुस्तक इंग्रजी भाषेंत प्रसिद्ध केलें आहे ( आवृत्ती २ री, सन १९२० ). वरील पुस्तकांत श्री. सरकार यांनीं परशियन, इंग्रजी व डच या लोकांनीं लिहिलेल्या इतिहासांवर व पत्रांवर विशेष भर देऊन शिवाजीमहाराजांचें चरित्र लिहिलें आहे. कै. राजवाडे, कै. खरे, कै. साने व श्री. सरदेसाई यांचा व भारत-इतिहास-संशोधक मंडळाचा उल्लेख श्री. सरकार यांनीं केला आहे. परंतु वरील इतिहासकारांनीं लिहिलेले व भा. इ. सं. मंडळानें प्रसिद्ध केलेले सर्व ग्रंथ मूळ मराठी भाषेंतून त्यांनीं वाचले असावेत असें त्यांच्या ग्रंथावरून दिसत नाहीं. समर्थांचे ग्रंथ तर त्यांनीं मुळींच वाचले नाहींत असें दिसतें. भाग १६, पान ४४२, मध्यें श्री. सरकार म्हणतात—"Before the rise of Shivaji, the Maratha race was scattered like atoms through many Deccani kingdoms. He welded them into a mighty nation" भावार्थः—शिवाजीमहाराजांच्या उदयापूर्वी मराठे लोक दक्षिणेंतील ( मुसलमानी ) राज्यांमध्यें कणांसारखे पसरलेले होते. शिवाजीमहाराजांनीं त्यांना एकत्र करून त्यांचें राष्ट्र बनविलें. हें त्यांचें म्हणणें बरोबर आहे. परंतु त्यांनीं समर्थवाङ्मय वाचलें नसल्यामुळें, 'मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्र-धर्म वाढवावा ।।' ही समर्थांची गर्जना त्यांच्या कानावर गेलेली नाहीं. श्री. सरकार यांनीं दोन भागांत समर्थांचा उल्लेख केला आहे.

पहिला उल्लेख भाग १, पान १२, मध्यें आहे. तो कै. न्या. रानडे यांच्या मराठ्यांचा उत्कर्ष या भागांतील आहे. तो असाः—"The names of Tukaram, of Ramadas, of Vamanpandit and of Ekanath still retain their ascendancy over the people of Maharashtra." दुसरा उल्लेख भाग १६, पान ४२१।४२२, मध्यें आहे. "Shivaji's spiritual guide (guru) was Ramadas Swami, one of the greatest saints of Maharashtra. An attempt has been made in the present generation to prove that the Maratha national hero's political ideal of an independent Hindu monarchy was inspired by Ramadas, but evidence produced is neither adequate nor free from suspicion; the holy man's influence on Shivaji was spiritual and not political." भावार्थः—रामदासस्वामी शिवाजीचे धार्मिक गुरु होते. रामदास महाराष्ट्रांतील श्रेष्ठ संतांपैकीं एक प्रमुख संत होते. हिंदूंचें स्वतंत्र राज्य करण्याच्या कल्पनेची स्फूर्ति रामदासांपासून शिवाजीला झाली असें सिद्ध करण्याचा प्रयत्न अलीकडे करण्यांत येत आहे; परंतु सदरहू गोष्टीबद्दलचा पुरावा भरपूर व संशयातीत नाहीं. त्या पवित्र साधूचें ( रामदासस्वामींचें ) शिवाजी-( महाराजां )वरील वजन धार्मिक होतें, राजकीय नव्हतें. समर्थांची गांठ पडण्यापूर्वी शिवाजीमहाराजांनीं स्वराज्यस्थापनेस अल्पारंभ केला होता हें आम्हांस मान्य आहे. परंतु समर्थांचें महाराजांवर राजकीय बाबतींत वजन नव्हतें, ही गोष्ट आम्हांस मान्य नाहीं. प्रो. भाटे यांच्या रामदासांवरील लेखाचा श्री. सरकार यांनीं टीपेंत उल्लेख केला आहे; परंतु राज्याभिषेकानंतर शिवाजीमहाराज समर्थांचा राजकीय गोष्टींत ही सल्ला घेत होते, असें प्रो. भाटे यांनीं स्पष्ट म्हटलें आहे, त्याकडे श्री. सरकारचें लक्ष गेलें नाहीं असें दिसतें. कै. रानडे यांनीं आपल्या 'मराठ्यांचा उत्कर्ष' या पुस्तकांत शिवाजी-समर्थांचा धार्मिक बाबतींतच नव्हे तर राजकीय बाबतींत सल्ला घेत होते असें म्हटलें आहे, तिकडे ही श्री. सरकारचें लक्ष गेलेलें नाहीं.

( ५ ) मि. सी. ए. किंकियेड, आय्. सी. एस्., व कै. रा. ब. दत्तात्रय बळवंत पारसनीस या उभयतांनीं मिळून '*A History of the Maratha People*' 'मराठ्यांचा इतिहास' या नांवाचें इंग्रजी पुस्तक स. १९१८ सालीं प्रसिद्ध केलें. त्यांतील १७वा भाग 'तुकाराम आणि रामदास' हा आहे. सदरहू भागांत समर्थांचें त्रोटक चरित्र दिलें असून त्यांची व शिवाजीमहाराजांची गांठ केव्हां पडली याविषयीं आपलें मत प्रगट केलें आहे. 'ग्रँट डफचा इतिहास प्रसिद्ध झाल्यावर ९० वर्षांनीं आपण मराठ्यांचा इतिहास लिहीत आहों, या दरम्यानच्या काळांत कै. राजवाडे, साने, खरे, लिमये व मेहेंदळेप्रभृति इतिहाससंशोधकांनीं ग्रँट डफच्या वेळेस उपलब्ध नसलेली पुष्कळ माहिती मिळवून प्रसिद्ध केली आहे,

कै. न्या. महादेव गोविंद रानडे यांच्या ‘ मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष ’ या उत्कृष्ट पुस्तकानें जगांतील अत्यंत थोर पुरुषांपैकीं एक थोर पुरुष जे शिवाजीमहाराज त्यांच्या विषयीं ग्रँट डफनें केलेला गैरसमज दूर झाला आहे. संतांच्या धार्मिक कामगिरीचा ही शिवाजीमहाराजांच्या कार्यास उपयोग झाला,’ असें प्रस्तावनेंत मि. किंकियेड यांनीं लिहिलें आहे. ‘ सरकारी कार्यबाहुल्यामुळें कै. रा. ब. पारसनीस यांना मीं मदतीस बोलाविलें व त्यांनीं आपला अमूल्य कागदपत्रांचा संग्रह माझ्या स्वाधीन केला व पुस्तक इंग्रजींत असल्यामुळें मीं पुस्तक लिहिण्याचें काम केलें आहे,’ असें ही पुढें प्रस्तावनेंत मि. किंकियेड म्हणतात. हें इतकें सांगण्याचा मुख्य उद्देश हा आहे कीं, या इंग्रजी पुस्तकांत कै. रा. ब. पारसनीस यांच्या संग्रहांतील अमूल्य कागदपत्रांचा उपयोग केला आहे. म्हणजे यांत महत्त्वाच्या गोष्टींविषयीं जीं मतें प्रतिपादन केलीं आहेत, तीं कै. राजवाडेप्रभृति इतिहाससंशोधकांनीं मिळविलेल्या माहितीचा उपयोग करून प्रतिपादन केलीं आहेत व कांहीं गोष्टींविषयीं तीं प्रो. जदुनाथ सरकार यांच्या मतांपेक्षां अधिक विश्वसनीय आहेत. प्रतापगड येथें श्रीभवानीदेवीची स्थापना झाली, त्या वेळीं त्या समारंभास हजर असलेल्या गृहस्थांची अस्सल यादी प्रतापगड येथील देवीच्या पुजाऱ्यांच्या घरीं कै. रा. ब. पारसनीस यांना सांपडली होती व त्या यादींत पहिलें नांव समर्थ रामदासस्वामींचें होतें. तेव्हां प्रतापगडच्या किल्ल्यावरील देवीची स्थापना होण्यापूर्वी समर्थशिवाजींची गांठ पडली होती हें निःसंशय ठरतें. या पुस्तकांतील ११ वा भाग ‘The Pandharpur Movement,’ हा आहे. त्यांत संतांच्या कामगिरीचा सविस्तर उल्लेख केला आहे.

( ६ ) कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजचे प्रिन्सिपॉल डॉ. बाळकृष्ण यांनीं राजारामियन कॉलेजच्या ज्युबिली मासिकांत ‘ Shivaji and Swami Ramadas ’ ‘शिवाजी व स्वामी रामदास ’ या विषयावर एक इंग्रजींत लेख लिहिला आहे. त्यांनीं मराठी व इंग्रजींतील बरींच पुस्तकें वाचून वरील निबंध लिहिला आहे. आपण ब्राह्मण ही नाहीं व मराठे ही नाहीं, तेव्हां जातिविषयक पूर्वग्रहानें मन दूषित न करितां निःपक्षपातानें शिवसमर्थभेटीविषयीं दोन्ही बाजूंचा विचार करून लिहीत आहों असें प्रारंभीं म्हणून त्यांनीं निबंधास आरंभ केला आहे. परंतु समर्थवाकेनिशीसारखे समकालीन लेख डॉक्टरसाहेबांच्या नजरेस न आल्यामुळें त्यांना प्रि. भाटे यांचा छोटा ग्रंथ, श्री. केळूसकर व श्री. टाखाव यांचें शिवाजीमहाराजांचें चरित्र यांवरच बहुतेक अवलंबून राहावें लागलें आहे. डॉक्टरसाहेबांच्या मताचें खंडन पुढें योग्य प्रसंगीं आम्हीं केलें आहे.

( ७ ) पुणें येथील शिवचरित्रकार्यालयामार्फत ‘ शिवाजी निबंधावली, भाग १’ हें पुस्तक सन १९३० सालीं प्रसिद्ध झालें. त्यांत देशभक्त श्री. ज. स. करंदीकर,

संपादक, केसरी यांनीं 'श्रीरामदासांची राजकारणांतील कामगिरी' या मथळ्याखालीं एक उत्कृष्ट निबंधात्मक लेख लिहिला आहे. त्यांत त्यांनीं प्रथमतः थोडक्यांत समर्थांचें चरित्र दिलें आहे व नंतर त्यांच्या राजकारणांतील कामगिरीचें मुद्देसूद विवेचन केलें. कांहीं ठिकाणीं त्यांनीं केवळ संभवनात्मक अनुमानें काढलीं आहेत, त्यांबद्दल त्यांचा व आमचा मतभेद आहे. त्याबद्दल पुढें योग्य ठिकाणीं विवेचन करण्यांत येईल.

(८) श्री. पां. प्र. कुकडे यांनीं सन १९३० सालीं श्रीमत् दासबोध शब्दार्थ-सार व टीपा यांसह प्रसिद्ध केला आहे. त्यांत त्यांनीं प्रथम दासबोधाच्या आधारें 'समर्थांचें तेजस्वी चरित्र' थोडक्यांत चांगलें दिलें आहे. समर्थग्रंथांवरून समर्थांचें आत्मचरित्र देण्याचा हा तिसरा प्रयत्न होय.

(९) कै. ख्रिस्तभक्त व महाराष्ट्र-संत-प्रेमी जे. ह. ॲबट यांनीं *Ramadas-Translation of Mahipati's Santa–Vijaya* 'रामदास–माहिपतीच्या संतविजयाचें भाषांतर' या नांवाचें एक पुस्तक लिहिलें असून तें सन १९३२ सालीं त्यांच्या मरणानंतर प्रसिद्ध झालें आहे. सदरहू पुस्तकांत ॲबटसाहेबांनीं महिपतीकृत संतविजयांतील ३२ भागांचें इंग्रजी भाषांतर दिलें आहे. मराठी संतविजयाचें विवेचन आम्हीं मागें केलेंच आहे. त्याच्या प्रस्तावनेंत ॲबट म्हणतात:— Ramadas believed in organisation. He was anxious that the worship of Rama should prevail. To him Rama was God supreme who for the salvation of the world had become an awatar millenniums ago but who is ready now to come to the aid of any one in distress who calls upon him. I consider him India's greatest saint.

भावार्थः——**संघटनात्मक कार्यावर** रामदासांचा विश्वास होता. श्रीरामाचा उत्सव सर्व ठिकाणीं सुरू व्हावा अशी त्यांची उत्कृष्ट इच्छा होती. हजारों वर्षांपूर्वीं जगाच्या उद्धाराकरितां श्रीरामानें अवतार घेतला व हल्लीं ही संकटसमयीं कोणीही धांवा केल्यास श्रीराम त्याच्या साहाय्यास धांवतो असा त्यांचा विश्वास होता. हिंदुस्थानांतील संतमंडळींत रामदास सर्वांत श्रेष्ठ होत.

(१) हा भाग छापण्यास दिल्यावर डॉ. केळकर यांनीं 'साधुवर्य संतकवि श्रीसमर्थ रामदासस्वामी' या नांवचें ६४ पानांचें एक छोटें पुस्तक 'पांच आणे मालें'त प्रसिद्ध केलें आहे. चरित्र अत्यंत त्रोटक असल्यामुळें त्यांना कांहीं महत्त्वाच्या गोष्टींचें सविस्तर विवेचन करतां आलें नाहीं. कांहीं महत्त्वाच्या गोष्टींत डॉ. केळकर यांचा व आमचा मतभेद आहे. त्यांच्या मतांचें खंडन ६ व्या व ७ व्या भागांत आढळून येईल. डॉ. केळकर यांचें समर्थचरित्र जरी त्रोटक आहे, तरी समर्थचरित्रांतील बहुतेक सर्व गोष्टी संक्षिप्त रीतीनें देण्यांत त्यांचें कौशल्य

दिसून येतें. हें त्यांच्या संक्षिप्त चरित्राचें वैशिष्ट्य आहे. हनुमंतस्वामींची बखर, गिरिधरस्वामींचा समर्थप्रताप, उद्धवसुतकृत समर्थचरित्र, तंजावरमठाधिपति भीमस्वामीकृत चरित्र, शिवगांवमठाधिपति भीमस्वामीकृत भक्तलीलामृत या ग्रंथांच्या आधारें त्यांनीं हें अल्पचरित्र लिहिलें आहे.

(२) श्री. रा. द. रानडे यांनीं आपल्या 'History of Indian Philosophy' (आर्यांच्या तत्त्वज्ञानाचा इतिहास) या इंग्रजी मालेंतील ७ वा ग्रंथ नुकताच प्रसिद्ध केला आहे. त्यांतील १७व्या भागांत त्रोटक समर्थचरित्र दिलें आहे व १९व्या भागांत दासबोधांतील तत्त्वज्ञानाचें मुद्देसूद विवेचन केलें आहे.

(३) 'मुलांचे रामदास' या नांवचे एक लहान पुस्तक श्री. विष्णु विनायक करमरकर यांनीं सन १९३० सालीं प्रसिद्ध केलेलें आहे (किं. ५ आणे). लहान मुलांना गोष्टी सांगतात, तशी भाषा घालून मुलांना रामदासांचें चरित्र मनोरंजक करण्याचा प्रयत्न केला आहे व तो चांगला साधला आहे.

(४) समर्थ-भक्त श्री. केशव भिकाजी ढवळे यांनीं 'बालधर्म शिक्षण माला' सुरू केली आहे. तींतील १ लें पुस्तक 'राष्ट्र-गुरु श्रीसमर्थ रामदास' हें आहे. सदरहू पुस्तक श्री. न. प. महाजन, शिक्षक, इंदापूर, यांनीं लिहिलें आहे. समर्थ-चरित्रांतील ठळक गोष्टी मनोरंजक भाषेंत दिल्या आहेत.

**राजवाडेकृत 'रामदास.'** समर्थांनीं आपल्या संप्रदायाचीं वीस लक्षणें दिलीं आहेत, त्यांत सर्वांत मुख्य लक्षण 'राम उपासना' हें शेवटीं दिलें आहे. त्याप्रमाणें अर्वाचीन समर्थ-चरित्र-साधनांमध्यें अत्यंत महत्त्वाचें जें चरित्र-साधन—कै. इतिहासाचार्य राजवाडे यांचा 'रामदास' हा टीकात्मक सर्वोत्कृष्ट लेख—याचा उलख आम्हीं शेवटीं करतों. कै. राजवाडे यांच्या 'रामदास' या छोट्या ग्रंथानंतरच समर्थ वाङ्मयभक्त श्री. शंकरराव देव यांना समर्थ-संशोधनाची स्फूर्ति झाली. कै. राजवाडे यांनीं आपल्या पुस्तकांत दासबोधाचें ऐतिहासिकदृष्ट्या अत्यंत मार्मिक रीतीनें विवेचन केलें आहे. समर्थ-वाङ्मयाचें रहस्य व समर्थ-कार्याचें महत्त्व ज्यांना समजून घेण्याचें असेल त्यांनीं कै. राजवाडे यांचा 'रामदास' मननपूर्वक वाचावा अशी आमची त्यांना विनंति आहे.

---

# भाग दुसरा

## (अ) पूर्वज

**शुद्धबीजापोटीं। फळें रसाळ गोमटीं ॥**

—श्रीतुकाराममहाराज

समर्थांचे शिष्य तंजावरमठाधिपति भीमस्वामी शहापूरकर यांनीं समर्थांचें जें चरित्र लिहिलें आहे, त्यांत व नंतर त्यांच्या प्रशिष्यांनीं जीं समर्थचरित्रें लिहिलीं आहेत, त्यांत समर्थांच्या प्राचीन पूर्वजांची माहिती दिलेली नाहीं. सांप्रदायिकांनीं व भक्तांनीं अभंगबद्ध अगर ओंवीबद्ध लिहिलेल्या समर्थचरित्रांत ही ती माहिती दिलेली नाहीं. समर्थांच्या पूर्वजांची सविस्तर माहिती दिलेलें पहिलें चरित्र हनुमंतस्वामींची बखर होय. या बखरीनंतर पुढें लिहिलेल्या समर्थचरित्रांपैकीं आत्मारामबुवा चरेगांवकर यांच्या समर्थचरित्रांतच फक्त समर्थांच्या पूर्वजांची त्रोटक माहिती दिली आहे. अर्थात् ती माहिती हनुमंतस्वामींच्या बखरींतूनच घेतली असली पाहिजे.

हनुमंतस्वामी हे समर्थांनीं स्थापन केलेल्या चाफळ येथील मठाचे परंपरेनें शके १७०५ सालीं अधिपति झाले व शके १७४० पर्यंत ते चाफळमठाधिपति होते. तेव्हां त्यांना समर्थांचे प्राचीन पूर्वज कृष्णाजीपंत ठोसर हे शके ८८४ सालीं बेदरप्रांताहून गोदातीरीं बीड प्रांतांत आल्यापासून समर्थजन्मापर्यंत सर्व पूर्वजांची वंशावळ चाफळमठांतील कागदपत्रांवरून समजणें साहजिक आहे. हनुमंतस्वामींच्या बखरींतील दंतकथा, आख्यायिका अगर अद्भुत गोष्टी यांविषयीं लिहितांना कांहीं ठिकाणीं अतिशयोक्तीचें वर्णन केलें असलें, तरी समर्थांच्या पूर्वजांची वंशावळ देण्यांत व पूर्वजांसंबंधीं इतर सामान्य माहिती सांगण्यांत अतिशयोक्तीचें वर्णन असण्याचा मुळींच संभव नाहीं. म्हणून ह. स्वा.च्या बखरींतील समर्थांच्या पूर्वजांची हकीकत विश्वसनीय मानली पाहिजे.

समर्थांचे प्राचीन पूर्वज औरंगाबादेकडे बेदर प्रांतीं राहत असत. नवव्या शतकाच्या अखेरीस राज्यक्रांति व दुष्काळ यांच्या त्रासामुळें बेदर प्रांतांतील कांहीं कुटुंबें अन्य प्रांतांत राहण्यास जाऊं लागलीं. तेव्हां त्यांबरोबर समर्थांचे पूर्वज कृष्णाजीपंत ठोसर हे शके ८८४ दुंदभि नाम संवत्सरीं गोदातीरीं मौजे हिंवरे तर्फ प्रांत तालुके खेड, बीड येथें कुटुंबासुद्धां येऊन राहिले. कृष्णाजीपंत हे ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण, गोत्र जमदग्नि, सूत्र आश्वलायन. कृष्णाजीपंतांना एकंदर पांच पुत्र होते. त्यांचीं ४ नांवें (१) कचोपंत, (२) राघोपंत, (३) हरिपंत, (४) आत्मारामपंत, व (५) दशरथपंत. पैकीं पहिल्या चार पुत्रांचा जन्म बेदर प्रांतीं झाला होता. पांचवे पुत्र दशरथपंत यांचा जन्म कृष्णाजीपंत कुटुंबासह गोदातीरीं आल्यावर झाला. पहिल्या चार पुत्रांनीं राक्षसभुवन, हिंवरे इत्यादि ४८ गांवीं वसाहत केली व तेथील

कुलकर्णीपणाची व ज्योतिषपणाची वृत्ति संपादन केली; व प्रत्येकीं बारा गांवांप्रमाणें ४८ गांवें चवघांत वाटून घेतलीं. त्या वेळीं दशरथपंत लहान होते. ते प्रौढ झाल्यावर त्यांचे चवघे बंधु त्यांना ४८ गांवांत हिस्सा देत होते; पण त्यांनीं तो घेतला नाहीं. वडिलांनीं संपादन केलेली मिळकत आपण आयतगव्हूप्रमाणें उपभोगणें हा आपला धर्म नव्हे असें त्यांना वाटलें. ६००।६२५ वर्षांनंतर त्यांच्या वंशांत उत्पन्न झालेल्या महापुरुषाच्या ग्रंथराज दासबोधांतील तत्त्वाचें अनुकरण दशरथपंतांनीं केलें. समर्थ दासबोधांत 'उत्तम लक्षण' नाम समासांत म्हणतात:—"आसुदें अन्न सेवूं नये। वडिलांचें ही ॥ (दशक २, समास ३-२६)" आसुदें=आयतें, आपल्या कष्टानें न मिळविलेलें. नवीन स्वतंत्र वृत्ति संपादन करण्याच्या प्रयत्नास दशरथपंत लागले व त्यांनीं जांबेसुद्धां बारा गांवांची कुलकर्णी व ज्योतिषपणाची वृत्ति संपादन केली. बारा गांवांचीं नांवें:-(१) कसबे जांब, (२) मौजे पोरवरी, (३) मौजे हतगांव, (४) मौजे निंब, (५) मौजे साकळगांव, (६) मौजे सुरमेगांव, (७) मौजे आरगड गव्हान, (८) मौजे पाटोदें, (९) मौजे सोडगांव, (१०) मौजे अंतरवेल, (११) मौजे आसनगांव व (१२) मौजे विरगव्हाण. कसबे जांब व मौजे आसनगांव हीं दोन्हीं गांवें दशरथपंतांनीं स्वतः मिळविलेल्या गांवांपैकींच आहेत हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें. कारण पुढें ६००।६२५ वर्षांनंतर जांबगांवचा वर व आसनगांवची वधू यांचा वाङ्निश्चय होऊन 'सावधान' म्हटल्यावर वरानें लग्नमंडपांतून कसें पलायन केलें, हा कथाभाग वाचकांच्या दृष्टीपुढें येणार आहे. असो. कसबे जांब हें गांव दशरथपंतांनीं नवीन वसाविलें. हिंवरे गांवापासून तीन कोसांवर वडगांव या नांवाच्या गांवची पांढर पड पडलेली होती. तेथें बहुत काळ वसाहत नव्हती. त्या ठिकाणीं फक्त कांहीं गवळी राहत होते. तेथें दशरथपंतांनीं लखमाजी गवळी याच्या मदतीनें नवीन गांव वसाविला व त्यास जांब असें नांव दिलें. लखमाजी गवळी यास त्यांनीं पाटीलकी दिली व आपण कुलकर्णी व ज्योतिषपणाची वृत्ति मिळविली, व शके ९१० सर्वधारी नाम संवत्सरीं जांब येथें येऊन राहिले. दशरथपंतांस सहा पुत्र होते. त्यांनीं प्रत्येकीं दोनप्रमाणें गांवें वांटून घेतलीं. दशरथपंतांचे वडील पुत्र रामाजीपंत, यांच्या वांटणीस जांबगांव आलें व ते तेथें येऊन राहिले. आजे कृष्णाजीपंत व वडील दशरथपंत यांप्रमाणें रामाजीपंत रामोपासक व वैराग्यशील होते. कृष्णाजीपंतांपासून समर्थांपर्यंत वंशावळ खालीं लिहिल्याप्रमाणें आहे:—

१ (मूळ पुरुष) कृष्णाजीपंत
२ दशरथपंत
३ रामाजीपंत
४ हरिपंत
५ निराजीपंत (ऊर्फ निरंजन)
६ शिवाजीपंत
७ विष्णुपंत
८ वामणाजीपंत (ऊर्फ ब्रह्मजी)

९ गणेशपंत
१० धोंडोपंत
११ आत्मारामपंत (ऊर्फ अलक्षपंत)
१२ गुंडोपंत
१३ निराजीपंत
१४ आत्मारामपंत
१५ शिवाजीपंत
१६ विष्णुपंत
१७ केशवपंत
१८ रामाजीपंत
१९ भवानजीपंत
२० सूर्याजीपंत
२१ त्रिंबकपंत
२२ सूर्याजीपंत

गंगाधर ऊर्फ श्रेष्ठ ऊर्फ रामीरामदास — नारायण ऊर्फ समर्थ ऊर्फ रामदास

यांपैकीं बारावे पुरुष गुंडोपंत यांनीं दक्षिण प्रांतांत मुसलमानी राज्य सुरू झाल्यावर आंबडप्रांतीं आणखी पांच गांवांची कुलकर्णीपणाची वृत्ति मिळविली व चवदावे पुरुष आत्मारामपंत यांनीं पांच गांवांची वृत्ति मिळवून आपल्या उपाध्यास दिली. आत्मारामपंत, निराजीपंत व बामगाजीपंत हे तिघे ब्रह्मनिष्ठ ब्रह्मवेत्ते होते, अशी त्यांची ख्याति आहे.

---

## (आ) वरदान

॥ प्रीतास्मि ते पुत्र वरं वृणीष्व ॥

—रघुवंश, सर्ग २

मूळ पुरुष कृष्णाजीपंत ठोसर यांच्यापासून समर्थांचे वडील सूर्याजीपंत हे बाविसावे पुरुष. सूर्याजीपंतांचा जन्म शके १४९० सालीं जांबगांवीं झाला. (बा.) म्हणजे कृष्णाजीपंत ठोसर आंबडप्रांतीं आल्यापासून बरोबर ६०६ वर्षांनीं सूर्याजीपंतांचा जन्म झाला. कृष्णाजीपंत व सूर्याजीपंत यांच्यामध्यें वीस पिढ्या झाल्या; म्हणजे दर पिढी साधारणपणें तीस वर्षांची पडते. पिढीचें हेंच अनुमान साधारणपणें धरण्यांत येतें. त्यावरून ही ह. स्वा.च्या बखरींत दिलेली समर्थांची वंशावळ विश्वसनीय ठरते.

सूर्याजीपंतांचे वडील लहानपणींच वारले होते. तरी त्यांचें पूर्वपद्धतीप्रमाणें लहानपणीं शिक्षण झालें होतें असें दिसतें. बारा वर्षांपासून ते सूर्याची आराधना

करीत असत. ते प्रातःस्नान व संध्या अर्घ्यप्रदान करून १२०० नमस्कार नित्य नेमानें घालीत असत, अशी सांप्रदायिकांमध्यें परंपरागत आख्यायिका आहे; परंतु संतविजयांत भक्त हजारच नमस्कार घालीत असा स्पष्ट उल्लेख आहे. ते परम तपस्वी, भागवत-धर्मी, सत्कर्मी निरंतर दक्ष असत. ते सूर्योपासक असून श्रीरामाची ही उपासना करीत असत. सकाळपासून संध्याकाळपर्यंत त्यांचा काळ जपध्यानपूजादि कार्यांत जात असे. उदरनिर्वाहाच्या वृत्तीचें काम ते रात्रीं करीत. त्यांना गुरुपरंपरा नव्हती, परंतु ते दरवर्षी रामनवमीचा उत्सव करीत व जनक राजाप्रमाणें निष्काम वृत्तीनें प्रपंच करीत. "परी रामनवमी उत्सव करावा । प्रपंच पहावा जनका ऐसा ॥ (भक्तलीलामृत, १–१०)." सुदैवानें त्यांना त्यांच्या वृत्तीला सर्वतोपरी अनुरूप अशी सहचारिणी मिळाली होती. सूर्याजीपंतांच्या पत्नीचें नांव रेणूकाबाई ऊर्फ राणूबाई. त्या फार सुशील, धर्माचरणतत्पर, पतिव्रताधर्मदक्ष व वैराग्यशील होत्या. या सत्त्व-शील पतिपत्नींचें महिपती वर्णन करितात:—"आतां ऐका देउनि चित्त । गंगा-तीरीं पंचक्रोशींत ॥ जांब क्षेत्र असे निश्चित । जगविख्यात जाणती ॥ १९ ॥ तेथील कुलकर्णी भगवद्भक्त । नामाभिधान सूर्याजीपंत ॥ राणूबाई स्त्री निश्चित । भ्रतार-आज्ञेंत सर्वदा ॥ १९ ॥ गृहस्थाश्रमी असोनि जाण । परमार्थसाधनीं त्याचें मन । वाचेसी नेम केला त्यानें । असत्य वचन न बोले ॥ २० ॥ मध्यान्हसमयासी आला कोणी । तरी तो विष्णुसमान मानी ॥ अधिकारपरत्वें पूजोनी । अन्नदानीं उदार ॥ २१ ॥ पुराण आणि हरिकीर्तन । दोघांसि आवडे चित्तांतून । काया वाचा आणि मनांतून । सूर्यउपासना करीतसे ॥ २३ ॥ प्रातःकाळीं करोनि स्नान । वासरमणीसी अर्घ्यदान । आरक्त सुमनें रक्तचंदन । यथाविधीनें मंत्रोक्त ॥ २४ ॥ इतकें करून साष्टांग घालीत सहस्र नमस्कार । तेणें तेजाची शक्ति फार । यास्तव अंतर पडेना ॥ २६ ॥ बारा सहस्र जप नित्य । करीत असे एकाग्र चित्त ॥ बारा वर्षें लोटतां सत्य । साक्षात् आदित्य भेटला ॥" पूर्वीं सूर्यवंशोत्पन्न दिलीप राजा व सुदक्षिणा यांनीं पुत्रप्राप्ती-करितां नंदिनी कामधेनूची फक्त २१ दिवसच सेवा केली, असें रघुवंशांत कालि-दासानें वर्णन केलें आहे (सर्ग २); परंतु सूर्याजीपंत व राणूबाई यांनीं बारा वर्षे भक्ति-भावानें पुत्रप्राप्तीकरितां सूर्याची आराधना केली. उभयतां पतिपत्नी वर्णाश्रमधर्मा-प्रमाणें आनंदानें कालक्रमणा करीत होतीं. सूर्याजीपंतांस तिसावें वर्ष लागलें तरी संतती झाली नाहीं. अखेर शके १५२५ शोभकृन्नाम संवत्सरीं माघ शुद्ध सप्तमी दिवशीं उभयतां पतिपत्नींची तपश्चर्या सफल झाली. त्या दिवशीं मध्यान्हकाळीं श्रीसूर्यनारायणांनीं ब्राह्मणरूपानें सूर्याजीपंतांस दर्शन दिलें व 'तुमच्या तपश्चर्येनें मी संतुष्ट झालों, वर मागा' असें म्हणाले. मला नाशवंत वर नको, अक्षय्यपद प्राप्त व्हावें एवढीच इच्छा आहे, असें सूर्याजीपंत म्हणाले. नंतर राणूबाईस बोलावून वर मागण्यास सांगितलें. त्यांनीं ही पतीप्रमाणेंच नाशवंत वर नको असें सांगितलें,

परंतु कृपावंत होऊन वर देणार तर परम भागवत असा एक पुत्र व्हावा अशी इच्छा त्यांनीं प्रगट केली. तेव्हां सूर्यनारायणरूपी ब्राह्मणानें उभयतां पतिपत्नींच्या मस्तकीं हात ठेवून 'तुम्हांस दोन पुत्र होतील' असा वर दिला. 'एक पुत्र मदंशेंकरून होईल, तो वंशधर होईल व गोदातीरीं राहून जगदुद्धार करील; दुसरा पुत्र मारुती-अंशेंकरून होईल व तो कृष्णातीरीं राहून जगदुद्धार करील; व पुढच्या वर्षी तुम्हांस रामनवमीच्या उत्सवांत श्रीरामदर्शन होईल,' असें सांगून ब्राह्मणरूपधारी श्रीसूर्यनारायण निघून गेले.

शके १५२६ सालीं क्रोधीनाम संवत्सरीं जांब येथें दरसालप्रमाणें श्रीरामनवमीचा उत्सव सुरू झाला. अष्टमीचे दिवशीं रात्रीं नित्याप्रमाणें सूर्याजीपंत कीर्तन ऐकत असतां धोंगडी पांघरून वेसकराच्या पोषाखांत एक मनुष्य सूर्याजीपंतांचे घरीं आला व मारुतीच्या देवालयांत जरुरीचें काम आहे, लवकर चला म्हणाला. ही कुलकर्णीपणाची तावेदारीची वृत्ति नको असें सूर्याजीपंतांस वाटलें. दौत, लेखणी व दप्तर हातांत घेऊन देवळांत कामगाराच्या स्वाधीन करण्याच्या हेतूनें सूर्याजीपंत मारुतीच्या देवळाकडे निघाले. नेहमींचे मोकाशी—कामगार दिसले नाहींत म्हणून प्रथम सूर्याजीपंत देवालयाचे आंत गेले व त्यांनीं मारुतीस नेहमींप्रमाणें साष्टांग नमस्कार घातला. सूर्याजीपंत उठतात, तों देवालय दिव्य तेजानें व्याप्त झालेलें त्यांना दिसलें व लागलीच त्यांना मूर्च्छा येऊन ते पडले. नंतर श्रीरामलक्ष्मण पंतांजवळ आले व त्या उभयतांनीं पंतांस उठविलें. पंत उठल्यावर त्यांना श्रीराम, सीता, लक्ष्मण व मारुति अशा चार मूर्ति दिसल्या. सूर्याजीपंतांनीं सर्वांना साष्टांग नमस्कार घातला. श्रीरामांनीं सूर्याजीपंतांच्या मस्तकीं हात ठेवून 'श्रीराम जयराम जयजयराम' हा त्रयोदशाक्षरी मंत्र सांगून अनुग्रह दिला; व श्रीसूर्यनारायणांनीं दिलेल्या वराप्रमाणें 'तुम्हांस लवकरच भक्ति-ज्ञान-वैराग्यसंपन्न दोन पुत्र होतील,' असें सांगितलें. नंतर ताम्रधातूच्या पट्टाभिषिक्त श्रीराम, सीता, लक्ष्मण व मारुति अशा चार मूर्ति नित्य पूजेकरितां दिल्या व श्रीराम अंतर्धान पावले.

सदरहू कथानकास आधार समर्थप्रताप, ह. स्वा.ची बखर इत्यादि समर्थचरित्रांचा आहेच; परंतु शिवाय समर्थकृत एका अभंगाचा ही आहे. तपोनिष्ठ, सत्वशील साधुसंतांना तपश्चर्या करीत असतां अगर स्वप्नांत साक्षात्कार झाल्याचें श्रीतुकाराम, रामदासप्रभृति साधुसंत आपल्या अभंगांत गुरुपरंपरा देतांना सांगतात तें विश्वसनीय मानलें पाहिजे. साक्षात्कारांचा अविश्वसनीय अद्भुत गोष्टींत समावेश करतां येणार नाहीं, असें आम्हांस वाटतें. तपःसामर्थ्यानें एक प्रकारची विशिष्ट सात्त्विक मनोवृत्ति साधुसंतांना प्राप्त होते व त्या मनःस्थितीचा अनुभव सहज लीलेनें ते काव्यांत उद्गारतात; तेव्हां त्यांचा तो अनुभव प्रापंचिक मनुष्यास कल्पना करतां येणें शक्य नाहीं म्हणून अविश्वसनीय मानतां येणार नाहीं. असे

साक्षात्कार महाराष्ट्रांतील साधुसंतांनाच नव्हे, तर इतर देशांतील साधुसंतांना ही झाले आहेत. अशा साधुसंतांच्या साक्षात्कारांची गणना अविश्वसनीय अद्भुत गोष्टींमध्यें करतां येणार नाहीं, एवढेंच वाचकांना आम्हांस सांगावयाचें आहे. कांहीं बखरींतून साक्षात्कारांचें ही वर्णन अतिशयोक्तिपर असतें ही गोष्ट वाचकांनीं ध्यानांत ठेवावी व अतिशयोक्तीचें वरील कवच काढून आंतील साक्षात्काराकडे पहावें अशी आमची त्यांना विनंति आहे.

तीर्थयात्रा संपल्यावर शके १५६६ सालीं समर्थ कृष्णातीरीं आले. माहुली येथें असतांना त्यांना भेटण्यास तत्कालीन साधुसंत येत असत. एकदां तुकाराम-महाराज समर्थांच्या भेटीस आले होते. त्या वेळीं उभयतांनीं एकमेकांस अभंग-रूपानें आपली गुरुपरंपरा सांगितली. त्या वेळीं समर्थांनीं तुकाराममहाराजांना जें आपलें त्रोटक आत्मवृत्त सांगितलें त्यांत वर दिलेल्या सूर्याजीपंतांस झालेल्या अनु-ग्रहाचा उल्लेख केला आहे म्हणून तो समर्थांचा आत्मचरित्रपर अभंग याच भागांत खालीं देतों:—

"नमो अधिष्ठाता विष्णु मुख्य साधु। तेथूनियां बोधु विधीलागी ॥ १ ॥ विधीपासुनियां ज्ञान विधि-सुता। तेंचि ज्ञान प्राप्त वसिष्ठासी ॥ २ ॥ वसिष्ठें उप-देश केला रामचंद्रा। तोचि महारुद्रा हनुमंता ॥ ३ ॥ हनुमंत कलीमाजीं चिरंजिव। झाले सर्व देव बौद्धरूप ॥ ४ ॥ बौद्ध नारायण होउनि बैसला। उपाव बोलिला व्यासमुनि ॥ ५ ॥ व्यासमुनि बोले भाविष्य पुराण। जग उद्धरणें कलीमाजीं ॥ ६ ॥ कलीमाजीं गोदातीरीं पुण्यक्षेत्र। तेथें वातपुत्र अवतरे ॥ ७ ॥ अवतरे अभिधानी रामदास। कृष्णातीरीं वास जगदुद्धारा ॥ ८ ॥ जगदुद्धारासाठीं श्रीरामा सांकडें। केलें वाडें कोडें भाक्तिपंथें ॥ ९ ॥ भाक्तिपंथ केला मोठा श्रीरामानें। जंबू अभिधानें ग्राम तेथें ॥१०॥ तेथें ब्रह्मनिष्ठ अधिष्ठाता पूर्ण। सूर्यनामा जाण द्विजवर्य ॥११॥ द्विजवर्य, सूर्य जैसा तपोधन। अद्भुत विंदान[1] झालें तेथें ॥ १२ ॥ झाली राम-नवमी मध्य अष्टमीसी। अर्धरात्रीं त्यासी दूत आले ॥ १३ ॥ दूत आले पुढें घालोनी चालीले। महाद्वारा आले भीम[2] जेथें ॥ १४ ॥ भीमदेवालयीं नेउनी तयासी। तेथें उभयतांसी देखियेले ॥ १५ ॥ देखियेले राजपुत्र सूर्यवंशी। झापड नेत्रांसी पडे तेव्हां ॥ १६ ॥ पडे तेव्हां जैसा दंडवत भूमी। मग अंतर्यामीं बोलाविलें ॥ १७ ॥ बोलवुनी माथां ठेवी सव्यपाणी। मंत्र सांगे कर्णीं रामनाम ॥ १८ ॥ नाम सांगुनिया ताम्रमूर्ति रम्य। पट्टाभिश्रीराम दिधला तया ॥ १९ ॥ तया दिला वर तुज पुत्र होतील। ध्वज उभारतील रामदास्यें ॥ २० ॥ रामदास्य झालें धन्य वंशोद्धार। बोलोनी सत्वर गैब[3] झाले ॥ २१ ॥ झाला रामनवमी महोत्सव थोर।

---

१ गोष्ट.   २ मारुति.   ३ गुप्त.

मध्यान्हीं सत्वर जन्म झाला ॥ २२ ॥ जन्म झाला मला देव वंशा आले । उपासना चाले राघवाची ॥ २३ ॥ राघवाची भक्ति सुखाची विश्रांति । पितयाची शांति झाली पुढें ॥ २४ ॥ पुढें ज्येष्ठ बंधु न सांगे चि कांहीं । सुखें देवालयीं निद्रा केली ॥ २५ ॥ निद्रा केली तेथें श्रीरामें उठवुनी । तोचि मंत्र कानीं सांगीतला ॥ २६ ॥ सांगीतला बोध रामी रामदासा । गुरूच्या वंशा निरोपीलें ॥ २७ ॥ ”

—बालबोध समर्थ-वाङ्मयमाला, पुष्प ३रें, समर्थांचें आत्मचरित्र, पृष्ठें ७२-७३

वरील उतारा मोठा आहे. परंतु ह. स्वा.वखरींतील सूर्याजीपंतांच्या अनुग्रहास खुद्द समर्थांची पुष्टि आहे हें दाखविण्याकरितां तो दिला आहे.

श्रीरामदर्शन होऊन अनुग्रह झाल्याबद्दल सूर्याजीपंतांना फार आनंद झाला. ते घरीं आले व सविस्तर हकीकत राणूबाईस सांगितली. प्रत्यक्ष दर्शन स्वतःस झालें नाहीं म्हणून त्यांना वाईट वाटलें. सूर्याजीपंतांस दिलेल्या मूर्तींचें दर्शन त्यांनीं घेतलें. त्या मूर्ती सूर्याजीपंतांनीं देवघरांत ठेवल्या, व नित्य परम भक्तीनें उभयतां त्यांची पूजा करूं लागले. सूर्याजीपंतांनीं इतउत्तर नोकरीची तावेदारी नको म्हणून दप्तर व कलमदान हीं देवापाशीं ठेवलें. तें कलमदान अद्यापि सज्जनगडावर आहे. पुढें थोड्याच दिवसांनीं राणूबाईंचे उदरीं गर्भ राहिला. चरित्रकारांनीं राणूबाईच्या या वेळच्या डोहाळ्यांचें वर्णन दिलेलें नाहीं. समर्थ मारुतीचे अवतार होते, तर श्रेष्ठ श्रीसूर्यनारायणाचे अवतार होते. तेव्हां श्रेष्ठ राणूबाईच्या उदरीं असतांना त्यांच्या भाविकार्यसूचकत्वाचे डोहाळे राणूबाईस होणें साहजिक आहे; परंतु तसें वर्णन कोणत्या ही समर्थचरित्रांत आढळून येत नाहीं. मनुष्य भविष्यकालीं थोर होणार हें तो गर्भावस्थेंत असतांना नव्हे तर जन्मास आल्यावर लहानपणीं ही कांहीं वर्षें सांगणें कठिण असतें. थोर मनुष्यांचे चरित्रकार त्यांच्या प्रौढ कालांतील पराक्रमावरून ते गर्भावस्थेंत असतांना त्यांच्या मातांना गर्भारपणीं डोहाळे झाले असतील अशा कल्पनेनें अनुमानानें कांहीं तरी वर्णन करितात अगर परंपरेनें मिळालेली माहिती अतिशयोक्ती करून, पराचा कावळा करून लिहीत असावेत असें आम्हांस वाटतें. चरित्रकारांचा मोठेपणा वर्णन करण्याच्या सद्भावनेनें चरित्रकार चरित्रनायकांच्या मातांच्या गर्भकालच्या डोहाळ्यांचें रसभरित वर्णन करितात हें आम्हांस मान्य आहे. परंतु जगांतील पुष्कळ थोर पुरुष गरीब आईबापांच्या उदरींच जन्मास आलेले असतात, तेव्हां मातोश्रींचें डोहाळे लिहून ठेवण्याची गोष्ट शक्य दिसत नाहीं; एवढेंच नव्हे तर पुष्कळ प्रसंगीं तशी तोंडी माहिती मिळणें ही कठीण असतें, असें आमच्या अल्प समजुतीस वाटतें. राजे व वडे श्रीमंत लोक यांच्या गर्भवती स्त्रियांचे डोहाळे लिहून ठेवणें शक्य मानतां येईल. दशरथ राजाला मोठ्या नवसानें पुत्र झाले, तेव्हां राजपुरुषांनीं कौसल्येचे डोहाळे

लिहून ठेवणें व अगर राणीचे डोहाळे म्हणून चारचौघांत प्रसिद्ध झाल्यावर परंपरेनें भावी इतिहासकारास समजणें शक्य आहे; परंतु सामान्य कुलांतील मुलें पुढें थोर पराक्रमी झाल्यावर त्यांच्या आईच्या डोहाळ्यांची सविस्तर माहिती कळणें अशक्य नसलें तरी फार कठिण आहे असें आम्हांस वाटतें.

नऊ महिने पूर्ण झाल्यावर शके १५२७ सालीं विश्वावसु नाम संवत्सरीं मार्गशीर्ष शुद्ध त्रयोदशीस राणूबाई सुखप्रसूत होऊन त्यांना पुत्र झाला. पुत्रप्राप्तीसाठीं प्रथम गंगेस नवस केला होता, म्हणून ज्येष्ठ पुत्राचें नांव गंगाधर असें ठेविलें. पुढें यांनाच श्रेष्ठ व रामीरामदास म्हणूं लागले. श्रेष्ठांचें अल्प चरित्र या भागांतच देतों, कारण पुढें एका स्वतंत्र भागांत आम्हीं समर्थांच्या शिष्यांचीं अल्प चरित्रें देणार आहों. श्रेष्ठ समर्थांचे शिष्य नसल्यामुळें त्या भागांत त्यांचें चरित्र देणें उचित नाहीं. तेव्हां तें याच भागांत देण्याचें आम्हीं योजिलें आहे.

गंगाधर ऊर्फ श्रेष्ठांची मुंज वयाचे पांचवे वर्षी म्हणजे शके १५३२ सालीं झाली. त्यांचा विवाह सातव्या वर्षी म्हणजे शके १५३४ सालीं झाला. आंबेडकर देशमुख यांच्या कन्येशीं त्यांचा विवाह झाला. श्रेष्ठांच्या पत्नीचें नांव पार्वतीबाई होतें. हा विवाह सूर्याजीपंत हयात असतांना झाला व तो मोठ्या थाटानें झाला. सौभाग्यवती राणूबाईंना ' सुनमुख ' पाहण्याचा हा पहिला व शेवटचा प्रसंग होय. मारुतीच्या देवालयांत ११ दिवस मारुतिकवचाचें पठण केल्यानंतर श्रेष्ठांस मारुतिकृपेनें श्रीरामचंद्राचा अनुग्रह शके १५३६ आनंदनाम संवत्सरीं फाल्गुन शुद्ध एकादशी दिवशीं झाला. सूर्याजीपंत नंतर फार दिवस राहिले नाहींत. शके १५३७ सालीं राक्षसनाम संवत्सरीं मार्गशीर्ष शुद्ध नवमी दिवशीं त्यांनीं इहलोकीची यात्रा संपविली. त्या वेळीं श्रेष्ठांना दहा वर्षें झालीं होतीं. सूर्याजीपंतांनंतर कुटुंबाची सर्व व्यवस्था श्रेष्ठांवर पडली व ती त्यांनीं राणूबाईच्या संमतीनें पोक्तपणानें चालविली. श्रेष्ठांचे धाकटे बंधु समर्थ हे फार हूड असल्यामुळें श्रेष्ठांना घरप्रपंचांत त्यांचा उपयोग झाला नाहीं. समर्थांचीं अनेक चरित्रें त्यांच्या शिष्यप्रशिष्यांनीं लिहिलेलीं आहेत. परंतु त्यांत जांबेतून समर्थ लग्नमंडपांतून शके १५४२ सालीं पळून गेल्यानंतर शके १५९९ सालीं श्रेष्ठांचा अंत होईपर्यंत श्रेष्ठांविषयीं कांहीं माहिती दिलेली नाहीं. श्रेष्ठ गृहस्थाश्रमी होते, तरी सत्त्वशील व सदाचारसंपन्न होते. समर्थांनीं दोन पत्रें श्रेष्ठांना लिहिलेलीं ह. स्वा. बखरींत दिलीं आहेत, त्यांवरून श्रेष्ठांच्या योग्यतेची कल्पना करितां येते. तीं पत्रें ओंवीबद्ध असून बरींच लांब आहेत. समर्थ श्रेष्ठांची योग्यता किती थोर समजत, हें वाचकांना कळण्याकरितां दोन्ही पत्रांतील फक्त तीन तीन ओंव्या देतों. पत्र पहिलें:—"सकळ तीर्थांचें माहेर । सकळ गुणांचें भांडार ।। सकळ विद्येचा सागर । स्वरूप तुमचें ।। १ ।। तूं धीरपणें मेरू । तूं उदारपणें जलधरू । तूं गंभीरपणें

सागरू । पीयुषाचा[1] ॥ २ ॥ तूं पवित्रपणें वैश्वानरू । तूं समर्थपणें ईश्वरू ॥ तूं प्रतापाचा दिनकरू । धगधगायमान ॥ ३ ॥" पत्र दुसरें:—" विमल ब्रह्मपरायण । सकल भक्तिसंरक्षण ॥ विशेष वैराग्यलक्षण । तुमचे ठायीं ॥ १ ॥ नसे कामनेचा लेश । जयंत्यापर्वांचा हव्यास ॥ अंतरीं आवडे विशेष । हरिकथानिरूपण ॥ २ ॥ दक्षता आणि चातुर्यता । व्युत्पन्नता आणि लीनता ॥ उत्तम गुण सर्वज्ञता । तुमचे ठायीं ॥ ३ ॥"

वरील दोन्ही पत्रांमध्यें हरिकथानिरूपण, वैराग्य, चातुर्यादि श्रेष्ठांच्या अनेक सद्गुणांचा उल्लेख समर्थांनीं केला आहे. परंतु राजकारणाचा मुळींच उल्लेख नाहीं. तेव्हां श्रेष्ठ हे केवळ भक्तिमार्गी संत होते. समर्थांप्रमाणें श्रेष्ठांनीं भरतखंडांत तीर्थयात्रा केली नव्हती; म्हणून त्यांना समर्थांप्रमाणें आर्यावर्तांतील हीन दीन स्थितीची कल्पना नव्हती. त्यामुळें राजकारणाकडे त्यांची प्रवृत्ति झाली नसावी. कदाचित् तुकाराममहाराजांप्रमाणें स्वभावतःच त्यांचा कल उत्कटपणें भक्तिमार्गाकडे असावा.

श्रेष्ठ केवळ सदाचारी व भक्तिमार्गी संतच नव्हते, ते ग्रंथकार ही होते. त्यांची कविता प्रसिद्ध आहे. 'भक्तिरहस्य' व 'सुगमोपाय' हे श्रेष्ठांचे ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत. भक्तिरहस्याचीं ७७ प्रकरणें आहेत. या ग्रंथांत नामस्मरणाचा महिमा उत्कटतेनें वर्णिला आहे. " तेणें केलीं सर्व ही दानें । तेणेंचि केलीं तीर्थाटणें । तेणें केलीं सर्व ही साधनें । हरिहरनामें स्मरे जो ॥ ७-४९ ॥ तेणेंचि केलें वेदाध्यन । तेणेंचि केलें सत्‌शास्त्रव्याख्यान ॥ तेणें केलें स्वकर्मानुष्ठान । हरिहरनामें जो स्मरे ॥ ७-५० ॥ श्रीराम जयराम जयजयराम । अखंड स्मरे जो सप्रेम ॥ तो स्वयेंचि असे पुरुषोत्तम । म्हणोनि राम न विसरावा ॥ ११-८८ ॥" नामस्मरणाचें माहात्म्य अनेक ठिकाणीं श्रेष्ठांनीं वर्णिलें आहे. कांहीं ठिकाणीं तत्कालीन धार्मिक समाजस्थितीचें वर्णन ही केलें आहे:—" कलियुग महाथोर । सर्व दोषांचा आकार ॥ वर्ण चतुष्टय नारी नर । सर्व धर्मपराङ्मुख ॥ ७३-३१ ॥ परान्न परद्रव्य परस्त्री लोलुप । द्विज होती, कैंचा पापभय-संकल्प ॥ कैंचें तीर्थ व्रत दान जप उपहास करिती, करी त्यांचें ॥ ७३-४६ ॥ निरंतर अवर्षण । क्षुधाभयें पीडे जन ॥ तस्करभयें कंपायमान । नीतिसंरक्षण तें कैंचें ॥ ७३-४८ ॥" समाजस्थितीचें असें यथार्थ वर्णन श्रेष्ठांनीं केलें आहे. परंतु त्यांच्या ग्रंथांत राजकारणाचा उल्लेख आढळून येत नाहीं.

सुगमोपायाचीं एकंदर दहा प्रकरणें आहेत. हा ग्रंथ भक्तिरहस्यापेक्षां लहान आहे. यांतील १० प्रकरणांपैकीं सात प्रकरणांच्या शेवटीं म्हणजे ३ ते ९ प्रकरणांच्या शेवटीं रामीरामदासकृत "मनोजये अध्यात्मविद्या" असें म्हटलें आहे. त्यावरून

---

१. अमृताचा.

या ग्रंथांत अध्यात्मविचार व मनोजय यांचें विशेषतः विवेचन आहे, हें वाचकांना कळून येईल. पहिल्या प्रकरणाचें नांव ' मंगलाचरण ' व दुसऱ्याचें 'गुरुशिष्यलक्षण' असें आहे व शेवटल्या प्रकरणाचें 'अखंडैकभक्ति' असें नांव आहे. श्रेष्ठांची स्फुट कविता ही आहे. पण ती फार थोडी आहे.

जांब सोडून समर्थ पंचवटीस गेल्यावर श्रेष्ठांची व समर्थांची दोन वेळां गांठ पडली होती. समर्थ तीर्थयात्रेहून परत आल्यावर कृष्णातीरीं राहण्यास गेले, त्यापूर्वी मातोश्रीस भेटण्यासाठीं गेले त्या वेळीं व पुन्हा समर्थ जांबेस शके १५७४ सालीं रामनवमीच्या उत्सवास गेले होते त्या वेळीं. या दोन भेटींच्या वेळीं उभय बंधूंचा बराच विचारविनिमय झाला असला पाहिजे. तिसरी भेट राणूबाईच्या निधनकालीं शके १५७७ सालीं ज्येष्ठ शुद्ध तृतीयेस झाली. परंतु या वेळीं समर्थ उत्तरक्रिया झाल्यावर लागलीच परत कृष्णातीरीं आले. त्यानंतर दोघां बंधूंची गांठ पडल्याचा कोठें चरित्रांत उल्लेख नाहीं. श्रेष्ठांनीं समर्थांप्रमाणें मठस्थापना करून संप्रदायाचा प्रसार केल्याचा कोठें उल्लेख नाहीं. त्यांनीं कांहीं लोकांना अनुग्रह देऊन शिष्य केले होते. अशा शिष्यांपैकीं शेवली प्रांतांतील एक अधिकारी त्यांचे शिष्य होते. त्यांच्या अत्याग्रहावरून श्रेष्ठ त्यांचे घरीं लग्नसमारंभास गेले होते. परत येतांना वाटेंत दहिफळबुद्रुक येथें त्यांची प्रकृति बिघडून त्यांचा अंत झाला ( ह. स्वा. बखर ). दहिफळ जांब गांवापासून उत्तर दिशेस अदमासें वीस कोस आहे. अंतकालीं श्रेष्ठांचे ज्येष्ठ चिरंजीव रामचंद्रबुवा जवळच होते. शके १५९९ पिंगलनाम संवत्सरीं फाल्गुन कृष्ण त्रयोदशीसह चतुर्दशीदिवशीं दोन प्रहरीं श्रेष्ठांनीं 'हरहर' शब्द म्हणून समाधि घेतली. रामचंद्रबुवांनीं दहनविधि केला. लागलीच पत्र पाठवून श्रेष्ठांच्या पत्नी पार्वतीबाई व दुसरे पुत्र शामजी यांना बोलावून आणलें. पार्वतीबाईनीं पतीबरोबर जाण्याचा निश्चय केला व आमावस्येदिवशीं दीर्घ स्वरानें ' रामराम ' म्हणून देह विसर्जन केला. दहिफळ गांवाबाहेर एक मैलावर खंदारे पाटलाच्या शेतांत श्रेष्ठांचें समाधिवृंदावन आहे. समाधीस निजाम संस्थानांतून ८० रु.चें वर्षासन आहे. श्रेष्ठांच्या अंतकालीं रामचंद्रबुवांचें वय १६ वर्षांचें व शामजीबुवांचें १० वर्षांचें होतें. श्रेष्ठनिधनानंतर शके १६०० चैत्र शुद्ध त्रयोदशीस समर्थांनीं उद्धव गोसावी यांना पाठवून दोघां बंधूंना सज्जनगडास बोलावून आणलें. वैशाखमासीं दोघे बंधु आले. त्यांना वर्षभर ठेवून घेतलें. समर्थांनीं त्या दोघां बंधूंना केलेला दशश्लोकी उपदेश प्रसिद्ध आहे. त्यांतील पहिला श्लोकः—"बरें सत्य बोला यथातथ्य चाला । बहु मानिती लोक तेणें तुम्हांला ॥ धरा बुद्धि पोटीं विवेकी मुलें हो। बरा गूण तो अंतरामाजि राहो ॥१॥" श्रेष्ठपुत्रांना भेटण्यास शिवाजीमहाराज आले होते. समर्थांसह दोघां मुलांना घेऊन महाराज प्रतापगडीं गेले. कांहीं दिवस राहून मुलांसह समर्थ चाफळास आले.

नंतर शके १६०० माघ कृष्णप्रतिपदेस दोघां मुलांना उद्धव गोसावी यांचे बरोबर जांबेस परत पाठविलें. महाराजांनीं दोघां बंधूंना वस्त्रें आभरणें देऊन लवाजमा ही बरोबर दिला होता ( ह. स्वा. बखर ). दोघां मुलांस जातांना समर्थांनीं श्रेष्ठांप्रमाणें जांबेस श्रीरघुपतीची पूजा व आत्मानात्मविचार करून जगदुद्धार करण्यास सांगितलें. समर्थांनीं अंतकालीं श्रेष्ठांच्या मुलांनाआणून त्यांच्या आज्ञेंत राहून चाफळ येथील मठांत श्रीची उपासना करून संप्रदायाचा विस्तार करण्यास उद्धवआक्कादि शिष्यमंडळींना सांगितलें होतें. परंतु त्या वेळीं धामधुमीचा काळ होता. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर शाहुमहाराज सातार्‍यास येऊन स्थिरस्थावर झाल्यावर त्यांनीं आक्कादिवाकरप्रभृतींच्या सल्ल्यानें जांबेस पत्रें लिहिलीं. तेव्हां रामजी व शामजी दोघे ही वारले होते. रामजीबुवांचे पुत्र गंगाधरबुवा यांना शाहूमहाराजांनीं समारंभानें आणवून त्यांची चाफळ मठांत शके १६३२ सालीं स्थापना केली. त्यांच्याच वंशजाकडे हल्लीं चाफळमठाची व्यवस्था आहे.

---

# ( इ ) जन्म व बाळपण

भवो हि लोकाभ्युदाय तादृशाम् ।।

—भर्तृहरि

श्रेष्ठजन्मानंतर दीड वर्षांनीं राणुबाईच्या उदरीं दुसरा गर्भ राहिला. समर्थांच्या वेळीं गरोदर असतांना राणूबाईच्या डोहाळ्यांचें वर्णन अनेक चरित्रकारांनीं सविस्तर केलें आहे. राजमाता जिजाबाई शिवाजीमहाराजांच्या वेळीं गरोदर असतांना त्यांच्या डोहाळ्यांचें ही शिवचरित्रकारांनीं रसभरित वर्णन केलें आहे. परमानंद कवीचा श्रीशिवभारत ग्रंथ भारतइतिहाससंशोधक मंडळ, पुणें, या संस्थेमार्फत कै. सदाशिव महादेव दिवेकर यांनीं शके १८४९ सालीं प्रसिद्ध केला आहे. त्यांतील सहावा भाग, 'शिवराजप्रभव' हा आहे. त्यांत ९ ते १५ या श्लोकांत राजमाता जिजाबाई गर्भवती असतांना तिच्या दिव्य शरिराचें वर्णन केलें आहे. तें रघुवंशांतील दिलीप राजाची पत्नी सुदक्षिणा गर्भवती असतांना कालिदासानें केलेल्या वर्णनाप्रमाणें आहे. १५ ते १८ या श्लोकांत जिजाबाईच्या डोहाळ्यांचें वर्णन आहे. त्यांचा सारांश:—किल्यावर, हत्तीवर व वाघावर आरोहण करावें, सुवर्ण सिंहासनावर शुभ्र छत्राखालीं बसावें, उंच झेंडा उभा करावा, सुंदर चवर्‍यांनीं वारा घ्यावा, धनुष्यबाण, भाला, तरवार धारण करून आणि चिलखत घालून

लढाया कराव्या, धर्मस्थापना करावी इत्यादि. अशा प्रकारचे डोहाळे राजमाता जिजाबाईंना होऊं लागले. थोर लोकांच्या मातांच्या डोहाळ्यांसंबंधीं सामान्य विवेचन आम्हीं याच भागांत ( आ ) या प्रकरणांत केलें आहे. बालक पुढें महा-प्रतापी जगद्विख्यात होणार हें क्वचितच लहानपणीं आईबाप व पालकांना कळतें. परंतु, शिवसमर्थजन्माच्या कथा दोन्ही घराण्यांत दोघांच्या पूर्वजांना जन्माच्या आधीं वर मिळून समजल्या होत्या, असें परंपरागत ऐकलेल्या माहितीवरून बखर-कारांनीं लिहिलें आहे, तेव्हां दोघांच्या मातोश्रींच्या गर्भधारणाकाळीं घरच्या मंडळींचें त्यांच्या डोहाळ्यांकडे लक्ष जाणें साहजिक आहे. तेव्हां शिवसमर्थ-कालीन लोकांनीं कर्णोपकर्णीं ऐकलेल्या गोष्टी चरित्रकारांना कळल्या, तशा त्यांनीं श्रद्धाळूपणानें लिहिल्या आहेत. समर्थचरित्रकारांपैकीं गिरिधरस्वामींनीं समर्थांना पाहिलें होतें व त्यांचा कांहीं काल समर्थसान्निध्यांत गेला होता; तेव्हां समर्थप्रतापांतील त्यांच्या वर्णनास इतर चरित्रकारांपेक्षां अधिक महत्त्व दिलें पाहिजे. गिरिधरस्वामींनीं राणूबाईच्या डोहाळ्यांचें सविस्तर वर्णन केलें आहे. त्यांतील कांहीं थोडा भाग दिग्दर्शनार्थ खालीं देतों:—"सूर्यकांतें कांतेसी पुसिलें । तुम्हांसी काय अपेक्षित आहे वो भले ! तें तें सांगा, मी सिद्ध करीन वहिलें । श्रीरामसमर्थकृपें-करूनियां ॥ (स. प्र. १–२५)" राणूबाई म्हणतात:—"गिरिकंदरें मज आवडतीं । घरें मंदिरें मज नावडती ॥ हनुमानरूपें मी नरवानराकृती । नरनारायणनिर्धारें ॥ ( स. प्र. १–२७ ) सर्व माया मिथ्या बाजीगरी । काय तुम्हीं हे मानिली आहे खरी ॥ आत्माराम मी एक सत्य चराचरीं । नित्य शाश्वत निरंजन ॥ ( १–२९ ) मज पुनीत करणें रे कृष्णातीरा । अखंडव्यापक मी चराचरा ॥ मज नावडे संसार पसारा । आश्रम सर्व ही श्रमरूप रे ॥ ( १–३१ ) जयजयराम म्हणा रे स्वानंदें । आत्मविचार पहा रे ब्रह्मानंदें ॥ काय भुलला आहे रे विषयानंदें । परमानंदें गर्जा रे ॥ ( १–३२ )" वरील प्रकारचें राणूबाईचें भाषण ऐकून सूर्याजीपंत घाबरले, व त्यांनीं ग्रामजोशी, पंचाक्षरी व देवर्षि बोलावून आणले, वगैरे वर्णन गिरिधरस्वामींनीं पहिल्या अध्यायांत केलें आहे. श्रीरामदासकथासारामृतांत राणूबाईच्या डोहाळ्यांचें वर्णन आहे. त्यांतील एकच ओंवी देतों:—"मज करणें धर्म-संस्थापन । मज करणें गोब्राह्मणप्रतिपालन ॥ विशेष महाराष्ट्रीं शिवरायाकारणें । कैवार घेणें मज-लागीं ॥ (प्रसंग ४. ६८)" असो. राणूबाईस नऊ महिने दहा दिवस पूर्ण झाले. सूर्याजीपंतांचे घरीं दरसालप्रमाणें श्रीरामनवमीचा उत्सव सुरू होता. चैत्र शुद्ध नवमी दिवशीं योग्य वेळीं कीर्तन सुरू झालें. शके १५३० सालीं कीलकनाम-संवत्सरीं चैत्र शुद्ध नवमी दिवशीं श्रीरामजन्माचे वेळीं बरोबर बारा वाजतां राणूबाई सुखप्रसूत होऊन त्यांना दुसरें पुत्ररत्न झालें. गिरिधरस्वामी म्हणतात:—"जयजय-कार सर्वत्रीं केला । श्रेष्ठांसी समर्थबंधु झाला ॥ श्रीराम हनुमानरूपें अवतरला ।

ब्राह्मरूपें जगद्गुरू ॥ ( स. प्र. १–५३ ) आधीं श्रीरामनौमीचा ब्रह्मानंद । विशेष समर्थ अवतरले सच्चिदानंद ॥ नाना दानप्रसंगें परमानंद । जो जो विधि तो झाला स्वानंदें ( १–६७)" श्रीरामदासकथासारामृतकार म्हणतातः—"पंत परम हरुषले। आजि द्वितीय पुत्रसौख्य देखिलें ॥ याचकाहातीं निज कोठार लुटविलें । सुखी केलें दरिद्र्यां ॥ (प्रसंग. ४–९६) मग सर्वे घेऊन ब्राह्मण । पंत आनंदें करून ॥ वेगें पावले राणाऊभुवन । मुखावलोकन नवपुत्रा ॥ ( ४–९७ ) पंतें करूनिया स्नान । मग केलें पुण्याहवाचन ॥ पहावया पुत्रवदन । आनंदें पूर्ण घातले ॥ ( ४–९८ )" श्रेष्ठ जन्मास आले तेव्हां ही सूर्याजीपंत स्नानपुण्याहवाचन करून पुत्रदर्शनास आले असें वर्णन आहे ( प्रसंग. ३–२५ ). इतर समर्थचरित्रकार या गोष्टीचा उल्लेख करीत नाहींत. समर्थ व तुकाराममहाराज एकाच वर्षी जन्मले. परंतु तुकाराम-महाराजांची जन्मतिथि समर्थांच्या जन्मतिथीप्रमाणें निश्चित नाहीं. ह. भ. प. पांगारकर तुकारामचरित्रांत म्हणतात:—"तुकोबांच्या जन्मशकाबद्दल निश्चित असें कांहींएक प्रमाण उपलब्ध नाहीं; तथापि जीं अनुमानें आहेत त्यांत चार मतें आहेत. प्रयाणाबद्दल ही तीन मतें आहेत. या सर्व मतांचें परीक्षण करून त्यांत ग्राह्य कोणतें हें ठरविण्याचा आपण प्रयत्न करूं." ( पान १४ ). हें करण्यास त्यांना तीस पानें खर्ची घालावीं लागलीं आहेत! सुदैवानें समर्थांचा जन्मकाल व प्रयाण-काल यांबद्दल दुमत नाहीं. याचें श्रेय समकालीन लेखक समर्थवाकेनिशीकार यांना दिलें पाहिजे.

द्वितीय पुत्र मारुतिअंशें निर्माण होऊन जगदुद्धार व धर्मसंस्थापना करील असा सूर्यनारायणानें वर दिला होता, म्हणून सूर्याजीपंतांनीं त्याचें 'नारायण' असें नांव ठेवलें. बारशाचा समारंभ मोठ्या थाटानें केला. सूर्याजीपंत ग्रामाधिकारी, सच्छील व संपन्न असल्याकारणानें बारशाच्या समारंभास गांवांतील सर्व प्रमुख सुवासिनी आल्या होत्या. नामकरण-समारंभाचें वर्णन श्रीरामदासकथासारामृतकार पुढील-प्रमाणें करतात:—'राणाऊचिया सदनीं । वेगीं मिळाल्या सुवासिनी ॥ बाळमुखचंद्रमा न्याहाळुनी । विस्मित मनीं त्या जाहल्या ॥ ( प्रसंग ४-१०० ) बाळ घालोनी पाळणा । मग त्या आरंभिती नामकरणा ॥ मनीं म्हणती रे जगज्जीवना । दिला तान्हा सगुण तुवां ॥ ( ४-१०२ ) हा भासतो बाल नारायण। म्हणोनि म्हणावें यासि नारायण ॥ शर्करा वाटती आनंदें करोन । नारायण नामाची ॥ १०४ ॥" नंतर पंतांनीं विद्वान् ज्योतिषी बोलावून जातक-विचार सुरू केला. तेव्हां पत्रिका पाहून एक द्विजवर म्हणाले:—"याची पत्रिका पाहों जातां । हा करील धर्मसंस्थापन निश्चिता ॥ भूषण-भूत संतामहंता । स्वराज्यसाम्राज्यता याचेनि गुणें ॥ ( ४-११२ ) एक भूपाळ सुलक्षणी । शरण येईल यालागुनी ॥ अघ-आपदा उपशमुनी । पवित्र मेदिनी याचेनि गुणें ॥ ( ४-११३ )"

# समर्थांची कुंडली

शके १५३० कीलकनाम संवत्सरे चैत्र शुद्ध नवम्यां तिथौ इंदुवासरे सूर्योदयात् गतघटि १५ पळें ७ एतस्मिन् दिने माध्यान्हे काले श्रीसूर्याजीपंतशर्मणः सौभाग्यवती राणूबाई नाम्नी भार्या नारायणनामानं पुत्रं प्रासूत. शुभं भवतु.

जन्मकुंडली




राशिकुंडली




या कुंडलींत दशमांत तीन ग्रह आहेत. चार किंवा अधिक असते तर प्रव्रज्यायोग पूर्ण होता. तो पूर्ण झाला नाहीं, तरी शुक्र नवम स्थानांत आहे, म्हणजे धर्मस्थानांत आहे; त्यासह चार ग्रह धर्मप्रवृत्तीस कारणीभत झाले. त्यांत रवि बलवान् असल्यानें गायत्रीपुरश्चरण, सूर्योपासना, व नैष्ठिक ब्रह्मचर्य हे योग साधले. गुरु स्वगृहींचा व बलवान् असा दशमस्थानीं असल्यानें राजगुरुत्व प्राप्त झालें. त्याचप्रमाणें रवि, बुध, गुरु, शुक्र, शनि वगैरे ग्रहांच्या कारकत्वानें व स्थानबलत्वानें महायात्रायोग, गंगास्नानयोग, जीर्णोद्धारकर्तृत्व देवालय-कूप-वापी-तडागादि-कर्तृत्व इत्यादि योग येतात. नवमस्थानचा शुक्र देवीची भक्ति दर्शवितो. मिथुनेंतला चंद्र, दशमस्थ बुध आणि नवमस्थ शुक्र हे ग्रंथकर्तृत्व व काव्यगायनादिकांची आवड दर्शवितात.

भावचलितांत शनि सप्तमांत असल्यानें पत्नीहीनत्व आलें. पण शनि स्वगृहींचा, शुभग्रहदृष्ट व दिग्बळी असल्यानें इतर दोषांची निवृत्ति झाली. तसेंच भावचलितांत मंगळ षष्ठस्थानीं असल्यानें समर्थांवर कोणा ही शत्रूची मात्रा न चालतां त्यांचीच सर्व शत्रूंवर छाप पडली. गुरूपासून पंचमस्थानीं राहु असल्यानें पुत्रयोग नाहींसा झाला.

दासविश्रामधामांत नक्षत्र व राशि पुढीलप्रमाणें दिल्या आहेतः—"पुनर्वसु चतुर्थ चरणीं। कर्कराशीस जन्मला सद्गुणी।। हरिनाम सत्व जोशीयांनीं। जन्म लिहिलें फळ ऐका।। (दा. वि. २. १०४)" ब्राह्मणांनीं केलेलें जातक ऐकून पंतांना व राणूबाईना आनंद वाटला. "ऐकोनि जातक सावचित्त। पंत द्विजवर

षोडषोपचारें पूजित ॥ यथाशक्ति द्रव्यसवर्ण अर्पित। लोटांगणें घालिती विनीतभावें ॥ (श्रीरामदासकथासारामृत, प्र. ४. १६)." समर्थ आजानुबाहु होते (दा. वि. ३. २६).

समर्थांचा जन्म जांबगांवीं झाला. त्या वेळचें तेथील समाजस्थितीचें सविस्तर वर्णन गिरिधरस्वामींनीं दिलें आहे. त्यांतील कांहीं ओंव्या दिग्दर्शनार्थ देतोंः—"जांबुवंती नामें रामराजधानी[१] । आरामें[२] शोभति चक्रध्वनि ॥ उभय सरिता जेविं जनस्थानीं । पंचवाटिका विराजे ॥ नगरींत श्रीमंत चारी वर्ण । अनन्य ब्राह्मणीं तिन्ही वर्ण ॥ विद्यातपशौच्यादि गुणें ब्राह्मणवर्ण । ब्रह्मानंदें संतुष्ट हो ॥ (स. प्र. १. १३–१४). ब्राह्मणांची रक्षिती प्रतिष्ठा। संतसज्जनीं केवळ निष्ठा । परदार परद्रव्य मानिती विष्ठा। स्वप्नीं ही अनिष्ट नातळती[३] ॥ (१. १८) देशकाल-वर्तमानें । ग्रामस्थ वर्तती प्रसंगमानें ॥ पिकें पिकती अतिमानें । पर्जन्य वर्षती यथाकाळीं ॥ (१. २१) ऐसिये जांबुवंतीये नगरीं । नगरलेखकाच्या[४] दिव्य मंदिरीं ॥ जमदग्नि-वत्स गोत्रीं। श्रीराणादेवी-उदरीं। स्वयें नारायण समर्थ अवतरले ॥ (१. २३)"

नाशिक येथें पंचवटिका आहे. त्याप्रमाणें समर्थकाळीं जांबिकेस ही पंचवटिका होती. नाशकाजवळ टाकळी येथें गोदावरीस एक लहान नदी मिळून संगम झाला आहे. त्याप्रमाणें जांबेंत ही दोन लहान नद्यांचा संगम आहे. तेथें नजीकच एके ठिकाणीं पांच वटवृक्ष होते. त्या स्थळास पंचवटी म्हणत. सूर्याजीपंतांनीं पुत्र-प्राप्तीकरितां पंचवटीस तप केलें असा उल्लेख एका समर्थचरित्रांत आहे. तो जांब येथील पंचवटीस अनुलक्षून होय.

राणूबाईचे बंधु भानाजीपंत गोसावी आसनगांवकर हे एकनाथस्वामींचे शिष्य होते. ते दरवर्षी पैठणास फाल्गुन वद्य षष्ठीस एकनाथस्वामींचे गुरु जनार्दन-स्वामी यांच्या पुण्यतिथीस जात असत. शके १५३०च्या फाल्गुन वद्य षष्ठीस जनार्दनपंतांच्या पुण्यतिथीस भानाजीपंतांबरोबर सूर्याजीपंत व राणूबाई 'बाल नारायणा'स घेऊन पैठणास गेल्याचा उल्लेख ह. स्वा.च्या बखरींत आहे. राणूबाई नारायणास नाथांच्या पायांवर घालणार, इतक्यांत नाथांनीं नारायणास उचलून घेऊन त्याचें चुंबन घेतलें व 'हा साक्षात् मारुतीचा अवतार आहे, पुढें कृष्णातीरीं राहून जगदुद्धार करील व शककर्त्या महाराजांस अनुग्रह देऊन त्याच्या हातून धर्मसंस्थापना व राज्यसंस्थापना' करील अशा अर्थाचे उद्गार पंत व राणूबाईच्या देखत नाथांनीं काढल्याचें वर्णन ह. स्वा.च्या बखरींत आहे. परंतु एकनाथ-महाराजांनीं शके १५२१ सालींच समाधि घेतली असें आतां इतिहाससंशोधकांनीं

१. दक्षिण अयोध्या. २. बागा. ३. स्पर्श करीत नाहींत. ४. कुलकर्णी याच्या.

नवीन उपलब्ध झालेल्या पुराव्यांवरून ठरविलें आहे. तेव्हां नाथसमर्थभेट विश्वसनीय दिसत नाहीं, असा कित्येकांचा आक्षेप आहे. परंतु ह. स्वा. च्या बखरींतील बहुतेक शक व तिथि आधुनिक इतिहासकागदपत्रांवरून खऱ्या ठरत आहेत. तेव्हां शके १५३०च्या फाल्गुन वद्य षष्ठीस बाळनारायणास घेऊन पंत व राणूबाई पैठणास जनार्दनस्वामींच्या पुण्यतिथीस गेल्या हें अविश्वसनीय मानतां येणार नाहीं. बाल नारायणास हातांत उचलून घेणारे नाथ हे सुप्रसिद्ध भागवतटीकाकार एकनाथ-स्वामी नसून त्यांच्या मागून स्थानापन्न झालेले त्यांचे शिष्य नाथ असले पाहिजेत. समर्थ मारुतिअंशेंकरून जन्मास आले आहेत, कृष्णातिरीं जाऊन शक-कर्त्या महाराजांना अनुग्रह करून धर्मस्थापना व राज्यस्थापना करणार आहेत वगैरे आख्यायिका नाथशिष्यांच्या कानावर समर्थजन्मानंतर १०।१२ महिन्यांत गेल्या असल्या पाहिजेत व त्यांसच उद्देशून त्यांनीं वरील उद्गार काढले असले पाहिजेत.

समर्थांच्या बालचरित्राचें वर्णन समर्थप्रतापांत दुसऱ्या समासांत सविस्तर दिलें आहे; कथासारामृतांत ४ थ्या प्रसंगांत दिलें आहे; संतविजयांत पहिल्या अध्यायांत दिलें आहे; इतर चरित्रकारांनीं ही आपापल्या माहितीप्रमाणें क्वचित् प्रसंगीं अतिशयोक्तीनें दिलें आहे. जन्मानंतर समर्थ दिवसेंदिवस क्रमानें वाढूं लागले. "समर्थ वर्धमान दिवसेंदिवस। इंदुउपमा न साजे समर्थास ॥ चंद्र पूर्ण-पणें अपूर्ण अमावास्येस। श्रीरामचंद्र समर्थ पूर्ण पूर्णत्वें ॥ (स. प्र. २. २)" गंगाधर व नारायण यांमध्यें सव्वा दोन वर्षांचें अंतर होतें. दोघे एकत्र खेळतांना त्यांच्या आईबापांस आनंद होत असे. गांवांतील स्त्रिया ही त्यांना खेळतांना कौतुकानें पाहण्यास येत. "राणाऊच्या सदनीं। सुदिव्य असती पुत्र दोन्ही ॥ त्यां पहावें खेळवावें म्हणुनी। कामधाम सांडुनी धांवती स्त्रिया ॥ (श्रीकथासारामृत, प्रसंग ४. ११९) म्हणती बाई राणाऊ नवल झालें। तुझ्या बालकें आमचें चित्त चोरिलें। किती परतपरतों जाऊं म्हणितलें। तरी चित्त राहे विगुंतलें यांचि माजीं (४.१२०)" नारायण कधीं रडत नसे. सर्वदा आनंदी असे. ५व्या महिन्यांत बसूं लागला. ७व्या महिन्यांत रांगूं लागला. तो चपळ असे. बाहेर उड्या मारीत जाई. 'बागुलबुवा येऊन भय दाखवील' असें म्हणतांना 'त्यासच मी मारीन' असें म्हणे. 'बाहेर गेलास तर चोर दागिने काढून घेतील' असें म्हटल्यावर, 'दागिने काढून घ्या, मी बाहेर जाणारच' असें उत्तर देई (संतविजय, अध्याय पहिला).

गंगाधराप्रमाणें नारायणाची मुंज त्याच्या पांचव्या वर्षी म्हणजे शके १५३५ सालीं झाली. नारायणास पांचव्या वर्षी शाळेंत घातलें. नारायण फार बुद्धिवान होता. जांबेंतील पंतोजींचें भांडवल त्यानें फार लवकर संपविलें. गिरिधरस्वामी म्हणतातः—"समर्थें अकरा घड्यांत केलें धूळाक्षर। अकरा प्रहरांत वाळिलें अक्षर ॥

अकरा दिवसें केला जमाखर्च सुंदर । ब्रह्मांडकुलकर्ण चालवावया." समर्थकाळीं दगडी पाट्या नव्हत्या असें दिसतें. इंग्रजी अंमलाचे आरंभीं कांहीं खेड्यांमध्यें धूळाक्षरांनेंच प्रारंभीं शिकवीत असत. लिहिणें, वाचणें व जमाखर्च करणें एवढेंच नारायणास जांब येथें शिकविलें, असें गिरिधरस्वामी व इतर चरित्रकार म्हणतात. सूर्याजीपंतांना कुलकर्णीपणाचे वृत्तीप्रमाणें जोशीपणाची वृत्ति होती असें कांहीं चरित्रकार लिहितात. तेव्हां अगर फक्त कुलकर्णीपणाची वृत्ति होती असें असलें तरी, त्या काळच्या रिवाजाप्रमाणें नारायणाचें पुरुषसूक्त, रुद्र, वैश्वदेव, ब्रह्मयज्ञ इत्यादि कांहीं शिक्षण जांबेंतच झालें असावें असें वाटतें. कारण नाशिक पंचवटींत गेल्यावर नारायणाचा तपश्चर्येंत बहुतेक काल जात असे. रूपावली, समासचक्रादि संस्कृत अध्ययन बहुधा जांबेंतच झालें असलें पाहिजे. दासविश्रामधामाशिवाय कोणत्या ही चरित्रांत मात्र याविषयीं उल्लेख आढळून येत नाहीं. "बालबोध मोडी अक्षर सुंदर । केलें शिकले सूक्तादि रुद्र । जिभेंत शारदा हृदयीं गणेंद्र । वाटे वस्तीस घातले ॥" अशी एक ओंवी दासविश्रामधामांत आहे. समर्थांचें बालबोध अक्षर ही चांगलें होतें. त्यांनीं कल्याणस्वामींना घालून दिलेला कित्ता डोमगांव मठांत आहे, त्यावरून ही गोष्ट सिद्ध होते. (स. प्र. २-१७) नारायण फार हूड व खोडकर होता. गंगाधराच्या खोड्यांचें वर्णन समर्थ-चरित्रांत मुळींच नाहीं. त्यावरून तो शांत स्वभावाचा होता असें दिसतें. समर्थांच्या खोड्यांचें वर्णन चरित्रकारांनीं आपापल्या माहितीप्रमाणें केलें आहे. उड्या मारणें, पोहणें, गोट्या खेळणें याचा नारायणास फार नाद असे. नारायणाच्या पाठीस मुलें लागलीं म्हणजे तो वानराप्रमाणें या झाडावरून त्या झाडावर सहज उड्या मारीत असे असें चरित्रकार लिहितात, यांत थोडीशी अतिशयोक्ति असावी. जवळच्या एखाद्या झाडावर प्रसंगविशेषीं उड्या मारणें अशक्य नाहीं. परंतु एकसारखें या झाडावरून त्या झाडावर उड्या मारणें कठीण दिसतें. दुसरा मुलगा हा मारुतीचा अवतार होईल, या वरास अनुलक्षून नारायण हा लहानपणीं वानराप्रमाणें उड्या मारीत असे, अशी आख्यायिका पडली असावी. तीवर विश्वास ठेवून चरित्रकारांनीं अतिशयोक्तीचीं वर्णनें केलेलीं दिसतात. नारायणाचा स्वभाव फार खोडकर असल्याकारणानें त्यावर लोकांचा विश्वास बसणें साहजिक आहे. नारायणास तालीमबाज सोबती घेऊन खेळण्याचा नाद असे. नारायणानें स्वतः तालीम करून शरीर कमावलेलें होतें. तो नित्य स्नानोत्तर दोन हजार नमस्कार घालीत असे, अशी

सांप्रदायिकांमध्यें परंपरागत आख्यायिका आहे. सूर्याजीपंत हजारबाराशें नमस्कार घालीत असत, असा वर उल्लेख केलेलाच आहे. तेव्हां पुत्रात् इच्छेत् पराभवम्–किंवा बापसे बेटा सवाई –या नात्यानें नारायण नित्य २००० नमस्कार घालीत असे, ही गोष्ट असंभवनीय नाहीं. नारायणास तालीमबाज मुलांत खेळण्याचा फार नाद असे. गिरिधरस्वामी म्हणतात:–"समर्थक्रीडेचें अद्‌भुत लक्षण। अष्ट जुत्पति संवगडे जाण॥ गोट्या बोटें टिचिती पूर्ण। एकशेर पूर्ण संभारें॥ वृक्षसरोवरीं उडया घेती। रानींवनीं सर्वदा असती॥यथा स्वलीला ग्रामांत येती। परमप्रतापी अनावर॥ (स. प्र. २. १५१६) सर्व काळ नारायण संवगड्यांबरोबर रानावनांत फिरत असे हें राणूबाईंना आवडत नसे. त्या एकदां रागावून म्हणाल्या, "नारोबा, पुरुषांना कांहींतरी संसाराची काळजी पाहिजे." तेव्हां नारायण घरांतील एका अंधारमय खोलींत जाऊन चिंतन करीत बसला. नित्याप्रमाणें नारायण घरीं आला नाहीं, म्हणून आईबापांनीं व इष्ट-मित्रांनीं गांवांत व रानावनांत फिरून पाहिलें, पत्ता लागेना. राणूबाईस काळजी लागली. मुलगा फार खोडकर आहे, कोठें गेला असावा, याविषयीं त्या विचारांत पडल्या. कांहीं कामाकरितां त्या माजघरांतील खोलींत गेल्या, तेव्हां नारायणाचा पाय लागून त्या दचकल्या. नारायण आहे असें समजल्यावर, "नारोबा, येथें अंधारांत काय करतोस?" असें त्या म्हणाल्या. "आई, चिंता करतों विश्वाची," असें नारोबानें उत्तर दिलें. सूर्याजीपंत गांवांत शोध करीत होते. ते घरीं आल्यावर नारायण अंधारांत एकांतांत बसला होता असें समल्यावर ते राणूबाईस म्हणाले, "त्याला तूं इतःपर कांहीं बोलूं नकोस. थोर झाल्यावर तो शहाणा होईल." कांहीं दिवस राणूबाईंनीं बोलण्याचें सोडून दिलें. पुढें एकदां घरीं प्रयोजन होतें. तेव्हां राणूबाई पंतांची आज्ञा विसरल्या व सहज म्हणाल्या, "नारोबा, उद्यां घरीं प्रयोजन आहे, ताक भरपूर नाहीं; पण तुला सांगून काय उपयोग?" नारायणानें आईचें भाषण ऐकून घरीं कोणास न कळवितां कुंभाराच्या घरांतून अकरा गाडगीं आणविलीं व अकरा घरांत देऊन "पहांटे ताक पाहिजे" असें सांगितलें, व अरुणोदयाच्या आंत परसदारानें अकरा गाडगीं ताकानें भरलेलीं आणून स्वयंपाकघरांत ठेविलीं. सकाळीं राणूबाई पाहतात तों स्वयंपाकघरांत चोहोंकडे त्यांना ताकच दिसलें. गिरिधरस्वामी म्हणतात "समर्थ-माता भ्रातृपत्नी येऊनि पाहे। तंव जेथें तेथें तक्राचि तक्र आहे॥ कोण हे विचित्र बापा करिसी काये। म्हणे, माये, मातृआज्ञापरिपालन हे!!॥ (सं. प्र. २. २८)"

एकदां एक ग्रामाधिकारी पंतांचे घरीं आले व म्हणाले, "दबेघरांत अध्यात्म चाललें आहे; परंतु बाहेर कोणी आल्यास त्याचें आदरआतिथ्य करण्यास बैठक नाहीं." तेव्हां नारायणानें आपले मल्लमित्र जमवून एका दिवसांत बैठक तयार केली. गिरिधरस्वामी म्हणतात:—"समर्थें अष्टजुत्पति संवगडे सवें घेतले । दोंप्रहररात्रीं काष्ठसंभार तोडविले ॥ भिंती घालुनी रात्रीं प्रताप किंचित् दाखविले । अरुणोदया बैठक सिद्ध केली ॥ (स. प्र. २-३१) ग्रामाधिपतीनें सूर्योदयीं अवचित देखिली । अरे बा, एके रात्रीं मोठी बैठक कैसी केली ॥ अवतारी पुरुषाची क्रिया देखविली । एके रात्रीं आणिला द्रोणाचळू[1] ॥ (स. प्र. २-३२)" नाराणयणाविषयीं वरील प्रकारच्या कांहीं गोष्टी चरित्रकारांनीं सविस्तरपणें वर्णन केल्या आहेत. परंतु त्यांत अविश्वसनीय व अद्भुत असें कांहीं नाहीं. लहानपणीं नारायण फार हूड होता. तो तालीमबाज असून कांहीं मल्ल त्याचे स्नेही होते. त्यांच्या साहाय्यानें तो थोडया वेळांत कांहीं अचाट कृत्यें करीत असे एवढेंच सिद्ध होतें. संतविजय-कारांनीं सविस्तर कादंबरीप्रमाणें वर्णन केलेली पुढील गोष्ट देखील नारायणाचें अचाट शरीरसामर्थ्यच सिद्ध करते असें आम्हांस वाटतें. "नारोबा, तूं शहाणा केव्हां होणार?" असें आईनें विचारल्यावर, "आई, शहाणपण म्हणजे काय?" असें नारायणानें विचारिलें. "धनधान्य मिळवून घरीं आणलें म्हणजे शहाणा म्हणतात" असें राणूबाई म्हणाल्या. दुसरे दिवशीं नारायण एका कुणब्याच्या खळ्यावर गेला व सव्वामणाची बांधलेली धान्याची मोट घेऊन वाऱ्यासारखा घरीं पळत आला. कुणबी मागोमाग धांवत आला व राणूबाईला म्हणाला, "तुमचा मुलगा राक्षस आहे." "बटबट काय लावलीस, तुझी मोट तूं घेऊन जा," असें नारायण चटकन् म्हणाला. कुणब्यानें एक मोट उचलली दुसरी आहेच! असें पन्नास वेळां झालें! दुःशासनानें साध्वी द्रौपदीचा भर सभेंत छळ आरंभिला तेव्हां श्रीकृष्णानें तिला लुगडीं पुरविलीं. मोरोपंतांनीं आपल्या महाभारतांत या गोष्टीस अकरावा 'अंबरा-वतार' होय असें म्हटलें आहे. त्याप्रमाणें साध्वी राणूबाईस धान्य पुरविण्याकरितां नारायणरूपी मारुतीनें कलियुगांत हा बारावा 'धान्यावतार' करून दाखविला असें चरित्रकार म्हणतील तर तें पूर्वपरंपरेस अनुसरूनच होणार आहे. या गोष्टींतील पूर्वार्ध बाल-नारायणाचें शरीरसामर्थ्य दाखविणारा आहे व उत्तरार्ध दंतकथा अगर कविकल्पना आहे असें आम्हांस वाटतें.

---

१. द्रोणागिरि—पर्वत.

नारायणाची मुंज शके १५३५ सालीं झाली असें वर सांगितलेंच आहे. नंतर १५३६ सालीं श्रेष्ठांचा विवाह झाला व त्याच वर्षीं मारुतीचे देवालयांत त्यांना श्रीरामाचा अनुग्रह झाला. शके १५३७ सालीं सूर्याजीपंत इहलोक सोडून गेले. पंतांच्या निधनानंतर श्रेष्ठ गादीवर लोकांना अनुग्रह देत असत. एके दिवशीं नारायणानें स्वतःस अनुग्रह देण्याविषयीं आग्रह धरिला. " तुझें वय लहान आहे. आतांच गडबड करूं नकोस " असें श्रेष्ठ म्हणाले. तेव्हां नारायण रुसून मारुतीचे देवालयांत गेला. तेथें मारुतिरायाच्या कृपेनें श्रीरामचंद्राचें दर्शन झालें व त्यांनीं मस्तकावर हात ठेवून अनुग्रह देऊन ' रामदास ' असें नांव ठेविलें. ही गोष्ट शके १५३८ नलनाम संवत्सरीं श्रावण शुद्ध अष्टमीस मध्यरात्रीं झाली ( ह. स्वा. बखर). नारायण रुसून गेला म्हणून श्रेष्ठांनीं व राणूबाईनीं गांवांत व रानांत तपास केला. श्रेष्ठ मारुतीचे देवालयांत गेले. नमस्कार करून प्रदक्षिणा घालण्यास गेले, तों वाटेंत पाठीमागें नारायणाची मूर्ति दिसली. पोटाशीं धरून मुखाकडे पाहत असतांना श्रीरामचंद्रांच्या अनुग्रहाच्या चिन्हें मुखावर दिसलीं. तेव्हां श्रेष्ठांना आनंद झाला. नारायणानें श्रींची कृपा झाली ती आपलीच कृपा आहे, असें म्हणून श्रेष्ठांना नमस्कार घातला व नंतर दोघे बंधू घरीं आले. राणूबाईंना ही अनुग्रहाची गोष्ट समजली तेव्हां फार आनंद झाला.

## भाग तिसरा

# पलायन

द्विज ' सावधान ' ऐसें सर्वत्र विवाहमंगलीं म्हणती।
तें एक रामदासें आयकिलें, त्यां सदा असो प्रणती ॥ १ ॥

—मोरोपंत

अनुग्रह झाल्यावर नारायण कांहीं दिवस मौनव्रत धारण करून होता. परंतु पुढें लवकरच त्याच्या नेहमींच्या वृत्तीप्रमाणें झाडांवर चढणें, उड्या मारणें, खेळणें वगैरे बालचेष्टा सुरू झाल्या. नारायणाचें एकदां लग्न करून टाकावें म्हणजे तो सहजच घरीं राहील असें राणुबाईंना वाटलें. श्रेष्ठांना नारायणाची अंतस्थ वृत्ति चांगली कळली होती. नारोबाचें लग्न करण्याचा प्रयत्न कराल तर तो हातचा जाईल असें श्रेष्ठांनीं राणुबाईंना सांगितलें; परंतु आपला वंश फार नाहीं, तेव्हां नारोबाचें लग्न झालेंच पाहिजे असा त्यांनीं आग्रह धरिला, व वधू पाहूं लागल्या. " आई तुझें लग्न करणार " असें मित्र त्याची थट्टा करीत, तेव्हां तो रागानें बाहेर पळून झाडावर बसत असे. कधींकधीं धोंडे ही मारी. एकदां एकानें लग्नाची गोष्ट काढली तेव्हां नारायण नदीकांठच्या एका वडाचे झाडावर जाऊन बसला. वाड्यांतील लोक बोलवावयास आले तेव्हां झाडाखालील नदींत त्यानें उडी टाकली. नारायण बुडाला म्हणून कांहींनीं पाण्यांत बुडून पाहिलें, परंतु शोध लागला नाहीं. ही बातमी समजतांच श्रेष्ठ धांवत आले व " नारोबा, बाहेर ये " म्हणून हांक मारली, तेव्हां एकदम नारोबा बाहेर आला. त्यास घेऊन श्रेष्ठ घरीं गेले. राणुबाईंनीं नारायणास पोटाशीं धरून समाधान केलें व म्हणाल्या, " असें तूं करतोस हें बरोबर नाहीं. पुन्हा असें करूं नको. " झाडावरून खालीं नदींत उडी टाकली, तेव्हां नारायणास कपाळाच्या मध्यभागीं पाण्यांतील खडक लागून टेंगूळ आलें, तें अखेरपर्यंत होतें.

लग्नाची गोष्ट काढली असतां नारायण तिकडे लक्षच देत नाहीं, उलट घरांतून पळून जाऊन कांहीं अचाट कृत्यें करतो, यास उपाय काय करावा, अशी राणुबाईस चिंता लागली. तो बुद्धिमान् आहे, प्रत्यक्ष श्रीरामचंद्राचा त्यास अनुग्रह झाला आहे, तेव्हां त्यास बोध करून पहावा असें त्यांच्या मनांत आलें. त्याप्रमाणें एके दिवशीं एकांतांत गांठून राणुबाई म्हणाल्या, " नारोबा, मी सांगेन ती गोष्ट तूं मान्य करशील काय ? ' न मातुः परदैवतम् ' असें शास्त्र आहे. " हें ऐकून नारायण म्हणाला, " आज्ञा करावी, सांगाल तें ऐकतों. " राणुबाई म्हणाल्या, " लग्नाची गोष्ट काढली असतां तूं रागावतोस, हें बरें नाहीं, तर असें करूं नकोस. अंतःपाट धरीपर्यंत नाहीं म्हणू नकोस. तुला माझी शपथ आहे. " " आज्ञा प्रमाण " असें

नारायण म्हणाला. त्या दिवसापासून लग्नाची गोष्ट काढली असतां पूर्वीप्रमाणें हूड-पणानें वागण्याचें त्यानें सोडून दिलें. नारायणाच्या वृत्तींतला फरक पाहून राणु-बाईस फार आनंद झाला व त्या वधू पाहूं लागल्या. परंतु श्रेष्ठ साशंक होते. वधू पाहण्यास सांगतांना ते म्हणालेः—" माये, मज तुझी आज्ञा प्रमाण । परी तुजप्रती काय बोलिला नारायण । ते तुवां कृपा करोन । एकवार श्रवण करवावें ।। ( श्रीरामकथासारामृत, प्रसंग ६. ३३ ). तंव जननी तया बोलली । जें म्या नारो-बाची भाक घेतली ।। अंतरपाठ धरी तों बोहलीं । तुमच्या बोलीं अनुसरेन ऐसी ।। ( ६. ३४ ) या लागीं धरलिया अंतरपाठ । नारोबा सांपडेल स्पष्ट । टाळी वाजवूं कडकडाट । वाजंत्री घडघडाट लग्नमंडपीं ।। ( ६. ३५ ) तंव मनीं चमत्कारला गंगाधर । म्हणे नारोबा अत्यंत चतुर । माय भोळी शब्दांतर । भाक अरुवार नेणं तें ।। ( ६. ३७ ). " श्रेष्ठांनीं नारायणास लग्नाबद्दल विचारलें, तेव्हां नारायण म्हणालों, " माय जननीचिये आग्रहा । कांहीं भाक बोलिलों पहा ।। परी निधडा शब्द राखेन हा । जे अंतरपाट धरी तों राहेन ऐसा ।। ( ६. ४३ )" नंतर राणु-बाईच्या सांगण्यावरून श्रेष्ठ जवळच असलेल्या आसनगांवीं गेले. तेथें त्यांचे मामा भानजीपंत बोधलापूरकर राहत होते. ते श्रीएकनाथस्वामींचे अनुगृहीत परमभक्त हरिदास होते. नारायण हा अवतारी पुरुष आहे असें त्यांना माहीत होतें. त्यांनीं आपली कन्या नारायणास देण्याचें कबूल केलें. नारायण हा आपला जामात होणार हें पाहून त्यांना फार आनंद झाला. वधू-निश्चय करून श्रेष्ठ घरीं आले. वरवधू-कडील मंडळी लग्नाच्या तयारीस लागली. कांहीं चरित्रकारांनीं लग्नसमारंभाचें चटक-दार वर्णन अलीकडील पद्धतीप्रमाणें केलें आहे त्यांत अविश्वसनीय अद्भुतपणाचा भाग नसला तरी अतिशयोक्तीचा भाग पुष्कळ आहे. रीतीप्रमाणें सीमांतपूजन झाल्यावर वरास समारंभानें वधूगृहीं लग्नमंडपांत आणलें. मुहूर्तघटिकेची नक्की वेळ तंजावर मठाधिपति भीमस्वामी यांच्या त्रोटक चरित्रांत दिली आहे. सदहू चरित्र समर्थसमाधीनंतर लागलीच लिहिलें असल्यानें पूर्ण विश्वसनीय आहे असें मागें पहिल्या भागांत सांगितलें आहेच. म्हणून समर्थांच्या लग्नासंबंधीं त्यांतील एक कडका व अभंग देतों. कडकाः—" नवरी निधान । पाहोनिया बंधुजन । समारंभें निघोन । मुहूर्तेसी जाऊन । केलें विधिविधान । देवदेवक स्थापन । सप्त घटिकेचें लग्न । ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण । वरा वदती अनुसंधान । अंत्रपटीं असो नयन । मंगलाष्टकें निवेदन । करितां म्हणती सावधान । तेव्हां स्वामी अंतःकर्ण । उठे जावें येथून । सारासार विचारून । तेचि संधि साधून । फडकले तेथून । विप्र म्हणती ओम् पुण्य । वरावीण विलक्षण । सर्व होय म्लान दीन रे ।। ६ ।।" अभंगः—"बहू दाटी झाली संधी ते पाहिली । चुकांडी खादली अकस्मात ।। २० ।। नेसलें धोतर उत्तरी दुसरी । पडिले बाहेरी एकाएकी ।। २१ ।। उघडे बोडके मनस्वी फिरती ।

अन्नपान चित्तीं चाड नाहीं ।। २२ ।। बंदीं बहु दिस आडकले होते । सुटे आवचितें तैसें वाटे ।। २३ ।। उदासीन काया उदासीन माया । ते लीला ब्रह्मया न कळेचि ।। २४ ।। पंचगंगातीर परिपूर्ण पूर । पात्र रुंद फार विशाळ तें ।। २५ ।। नांवे उपेक्षिले ते उडी घातली । लोकीं हाक दिली बुडाला रे ।। २६ ।। भवसिंधु-माजी जनासी तारिता । त्यासी काय चिंता मृषा जळ ।। २७ ।। पूर्ण अवतार म्हणतांचि नये । पूर्ण ब्रह्म स्वयें हेंचि खरें ।। २८ ।। " पुढें सात दिवस अहोरात्र अन्नपानशयनाचें स्मरण नव्हतें; नंतर श्रीरामदर्शन झालें, इत्यादि मजकूर आहे. दासविश्रामधामांत लग्न अकरा घटकेचें होतें असा मजकूर आहे. " फाल्गुनमासीं शुद्ध अष्टमी । एकादश घटिका द्वितीययामीं । सुमुहूर्त काळ नेमूनि धामीं । घटिका स्थापिली जलांत ।। ( ५ सर्ग. ७१ )" संतविजयाच्या पहिल्या अध्यायांत पुढील आशयाचा मजकूर आहे. " वधूवर बोहल्यावर आल्यावर उपाध्याय मंगलाष्टकें म्हणून अक्षता टाकतांना ' सावधान ' असें म्हणू लागले. ' सावधान ' याचा अर्थ काय असें नारायणानें आपल्या मेहुण्यास विचारलें. तो विनोदानें म्हणाला, ' आतां पायांत बेडी पडत आहे, सावध व्हा, असें उपाध्यायबुवा सांगत आहेत.' तें ऐकून ' मी सावधच आहें, मातुश्रीची शपथ ही एथपर्यंतच होती ' असें म्हणून श्रीरघुनाथ-स्मरण करून नारायण वायुवेगानें बाहेर पळाला. " जांबगांवीं अश्वत्थाचे वृक्षावर बहुत निबिड व अवघड जागेंत तीन दिवस बसला, नंतर नदी ओलांडून गोदातीरीं नाशिकाजवळ पंचवटीस गेला, असें हनुमंतस्वामी म्हणतात. गांवांतील लोक आसपास झाडांवर रानावनांत एकसारखा शोध करीत होते; तेव्हां तीन दिवस जांबेंतच झाडावर नारायण दडून राहणें सकृद्दर्शनीं शक्य दिसत नाहीं. " समर्थ मंडपांतून निघाले ते जांबेंत अश्वत्थावर तीन दिवस होते " असा मजकूर समर्थवाकेनिशीच्या टिपणांत ही आहे. वाकेनिशीच्या आधारावरच ह. स्वा. च्या बखरींतील मजकूर लिहिलेला दिसतो. दासविश्रामधामांत नारायणास झाडावर लोकांनींच नव्हे तर राणुबाईनीं ही पाहिलें असा मजकूर आहे; ( दा. वि. धाम, सर्ग ५८७-८९ ) तो विश्वसनीय दिसत नाहीं. त्याच दिवशीं वधूचें लग्न दुसऱ्या वराशीं केलें असें ह. स्वा. च्या बखरींत एक विधान केलें आहे तें शक्य असू शकेल. दोन वर्षांपूर्वी कऱ्हाड-गांवीं एक लग्न आयत्या वेळीं वधूवरांचें एक गोत्र आहे असें समजतांना राहिलें. परंतु त्याच मुहूर्तावर वराचें दुसऱ्या वधूशीं व वधूचें दुसऱ्या वराशीं लग्न झालें! दासविश्रामधामांत ही तसाच मजकूर आहे. वधूचे वडील म्हणतात, " पुन्हां नारोबा येईल तरी । कन्या अर्पीन माझी दुसरी ।। ( ५-११२ ) मग त्याच मंडपीं दुजा शोधून । नेमून केलें कन्यार्पण ।। ( ५-१३३ ). "

नारायणानें राणुबाईना अंतरपाट धरीपर्यंत लग्नास नाहीं म्हणणार नाहीं अशी जी शपथ दिली होती ती अक्षरशः पाळिली. मातोश्रींस दिलेली शपथ

पाळून जगदुद्धारार्थ लग्नमंडपांतून निसरण्याचा कोणता मार्ग नारायण काढतो हे पाहण्याकरितां श्रेष्ठ नारायणाकडे हास्ययुक्त मुद्रेनें पाहात होते. नारायण ही श्रेष्ठांकडे हास्ययुक्त मुद्रेनें पाहात होता. "श्रेष्ठांची व समर्थांची नजर होतांच उभयतांनीं परस्परें हांसावें" असा समर्थवाक्‌निशीत मजकूर आहे. नारायण पळून गेल्याबद्दल श्रेष्ठांना कांहीं विशेष आश्चर्य वाटलें नाहीं. कारण कांहींतरी युक्ति काढून तो शपथेंतून मुक्त होऊन पळून जाईल असें त्यांना वाटत होतें असें त्यांच्या हास्ययुक्त मुद्रेनें नारायणाकडे पाहण्यावरून दिसलें. कदाचित् नारायणाची युक्ति श्रेष्ठांना पूर्वी माहीत ही असेल. परंतु कोणत्या ही चरित्रांत त्याचा उल्लेख नाहीं. आईस दिलेली शपथ पाळून सावधान म्हणतांच पळून गेल्याबद्दल कथासारामृतकार म्हणतात, "सावधान सावधान। भिक्षुक बोलती गर्जगर्जुन ।। नारायण म्हणे मी असतां सावधान। वृथा शिकवण हे काईसी ।। ( प्रसंग ६. ३३ ) जननीचा बोल राखिला। हा अंतरपाट फेडिला। मी झालों चहूं देहा मोकळा । विवाह-सोहळा मज काइसा ।। ( ६. ३४ ) ऐसें आवेशें गर्जोन । नारोबा उसळला अतिसत्राण ।। नावरेचि कवणा अणुप्रमाण। घेतलें रान क्षणार्धे ।। "

समर्थांच्या पलायनासंबंधानें गिरिधरस्वामी म्हणतात, " लोक धांविले मध्य-रात्रीं । समर्थ कोणासी न दिसती नेत्रीं ।। पंचक्रोशीं गोदावरीपात्रीं । शुद्ध हरिभक्ति हरिद्रागात्रीं प्रवेशले ।। ( स. प्र. २. ४८ ) समर्थांचें लागलें शुद्ध हरिद्रांग। विमल गोदावरीचें झालें दिव्यांग ।। आपले हृदय-हृदीं ठेवूं म्हणे समर्थांग । श्री-रामराये कृपापांगें ओढिलें ।। ( २. ४९ ) समर्थ लागले गोदावरीच्या दक्षिणतीरीं। महावैराग्य प्रताप तीव्रतर अंतरीं ।। केवळ स्मशानवासी सर्वेश्वर अवतारी । गोदा-तीरीं प्रेत एक जळतां देखिलें ।। ( २. ५०. )" यावरून लग्नमंडपांतून झुकांडी देऊन गेल्यावर नारायण गांवाबाहेरील झाडावर तीन दिवस बसला नसावा. लागलीच ५।६ मैल लांब असलेल्या गोदावरीतीरावर गेला, त्या वेळीं तेथें एक प्रेत जळत होतें, नावेची वाट न पाहतां नारायणानें गोदावरींत उडी टाकली, नारायणाच्या अंगावरील हळदीनें गोदावरीचें पाणी पिंवळें झालें, नारायण रात्रींच नदी पोहून पलीकडे गेला असावा असें दिसतें, या म्हणण्यास भीमस्वामींच्या वर दिलेल्या चरित्रांतील उताऱ्यावरून ही बळकटी येते.

नारायण पळून गेल्यावर लागलींच रात्रीं लोकांनीं चहूंकडे बऱ्याच अंतरा-वर जाऊन शोध केला; परंतु कांहीं पत्ता लागला नाहीं. राणुबाई फार शोक करूं लागल्या. मोठ्या प्रयासानें नारायणाचें मन वळवून अंतरपाट धरीपर्यंत स्वस्थ बसण्याची शपथ घेतली, तेव्हां नारायण आपण दिलेली शपथ अक्षरशः पाळून अशा रीतीनें पळून जाईल अशी त्या माउलीच्या स्वप्नांत ही कल्पना आली नसेल.

लग्नसमारंभाचा सर्व थाट जमलेला, आप्तइष्ट लग्नाकरितां जमलेले, मंगलाष्टकांची गर्जना चाललेली, अशा ऐन वेळीं नारायण एकदम पळून गेलेला पाहून राणुबाईंना किती दुःख झालें असेल याची कल्पना वाचकांनींच करावी. श्रेष्ठांनीं त्यांचें बहुत प्रकारें समाधान केलें. सकाळीं अधिक शोध करूं असें सांगून राणुबाईंना घरीं नेलें. त्याप्रमाणें चारी दिशांस सकाळीं लोक शोधार्थ पाठविले. परंतु नारायणाचा शोध कोणास लागला नाहीं, तेव्हां राणुबाई फार आक्रोश करूं लागल्या. नारायण जेथें असेल तेथें सुखी आहे, तो मारुतीचा अवतार आहे, भिण्याचें कांहीं कारण नाहीं, लवकरच पुन्हा येऊन भेटेल वगैरे समाधानाच्या गोष्टी श्रेष्ठांनीं राणुबाईंना सांगितल्या, परंतु त्याचा कांहीं विशेष उपयोग झाला नाहीं.

समर्थ लग्नांतून पळून गेले यासंबंधानें गिरिधरस्वामी म्हणतात, " ऐसें कोठें नाहीं हो वर्तलें। पूर्वी अवतारादिकांसी नाहीं झालें ॥ मायामोहिनीनें ब्रह्मादिकां भुलविलें ॥ नानापुराणें आम्हीं ऐकिलीं ॥ ( स. प्र. २. ४१ ) समर्थदेवें ख्याती केली। सांगायासी ऐकायासी गोष्ट झाली। मूळ हनुमानमूर्ति प्रत्यया आली। समर्थमाता बोलली तें झालें ॥ ( २. ४२ )." हिंदुस्थान देशांतील व पृथ्वीवरील इतर देशांतील साधुसंतांचीं व थोर पुरुषांचीं अनेक चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत, त्यांत जगदुद्धाराकरितां, लोकसेवेकरितां, लोकसंग्रहाकरितां, दरिद्रीनारायणाच्या अगर लक्ष्मीपतीनारायणाच्या सेवेकरितां लहान वयांत लग्नमंडपांतून पळून गेल्याचें दुसरें उदाहरण इतिहासांत आढळून येत नाहीं. ज्ञानप्राप्तीकरितां, सत्यशोधाकरितां, परमेश्वरप्राप्तीकरितां, गृहस्थाश्रमाचा उपभोग घेतल्यानंतर प्रौढ पुत्रावर प्रपंचभार टाकून वृद्धापकाळीं वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार करून अरण्यवास स्वीकारलेल्यांचीं कांहीं प्रसिद्ध उदाहरणें या आर्यभूमीच्या पूर्वेतिहासांत सांपडतात. प्राचीन काळीं सत्यशोधनार्थ गौतमबुद्धांनीं पत्नीत्याग केला व अर्वाचीन काळीं तुळसीदासांनीं सायुज्यमुक्तीकरितां पत्नीत्याग केला; अशीं हीं पत्नीत्यागाचीं सुप्रसिद्ध उदाहरणें सर्वांना माहीत आहेत. परंतु वरील दोन्ही महापुरुषांनीं विवाहोत्तर कांहीं काल संसारसुखाचा अनुभव घेतला होता व दोघे ही प्रौढ होते. गौतमबुद्धांना एक मुलगा ही झाला होता. बाराव्या वर्षी संसारसुखावर लाथ मारून तपश्चर्येकरितां पळून गेल्याचें दुसरें उदाहरण नाहीं, म्हणूनच अवतारी पुरुषांना जें करितां आलें नाहीं, तें बालनारायणानें बाराव्या वर्षी करून दाखविलें, ही " सांगायास व ऐकण्यास " अभूतपूर्व गोष्ट झाली असें गिरिधरस्वामींनीं म्हटल्याचा जो वर उल्लेख केला आहे तो अगदीं यथार्थ आहे.

समर्थ 'सावधान' शब्द ऐकून लग्नमंडपांतून पळाले अशी हकीकत 'श्रीरामदासजन्मकथा'कारांशिवाय सर्व प्राचीन व सांप्रदायिक चरित्रकारांनीं दिलेली आहे. सूर्याजीपंतांनीं श्रेष्ठांना अनुग्रह दिला, त्या वेळीं त्यांनीं नारायणाला

अद्याप अधिकार नाहीं म्हणून अनुग्रह दिला नाहीं, म्हणून नारायण सूर्याजीपंतांवर रुसून बाहेर गेला, व नंतर प्रहर रात्रीं गोदावरींत उडी टाकून पलीकडे गेला, व पंचवटीस जाऊन तपश्चर्या केली, असें 'रामदासजन्मकथा'कार म्हणतात. 'जन्मकथा'-कारांची सदर्हू गोष्ट आम्हांस विश्वसनीय वाटत नाहीं, त्याचीं कारणें:—

( १ ) सूर्याजीपंत शके १५३७ सालीं मार्गशीर्ष महिन्यांत वारले. नारायणाची मुंज शके १५३६ सालीं झाली; म्हणजे पंतांनीं श्रेष्ठांना अनुग्रह देतांना नारायणास दिला नाहीं ही गोष्ट शके १५३६ सालीं अगर १५३७ सालीं मार्गशीर्ष महिन्याच्या अगोदर झाली असली पाहिजे. म्हणजे त्या वेळीं नारायण ६।७ वर्षांचा होता. इतक्या लहान वयांत मध्यरात्रीं एकट्यानें नदी पोहून जाणें शक्य दिसत नाहीं.

( २ ) श्रेष्ठांना अनुग्रह जांबेंत मारुतीचे देवालयांत श्रीरामचंद्रांनीं दिला असें सर्व प्राचीन चरित्रकार म्हणतात. सूर्याजीपंतांनीं दिल्याचा इतरत्र कोठें उल्लेख नाहीं.

( ३ ) शके १५४२ सालीं नारायणानें गोदातटीं पंचवटीनजीक तपश्चर्येस आरंभ केला असें सर्व चरित्रकार म्हणतात. शके १५३६ अगर १५३७ सालीं नारायणानें गोदातटीं तपश्चर्येस आरंभ केल्याचा इतरत्र कोठें उल्लेख नाहीं.

( ४ ) नारायणास अनुग्रह जांब येथें शके १५३८ नलनाम संवत्सरीं श्रावण शुद्ध अष्टमीस झाला असा प्राचीन चरित्रांत उल्लेख आहे; व तो अनुग्रह-दिवस सर्व सांप्रदायिक लोक पाळतात.

( ५ ) समर्थसमाधीनंतर चारच दिवसांनीं 'समर्थबाकेनिशी' लिहिलेली आहे. त्यांत श्रेष्ठांनीं नारायणास अनुग्रह दिला नाहीं म्हणून नारायण रुसून जांबेंत मारुतीच्या देवालयांत गेला, व तेथें त्यास शके १५३८ सालीं श्रावण शुद्ध अष्टमीस अनुग्रह झाला व लग्नमंडपांतून सावधान म्हणतांना नारायण शके १५४२ सालीं पळून गेला असा स्पष्ट उल्लेख आहे.

( ६ ) तंजावर मठाधिपति भीमस्वामी समर्थांचे प्रत्यक्ष शिष्य होते. त्यांचें चरित्र पूर्ण विश्वसनीय आहे. त्यांत नारायण लग्नांत पळून गेला, एवढेंच नव्हे तर लग्न सात घटकेचें ठरलें होतें व "संधि साधून" नारायण पळून गेला असें स्पष्ट म्हटलें आहे. ( भीमस्वामीकृत चरित्र, कडका ६ )

( ७ ) तिसगांव मठाधिपति दिनकरस्वामी हे ही समर्थांचे प्रत्यक्ष शिष्य होते. नवरीस झिडकारून नारायणानें पलायन केलें असें ते ही म्हणतात. ( स्वानुभव दिनकर, कलाप १६, किरण, ४ ओंवी ८० )

( ८ ) खुद्द समर्थांनीं आपली गुरुपरंपरा सांगितली आहे. त्यांत सूर्याजीपंत वारल्यावर श्रेष्ठांनीं आपणांस अनुग्रह देण्याचें नाकारलें असें स्पष्ट म्हटलें आहे.

कारणापुरता उतारा:—"राघवाची भक्ति सुखाची विश्रांती। पितयाची शांति झाली पुढें ॥ २४ ॥ पुढें ज्येष्ठ बंधु न सांगती कांहीं । सुखें देवालयीं निद्रा केली॥२५॥ निद्रा केली तेथें श्रीरामें उठउनी । तोचि मंत्र कानीं सांगितला ॥ २६ ॥ सांगितला बोध रामीरामदासा । गुरूच्याही वंशा निरोपिलें ॥ २७ ॥"

( ९ ) रामदास व रामदासी, भाग १५, पान २३३, यांत समर्थांचें पुढील पद दिलें आहे, त्यावरून समर्थ नवरीचा त्याग करून पळून गेले हें सिद्ध होतें:— "गोडी लागली रामीं न गुंतत कामीं हो ॥ धृ०॥ कनकमंदिरें सांडुनि सुंदरें विजन सेवियलें। त्यजुनि सुंदरी वसविली दरी चरण भावियले ॥ १ ॥ शुकसनकादिक नारद तुंबर आर्षभादि मुनिराज । दास उदासिन होउनी विचरति सांडुनि राजसमाज ॥ २ ॥" या पदांत समर्थांनीं आत्मचरित्र सांगितलें आहे.

( १० ) दुसरें एक समर्थकृत पद आहे, त्यावरून ही समर्थ लग्नांतून पळून गेले हें सिद्ध होतें:—

"उभी राहे रांडे । शब्द चाळ भांडे ॥ काजळ कुंकु लेवुनि रांडे । किती करिसी नखरा ॥ १ ॥"

"रामदासें पर्णुनि तुजला लग्निं टाकुनि दिलें। साधुसंगति जाणुनिया फार फजित केलें ॥ ५ ॥" या पदांवरून वाङ्निश्चय झाल्यावर सावधान म्हणून अक्षता टाकण्याचे वेळीं नारायण वधू-त्याग करून पळून गेला हें सिद्ध होतें.

( ११ ) 'रामदासजन्मकथा'कारांनीं आपलें नांव दिलेलें नाहीं. ते समर्थ-शिष्य असते तर त्याचा त्यांनीं अभिमानानें उल्लेख केला असता व दिनकर-स्वामींप्रमाणें अनुग्रहवर्णन दिलें असतें. ग्रंथकारानें आपलें नांव दिलेलें नाहीं त्याप्रमाणें जन्मकथा कोणत्या सालीं लिहिली याचा ही उल्लेख चरित्रांत आरंभीं अगर शेवटीं केला नाहीं. श्रीकल्याणशिष्य तडवळें मठाधिपति जगन्नाथमहाराज यांनीं ही कथा लिहिली असावी अशी श्रीयुत देव यांची कल्पना आहे. कल्याणपरंपरेंतील ही आख्यायिका असती तर कल्याण-बंधु शिरगांवकर मठपति भीमस्वामी यांच्या अभंग-बद्ध चरित्रांत तिचा उल्लेख सहज आला असता. पण तसा तो तेथें मुळींच नाहीं. उलट पक्षीं शिरगांवकर भीमस्वामी म्हणतात:—"पुढें पिता शांत होउनिया जात । ज्येष्ठ बंधु करीत प्रपंचासी ॥ ३ ॥ माडीवर अनुग्रह देती तेथें । हे ही अवचितें गेले होते ॥ ४ ॥ ज्येष्ठ बंधु तया न देतीच येवों । म्हणती आतां जाऊं देवापाशीं ॥ ५ ॥ मारुतीच्या देवाल्यांत जातां रामें । भेटोनिया प्रेमें कृपा केली ॥ ६ ॥ ......लग्नमंडपासी समारंभें नेलें । विप्र एक बोले सावधान ॥ ९ ॥ ऐकतांचि शब्द झाले सावधान । केलें पलायन अकस्मात ॥ १० ॥ (अभंग ४)" दासविश्रामधाम हा ग्रंथ ही कल्याण-परंपरेंतीलच आहे. त्यांत लग्नमंडपांतून समर्थ पळून गेल्याचें इतर चरित्रकारांप्रमाणेंच वर्णन आहे, एवढेंच नव्हे तर त्याच अध्यायांत

श्रेष्ठांनीं नारायणाला अनुग्रह देण्याचें नाकारलें म्हणून तो रुसून जांब येथें मारुतीचे देवालयांत गेला असा स्पष्ट उल्लेख आहे. ( दासविश्रामधाम, सर्ग ५, ७८ ते ८५ ) तेव्हां श्रीरामदासजन्मकथाकारांची ही आख्यायिका कल्याणपरंपरेंतील असावी असें आम्हांस वाटत नाहीं. ह. स्वा. च्या बखरींत शिवाजीमहाराजांना समर्थांची गांठ पडली नाहीं, तेव्हां त्यांचा महाराजांना ध्यास लागला, म्हणून समर्थांनीं स्वप्नांत भेट देऊन नारळ दिला अशी एक आख्यायिका आहे. त्याचें अनुकरण करून जन्मकथाकारांनीं सूर्याजीपंतांना व राणुबाईंना स्वप्नांत श्रीरामानें ( श्रीसूर्यनारायणानें नव्हे ) भेट देऊन दोन नारळ व श्रीरामपंचायतन दिलें अशी एक आख्यायिका दिली आहे. समर्थ शिष्य-प्रशिष्य अगर सांप्रदायिक यांच्या कोणत्या ही चरित्रांत यास आधार नाहीं. तेव्हां श्रीरामदासजन्मकथेंतील वर्णन, विशेषतः अनुग्रह दिला नाहीं म्हणून रागावून नाशिकपंचवटीस तपश्चर्येस पळून गेल्याचा वरील भाग विश्वसनीय नाहीं, असें आम्हांस वाटतें.

वरील अकरा कारणांवरून समर्थ शके १५४२ सालीं 'सावधान' शब्द ऐकून लग्नमंडपांतून पळून गेले हीच गोष्ट विश्वसनीय मानली पाहिजे हें सिद्ध होतें. नारायणाच्या पहिल्या बारा वर्षांच्या लीलांचें येथपर्यंत पूर्वचरित्रकारांच्या आधारानें जें वर्णन करण्यांत आलें, त्यावरून तो प्रथम हूड, खोडकर होता व नंतर शके १५३८ सालीं अनुग्रह झाल्यावर कांहीं काळ अगदीं विरक्त होता, लग्नाची गोष्ट काढली असतां त्याला ती आवडत नसे,—"आई चिंता करितों विश्वाची" असें प्रसंगविशेषीं म्हणत असे, ऐवढेंच दिसून येतें. आठव्या वर्षीच नारायणानें अनुग्रह देण्याविषयीं ज्येष्ठ बंधूजवळ आग्रह धरिला, यावरून निसर्गतः त्याची अध्यात्माकडे—निवृत्तिमार्गाकडे—परमार्थाकडे—परमेश्वरप्राप्तीकडे प्रवृत्ति होती एवढें म्हणतां येईल. प्रौढ झाल्यावर परमार्थास व्यवहाराची, अध्यात्मज्ञानास—हरिकथा-निरूपणास—राजकारणाची जी जोड नारायणानें दिली, आपल्या संप्रदायांत राजकारणाचा जो स्पष्टपणें अंतर्भाव केला, त्याचा अस्पष्ट संबंध देखील नारायणाच्या बाललीलांत दिसून येत नाहीं. याचें कारण त्या वेळची जांबगांवची परिस्थिति होय. जांबगांवच्या लोकांच्या धार्मिक प्रवृत्तीचें वर्णन आम्ही समर्थप्रतापांतील उताऱ्यांत दिलेंच आहे.

जांबगांवांतील इतर सामान्य गृहस्थांप्रमाणें सूर्याजीपंत वर्णाश्रमधर्माप्रमाणें चालणारे धार्मिक वृत्तीचे वैराग्यशील सद्‌गृहस्थ होते. त्यांचाच कित्ता श्रेष्ठांनीं उचलला होता. या दोघांच्या समागमांत नारायणाचीं बारा वर्षे गेलीं. तेव्हां तत्कालीन राजकीय उलाढालींची—राजकारणाची—अंधुक झुळुक देखील पहिल्या बारा वर्षांत नारायणाच्या कानांवरून गेली नव्हती. समर्थांच्या बालपणाच्या लीलांत त्यांच्या भावी राजकारणाचा कांहीं उगम सांपडत नाहीं.

# भाग चवथा

## तपश्चर्या

वैराग्य–ज्ञान भरिलें असतां अनन्या ।
आल्या जयाप्रति चतुर्विध मुक्तिकन्या ।।
चौथी तयांत वरिली उरल्यां न पाहे ।
तो आमुचा समर्थ, समर्थ आहे ।। १ ।।

—रघुनाथ पंडित

या भागापासून 'नारायणास' 'समर्थ' या नांवानें आम्ही संबोधणार आहों. कारण लग्नमंडपांतून पळून गेल्यावर पंचवटींत जाऊन नारायणानें जी खडतर तपश्चर्या एक तप ( १२ वर्षे ) केली, त्यायोगानें नारायणास पूर्ण वैराग्य उत्पन्न झालें. सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता अशा चार मुक्ति त्यास आपण होऊन वरण्यास आल्या, नारायणानें चवथ्या सायुज्य मुक्तीचा अंगीकार केला म्हणून रघुनाथ पंडित म्हणतात. "तो आमुचा समर्थ, समर्थ आहे." समर्थांच्या बालपणाचें वर्णन करितांना आम्ही नारायणाचा एकेरी नांवानें उल्लेख करून त्यांच्या बाललीला वर्णन केल्या. लग्नमंडपांतून पळून जाण्याचें अभूतपूर्व कृत्य त्यांनीं केलें; व नंतर तपश्चर्या करून तपःसामर्थ्य वाढवून 'समर्थ' ही पदवी मिळविली. म्हणून या चरित्रांत इतउत्तर 'समर्थ' या नांवानेंच आम्ही त्यांचा नामनिर्देश करणार आहों.

समर्थ लग्नमंडपांतून वायुवेगानें उडी मारून जे पळाले, ते जांबेहून तीन कोसांवर असलेल्या गोदातीरीं आले. नदींतून पोहून पलीकडे गेले व कांठाकांठानें नाशिक-पंचवटीस आले. पंचवटीस जातांना त्यांचे वाटेंत फार हाल झाले. नेसलेलें धोतर व उत्तरीय ( पांघरलेलें ) धोतर यांशिवाय त्यांच्या आंगावर कांहीं नव्हतें. ( तंजावर मठाधिपति भीमस्वामीकृत चरित्र, अभंग २१ ). समर्थ पंचवटीस येत असतांना वाटेंत त्यांनीं मारुतीची आराधना केली. तेव्हां मारुति प्रसन्न झाले व त्यांनीं समर्थांना पंचवटीस आणून श्रीरामाचें दर्शन करविलें. श्रीरामनवमीचा उत्सव असल्यामुळें लोकांची दाटी होती. मध्यरात्रीं मारुति समर्थांस घेऊन श्रीराम-मंदिराच्या गाभाऱ्यांत गेले. श्रीरामचंद्रांनीं मस्तकीं हात ठेवून अनुग्रह दिला व नारायणाचें नांव रामदास ठेविलें, अशी कथा महिपतिबुवा संतविजयांत सांगतात ( अध्याय २ ). परंतु जांब येथें शके १५३८ सालीं मारुतीचे देवालयांत प्रथम श्रीरामचंद्रांनीं अनुग्रह दिला, त्याच वेळीं नारायणाचें नांव रामदास ठेवलें असा

समर्थवाक्केनिशीत स्पष्ट उल्लेख आहे. एकदां प्रथम अनुग्रह झाल्यावर पुन्हां अनुग्रह देण्याची पद्धति नाहीं. तेव्हां पंचवटींत गेल्यावर समर्थांनीं श्रीराममंदिरांत श्रींचें दर्शन घेतलें असणें साहजिक आहे. पुन्हां अनुग्रह देऊन रामदास हें नांव ठेविलें, ही दंतकथा दिसते. पंचवटीस श्रीरामदर्शन झालें. तेव्हां " उदासीन हे वृत्ति जीवीं धरावी । अती आदरें सर्व सेवा करावी ॥ सदा प्रीति लागो तुझे गुण गातां । रघूनायका मागणें हेंचि आतां ॥ १ ॥ " हें सुप्रसिद्ध दहाश्लोकी करुणाष्टक समर्थांनीं केलें असें महिपतिबुवा म्हणतात ( अध्याय २ ). बहुतेक सर्व करुणाष्टकें पंचवटींत तपश्चर्येच्या कालांतच समर्थांनीं केलीं असावींत असें आम्हांस वाटतें. याचें सविस्तर विवेचन याच भागांत पुढें आम्हीं करणार आहों.

नाशिकपासून जवळ पूर्वेस टाकळी या नांवाचें एक गांव आहे. तेथें गोदावरी नदीचा व नंदिनी नदीचा संगम झालेला आहे. समर्थ टाकळीस एका गुहेंत रहात असत व वर सांगितलेल्या पवित्र संगमावर नित्य स्नानास येत असत. त्या पवित्र संगमस्थानीं तेरा कोटी त्रयोदशाक्षरी जपसंख्येचा समर्थांनीं शके १५४२ रौद्रनाम संवत्सरीं, माघ शुद्ध सप्तमी दिवशीं निश्चय केला. प्रातःस्नानसंध्यानमस्कारादि नित्यकर्मे सूर्योदयापूर्वीच आटपून सूर्योदयानंतर दोन प्रहरपर्यंत संगमस्थानीं कंबरेइतक्या पाण्यांत उभें राहून जप करण्याचा समर्थांचा नियम असे. दोनप्रहरपर्यंत कंबरेइतक्या पाण्यांत उभें राहून जप करीत असतां मासे त्यांच्या मांड्यांस व पायांस डसत, त्यायोगें कंबरेखालचें समर्थांचें अंग पांढरें दिसत असे. जपानंतर ब्रह्मयज्ञ करून पंचवटींत ते मधुकरी मागत असत. मधुकरी मागून श्रीरघुपतीस नैवेद्य समर्पण करून टाकळी येथें राहण्याच्या गुहेंत जाऊन भोजन करीत. नंतर तिसरे प्रहरीं पंचवटीस पुराणश्रवणास जात व नंतर संध्याकाळीं टाकळी येथील गुहेंत येत व सायंकाळचें आन्हिक आटपून विश्रांति घेत. अशा तऱ्हेचा समर्थांचा नित्य कार्यक्रम तपश्चर्येच्या बारा वर्षांत अव्याहत चालू होता. संध्याकाळच्या भोजनाचा अगर फलाहाराचा पूर्वचरित्रांत उल्लेख नाहीं. तेव्हां कदाचित् पंचवटींतच तेरा कोटी श्रीरामनामजप करीत असतां समर्थ एक वेळच मधुकरीच्या अन्नावर राहात असत असें ही असण्याचा संभव आहे. श्रीरामदासजन्मकथाकार हे समर्थ रात्रीं रामकुंडांत गळ्याइतक्या पाण्यांत राहून तप करीत असत असें म्हणतात. ( श्री. वि. वि. भाग १, पान २८६ ) या गोष्टीस इतर कोणत्याही चरित्राचा आधार नाहीं.

समर्थांनीं कोणकोणत्या संस्कृत ग्रंथांचें अध्ययन केलें होतें याचा उल्लेख कोणत्या ही चरित्रग्रंथांत नाहीं. परंतु दासबोधाच्या पहिल्या समासांत दासबोधाच्या 'संमतीस' कोणकोणते ग्रंथ घेतले आहेत हें सांगितलें आहे. त्यांत वेद, वेदांत, भागवत, उपनिषदं व भगवद्गीतादि बारा गीतांचा उल्लेख आहे; व प्रसंगविशेषीं त्यांनीं

सदरहू ग्रंथांतील श्लोक समर्थवाङ्मयांत आधाराकरितां उद्धृत केले आहेत. या सर्व संस्कृत ग्रंथांचें अध्ययन या तपश्चर्येच्या बारा वर्षांतच नाशिक-पंचवटीमध्यें झालें असलें पाहिजे. जांब येथें फक्त लिहिणेंवाचणें, जमाखर्च, रुद्र, पुरुषसूक्त येवढेंच समर्थांना शिकविल्याचा पूर्वचरित्रांत उल्लेख आहे. समर्थ बुद्धिमान होते हें दाखविण्याकरितां ते अकरा तासांत (घड्यांत) सर्व वर्ण शिकले, अकरा प्रहरांत वळणदार सुंदर अक्षर (बाळबोध व मोडी) काढावयास शिकले व अकरा दिवसांत उत्तम जमाखर्च करण्यास शिकले असें गिरिधरस्वामी म्हणतात. याचा उल्लेख मागें केलेलाच आहे. गीताभागवतादि ग्रंथ त्यांना लहानपणीं—बारा वर्षे होण्यापूर्वी—शिकविले असते तर समर्थांनीं ते ग्रंथ फार थोड्या अवधींत शिकल्याचा उल्लेख गिरिधरस्वामींनीं अभिमानपूर्वक कौतुकानें केला असता. तेव्हां गीताभागवतादि संस्कृत ग्रंथांचें अध्ययन समर्थांनीं कोठें केलें असावें असा प्रश्न साहजिक उद्भवतो. तीर्थयात्रा समर्थांनीं पायीं चालूनच केली व त्या बारा वर्षांच्या कालांत एकाच क्षेत्रीं अध्ययनाकरितां म्हणून बहुत काळ राहणें शक्य नव्हतें. एका क्षेत्रांत चारआठ दिवस याप्रमाणेंच त्यांचा तीर्थयात्रेंतील काल गेला असला पाहिजे. तीर्थयात्रा करून कृष्णातीरीं आल्यावर समर्थांना ३६ वर्षे झालीं होतीं. व नंतर त्यांचा काल मारुतिस्थापना, रामस्थापना, मठस्थापना, हरिकथानिरूपण व राजकारण यांकरितां संचार करण्यांत गेला. तेव्हां गीता, भागवतादि संस्कृत ग्रंथांचें अध्ययन बारा वर्षांच्या तपश्चर्येच्या कालांत नाशिक-पंचवटीमध्यें झालें असलें पाहिजे. समर्थप्रतापांत १६ व १७ समास 'महापुरुष भोजनें' व 'दुसरी पंगति' असे आहेत. त्या समासांत आद्य शंकराचार्यांपासून तों समर्थांपर्यंत सर्व ग्रंथकारांचा व त्यांच्या प्रमुख ग्रंथांचा उल्लेख आहे. गिरिधरस्वामींच्या तारुण्यांतील कांहीं काल समर्थ-सहवासांत गेला होता; तेव्हां वरील दोन समासांत निर्दिष्ट केलेले ग्रंथ समर्थांना अवगत असल्याशिवाय त्यांचा उल्लेख त्यांनीं समर्थप्रतापांत केला नसता. या सर्व ग्रंथांचें अवलोकन ही या तपश्चर्येच्या कालांतच झालें असलें पाहिजे. लिहिण्यावाचण्याची पूर्वतयारी बालपणीं झाल्यावर गहन ग्रंथांचें अध्ययन करण्यास १२ ते २४ वर्षे हा कालच विहित आहे. तेव्हां या वयांतच समर्थांच्या संस्कृत ग्रंथांचें अध्ययन झालें असलें पाहिजे. समर्थांनीं पंचवटींत श्रीरामनवमीचे उत्सवांत रामायणावर कांहीं दिवस पुराण सांगितल्याचा उल्लेख ह. स्वा.च्या बखरींत आहे. समर्थांनीं बालपणीं जांबेंत पुराण सांगितल्याचा कोणत्या ही चरित्रांत उल्लेख नाहीं. तेव्हां पुराण सांगण्याइतकें समर्थांचें संस्कृत अध्ययन तपश्चर्येच्या कालांत पंचवटींतच झालें असलें पाहिजे हें निर्विवाद सिद्ध होतें. समर्थांनीं पंचवटींत कीर्तन केल्याचा पूर्वचरित्रांत उल्लेख नाहीं, परंतु तीर्थयात्रा संपवितांना पैठणास आल्यावर तेथें कीर्तन केल्याचा उल्लेख आहे. कृष्णातीरीं आल्यावर हनुमानजयंती, रामजयंतीच्या

वेळीं व प्रचारांत ही समर्थ अनेक वेळां कीर्तन करीत. कीर्तनकारांना ही संस्कृत अध्ययनाची जरूरी लागते. तेव्हां समर्थांचें जें संस्कृत अध्ययन झालें तें या तपश्चर्येच्या काळांतच झालें असलें पाहिजे. नाशिक क्षेत्र विद्वान् शास्त्रीपंडितांचें माहेरघर म्हणून त्याचा पूर्वापार लौकिक आहे. तेव्हां कोणातरी एका शास्त्री, पुराणिक अगर पंडिताला गांठून समर्थांनीं आपला दुपारचा काल त्या गुरूजवळ संस्कृत ग्रंथांचें अध्ययन करण्यांत घालविला असला पाहिजे. गीताभागवतादि ग्रंथांचे पाठ समर्थांना देणारे त्यांचे गुरु कोण होते, समर्थांचे सहाध्यायी कोण होते, याबद्दल कोणत्या ही चरित्रग्रंथांत कांहीं माहिती सांपडत नाहीं. नाशिकसारख्या सुप्रसिद्ध क्षेत्रांत त्या वेळीं वैदिक, शास्त्री, पुराणिक बरेच असले पाहिजेत. त्यांच्या वंशजांच्या घरीं समर्थांविषयीं कांहींतरी उल्लेख सांपडणें कोणास ही साहजिक वाटण्याचा संभव आहे. परंतु दुर्दैवाची गोष्ट कीं, कै. राजवाडे व श्री. शंकरराव देव यांना नाशिक-टाकळीच्या संशोधनांत या गोष्टीसंबंधानें अद्याप कांहीं माहिती मिळालेली नाहीं. ह. भ. प. ल. रा. पांगारकर हे अलीकडे बरींच वर्षे नाशिक-पंचवटीस राहतात. ग्वाल्हेरास सहज गेल्या वेळीं त्यांना दत्तात्रयस्वामीलिखित दासबोधाची अस्सल प्रत सांपडली. परंतु नाशिक-पंचवटींत सतत बारा वर्षे राहून ही त्यांना समर्थांच्या बारा वर्षांच्या तपश्चर्येच्या कालांतील समर्थांचे संस्कृतगुरु व सहाध्यायी यांसंबंधीं कांहीं माहिती अद्याप सांपडूं नये हें आश्चर्य होय.

समर्थांच्या कांहीं शिष्यांनीं समर्थचरित्रें लिहिल्याचा ह. स्वा. च्या बखरींत उल्लेख आहे. त्यांत उद्धव गोसावी यांचें ही नांव आहे. उद्धव गोसावी हे समर्थांचे शिष्य होत. नाशिक-पंचवटींतील समर्थ-गुरूंची व समर्थ-गुरुबंधूंची माहिती असण्याचा संभव, समर्थ कृष्णातीरीं आल्यावर झालेल्या त्यांच्या इतर शिष्यांपेक्षां उद्धवांनाच साहजिक अधिक आहे. कारण उद्धवांचा जन्म समर्थांच्या तपश्चर्येच्या कालांत चवथे वर्षी नाशिकसंनिध दशपंचक गांवीं झाला. नंतर आठ वर्षे ते समर्थ-संनिधच होते. समर्थ तीर्थयात्रेहून शके १५६६ सालीं कृष्णातीरीं परत आल्यावर शके १५६७ सालीं त्यांनीं उद्धवांना आपल्याजवळ बोलावून नेलें व नंतर ही ते समर्थसमाधीपर्यंत बराच काल समर्थसहवासांत होते व समर्थसमाधीनंतर कांहीं दिवस सज्जनगडीं होते. त्यांनीं लिहिलेलें विश्वसनीय चरित्र संशोधकांना अद्याप सांपडूं नये व समर्थसमाधीनंतर पुष्कळ वर्षांनीं ऐकीव माहितीवरून 'उद्धवसुत' यांनीं लिहिलेलें समर्थचरित्र उपलब्ध व्हावें हें आश्चर्य होय.

टाकळीस आल्यावर सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत समर्थांची दिनचर्या कशी होती हें वर सांगितलेंच आहे. इतक्या लहान वयांत अशी खडतर तपश्चर्या पाहून लोक नाना प्रकारचे तर्क करूं लागले. जनावेगळी याची ही कसली तपश्चर्या, मायेचें कोणी घरचें मनुष्य नसेल म्हणून यानें तरुण वयांत हें आरंभिलें असावें,

अशा प्रकारें लोक प्रथम प्रथम म्हणूं लागले. लोक आपल्याविषयीं काय बोलत असत याचें वर्णन समर्थांनींच थोडक्यांत दिलें आहेः—" विषयाचीं सोयरीं प्रपंचाचीं सखीं । मिळोनी एकमेकीं करिती मात ॥ १ ॥ यासी काय झालें घडचि कां विघडलें । वयेंवीण लागलें देवपिसें ॥ २ ॥ देव काय आम्हां सकळांपासीं नसे । जनावेगळें कैचें भजन याचें ॥ ३ ॥ हें आधींचि विषय-संसारा उबगलें । पुरुषार्थें सांडवलें अहंतेच्या ॥ ४ ॥ यासि कोणी मोहाचें वडिलधारें नाहीं । म्हणऊनी पाहीं, छंद करी ॥ ५ ॥ न करवे म्हणुनी त्यजिला विषयधंदा ॥ जल्पतसे सदा रामनाम ॥ ६ ॥ रामी रामदास पिसळले माय । म्हणोनि मोकली धाय विषयजनु ॥ ७ ॥ " उद्धवाच्या मृत पित्याला गंगोदक शिंपडून जिवंत करण्यापूर्वीचें हें समर्थांविषयीं लोकमत होतें. नंतर गंगोदकांत दोन प्रहर उभा राहून रामनामाचा जप करणारा हा तरुण महातपस्वी पुरुष आहे अशी पंचवटींतील लोकांची खात्री झाली.

पंचवटीस येऊन समर्थांच्या तपश्चर्येस तीन वर्षे संपण्याच्या सुमारास पुढील अद्भुत गोष्ट घडल्याचा उल्लेख बहुतेक सर्व पूर्वचरित्रकारांनीं केला आहे. नित्यक्रमाप्रमाणें एके दिवशीं समर्थ संगमावर जप झाल्यावर ब्रह्मयज्ञ करीत बसले होते. इतक्यांत एक तरुण सुवासिनी समर्थांजवळ आली व तिनें त्यांना आदरपूर्वक नमस्कार केला. टाकळीच्या उत्तरेस दोन मैलांवर दशकपंचक नांवाचें एक गांव आहे. त्या गांवीं गिरिधरपंत कुलकर्णी या नांवाचे एक अग्निहोत्री तरुण संपन्न ब्राह्मण राहत असत. त्यांची ही स्त्री होती. तिचें नांव अनुपूर्णाबाई होतें. गिरिधरपंतांना क्षयाची व्यथा होती. त्यांनीं पुष्कळ द्रव्य खर्चून अनेक उपचार केले परंतु कांहीं गुण आला नाहीं. रोग असाध्य होऊन त्यांतच त्यांचा अंत झाला. अनुपूर्णाबाई या पतिसेवातत्पर महासाध्वी होत्या. त्यांनीं पतिमरणानंतर सहगमनाचा निश्चय केला व त्या आपल्या गांवाहून पतिशवाबरोबर टाकळीनजिक संगमावर गोदातीरीं आल्या. सहगमनापूर्वी तपस्वी सत्पुरुषांना नमस्कार करावा म्हणून त्या समर्थांजवळ आल्या व त्यांनीं समर्थांना भक्तिपूर्वक नमस्कार केला. कोणी सुवासिनी स्त्री नमस्कार करीत आहे हें पाहून ब्रह्मयज्ञ करीत असतांनाच समर्थांनीं " अष्टपुत्रा सौभाग्यवती भव " असा आशीर्वाद दिला. " या जन्मीं कीं पुढच्या जन्मीं " असें म्हणतांच समर्थांनीं अनुपूर्णाबाईकडे पाहिलें. जवळील आप्तेष्टांनीं बाईचा पति मृत झाला आहे, त्या सती जाण्यास निघाल्या आहेत असें सांगितलें. समर्थांनीं प्रेत जवळ आणण्यास सांगितलें व श्रीरामचंद्राचें स्मरण करून प्रेतावर गंगोदक शिंपडलें. लागलीच प्रेत "राम राम" म्हणत उठलें. समर्थमुखांतून निघालेले सहजोद्गार खरे व्हावयाचे होते म्हणून श्रीरामस्मरणपूर्वक गंगोदक शिंपडल्याबरोबर गिरिधरपंत जिवंत होऊन उठले. "लौकिकानां हि साधूनामर्थं वागनुवर्तते । ऋषीणां पुनराद्यानां

वाचमर्थोऽनुधावति ” ॥ १ ॥ ही उत्तररामचरित्रांतील महाकवि भवभूतीची उक्ति खरी ठरली. प्रेत उठल्यावर समर्थ अनुपूर्णाबाईस म्हणाले, “ बाई, तुम्हांला ‘अष्टपुत्रा सौभाग्यवती भव,’ असा प्रथम आशीर्वाद दिला होता, आतां श्रीरामकृपेनें आणखी दोन पुत्र अधिक होतील.” ही अद्भुत गोष्ट शके १५४२ रुधिरोद्गारि नाम संवत्सरीं वैशाख शुद्ध दशमी दिवशीं झाली. उद्धवजन्मकथा आम्हीं पुढें ‘अद्भुत गोष्टी’ या भागांत त्रोटक दिली आहे व येथें सविस्तर दिली आहे. समर्थांच्या आशीर्वादाप्रमाणें अनुपूर्णाबाईस दहा पुत्र झाले व गिरिधरस्वामींनी आडनांव दशपुत्रे असें पडलें. त्यांच्या वंशजांस तें आडनांव अद्याप मुळ आहे. अनुपूर्णाबाईंना पहिला मुलगा झाला त्याचें नांव उद्धव ठेवलें. त्यांनीं तो मुलगा समर्थकृपेनें व समर्थप्रसादानें झाला म्हणून तो समर्थांस अर्पण केला. समर्थांचे पुढें हजारों शिष्य झाले; परंतु समर्थांच्या मांडीवर खेळण्याचें भाग्य उद्धवाशिवाय इतर कोणा शिष्याच्या वांट्यास आलें नाहीं. शिष्यवर कल्याणस्वामी यांच्या ही वांट्यास हें भाग्य आलेलें नव्हतें. उद्धव बोलूं लागल्यावर त्याला “ प्रपंची होसी कां परमार्थी होसी ? ” असें कौतुकानें समर्थ विचारीत असत. ( प्र. ) “ शुकासारिखें पूर्ण वैराग्य ” असणाऱ्या समर्थांचा ज्याला जन्मापासून सहवास झाला तो भाग्यशाली उद्धव प्रपंची होईन असें कसें उत्तर देईल ! असो. या चमत्कारापासून समर्थांची थट्टा व टवाळी करणारे लोकसुद्धां त्यांची स्तुति करूं लागले व त्यांच्याविषयीं अत्यंत पूज्यबुद्धि दाखवूं लागले. उद्धवाचा जन्म झाल्यावर समर्थ पंचवटीस आठ वर्षे होते. उद्धवाची मुंज समर्थसन्निध असतांना झाली. समर्थांचा तेरा कोटि जप शके १५५४ सालीं संपला. तेव्हां श्रीरामचंद्रांनीं त्यांना दर्शन दिलें, आणि, शिवछत्रपतींचा जन्म भोंसले कुळांत झाला आहे, ते शंकराचा अवतार आहेत, म्लेच्छांचा उच्छेद करून स्वराज्यस्थापना व स्वधर्मस्थापना करण्यास त्यांना साहाय्य करण्यास कृष्णातीरीं जावें, असें समर्थांना सांगितलें. तीर्थयात्रा केल्यानंतर आज्ञेप्रमाणें कृष्णातीरीं जातों, असें समर्थ म्हणाले, असा कथाभाग पूर्वचरित्रग्रंथांत सांगितला आहे. बालउद्धव या वेळीं आठ वर्षांचा होता. तीर्थयात्रेस मी बरोबर येतों म्हणून उद्धव पाठीस लागला. हल्लींप्रमाणें त्या वेळीं टांगे, मोटारी व आगगाड्या नव्हत्या. हल्लीं अगदीं लहान मुलास घेऊन देखील विनश्रमानें सर्व तीर्थयात्रा एकदोन महिन्यांत करतां येतात. समर्थकालीं हल्लींप्रमाणें सोयी नव्हत्या. व समर्थांना टपालाच्या शिपायाप्रमाणें केवळ स्थळदर्शन घेऊन यावयाचें नव्हतें; म्हणून त्यांनीं उद्धवास बरोबर घेतलें नाहीं. “ तुझें वय लहान आहे, तुला प्रवासांतील कष्ट सोसणार नाहींत, मी परत येईपर्यंत येथें रहा ” असें समर्थांनीं उद्धवास सांगितलें. उद्धव गडबडा लोळूं लागला, तेव्हां त्याची समजूत घातली व त्याचे मस्तकीं वरदहस्त ठेवून त्यास अनुग्रह दिला.

त्याचे करितां गाईचे शेणाची एक मारुतीची मूर्ती तयार केली; व तिची यथाशास्त्र प्राणप्रतिष्ठा करून दिली. हा समर्थकृत पहिला मारुति होय. तीर्थयात्रेहून परत येईपर्यंत नित्य मारुतीची पूजा करण्यास व भिक्षा मागून पुरश्चरण करण्यास समर्थांनीं उद्धवास सांगितलें. पंचवटीहून तीर्थयात्रेस जाण्यास समर्थ शके १५५४ सालीं फाल्गुन शुद्धपक्षांत निघाले. ( समर्थवाकेनिशी, टिप्पण १२ )

याच वर्षी म्हणजे शके १५५४ सालीं " पुष्पाच्या गोष्टींचें चरित्र झालें " असा समर्थबाकेनिशींत टिप्पण ११ यांत उल्लेख आहे. पुष्पाच्या गोष्टीचें चरित्र म्हणजे, समर्थांच्या रामायणावरील पुराणास बटुवेषधारी मारुति येत असत, तेव्हां समर्थ व मारुति यांच्यामध्यें रावणाच्या बागेंतील कणेरीचीं फुलें पांढरीं होतीं कीं तांबडीं होतीं यासंबंधानें झालेला वाद होय. ही पुष्पाची गोष्ट पुढें ' अद्‌भुत गोष्टी ' या भागांत दिली आहे.

हल्लीं नवीन उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक कागदपत्रांवरून, समर्थ तीर्थयात्रेस निघण्यापूर्वी एक वर्ष म्हणजे शके १५५३ सालीं, छत्रपति शिवाजीमहाराज यांचे वडील शहाजीराजे भोसले यांची छावणी नाशिक येथें होती असें सिद्ध झालें आहे. व उद्धवजन्मानंतर समर्थांची ख्याति त्या भागांत फार झाली होती. तेव्हां शहाजीराजे यांचा मुक्काम नाशीक छावणींत असते वेळीं ते समर्थांच्या दर्शनास गेले असावेत व बालशिवजन्मकथा त्यांनीं समर्थांना विदित केली असावी, असें अनुमान करण्यास बळकट जागा आहे. त्या वेळच्या प्रचलित राजकारणासंबंधानें ही दोघांचें बोलणें झालें असावें असें श्री. अनंतदास म्हणतात. ( स. गा. ) तीर्थयात्रेवरून समर्थ परत आल्यावर शहाजी राजे—शिवाजी राजे—यांच्या ताब्यांत असलेल्या मसूर प्रांतींच प्रथम राहण्यास गेले व त्या प्रांताच्या आसपासच अकरा मारुति स्थापन केले, यावरून वरील अनुमान खरें असावें असें आम्हांस वाटतें.

समर्थांची कविता फार मोठी आहे. तिच्याविषयीं विवेचन पुढें एका स्वतंत्र भागांत आम्ही करणार आहों. या भागांत त्यांना प्रथम काव्यस्फूर्ति केव्हां व कोठें झाली याविषयीं विवेचन करण्याचें योजिलें आहे. समर्थांच्या प्रथम काव्याची शक, मिति त्यांनीं कोठें दिली नाहीं व शिष्यप्रशिष्यांच्या चारित्रांत ही कोठें सांपडत नाहीं. याविषयीं आत्मारामभहाराज म्हणतात, " कवनवर झाला कवण्या समयीं । प्रथमपद वदले कोणते ठायीं । अंकित आरंभिति कवणा ही । नसेचि विदित निःसंगीचे ॥ ( दासविश्रामधामसोपान, १३-९७ )" समर्थांना प्रथम काव्यस्फूर्ति पंचवटींत श्रीरामदर्शन झाल्यावर झाली व करुणाष्टकें, निदान त्यांतील बरींच करुणाष्टकें, त्यांनीं पंचवटीस आल्यावर लिहिलीं असें आम्हांस वाटतें. एक करुणाष्टक तर समर्थांनीं पंचवटींत केल्याबद्दल ते स्वतःच ग्वाही देत आहेत. तें असें:— " नव्हे राजयोगी महद्भागत्यागी । उदासीन जो वीतरागी विरागी ॥ जनस्थान

गोदातटीं वास केला । प्रभू देखिला दास संतुष्ट झाला ॥ " नाशिक-पंचवटीस जनस्थान म्हणतात हें सुप्रसिद्ध आहे. लग्नमंडपांतून पळून पंचवटीस आल्यावर प्रथम समर्थांनीं श्रीरामाचें दर्शन घेतलें. श्रीरघुपतींचें दर्शन घेतल्यावर समर्थांना फार संतोष वाटला व त्या संतोषाचें पर्यवसान 'प्रभुदर्शन' या करुणाष्टकांत झालें. या करुणाष्टकांत एकंदर पांच श्लोक आहेत व प्रत्येक श्लोकाच्या शेवटीं " प्रभू देखिला दास संतुष्ट झाला " असें आहे. सुप्रसिद्ध रामायणकवि वाल्मीकिऋषि यांना प्रथम काव्यस्फूर्ति कशी झाली याविषयीं पुढील कथा प्रसिद्ध आहे. एका पारध्यानें एका क्रौंच पक्ष्याला बाणानें मारून पाडलेलें वाल्मीकींनीं पाहिलें. तेव्हां त्यांना फार गहिंवर आला. मृत पक्ष्यास पाहून त्यांनीं फार शोक केला व त्या पारध्यास शाप दिला. तो शोकोत्तर शापच वाल्मीकि ऋषींची पहिली काव्यस्फूर्ति होय. वाल्मीकि ऋषींनीं पुढील शाप दिलाः—मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः । यत् क्रौंच-मिथुनादेकमवधीः काममोहितम् ॥ १ ॥ भावार्थः–हे पारध्या, ज्या अर्थी तूं काममोहित झालेल्या क्रौंच पक्षाच्या जोडप्यापैकीं एकाला ठार मारलेंस, त्या अर्थीं तुला कैक वर्षे सद्गति मिळणार नाहीं. रामायणकार वाल्मीकि कवीचा हा पहिला श्लोक या कथाभागास अनुलक्षून महाकवि कालिदास म्हणतातः— श्लोकत्व-मापद्यत यस्य शोकः ॥ ( रघुवंश-सर्ग १४. ) अर्थ—ज्याचा ( वाल्मीकीचा ) शोक श्लोकांत परिणत झाला, ज्याचा शोक श्लोकाप्रत पावला. त्रेतायुगांतील रामायणकारांप्रमाणें कलियुगांतील रामायणकारांची स्थिति झाली. 'सावधान' शब्द ऐकल्यावर लग्नमंडपांतून समर्थ पळाले ते गोदावरी नदींतून पोहून अलिकडे आले. नंतर रानावनांतून प्रवास करून पंचवटीस आले. तेव्हां त्यांना फार त्रास झाला होता. श्रीरामचंद्राची सगुण मूर्ति पाहून समर्थांना फार संतोष झाला. त्याचें पर्यवसान " प्रभू देखिला दास संतुष्ट झाला " या 'प्रभुदर्शन' करुणाष्टकांत झालें. वाल्मीकीच्या प्रथम काव्यस्फूर्तीच्या श्लोकाविषयीं " श्लोकत्वमापद्यत यस्य शोकः " असें कालिदासानें म्हटलें आहे; त्याप्रमाणें समर्थांच्या प्रथम काव्यस्फूर्तीच्या करुणाष्टकाविषयीं ही " श्लोकत्वमापद्यत यस्य तोषः " असें म्हणतां येईल असें आम्हांस वाटतें. 'प्रभुदर्शन' झाल्यावर " रघूनायका मागणें हेंचि आतां " हें दुसरें अष्टक लिहिलें असावें असें दिसतें. पंचवटींत श्रीरामदर्शन झाल्या-वर श्रींनीं समर्थांना वर मागण्यास सांगितलें, तेव्हां "उदासीन हे वृत्ति जीवीं धरावी । अति आदरें सर्व सेवा करावी ॥ सदा प्रीति लागो तुझे गुण गातां । रघुनायका मागणें हेंचि आतां ॥ १ ॥ " हें नऊ श्लोकांचें अष्टक करून समर्थांनीं वर मागितला असें विधान संतविजयकारादि कांहीं पूर्वचरित्रकारांच्या ग्रंथांत सांपडतें, त्यायोगानें आमच्या वरील म्हणण्यास पुष्टि येते. पंचवटींत श्रीरामदर्शन घेऊन नंतर समर्थ टाकळीस गुहेंत राहण्यास गेले व तेथून तपश्चर्येकरितां नित्य संगमावर येत, तेव्हां लोक त्यांच्या-

विषयीं अनेक तर्ककुतर्क करीत, याविषयीं समर्थांचेंच एक स्फुट वर या भागांत दिलें आहे. ( विषयांची सोयरी प्रपंचाची सखी। मिळोनी एकमेकीं करिती मात॥ इत्यादि. ) त्यानंतर उद्धवजन्म होऊन समर्थांची कीर्ति सर्वतोमुखीं होईपर्यंत कांहीं करुणाष्टकें केलीं असावींत असें त्यांतील वर्णनावरून दिसतें. त्यांपैकीं कांहीं सुप्रसिद्ध अष्टकें खालीं देतों. "अनुदिनि अनुतापें तापलों रामराया" हें पंधरा श्लोकी अष्टक सुप्रसिद्ध आहे. लग्नमंडपांतून पळून आल्यामुळें प्रिय वृद्ध माता व प्रिय ज्येष्ठ बंधु यांचा नुकताच वियोग झाला होता; श्रीरामाचे भजनाशिवाय काल गेला होता, जांबेंत असतांना स्वजनधनाचा स्वार्थ करावा लागला होता वगैरे मनांत घोळणाऱ्या गोष्टींचें हुबेहुब वर्णन समर्थांनीं या अष्टकांतील पुढील श्लोकांत केलें आहेः—(अ) " चपळपण मनाचें मोडतां मोडवेना। **सकळ स्वजनमाया तोडता तोडवेना** ॥ घडघडि विघडे हा निश्चयो अंतरींचा। म्हणउनि करुणा हे बोलतों दीनवाचा ॥ १ ॥ (आ) भजनरहित रामा सर्व ही जन्म गेला। **स्वजनजनधनाचा व्यर्थ म्या स्वार्थ केला** ॥ रघुपति मति माझी आपुलीशी करावी। सकळ त्यजुनि भावें कास तूझी धरावी ॥ १ ॥" "रामावर भार" हें अष्टक ही पंचवटीस आल्यावर लागलींच केलें असें त्यांतील संदर्भावरून दिसतेंः—"**नसे भक्ति ना ज्ञान ना ध्यान कांहीं** । नसे प्रेम हें रामविश्राम नाहीं ॥ **असा दीन अज्ञान मी दास** तूझा। समर्था जनीं घेतला भार माझा ॥ १ ॥ जनीं बोलती दास या राघवाचा। परी अंतरीं लेश नाहीं तयाचा ॥ २ ॥ दिनाचें उणें दीसतां लाज कोणा। तुझा दास दीसे सदा दैन्यवाणा ॥ ३ ॥" "बुद्धि दे रघुनायका" हें वीस अनुष्टुप् छंदाचें अष्टक ही याच सदरांत येतें. वयाच्या बाराव्या वर्षीं पळून आलेले समर्थ पंचवटींत सगुण श्रीरामाला हृदय मोकळून जें बोलले त्याचें उत्कृष्ट चित्र या अष्टकांत आहे:—"युक्ति नाहीं बुद्धि नाहीं विद्या नाहीं विवेकिता। नेणता भक्त मी तूझा बुद्धि दे रघुनायका ॥ १ ॥ अन्न नाहीं वस्त्र नाहीं सौख्य नाहीं जनांमध्यें। आश्रयो पाहतां नाहीं बुद्धि दे रघुनायका ॥ २ ॥ देईना पुर्विना कोणी उगेचि जन हांसती ॥ ३ ॥ **पिशुनें वाटती सर्वे कोणी** ही मजला नसे ॥ ४ ॥ **उदास वाटतें जीवीं** आतां जावें कुणीकडे ॥ ५ ॥" या अष्टकांतील वरील उताऱ्यावरून तपोबलानें आत्मविश्वास येण्यापूर्वी पंचवटींत आल्यावर लोक समर्थांना हांसत होते तेव्हां तें केलें आहे हें स्पष्ट दिसतें. "उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥" हें दहा श्लोकांचें अष्टक ही समर्थ पंचवटींत आल्यावर लागलींच केल्याचें दिसतें; कारण त्यांत खालील उद्गार आढळतातः..."**घरें सुंदरें सौख्य नानापरीचें** । परी कोण जाणेल तें अंतरींचें ॥ मनीं आठवीतांचि तो कंठ दाटे। उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ १ ॥ **बळें लावितां चित्त कोठें** जडेना। **समाधान तें कांहीं** केल्या घडेना ॥ नव्हे धीर नयनीं सदा नीर लोटे। उदासीन

हा काळ कोठें न कंठे ॥ २ ॥ " कंठ दाटणें, डोळ्यांत पाणी येणें, कांहीं केल्या समाधान न होणें, अशा प्रकारची मन:स्थिति पंचवटींत आल्यानंतर लागलीच होण्याचा संभव आहे; तपश्चर्या संपून पूर्ण वैराग्यज्ञान झाल्यावर असणें संभवत नाहीं. टाकळी मठांत कांहीं श्लोक संशोधनांत सांपडलेले 'रामदास रामदासी,' भाग १५, सांप्रदायिक विविध विषय भाग १, लेखांक ३१, यांत प्रसिद्ध केले आहेत. मूळ श्लोक दहा होते. शेवटचे चार गहाळ झाले आहेत. पहिले सहाच सदर लेखांकांत छापले आहेत. ते ही समर्थ पंचवटींत आल्यावर प्रथम त्यांना लोक त्रास देत होते त्या वेळचे आहेतः—"निपट कपट नाहीं अंतरामाजिं कांहीं। परि मज जन देखों कां शकेना कदा ही ॥ निवळ निवळ माझें चित्त हें देवराया। बहुतचि नर मातें इच्छिति कां अपाया ॥ १ ॥ बहुताचि पिळपेचें, प्राण जातो दयाळा। मजवरि करुणेचा ओघ लोटीं कृपाळा ॥ कच कच न करीतां तो तिढा प्राप्त होतो। बहुताचि शिण होतो अंतरीं शोक येतो ॥ २ ॥" विस्तारभयास्तव अधिक श्लोक देत नाहीं. या श्लोकांवरून निष्कपटी समर्थांचा ही द्वेष करणारे व त्यांचा उत्कर्ष सहन न करणारे, त्यांना कठोर बोलणारे लोक, समर्थ पंचवटींत आले तेव्हां, होते व त्यांचें वर्णन समर्थांनीं वरील सहा श्लोकांत केलें आहे. "रघूनायका काय कैसें करावें" व "तुजवीण रामा मज कंठवेना" हीं अष्टकें ही समर्थ पंचवटींत आल्यानंतर लागलींच केलेलीं दिसतात. विस्तारभयास्तव आणखी उदाहरणें देत नाहीं. समर्थ परिणतप्रज्ञ झाल्यावर ग्रंथराज दासबोध, मनोबोध, स्फुट प्रकरणें प्रभृति उत्कृष्ट काव्यग्रंथ लिहून त्यांनीं कर्तव्यमूढ महाराष्ट्रजनतेस जागृत करून महाराष्ट्रधर्म शिकविला, त्या काव्यग्रंथाचा ओनामा समर्थांनीं पंचवटींत कांहीं करुणाष्टकें करून केला. "हेळामात्रें मुक्त करिन या जना। तरीच पावन राघवाचा ॥ राघवाचा दास मी झालों पावन। पतित तो कोण असों शके ॥१॥" असें पूर्ण वैराग्यज्ञानप्राप्तीनंतर आत्मविश्वासदर्शक काव्य त्यांच्या दिव्य वाणींतून निघण्यापूर्वींचीं पंचवटींत आल्यावर केलेलीं करुणाष्टकें ही समर्थांची प्रथमारंभींची कविता आहे, हें वाचकांच्या निदर्शनास आणण्याकरितां वरील विवेचन केलें आहे.

१२ ते १५ या वयांत अगर १५ ते १८ या वयांत म्हणजे समर्थांच्या तपश्चर्येच्या पूर्वार्धांत समर्थांना काव्यस्फूर्ति होऊन त्यांनीं करुणाष्टकें कशीं केलीं असतील—इतक्या लहान वयांत कशीं केलीं असतील—अशी शंका घेण्याचें कारण नाहीं. जगांतील पुष्कळ मोठ्या कवींनीं अगर ग्रंथकारांनीं लहानपणापासून कविता अगर ग्रंथ करण्यास आरंभ केल्याचीं उदाहरणें आहेत. ज्ञानदेवांनीं ज्ञानेश्वरीसारखा गहन ग्रंथ वयाच्या १८ व्या वर्षी लिहिला. आद्य श्रीशंकराचार्यांनीं गीता-उपनिषदांवरील भाष्यें करण्यास ही तरुण वयांतच आरंभ केला. आचार्यांची मुंज समर्थांप्रमाणें ५व्या वर्षी झाली, त्यांनीं नवव्या वर्षी संन्यास घेतला व शृंगेरीमठाची

स्थापना केली व वेदोपनिषदांचें अध्ययन करून मंडनमिश्रासारख्या जाड्या विद्वानाचा वादांत पराजय करून त्यास शिष्य केलें. आचार्यांची इहलोकींची यात्राच मुळीं ३२व्या वर्षी संपली. आंग्ल कवि पोप हा ७व्या वर्षीच कविता करूं लागला. तेव्हां साधारण मनुष्याच्या उदाहरणावरून थोर लोकांच्या कृतीविषयीं अनुमान करणें योग्य होणार नाहीं. "तेजसां हि न वयः समीक्ष्यते" असें कालिदासानें म्हटलें आहे; तो न्याय समर्थज्ञानेश्वरादि थोर विभूतींस लावल्यास समर्थांनीं १२।१५व्या वर्षी कांहीं करुणाष्टकें केलीं, १८ व्या वर्षी ज्ञानदेवांनीं ज्ञानेश्वरी लिहिली, याचें कोणास आश्चर्य वाटणार नाहीं.

## तीर्थयात्रा

अयोध्या, मथुरा, माया[१], काशी, कांची, अवंतिका[२] ।
पुरी द्वारावती चैव सप्तैता मोक्षदायिकाः ॥ १ ॥

वरील श्लोकांत उल्लेखिलेलीं सात क्षेत्रें मोक्षदायक आहेत, असा भाविक भारतवासियांचा समज आहे. म्हणून भरतखंडांतील इतर पवित्र क्षेत्रांची यात्रा झाली तरी या सात मोक्षदायक क्षेत्रांची यात्रा झाल्याशिवाय जन्माचें सार्थक झालें असें भाविक यात्रेकरू समजत नाहींत. समर्थ या सुप्रसिद्ध तीर्थक्षेत्रांना गेले होतेच; परंतु यांशिवाय चार धामें, बारा ज्योतिर्लिंगें व भरतखंडांतील इतर प्रसिद्ध क्षेत्रें या ठिकाणीं ही ते तीर्थयात्रेस गेले होते. कोणत्या क्रमानें त्यांनीं प्रवास केला, याविषयीं क्वचित्प्रसंगीं चरित्रकारांमध्यें भेद असला तरी भरतखंडांतील चारी दिशांच्या क्षेत्रांत त्यांनीं तीर्थयात्रेकरितां प्रवास केला याविषयीं मतभेद नाहीं.

समर्थांच्या तीर्थयात्रेचें "तीर्थावळी" नांवाचें समर्थकृत एक प्रकरण संशोधकांना इंदूरबोधन मठामध्यें सांपडलें आहे. तें रामदास आणि रामदासी, भाग १७–(श्रीसांप्रदायिक विविध विषय) यांत प्रसिद्ध झालें आहे. (पृष्ठें १ ते ८) त्यांत समर्थ ज्या ज्या क्षेत्रीं गेले होते, त्यांचा फक्त नामनिर्देश आहे; परंतु तो नामनिर्देश कालक्रमानें दिलेला नाहीं.

समर्थांच्या तपश्चर्याकालांतील नाशिक-पंचवटींतील त्यांच्या संस्कृतगुरूंची व गुरुबंधूंची जशी अद्याप कांहीं माहिती लागलेली नाहीं, त्याप्रमाणें त्यांच्या बारा वर्षांच्या तीर्थयात्रेंतील प्रवासबंधूंची अगर सहयात्रेकरूंची ही कांहीं माहिती अद्याप लागलेली नाहीं. समर्थ बारा वर्षे नाशिक-पंचवटींत होते; तेव्हां त्यांचा बऱ्याच गृहस्थांशीं परिचय झाला असला पाहिजे. समर्थ कृष्णातीरीं आल्यावर त्यांनीं एक कविताबद्ध पत्र, पंचवटींतील रामोपासकांस लिहिलें, तें पुढें ५व्या भागांत दिलें

१. हरिद्वार. २. उज्जयिनी.

आहे. त्यांत ते म्हणतात:—" इतुकें देवाली मागावें तुम्ही बंधुवर्गी ॥ ८ ॥ " तेव्हां त्यांचे कांहीं बंधुवर्ग पंचवटीस होते हें सिद्ध होतें. समर्थ तीर्थयात्रेस निघाले, तेव्हां उद्धवासारखा ७।८ वर्षांचा मुलगा जर त्यांच्या बरोबर जाण्यास तयार झाला, तर समर्थांची खडतर तपश्चर्या पाहून त्यांच्याविषयीं पूज्य-बुद्धि असलेल्या कांहीं भाविक गृहस्थांना व त्यांच्या बंधुवर्गांना त्यांच्या सारख्या साधूबरोबर तीर्थयात्रेस जाण्याची उत्कट इच्छा झाली असली पाहिजे. कै. लोकमान्य टिळक अगर महात्मा गांधी राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनास 'स्पेशल' गाडींतून निघाले कीं, त्या गाडींतून जाण्यास प्रतिनिधींची किती अहमहमिका होते हें वाचकांना सांगण्याची जरूरी नाहीं. समर्थकालीं हल्लींप्रमाणें 'स्पेशल' गाड्यांतून सुखानें प्रवास करण्याचीं साधनें नव्हतीं, तरी त्या वेळच्या कष्टतर साधनानें सुद्धां सत्पुरुषांबरोबर तीर्थयात्रेच्या प्रवासाचा सुदैवानें लाभ झाल्यास, त्यांत धन्यता मानणारे त्या काळीं कांहीं लोक तरी असले पाहिजेत. परंतु समर्थांबरोबर तीर्थयात्रा करणाऱ्या भाग्यवान् गृहस्थांचा नामनिर्देश समर्थांच्या एका ही चरित्रांत आढळून येत नाहीं. समर्थांबरोबर तीर्थयात्रेस कोण कोण गेले होते याची प्रत्यक्ष माहिती समर्थशिष्यांपैकीं एका उद्धवासच असण्याचा संभव आहे. समर्थांनीं बारा वर्षांच्या तीर्थयात्रेंत ज्या अनेक लीला केल्या, त्यांचें सविस्तर वर्णन उद्धवगोसावी यांनीं लिहिलें आहे, असा उल्लेख समर्थवांकेनिशीच्या १३व्या टिपणांत आहे. तें उद्धवकृत समर्थतीर्थयात्रेचें वर्णन संशोधकांना सांपडेल तो सुदिन होय.

समर्थांच्या तीर्थयात्रेचें वर्णन यथाक्रम सविस्तर श्रीसमर्थप्रतापकारांनीं कां दिलें नाहीं तें समजत नाहीं. इतर चरित्रकारांपेक्षां त्यांना प्रत्यक्ष माहिती मिळण्याचीं साधनें अधिक होतीं. समर्थप्रतापाच्या तिसऱ्या भागांत तीर्थयात्रेचें अगदीं त्रोटक वर्णन आहे, पण तें ही कालानुक्रमानें व स्थलानुक्रमानें नाहीं. शिरगांवमठाधिपति भीमस्वामीकृत भक्तलीलामृतांत दोन अभंगांत १० । १२ क्षेत्रांचीं नांवें देऊन समर्थांची बारा वर्षांची तीर्थयात्रा संपविली आहे. ह. स्वा.च्या बखरीच्या आधारानेंच प्रायः आम्हीं समर्थांच्या तीर्थयात्रेची हकीगत दिली आहे.

नाशिकहून समर्थ प्रथम एकदम काशीस गेले. मध्यंतरीं कोणत्या ही ठिकाणीं उतरल्याचा उल्लेख कोणत्या ही चरित्रांत नाहीं. काशी येथें श्रीविश्वेश्वराचें दर्शन घेतलें व यथाविधि सर्व क्षेत्रकृत्यें केल्यावर प्रयाग व गया येथें जाऊन त्रिस्थळी यात्रा आटपून पुन्हा काशीस येऊन कांहीं दिवस ते तेथें राहिले. हनुमंत घाटावर मारुति नव्हता, तेथें मारुतीची स्थापना केली. हा समर्थकृत दुसरा मारुति होय. पहिला उद्धवाकारितां टांकळी येथें स्थापलेला व हा दुसरा. नंतर समर्थ अयोध्येस गेले.

## श्री समर्थांच्या तीर्थयात्रेंतील प्रमुख
# क्षेत्रें

श्रीनगर
गंगोत्री
केदारेश्वर
मानस सरोवर
ब्रह्मपुत्रा नदी
बदरीनारायण
हरिद्वार
सिंधु नद
मथुरा
अयोध्या
प्रयाग
काशी
ब्रह्मपुत्रा
यमुना नदी
गंगा नदी
गया
अवंतिका
ओंकारेश्वर
द्वारका
नर्मदा नदी
सोमनाथ
नाशीक
त्र्यंबकेश्वर
पैठण
जगन्नाथपुरी
महाबळेश्वर
गोदावरी नदी
परशुराम क्षेत्र
पंढरपूर
सप्त गोदावरी
करवीर
कृष्णा नदी
गिरी
श्रीरंगपट्टण
रामेश्वर
सेतुबंध
लंका

BALODYAN PRESS.

श्रीरामचंद्र हें समर्थांचें आराध्यदैवत. समर्थांस अनुग्रह प्रत्यक्ष श्रीरामाचा. तेव्हां अयोध्यानगरीं गेल्यावर समर्थांना गृहीं गेल्यासारखें होऊन दशरथराजाची व रामराजाची राजधानी व भव्य व अफाट शरयूतीर पाहून अत्यानंद झाला असेल. " पुरी वाहिली सर्व जेणें विमानीं । नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥ ( मनोबोध २९ ) " असें ज्या अयोध्यानगरीचें समर्थांनीं मनोबोधांत वर्णन केलें आहे, त्या अयोध्यानगरींत समर्थ अकरा महिने राहिले होते, असें आत्मारामबुवा चरेगांवकर समर्थचरित्रांत म्हणतात ( अध्याय ८.२० ). समर्थकालीं अयोध्येंत पूर्वपरंपरागत श्रीराममंदिर होतें अगर नव्हतें हें समजण्यास निश्चित मार्ग नाहीं. दशरथराजाच्या वाड्यांतील रामजन्माच्या ठिकाणीं राममंदिर होतें, तें मंदिर औरंगजेब बादशहानें पाडलें व त्या ठिकाणीं मशीद बांधली असें तेथील लोकांनीं आम्हांस तेथें सांगितलें. हल्लीं जें भव्य राममंदिर बांधलें आहे तें अलीकडे एका हिंदु राजानें बांधलेलें आहे. समर्थ तीर्थयात्रेस शके १५५४ सालीं फाल्गुनांत म्हणजे सन १६३२ सालीं निघाले. सन १६३४ अगर १६३५ सालीं ते काशीहून अयोध्येस गेले असतील. बापाला कैदेंत टाकून व तीन बंधूंना मारून औरंगजेब सन १६५८ त गादीवर बसला. काशी येथील श्रीविश्वेश्वराचें देवालय पाडून त्यानें त्या ठिकाणीं मशीद सन १६६९ सालीं सप्टेंबरनंतर बांधली. ( ज. सरकार ) अयोध्येचें राममंदिर पाडून तेथें मशीद बांधल्याची तिथि इतिहासांत कोठें दिलेली नाहीं. सन १६५८ ते सन १६७० या काळांत केव्हांतरी ती असावी. म्हणजे समर्थ सन १६३४।३५ सालीं अयोध्येस गेले त्या वेळीं पूर्वीचें जुनें राममंदिर रामजन्माच्या ठिकाणीं होतें असें म्हणतात, त्या ठिकाणींच असलें पाहिजे व काशी येथील श्रीविश्वेश्वरमंदिर ही मोठ्या नंदीसमोर हल्लीं ज्या ठिकाणीं औरंगजेबानें मंदिर पाडून मशीद बांधली त्या ठिकाणींच असलें पाहिजे. काशी व अयोध्या येथील जुनीं मंदिरें पाडून त्या ठिकाणीं मशिदी बांधल्याचा देखावा समर्थांना दिसला असता तर त्याचें वर्णन त्यांनीं अस्मानीसुलतानींत केलें असतें. वरील स्फुट प्रकरणांत स्त्रियांवर बलात्कार केल्याचें समर्थांनीं केलेलें हृदयस्पर्शी वर्णन याच भागांत पुढें आम्ही समर्थांच्या तीर्थयात्रेंतील कवितेवर विवेचन करितांना दिलें आहे.

अयोध्येहून समर्थ यमुनातीरीं असलेल्या पौराणिक व श्रीकृष्णलीलेविषयीं प्रसिद्ध असलेल्या गोकुळ, वृंदावन व मथुरा या क्षेत्रीं गेले. मथुरेंतील जुनें श्रीकृष्णमंदिर पाडून तेथें शहाजहान बादशहानें मशीद बांधली असें लोक सांगतात. हा बादशहा सन १६२७ पासून सन १६५८ पर्यंत गादीवर होता. अयोध्येहून समर्थ मथुरेस सन १६३४।१६३५ सालीं गेले असावेत. त्या वेळीं जुनेंच श्रीकृष्णमंदिर असावें असें दिसतें. कारण मथुरेंत श्रीकृष्णमंदिर पाडून त्या ठिकाणीं मशीद बांधल्याचा उल्लेख 'अस्मानीसुलतानीं'त आढळत नाहीं. मथुरेहून समर्थ विंदार्कभास

(प्रभासपट्टण) येथें गेले, तेथून द्वारकेस गेले. येथें श्रीकृष्णदर्शन घेऊन तेथील संप्रदाया-प्रमाणें तीर्थविधि केला व श्रीराममूर्तीची स्थापना करून पुढील अभंग केलाः—"अंतरीं गुरुवचन । बाह्य नापीतवपन ॥ १ ॥ अंतरबाह्य शुद्ध झाला । रामदर्शनें निवाला ॥ २ ॥ मन मुंडिल्या उन्मन झालें । शिर मुंडिल्या काय केलें ॥ ३ ॥ रामदासीं तीर्थविधि केला । रामीं पिंड समर्पिला ॥ ४ ॥" आम्ही सन १९२१ सालीं अमदाबादच्या राष्ट्रीय सभेनंतर द्वारकेस गेलों होतों, त्या वेळीं तेथील कांहीं नागरिकांनी समर्थ द्वारकेस आले होते त्या वेळीं तेथें एक मारुति स्थापन केला होता असें आम्हांस सांगितलें. तो समर्थकृत मारुति दाखवा असें म्हणतांना आमचे वाडवडिल असें म्हणत होते, तो कोठें आहे हें आम्हांस माहीत नाहीं असें ते म्हणाले.

काशी, द्वारका, मथुरा इत्यादि तीर्थक्षेत्रांचे ठिकाणीं मठ स्थापून शिष्य केले, त्यांचीं नांवें गिरिधरस्वामींनीं समर्थप्रतापांत दिलीं आहेत ( स. प्र. अध्याय १०।११ ). ती मठस्थापना समर्थांनीं उत्तर हिंदुस्थानांत तीर्थयात्रा करतांनाच केली असली पाहिजे. कारण तीर्थयात्रा संपवून कृष्णातीरीं गेल्यावर समर्थ पुन्हा कांहीं उत्तर हिंदुस्थानांत गेले नाहींत. ज्या ज्या क्षेत्रीं समर्थ जात तेथें देवदर्शन घेऊन कांहीं दिवस राहून लोकांची स्थिती समजावून घेत. नंतर योग्य गृहस्थांना अनुग्रह देऊन त्यांना शिष्य करीत व मठस्थापना करून मारुतीची अगर रामाची स्थापना करून पूजाअर्चेच्या व्यवस्थेकरितां प्रत्येक मठांत आपले शिष्य ठेवीत. शिष्यांना अनुग्रह देऊन श्रीची स्थापना करून मठस्थापना करण्याचा हेतु तीर्थयात्रा सुरू केल्यापासूनच समर्थांच्या मनांत होता असें दिसतें. कारण तीर्थयात्रेच्या प्रथमारंभींच ते काशी, प्रयाग, अयोध्या, मथुरा इत्यादि क्षेत्रांत गेले होते. तेथील मठांचीं व महंतांचीं नांवें समर्थप्रतापांत दिलीं आहेत, त्यावरून हें सिद्ध होतें. तीर्थयात्रेच्या आरंभापासूनच समर्थांनीं शिष्यसंप्रदाय सुरू करून मठस्थापना करण्यास सुरवात केल्यामुळें त्यांना निदान आठदहा दिवस प्रत्येक क्षेत्रांत आरंभापासूनच रहावें लागलें असलें पाहिजे म्हणून व त्या कालीं प्रवासाचीं साधनें हल्लीं-प्रमाणें सोयीचीं व शीघ्रगामी नव्हतीं म्हणून सर्व भरतखंडाची तीर्थयात्रा करण्यास समर्थांना बारा वर्षे लागलीं यांत कांहीं आश्चर्य नाहीं. शिवाय अयोध्येसारख्या कांहीं क्षेत्रांत ते अकरा महिने राहिले होते. कांहीं क्षेत्रांत चातुर्मास्य काढल्याचा ही ह. स्वा. च्या बखरींत उल्लेख आहे. व शिवाय "भिक्षामिषें लहान थोरें । परीक्षून सोडावीं ॥" ( दासबोध ) हा त्यांचा स्वतःचा दंडक असल्यानें त्या महत्त्वाच्या कामाकरितां ही कांहीं प्रसिद्ध क्षेत्रीं अधिक दिवस राहावे लागले असण्याचा संभव आहे. असो. द्वारकेहून समर्थ श्रीनगरास गेले. तेथें शीखपंथाचे गुरु नानक यांची व समर्थांची भेट झाली; नानकांच्या शंकांचें समाधान समर्थांनीं केलें; नंतर नानकांनीं समर्थांना अनुग्रह देण्याविषयीं विनंति केली; एकदां अनुग्रह घेतल्यावर पुन्हा घेऊं

नये असें समर्थांनीं त्यांना सांगितलें; अधिक आग्रह केल्यावर त्यांना श्रीरामाची उपासना करण्यास सांगितलें, असा मजकूर ह. स्वा. च्या बखरींत आहे. परंतु समर्थ व नानक समकालीन नव्हते असें इतिहास सांगतो. प्रथमतः नानकपंथी शीख गुरूंची व समर्थांची गांठ पडली असें हनुमंतस्वामी म्हणतात, तेव्हां नानकांच्या मागूनच्या त्यांच्या शिष्यांची व समर्थांची गांठ पडली असावी असें दिसतें. कारण पुढें ही एकदां नानकपंथीयानें प्रश्न विचारले असें ह. स्वा.च्या बखरींत म्हटलें आहे. परंतु नानकांचें समाधान झालें असें शेवटीं म्हटलें आहे, तें चुकून पडलें असावें असें वाटतें. असो. श्रीनगराहून समर्थ बदरीनारायण व केदारेश्वर येथें गेले व तेथून पर्वतशिखरीं ध्यानस्थ असलेल्या श्रीश्वेतमारुतीच्या दर्शनास गेले. तेथें समर्थांना शीत फार झालें. तेव्हां मारुतिरायांनीं त्यांना टोप, मेखला, वल्कलें, हुरमुजी रंगाचीं वस्त्रें, जपमाळ, खडावा व कुबडी अशा वस्तु दिल्या, असा कथाभाग ह. स्वा.च्या बखरींत सांगितला आहे ( भाग ३ ). भक्तलीलामृतांत " हुर्मुजी वस्त्रांची मेखळ गळयांत । वालतांचि शीत निवारलें ॥ ५ ॥ परिव्राड् नामें जाण हा संन्यास । नाम रामदास अजीहुनी ॥ ६ ॥" ( अभंग ५ ) असें म्हटलें आहे. समर्थांना ' रामदास ' नांव केव्हां व कोणीं दिलें याविषयीं चरित्रकारांत मतभेद आहे. भक्तलीलामृतकार तीर्थयात्रेंत मारुतीनें रामदास नांव ठेवलें असें म्हणतात. समर्थवाकेनिशीच्या ६व्या टिपणांत श्रीरघुपतींनींच अनुग्रहकालीं रामदास हें नांव ठेवलें असें म्हटलें आहे. समर्थवाकेनिशी समर्थसमाधीनंतर चारच दिवसांनीं लिहिली असल्यानें ती अधिक विश्वसनीय मानली पाहिजे.

पंचवटीस तपश्चर्येच्या कालीं लोक समर्थांना ' रामदास ' जाहीर रीतीनें म्हणूं लागले असावेत असें आम्हांस वाटतें. " जनीं बोलती दास या राघवाचा । परी अंतरीं लेश नाहीं तयाचा ॥ " ( करुणाष्टक ) करुणाष्टकें तपश्चर्येच्या कालांत केलीं असावींत असें अंत:प्रमाणांवरून आम्हीं सिद्ध केलें आहेच.

श्रीश्वेतमारुतिसन्निध समर्थांनीं चातुर्मास्य काढला व नंतर उत्तर मानसयात्रा करून ते पूर्व भागांतील क्षेत्रें पाहात पाहात जगन्नाथपुरीस आले. तेथें कांहीं दिवस राहून पद्मनाभ ब्राह्मणास अनुग्रह दिला. श्रींची स्थापना करून पद्मनाभास मठपति केलें. नंतर पूर्व समुद्रानें फिरत फिरत दक्षिण समुद्रतीरीं आले. श्रीरामेश्वराचें दर्शन घेऊन सेतुबंधास व लंकेस गेले. तेथें समर्थांची व बिभीषणाची गांठ पडल्याच्या दंतकथेचा उल्लेख ह. स्वा.च्या बखरींत आहे. तेथून आदिरंग, मध्यरंग, अंतरंग, भद्रसेन, जनार्दन यांचें दर्शन घेऊन गोकर्ण महाबळेश्वर येथें आले. तेथें कांहीं दिवस राहून शेषाचलास जाऊन श्रीवेंकटेशदर्शन घेतलें. नंतर श्रीशैल मल्लिकार्जुन, महाबळ नरसिंह, पानक नरसिंह, राचोटी-वीरभद्र, पंचमहालिंगें इत्यादि क्षेत्रें केलीं. नंतर किष्किंधानगरी व पंपासरोवर या ठिकाणीं जाऊन ऋष्यमूक पर्वतावरून दक्षिण

भागांतील क्षेत्रें पाहात पाहात कार्तिकस्वामींचें दर्शन घेऊन दक्षिण काशी म्हणून प्रसिद्ध असलेल्या करवीरक्षेत्रीं आले. तेथून परशुरामक्षेत्रीं जाऊन पश्चिम मानसतीर्थें करीत करीत महाबळेश्वरीं आले. तेथून पंढरीनाथ, आदिभीमाशंकर व त्र्यंबकेश्वर येथें जाऊन नंतर पंचवटीस येऊन श्रीरामदर्शन घेतलें.

**मातृदर्शन:**—पंचवटींत येऊन रामदर्शन घेतल्यानंतर तीर्थयात्रा संपविण्याकरितां समर्थ गंगा( गोदा )प्रदक्षिणेस निघाले. वाटेंत श्रीप्रतिष्ठान ( पैठण ) येथें आले. येथें असतांना मेलेली घार उठवून एक अद्‌भुत चमत्कार करून दाखविल्याचा उल्लेख पूर्व समर्थचरित्रांत आढळून येतो. अद्‌भुत गोष्टींविषयीं विवेचन आम्ही पुढें एका स्वतंत्र भागांत करणार आहों. पैठण येथें घार उठवितांना तेथील ब्राह्मणांना समर्थांनीं प्रायश्चित्तविषयीं एक मार्मिक प्रश्न विचारला, तो वाचकांच्या नजरेस आणण्याकरितां थोडक्यांत ही गोष्ट येथें सांगतों. समर्थांजवळ तीरकमठा पाहून पैठण येथील ब्राह्मण म्हणाले कीं, तीरकमठा गमतीखातर बाळगला कां कांहीं अभ्यास आहे? "कांहीं अभ्यास आहे" म्हणतांना, "आकाशांत घार फिरत आहे तिला तीरकमठा मारून खालीं पाडा" असें ब्राह्मण म्हणाले. समर्थांनीं तीरकमठ्यानें घार खालीं पाडली. तेव्हां ब्राह्मण म्हणाले, " तुम्ही साधु, मस्तकीं जटाभार आहे, हुर्मुजी वस्त्रें धारण करून ' रामदास ' म्हणवितां आणि हिंसा करितां हें ठीक नव्हे. तुम्हांला आतां प्रायश्चित्त घेतलें पाहिजे." समर्थांनीं अनुमोदन दिल्यावर ब्राह्मणांनीं त्यांना सक्षौर प्रायश्चित्त दिलें. तेव्हां समर्थ म्हणाले, " प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून घेतलें असें तुम्ही म्हणतां, परंतु घार अद्याप मेलेलीच पडली आहे, जिवंत झाली नाहीं हें कसें ?" ब्राह्मण म्हणाले, "मेलेला प्राणी कसा उठेल ? हिंसा केल्यावर प्रायश्चित्त घ्यावें अशी वेदाज्ञा आहे, म्हणून आम्हीं प्रायश्चित्त दिलें." समर्थ हास्य करून हात जोडून ब्राह्मणांस म्हणाले, " वेदाज्ञा प्रायश्चित्त घेण्यापुरतीच आहे, मृत जीव उठविण्याबद्दल नाहीं हें आश्चर्य होय. " नंतर समर्थांनीं मृत घार हातीं घेतली व श्रीरामाचें स्मरण करून तिच्या अंगावरून हात फिरवितांच ती जिवंत होऊन आकाशांत उडून गेली. प्रायश्चित्ताविषयीं समर्थांची कल्पना काय होती हें दाखविण्याकरितां ही गोष्ट येथें दिली आहे.

नंतर एकदां समर्थ पैठणांत कीर्तन करीत असतांना, आंबड प्रांतांतील एक ब्राह्मण कीर्तनास आला होता. त्यानें समर्थांस ओळखलें. त्यांच्या कपाळावरील आवाळू पाहून लग्नमंडपांतून पळून गेलेला सूर्याजीपंतांचा मुलगा नारायण हाच होय असें त्या ब्राह्मणास वाटलें. उद्धवसुतकृत समर्थचरित्रांत पुढील वर्णन आहे. " कित्येक स्वामीकडे पाहती । ओळखीचा दिसतो म्हणती ।। भाळींचें आवाळू देखती । म्हणती नारायण हा ।। एक म्हणती तो गेला । शुद्धि घेतां नाहीं सांपडला ।। कैंचा कोठें काय झाला । न कळे कवणासी ।। गांवचा जोशी

रहात । तेणें ओळखिलें असें म्हणत ।। हा नारायण सत्य सत्य । पुत्र सूर्याजी-पंतांचा ॥ " ( १६.१७.१८ )

समर्थ लग्नमंडपांतून पळून गेल्यापासून राणुबाई एकसारख्या शोक करीत होत्या. श्रेष्ठ त्यांचें समाधान करीत, परंतु त्याचा कांहीं विशेष उपयोग होत नसे. " माझा नारायण मला कधीं भेटेल काय ? " असा त्यांनीं ध्यास घेतला होता. त्या योगानें त्यांची दृष्टि अगदीं मंद झाली होती. दिसत नव्हतें. पैठण येथील कीर्तन संपल्यावर ज्या ब्राह्मणानें समर्थांना ओळखिलें, तो ब्राह्मण समर्थांपाशीं येऊन म्हणाला, "तुम्ही कीर्तन करीत फिरतां, तुमच्याबद्दल शोक करून तुमच्या मातोश्रींचे डोळे गेले. आतां तरी त्यांना भेटून त्यांचें समधान करा." "ठीक आहे" असें समर्थ त्या ब्राह्मणास म्हणाले व पैठणाहून निघून जांबेस गेले. प्रथम मारुतिरायाचें दर्शन घेतलें व नंतर आपल्या घरीं अंगणांत जाऊन "जयजय रघुवीर समर्थ" म्हणून उभे राहिले. "कोणी गोसावी आला आहे, भिक्षा घाला," असें राणुबाई म्हणाल्या. श्रेष्ठांच्या पत्नी पार्वतीबाई भिक्षा घेऊन आल्या, तेव्हां "हा भिक्षा घेणारा गोसावी नव्हे" असें समर्थ म्हणाले. हे शब्द कानीं पडतांच राणुबाई म्हणाल्या, "कोण, माझा नारोबा आला कीं काय?" "होय आई, मीच आलों आहें" असें म्हणून समर्थांनीं दंडवत प्रणाम करून मातोश्रींच्या चरणांवर मस्तक ठेवलें. राणुबाई समर्थांना कडकडून भेटल्या. त्यांच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या !! चोवीस वर्षांनीं मुलाची भेट झाल्यावर आईच्या डोळ्यांतून प्रेमाश्रु येणें साहजिकच आहे. नारोबा जवळ आला, पण पाहण्याला डोळे नाहींत. 'मोहादभूत्कष्टतरः प्रबोधः'।। ( कुमारसंभव सर्ग ४—कालिदास) अशी त्यांची स्थिति झाली. राणुबाईनीं समर्थांच्या मस्तकाचें अवघ्राण केलें व मुखावरून हात फिरविला. समर्थांनीं राणुबाईच्या डोळ्यांवरून हात फिरवितांच त्यांना पूर्वीप्रमाणें दिसूं लागलें. समर्थांची भव्य मूर्ति व जटाभार पाहून राणुबाई म्हणाल्या, "देशांतरीं फिरून तूं भूतचेष्टा शिकून आला आहेस असें दिसतें." समर्थ हास्य करून म्हणाले, "होय आई, मी भूतचेष्टा शिकलों आहे. ज्या भूतानें मला चेष्टा शिकविली, त्याचें वर्णन ऐक," म्हणून समर्थांनीं पुढील पद तेथेंच करून राणुबाईना म्हणून दाखविलें. तें पद लहान आहे, पण त्यांत रामायणाचें सार फार थोडक्यांत खुबीनें दिलें आहे. म्हणून तें सर्व पद देतों. " होतें वैकुंठीचे कोनीं । शिरलें अयोध्याभुवनीं । लागे कौसल्येचे स्तनीं । तेंचि भूत गे माय ॥ १ ॥ जातां कौशिक-राउळीं । अवलोकितां भयकाळीं । ताटिका ते छळोनि मेली । तेंचि भूत गे माय ॥ २ ॥ मार्गी जातां वनांतरीं । पाय पडतां दगडावरीं । पाषाणाची नारी[1] झाली । तेंचि भूत गे माय ॥ ३ ॥ जनकाचे अंगणीं गेलें । शिवाचें धनु भंगिलें । वैदेही[2] अंगीं ।

---

१. स्त्री—अहिल्या. २. सीता.

संचरलें । तेंचि भूत गे माय ॥ ४ ॥ जेणें[1] सहस्रार्जुन वधिला । तोहि तत्काळचि भ्याला । धनु देउनि देह रक्षिला । तेंचि भूत गे माय ॥ ५ ॥ पितयाचे भाकेशी[2] कैकयीचे वचनाशी । मानुनि, गेलें अरण्याशी । तेंचि भूत गे माय ॥ ६ ॥ चौदा संवत्सरें तपासी । अखंड हिंडे वनवासी । सांगातें भुजंग[3] पोशी । तेंचि भूत गे माय ॥ ७ ॥ सुग्रीवाचें पालन । वालीचें निर्दालन । तारी पाण्यावरी पाषाण । तेंचि भूत गे माय ॥ ८ ॥ रक्षी मरणीं बिभीषण । मारी रावण कुंभकर्ण । तोडी अमरांचें बंधन । तेंचि भूत गे माय ॥ ९ ॥ वामांगीं स्त्रियेला धरलें । धांवुनि शरयू-तीरा आलें । तेथें भरतासी भेटलें । तेंचि भूत गे माय ॥ १० ॥ सर्वां भूतांचें हृदय । नाम त्याचें रामराय । रामदास नित्य गाय । तेंचि भूत गे माय ॥ ॥ ११ ॥" समर्थांनीं या पदांत स्वतःस 'रामदास' म्हणवून घेतलें आहे. अशा प्रकारचें समर्थकृत हें पहिलेंच पद. कृष्णातिरीं जाण्यापूर्वीचें म्हणजे बहुधा शके १५६५ सालांतील हें पद असावें. हें पद समर्थ राणूबाईंना म्हणून दाखवीत असतांना श्रेष्ठ आंत संध्या करीत होते ते बाहेर आले. त्यांना समर्थांनीं साष्टांग नमस्कार घातला. चवदा वर्षांच्या वनवासानंतर रामास भेटून जसा भरतास आनंद झाला, त्याप्रमाणें चोवीस वर्षांच्या कालानंतर समर्थांस भेटून श्रेष्ठांना आनंद झाला. तीर्थयात्रेंतील सर्व हकीकत राणूबाईंना व श्रेष्ठांना समर्थांनीं सांगितली. त्या वेळीं ती हकीकत टिपून घेणारा एखादा कल्याण अंगर बॉस्वेल असता तर समर्थचरित्रकारांना फार उपयोग झाला असता. असो. समर्थांनीं मातोश्रींस कपिलगीता सांगितली व नंतर मातोश्रींची व श्रेष्ठांची आज्ञा घेऊन गंगाप्रदक्षिणेस निघाले. गोदावरीचे सात ओघ समुद्रास मिळतात तेथें आले. त्या सप्त ओघांना सप्त गोदावरी म्हणतात. सप्त गोदावरीस सव्य घालून मध्यंतरीं कोठें न थांबतां त्र्यंबकेश्वरास आले व तेथून पंचवटीस आले व श्रीरामदर्शन घेऊन टाकळीस येऊन उद्धवास भेटले व तेथें कांहीं दिवस राहिले. बारा वर्षांच्या तीर्थयात्रेनंतर तपश्चर्याभूमींत महिना पंधरा दिवस राहून त्यांनीं विश्रांति घेतली. या अवधींत त्यांनीं आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धांतील कार्यक्रमाची योजना केली असली पाहिजे. त्याचें विवेचन पुढील भागांत केलें आहे.

तीर्थयात्रेच्या कालांत समर्थांनीं कांहीं स्फुट कविता केली तीविषयीं आतां थोडेंसें विवेचन आम्ही करणार आहों. समर्थांनीं बारा वर्षें तीर्थयात्रेंत घालविलीं त्या वेळीं त्यांनीं तत्कालीन लोकस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण केलें होतें. तत्कालीन धार्मिक, सामाजिक व राजकीय स्थिति पाहून त्यांच्या मनावर जो परिणाम झाला त्या योगानें त्यांच्या नैसर्गिक अध्यात्मिक प्रवृत्तीचा बराच कल व्यावहारिक प्रवृत्तीकडे

---

१. ज्या परशुरामानें. २. शपथेला. ३. शेष, लक्ष्मण.

वळला, त्याचा विचार पुढें केला आहे. या भागांत त्यांच्या तीर्थयात्रेच्या प्रवासांत त्यांना लोकांची जी हीन स्थिति दिसून आली, तिचें उत्कृष्ट काव्यचित्र त्यांनीं ' अस्मानीसुलतानी ' या स्फुट प्रकरणांत केलें आहे त्याविषयीं विवेचन करतों. दुष्काळामुळें लोकांची अन्नान्नदशा झाली होती, विधर्मी व परकीय राजसत्तेमुळें देवालयें पाडणें, देवांच्या मूर्ति फोडणें, बलात्कारानें स्त्रिया भ्रष्टविणें व परधर्म स्वीकारावयास लावणें इत्यादि अंगावर शहारे आणणारे अनन्वित प्रकार चालले होते, त्यांचें हृदयद्रावक वर्णन वरील स्फुट प्रकरणांत केलेलें आहे. 'अस्मानीसुलतानी' व 'परचक्र निरूपण' हीं दोन्ही स्फुट प्रकरणें तीर्थयात्रेच्या कालांतच प्रत्यक्ष समाजस्थिति अवलोकन केल्यावर लागलींच लिहिलेलीं असावींत असें वाटतें. ' समर्थांचे समग्र ग्रंथ ' म्हणून प्रकाशित केलेल्या ग्रंथांत वरील स्फुट प्रकरणें आढळून येत नाहींत, म्हणून त्यांतील कांहीं त्रोटक उतारे खालीं देतों. 'अस्मानीसुलतानी' प्रकरणाचे तीन प्रबंध आहेत, त्यांविषयीं कै. इतिहासाचार्य राजवाडे म्हणतात, " वर्णन अप्रतिम आहे. बीभत्स व करुणरस इतके उठावदार रेखाटलेले इंग्रजी वगैरे पाश्चात्य वाङ्मयांत किंवा संस्कृत, प्राकृत वगैरे भारतीय वाङ्मयांत माझ्या पहाण्यांत नाहींत." प्रबंध १ला यांत दहा श्लोक आहेत. त्यांतील दिग्दर्शनार्थ कांहीं देतों:—

"बहुसाल कल्पांत लोकांसि आला। महर्गे बहू धाडि केली जनाला ॥ कितीएक मृत्यूस ते योग्य झाले। कितीएक ते देश त्यागून गेले ॥ १ ॥ कितीएक ग्रामेंचि ते ओस झालीं। पिकें सर्व धान्येंचि नाना बुडालीं। कितीएक धाडीवरी धाडि येती। द्रया सैनिकाचेनि संहार होती ॥ २ ॥ किती एक ते धान्य लूटूनि नेती। कितीएक ते पेंव खाणोनि नेती ॥ कितीएक ते पूरिले अर्थ नेती। किती पूरिलीं सर्व पात्रेंचि नेती ॥ ३ ॥ कितीएक ते घ्राणकर्णेंचि घेती। किती उत्तमा त्या स्त्रिया भ्रष्टवीती ॥ किती मोट बांधोनि ते बूडवीती। पिछोडेचि बांधोनि हीरोनि नेती ॥ ४ ॥ किती गुज्रिणी ब्राम्हणी भ्रष्टवील्या। किती शामुखी जहाजीं फांकवील्या ॥ कितीएक देशांतरीं त्या विकील्या। किती सुंदरा हाल होऊनि मेल्या ॥ ५ ॥" दुसऱ्या व तिसऱ्या प्रबंधांतील उतारे विस्तारभयास्तव देत नाहीं. आतां 'परचक्रनिरूपणां'तील थोड्या ओंव्या देतों. हें स्फुट प्रकरण उद्धवस्वामींच्या टाकळी मठांत अपूर्ण सांपडलें आहे. या प्रकरणाच्या ४१ ओंव्यांपैकीं फक्त शेवटाच्या १४ ओंव्याच सांपडल्या आहेत. समर्थकालीन दुःसह समाजस्थितीची कल्पना येण्याकरितां त्यांतील फक्त पांच ओंव्याच देतों. " माणसा खावया धान्य नाहीं। आंथरुण पांघरूण तें हि नाहीं ॥ घर करावया सामग्री नाहीं। काय करिती ॥ ३१ ॥ कितीएक अनाचारीं पडिलीं। कितीएक यातिभ्रष्ट झालीं ॥ कितीएक ते आक्रंदलीं। मुलेंबाळें ॥ ३३ ॥ कित्येकीं विषें घेतलीं। कित्येक जळीं बुडालीं ॥ जाळिलीं ना पुरलीं। कितीएक ॥ ३४ ॥ प्राणिमात्र झाले दुःखी। पाहतां कोणी

नाहीं सुखी ॥ कठिण काळीं ओळखी । धरिनात कोणी ॥ ४० ॥ लोक बहुत रस्तावले । कितीएक जाजावले ॥ कितीएक ते कावले । उद्वेगरूपीं ॥ ४१ ॥ ”

तीर्थयात्रा करीत असतांना लोकांची दुःसह स्थिति पाहून काव्यस्फूर्ति होऊन केलेलें वर्णन कळण्याकरितां आणखी कांहीं उतारे देतों. “ स्वधर्माचा लोप झाला । अधर्मी जन प्रवर्तला ॥ स्वइच्छा गोंधळ घातला । कलीनें सावकाश ॥ ” ही दीन स्थिति पाहून तीर्थयात्रा करीत असतांना समर्थांनीं पुढें दासबोधांतील ११व्या दशकांतील राजकारणाच्या पांचव्या समासांतील दिलेल्या चतुःसूत्रींतील तिसऱ्या सूत्राचा म्हणजे ‘ सावधपणा ’चा पुढीलप्रमाणें जोरदार भाषेंत उपदेश केला आहे. “ अखंड सावधान रे । प्रयोग प्रेत्न मान रे ॥ प्रसंग हा तुफान रे । नकोचि बेवधान रे ॥ १ ॥ अरत्र हो परत्र हो । विचित्र काल-सूत्र हो ॥ अखंड सावधानता । सभाग्य तो नव्हे रिता ॥ २ ॥ कवी म्हणे बहू बरें । करील देव तो खरें ॥ बरी धरूनि वासना । धरा मनीं उपासना ॥ ३ ॥ विवेक पहाणें बरा । बरा विचार तो करा ॥ उपासकांसि सूचना । उपासना उपासना ॥ ४ ॥ ” लोकांची दुःस्थिति पाहून लोकांनीं विवेकानें अखंड सावधान रहावें व संकटनिवारणार्थ श्रीरामाची उपासना करून प्रयत्न करावा असें लोकांना सांगितलें. कदाचित् कांहीं लोक धीर सोडून स्वस्थ बसतील म्हणून त्यांना समर्थ सांगतात, “ धीर्धरा धीर्धरा तकवा । हडबडूं गडबडूं नका ॥ काल देखोनि वर्तावें । सांडावें भय पोटिचें ॥ १ ॥ ” लोकांना धीर धरण्यास व श्रीरामाची उपासना करण्यास सांगून कृष्णातिरीं येण्यापूर्वी तीर्थयात्रेंत असतांनाच समर्थ श्रीरामाची करुणा भाकतात. “ हुजुर, दम निघेना अंतरीं कोंड नाना । तिळभर स्थळ कोठें पाहतां ही दिसेना ॥ बहुत विषम काळें दाटणी थोर झाली । म्हणउनी चरणीं हो वृत्ति गुंतोनि गेली ॥ १ ॥ ” समर्थांना तीर्थयात्रेंत नाना प्रकारचे लोक भेटले, त्यांचें वर्णन, “ मही मंडळीं लोक नाना, गुणांचे । असंभाव्य लीला कलाकूसरीचे ॥ कितीएक साधे कितीएक बाधे । कितीएक ते देखिले मंदबोधे ॥ १ ॥ कितीएक लाताड लाबाडवाणे । कितीएक पापी पुराणे पुराणे ॥ कितीएक तोंडाळ वोढाळ ऊणे । कुशब्दीं कितीएक वाचाळ सूणे ॥ २ ॥ ........फिरे दास ऊदास लोकांस पाहे । मनामाजि थक्कित होऊनि राहे ॥ ५ ॥ ”

‘ अस्मानी सुलतानी ’, ‘ परचक्र निरूपण ’ व तीर्थयात्राकालीं रचलेलीं इतर कांहीं स्फुटें, यांतील कांहीं उत्तरे वर दिले, त्याचीं मुख्य दोन कारणें आहेतः—( १ ) तत्कालीन समाजस्थितीचें समर्थांनीं किती सूक्ष्म अवलोकन केलें होतें त्याचें यथार्थ ज्ञान वाचकांना व्हावें हें पहिलें कारण व ( २ ) लग्नमंडपांत सावधान शब्द ऐकून तात्काल संसारबंधनें तोडून भगवत्प्राप्तीकरतां बाहेर पडलेले समर्थ १२ वर्षे पंचवटींत तपश्चर्या करून तीर्थयात्रेस निघाले, परंतु बारा वर्षे तीर्थाटन करून परत आल्यानंतर ते पंचवटींत श्रीरामाजवळ पूजाअर्चा करीत जन्माचें

सार्थक करीत कां बसले नाहींत याची यथार्थ कल्पना वाचकांना यावी हें दुसरें कारण. तीर्थयात्रेतील बारा वर्षांच्या सूक्ष्म निरीक्षणानें लोकस्थिति सुधारण्याकरितां मठ स्थापून संघटना करण्याची व धर्मसंस्थापना करण्याची त्यांना आवश्यकता वाटली व तीर्थयात्रा करीत असतांनाच त्यांनीं मठस्थापना करण्यास आरंभ केला होता. तीर्थयात्रेहून परत आल्यावर स्वधर्मस्थापना करण्यास स्वराज्यस्थापनेची आवश्यकता आहे असें त्यांना वाटलें व स्वराज्य स्थापन करण्यास आरंभ करणाऱ्या शिवाजीमहाराजांच्या ताब्यांतील कृष्णातीरसन्निधच्या मसूर भागांतच ते प्रथम रामोत्सव करण्याकरितां येऊन राहिले.

श्री. ज. स. करंदीकर हे 'शिवाजी–निबंधावली, भाग १' यांतील आपल्या लेखांत म्हणतात, "शके १५६४ पर्यंत शिवाजी शहाजीराजांजवळ कर्नाटकांतच होता आणि याच वेळीं समर्थ ही कर्नाटकांतच तीर्थयात्रा करीत होते. यावरून बंगलोरास समर्थ व शहाजी यांची भेट झाली असण्याचा संभव आहे.........स्फुट प्रकरण ६७ यांत स्वतः श्रीसमर्थ म्हणतातः—'अंतरीं कल्पना केली। एकांतीं बोलिलों बहु ॥ रक्षिता देव देवांचा। त्याचा उच्छाव इच्छिला ॥ स्फुट. ६७-४५.......' 'अंतरीं कल्पना केली,' यांत स्वतःच्या मनाशीं विचार केला हा अर्थ आलाच. नंतर पुन्हां 'एकांतीं बोललों' हें सांगण्यांत स्वारस्य काय ? हें बोलणें मसुरास येण्यापूर्वी बंगलोरप्रांतीं शहाजीशीं झालें असावें आणि तेथेंच कृष्णातीरीं शहाजीच्या देशमुखीच्या गांवीं समर्थांनीं रहावें असा विचार ठरला असावा. सारांश, तीर्थाटन करितांना बंगलोर प्रांतीं शहाजीची व समर्थांची भेट झाली व बालशिवाजीस ही समर्थांनीं तेथें पाहिलें. ( पृ. १११।११२ )." यांतील कांहीं अनुमानांस ऐतिहासिक पुरावा अगदीं उलट आहे. बालशिवाजी वयाच्या बाराव्या वर्षींच बंगलोराहून पुण्यास आले ( शिवभारत ) व कांहीं बखरींत ही बालशिवाजी आपल्या वयाच्या १२व्या वर्षींच पुण्यास आल्याचा उल्लेख आहे. म्हणजे नव्या जन्मतिथीनें ही बालशिवाजी शके १५६३ सालींच पुण्यास आले असें होतें. दादोजी कोंडदेवापाशीं बालशिवाजी असतांना त्यांचे नांवची "प्रतिपच्चंद्ररेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता ॥ शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते ॥" ( म. इ. साधनें, खं. १५, प. न. ४-३५ ) ही मुद्रा प्रचारांत होती. यावरून शके १५६१ तच बालशिवाजी पुणें

प्रांतीं आले होते हें ठरतें. तेव्हां दक्षिण भागच्या तीर्थयात्रेंत समर्थांची व बाल-शिवाजीची गांठ पडली होती, हें श्री. करंदीकरांचें म्हणणें ऐतिहासिक पुराव्या-वरून खरें ठरत नाहीं. शके १५६४ सालीं बंगलोरास शहाजीराजे व समर्थ यांची गांठ पडण्याचा मात्र संभव आहे व त्या वेळीं दोघांचें बोलणें होऊन समर्थांनीं कृष्णातीरीं आल्यावर मसूरास रहावें असें ठरलें असेल. परंतु या अनुमानास ही भरपूर ऐतिहासिक पुरावा अद्याप मिळालेला नाहीं.

श्री. करंदीकर यांनीं "एकांतीं बोलिलों बहु" याचा अर्थ केलेला ही आम्हांस मान्य नाहीं. "अंतरीं कल्पना केली।" याचेंच अधिक स्पष्टीकरण करण्याकरितां "एकांतीं बोलिलों बहु" असें समर्थांनीं म्हणण्याचा ही संभव आहे. विश्वसनीय पुरावा मिळाल्याखेरीज एकांतीं म्हणजे "शहाजीराजाशीं बोलिलों" असें म्हणणें म्हणजे अर्थाची फार ओढाताण करणें आहे असें आम्हांस वाटतें.

## भाग पांचवा

# ( अ ) कृष्णातीरीं आगमन

जो गोदातीरीं जन्मला । तो कृष्णातीरीं आला ॥
तेथें प्रताप प्रगटला । धन्य तो साधू ॥ १ ॥ —श्रेष्ठ

बारा वर्षे सर्व भरतखंडांत तीर्थयात्रा करून तेथील धार्मिक, सामाजिक व राजकीय स्थितींचें सूक्ष्म निरीक्षण करून ठिकठिकाणीं मठस्थापना करून व तेथें योग्य शिष्यांची योजना करून व अखेर मातृदर्शन घेऊन शके १५६६ सालीं तारणनाम संवत्सरीं वैशाखमासीं समर्थ कृष्णातीरीं आले.

समर्थांना शके १५३८ सालीं बलनाम संवत्सरीं श्रावण शुद्ध अष्टमीस जांब येथें मारुतीच्या देवालयांत जेव्हां श्रीरामचंद्रांनीं दर्शन देऊन अनुग्रह दिला, त्याच वेळीं त्यांना कृष्णातीरीं जाऊन जगदुद्धार करण्यास आज्ञा केली होती. कारण शिसोदियांचे वंशीं सांबवरेंकरून व देवीच्या वरेंकरून शिवनामा राजा होणार आहे, त्यास उपासना सांगून त्याचेकडून धर्मस्थापना करवावी असा मजकूर समर्थ-बाकेनिशी, ह. स्वा.ची बखर व इतर पूर्वचरित्रांत आहे. प्रथम पंचवटींत गेल्यावर श्रीरामचंद्रदर्शन घेतलें तेव्हां व तीर्थयात्रा करून परत आल्यावर पंचवटींत पुन्हा श्रींचें दर्शन घेतलें तेव्हां ही समर्थांना श्रीरामांनीं कृष्णातिरीं जाऊन शिवछत्रपतींना धर्मस्थापनेच्या कामीं साहाय्य करण्यास आज्ञा केल्याचा उल्लेख वरील चरित्रग्रंथांत आहे. मारुतिअंशेंकरून एक पुत्र होईल तो धर्म-स्थापना करून जगदुद्धार करील, असा सूर्याजीपंतांस सूर्यनारायणांनीं वर दिल्याची आख्यायिका लोकांत प्रसिद्ध झाली होती व मालोजी राजे भोंसले यांना ‘ तुमच्या वंशांत मदंशेंकरून पुत्र होईल, तो राज्यस्थापना करून शककर्ता होईल,’ असा शंकरांनीं वर दिला होता, अशी आख्यायिका ही लोकांत प्रसिद्ध झाली होती. या दोन आख्यायिकांचा मेळ बसवून समर्थांना श्रीरामांनीं कृष्णातीरीं जाऊन शिवछत्रपतींस स्वराज्य-स्थापनेच्या कामीं साहाय्य करण्यास आज्ञा दिली, असा मजकूर समर्थबाकेनिशी, ह. स्व.ची बखर व इतर पूर्वचरित्रांत लिहिला असावा असें आम्हांस वाटतें.

शके १५६६ सालीं समर्थ प्रथमतः महाबळेश्वरीं आले. तेथें कृष्णा नदीचें उगमस्थान आहे. महाबळेश्वरची हवा फार थंड आहे. तें समुद्रसपाटीपासून ४००० फूट उंचीवर आहे. हल्लीं तेथें राजपुरुष, संस्थानिक व श्रीमंत लोक उन्हाळ्यांत थंड हवेचा उपभोग घेण्याकरितां जातात. समर्थ गेले त्या वेळीं हल्लींप्रमाणें वस्ती, बंगले, मोटरगाड्यांचे रस्ते वगैरे कांहीं नव्हतें. झाडी फार दाट असून हिंस्र

पशूंची फार भीति होती. क्षेत्र महाबळेश्वर येथें कृष्णेच्या उगमानजीकच पुढें शंकराचें फार प्राचीन स्वयंभूस्थान आहे, त्यास हल्लीं क्षेत्र महाबळेश्वर म्हणतात. तेथें समर्थ चार महिने राहिले. त्या अवधींत त्यांनीं दिवाकरभट व अनंतभट यांना अनुग्रह दिला व मारुतीची स्थापना केली. हा मारुती कृष्णेच्या उगमाच्या मागें किंचित् उंचवटयावर आहे. समर्थ कृष्णातीरीं आल्यावर त्यांनीं स्थापन केलेला हा पहिला मारुति. त्यापूर्वीं त्यांनीं दोन मारुति स्थापन केलेले वाचकांच्या स्मरणांत असतीलच. तीर्थयात्रेस जातांना उद्धवाकरितां टाकळीस स्थापन केलेला पहिला मारुति व श्रीक्षेत्र काशी येथें हनुमंत घाटावर स्थापन केलेला दुसरा मारुति. परंतु कृष्णतीरीं येण्यापूर्वीं स्थापन केलेल्या वरील दोन मारुतींची व कृष्णतीरीं आल्यावर महाबळेश्वरीं स्थापन केलेल्या मारुतीची गणना चरित्रकारांनीं समर्थांच्या सुप्रसिद्ध अकरा मारुतींमध्यें केलेली नाहीं. महाबळेश्वर येथें चातुर्मास्य संपवून समर्थ वांई येथें आले, तेथें कांहीं दिवस राहून पिटके, थिटे, चित्राव प्रभृति मंडळींना व त्यांच्या मातोश्रींना अनुग्रह दिला व तेथें कृष्णातीरीं मारुतीची स्थापना केली. हा चवथा मारुति. रोकडोबाचा मारुति म्हणून हल्लीं त्याची प्रसिद्धी आहे. पिटके घराण्यांत या मारुतीची पूजा आहे. या मारुतीची ही सुप्रसिद्ध अकरा मारुतींमध्यें गणना केलेली नाहीं. वांईहून समर्थ माहुलीस गेले. तेथें श्रीकृष्णावेण्या-संगम आहे, तेथें स्नान करून कृष्णवेण्यासंगमावर एक आरती केली. ती समर्थ-कृत पहिली आरती होय, म्हणून ती येथें देतों. “ सुखसरिता-गुणभारिता दुरिता निवारीं । निस्संगा भवभंगा चिद्गंगा तारी ।। श्रीकृष्णनिजतनु जलवेषधारी । कलिमलदलजल निर्मळ साक्षत्वें हारी ।। जयदेवी जयदेवी जय माये कृष्णे । आलों तुझ्या उदरीं निरसीं मम तृष्णे ।। १ ।। हरिहर सुंदर ओघ ऐक्याशीं आले। परमानंदबोधें मिळणीं मिळाले ।। ऐसे हे संगमीं मिसळोनी गेले । रामदास त्यांचीं बंदी पाउलें ।। २ ।।” माहुलीहून समर्थ जरंड्यास गेले. तेथें उंच डोंगरावर मारुतीचें पुरातन स्थान आहे; तेथें कांहीं दिवस राहिले. तेथें असतांना समर्थ नित्य माहुलीस संगमावर स्नानसंध्येस येत. स्नानसंध्यादि नित्य आन्हिक आटोपल्यावर ते क्षेत्रांत जाऊन माधुकरी मागत. नंतर श्रीस नैवेद्य समर्पण करून भोजन करीत. माहुलीस आल्यावर ते वाळवंटींत मुलांबरोबर खेळत असत. लहान मुलांशीं खेळण्याचा समर्थांना फारच नाद असे. समर्थ माहुलीस आल्याची बातमी आसपासच्या प्रांतांतील संतमंडळींस कळली तेव्हां बरेच संत समर्थांना भेटण्यास येऊं लागले. त्यांपैकीं कांहीं सुप्रसिद्ध साधुसंतांचीं नांवें देतों:-( १ ) वडगांवचे जयराम स्वामी, ( २ ) निगडीचे रंगनाथस्वामी, ( ३ ) ब्रह्मनाळचे आनंदमूर्ति स्वामी, ( ४ ) भागानगरचे ( हैदराबादचे ) केशवस्वामी. हे चार संत व समर्थ मिळून ‘ दासपंचायतन ’ नांवानें प्रसिद्ध आहेत. त्यांत समर्थ सर्वांत वडील म्हणून

त्यांना पितृस्थानीं मानीत व त्यांच्या तपश्चर्येचें सामर्थ्य सर्वांत अधिक म्हणून त्यांना ‘ समर्थ ’ म्हणत. सुप्रसिद्ध भगवद्भक्त व कवि तुकाराममहाराज व चिंचवडचे मोरया देव हे समर्थांना भेटण्यास येत असत. तुकाराम समर्थांच्या भेटीस आले तेव्हां एकमेकांनीं एकमेकांस आपली गुरुपरंपरा सांगितली, ते अभंग प्रसिद्ध आहेत. समर्थांनीं आपली गुरुपरंपरा सांगितलेला अभंग भाग २ ( आ ) ‘वरदान’ या प्रकरणांत दिला आहे.

तुकाराममहाराजांनीं समर्थांना आपली परंपरा सांगितलेला अभंगः—“यातिशूद्र, वैश्य केला व्यवसाय। आधींचा हा देव कुळपूज्य ॥ १ ॥ न बोलावें परी, पाळिलें वचन। केलियाचा प्रश्न तुम्ही संतीं ॥ २ ॥ संसारीं तो झाल्या दुःखाचिया राशी। मायबापें शेवटीं कर्मीयेलीं ॥ ३ ॥ देवाचें देऊळ होतें तें भंगलें। चित्तास हें आलें करावेंसें ॥ ४ ॥ दुष्काळीं आटलें द्रव्य नेलें माने ॥ स्त्री एक अन्न करितां मेली ॥ ५ ॥ लाज वाटे जीवा त्रासलों या दुःखा ॥ व्यवसायीं देखा तुटी येत ॥ ६ ॥ कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें। विश्वास आदरें करूनियां ॥ ७ ॥ सत्य असत्यासी मन केलें ग्वाही। मानियलें नाहीं बहुमता ॥ ८ ॥ गाती त्यांचे पुढें धरावें ध्रुपदा। भावें चित्त शुद्ध करूनियां ॥ ९ ॥ मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश। धरिला विश्वास दृढ मनीं ॥ १० ॥ ठाकला तो थोडा पर उपकार। केला हें शरीर कष्टऊनी ॥ ११ ॥ संतांचें सेवियलें तीर्थ पायवणी। आरंभ कीर्तनीं करता झालों ॥ १२ ॥ नव्हते अभ्यासीं मन चित्त आधीं। लाज नाहीं मनीं येऊं दिली ॥ १३ ॥ तयावरी झाली कवित्वाची स्फूर्ति। पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥ १४ ॥ निषेधाचा कांहीं पडला आघात। तेणें मध्यें चित्त दुखवलें ॥ १५ ॥ बुडविल्या वह्या बैसलों धरणें। केलें नारायणें समाधान ॥ १६ ॥ आहे तोचि आतां दीसतो प्रकार। पुढिला विचार देव जाणे ॥ १७ ॥ तुका म्हणे माझें सर्व भांडवल। बोलविलें बोल पांडुरंगें ॥१८॥” समर्थ श. १५६६ सालीं कृष्णातीरीं आले व तुकाराम शके १५७१ सालीं वैकुंठवासी झाले. तेव्हां मध्यंतरीं दोघां साधुवर्यांच्या गांठी कृष्णातीरीं पडून परस्परांनीं परस्परांस गुरुपरंपरा सांगणें संभवनीय आहे, म्हणून दोघांच्या गांठीची ही हकीकत विश्वसनीय आहे.

समर्थ कृष्णातीरीं आल्यावर कांहीं दिवस त्यांना आपण पंचवटीहून दूर देशीं आलों आहों असें वाटलें. पंचवटींतील रामोपासकांची व श्रीरामाची त्यांना आठवण होऊन त्यांनीं तेथील रामोपासकांना एक कविताबद्ध पत्र पाठविलें. कृष्णातीरीं आल्यावर चाफळास रामस्थापना करण्यापूर्वीं तें पत्र पाठविलें असावें असें आंतील मजकुरावरून दिसतें. बहुधा तें शके १५६६।६७ सालींच पाठविलें असावें. समर्थांची कृष्णातीरीं आल्यावरची ती पहिली कविता व त्यांत समर्थांनीं आपले अंतःकरणांतील उद्गार कळकळीनें निवेदन केले आहेत, म्हणून तें पत्र सबंध देतों:—

"जनस्थान गोदातटीं । परमपावन पंचवटी ।। तेथें पडिली कृपादृष्टि । रघुत्तमारायाची ।। १ ।। तेथील रामउपासक । त्यांच्या सेवकांचा सेवक ।। तुम्हां-मध्यें मी एक रंक । स्मरतें करावें ।।२।। तुम्ही निकट देवापाशीं । आणि मी पडिलों दूरि देशीं ।। कृपाळूपणें रघुनाथाशीं । माझी करुणा भाकावी ।। ३ ।। म्हणावें ते अनाथ । समर्था तूं दीनानाथ ।। म्हणावें ते पतित । तूं पतित-पावनु ।। ४ ।। म्हणावें ते परमकिंकर । देवा तूं करुणाकर ।। म्हणावें ते निराधार । आधार इच्छी ।। ५ ।। सत्य मिथ्या तुझा म्हणवी । त्याची चिंता असों द्यावी ।। ऐसी करुणा करावी । नानाप्रकारीं ।। ६ ।। तुम्हां दासांमध्यें मी हीन । माझे कोट्यावधि अवगुण ।। परंतु आहें अनन्य । सेवक रघुनाथाचा ।। ७ ।। पुढें म्यां ऐसेंचि असावें । माझें मत न पालटावें ।। इतुकें देवासी मागावें । तुम्हीं बंधुवर्गी ।। ८ ।। प्रत्यहीं माझा नमस्कार । देवासी करावा निरंतर ।। मजकारणें शरीर । इतुकें कष्टवावें ।। ९ ।। बाल वृद्ध नर नारी । सकळ भक्त कुमार कुमारी ।। समस्तांसी नमस्कारी । कृष्णातीरवासी ।। १० ।। शुद्ध उपासना विमल ज्ञान । वीतराग आणि ब्राह्मण्यरक्षण ।। गुरुपरंपरेचें लक्षण । शुद्धमार्ग ।। ११ ।। ऐसें पंचविधा बोलिलें । इतुकें पाहिजे यत्नें केलें ।। म्हणजे सकळ ही पावलें । म्हणे दासानुदास ।। १२ ।।"

माहुलीहून समर्थ कऱ्हाडास गेले. तेथें कृष्णाकोयनेचा प्रीतिसंगम आहे. म्हणजे कृष्णा व कोयना या दोन नद्या संगमस्थानीं समोरासमोर येऊन मिळतात—एकमेकींच्या मुखांत मुख घालतात. म्हणून या संगमास 'प्रीतिसंगम' हें अन्वर्थक नांव दिलेलें आहे. असा प्रीतिसंगम इतर कोठें ही नाहीं असें म्हणतात.




कऱ्हाड येथील कृष्णा व कोयना या नद्यांचा प्रीति-संगम

इतर संगमांच्या ठिकाणीं दोन्ही नद्यांचे संगम मिळून सहा तीर अगर कांठ असतात. संगमाच्या पूर्वी दोन्ही नद्यांचे मिळून चार तीर व संगमोत्तर झालेल्या नदीचे दोन तीर. परंतु कऱ्हाड येथें प्रीतिसंगमस्थानीं पांचच तीर आहेत. पश्चिम बाजूस कृष्णा व कोयना समोरासमोरून आल्यामुळें त्या दिशेस दोन्ही नद्यांचा एकच तीर अगर कांठ झालेला आहे. याची कल्पना वर दिलेल्या संगमाच्या नकाशावरून वाचकांना होईल. संगमस्थानीं कृष्णा एक फर्लांग दक्षिणवाहिनी आहे व कोयना दोन फर्लांग उत्तरवाहिनी आहे व संगमोत्तर कृष्णा पूर्ववाहिनी आहे. विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे कीं, दोन्ही नद्या संगमापूर्वी अगदीं थोड्या अंतरावर पूर्ववाहिनी आहेत व संगमाजवळच एकदोन फर्लांग प्रीतिसंगम करण्याकरितांच उत्तर व दक्षिणवाहिनी झाल्या आहेत असा प्रेक्षकांस भास होतो. कऱ्हाडाहून पांच मैलांवर शहापूरनजिक डोंगर आहे. तेथें समर्थ रहात व कऱ्हाडच्या प्रीतिसंगमावर स्नानसंध्यादि आन्हिक करण्यास येत व तें आटपल्यावर शहापूरचे डोंगरावर परत जात. दोनप्रहरीं शहापूर अगर मसूर गांवीं कोरडी भिक्षा मागत. भिक्षा मागून परत आल्यावर पानगे करून श्रींस नैवेद्य समर्पण करून भोजन करीत. एके दिवशीं ते बाजीपंत कुलकर्णी शहापूरकर यांच्या घरीं भिक्षेस गेले व 'जयजय रघुवीर समर्थ' असें म्हणाले. बाजीपंतांची बायको सईबाई ही बाहेर आली व नांदत्या-भरल्या-घरांत असे शब्द म्हणूं नका, असें रागानें म्हणाली. परंतु त्याकडे लक्ष न देतां दररोज भिक्षेच्या वेळीं सईबाईच्या दारांत समर्थ 'जयजय रघुवीर समर्थ' असें म्हणत असत व सईबाई नित्य असें म्हणूं नका असें रागानें सांगत असत. एके दिवशीं समर्थ भिक्षेस गेले असतां बाजीपंतांच्या घरांतील सर्व बायका चिंताग्रस्त बसलेल्या समर्थांस दिसल्या. चिंताग्रस्त होण्याचें कारण विचारतां, सईबाई म्हणाल्या कीं, कऱ्हाडास मोंगलाई आहे, तेथील यवन अधिकाऱ्यांनीं बाजीपंतांस गांवकीच्या हिशेबाकरितां विजापुरास नेलें आहे व त्यांस बहुत त्रास देत आहेत. बाजीपंत संकटांतून सुटून सुखरूप परत आल्यास तुम्ही 'राम राम' म्हणाल काय? असें समर्थांनीं विचारतां सईबाई होय म्हणाल्या. आजपासून अकरावे दिवशीं दुपारीं बाजीपंत घरीं येतील, असें सांगून समर्थ बाहेर पडले व कारकुनाचा वेष घेऊन विजापुरास गेले. तेथें बादशहापाशीं शहापूरगांवचा सर्व हिशेब समजावून देऊन समर्थांनीं बाजीपंतास सोडवून घेतलें. नांव विचारतां दासोपंत म्हणून सांगितलें. बादशहानें वस्त्रें देऊन दासोपंतांचा सन्मान केला व उभयतांना जाण्यास निरोप दिला. वाटेंत बाजीपंतांनीं कोण, कोठून आलां वगैरे विचारतां, तुमची स्त्री सईबाई व श्वशूर आबाजीपंत यांनीं पाठविलें म्हणून सांगितलें. समर्थ शहापूरच्या शिवेपर्यंत बाजीपंतांबरोबर आले व नंतर बाजीपंतांस चुकवून डोंगरांत गेले. ग्रामदेवतेचें दर्शन घेऊन बाजीपंत घरीं

गेले. समर्थांनीं सांगितल्याप्रमाणें तो अकरावा दिवस होता. घरीं सर्वांना भेटल्यावर " तुम्ही पाठविलेला कारकून कोण ? त्यानें बादशहापाशीं हिशेब बरोबर सांगून मला सोडवून घेतलें. माझेबरोबर तो गांवशिवेपर्यंत होता. नंतर नाहींसा झाला." असें बाजीपंत म्हणाले. सईबाईनीं मागील सर्व हकीकत सांगितली. " त्यांचें दर्शन घेतल्याशिवाय अन्न घेणार नाहीं " असें म्हणून बाजीपंत तीन दिवस निराहारी राहिले. चवथे दिवशीं ' जयजय रघुवीर समर्थ ' म्हणून समर्थ भिक्षेस आले. सईबाई व बाजीपंत या उभयतांनीं समर्थांस साष्टांग नमस्कार घातला व अनुग्रह करण्यास विनंति केली. समर्थांनीं उभयतां पतिपत्नींना व आबाजी मुरार व दत्ताजी अनंत यांना अनुग्रह दिला व डोंगरांत निघून गेले. आबाजीपंत व दत्ताजीपंत हे चुलत बंधु व आबाजीपंत हे बाजीपंतांचे श्वशूर. सईबाईना अनुग्रह देण्यापूर्वी समर्थांनीं त्यांना फार छळलें व त्यांची अनन्यनिष्ठा पाहून नंतर अनुग्रह दिला, याबद्दल पूर्वचरित्रांत बरेंच विस्तृत व अतिशयोक्तिपूर्ण वर्णन केलेलें आहे. आठ आठ दिवस समर्थांचें दर्शन झालें नाहीं, तरी सईबाई उपोषण करीत म्हणून समर्थांनीं त्यांच्या करितां शहापूर येथें एक चुन्याचा मारुति तयार करून त्याची मंदिरांत स्थापना करून दिली. तो प्रताप मारुति आहे. त्या मारुतीची पूजा करून तीर्थ घेऊन भोजन करावें असें सईबाईस सांगितलें. ( शके १५६७ ) मारुतीच्या डाव्या बाजूस समर्थ एकांतांत बसत असत. ती गुहा आहे. उजव्या बाजूच्या डोंगरावर समर्थ बसण्यास जात असत, ती जागा अद्याप ही दाखवितात. कांहीं अंतरावर असलेल्या चरेगांवच्या डोंगरावर ही समर्थ जात असत. त्या डोंगरावर समर्थांची एक गुहा आहे. त्या डोंगरावरून एकीकडे कोयना व एकीकडे कृष्णा अशा दोन नद्यांच्या कांठांवरील रम्य प्रदेश दिसतो. त्याचें वर्णन समर्थांनीं एका स्फुटांत केलें आहे. शहापूर येथील मारुति सुप्रसिद्ध अकरा मारुतींपैकीं पहिला मारुति होय. तंजावरमठाधिपति भीमस्वामी म्हणतात:—" पुढें नाना भक्त मिळाले अपार । महोत्सव थोर थोर होती ।। शहापूर स्वामीचें मुख्य अधिष्ठान । मोक्षाचें भुवन भूमंडळीं ।। ४२ ।। " यावरून चाफळास राममंदिर बांधून तेथें राहण्यास जाण्यापूर्वी समर्थांचें मुख्य ठाणें ( अधिष्ठान ) शहापूरच होतें असें दिसतें.

शहापुराहून समर्थ चाफळखोऱ्यांत गेले. ते नेहमीं डोंगरांत असत. डेरवणचे डोंगरघळींत, वाघापूरचे सड्यावर, भैरवगडचे घळींत, चंद्रगिरीचे डोंगरावर किंवा कळंब्याचे घळींत असत. त्या वेळीं चाफळ खोऱ्यांत शिवाजीमहाराजांतर्फे नरसोमलनाथ अंबरखाने हे मामलेदार होते; त्यांनीं व चाफळचे आनंदराव देशपांडे व भानजी जोशी यांनीं समर्थांचा अनुग्रह घेतला. त्यांना समर्थांनीं चाफळांत मठ करून दिला. ( ह. स्वा. ब. ) भानजी जोशी ( गोसावी ) हे नेहमीं समर्थांपाशीं असत. नंतर फिरत फिरत समर्थ पुन्हा कऱ्हाडास गेले. तेथें रुद्राजीपंत देश-

पांडे यांचे घरीं त्यांचें कीर्तन झालें. रुद्राजीपंतांची आक्का नांवाची एक बालविधवा कन्या होती. तिनें समर्थांचा अनुग्रह घेतला. कऱ्हाडाहून समर्थ मिरजेस गेले. तेथें गोपजीपंत देशपांडे यांची बालविधवा कन्या वेणूबाई यांनीं समर्थांचा अनुग्रह घेतला. त्यांचें सविस्तर चरित्र पुढें ८ व्या भागांत दिलें आहे. मिरजेहून समर्थ कोल्हापुरास गेले. तेथें महालक्ष्मीच्या देवालयांत त्यांचें कीर्तन झालें. कोल्हापुरचे सुभेदार गंगातीरस्थ पाराजीपंत बर्वे हे कीर्तनास आले होते. त्यांनीं समर्थांना घरीं नेऊन त्यांचा अनुग्रह घेतला. पाराजीपंतांची बहीण रखमाबाई व त्यांचीं दोन मुलें अंबाजी व दत्तात्रय त्यांचे घरीं होतीं. अंबाजीची पूजासाहित्यादि देण्यांत दक्षता, टापटीप व तरतरीतपणा पाहून समर्थांनीं त्याला आपल्याजवळ ठेवण्यास सांगितलें. "माझे दोन पुत्र व मी अशीं सर्वच स्वामीपाशीं राहतों" असें रखमाबाई म्हणाल्या. त्या सर्वांना स्वामींनीं बरोबर घेतलें. नंतर कऱ्हाडप्रांतीं शिरगांव येथें मठ स्थापून तेथें दत्तात्रय व रखमाबाई यांना ठेवलें व अंबाजी यास बरोबर घेतलें. हाच समर्थांचा पट्टशिष्य कल्याणस्वामी होय. याचें सविस्तर चरित्र पुढें ८ व्या भागांत दिलें आहे. शिरगांवास आल्यावर टाकळीहून उद्धवास बोलावून आणलें व त्यास ही बरोबर घेतलें. सईबाई, बाजीपंत, रुद्राजीपंत, आक्काबाई, गोपजीपंत, वेणूबाई, पाराजीपंत, रखमाबाई या सर्वांना अनुग्रह शके १५६६ मधील वैशाख व १५६७ मधील चैत्र यांच्या दरम्यान, समर्थ शहापूर, कऱ्हाड, मिरज व कोल्हापूर येथें गेले त्या वेळीं, दिला असला पाहिजे. नक्की काळ कोणत्या ही चरित्रांत दिलेला नाहीं.

अनेक शिष्य होऊन संप्रदाय वाढत चालला; तेव्हां श्रीरामनवमीचा उत्सव सुरू करावा असें समर्थांना वाटूं लागलें. त्याकरितां मसूर हें गांव पसंत केलें. तेथें ब्राह्मणवस्ती बरीच होती, म्हणून त्यास ब्रह्मपुरी म्हणत असत. तेथील कुलकर्ण्यांच्या आईस अनुग्रह दिला व तेथें मारुतीची स्थापना केली. हा सुप्रसिद्ध अकरा मारुतींपैकीं दुसरा मारुति. शिष्यमंडळी बरीच वाढली, तेव्हां शके १५६७ सालचा मसूरचा पहिला श्रीरामनवमीचा उत्सव मोठ्या समारंभानें करण्याचें समर्थांनीं ठरविलें. उत्सवाची तयारी होत आली. परंतु मसूरच्या यवन अधिकाऱ्यानें मध्यें एक विघ्न आणलें. त्या काळीं श्रींची उत्सवमूर्ति रथांत बसवून छबिना काढण्याची पद्धत असे. रथांतील सिंहासनास उंच निशाणाच्या काठ्या लावीत असत. वाटेंत आंब्याच्या झाडाच्या कांहीं फांद्या होत्या त्या तोडण्यास मसूरच्या यवनाधिकाऱ्यानें हरकत घेतली. समर्थ तत्काल विजापूरच्या बादशहाकडे गेले व बादशहाकडून फांद्या तोडण्याचा मोहरबंद हुकूम आणून मसूरच्या अधिकाऱ्यास दाखविला, तेव्हां त्यास फांद्या तोडण्याची परवानगी देणें भाग पडलें. समर्थांनीं अंबाजीस कुऱ्हाड घेऊन फांदी तोडण्यास सांगितलें. पुढें बसून मागें तोडण्यास सांगितलें. आज्ञेप्रमाणें फांदी तोडतांच अंबाजी विहिरींत पडला. विहीर फार खोल होती. बराच वेळ

झाला, तेव्हां अंबाजी बुडून मेला, असें सर्वांस वाटलें. तेव्हां समर्थ विहिरीजवळ आले व "अंबाजी, 'कल्याण' आहेस काय?" म्हणून हांक मारली. "आपल्या कृपेनें 'कल्याण' आहें", म्हणून अंबाजी वर आला. त्या दिवसापासून समर्थांनीं त्याचें नांव 'कल्याण' ठेवलें. नंतर रथाची मिरवणूक यथासांग होऊन उत्सवसमारंभ निर्विघ्नपणें पार पडला. कल्याणस्वामींच्या चरित्रांतील वरील गोष्टीबद्दल मोरोपतांची पुढील आर्या प्रसिद्ध आहेः—"निजवचनें वटशाखा तोडुनि जो शिष्य पावला पतन। तो कल्याणचि केला, जीवनदानें करूनियां जतन ॥ १ ॥" पंतांनीं आर्या-वृत्तांतील मात्रा जुळण्याकरितां 'आम्रशाखा' ऐवजीं 'वटशाखा' घातलें आहे असें दिसतें. यानंतर समर्थ कांहीं दिवस मसूरांत होते. त्या वेळीं शहापूरच्या सईबाई त्यांच्या दर्शनास येत. त्यांच्या बरोबर भिकाजी नांवाचा एक मुलगा येत असे. त्याला सईबाईनें आपल्या मुलाप्रमाणें वाढविला होता. तो सईबाईच्या चुलतभावाचा मुलगा (भक्तमंजरीमाला). त्यानें ही समर्थआज्ञेवरून एके दिवशीं विहिरींत उडी टाकली व नंतर समर्थांनीं त्यास अनुग्रह दिला. तोच पुढें तंजावर-मठाधिपति भीमस्वामी झाला. त्याची सविस्तर कथा पुढें ८ व्या भागांत दिली आहे. यानंतर रामनवमीचे तीन उत्सव मसूरांत झाले. अद्याप राममंदिरास स्थळ निश्चित करावयाचें होतें. श्रीराममूर्ति ही अद्यापि मिळाली नव्हती. त्याकरितां समर्थ प्रयत्न करीत होते. श्रीराममूर्ति मिळेपर्यंत समर्थांनीं सुप्रसिद्ध अकरा मारुतींपैकीं बऱ्याच मारुतींची स्थापना केली.

---

## (आ) अकरा मारुति

**मनोजवं मारुततुल्यवेगं। जितेन्द्रियं बुद्धिमतां वरिष्ठम् ॥**
**वातात्मजं वानरयूथमुख्यं। श्रीरामदूतं शरणं प्रपद्ये ॥ १ ॥**

—रामरक्षा

समर्थांना लोक मारुतीचा अवतार समजत. श्रीसूर्यनारायणानें सूर्याजीपंतांस वर दिला तेव्हां दुसरा पुत्र मारुतिअंशेंकरून होईल असें सांगितलें होतें. लहानपणीं समर्थ या झाडावरून त्या झाडावर सहज लीलेनें उड्या मारीत, तेव्हां जांबच्या लोकांना सूर्यनारायणाचा वर खरा आहे असें वाटूं लागलें. पुढें बाराव्या वर्षी समर्थ लग्नमंडपांतून पळून जाऊन तपश्चर्या करून व तीर्थयात्रा करून आजन्म ब्रह्मचारी राहिले. तेव्हां मारुति-अवतारांत व समर्थचरित्रांत साम्य आहे अशी लोकांची दृढ समजूत झाली. पुढें धर्मसंस्थापनेकरितां समर्थांनीं समाजामध्यें संघटना करण्याचा जो प्रयत्न केला, त्यांत गांवोगांवीं मारुतीची स्थापना करणें हा ही एक मुख्य भाग होता, असें जेव्हां बहुजन समाजाच्या नजरेस आलें, तेव्हां समर्थ हे खरोखरीच




श्रीसमर्थ-स्थापित

**अकरा मारुती**

खालीं रेघ मारलेल्या दहा गांवीं समर्थांनीं स्थापन केलेले अकरा मारुति आहेत.
चाफळ येथें दोन मारुति आहेत, श्रीरामापुढें दास मारुति व मागें प्रताप मारुति.

मारुतीचे अवतार असावेत असें लोकांना वाटूं लागलें असल्यास त्यांत नवल नाहीं. समर्थांनीं अनेक मारुति स्थापन केले. परंतु शके १५६६ ते १५७० च्या दरम्यान शहापूर, मसूर, चाफळ, उंब्रज, माजगांव, शिराळें, बहेबोरगांव, पारगांव व मनपाडलें या दहा गांवीं स्थापन केलेल्या अकरा मारुतींचीच सुप्रसिद्ध अकरा मारुतींमध्यें गणना कां केली आहे हा एक गूढ प्रश्न आहे. कोणत्या ही शिष्यप्रशिष्यकृत अगर सांप्रदायिक चरित्रांत या गोष्टीचा खुलासा केलेला नाहीं. समर्थकृत वाङ्मयामध्यें ही वरील दहा गांवांतील अकरा मारुतींसंबंधीं एकादें स्फुट नाहीं. प्रसंगविशेषीं समर्थांनीं अनेक तीर्थक्षेत्रांचा उल्लेख केला आहे. परंतु सुप्रसिद्ध अकरा मारुतींचा अंतर्भाव केलेलें एखादें स्फुट कोठें आढळत नाहीं. उद्धवाकरितां टाकळी येथें शके १५४२ सालीं स्थापन केलेला समर्थकृत पहिला मारुति. उद्धव हा समर्थांचा पहिला शिष्य. समर्थांनीं लहानपणीं त्यास आपल्या मांडीवर खेळविलें होतें. त्याला पुत्राप्रमाणें मानून त्याची मुंज केली. तीर्थयात्रेस जातांना उद्धव पाठीस लागला म्हणून त्याला पूजाअर्चेकरितां टाकळीमध्यें आपल्या तपश्चर्याकालच्या गुहेजवळ समर्थांनीं मारुति स्थापन करून दिला. असें असतां, टाकळी येथील समर्थकृत पहिल्या मारुतीची गणना सुप्रसिद्ध अकरा मारुतींमध्यें केलेली नाहीं. तेव्हां ज्या कोणीं प्रथम या विशिष्ट गांवांतील मारुतींस 'अकरा मारुति' ही संज्ञा दिली त्याचा कांहींतरी विशेष हेतु असला पाहिजे. सुप्रसिद्ध अकरा मारुतींचीं गांवें तत्कालीन राजकारणास उपयुक्त होतीं म्हणून त्यांना त्या स्वराज्यस्थापनेच्या कालीं विशेष महत्त्व आलें होतें, असें समर्थगाथाकार श्री. अनंतदास समर्थगाथेच्या प्रस्तावनेंत म्हणतात ( पान १२४ ). त्यांचें तें म्हणणें सयुक्तिक आहे असें आम्हांस वाटतें. हिरोजी फर्जंद यानें पन्हाळा किल्ला घेतल्यावर पारगांव येथें रायगडाहून शिवाजी महाराज गेले. त्याच वेळीं पोलादपुराहून समर्थ तेथें राजकारणाच्या खलबताकरितां गेले होते. मसूर गांव तर विजापूरप्रांत व शिवाजीची पुणें प्रांताची जहागीर यांमध्यें फार महत्त्वाचें ठिकाण होतें. म्हणून त्याकरितां मसूरच्या जगदाळ्याबरोबर शहाजी राजे यांचा बहुत दिवस तंटा होता व अखेर विजापूरदरबारांतून तो गांव शहाजी राजे यांनीं आपलेकडे घेतला. त्या काळीं राजकीय दृष्ट्या मसूरचें इतकें महत्त्व होतें. इतर गांवें ही तत्कालीन राजकारणाकरितां उपयुक्त होतीं, म्हणून त्या गांवीं त्या कारणाकरितां समर्थशिवाजींना वारंवार जावें लागलें असेल म्हणून त्या काळीं त्या गांवांना राजकीयदृष्ट्या विशेष महत्त्व होतें. या कारणाकरितां त्या गांवांतील अकरा मारुति सुप्रसिद्ध म्हणून प्रथम प्रसिद्धीस आले. पुढें स्वराज्यस्थापनेनंतर अकरा मारुतींच्या गांवांचें राजकीय महत्त्व गेलें तरी पूर्वीं एकदां विशिष्ट गांवांच्या अकरा मारुतींची सुप्रसिद्ध अकरा मारुतींमध्यें गणना केली ती पुढें ही कायम राहिली असावी.

समर्थशिष्या वेणूबाई यांनीं सुप्रसिद्ध अकरा मारुति एका अभंगांत गोवले आहेत. तो अभंगः—"चाफळामाजीं दोन उंब्रजेसी एक। पारगांवीं देख चौथा तो हा ॥ १ ॥ पांचवा मसुरीं, शहापुरीं सहावा । जाणा तो सातवा शिराळ्यांत ॥२॥ शिंगणवाडीं आठवा, मनपाडळें नववा ॥ दहावा जाणावा माजगांवीं ॥ ३ ॥ बाह्यांत अकरावा येणें रीती गावा । सर्व मनोभाव पुरविला ॥ ४ ॥ वेणी म्हणे स्वामी समर्थ रामदास ॥ कीर्ति गगनांत न समाये ॥ ५ ॥" या अभंगांत अकरा मारुति दिले आहेत. मात्र ते स्थापनेच्या कालक्रमानें दिले नाहींत. हनुमंतस्वामींच्या बखरींत ज्या क्रमानें नांवें दिलीं आहेत, तीं स्थापनाकालक्रमानें दिलीं असावींत असें दिसतें. तो क्रम:—( १ ) शहापूर येथें सईबाईकरितां स्थापलेला; ( २ ) मसूर येथें शके १५६७ च्या रामनवमी उत्सवाच्या पूर्वीं स्थापलेला; ( ३, ४ ) चाफळ येथें दोन मारुति, एक श्रीराममंदिरापुढील दासमारुति व दुसरा मंदिरामागील प्रताप-मारुति; ( ५ ) उंब्रज—चाफळाहून समर्थ नित्य स्नानास उंब्रजास कृष्णानदीस जात असत. तेथें क्वचित्प्रसंगीं राहावें लागे म्हणून उंब्रज येथें मारुतीची स्थापना केली. तेथें मठ स्थापून केशवगोसावी यांस ठेवलें; ( ६ ) शिराळें ——येथें देशपांडे प्रभृति बऱ्याच मंडळींनीं समर्थांचा अनुग्रह घेतला, त्यांनीं विनंति केल्यावरून तेथें मारुतीची स्थापना करून पूजाअर्चेचें काम देशपांडे यांस सांगितलें; ( ७ ) मनपाडळें व ( ८ ) पारगांव या दोन गांवांच्या शिष्यमंडळींनीं विनंति केल्यावरून तेथें दोन मारुतींची स्थापना करून दिली; ( ९ ) माजगांव——चाफळहून उंब्रजेस जातांना माजगांव पूर्वेस दीड मैलावर आहे. तेथील शिवेवर एक धोंडा होता त्यासच मारुति मानून लोक पूजा करीत असत. गांवकऱ्यांच्या विनंतीवरून समर्थांनीं त्याच धोंड्यावर मारुतीची मूर्ति कोरून तेथें मारुतीची स्थापना करून दिली; ( १० ) शिंगणवाडी—चाफळहून शिंगणवाडीची टेकडी अर्ध्या मैलावर आहे. तेथील गुहेंत समर्थ स्नानसंध्या करण्यास जात; तेव्हां तेथें टेकडीवर एक लहान गोजिरी मूर्ति तयार करून तिची स्थापना केली; ( ११ ) बाहें—हें गांव वाळवें तालुक्यांत बोरगांवनजीक कृष्णातीरीं आहे. कृष्णामहात्म्यांत यास 'बाहुक्षेत्र' ही संज्ञा आहे. तेथें कृष्णेचे दोन्हीकडे दोन ओघ होऊन मध्यें लहानसें बेट झालें आहे. तेथें समर्थस्थापित अकरावा मारुति आहे. बाहुक्षेत्रासंबंधीं पुढीलप्रमाणें आख्यायिका आहे. रावणवधानंतर श्रीराम पुष्पकविमानांत बसून लंकेहून अयोध्येस जात होते. वाटेंत बाहुक्षेत्रीं स्नानास उतरले. श्रीसीताबाई जवळच शिरटी येथें स्नानास राहिल्या. श्रीराम स्नानसंध्या करून श्रीसांबाची पूजा करूं लागले. कृष्णेस उल्हास वाटून गर्जना करूं लागली. मारुतीनें रामाच्या मागें उभा राहून कृष्णेचा ओघ थांबविला. पूजा झाल्यावर श्रीरामाच्या आज्ञेनें कृष्णेचा ओघ हळुहळु सोडला. त्यायोगानें दोन ओघ होऊन मध्यें बेट झालें. त्या ठिकाणीं रामस्थापित एक व

लक्ष्मणस्थापित एक अशीं दोन लिंगें आहेत. वरील आख्यायिका समर्थांनींच आपल्या एका स्फुटांत दिली आहे.

समर्थ या क्षेत्रीं आले तेव्हां "येथें मारुती नाहीं का ?" असें विचारतांच गांवकरी म्हणाले कीं, नजीकच अक्षोभ्य डोहांत भीमकुंड आहे, त्यांत मारुति आहे. अकरा खंडी धान्याचा नैवेद्य सिद्ध कराल तर मारुति बाहेर काढतों असें गांवकऱ्यांना समर्थ म्हणाले. "होय" म्हणतांच कोरेगांवकर कृष्णाजीपंत बोकील यांसह समर्थांनीं डोहांत उडी टाकली व मारुतीची मूर्ति घेऊन बाहेर आले. गांवकऱ्यांकडून धान्याची सिद्धता झाली नव्हती. तेव्हां मारुति समर्थांस म्हणाले, "ही मूर्ति या कालीं बाहेर राहणेची नाहीं म्हणून मी डोहांत राहतों. तुमचेकरितां बाहेर आलों. ही मूर्ति पुन्हा पूर्वस्थानीं ठेवावी व या ध्यानाची दुसरी मूर्ति तयार करून येथें स्थापावी." शिष्यमंडळीकडून चुना तयार करवून समर्थांनीं मूर्ति तयार केली व तिची तेथें स्थापना केली. कृष्णाजीपंत बोकील यांस समर्थांनीं पट्टाभिषिक्त राममूर्ति पूजेस दिली. अद्यापि ती त्यांच्या वंशजांच्या घरीं कोरेगांव येथें आहे. हे अकरा मारुती समर्थांनीं शके १५६७ ते शके १५७२ च्या दरम्यान कऱ्हाड—करवीर प्रांतांत संप्रदायप्रसारार्थ फिरत असतां स्थापलेले आहेत. प्रत्येक गांवांतील मारुतिस्थापनेचा नक्की काल कोणत्या ही चरित्रांत दिलेला नाहीं; परंतु चाफळ येथें राममूर्तीची स्थापना होण्यापूर्वी बहुतेक स्थापले असावेत. या अकरा मारुतींशिवाय वांई व महाबळेश्वर येथें दोन मारुति स्थापल्याचा मागें उल्लेख केला आहेच. त्यांशिवाय सज्जनगड येथें एक नैऋत्य दिशेस, प्रतापगडावरील बालेकिल्ल्यावर एक व उर्वशी नदीचे कांठीं डोळेगांवांत एक असे तीन मारुती समर्थांनीं स्थापलेले आहेत. खुद्द चाफळ येथें राममंदिरांतील दोन मारुतींशिवाय तिसरा एक गांवांत बाजारपेठेंत आहे. तो समर्थकृत असें कै. राजवाडे म्हणतात. चाफळगांवास कसबा केला त्या वेळेस पेठेंत मारुतीची स्थापना समर्थांनीं केली ( रामदास रामदासी, भाग १७, पान ४७ ).

---

## ( ई ) श्रीरामस्थापना

श्रीरामचंद्रा करुणा समुद्रा । ध्यातों तुझी राजसयोगमुद्रा ॥
नेत्रीं नये रे तुजवीण निद्रा । कैं भेटसी बा मजला समुद्रा ॥ १ ॥
जया यत्न फावेल तेणें करावा । महोत्सव या राघवाचा भरावा ॥
महा यत्न देखोनियां काळ धाके । प्रतापें बळें गाजवावे तडाखे ॥२॥
ळवे नेत्रपातें स्फुरे आजि बाहे । दिनानाथ हा राम येणार आहे ॥
जयाचेनि योगें सुखानंद लोटे । तया देखतां अंतरीं बाष्प दाटे ॥ ३ ॥

—समर्थ

कृष्णातीरीं समर्थ शके १५६६ सालीं वैशाख महिन्यांत आले व पहिला रामनवमीचा उत्सव मसूर येथें शके १५६७ सालीं चैत्र शुद्ध नवमीस केला. त्याची हकीगत मागें दिलीच आहे. त्या वेळीं श्रीराममूर्तीची स्थापना करण्यांत आली नव्हती. मसूर येथें रामनवमीचे तीन उत्सव झाल्यावर श्रीराममूर्तीची कोठें तरी कायमची स्थापना करून समारंभानें दरवर्षीं त्या ठिकाणीं उत्सव करावा असें समर्थांना वाटलें. त्यांनीं एका पाथरवटास बोलावून श्रींच्या चार मूर्ति करण्यास सांगितलें. त्यानें एक वर्षाची मुदत मागितली. नंतर कांहीं दिवसांनीं रंगनाथस्वामींनीं आपले वडील निजानंदस्वामी यांचे पुण्यतिथीकरितां समर्थांना कऱ्हाड येथें नेलें. पुण्यतिथि झाल्यावर समर्थ रंगनाथस्वामींबरोबर निगडीस गेले. तेथें कांहीं दिवस राहून समर्थ परत येण्यास निघाले. वाटेंत रहिमतपूरनजीक अंगापूरच्या रानांत कृष्णातटाकीं 'शिवनाथ' म्हणून एक पुरातन स्वयंभु प्रसिद्ध देवस्थान आहे, त्या ठिकाणीं समर्थ मुक्कामास उतरले. स्नानसंध्यादि आन्हिक झाल्यावर मारुतीचें ध्यान धरून समर्थ मानसपूजेस बसले. त्या वेळीं मारुतीचें ध्यान प्रगट न होतां रामाचें ध्यान प्रगट झालें. याचें कारण काय असावें याविषयीं समर्थ श्रीचें स्मरण करून चिंतन करीत असतां, कृष्णेचे डोहांतून शब्द झाला कीं, "तुमचे मनांत रामनवमीचे उत्सवास ज्या ध्यानाची मूर्ति पाहिजे त्या ध्यानाची मूर्ति या डोहांत आहे." समर्थांनीं डोहांत उडी मारली. हातास दोन मूर्ति लागल्या. त्या घेऊन समर्थ वर आले. एक मूर्ति धनुर्धारी रामाची व दुसरी महिषासुरमर्दिनी देवीची होती. दोन्ही मूर्तींची समर्थांनीं पूजा केली व झोळींत घालून अंगापुराहून चाफळास जाण्यास निघाले. (श. १५६९) भक्तलीलामृतांत अंगापुरच्या डोहांतून समर्थांनीं मूर्ति बाहेर काढल्याची कथा निराळी दिली आहेः शिवाच्या देवालयांत समर्थ निजले असतां त्यांना स्वप्न पडलें. स्वप्नांत श्रीरामांनीं स्वतः सांगितलें कीं, "या डोहांत राममूर्ति आहे. कडब्याची पेंडी डोहांत धारेवर सोडावी. जेथें पेंडी पेटेल तेथें बुडी मारून मूर्ति काढावी." (भक्तलीलामृत, अभंग २४।२५) अंगापूरच्या डोहांतून समर्थांनीं मूर्ति काढली ही गोष्ट खरी. त्यावर निरनिराळ्या पूर्वचरित्रांत तत्कालीं बहुजनसमाजांत कर्णोपकर्णीं ऐकलेल्या दंतकथा दिलेल्या दिसतात. समर्थांनीं झोळींतून मूर्ति नेलेली हकीकत गुराख्याच्या मुलांनीं लागलीच गांवकऱ्यांना सांगितली. ते समर्थांच्या पाठीमागें धांवून गेले. चरेगांवच्या रानांत सुकण्याच्या खिंडींत गांवकऱ्यांनीं समर्थांना गांठलें व मूर्ती परत मागितल्या. "मूर्ती तुमच्या गांवांतून आणल्या नाहींत, डोहांतून आणल्या आहेत," असें समर्थ म्हणाले. त्यावर गांवकरी म्हणाले कीं, "मूर्ती गांवांत गणपतीच्या देवालयांत होत्या. मोंगलाईंतील दंग्यांत यवन फोडतील या भीतीनें आमच्या वडलांनीं डोहांत ठेविल्या होत्या." "ठीक आहे, तुमच्या मूर्ती तुम्ही घेऊन जा" म्हणून मूर्ती सुखठाण्यावर ठेवून समर्थ

चाफळास गेले. अंगापूरच्या लोकांनीं चरेगांवांतून दोन गाडे आणले. पांचपन्नास लोकांनीं मूर्ती उचलून गाड्यांत ठेवण्याचा प्रयत्न केला. परंतु मूर्ती जागेवरून उचलेनात. तेव्हां अंगापूरचे लोक चाफळास गेले व समर्थांना साष्टांग नमस्कार घालून विनंति केली कीं, " मूर्ति आपणच आणाव्यात, आम्ही नेत नाहीं." समर्थांनीं "बरें आहे" म्हणून भानजी गोसाव्यांस मूर्ती आणण्यास आज्ञा केली. त्यांनीं सुखठाण्यास जाऊन दोन्ही मूर्ती झोळींत घालून आणल्या. समर्थांच्या अंगचें शारीरिक सामर्थ्य दाखविण्याकरितां ही गोष्ट थोडी अतिशयोक्तिपूर्वक वर्णन केलेली दिसते. बालपणांत ही समर्थांनीं सव्वा मणाचें पोतें उचलल्याची गोष्ट मागें सांगितली आहे. तेव्हां प्रौढपणांत ७।८ लोकांना न उचलणाऱ्या मूर्ती त्यांनीं उचलून नेणें शक्य आहे. परंतु भानजी गोसाव्यानें एकट्यानेंच झोळींतून मूर्ती कशा नेल्या याविषयीं शंका येते. कल्याणाच्या शरीरसामर्थ्याच्या एक दोन गोष्टी पुढें चारित्रांत दिल्या आहेत. कदाचित् कल्याणाप्रमाणें भानजी गोसावी सामर्थ्यवान् असण्याचा ही संभव आहे. अंगापूरच्या गांवकऱ्यांनीं श्रींचे सेवेस आमचा कांहीं अधिकार असावा अशी समर्थांना विनंति केली. प्रतिवर्षी रामनवमीच्या उत्सवांत बिनीस सिंहासनाची काठी तुमची ठेवण्यांत येईल, असें सांगितलें. त्याप्रमाणें दरवर्षीच्या रामवमीच्या उत्सवांतील बिनीचा मान अंगापूरकरांकडे अद्याप चालू आहे.

समर्थांच्या इच्छेप्रमाणें राममूर्ती अनायासानें मिळाली. नंतर ते राममंदिरास योग्य स्थळ शोधण्याच्या प्रयत्नास लागले. चाफळच्या आसपासचे डोंगर व वनश्री पाहून समर्थांनीं चाफळ गांव पसंत केलें व देवालयास जागा देण्यास गांवकरांना सांगितलें. मांड नदीच्या कुंभार डोहापलीकडे दक्षिणदिशेस दाट झाडींत स्मशानभूमि होती, ती जागा गांवकरांनीं दाखविली. भूतपिशाच्चांनीं बाधित अशी ती जागा होती, तरी समर्थांनीं ती पसंत केली व शिष्य मंडळी घेऊन ती जागा दुरुस्त करण्यास आरंभ केला. शेंदूर लावलेले सर्व दगड डोहांत फेंकून दिले. एका म्हसोबानें विनंति केल्यावरून श्रींच्या यात्रेकरूंना उपद्रव न देण्याचें वचन घेऊन टेकडीखालीं दक्षिणेस एका जांभळीच्या झाडाखालीं त्यास राहण्यास आज्ञा केली. रथाच्या पूर्व दिवशीं एक मापटें तांदूळ व एक नारळ व रथाच्या दिवशीं श्रींची स्वारी परत आल्यावर श्रींवरून ओंवाळलेला दहीभात, एवढ्याशावर त्यास संतुष्ट राहण्यास सांगितलें; अशी दंतकथा पूर्वचरित्रकारांनीं दिली आहे.

देवालयाची जागा स्वच्छ केली, परंतु 'सर्वारंभास्तंडुलाः प्रस्थमूलाः' या न्यायानें देवालय बांधण्यास लागणाऱ्या खर्चाचा प्रश्न निघाला. पुणें येथें शिवाजीमहाराजांनीं गिरिगोसावी यांचें कीर्तन ऐकलें. तेव्हां संतुष्ट होऊन महाराज त्यांना बिदागी देऊं लागले. निस्पृहपणानें त्यांनीं ती घेतली नाहीं. परंतु " चाफळास समर्थ श्रीरामाचें देवालय बांधीत आहेत, त्यांना मदत करावी" असें त्यांनीं सांगितल्यावरून महाराजांनीं

चाफळचे मामलेदार नरसोमलनाथ यांचेमार्फत ३०० होन पाठविले. ते द्रव्य व आनंदराव देशपांडेप्रभृति शिष्यमंडळींकडून आलेलें द्रव्य खर्च करून श्रीरामाचें देवालय बांधलें व त्यांत अंगापूरच्या डोहांतून आणलेल्या श्रीराममूर्तीची स्थापना यथाशास्त्र केली. त्या देवालयांत शके १५७० सर्वधारीनाम संवत्सरीं श्रीरामनवमीचा उत्सव मोठ्या समारंभानें केला. तो अद्याप पावेतों पूर्वपरंपरेप्रमाणें त्यांच्या वंशजांकडून चालत आहे. पहिल्या उत्सवाचें वर्णन स्वतः समर्थांनींच केलें आहे. तें डफगाण्यांत आहे. पहिल्या उत्सवाची वाचकांना यथार्थ कल्पना येण्याकरितां तें डफगाणें संबंध देतों.

भोंवती डोंगराचे फेर । मध्यें देवाचें शिखर ॥ पुढें मंडप सुंदर । नव खणांचा ॥ १ ॥ चहू खांबांवरी रचना । वर त्या चोवीस कमाना ॥ कम कटाऊ नयनां । समाधान ॥ २ ॥ नाना तरु आंबेवनें । दोहींकडे वृंदावनें ॥ वृंदावनीं जगज्जीवनें । वस्ती केली ॥ ३ ॥ पुढें उभा कपी वीर । पूर्वेकडे लंबोदर ॥ खालीं दाटले तरुवर । ठायीं ठायीं ॥ ४ ॥ दमामे चौघडे वाजती । धडाके भांड्यांचे[1] होती ॥ फौजा भक्तांच्या साजती । ठायीं ठायीं ॥ ५ ॥ माही मरातबें निशाणें । मेघडंबरें सूर्यपानें ॥ पताका छत्र्या सुखासनें । दिंड्या विंझणें कुंचे ॥ ६ ॥ काहळे कर्णे बुरुंग बाके । नानाध्वनी गगन झाके ॥ बहु वाद्यांचे धबके । परोपरी ॥ ७ ॥ टाळ मृदंग उपांग । ब्रह्मविणें चुटक्या चंग ॥ तानें मानें माजे रंग । हरिकथेशीं ॥ ८ ॥ घंटा घांटा शंख भेरी । डफडीं पांवे वाजंतरीं ॥ भाट गर्जती नागरी । परोपरी ॥ ९ ॥ उदंड यात्रेकरू आले । रंगीं हरिदास मिळाले ॥ श्रोतेवक्ते कथा चाले । भगवंताची ॥ १० ॥ नाना पुष्पमाळा तुरे । पाहों जातां भडस पूरे ॥ रंग स्वर्गांचा उतरे । ठायीं ठायीं ॥ ११ ॥ गंध सुगंध केशरे । उदंड उधळिती धूशरें ॥ जगदंतरें हरिहरें । वस्ती केली ॥ १२ ॥ दिवट्या हिलाल चंद्रज्योती । नळे आरडत ऊठती ॥ बाण हवया सरकती । गगनामध्यें ॥ ३ ॥ उदंड मनुष्यांचे थाटे । दिसताती लखलखाटे । एकमेकांसी बोभाटे । बोलाविती ॥ १४ ॥ उदंड उजळल्या दीपिका । नामघोष करतालिका । कित्येक म्हणती ऐका ऐका । ऐसे शब्द होती ॥ १५ ॥ खिरापतीची वांटणी । तेथें झालीसे दाटणी । पैस नाहीं राजांगणीं । दाटी जाहाली ॥ १६ ॥ रंगमाळा नीरांजनें । तेथें वस्ती केली मनें ॥ दिवस उगावला सुमनें । कोमाइली ॥ १७ ॥ रथ देवाचा ओढिला । यात्रेकरां निरोप झाला । पुढें जावयाचा गलबला । ठायीं ठायीं ॥ ८ ॥ भक्तजन म्हणती देवा । आतां लोभ असों द्यावा ॥ धन्य सुकृताचा ठेवा । भक्ती तुझी ॥ १९ ॥ दास डोंगरीं राहतो । यात्रा देवाची पाहतो । देव भक्तासवें जातो । ध्यानरूपें ॥ २० ॥" या डफगाण्यांत चाफळच्या देवालयाचें वर्णन आहे, भोंवतालच्या वनश्रीचें वर्णन आहे, यात्रेंतील निरनिराळ्या वाद्यांचें

---

1. तोफांचे.

वर्णन आहे, हरिदासांच्या कथेचें वर्णन आहे, यात्रेंतील बाण चंद्रज्योतींचें वर्णन आहे, " पैस नाहीं राजांगणीं दाटी जाहाली " असें यात्रेंतील दाटीचें वर्णन आहे, " रंग स्वर्गींचा उतरे। ठायीं ठायीं " असें यात्रेंतील कांहीं विशेष भागांचें वर्णन आहे व अखेर रथानंतर यात्रेकरूंच्या परत जाण्याच्या गलबल्याचें वर्णन आहे. इतकें सुंदर यात्रेचें वर्णन आहे. याप्रमाणें यात्रेचें वर्णन करून समर्थ म्हणतातः—" दास डोंगरीं राहतो। यात्रा देवाची पाहतो॥ " यात्रा सुरू असतांना समर्थ आसपासच्या डोंगरांत रामघळींत राहात असत व प्रसंगविशेषीं चाफळास येत. समर्थांच्या चरित्र-लेखनास उपयोगी पडणाऱ्या समर्थवाङ्मयापैकीं समर्थांचें डफगाणें हें एक महत्त्वाचें स्फुट काव्य आहे.

चाफळास श्रींच्या देवालयाच्या दक्षिणेस मठ बांधला. त्यांत शिष्यमंडळी राहत. समर्थ बहुधा मठांत राहत नसत. हल्लीं जेथें मोठा मठ आहे, तेथें पूर्वीं समर्थकाळीं प्रथम पर्णकुटिका होती. त्या पर्णकुटिकेंत बसूनच समर्थांनीं आपल्या भावी कार्याची रूपरेषा आंखली. नंतर तेथें मठ बांधला. रामाच्या देवालयाच्या घुमटाखालीं योग-विवरिका आहे व देवालयाखालीं तळघर आहे. या दोन्ही ठिकाणीं समर्थ एकांतांत ध्यान करण्यास जात असत. देवालयामागील प्रताप-मारुतीजवळील जागा समर्थांना फार प्रिय असे. हल्लीं ही ती जागा फार रमणीय वाटते. देवालयापुढें उत्तर बाजूस समर्थांच्या समाधीनंतर बांधलेलें वृंदावन आहे. समर्थांनीं सज्जनगडास समाधि घेतली; परंतु त्यांच्या अस्थि काशीस नेण्यापूर्वीं ज्या जागेवर चाफळ येथें आणून ठेवल्या, त्या जागेवर तेव्हां जें वृंदावन बांधलें तें अद्याप तेथें आहे. समर्थ रामघळींत किंवा शिंगणवाडीच्या गुहेंत राहत असत. प्रतिदिवशीं चाफळाहून उंब्रजेस कृष्णास्नानास जात. समर्थांनीं चाफळ येथें सुरू केलेला रामनवमीचा उत्सव श्रींच्या कृपेनें उत्तरोत्तर अधिकाधिक थाटानें व उत्साहानें होऊं लागला, ही गोष्ट खरी आहे. परंतु आरंभीं उत्सव सुरू झाल्यावर पुढें तो सतत उत्तम प्रकारें चालावा याबद्दल समर्थांना किती काळजी वाटत असे, हें ' रामदास आणि रामदासी ' भाग ९ वा, यांत प्रसिद्ध केलेल्या एका पत्रावरून सिद्ध होतें. सदरहू भागांत संप्रदायाचीं कागदपत्रें प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांत लेखांक ५२ यांत पुढील मजकूर आहेः—" पूर्वीं श्रींची स्थापना चाफळीं जाली, ते समयीं नरसिंगराव आंबरखानी मुद्राधारी, परांजी देशमुख, नागोजीपंत देशकुलकर्णी, नागोजी भावे नाईकवाडी व नाना घोलकर या पांच जणांकडून श्रींचे पुष्पांवर श्रींनीं हस्त ठेविलें कीं, या अधिष्ठानाची भाक्तिपरंपरा करावी, सर्व साह्यता करावी, कानु कानुनाती यात्रेंत होऊं न द्यावी, सर्वस्वेसी साहे असावें म्हणून पुष्पावरी हस्त पांच जणांनीं ठेविले. ते कालीं पांच जणांनीं श्रींस उभे राहून प्रार्थना केली कीं, आम्हांकडून श्रींचे पुष्पांवर हात ठेविले तरी श्रींनीं ही यास श्रींच्या अधिष्ठानाची

उदासीनता न केली पाहिजे; येविषयीं श्रींनीं ही श्रींच्या प्रसाद-पुष्पांनीं साक्ष म्हणून हास्यवदनें संतोषपूर्वक हस्त ठेविला, " इत्यादि पत्र पुढें बरेंच आहे. कारणापुरता उतारा उद्धृत केला आहे. चाफळची उत्सवपरंपरा अव्याहत चालावी याबद्दल पंचांकडून जसें समर्थांनीं श्रींच्या पुष्पांवर हात ठेवून वचन घेतलें, तसें पंचांनीं ही समर्थांकडून अधिष्ठानाविषयीं उदासीन न राहण्याबद्दल वचन घेतलें ! रामनवमीच्या उत्सवाचें काम पंचांवर व शिष्यमंडळींवर सोंपवून समर्थ नेहमींप्रमाणें रानावनांत, दरीखोऱ्यांत फिरत राहतील अशी भीति चाफळ येथील पंचांस पडली असावी असें दिसतें !! वरील पत्रांत शके १५७० सालीं विजापूरचे दिवाण कानतराव यांनीं उंब्रज व कोरटी येथील कांहीं जमीन व घोरपडे बाजी राजे यांनीं चरेगांव, माजगांव येथील कांहीं जमीन चाफळच्या उत्सवास इनाम दिल्याचा उल्लेख आहे. यावरून शके १५७१ सालीं शिंगणवाडीस समर्थांनीं शिवाजीमहाराजांना अनुग्रह देण्यापूर्वीच चाफळच्या रामाची कीर्ति विजापूर येथील बडे हिंदु अधिकारी व मराठे सरदार यांच्यापर्यंत गेली होती असें सिद्ध होतें.

## ( ई ) उत्सव-रहस्य

बहुविध भजनाचीं दैवतें पाहिलीं हो ।
सकळ त्यजुनि रामीं वृत्ति हे राहिली हो ॥
विमलगुणशिलाची लागली प्रीति मोठी ।
विमल हृदय होतां उद्धरे कूळ-कोटी ॥ १ ॥
सकळ गुण-निधीचा राम लावण्यसिंधू ।
अगणित गणवेना शक्तिरूपें अगाधू ॥
प्रबळबळ चळेना, वाउगे व्यर्थ कामी ।
म्हणउनि मन रामीं लागलें पूर्णकामीं ॥ २ ॥

—समर्थ-स्फुट कविता

या भागांत समर्थांनीं तत्कालीन समाजाला श्रीराम व रामदूत हनुमान या दोन देवतांचीच उपासना करण्यास कां प्रवृत्त केलें, याचें विवेचन केलें आहे. तें विवेचन करण्यापूर्वीं समर्थ-वाङ्मयांतील वर दिलेल्या उताऱ्यांशिवाय आणखी कांहीं उतारे पुढें दिले आहेत. हेतु हा कीं, समर्थांनीं कृष्णातीरीं आल्यावर अनेक मारुति स्थापून हनुमंतजयंती व रामजयंती हे जे उत्सव सुरू केले, त्यांच्या रहस्याची कांहीं कल्पना वाचकांस खुद्द समर्थांच्या दिव्य वाणींतील तेजस्वी उद्गारांनीं व्हावी.

उतारे अधिक असले तरी उत्सव-रहस्य कळण्याला ते उपयोगी पडणारे आहेत म्हणून देत आहे.

"कथा नृसिंहा वामना-भार्गवाची। कथा कौरवा पांडवा माधवाची॥ कथा देवइंद्रादि ब्रह्मादिकांची। समस्तांमधें श्रेष्ठ या राघवाची॥ १॥ जेणें फेडिला पांग ब्रह्मादिकांचा। बळें तोडिला बंध त्या त्रीदशांचा॥ म्हणोनी कथा थोर या राघवाची। जनीं ऐकतां शांत होते भवाची॥ २॥ (रामायण, युद्धकांड) कीर्ति या रघुनाथाची। पाहतां तुळणा नसे॥ एकबाणी एकवचनी। एकपत्नीच धार्मिकू॥१॥ (मानपंचक) आमुचे कुळीं रघुनाथ। रघुनाथें आमुचा परमार्थ॥ जो समर्थांचा ही समर्थ। देवा सोडवीता॥ (दासबोध, १०-७, ११) करी दुर्जनांचा संहार। भक्तजनांसी आधार॥ ऐसा तो हा चमत्कार। रोकडा चाले॥ (१०-७, २९) मनीं धरावें तें होतें। विघ्न अवघेंचि नासून जातें॥ कृपा केलिया रघुनाथें। प्रचीत येते॥ (१०-७, ३०) रघुनाथ स्मरोनि कार्य करावें। तें तत्काळचि सिद्धीस जावें॥ कर्ता राम हें असावें। अभ्यंतरीं॥ (१०-७, ३३)."

पुढील उतारे समर्थांच्या स्फुट काव्यांतील आहेत:—"चळेना समरांगणीं ठाण मागें। चळेना मुखें बोलतां वाक्य यूगें॥ चळेना कृपासिंधु कल्पांतकाळीं। रघूराज हा आदरें दास पाळी॥ १॥ चमत्कारलें चित्त हें रामगूणीं। उठे कीर्ति वाखाणितां प्रीति दूणी॥ रघूनायकासारिखा देव नाहीं। क्रिया पाहतां चोखडी सर्व कांहीं॥ २॥ चपेटा विझे काळमाथां जयाचा। धरी रे मना पंथ हा राघवाचा॥ विवेकी जनें राजपंथेंचि जावें। तरी श्रीहरि पाविजेतो स्वभावें॥ ३॥ जया यत्न फावेल तेणें करावा। महोत्सव या राघवाचा भरावा॥ महायत्न देखोनियां काळ धाके। प्रतापें बळें गाजवावे तडाखे॥ ४॥ सकल भुवन तारी राम लीलावतारी। भवभय अपहारी राम कोदंडधारी॥ मनन करि मना रे धीर दे वासना रे॥ रघुविरभजनाची हे धरीं कामना रे॥ ६॥ अनाथांचा नाथ, भक्तांचा कैवारी। सिंहासनावरी शोभताहे॥ १॥ शोभताहे राम प्रतापें आगळा। दिसे सौम्य लीळा सत्त्वगूणी॥ २॥ सत्त्वगुणी होणें सात्त्विकां कारणें। कोपें संहारणें दुर्जनांसी॥ ३॥ दुर्जनां संहार सज्जनां आधार। भाविकांसी पार पाविजे तो॥ ४॥.........महा भय कैसें रामासी भजतां। हें जाण अन्यथा वाक्य नव्हे॥ ५॥ नव्हे सोडवण रामनामेंविण। रामदास खूण सांगतसे॥ ६॥ स्वधामासि जातां महा रामराजा। हनूमंत तो ठेविला याच काजा॥ सदा सर्वदा रामदासांसि पावे। खळीं गांजितां ध्यान सांडूनि धांवे॥ १॥"

बारा वर्षे पंचवटींत गोदातीरीं तपश्चर्या करून व नंतर बारा वर्षे सर्व भरत-खंडांत तीर्थयात्रा करून समर्थ आपल्या वयाच्या छत्तिसाव्या वर्षी महाबळेश्वरीं कृष्णातीरीं आले. तेथें शंकराचें पुरातन स्थान असतांना ही मारुतीची स्थापना

केला. लागलींच वांई येथें ही मारुतीची स्थापना केली व नंतर ३।४ वर्षांत संप्रदायप्रसाराकरितां फिरत असतां कऱ्हाड-करवीर भागांत सुप्रसिद्ध अकरा मारुतींची स्थापना केली. कृष्णातीरीं दुसऱ्या वर्षी म्हणजे शके १५६७ सालीं मसूर येथें रामनवमीचा उत्सव सुरू केला. शिष्यसमुदाय वाढल्यावर चाफळ येथें सुंदर मंदिर बांधलें व त्यांत राममूर्तीची स्थापना केली व रामनवमीचा उत्सव शके १५७० सालीं सुरू केला. त्याच्या यथार्थ वर्णनाचें समर्थकृत डफगाणें मागें दिलेंच आहे. प्रश्न असा उद्भवतो कीं, भरतखंडांत अनेक देवता असतांना समर्थांनीं लोकांना राम व मारुति या दोन देवतांच्याच उपासनेस कां लावलें ? याचें कारण समर्थांच्या शब्दांत दिलें असतां वाचकांना पटेल म्हणून आम्हीं समर्थांच्याच कवितेंतील कांहीं उतारे वर दिले आहेत. त्यांवरून समर्थांनीं या दोन सुप्रसिद्ध देवतांच्याच उपासनेकडे लोकांचीं मनें कां प्रवृत्त केलीं हें वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. परंतु रामजयंति व हनुमंतजयंति या दोन जयंत्यांकडे बहुजन-समाजाचें लक्ष वेधण्यांत समर्थांचा कांहीं विशेष हेतु नव्हता, अशी शंका कांहीं विद्वान् आक्षेपक अलीकडे घेऊं लागले आहेत, म्हणून त्याविषयीं चार शब्द लिहिणें आवश्यक आहे.

समर्थांना बारा वर्षांच्या तीर्थयात्रेच्या प्रवासांत भरतखंडांतील लोकांची जी तत्कालीन स्थिति दिसून आली त्याची थोडीशी कल्पना आम्ही तीर्थयात्रेच्या भागांत 'परचक्रनिरूपण' व 'अस्मानीसुलतानी' या स्फुट प्रकरणांतील कांहीं उतारे दिले आहेत त्यांवरून वाचकांना झाली असेलच. दुष्काळ, अस्मानी-सुलतानी व परचक्र यांनीं लोक हवालदील झाले होते, त्यांचा आत्मविश्वास जाऊन ते परावलंबी झाले होते. कित्येक लोक पोटाकरितां परकीय सत्ते-खालीं नोकरी करण्यांत व सरदारी पत्करण्यांत आनंद मानीत होते, तर कित्येक लोक परधर्म स्वीकारण्यांत धन्यता मानीत होते; स्त्रिया भ्रष्टविल्या जात होत्या, देवतामूर्तींचा उच्छेद होऊन देवालयें भ्रष्टविलीं जात होतीं, असें समर्थांना आढळून आलें. तेव्हां वर वर्णन केलेली दुःस्थिति जाऊन देशाला सुस्थिति कशी प्राप्त होईल याची समर्थांना चिंता लागली. लहाणपणीं जगाचा अनुभव नसतांना केवळ पूर्वसंस्कारानें "आई, चिंता करितों विश्वाची" असें त्यांनीं आपल्या मातो-श्रींच्या एक प्रश्नास उत्तर देतांना म्हटलें होतें. परंतु बारा वर्षें तीर्थयात्रेच्या प्रवासांत लोकांची हीनदीन स्थिति पाहून त्यांना भरखंडांतील विश्वाची खरोखरच चिंता लागली. हल्लींप्रमाणें सभा भरवून व्याख्यानें देण्याचे ते दिवस नव्हते. हल्लीं-प्रमाणें पाश्चात्य शिक्षणाचा प्रसार होऊन सभा करण्याकडे लोकांच्या पुढाऱ्यांची व सभेस जाऊन भाषणें ऐकण्याकडे बहुजन समाजाची प्रवृत्ति त्या वेळीं झाली नव्हती. समर्थांना धर्मस्थापनेकरितां लोकसंग्रह करावयाचा होता. लोकसंग्रह करण्या-

करितां लोकांचीं मनें आकर्षण करावीं लागतात. कोणत्या मार्गानें लोकांचीं मनें आकर्षण होतील, तो मार्ग शोधून काढण्यांतच लोकनायकांचें कौशल्य दिसून येतें. "नभामाजिं तारांगणें" असा भक्तसमुदाय, असा शिष्यसमुदाय, असा अनुयायिसमुदाय उत्पन्न केल्याशिवाय इष्ट कार्यसिद्धि झपाट्यानें होत नाहीं. प्राचीन कालापासून हिंदुस्थानांतील लोकांची नैसर्गिक प्रवृत्ति धर्माकडे आहे. या प्रवृत्तीचा फायदा घेऊन समर्थांनीं लोकसंग्रह करण्याचें ठरविलें. बहुजन समाजामध्यें धर्मशैथिल्य, निरुत्साह व पराधीनपणा उत्पन्न झाला आहे, असें समर्थांना तीर्थयात्रेच्या प्रवासांत आढळून आलें होतें, तें धर्मशैथिल्य, तो निरुत्साह व तो पराधीनपणा घालवून बहुजन समाजामध्यें धर्मनिष्ठा, कर्तव्यजागृति व आत्मविश्वास हीं उत्पन्न करण्याकरितां कोणत्या देवतांच्या उपासनेस लोकांना लावावें याचा समर्थ विचार करूं लागले. तेव्हां त्यांना स्फूर्ति झाली:—"बहुविध भजनाचीं दैवतें पाहिलीं हो। सकळ त्यजुनि रामीं वृत्ति हे राहिली हो॥" समर्थांना रामायण फार आवडत होतें. व रामायणांतील सात कांडांपैकीं सुंदरकांड व युद्धकांड या दोन कांडांवर त्यांची विशेष प्रीति होती असें दिसतें. कारण त्यांनीं त्या दोन कांडांवरच कविता केली आहे. या दोन कांडांतील कथाभागानें लोकांमध्यें उत्साह, स्फूर्ति व पराक्रम करण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न होईल असें त्यांना वाटलें असावें असें दिसतें. युद्धकांडाच्या आरंभीं समर्थ म्हणतातः— "जेणें फेडिला पांग ब्रह्मादिकांचा। बळें तोडिला बंध त्या त्रीदशांचा॥ म्हणोनी कथा थोर या राघवाची। जनीं ऐकतां शांत होते भवाची॥ (युद्धकांड)" रामाची कथा थोर कां? याचें कारण समर्थ देतात तें मननीय आहे. त्या योगानें राम-उत्सवाचें रहस्य कळणार आहे. रामानें आपल्या पराक्रमानें रावणवध करून देवांचा कारागृहवासरूपी बंध तोडला. देवांना परदास्यांतून मुक्त केलें, पूर्वीप्रमाणें स्वतंत्र केलें. "म्हणोनी कथा थोर या राघवाची" असें समर्थ म्हणतात. समर्थकालीन हिंदुस्थानांतील स्थिति रावणाच्या बंदिशाळेंतील देवांप्रमाणें होती. तेव्हां त्या देवांचा बंध तोडणाऱ्या कोदंडधारी रामाची उपासना करण्यास लावण्याकरितां समर्थांनीं रामनवमीचा उत्सव सुरू केला. उपासना करणाऱ्या लोकांपुढें उपास्य देवतेचे गुण ठेवावे म्हणजे त्या गुणांचें थोडें तरी अनुकरण करण्याकडे लोकांची प्रवृत्ति होईल या हेतूनें समर्थांनीं रामजयंति व हनुमंतजयंति हे उत्सव सुरू केले. एका प्रसिद्ध हिंदी पुढाऱ्यानें म्हटल्याप्रमाणें, The best way of adoration is imitation—कोणत्या ही विभूतीविषयीं पूज्यभाव व्यक्त करण्याचा उत्तम मार्ग म्हणजे त्या विभूतीचें यथाशक्ति अनुकरण करणें हें होय. उत्सवप्रसंगीं आराध्यदेवतेच्या अंगच्या गुणांचें अनुकरण करण्याविषयीं लोकांना उपदेश करणें कीर्तनकारांचें, प्रवचनकारांचें, व्याख्यानकाराचें व उत्सवचालकांचें पवित्र व मुख्य कर्तव्य आहे, ही गोष्ट लक्ष्यांत घेतली म्हणजे रामजयंतीचा उत्सव सुरू

करण्यांत श्रीराम हे विमल गुणशील होते, कोंदडधारी होते, अतुलप्रतापी होते, सुरबंधविमोचक होते, दुर्जनांचा संहार करणारे होते, सज्जनांचें रक्षक करणारे होते, पितृभक्त होते, बंधुप्रेमी होते, प्रजापालनतत्पर होते, एकबाणी होते, एकवचनी होते, एकपत्नी होते, हें लोकांच्या निदर्शनास आणून त्यांच्यामध्यें धैर्य, आत्म-विश्वास, दास्यविमोचनप्रेरणा, स्वातंत्र्यप्रीति, एकपत्नीत्व इत्यादि सद्गुण उत्पन्न करून त्यांना कर्तव्यदक्ष करावयाचें होतें.

त्याप्रमाणें हनुमंतजयंतीचा उत्सव सुरू करण्यामध्यें ही समर्थांचा विशिष्ट हेतु होता. देवांना कारागृहवासांत टाकणाऱ्या रावणाचा वध करून रामानें देवांना बंधमुक्त केलें, हें कोदंडधारी रामाच्या एकबाणी अतुल पराक्रमाचें फल होतेंच; परंतु त्या कामीं बलभीम मारुतीचें केवढें मोठें साहाय्य होतें, हें रामायण माहीत असणाऱ्या लोकांना सांगवयास नकोच. नल, नील, जांबुवंत, लक्ष्मण प्रभृति रथी महारथी होतेच; परंतु त्या सर्वांहून मारुतीच्या साहाय्याची योग्यता अधिक आहे व या गोष्टीची जाणीव खुद्द रामासही होती. 'अंजनीगीत' म्हणून समर्थांचें एक स्फुट काव्य आहे. तें महाराष्ट्रांतील स्त्रियांनीं अवश्य वाचावें, इतकेंच नव्हे तर नित्य पठण करावें. त्यांच्या करितांच तें समर्थांनीं मुद्दाम केलें आहे. त्यांतील पुढील उतारा देतों, म्हणजे मारुतीची योग्यता स्वतः राम किती मानीत होते हें कळून येईल:——"लंकेहुनी अयोध्या येतां। राम लक्ष्मण सीता। हनुमंतें अंजनीमाता। दाखविली रामा ॥ १ ॥ चवघें केला नमस्कार। काय बोले रघुवीर॥ तुझ्या कुमरें थोर। उपकार केला ॥ २ ॥ ............ माते तुझ्या उदरीं जाण। हनुमान जन्मला रत्न। येवढें माझें रामायण। याचेनियोगें ॥ ३ ॥" अस्खलित ब्रह्मचर्य, एकनिष्ठ स्वामिसेवा व अद्भुत पराक्रम या गुणांनीं युक्त असें मारुतीचें चरित्र तत्कालीन लोकांपुढें ठेवून त्यांना इष्ट हेतु सिद्धीस नेण्याच्या कामीं कर्तव्यनिष्ठ करावयाचें होतें. हिंदु लोकांमध्यें ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास असे चार आश्रम आहेत. या चार आश्रमांपैकीं बहुतेक सर्व लोक पहिल्या दोन आश्रमांतीलच असतात. त्यांपैकीं पहिल्या आश्रमांतील लोकांपुढें समर्थांनीं मारुतीचें ध्येय ठेविलें व दुसऱ्या आश्रमांतील लोकांपुढें रामाचें ध्येय ठेविलें. समर्थकालीं स्वधर्मसंस्थापनेचें काम करणें व स्वराज्यसंस्थापनेचें काम करणें हें फार कठिण होतें. दोन्ही कामें करण्यास परिस्थिति अत्यंत प्रतिकूल होती. अंगीकृत कामांत संकटें आलीं तरी न डगमगतां काम करणारे लोक समर्थांना समाजांत उत्पन्न करावयाचे होते. चारित्र्य उत्तम असल्याशिवाय संकटास टक्कर देऊन काम करणें कठिण जातें; म्हणून समर्थांनीं समजांतील अविवाहित लोकांपुढें मारुतीचें ध्येय ठेविलें व विवाहित लोकांपुढें रामाचें ध्येय ठेविलें. अविवाहित लोक अस्खलित ब्रह्मचर्य पाळून व विवाहित लोक अव्यभिचारी एकपत्नीव्रत पाळून स्वधर्म-स्थापनेच्या व स्वराज्य-

स्थापनेच्या पवित्र कार्यास प्रवृत्त होतील तर " विघ्नैः पुनःपुनरपि प्रतिहन्यमानाः। प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति ।। " या भर्तृहरीच्या उक्तीप्रमाणें शेंकडों विघ्नें पायाखालीं तुडवून ते कार्यसिद्धि होईपर्यंत न भितां आनंदानें व उत्साहानें काम करतील अशी समर्थांना खात्री होती. म्हणून त्यांनीं रामजयंतीचे व हनुमंतजयंतीचे उत्सव सुरू केले असें, समर्थवाङ्मयांत समर्थांनीं रामाची उपासना व मारुतीची उपासना यांविषयीं ठिकठिकाणीं जे उद्गार काढले आहेत त्यांवरून आम्हांस वाटतें.

रामनवमीचा उत्सव व हनुमंतजयंतीचा उत्सव हे जुनेच पौराणिक उत्सव होते; परंतु त्यांमध्यें नवीन जोम उत्पन्न करून समर्थांनीं लोकांमध्यें आत्मविश्वास उत्पन्न केला. समर्थांच्या वडिलांची सूर्योपासना होती. ते नित्य १०००।१२०० नमस्कार घालीत. " बापसे बेटा सवाई " या म्हणीप्रमाणें समर्थ ही नित्य २००० नमस्कार घालीत अशी सांप्रदायिकांमध्यें परंपरागत आख्यायिका आहे. ( तंजावर मठांतील समर्थांची विश्वसनीय तसबीर इतिहास-संशोधक-मंडळाकडून प्रसिद्ध झाली आहे तीवरून ती आख्यायिका खरी वाटते. ) परंतु समर्थांनीं तत्कालीन लोकांना सूर्योपासना सांगितली नाहीं, तर उपजतां क्षणींच उड्डाण करून सूर्यबिंब गिळण्यास प्रवृत्त झालेल्या रामदूत मारुतिरायाची व मारुतिस्वामी कोदंडधारी व एकबाणी रामाची उपासना करण्यास सांगितलें. उत्सवासाठीं हजारों लोक एकत्र जमत, त्या वेळीं रामचरित्रांतील व हनुमंतचरित्रांतील महत्त्वाच्या गोष्टी त्यांच्या नजरेस आणून त्यांचें यथाशक्ति अनुकरण करण्यास त्यांना कळकळीनें उपदेश करण्याचा समर्थांचा मुख्य हेतु हाच होता.

समर्थांनीं जुनीच पौराणिक रामोपासना महाराष्ट्रांत सुरू केली, यांत त्यांचें वैशिष्ट्य तें काय ? असा आक्षेप अलीकडे कित्येक चिकित्सक विद्वान् पदवीधर घेऊं लागले आहेत. ते म्हणतात कीं, "तुलसीदासांचा राम व समर्थांचा राम निराळा होता कीं काय ?" आक्षेपकांप्रमाणें आम्ही ही कबूल करतों कीं, तुलसीदासांचा राम व समर्थांचा राम एकच होता. दोघांचा ही राम वाल्मीकिरामायणांतील सुप्रसिद्ध महापराक्रमी रक्षःकुलनिहंता, सुर-बंधविमोचक, कोदंडधारी, एकबाणी रामच होय. आक्षेपक म्हणतात त्याप्रमाणें मध्वाचार्य, रामानंद प्रभृतींचा राम व समर्थांचा राम ही एकच आहे. सर्व साधुसंतांचा राम एकच. तेव्हां आक्षेपक प्रश्न करितात कीं, रामोपासनेंत स्वातंत्र्य देण्याचें सामर्थ्य असतें तर उत्तर हिंदुस्थानांतील तुलसीदासांच्या रामोपासनेला व दक्षिण हिंदुस्थानांतील मध्वाचार्यप्रभृति संतांच्या रामोपासनेला समर्थांच्या रामोपासनेप्रमाणें स्वातंत्र्याचीं मधुर फळें कां लागलीं नाहींत ? पाश्चात्य शिक्षण मिळालेल्या पदवीधरांकडून असला आक्षेप यावा याचें आम्हांस आश्चर्य वाटतें. निरनिराळ्या कॉलेजांत इतिहास एकच असतो; परंतु इतिहासाचीं तत्त्वें पटविणारा शिक्षक ( प्रोफेसर ) ज्या वृत्तीचा अगर पंथाचा अगर संस्कृतीचा असेल,

त्याप्रमाणें तरुण विद्यार्थ्यांच्या मनावर इतिहासाचा परिणाम घडतो. प्रतापगडच्या युद्धावर ग्वाल्हेरचे कॅप्टन मोडक यांच्या व्याख्यानानें विद्यार्थ्यांच्या मनावर जो परिणाम होईल, तो परिणाम इतर विद्वान् प्रोफेसरांच्या व्याख्यानानें होणार नाहीं. कांहीं इष्ट परिणाम होईलच, कां कीं, प्रतापगडच्या यशस्वी वीरामध्यें तसेच अलौकिक गुण होते. तुलसीदासांच्या रामायणांत ही अनेक अलौकिक गुण आहेत व त्यांचा परिणाम ही उत्तरहिंदुस्थानांत चांगला झाला आहे. त्यांच्या रामायणानें उत्तर हिंदुस्थानांत अप्रतिम कामगिरी बजावली आहे. गोस्वामींच्या रामोपासनेनें उत्तर हिंदुस्थानांतील कोट्यवधि लोकांना परधर्मांपासून परावृत्त करून रामोपासनेचें वेड लाविलें, ही कांहीं लहानसहान कामगिरी नाहीं. रामाच्या अंगीं अनेक उत्तम गुण होते. ज्या गुणांवर विशेष भर देऊन उत्सवचालक अनुकरण करण्यास सांगतील, त्या गुणांचें अनुकरण करण्याकडे बहुजनसमाजाची प्रवृत्ति होईल.

आतां कदाचित् असा ही आक्षेप घेण्यांत येईल कीं, शिव-समर्थकालानंतर रामजयंतीचे व हनुमंतजयंतीचे उत्सव होत होते व हल्लीं ही दरसाल होत असतात. परंतु त्या कालाप्रमाणें हल्लींच्या उत्सवांपासून इष्ट फलप्राप्ति कां होत नाहीं? या आक्षेपाचें उत्तर असें आहे कीं, हल्लींचे उत्सव अगदीं दिखाऊ आहेत. त्यांत बिलकुल राम नाहीं. प्रत्येक उत्सवाचीं दोन अंगें असतात. एक बाह्यांग व एक अंतरंग. बहुजनसमाजाची वृत्ति बाह्यांगाकडे फार असते. मंडप, बैठक, हंड्या, खिरापत, पानसुपारी, पेटी, वाजंत्री, पालखी इत्यादि, हीं उत्सवाचीं बाह्यांगें होत. हीं बाह्यांगें देखील हल्लीं वेठीप्रमाणें केलीं जातात. मग उत्सवाच्या अंतरंगाकडे पाहण्याची गोष्ट कुठली? उत्सवाच्या अंतरंगाकडे पाहण्यास लोकांना फावत नाहीं, अगर पाहण्याची ते तसदी घेत नाहींत अगर उत्सवाचें अंतरंग जाणण्याची त्यांची इच्छा अगर योग्यता ही नसते. समर्थांच्या काळच्या व हल्लींच्या वस्तुस्थितींत कांहीं फरक पडल्यामुळें उत्सवाच्या कार्यक्रमांमध्यें परिस्थित्यनुरूप बदल करावा लागेल. उत्तम चारित्र्याचा व अध्यात्मिक उन्नतीचा नेता मिळाला कीं, उत्सवांतील उत्साहाचा पारा चढत असतो. देशाभिमान रोमरोमांत भिंबलेला लोकमान्य टिळकांसारखा चारित्र्यवान् नेता मिळाला, तेव्हां त्यानें गणेशोत्सवानें, शिवजयंत्युत्सवानें महाराष्ट्र हलवून सोडलें होतें. हल्लीं बदललेल्या परिस्थितीमुळें प्रांतिक उत्सवाऐवजीं भारतीय उत्सवाची योजना करावी लागेल. शिवसमर्थकालीं उत्सवास प्रांतीय व एकदेशीय धार्मिक स्वरूप होतें, हल्लींच्या परिस्थित्यनुरूप उत्सवास भारतीय व विश्वधार्मिक रूप द्यावें लागेल. महात्मा गांधींसारख्या अध्यात्मिक उन्नतीच्या नेत्याकडून तें काम होणें फारसें कठिण नाहीं. प्रत्येक प्रांतांतल्या स्थितीप्रमाणें इतर धर्मांशीं विरोध न करितां बहुजन समाजांतील लोकांचा उत्साह कायम ठेवण्यास पूर्वींप्रमाणें प्रांतिक उत्सव ही जोमानें सुरू ठेवतां येतील. राष्ट्रीय व राजकीय

संस्थांमध्यें सुद्धां धर्माचें अधिष्ठान पाहिजे. "सामर्थ्य आहे चळवळीचें। जो जो करील त्याचें ॥ परंतु येथें भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥ ( दासबोध–२०।४।२६ )" ही समर्थांची उक्ति त्रिकालाबाधित आहे. कोणत्या ही देशांत कोणत्या ही कालीं लोकनायकांनीं त्या युक्तीप्रमाणें चळवळ केल्यास यश आल्याशिवाय राहणार नाहीं. ती चळवळ धार्मिक असो, सामाजिक असो, अगर राजकीय असो, भगवंतावर विश्वास ठेवून अहर्निश धर्मभावनेनें अंतःकरणपूर्वक झटून प्रयत्न केल्यास खात्रीनें यश येईल, अशी समर्थ ग्वाही देतात. "केल्यानें होत आहे रे । आधीं केलेंचि पाहिजे ॥ यत्न तो देव जाणावा । अंतरीं धरितां बरें ॥ ( समर्थ–स्फुट प्रकरणें )." देशाकरितां प्रयत्न करणें तो अर्धवट उपयोगी नाहीं. अंतःकरणपूर्वक 'प्रयत्न हा देवच' अशी कल्पना करून प्रयत्न केला पाहिजे. "यत्न तो देव जाणावा" असें समर्थ म्हणतात त्यांत फार गूढ अर्थ आहे. Leave no stone unturned याप्रमाणें यत्न करण्यांत पराकाष्ठा करावयाचीच–भगीरथ प्रयत्न करावयाचाच असा दृढ निश्चय पाहिजे. परंतु देशहितार्थ भगीरथ प्रयत्न करितांना भागीरथी ज्याच्या मस्तकांतून आली त्या शंकरांला–रामाच्या उपास्य देवतेला–किंवा हल्लींच्या परिस्थित्यनुरूप बोलावयाचें म्हणजे सर्वव्यापी सर्वधर्मांतर्गत देवतेला विसरून उपयोगी नाहीं. राष्ट्रहिताच्या प्रयत्नास देखील धर्माचा ओलावा, म्हणजे समर्थांच्या भाषेंत भगवंताचें अधिष्ठान पाहिजे, म्हणजे राष्ट्रोन्नतीच्या प्रयत्नास यश आल्यावांचून राहणार नाहीं. समर्थांनीं राष्ट्रोन्नतीचा प्रयत्न केला त्यास यश आलें याचें कारण भगवंताचें अधिष्ठानच होय. तेंच त्यांनीं सुरू केलेल्या रामजयंतीच्या व हनुमंतजयंतीच्या उत्सवांचें रहस्य होय.

# भाग ६ वा

# समर्थ रामदास व छत्रपति शिवाजीमहाराज

**पवनाग्निसमागमो ह्ययं सहितं ब्रह्म यदस्त्रतेजसा ॥**

—कालिदास ( रघुवंश, सर्ग ८-४ )

अर्थः—ब्रह्मतेज व क्षात्रतेज यांचा संगम; वारा व अग्नि यांच्या संगमाप्रमाणें आहे.

शके १५७० सालीं चाफळ येथें पहिला रामनवमीचा उत्सव सुरू झाल्याचें वर्णन मागील भागांत दिलें आहे. चाफळ येथील उत्सव सुरू झाल्यावर दुसऱ्या वर्षींच म्हणजे शके १५७१ सालीं चाफळनजीक शिंगणवाडी येथें समर्थांचा शिवाजीमहाराजांना अनुग्रह झाला. समर्थछत्रपतींची भेट हा समर्थचरित्रांतील एक अत्यंत महत्त्वाचा प्रसंग होय. शिवसमर्थांची प्रथम भेट केव्हां झाली व समर्थांनीं महाराजांना अनुग्रह केव्हां दिला हा वादग्रस्त विषय आहे, असें कित्येकांचें म्हणणें आहे. परंतु हल्लीं जो ऐतिहासिक पुरावा उपलब्ध झाला आहे, त्याचा निर्विकार अंतःकरणानें विचार केल्यास हा विषय निश्चित मानण्यास कांहीं हरकत आहे असें आम्हांस वाटत नाहीं.

समर्थ व छत्रपति यांची भेट केव्हां झाली व समर्थांनीं छत्रपतींना अनुग्रह केव्हां दिला यासंबंधीं चार पक्ष आहेतः—

पक्ष १ लाः—समर्थशिवाजींची भेट समर्थ कृष्णातीरीं आल्यावर लागलींच झाली. स्वराज्याची स्फूर्ति शिवाजीमहाराजांना समर्थांपासून झाली. समर्थांचा अनुग्रह महाराजांना शके १५७१ सालीं झाला. महाराज समर्थांना दर गुरुवारीं भेटून त्यांना राजकारणांत सल्ला घेत असत.

पक्ष २ राः—शिवाजीमहाराजांची व समर्थांची प्रथम भेट शके १५९४ सालीं झाली. त्या वेळीं महाराजांचें स्वराज्यस्थापनेचें काम बहुतेक संपत आलें होतें. महाराजांच्या स्वराज्यस्थापनेच्या कामाशीं समर्थांचा बिलकूल संबंध नव्हता. ते इतर साधुसंतांप्रमाणें फक्त भक्तिमार्गी संत होते. ते महाराजांचे फक्त मोक्षगुरु होते. समर्थवाङ्मयांत राजकारणावर जें कांहीं लिहिलें आहे तें लिहिण्याची स्फूर्ति समर्थांना शिवाजीच्या भेटीनंतर म्हणजे शके १५९४ नंतर झाली.

पक्ष ३ राः—समर्थांची व महाराजांची भेट अफझुलखानाच्या मृत्यूनंतर लागलींच म्हणजे शके १५८१ सालीं झाली. समर्थ हे केवळ भक्तिमार्गी संत

नव्हते. ते राजकारणी संत होते. महाराज उत्तरार्धांत त्यांचा सल्ला राजकारणांत ही घेत होते.

पक्ष ४ थाः—शिवाजीमहाराजांना स्वराज्यस्फूर्ति समर्थ कृष्णातीरीं येण्यापूर्वी स्वतःच होऊन त्यांनीं स्वराज्यस्थापनेस अल्पारंभ ही केला होता. शिवसमर्थांची भेट शके १५६७ सालीं मसूर येथील पहिल्या रामजयंतीच्या उत्सवाच्या वेळीं झाली. महाराजांना समर्थांनीं अनुग्रह शके १५७१ सालीं शिंगणवाडी येथें दिला. नंतर समर्थांनीं महाराजांना राजधर्म व क्षात्रधर्म सांगितला व स्वराज्यस्थापनेच्या कामीं प्रोत्साहन दिलें व आपल्या संप्रदायांत राजकारणाचा समावेश करून बहुजनसमाजाचीं मनें महाराजांच्या स्वराज्यसंस्थापनेच्या कामाकडे वळवून त्यांना साहाय्य केलें. ते समर्थांचा प्रसंगविशेषीं राजकारणांत सल्ला घेत असत. समर्थ इतर साधुसंतांप्रमाणें केवळ भक्तिमार्गी संत नव्हते. ते राजकारणी संत होते.

आतां प्रत्येक पक्षाच्या म्हणण्याचा क्रमानें आम्ही विचार करणार आहों.

पक्ष १ लाः—समर्थांचे सर्व प्राचीन ग्रंथकार व बखरकार व अर्वाचीन कालचे बहुतेक चरित्रकार व शिवाजीमहाराजांचे कांहीं चरित्रकार व बखरकार यांचा या पक्षांत समावेश होतो. समर्थांच्या प्राचीन चरित्रकारांनीं व शिवाजीमहाराजांच्या कांहीं बखरकारांनीं ही समर्थभेटीची व अनुग्रहाची माहिती हनुमंतस्वामींच्या बखरीवरून घेतलेली दिसते. हनुमंतस्वामींनीं शकतिर्थींची बरीच माहिती समर्थवाकेनिशीवरून घेतलेली दिसते व बाकीचें वर्णन चाफळमठांतील पूर्वपरंपरेच्या माहितीवरून व कर्णोपकर्णी मिळालेल्या माहितीवरून दिलेलें दिसतें. समर्थवाकेनिशींतील १८ व्या टिपणांत पुढील त्रोटक मजकूर आहेः—"शिवाजीमहाराज यांस अनुग्रह शके १५७१त शिंगणवाडीचे बागेंत वैशाख शुद्ध नवमीस गुरुवारीं जाला. वरकड शिवछत्रपतिप्रकरण आलाहिदा लिहिलेलें आहे." हें आलाहिदा लिहिलेलें शिवछत्रपतिप्रकरण अद्याप संशोधकांना सांपडलेलें नाहीं. ह. स्वा.च्या बखरींतील अनुग्रह, तिथि व शक बरोबर आहेत. वाकेनिशींतील विश्वसनीय त्रोटक माहितींत कर्णोपकर्णी ऐकलेल्या गोष्टी व आख्यायिका यांची भर घालून ह. स्वा.च्या बखरींत शिवसमर्थांच्या भेटीचें व अनुग्रहाचें वर्णन दिलें आहे. ह. स्वा.च्या बखरींतील अतिशयोक्तीचा भाग गाळल्यास त्रोटक वृत्त विश्वसनीय आहे. त्याचा गोषवारा येणेंप्रमाणें आहेः—

"समर्थांनीं अकरा मारुती स्थापून निरानिराळ्या ठिकाणीं हनुमंतजयंतीचे उत्सव सुरू केले व चाफळ येथें राममंदिर बांधून रामजयंतीचा उत्सव सुरू केला; हें वर्तमान शिवाजीमहाराजांस कळतांच त्यांना समर्थांचें दर्शन घेण्याची इच्छा झाली. एके दिवशीं महाड येथें महाराजांनीं एका हरिदासाचें कीर्तन करविलें. त्या कीर्तनांत ध्रुवचरित्राचें आख्यान लावलें होतें. त्यांत 'सद्गुरुवांचून मोक्ष

नाहीं,' असें कीर्तनकारांनीं प्रतिपादन केलें होतें. तें ऐकून महाराजांना सद्गुरुप्राप्तीची चिंता लागली. प्रतापगडीं देवीच्या देवालयांत निद्रा केली असतां, 'रामदासां'ना गुरु करावें असा दृष्टांत झाला. महाराज चाफळास गेले. तेथें नरसोमल्लनाथ अंबरखाने—महाराजांचे चाफळ खोऱ्यांतील मामलेदार—होते. समर्थ मठांत रहात नाहींत, ते अरण्यांत फिरत असतात असें त्यांनीं सांगितलें. "समर्थ या भागांत इतके दिवस असतां आपणांकडून कांहीं सेवा घडली नाहीं" असें महाराज म्हणाले. तेव्हां "महाराजांकडून ३०० होन पोहोंचले आहेत" असें नरसोमल्लनाथ म्हणाले. ते कसे व केव्हां याचा खुलासा विचारला, तेव्हां "पुण्यास नाशिककर गिरिगोसावी यांच्या कीर्तनास महाराज आले होते, तेव्हां त्यांनीं गिरिगोसाव्यांना ३०० होनांची बिदागी दिली. परंतु निस्पृहपणानें त्यांनीं ती बिदागी घेतली नाहीं. पण चाफळास समर्थ रामाचें मंदिर बांधीत आहेत, त्यांना ते ३०० होन पाठवावेत असें सांगितलें. त्याप्रमाणें ते ३०० होन चाफळचे देवालयाकरितां पाठविले आहेत." असा मजकूर चाफळ मामलेदारांनीं महाराजांना सांगितला. ही हकीकत ऐकून महाराजांनीं ७०० होन नरसोमलनाथांपाशीं दिले; व देवालयास मांड नदी व हणमंत ओढा यांचा उपद्रव होतो, त्याच्या निवारणार्थ बंधारा घालण्यास सांगितलें. कोंडवळीचे घळींत समर्थांचा शोध केला, पण ते तेथें नव्हते. तेव्हां महाराज निराश होऊन प्रतापगडास गेले. समर्थांचा अनुग्रह झाल्याशिवाय अन्नग्रहण करणार नाहीं असा निश्चय करून ते देवीच्या देवालयांत निजले. पहांटे समर्थांनीं स्वप्नांत दर्शन दिलें. मस्तक अवघ्राण करून नारळ प्रसाद दिला. सदरहू हकीकत मातोश्रींना सांगून महाराज समर्थशोधास निघाले. महाबळेश्वर-वांईहून ते माहुलीस आले. तेथें समर्थांकडून एक शिष्य ओंवीबद्ध पत्र घेऊन आला. तें पत्र महत्त्वाचें आहे, म्हणून सबंध देतों. "निश्चयाचा महामेरु । बहुजनास आधारु ॥ अखंड स्थितीचा निर्धारु । श्रीमंत योगी ॥ १ ॥ परोपकाराचिया राशी । उदंड घडती जयाशी ॥ जयाचे गुणमहत्त्वाशी । तुळणा कैशी ॥ २ ॥ नरपति हयपति । गजपति गडपति ॥ पुरंदर आणि शक्ति । पृष्ठ भागीं ॥ ३ ॥ यशवंत कीर्तिवंत । सामर्थ्यवंत वरदवंत ॥ पुण्यवंत आणि जयवंत । जाणता राजा ॥४॥ आचारशील विचारशील । दानशील धर्मशील ॥ सर्वज्ञपणें सुशील । सर्वांठायीं ॥ ५ ॥ धीर उदार सुंदर । शूरक्रियेसी तत्पर ॥ सावधपणेसी नृपवर । तुच्छ केले ॥ ६ ॥ तीर्थक्षेत्रें तीं मोडिलीं । ब्राह्मणस्थानें बिघडलीं ॥ सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ॥ ७ ॥ देवधर्म गोब्राह्मण । करावयासी रक्षण ॥ हृदयस्थ झाला नारायण । प्रेरणा केली ॥ ८ ॥ उदंड पंडित पुराणिक । कवीश्वर याज्ञिक वैदिक ॥ धूर्त तार्किक सभानायक । तुमचे ठायीं ॥ ९ ॥ या भूमंडळाचे ठायीं । धर्म रक्षी ऐसा नाहीं ॥ महाराष्ट्र धर्म राहिला कांहीं । तुम्हां करितां ॥ १० ॥ आणखी कांहीं धर्म

चालती। श्रीमंत होऊनि कित्येक असती ॥ धन्य धन्य तुमची कीर्ति। विस्तारली ॥ ११॥ कित्येक दुष्ट संहारिले। कित्येकांस धाक सुटले ॥ कित्येकांसी आश्रय झाले। शिवकल्याण राजा ॥ १२ ॥ तुमचे देशीं वास्तव्य केलें। परंतु वर्तमान नाहीं घेतलें ॥ ऋणानुबंधें विस्मरण जाहलें। बां काय नेणुं ॥ १३ ॥ सर्वज्ञ मंडळी धर्ममूर्ति। सांगणें काय तुम्हांप्रती ॥ धर्मस्थापनेची कीर्ति। संभाळिली पाहिजे ॥ १४ ॥ उदंड राजकारण तटलें। तेथें चित्त विभागलें ॥ प्रसंग नसतां लिहिलें। क्षमा केली पाहिजे ॥ १५ ॥" प्रो. भाटे यांचा तिसऱ्या ओंळींतील प्रथमार्धाचा पाठ निराळा आहे. तो असाः—"नरपति हयपति गजपति। गडपति भूपति जलपति ॥" "जलपति हें विशेषण शिवाजीनें समुद्रकांठीं किल्ले बांधून आरमार तयार केल्यानंतर त्याला अन्वर्थक होईल" असें प्रो. भाटे म्हणतात. ( सज्जनगड व रामदास, पान १०३ ) समुद्रावरील किल्ले शके १५७१ सालीं बांधून झाले नव्हते, त्याअर्थी वरील ओंवीबद्ध पत्र शके १५७१चें नसावें असें प्रो. भाटे म्हणतात. शिवाजीमहाराजांना 'जलपति' हें विशेषण लावण्यास समुद्रावरील किल्ले बांधून आरमार तयार होणें आवश्यक होतें असें आम्हांस वाटत नाहीं. समुद्रावर किल्ले बांधण्याची कल्पना येऊन किल्ले बांधणें व आरमार तयार करण्याची योजना झाल्यावर ही 'जलपति' हें विशेषण लावतां येईल. किंवा समुद्रकांठीं किल्ले बांधले नसतां व आरमार तयार नसतां ही तें विशेषण लावतां येईल. भूपतीची भूमीवर जशी सत्ता असते, त्याप्रमाणें समुद्रावर ही असते असा पूर्वकालीन लोकांचा समज होता. त्यास अनुसरून कवितेंत जलपति म्हणणें साहजिक आहे. आमच्या म्हणण्याप्रमाणें समर्थांचे अमेरिकन चरित्रकार रे. डेमिंग यांचें ही मत आहे. ते म्हणतातः—The term 'Lord of water' (जलपति) may refer to a navy or it may be a poetic exaggeration referring to the king's ascendency over the whole territory including lakes and rivers." —(*Ramadas and Ramadasi*, page 69

भावार्थ—जलपति हें विशेषण आरमारास ही लागू पडेल किंवा सरोवरें व नद्यांसह सर्व भूमीवर राजाचा अंमल असतो या अर्थानें कवीचें तें अतिशयोक्तिपूर्वक विशेषण ही असूं शकेल. तेव्हां वरील ओंवीबद्ध पत्रांत 'जलपति' हें विशेषण ही महाराजांना लावलें आहे, म्हणून तें पत्र शके १५७१चें नसावें, या प्रो. भाटे यांच्या आक्षेपांत तथ्य आहे असें आम्हांस वाटत नाहीं. असो. समर्थांच्या ओंवीबद्ध पत्रास महाराजांचें उत्तर आलें तें:—" स्वामी, मी बहुत अपराधी आहें. आपण क्षमावंत आहां. सांप्रत कृपा करून आशीर्वादपत्र पाठविलें, तें पाहून परम आनंदातें पावलों. दर्शनाची इच्छा धरून येत आहें, त्यास कृपा करून दर्शन दिलें पाहिजे. ही विज्ञप्ति." असो. दुसरे दिवशीं महाराज स्वारीसह माजगांवापर्यंत गेले. तेथून पुढें निळो सोनदेव मुजुमदार, बाळाजी आवजी चिटणीस प्रभृति निवडक मंडळींसह

चाफळास जाऊन त्यांनीं श्रीरामदर्शन घेतलें. समर्थ शिंगडवाडीस आहेत, असें कळतांना दिवाकरभट गोसावी यांस बरोबर घेऊन ते शिंगणवाडीस गेले. समर्थ खिंडीचे खालीं बागेंत होते. महाराज जाण्यापूर्वीं त्यांचें उत्तर कल्याणस्वामींनीं समर्थांना वाचून दाखविलें होतें. समर्थ उंबराखालीं बसले होते, जवळ दासबोध लिहिण्याचें काम चाललें होतें, इतक्यांत दिवाकरभटजीसह महाराज तेथें गेले. महाराजांनीं समर्थांना साष्टांग नमस्कार घातला. "पत्र व तुम्ही एकदमच आलां" असें समर्थ म्हणाले. महाराजांनीं अनुग्रह करण्याविषयीं विनंति केली. समर्थांनीं संमति दिल्यावर महाराज स्नान करून आले, समर्थांची पूजा केली. नंतर समर्थांनीं त्यांना त्रयोदशाक्षरी मंत्र सांगून अनुग्रह दिला व आत्मानात्म विचार सांगितला, तो 'लघुबोध' म्हणून प्रसिद्ध आहे. तो दासबोधांत तेराव्या दशकांतील सहाव्या समासांत समाविष्ट केला आहे. नंतर श्रीफळ, मूठभर माती, दोन मुठी लीद व चार मुठी खडे समर्थांनीं महाराजांच्या पदरांत घातले. " सन्निध राहून सेवा करण्याची इच्छा आहे " असें महाराज म्हणतांना समर्थ म्हणाले, "तुम्ही क्षत्रिय आहां, राज्याचें रक्षण करून प्रजापालन करणें तुमचा धर्म आहे. पृथ्वी म्लेंच्छमय झाली आहे, तिचें निवारण तुमचे हातून व्हावें अशी रघुपतीची इच्छा आहे." असें म्हणून पंचवटींतील साक्षात्काराच्या वेळचा मजकूर सांगितला व म्हणाले, " बहुतां दिवसांचें हें बंड । म्लेंच्छ माजले उदंड ।। त्यांचे करूनि दुखंड । राज्य करावें ।। १ ।। " नंतर समर्थांनीं महाराजांना राजधर्म व क्षात्रधर्म सांगितला. याविषयीं विवेचन पुढें " समर्थांचें राजकारण " या भागांत केलें आहे. निळो सोनदेव व बाळाजी आवजी हे अनुग्रह देतांना जवळ होते, त्यांनीं विनंति केल्यावरून त्यांना ही अनुग्रह दिला व सेवाधर्म सांगितला. महाराजांनीं समर्थांची अनुग्रहकालीं पूजा केली त्या वेळीं पुतळ्या, पोंवळी, मोतीं यांनीं समर्थांना अभिषेक केला. तें द्रव्य समर्थांनीं उधळलें व गुराख्यांच्या पोरांना घेण्यास सांगितलें. अद्यापि ही तेथें मोहोर अगर पुतळी केव्हांतरी सांपडते असें म्हणतात. अनुग्रहानंतर समर्थ चाफळास गेले व तेथें श्रीचा प्रसाद घेऊन प्रतापगडास गेले. मातोश्रींना व त्रिवर्ग राण्यांना प्रसाद दिला. " नारळ, माती, खडे व लीद हा प्रसाद समर्थांनीं दिला याचा अर्थ काय ? " असें मातोश्रींनीं विचारतां महाराज म्हणाले, " नारळ माझ्या कल्याणार्थ दिला, माती दिली त्या योगें पृथ्वी प्राप्त होईल, खडे दिले त्या योगें किल्ले ताब्यांत राहतील व लीद दिली त्या योगें पागा पुष्कळ पदरीं राहील, असें समर्थांनीं सुचविलें आहे. " अनुग्रहासंबंधीं वरील प्रमाणें ह. स्वा. च्या बखरींत वर्णन आहे. शिवदिग्विजय व मल्हार रामराव चिटणीसकृत सप्तप्रकरणात्मक शिवचरित्र यांत ही उभयतांच्या भेटीचें व अनुग्रहाचें वरील प्रमाणेंच वर्णन आहे. व त्याप्रमाणेंच थोड्या कमीजास्त प्रमाणानें इतर प्राचीन चरित्रकारांनीं वर्णन केलें आहे. श्री. आठल्ये, श्री. भीमराव

पारळकरप्रभृति अर्वाचीन चरित्रकार यांनीं त्याचेंच अनुकरण केलें आहे. नंतर महाराज प्रत्येक गुरुवारीं समर्थदर्शनास जात असत. ते आठवड्यांतील वृत्त त्यांना निवेदन करीत व पुढील आठवड्यांत काय करावयाचें याची आज्ञा घेत, असा मजकूर ह. स्वा. त्या बखरींत व इतर कांहीं पूर्व चरित्रांत आहे. परंतु हें शक्य व विश्वसनीय दिसत नाहीं. अनुग्रहानंतर एकदोन गुरुवारीं ते गेले असतील, त्यावरून प्रत्येक गुरुवारीं जात असत, असें अनुमान काढून अतिशयोक्तीनें लिहिलें आहे असें आम्हांस वाटतें. मागील आठवड्यांतील वृत्त निवेदन करणें व पुढील आठवड्यांतील कामाविषयीं आज्ञा घेणें हें ही शक्य दिसत नाहीं. पुष्कळ दिवसांनीं गांठ पडल्यावर कांहीं महत्त्वाच्या गोष्टी सांगणें व विशेष प्रसंगीं सल्ला विचारणें संभवनीय आहे; परंतु त्यावरून प्रत्येक आठवड्यांत तसें करीत होते असें म्हणतां येणार नाहीं. महाराजांना समर्थांनीं अनुग्रह दिला त्यासंबंधीं व नंतर उभयतांचा संबंध कशा प्रकारचा होता याविषयीं पहिल्या पक्षाची हकीकत याप्रमाणें आहे. शके १५७१ सालीं शिंगणवाडी येथें अनुग्रह झाला ही माहिती त्यांनीं समर्थवाक्केनिशीवरून घेतली ती खरी आहे. बाकीची हकीकत त्या वेळीं हजर असलेल्या दिवाकरप्रभृतींच्या सांगण्यावरून व शके १६४० च्या बखरीवरून व ह. स्वा. च्या बखरीवरून घेतली असावी. कांहीं गोष्टींत अतिशयोक्तिपूर्वक वर्णन असलें तरी महाराज चाफळाहून दिवाकरभटांबरोबर शिंगणवाडीस गेले, नंतर महाराजांना व निळोपंत बाळाजी आवजी यांना अनुग्रह झाला, इत्यादि गोष्टी विश्वासनीय आहेत. पहिल्या पक्षावर दुसऱ्या पक्षांतील लोकांचा असा आरोप आहे कीं, त्यांनीं महाराजांना स्वराज्याची स्फूर्ति समर्थांपासून झाली असें दाखविण्याकरितां समर्थांची महती गाइली आहे. अनुग्रहाची व नंतर उभयतांच्या संबंधांची माहिती देतांना प्रसंगविशेषीं बखरकारांनीं व इतर पूर्वचरित्रकारांनीं अतिशयोक्तिपूर्वक वर्णन देऊन समर्थांची महती गाइली आहे ही गोष्ट खरी आहे. उदाहरणार्थ, अनुग्रहकालीं समर्थांवर मोहोरापोंवळीमोत्यांचा अभिषेक केला, प्रत्येक गुरुवारीं दर्शनास जाऊन पुढील आठवड्यांत काय करावें याचा सल्ला घेत असत, इत्यादि. परंतु ह. स्वा. च्या बखरींत अगर इतर पूर्वचरित्रांत महाराजांना स्वराज्यस्थापनेची स्फूर्ति समर्थांपासून झाली असें म्हटलेलें नाहीं. प्राचीन चरित्रकारांच्या प्रसंगविशेषीं केलेल्या अतिशयोक्तीवरून तसें वाटण्याचा किंचित् संभव आहे. तो संभव खरा मानल्यास स्वराज्यप्राप्तीचें श्रेय महाराजांना न मिळतां समर्थांना मिळेल. म्हणून दुसऱ्या पक्षांतील लोकांनीं स्वराज्यप्राप्तीची स्फूर्ति समर्थांपासून महाराजांना झाली असें भासविण्याकरितां त्यांनीं समर्थांची विनाकारण महती गाइली असें म्हटलें आहे.

दुसरा पक्ष कै. चांदोरकर, प्रो. गो. चि. भाटे, श्री. केळुस्कर, श्री. जदुनाथ सरकार, डॉ. बाळकृष्णप्रभृति लोकांचा आहे. या पक्षाचें म्हणणें असें आहे

कीं, समर्थ व शिवाजीमहाराजांची प्रथम भेट शके १५९८ सालीं झाली. त्या वेळीं महाराजांचें स्वराज्यस्थापनेचें काम संपत आलें होतें, समर्थांचा महाराजांच्या राजकारणाशीं कांहीं संबंध नव्हता, ते फक्त त्यांचे मोक्षगुरु होते, इत्यादि. या म्हणण्यास आधार म्हणून शके १५८० व १५९४ या सालचीं दोन पत्रें पुढें करण्यांत येतात. सदरहू पत्रें कै. चांदोरकर यांना मालेगांव येथें दिवाकरभटांचे वंशज उपाध्ये (हे इंजिनिअरखात्यांत कारकून आहेत ) यांचे घरीं इतर कागद-पत्रांबरोबर सांपडलीं. ते सर्व कागदपत्र प्रो. भाटे यांनीं पाहिले व त्या पत्रांच्या आधारावर त्यांनीं 'सज्जनगड व रामदास' या पुस्तकांतील दहावा भाग 'रामदास व शिवाजी यांचा संबंध' हा लिहिला आहे. त्या भागांतील प्रो. भाटे यांच्या म्हणण्याचें आम्ही आतां विवेचन करणार आहों.

शिवाजीमहाराजांना शिंगणवाडी येथें शके १५७१ सालीं अनुग्रह झाला असें श्री. शंकर श्रीकृष्ण देव व कै. राजवाडे ज्या कागदपत्रांच्या आधारावर म्हणतात त्यांसंबंधानें प्रो. भाटे म्हणतात ( सज्जनगड व रामदास, पान ९८ )– "त्यांपैकीं एक जुनें पत्र सांप्रदायिक आहे व दुसरीं तीन ऐतिहासिक कागद-पत्रांचा शोध करतांना अलीकडे सांपडलीं आहेत. पाहिलें तुकारामाचें शिवाजीस ओंवीबद्ध पत्र, दुसरें शिवाजीचें सनदवजा रामदासांस पत्र, तिसरें शिवाजीच्या रामदासांशीं रायगडीं एकांतांत झालेल्या भेटीच्या उल्लेखाचें पत्र व शेवटलें राज-वाडे यांच्या मतें या वादाचें निर्णायक असें रामदासांच्या मरणानंतर लिहिलेलें एक कच्चें टिपण." प्रो. भाटे, तुकाराममहाराजांनीं शिवाजीमहाराजांना लिहिलेलें पत्र ओंवीबद्ध आहे असें म्हणतात, तें ओंवीबद्ध नसून अभंगबद्ध आहे. ही बाब क्षुल्लक आहे. नजरचुकीनें ओंवीबद्ध असें पडलें आहे असें आम्हांस वाटतें. मात्र प्रोफेसर साहेबांनीं पुढील मोघम विधान केलें आहे, तें चुकीचें आहे असें आम्हांस वाटतें. तें विधानः–"तुकारामानें शिवाजीस लिहिलेलें पत्र हनुमंतस्वामींच्या बखरीप्रमाणें बऱ्याच काळानें लिहिलेलें आहे असें बखरीवरून दिसतें." अनुग्रह शके १५७१ वैशाख शुद्ध नवमीस झाला व तुकाराम महाराज शके १५७१ सालीं फाल्गुन कृष्ण द्वितीयेस वैकुंठवासी झाले. तेव्हां तुकारामाचें शिवाजीमहाराजांना पाठविलेलें पत्र या दरम्यानच्या काळांतील असलें पाहिजे. बऱ्याच काळानें म्हणजे किती दिवसांनीं हें प्रो. भाटे यांनीं स्पष्ट लिहिलेलें नाहीं. २।३ महिन्यांनीं म्हणजे ही बऱ्याच काळानें म्हणतां येईल. अनुग्रह झाल्यावर शिवाजी महाराजांनीं समर्थांना नित्य जवळ राहण्याची विनंती केली. "आम्ही अरण्यवासी, तुम्ही राजे लोक, आमचें तुम्हांपाशीं नित्य राहणें होणार नाहीं" असें समर्थ म्हणाले. तेव्हां महाराजांच्या मनांत आलें कीं, तुकाराम महाराज ही महाप्रतापी साधु आहेत, त्यांना बोलावून जवळ आणून ठेवावें. लागलीच महाराजांनीं कारकुनामार्फत

तुकारामांना पत्र पाठविलें तें पत्र अनुग्रहानंतर बऱ्याच काळानें म्हणजे २।३ महिन्यांनीं पाठविलें असावें असें आम्हांस वाटतें. तें अभंगबद्ध पत्र फार महत्त्वाचें आहे म्हणून सबंध देतों:—

अभंग १ लाः—"विरंचीनें[१] केलें ब्रह्मांड सकळ। तयामाजी खेळ नाना युक्ती ॥ १ ॥ युक्तीचे चालक तपोनिष्ठ ज्ञानी। गुरुभक्ति मनीं विश्वासेशीं ॥ २ ॥ ऐसा तुझा प्रेमा कळला हा एक। पाहूनीया लेख पत्रीचे कीं ॥ ३ ॥ शिव नाम तुझें ठेविलेंपवित्र। छत्रपति सूत्र। विश्वाचें कीं ॥ ४ ॥ व्रत तप नेम ध्यान योग केला। करूनी मोकळा झालासी तूं ॥ ५ ॥ हेत हा लागला आमुचिये भेटीं। पत्रामाजी गोष्टी हीच थोर ॥ ६ ॥ याचें ही उत्तर ऐके बा भूपति। लिहितों विनंति हेताची हे ॥ ७ ॥ अरण्यवासी आम्ही फिरूं उदासीन। दर्शन हें हीन अमंगळ ॥ ८ ॥ वस्त्रावीण काया झाली ही मळीण। अन्नाविणें जीर्णें फलाहारी ॥ ९ ॥ रोड हात पाय दिसे अवकळा। काय तो सोहळा दर्शनाचा ॥ १० ॥ तुका म्हणे माझी विनंति सलगीची। वार्ता ही भेटीची करूं नका ॥ ११ ॥"

अभंग २ राः—"ऐसी माझी वाणी दीन रूप आहे। करुणा त्या आहे हृदयस्थाशीं ॥ १ ॥ न हो केविलवाणें, न हो आम्ही दीन। सर्वदा शरण पांडुरंगीं ॥ २ ॥ पांडुरंग आम्हां पाळिता पोशिता। आणिकाची कथा काय तेथें ॥ ३ ॥ तुझी भेट घेणें काय हो मागणें। आशेचें ही शून्य केलें तेणें ॥ ४ ॥ निराशेचा गांव दिधला आम्हांशीं। प्रकृति-भावाशीं सोडियेलें ॥ ५ ॥ पतिव्रता मन पतीशींच भेटो। तैसें आम्ही विठोमाजीं नांदों ॥ ६ ॥ विश्व हें विठ्ठल दुजें नाहीं कांहीं। देखणें तुझें ही तुजमाजीं ॥ ७ ॥ तुज ही विठ्ठल हवा ऐसा वाटे। परी एक मोठी आवडीची ॥ ८ ॥ **सद्गुरु श्रीराम-दासाचें भाषण। तेथें घालीं मन चळूं** नको ॥ ९ ॥ बहुतांची वृत्ति चाळविली जेव्हां। रामदास्य तेव्हां घडे केंवि ॥ १० ॥ तुका म्हणे बापा चातुर्यसागरा। भक्ति एक थारा भाविकांसी ॥ ११ ॥"

अभंग ३ राः—"तुम्हापाशीं आम्हां येउनिया काय। वृथा शीण आहे चालण्याचा ॥ १ ॥ मागावें हें अन्न तरी भिक्षा थोर। वस्त्राचा ही थार चिंध्या बिदीं ॥ २ ॥ निद्रेसी आसन उत्तम पाषाण। वरी हें प्रावर्ण आकाशाचें ॥ ३ ॥ तेथें काय करणें कोणाचा ही आस। वायां होय नाश आयुष्याचा ॥ ४ ॥ राजगृहा यावें मनाचिया आशें। तेथें काय वसे समाधान ॥ ५ ॥ राजाचिये गृहीं भाग्यवंता मान। इतरां सन्मान नाहीं तेथें ॥ ६ ॥ देखोनियां वस्त्राभूषणाचें जन। तत्काळ मरण येतें आम्हां ॥ ७ ॥ ऐकोनियां मनीं उदासावें जरी। तरी आम्हा हरी उपेक्षीना ॥ ८ ॥ आतां हेंचि तुम्हां सांगेन कौतुक। भिक्षेएवढें

१. ब्रह्मदेवानें.

सुख नाहीं नाहीं ॥ ९ ॥ तपव्रत-योगें महा भले जन । आशाबद्ध लीन वर्तताती ॥१०॥ तुका म्हणे तुम्ही श्रीमंत मानाचे। पूर्वील देहीचे हरिभक्त ॥११॥"

**अभंग ४ था:**—"आतां एक योग साधावा हा नीट। भल्याचा ही वीट मानूं नये ॥ १ ॥ जेणें योगें तुम्हां लागूं पाहे दोष। असा हा सायास करूं नका ॥२॥ निंदक दुर्जन सांगाती असती। त्यांच्या युक्ती चित्तीं आणूं नका ॥३॥ परीक्षावें कोण राजाचे सेवक। विवेकाविवेक पाहूनीया ॥ ४ ॥ सांगणें नलगे सर्वज्ञ तूं राजा। अनाथांच्या काजा साह्य होशी ॥५॥ हेंचि ऐकोनियां पावे समाधान। आतां या दर्शना काज नाहीं ॥ ६ ॥ घेऊनियां भेटी कोणा हा संतोष। आयुष्याचे दिवस गेले गेले ॥ ७ ॥ एक दोन कर्में जाणोनियां वर्में। आपुलीया श्रमें राहें आतां ॥ ८ ॥ कल्याणकारक अर्थ याचा एक। सर्वांभूतीं देख एक आत्मा ॥ ९ ॥ आत्मारामीं मन ठेऊनीयां राहें। रामदास पाहें आपणाचि ॥१०॥ तुका म्हणे राया धन्य धन्य स्थिति। त्रैलोक्यीं ही ख्याति कीर्ति तूझी ॥ ११ ॥"

**अभंग ५ वा:**—"**राया छत्रपती ऐकावें वचन। रामदासीं मन लावीं वेगीं ॥ १ ॥ रामदास स्वामी सोयरा सज्जन। त्याशीं तनमन अर्पी बापा** ॥ २ ॥ मारुति अवतार स्वामी प्रगटला। उपदेश केला तूजलागीं ॥ ३ ॥ रामनाम मंत्रतारक केवळ। झालासे शीतळ उमाकांत ॥ ४ ॥ उफराटें नाम जपतां वाल्मिक। झाला पुण्यश्लोक तात्कालीक ॥ ५ ॥ तोचि बीजमंत्र वसिष्ठ उपदेश। याहुनि विशेष काय आहे ॥ ६ ॥ आतां धरूं नको भलत्याचा संग। राम पांडुरंग कृपा करी ॥ ७ ॥ **धरूं नको आशा आमुची कृपाळा। रामदासीं डोळा लावीं आतां** ॥ ८ ॥ तुझी चाड आम्हा नाहीं छत्रपती। आम्ही पत्रपती त्रैलोक्याचे ॥ ९ ॥ चारी दिशा आम्हां भिक्षेचा अधिकार। नेमिली भाकर भक्षावया ॥१०॥ पांडुरंगीं झाली आमुची हे भेटी। हातांत नरोटी दिली देवें ॥ ११ ॥ आतां पडूं नको आमुचिये काजा। पवित्र तूं राजा रामभक्त ॥ १२ ॥ विठ्ठलाचे दास केवळ भिकारी। आम्हां कधीं हरी उपेक्षीना ॥ १३ ॥ **शरण असावें रामदासालागीं। नमन साष्टांग घालीं** त्यांसी ॥ १४ ॥ तुका म्हणे राया तुज असो कल्याण। सद्गुरु-शरण राहें बापा ॥ १५ ॥"

**अभंग ६ वा:**—"आतां ही विनंति प्रधान अष्टका। प्रभूसी विवेक ऐसा सांगा ॥ १ ॥ प्रतिनिधि मनरक्षक चतुर। सात्विकाचें घर तुम्हांपाशीं ॥ २ ॥ मजुरीचे धनी लेखन-कारक। पत्राचा विवेक समजावा ॥ ३ ॥ पेशवे सुर्नीस चिटणीस डबीर। राजाज्ञा सुमंत सेनापती ॥ ४ ॥ भूषण पंडित विद्या-अध्ययन। वैदिका नमन माझें असो ॥ ५ ॥ पात्रिचा हा अर्थ अंतरीं जाणोनी। विवंचुनी श्रवणीं घाला राया ॥ ६ ॥ सात्त्विक प्रेमळ दृष्टांताचें मत। बोलिलों बहूत कळावया ॥७॥ यथास्थित निरोप सांगणें हो राया। अर्थ पाहा वाया जाऊं न द्या ॥ ८ ॥ भीड अशी

बळें घालोनी अर्थात । अनर्थकारक तुम्हां होई ॥ ९ ॥ सत्यवंशी जन असाल भूषण । अर्थ हा सांगणें वाचोनिया ॥ १० ॥ तुका म्हणे तुम्हां नमन अधिकाऱ्यां । सांगावें तें राया पत्र माझें ॥ ११ ॥" रा. ह. आवटे-तुकारामगाथा (४३९७–४४०२)

भाषासरणीवरून, मजकुरावरून हें अभंगात्मक पत्र तुकारामांचेंच आहे हें स्पष्टपणें दिसतें. व तुकाराममहाराजांच्या परंपरागत प्रकाशित गाथ्यांत तें दिलेलें आहे. आतां हें पत्र केव्हां लिहिलें याबद्दल प्रो. भाटे यांना संशय पडला आहे. पत्र बऱ्याच काळानें लिहिलेलें असावें याचें कारण ते देतात—"पत्रांतील खालील ओंव्यांवरून ही गोष्ट स्पष्ट दिसते. सद्गुरु रामदासाचें भूषण । तेथें घालीं मन चळों नको । बहुतां ठायीं वृत्ति चळविली जेव्हां । रामदास्य तेव्हां घडे कैचें ॥ राया छत्रपती ऐकावें वचन । रामदासीं मन लावीं वेगें ॥ रामदासस्वामी सोयरा सज्जन । त्यासी तनमन अर्पीं बापा ॥ मारुति अवतार स्वामी प्रगटला । उपदेश केला तुजलागीं ॥" यांतील पहिले दोन चरण दुसऱ्या अभंगांतील आहेत व शेवटचे तीन चरण चवथ्या अभंगांतील आहेत. या पांच चरणांतील कोणत्या चरणांवरून तुकारामाचें पत्र अनुग्रहानंतर बऱ्याच काळानें लिहिलेलें आहे असें प्रो. साहेबांना वाटलें तें त्यांनीं दिलें नाहीं. "बहुतां ठायीं वृत्ति चाळविली जेव्हां । रामदास्य तेव्हां घडे कैचें ॥" या चरणावरून त्यांचा तसा समज झाला असावा असें दिसतें. बहुतां ठायीं वृत्ति चालविण्यास बराच काळ लागतो अशी त्यांनीं खोटी समजूत करून घेतली आहे. शिवाजीमहाराज अत्यंत श्रद्धाळु, भाविक व सात्त्विक वृत्तीचे होते. क्षत्रियकुलांत उत्पन्न होऊन वडीलमातोश्रींपासून त्यांना स्वराज्यस्थापनेचें बाळकडू मिळालें नसतें तर ते महाराष्ट्रांतील एक सुप्रसिद्ध संत-कवि झाले असते व महाराष्ट्रवाङ्मयांत ज्ञानेश्वरी, एकनाथीभागवत, तुकारामगाथा व दासबोध यांसारख्या अमूल्य ग्रंथांची त्यांच्याकडून भर पडली असती. क्षत्रिय-कुलांत जन्म झाल्यामुळें लहानपणापासून क्षत्रियकुलाला शोभेल असें शिक्षण त्यांना मिळालें होतें व त्याप्रमाणें क्षत्रियाचीं कामें ही त्यांना लवकरच करावीं लागलीं. परंतु नैसर्गिक वृत्ति धार्मिक व भाविक असल्यामुळें सद्गुरु करून मोक्ष मिळवावा अशी तरुणपणींच त्यांना इच्छा झाली. सुदैवानें समर्थांचा अनुग्रह लवकरच झाला. परंतु त्यांचा नित्य सहवास होते नाहीं असें वाटलें, तेव्हां त्यांनीं तुकाराममहाराजांना कारकुनामार्फत पत्र पाठविलें. समर्थांचा अनुग्रह वैशाखांत झाला. समर्थांचा नित्य सहवास मिळणें शक्य नाहीं, असें त्यांना एकदोन महिन्यांतच कळलें असावें व नंतर लागलीच म्हणजे आषाढश्रावणांत पत्र लिहिलें असावें. त्या वेळीं तुकाराममहाराज हयात होते, व त्यांनीं लागलीच वरील अभंगात्मक उत्तर पाठविलें असावें. ह. स्वा.च्या बखरींत "अनुग्रह झाल्यानंतर कोणे एके समयीं शिवछत्रपतींच्या मनांत आलें कीं, स्वामी सतत आपणांजवळ राहात नाहींत." असें म्हटलें आहे. त्यावरून

कोणे एके समयीं म्हणजे बऱ्याच काळानें म्हणजे कांहीं वर्षांनीं अशी समजूत करून घेऊन प्रो. भाटे म्हणतात:—" परंतु तुकाराममहाराज सन १६४९ (श. १५७१) फार तर १६५१ मध्यें ( श. १५७३ ) वैकुंठवासी झाले, असें ऐतिहासिक पुराव्यावरून ठरलें आहे, तेव्हां हें पत्र तुकारामांनीं लिहिलेलें दिसत नाहीं." तुकाराम सन १६४९ ( श. १५७१ ) सालीं फाल्गुन महिन्यांत वैकुंठवासी झाले असें मानलें तरी त्यांनीं हयात असतांना शिवाजीमहाराजांना पत्र पाठविणें शक्य आहे. कारण कोणे एके समयीं म्हणजे अनुग्रहानंतर २।३ महिन्यांतीलच गोष्ट असली पाहिजे. शिवाजीमहाराज कोणती ही गोष्ट मनांत आल्यावर झटपट करीत असत. समर्थ अनुग्रह देतात पण नित्य जवळ राहात नाहींत, ठीक आहे. तुकाराम ही महाप्रतापी साधु आहेत, त्यांना पत्र पाठवून आणून जवळ ठेवावें असें वाटून लागलीच कारकुनामार्फत पत्र पाठविलें. महाराजांचें पत्र पहातांच तुकारामांनीं पत्राचें उत्तर पाठविलें असें हनुमंत स्वामी म्हणतात. तेव्हां ( श. १५७१ ) वैशाखांतील अनुग्रहानंतर २।३ महिन्यांतच म्हणजे फाल्गुनांतील तुकारामांच्या वैकुंठगमनाच्या पूर्वीं पत्र पाठविणें व उत्तर येणें या गोष्टी होणें शक्य आहे हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल. पुढें प्रो. भाटे म्हणतात:— "तुकारामाच्या हयातींत हें पत्र लिहिलें आहे असें मानल्यास रामदास व शिवाजींची भेट सन १६४९ (श. १५७१ ) च्या पूर्वीं पुष्कळ काळ झाली असावी असें अनुमान करावें लागेल." हें विधान फार मोघम आहे. पत्रांतील कोणत्या विशिष्ट चरणांवरून हें अनुमान करणें भाग आहे व पुष्कळ काळ म्हणजे किती वर्षें हें स्पष्ट लिहिणें प्रो. भाटे यांचें कर्तव्य होतें. त्यांच्यासारख्या विद्वान् प्रोफेसरांनीं मोघम विधान ठोकून वाचकांची दिशाभूल करणें योग्य नाहीं. तुकाराममहाराजांच्या पत्रावरून तसें अनुमान करण्याची आवश्यकता नाहीं, असें आम्हांस वाटतें. परंतु प्रो. साहेबांना अनुग्रहापूर्वीं दोघांची भेट झाल्याचा आधार पाहिजे असल्यास तो ही एका पूर्वचरित्रांत आहे. अनुग्रहापूर्वीं चार वर्षें शके १५६७ सालीं मसूर येथें पहिला रामनवमीचा उत्सव झाला, त्या वेळीं महाराज उत्सवास आले होते व दोघांची भेट झाली, असा उल्लेख दासविश्रामधामांत आहे. ( दा. वि., वर्ग ७, पान २०६ ) शेवटीं प्रो. भाटे म्हणतात:—" सारांश, हें पत्र सांप्रदायिक हकीकतींतीलच असल्यामुळें भेटीच्या कालनिर्णयाच्या वादांत स्वतंत्र ऐतिहासिक पुरावा म्हणून ग्राह्य धरतां येत नाहीं." हें प्रो.साहेबांचें अनुमान मात्र सर्वांत विचित्र आहे. तुकारामाच्या अभंगात्मक पत्रांत समर्थांचा उल्लेख आहे, एवढ्यावरून तें पत्र सांप्रदायिक हकीगतींतील आहे हें कसें हें प्रो. साहेबांशिवाय इतरांना समजणें फार कठिण आहे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें तुकाराम महाराज ही सांप्रदायिक हनुमंतस्वामींच्या अनुग्रहकाल-कटांत सामील होते असें म्हणावें लागेल. वर

नमूद केलेल्या कारणांवरून तुकारामांच्या अभंगात्मक पत्रांवरील प्रो. भाटे यांचे आक्षेप समर्थनीय नाहींत असें वाचकांना कळून येईल. प्रि. डॉ. बाळकृष्णप्रभृतींनीं असा आक्षेप घेतला आहे कीं, वरील अभंगात्मक पत्रांत 'छत्रपति,' 'अष्टप्रधान' असे शब्द आहेत. शके १५७१ सालीं म्हणजे शिवाजीमहाराज २०।२२ वर्षांचे असतांना हे शब्द प्रचलित असणें संभवनीय नाहीं. परंतु राधामाधवविलासचंपू व कांहीं ऐतिहासिक पत्रें यांवरून सदरहू शब्द फार पूर्वींपासून प्रचलित होते, हें आतां सिद्ध झालें आहे. ( म. इ. सा., खं. १५ ) तेव्हां तुकाराममहाराजांनीं शिवाजी-महाराजांना अभंगात्मक लिहिलेलें पत्र हें शके १५७१ सालीं महाराजांना समर्थांचा वैशाखमासीं अनुग्रह झाल्यानंतर व फाल्गुन महिन्यांत तुकाराममहाराज वैकुंठास जाण्यापूर्वीं लिहिलें असें मानण्यास कोणत्या ही प्रकारची हरकत येत नाहीं. समर्थांनीं महाराजांना अनुग्रह दिल्याचा काल शके १५७१ वैशाख मास हाच आहे असें कै. लो. टिळक यांचें ही मत होतें ( गी. र., पा. ४३५ ).

आतां दुसरा कागदोपत्री पुरावा म्हणजे शिवाजीमहाराजांनीं समर्थांना शके १६०१ सालीं करून दिलेली सनद होय. त्याविषयीं प्रो. भाटे काय म्हणतात त्याचा विचार करूं. ती सनद फार महत्त्वाची आहे. ती परिशिष्ट ( अ ) यांत दिली आहे, ती वाचकांनीं प्रथम वाचावी. ती सनद राज्याभिषेक ५ कालयुक्ताक्षिनाम संवत्सर आश्विन शुद्ध दशमीची आहे, म्हणजे शके १६०१ची आहे. "या पत्राचा ( सनदवजा पत्राचा ) पुरावा प्रथम भेटीच्या प्रश्नासंबंधानें शून्य आहे हें सहज समजेल," असें प्रो. भाटे या सनदेसंबंधानें म्हणतात. परंतु या पत्रांत प्रथमभेटीचा तिथि, वार, महिना व शक देऊन जरी उल्लेख केला नाहीं तरी समर्थांनीं चाफळास श्रीरामाची स्थापना केल्यापासून आपल्या व समर्थांमध्यें घडलेल्या पुष्कळ गोष्टींचा वृत्तांत शिवाजीमहाराजांनीं दिला आहे; त्यावरून या गुरुशिष्यांची भेट "दुर्घट स्थळें" म्हणजे किल्ले बांधण्यापूर्वीं व "राज्य चरणीं अर्पण" करण्यापूर्वीं म्हणजे आसमंतांत गिरिगव्हरीं वास करून चाफळास श्रीस्थापना करण्याच्या वेळीं किंवा त्यापूर्वीं ही घडली होती असें स्पष्ट सिद्ध होतें. शके १५६७ सालीं महाराज मसूर येथील श्रीरामनवमीच्या उत्सवास गेले होते, असा दासविश्रामधामांत उल्लेख आहे असें आम्हीं वर दाखविलें आहे त्यावरून ही वरील सिद्धांतास बळकटी येते.

शके १५७१ सालीं समर्थांचा महाराजांना अनुग्रह झाला असें मानल्यास चाफळच्या देवालयाच्या सनदा इतके दिवस लांबणीवर कां पडल्या असा एक आक्षेप प्रोफेसरसाहेबांनीं घेतला आहे व इतर कांहीं चिकित्सक आक्षेपकांनीं ही घेतला आहे. त्यास असें उत्तर आहे कीं, महाराजांनीं अनेक वेळां श्रीच्या उत्स-वाच्या व्यवस्थेची गोष्ट काढली कीं समर्थ तिकडे लक्ष देत नसत. शिष्यांनीं भिक्षा मागून उत्सव करावे अशी त्यांची इच्छा होती. वरील सनदेंत ही "विशेष उपाधीचें

कारण काय ? " असें महाराजांच्या इच्छेस समर्थ बोलल्याचा उल्लेख आहे. पुढें समर्थांचा वृद्धापकाळ झाला व महाराजांचा व शिष्यमंडळीचा ही विशेष आग्रह पडला तेव्हां " तथापि तुमचे मनीं श्रीची सेवा घडावी हा निश्चय झाला त्यास यथावकाश जें जें नेमावेंसें वाटेल तें नेमावें व पुढें जसा संप्रदायाचा व राज्याचा विस्तार होईल तैसें करीत जावें, " अशी संमती समर्थांनीं दिली. यावरून संप्रदायाचा व राज्याचा विस्तार होण्यापूर्वीपासूनची हकीकत महाराज या पत्रांत देतात हें सिद्ध होतें. चाफळच्या देवालयास सनदा उशीरानें कां दिल्या याचें कारण ही या सनदेवरून कळून येतें.

तिसरा कागदोपत्री पुरावा महाराजांच्या समर्थांशीं रायगडावर झालेल्या भेटीच्या उल्लेखाचें पत्र होय. या पत्रासंबंधीं प्रो. भाटे सनदेवरील आक्षेपाप्रमाणेंच या पत्राचा प्रथम भेटीसंबंधाच्या प्रश्नावर कांहीं उजेड पडत नाहीं, असें मोघम विधान करतात. तेव्हां त्याविषयीं विशेष विचार करण्याचें कारण नाहीं.

अनुग्रहाच्या कालासंबंधीं चवथा कागदोपत्री पुरावा म्हणजे अनंत गोपाळ कुडाळकरकृत समर्थवाकेनिशी-टिप्पण होय. हें टिप्पण अत्यंत महत्त्वाचें व पूर्ण विश्वसनीय आहे. " हें टिप्पण सांप्रदायिक पुराव्यांतील आहे. त्याला स्वतंत्र ऐतिहासिक पुरावा म्हणतां येणार नाहीं. " असें प्रो. भाटे म्हणतात हें आश्चर्य होय. जो कोणी निर्विकार मनानें या वाकेनिशी टिप्पणांकडे पाहील त्यास त्याच्या सत्यतेविषयीं बिलकुल शंका येणार नाहीं.

प्रथम ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, हें टिप्पण स्वराज्यस्थापनेची स्फूर्ति प्रथम शिवाजीमहाराजांना झाली कां ती त्यांना समर्थांच्या भेटीनंतर झाली हा अलीकडील वाद उत्पन्न होण्यापूर्वी २५० वर्षें लिहिलेलें आहे. तें विनाकरण समर्थांची महती वाढविण्याकरितां लिहिलेलें नाहीं व त्यांत भेटीचें, अनुग्रहाचें पाल्हाळिक व अतिशयोक्तिपूर्वक वर्णन ही नाहीं. फक्त समर्थचरित्रांतील महत्त्वाच्या गोष्टींचीं कलमवार टिपणें त्यांत दिलीं आहेत. दुसरी गोष्ट अशी कीं, या टिपणांत अनुग्रहकालीं समर्थांनीं महाराजांना स्वराज्यस्थापनेचा मंत्र कानीं सांगितल्याचा उल्लेख नाहीं. तिसरी महत्त्वाची गोष्ट ही कीं, ही समर्थवाकेनिशी समर्थ समाधिस्थ झाल्यावर चारच दिवसांनीं लिहिली आहे म्हणून ती काल व नामनिर्देश या बाबतींत विश्वसनीय मानणें भाग आहे. या मुद्याचें साविस्तर विवेचन आम्हीं पहिल्या भागांत केलेंच आहे. या टिप्पणासंबंधानें प्रो. भाटे म्हणतातः—"पण हें टिप्पण चाफळ मठांतलें आहे व त्यांत रामदासांसंबंधीं प्रचलित असलेल्या सर्व दैवी चमत्कारांच्या अशक्य व असंभाव्य गोष्टींचा हनुमंतस्वामींच्या बखरीप्रमाणेंच उल्लेख आहे. म्हणजे असत्योक्ति व अतिशयोक्ति हे दोष या टिप्पणावर येतात. सारांश, हें टिप्पण सांप्रदायिक पुराव्यांतील आहे. त्याला स्वतंत्र ऐतिहासिक पुरावा

मानतां येणार नाहीं." या बाकेनिशींत एकंदर ३९ टिप्पणें आहेत. या टिप्पणांत अनुक्रमणिकेप्रमाणें त्रोटक माहिती आहे. ३९ टिप्पणांपैकीं ७ टिप्पणें एका ओळीचीं आहेत; १६ टिप्पणें २।३ ओळींचीं आहेत; ४ टिप्पणें ५।७ ओळींचीं आहेत; ५ टिप्पणें ७।८ ओळींचीं आहेत; बाकीं ७ टिप्पणें १० पासून १२ ते १५ ओळींचीं आहेत. ही ओळीवार माहिती देण्याचा हेतु हा कीं, या त्रोटक टिप्पणांत अतिशयोक्तिपूर्वक वर्णन असणें अशक्य आहे. टिप्पणकारानें समर्थसमाधीनंतर चार दिवसांनीं मिळालेल्या लेखी व तोंडी माहितीप्रमाणें अगदीं त्रोटक—कांहीं ठिकाणीं तर भागाच्या शिरोलेखाप्रमाणें—टिप्पण दिलें आहे. या बाकेनिशींतील टिप्पणांवरून हनुमंतस्वामींनीं आपल्या बखरींतील कांहीं भाग लिहिला आहे. त्यांत ठिकाठिकाणीं अतिशयोक्तिपूर्वक पाल्हाळिक वर्णन आहे. तें प्रो. भाटे यांच्या डोक्यांत असतांना त्यांनीं "शिष्यापराधे गुरोर्दंडः" या न्यायानें बाकेनिशीटिप्पण-कारांवर अतिशयोक्तीच्या दोषाचा शेरा ठोकला आहे. अतिशयोक्तीमध्यें मुळांत थोडा तरी सत्यांश असतो. परंतु असत्योक्तिदोषाची गोष्ट फार निराळी आहे. तो दोष फार भयंकर आहे. तो दोष अक्षम्य आहे. बाकेनिशीकारावर तो दोष ठेवण्यापूर्वीं ३९ टिप्पणें ऐतिहासिक पुराव्यांवरून साफ खोटीं आहेत असें सिद्ध करणें प्रोफेसरसाहेबांचें कर्तव्य होतें. बाकेनिशी टिप्पणांत शके १४९० पासून म्हणजे समर्थांचे वडील सूर्याजीपंत यांच्या जन्मापासून शके १६०३ पर्यंत म्हणजे समर्थांच्या समाधीपर्यंत झालेल्या महत्त्वाच्या गोष्टी व त्यांची शकतिथिपूर्वक कालाची माहिती दिली आहे. त्यांमध्यें अमक्या गोष्टीचा दिलेला काल अमक्या ऐतिहासिक पुराव्यावरून खोटा आहे, असें पुराव्याचें माप बाकेनिशीटिप्पण-काराच्या पदरांत घालावयास पाहिजे होतें. ११२ शकतिथींशिवाय सर्व शक-तिथि न्याय-निष्ठुर चिकित्सकांना देखील मान्य आहेत. बाकेनिशींतील बाकोच्या शकतिथींचा ते टीका करितांना उपयोग करितात. विशेषतः अनुग्रहकालाच्या शकतिथीवर दुसऱ्या पक्षांतील लोकांचा कटाक्ष आहे. बाके-निशींतील १८व्या टिप्पणांतील अनुग्रहाचा काल प्रो. भाटे यांच्या पूर्वग्रहाच्या उलट आहे, म्हणून ते बाकेनिशींतील टिप्पणांवर असत्योक्तीचा दोष ठेवण्यास तयार झाले आहेत. बाकेनिशीटिप्पणें समर्थसमाधीनंतर चारच दिवसांनीं समर्थांची दिनचर्या शिवाजीमहाराजांकडे पाठविणाऱ्या कारकुनानें तयार केलें होतें. आम्ही पहिल्या भागांत बाकेनिशीच्या विश्वसनीयतेविषयीं लिहितांना श्री. वैद्य यांच्या शिवाजीमहाराजांच्या इंग्रजी चरित्रांतील दिलेलें एक वाक्य वाचकांची स्मरण-शक्ति ताजी करण्याकरितां येथें देतों. तें वाक्य असें "...events, dates or names cannot be questioned when noted by contemporary writers" अर्थः— समकालीन लेखकांनीं लिहून ठेवलेल्या घटित गोष्टी, शक, तिथि व नांवें यांच्या

सत्यतेविषयीं प्रश्न काढतां येणार नाहीं, म्हणजे तीं सर्व खरीं मानलीं पाहिजेत. समर्थबाकेनिशी शके १६०३ मध्यें लिहिली आहे. तेव्हां ती समकालीन लेखकांनीं लिहिली आहे म्हणून तींतील शक, तिथि हीं मान्य केलीं पाहिजेत.

या बाकेनिशीटिप्पणासंबंधीं छत्रपति शिवाजीमहाराजांचे प्रसिद्ध चरित्र-कार श्री. केळुस्कर पुढील विधान करितातः—" परंतु हें टिप्पण कधीं लिहिलें याचा काल निश्चित नाहीं. " (पान ५३६, टीप). श्री. केळुस्कर यांनीं शिवाजीमहाराजांचें चरित्र लिहितांना इंग्रजी व मराठी अनेक ग्रंथ वाचून महा-राजांच्या बाल्पणापासून अंतापर्यंत संपूर्ण विविध माहिती देऊन उत्तम चरित्र लिहिलें आहे. परंतु बाकेनिशीवर वरील विधान करतांना त्यांनीं बाकेनिशी वाचण्याचे ही श्रम घेतले नाहींत, असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. कारण बाकेनिशीच्या आरंभीं " शके १६०३ दुर्मतिनाम संवत्सरे, माघ वद्य १३, सौम्यवासरे तद्दिने लिख्यते " असा स्पष्ट शेरा आहे.

बाकेनिशीमधील टिपणांतील अनुग्रहवर्ष—शके १५७१—यावर आक्षेप घेण्यास प्रो. भाटे यांनीं दोन पत्रांचा आधार पुढें केला आहे. त्यांत कितपत तथ्य आहे तें पाहूं. त्यांपैकीं पहिलें पत्र श. १५८० सालीं दिवाकर गोसावी यांना भास्कर गोसावी यांनीं लिहिलें आहे. त्यांत " आपण शिवाजीमहाराजांना भेटण्यास गेलों, त्या वेळीं ' समर्थ कोठें राहतात ? मूळ गांव कोण ? ' " असें त्यांनीं विचारल्याचा उल्लेख आहे. समर्थ एके ठिकाणीं रहात नसत. दत्तात्रयाप्रमाणें त्यांची त्रिस्थळी यात्रा असे. सकाळीं स्नान एके ठिकाणीं, दुपारीं भिक्षा एके ठिकाणीं, तर रात्रीं कीर्तन एके ठिकाणीं अशी त्यांची दिन-चर्या असे. आज एका डोंगरांतील घळींत, तर उद्यां दुसऱ्या डोंगराच्या घळींत, अशी समर्थांची फिरण्याची रहाटी असल्यानें भास्कर गोसावी महाराजांच्या भेटीस गेले त्या वेळीं " समर्थ कोठें राहतात ? " असा प्रश्न विचारणें साहजिक आहे. समर्थ गोदातीराहून कृष्णातीरीं आले, एवढी साधारण माहिती महाराजांना माहीत असली तरी, समर्थांचें मूळ गांव कोण हें कदाचित् माहीत नसेल, म्हणून " मूळ गांव कोण ? " हें विचारणें ही साहजिक आहे. समर्थ कोठें राहतात ? मूळ गांव कोण ? वगैरे माहिती विचारण्याचें आणखी एक महत्त्वाचें कारण असावें असें आम्हांस वाटतें. तो धामधुमीचा काल होता. शिवाजीमहाराजांस पकडण्याकरितां मुसलमानी अधिकारी नाना प्रकारांचे प्रयत्न करीत असत. तुकाराममहाराजांच्या कीर्तनास महाराज गेले असतांना हजार पठाण लोक त्यांना पकडण्याकरितां आले त्या गोष्टीची हकीकत श्री. केळुस्करांनीं ही आपल्या शिवचरित्रांत दिली आहे (केळुस्करकृत छत्रपति शिवाजीमहाराजांचें चरित्र, पान ५१५।५१६). तो धाम-धुमीचा काल लक्षांत घेतां शिवाजीमहाराजांसारखा धूर्त व अष्टपैलू राजकारस्थानी

पुरुष भेटीस आलेल्या मनुष्याची पूर्ण चौकशी केल्याशिवाय देवालयास दोनशें होन देईल हें संभवत नाहीं. प्रो. भाटे यांना राष्ट्रीय सभेच्या सांप्रतच्या चळवळींत भाग घेण्याचा प्रसंग कधीं आलेला नाहीं. त्यांनीं भाग घेतला असता तर, राष्ट्रीय सभेच्या जिल्ह्यांतील व तालुक्यांतील पुढाऱ्यांकडे स्वयंसेवकाचा पोषाख घालून गुप्त पोलिसांतील लोक कसे येतात व आपण दुसऱ्या जिल्ह्यांतील पुढाऱ्यांकडून आलों, असें सांगून बातमी काढण्याचा व भाड्याचे पैसे उपटण्याचा कसा प्रयत्न करितात हें त्यांना कळलें असतें. घरीं माहिती विचारण्याकरितां आलेला मनुष्य खरा स्वयंसेवक आहे कां वेषधारी गुप्त पोलिस आहे, याविषयीं उलट तपासणीच्या रूपाचे प्रश्न न केल्यास पुढाऱ्यांवर कोणतीं संकटें येण्याचा संभव आहे हें प्रो. साहेबांना कळणें शक्य नाहीं. "जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे." शिवाजीमहाराजांनीं भास्कर गोसाव्यांना समर्थांविषयीं कांहीं प्रश्न विचारले, यावरून महाराजांना त्यापूर्वी समर्थांची माहिती नव्हती असें अनुमान काढणें किती धोक्याचें आहे हें वाचकांना समजण्याकरितां वरील विवेचन आम्हांस करावें लागलें.

दुसरें पत्र शके १५९४ सालचें आहे. हें पत्र दिवाकर गोसावी यांस केशव गोसावी यांनीं लिहिलेल्या पत्राची नक्कल आहे. त्यांतील प्रस्तुत वादाच्या उपयोगाचा उतारा खालीं देतों. "राजश्री शिवाजी राजे भोसले हे समर्थांचे भेटीस येणार. राजे यांची पाहिलीच भेट. वाडीचे लोकांस खटपटीस आणावें. उपयोग होईल. झाडी बहुत आहे." पहिलीच भेट याचा अर्थ पुढील संदर्भावरून त्या भागांतील पहिली भेट असा घ्यावा लागतो. कारण समर्थ डोंगरीं राहत हें प्रसिद्ध आहे. आज या डोंगरांत तर उद्यां त्या डोंगरांत असे ते फिरत. ज्या भागांत भेटीचे वेळीं समर्थ होते त्या भागांतील 'बहुत झाडी' काढून टाकून रस्ता साफ करण्यास वाडीच्या लोकांस खटपटीस आणण्यास लिहिणें स्वाभाविक आहे. खाजगी भेट व दरबारी, सरकारी व जाहीर भेट यांमध्यें ही फरक असतो, हें हल्लीं अधिकाऱ्यांच्या खाजगी (Private) व जाहीर अगर दरबारी (State) भेटींच्या वर्णनांवरून सिद्ध होतें. दरबारी भेटीच्या वेळीं अधिक तयारी करावी लागते. तेव्हां श. १५९४ च्या पत्रांत पहिली भेट म्हटलें आहे त्याचा अर्थ पहिली दरबारी भेट असण्याचा ही संभव आहे. कारण बहुत झाडींतून रस्ता तयार करण्याकरितां वाडीच्या लोकांस खटपटीस आणण्याचा त्यांत उल्लेख आहे. पहिलीच भेट याचा अर्थ रे. डेमिंगसाहेबांसारखे त्रयस्थ मिशनरी कसा करतात तें पाहिलें म्हणजे आमच्या म्हणण्याची सत्यता वाचकांना दिसून येईल. "The word *first* in Keshava's letter is by no means conclusive. It may be used in an official or political sense and the King may have visited Shinganvadi a number of times." भावार्थः—"केशवांच्या पत्रांतील पहिली या शब्दावरून निःसंदिग्ध असें कांहीं

अनुमान काढतां येत नाहीं. त्याचा उपयोग दरबारी अगर राजकीय अर्थी केला असण्याचा संभव आहे. महाराजांनीं शिंगणवाडी अनेक वेळां पाहिली असेल, तेव्हां शके १५९४ च्या केशव गोसाव्याच्या पत्रावरून त्यापूर्वी समर्थशिवाजींची भेट कधीं ही झाली नव्हती असें निःसंदिग्धपणें सिद्ध होत नाहीं."

शके १५९४ सालीं समर्थशिवाजींची भेट त्यांच्या आयुष्यांतील पहिलीच भेट नसली पाहिजे हें शके १५८० च्या पत्रावरून ही सिद्ध होण्यासारखें आहे. कारण त्या पत्रावरून महाराजांना समर्थांच्या कार्याची व चाफळ येथील श्रीराम-मंदिराच्या स्थापनेची माहिती निदान शके १५८० सालीं होती हें सिद्ध होतें. तेव्हां शिवाजीमहाराजांसारखा धार्मिक, श्रद्धाळु पुरुष समर्थांच्या कार्याचें महत्त्व पटून रामनवमीच्या उत्सवास दरवर्षी २०० होन देऊं लागल्यावर त्यांची गांठ घेतल्याशिवाय चवदा वर्षे राहील हें मुळींच संभवनीय दिसत नाहीं. शके १५८० फाल्गुन शुद्ध द्वितीयेचें भास्कर गोसाव्यांचें पत्र आहे. त्यानंतर लागलीच ८।१५ दिवसांत लिहिलेलें पत्र उपलब्ध झालें असतें व त्यांत प्रथम भेटीचा उल्लेख असता तर बाकेनिशींतील अनुग्रहकालाबद्दल शंका घेतां आली असती. उत्सवास दरवर्षी २०० होन सुरू केल्यावर महाराजांनीं समर्थांची गांठ पुढें चवदा वर्षे कां घेतली नाहीं? असा आक्षेप येईल अशी भीति प्रो. भाटे यांना ही वाटली आहेच; व त्याबद्दल त्यांनीं सदरहू आक्षेपास उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे. ते म्हणतात, "दिल्लीहून सुटका होऊन देशीं परत येण्यास शिवाजीस २।-२॥ वर्षे लागलीं. परत आल्यावर शिवाजीनें गेलेलें राज्य पुन्हा परत घेण्याचा आटोकाट प्रयत्न केला; व त्याच्या प्रयत्नाला यश ही आलें. पण त्या धांदलीच्या, गडबडीच्या व अस्वस्थतेच्या कालीं रामदासाची हकीकत सन १६५८ सालीं कानावर गेली असतांना ही रामदासास भेटावयास सवड झाली नसावी हें उघड आहे." वरील अवतरणांतील प्रो. भाटे यांच्या म्हणण्यांत अनेक ढोबळ चुका झाल्या आहेत. शिवाजीची सुटका दिल्लीहून न होतां आग्र्याहून झाली असें इतिहास सांगतो. शिवाय सुटका झाल्यावर परत राजगडावर येण्यास २।-२॥ वर्षे लागलीं नाहींत, फक्त दहा महिने लागले असें ही इतिहास सांगतो. या दोन ऐतिहासिक स्थल-काल-प्रमादाच्या गोष्टी सोडून देऊन मुख्य वादग्रस्त विषयाकडे वळूं. शके १५८० म्हणजे सन १६५८ सालीं महाराजांना भास्कर गोसाव्यांच्या पत्रावरून समर्थकार्याची व चाफळच्या राममंदिराची हकीकत कळली. त्यानंतर ते १६६६ सालीं औरंगजेबास भेटण्यास आग्र्यास गेले. त्या आठ वर्षांत महाराजांनीं समर्थांची गांठ कां घेतली नाहीं? याचा खुलासा प्रो. भाटे करीत नाहींत. आग्र्याहून आल्यावर गेलेलें राज्य परत मिळविण्याच्या कामांत महाराज सहा वर्षे गुंतले होते असें गृहीत धरलें तरी जाण्यापूर्वी कां भेटले नाहींत? प्रो. भाटे यांचा खुलासा आम्हांस समाधानकारक

वाटत नाहीं. शिवाजीमहाराजांसारखा धार्मिक व भाविक पुरुष शके १५८१ सालीं अफझुलखानाच्या तडाख्यांतून "शक्तीनें व युक्तीनें" सुटल्यावर १३ वर्षें व शके १५८८ सालीं औरंगजेबाच्या तडाख्यांतून सुटल्यावर ६ वर्षें समर्थांसारख्या सत्पुरुषाला भेटल्याशिवाय स्वस्थ बसेल हें मुळींच संभवत नाहीं.

शके १५८० व शके १५९४ या सालांतील वर नमूद केलेल्या दोन पत्रांशिवाय आणखी सहा पत्रें प्रो. भाटे यांनीं आपल्या पुस्तकाच्या परिशिष्टांत दिलीं आहेत. त्यांतील तिथि शक नसलेल्या अशा दोन पत्रांतील मजकुरावर भर देऊन प्रो. भाटे म्हणतात कीं, "त्या दोन्ही पत्रांत प्रथमभेटीच्या सालाचा उल्लेख आहे. परिधावीनाम संवत्सरीं महाराजांस रामदासांनीं परमार्थ सांगून अनुग्रह केला. तेव्हांपासून आपल्याकडेस संस्थानचा कारभार रामदासांनीं दिला आहे." सदरहू पत्रें समर्थांच्या मागें चाफळ संस्थानच्या कारभारासंबंधीं दिवाकर गोसावी व उद्धवस्वामी या दोघांमध्यें लागलेल्या तंटयासंबंधीं आहेत. त्यांत शिवाजीच्या प्रथमभेटीच्या सालचा उल्लेख आहे असें प्रो. भाटे म्हणतात त्याप्रमाणें मुळींच उल्लेख नाहीं; व अनुग्रह दिल्याचा ही उल्लेख नाहीं. परिशिष्टांतील नं. ५ च्या पत्रांत पुढील मजकूर आहे:—"पूर्वीं कैलासवासी शिवाजी राजे भोसले यांसी परिधावी नाम संवत्सरीं शिंगणवाडीचे मठीं श्रीहनुमंतांसमोर परमार्थ झाला...." इत्यादि. नं. ६ च्या पत्रांत ही "परिधावीनाम संवत्सरीं राजश्रींनीं परमार्थ घेतला." असाच उल्लेख आहे. अनुग्रह हा शब्द दोन्ही पत्रांत नाहीं व प्रथमभेटीचा उल्लेख ही दोन्ही पत्रांत नाहीं. परमार्थ याचा अर्थ प्रो. भाटे अनुग्रह असा करितात, पण तो चुकीचा आहे. संस्कृत अगर मराठी कोशांत तसा अर्थ दिलेला नाहीं.

पान ११५त प्रोफेसरसाहेब म्हणतात, "केशव गोसाव्यांच्या पत्राची तिथि चैत्र वद्य १ शके १५९४ आहे. त्या सालीं परिधावी संवत्सर आहे. सांप्रदायिक कथेप्रमाणें शिवाजीला गुरुमंत्र गुरुवारीं झाला असें आहे. या पत्राच्या मितीला बुधवार होता. दुसरेच दिवशीं भेटीचा दिवस नसला पाहिजे. वैशाख शुद्ध नवमी ही पत्राच्या तिथीपासून फार दूर आहे. शिवाय रा. चांदोरकर यांनीं पत्रांवरून असें काढलें आहे कीं, चैत्र वद्य नवमी परिधावी नाम संवत्सर हा फार चांगल्या मुहूर्ताचा दिवस आहे. त्या दिवशीं अमृतसिद्धियोग आहे व उत्तराषाढा नक्षत्र आहे. त्या दिवशीं अभिजित् नक्षत्रीं अनुग्रह झाला असला पाहिजे. तेव्हां १२ एप्रिल सन १६७२ या दिवशीं शिवाजी व रामदासांची प्रथमभेट झाली व बखरींत वर्णन केल्याप्रमाणें त्याच दिवशीं रामदासांनीं महाराजांवर अनुग्रह केला व रामदासांनीं त्यांना मेजवानी दिली हें सिद्ध होतें." वरील अवतरणांतील अनुमानें व विधानें पाहून प्रोफेसरसाहेबांची कींव येते. ह. स्वा.च्या बखरीवर असत्योक्तीचा दोष ते

ठेवतात. नंतर त्या बखरींत अनुग्रहाचा शक शके १५७१ सोडून देऊन अनुग्रहाचा वार **गुरुवार** फक्त घेतात व महाराजांना अनुग्रह शके १५९४ चैत्र वद्य नवमी **गुरुवारीं** झाला असें म्हणतात. चैत्र वद्य नवमी हा अनुग्रहाचा दिवस, त्या दिवशीं गुरुवार येतो म्हणून प्रोफेसर साहेबांनीं अनुमानानें ठरविला आहे. तो शके १५९४ च्या पत्रांत नाहीं. बखरींतील वैशाख शुद्ध नवमी दिवशीं गुरुवार येतो. परंतु तो दिवस पत्राच्या तिथीपासून फार लांब आहे, असें प्रो. भाटे म्हणतात. पत्राची तिथि चैत्र वद्य प्रतिपदा आहे. त्या तिथीपासून वैशाख शुद्ध नवमी फक्त बावीस दिवसच राहते. या बावीस दिवसांच्या कालास प्रो. भाटे 'लांबचा काल' म्हणतात. परंतु तुकाराममहाराजांनीं शिवाजी-महाराजांना जें अभंगात्मक पत्र लिहिलें त्याविषयीं विचार करतांना त्यांची 'लांब काला'ची कल्पना बदलते. अनुग्रहाचा काल शके १५७१ वैशाख शुद्ध नवमी हा धरल्यास तें पत्र अनुग्रहानंतर बऱ्याच काळानें लिहिलें असलें पाहिजे असें ते म्हणतात व ज्या अर्थी तुकाराम शके १५७१ सालीं, फार तर शके १५७३ सालीं वैकुंठवासी झाले असें ऐतिहासिक पुराव्यावरून सिद्ध झालें आहे, त्या अर्थी अभंगात्मक पत्र खरें नसलें पाहिजे असें ते म्हणतात (पान २८). म्हणजे अभंगात्मक पत्राचा विचार करतांना त्यांना दहा महिने हा काल अगर दोन वर्षे दहा महिने हा काल सुद्धां फार लांब वाटत नाहीं. परंतु अनुग्रहासंबंधीं विचार करतांना (पान ११५ मध्यें) चैत्र वद्य १ पासून वैशाख शुद्ध नवमीपर्यंतचा बावीस दिवसांचा काल त्यांना लांबचा वाटतो. तेव्हां महिना पंधरा दिवसांचा काल प्रो. भाटे यांच्या मताप्रमाणें बराच लांबचा काल होऊं शकतो. म्हणून तुकारामांचें शिवाजीमहा-राजांना पाठविलेलें अभंगात्मक पत्र प्रो. भाटे यांच्या पान ११५ यांतील तर्क-पद्धतीप्रमाणें खरें ठरतें. व तें अभंगात्मक पत्र खरें ठरल्यावर महाराजांना समर्थांचा अनुग्रह तुकारामांच्या हयातींतच झाला असें मानणें क्रमप्राप्तच होतें; व त्यांत दुसऱ्या पक्षाच्या लोकांस असमाधान वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण अनुग्रह-काल शके १५७१ हा ठरला तरी महाराजांना स्वराज्यस्थापना करण्याची स्फूर्ति समर्थांपासून झाली असें त्यावरून सिद्ध होत नाहीं.

प्रतापगडचा किल्ला बांधण्यास शिवाजीमहाराजांनीं मोरोपंत पिंगळे यांस शके १५७५ सालीं सांगितलें. तो किल्ला शके १५७८ सालीं बांधून झाला व तेथें देवी स्थापन करण्याचा समारंभ त्याच वर्षी झाला. त्या समारंभास समर्थ हजर होते. समारंभास हजर असलेल्या गृहस्थांची अस्सल यादी प्रतापगडच्या देवीच्या पुजाऱ्यांच्या घरीं कै. रा. ब. पारसनीस यांनीं स्वत: पाहिली होती, असें आम्हांस त्यांनीं हयात असतांना सातारा मुक्कामीं सांगितलें होतें. या यादींत समर्थांचें नांव पहिलें आहे असें कै. रा. ब. पारसनीस म्हणत होते.

श्री. महादेव मोरेश्वर गोरे यांनीं श्रीमंत पंत अमात्य संस्थान बावडें यांचें वंशवृत्त सन १९१५ सालीं प्रसिद्ध केलें आहे. बावडें संस्थानचे संस्थापक सुप्रसिद्ध राजकार्यधुरंधर रामचंद्र नीळकंठ हे होत. बावडे-दप्तरांतील अस्सल कागदपत्र व सनदा यांच्या आधारें व काव्येतिहाससंग्रहाच्या आधारें या वंशवृत्तांत माहिती दिली आहे. त्यांत इ. स. १६४९ (श. १५७१) सालीं शिवाजीमहाराजांना शिंगणवाडी येथें समर्थांनीं अनुग्रह दिला, त्या वेळीं रामचंद्र नीलकंठांचे वडील निळोपंत मुजुमदार व बाळाजी आवजी चिटणीस हे महाराजांबरोबर होते. त्यांना ही समर्थांनीं अनुग्रह दिला व नंतर या दोघांना सेवाधर्म सांगितला असा मजकूर आहे (पान १५). नंतर पुढें पंत अमात्यवंशवृत्तकार म्हणतात, "त्या वेळे-पासून निळोपंतांचे घराण्यांत आराध्य दैवत रघुपति व दासपंथ हीं चालू झालीं. निळोपंत वारंवार स्वामींचे दर्शनास जात व उपदेश ग्रहण करून परत येत. यांची स्वामींचे ठिकाणीं पूर्ण निष्ठा होती. शके १५८० त स्वामींनीं अंत्यज उद्धरिला त्या वेळीं निळोपंत जवळ होते. शके १५८१ त चाफळ मुक्कामीं उद्धवगोसावी यांचे कीर्तनांत स्वामी श्रवणास बसले असतां शिवाजीमहाराजांनीं मोरचल व निळो-पंतांनीं हातांत भालदारकाठी घेतली होती." (पान १५।१६)

समर्थांचे शिष्य वासुदेव गोसावी यांच्या मठास शिवाजीमहाराजांनीं शके १५९३ सालीं सनद दिली (सांप्रदायिक पत्रें). शिष्यास सनद दिली तेव्हां गुरूची भेट झाली नसावी असें असणें शक्य नाहीं. म्हणून शके १५९४च्या पत्रांतील प्रथम भेट याचा अर्थ त्या भागांतील अगर वर्षांतील अगर दरबारी प्रथम भेट असाच असला पाहिजे हें सिद्ध होतें.

श्री. केळुस्कर यांची ही मुख्य मदार या शके १५९४ च्या पत्रावर आहे (छत्रपती शिवाजीमहाराजांचें चरित्र, पान ५३१). समर्थांच्या ओंवीबद्ध पत्रांतील जलपति शब्दावर ही त्यांचा कटाक्ष आहे (पान ५३३); अनुग्रह शके १५७१ सालीं तर चाफळच्या देवालयास उत्पन्नाची सनद शके १६०१ सालीं कां (पान ५३२) वगैरे त्यांचे ही आक्षेप प्रो. भाटे यांच्याप्रमाणेंच आहेत. त्या सर्व आक्षेपांचें खंडण वर केलेंच आहे, तेव्हां त्यांसंबंधीं निराळें विवेचन करण्याचें कारण नाहीं.

तुकारामांनीं शिवाजीमहाराजांना जें अभंगात्मक पत्र शके १५७१ सालीं फाल्गुन महिन्यांत वैकुंठास जाण्यापूर्वी पाठविलें, त्यासंबंधानें श्री. केळुस्कर म्हणतात कीं, त्यांतील कांहीं अभंग प्रक्षिप्त आहेत. कारण त्यांत छत्रपति व अष्टप्रधान हे शब्द आले आहेत व हे शब्द तुकाराममहाराजांच्या हयातींत प्रचलित नव्हते (पान ५३५). परंतु छत्रपति व अष्टप्रधान हे शब्द पूर्वीपासून प्रचलित होते हें आतां नवीन उपलब्ध झालेल्या पुराव्यावरून सिद्ध झालें आहे हें आम्हीं पूर्वी याच भागांत सिद्ध केलें आहे. तुकाराममहाराजांचें शिवाजीमहाराजांना पाठविलेलें जें

अभंगात्मक पत्र आहे, त्यांतील कांहीं अभंग प्राक्षित मानण्याचें कारण श्री. केळुस्कर पुढें लिहिल्याप्रमाणें देतात. "हा प्रक्षेप करणाऱ्यांनीं आपल्या गुरूची महती वाढविण्यासाठीं हा सत्यापलाप केला नसता तर महाराजांस हीनपणा आणणारा प्रवाद आज महाराष्ट्रांत प्रचलित झाला नसता. हा प्रवाद अर्थात् असा कीं, स्वधर्म-रक्षण व स्वराज्यसाधन हीं मुख्यत: रामदासस्वामींच्या उपदेशानें महाराजांकडून घडलीं." ( पान ५३५ ). श्री. केळुस्कर तुकारामांच्या सहा अभंगांतील चार अभंग प्राक्षित आहेत असें म्हणतात. ते अभंग २, ४, ५ व ६ होत. १ ला व ३ रा अभंग मात्र खरे, कारण त्यांत रामदासांच्या नांवाचा उल्लेख नाहीं. २, ४, ५ व ६ अभंग खरे मानले तर तुकाराम हयात असतांनाच म्हणजे शके १५७१ सालीं शिवाजी-महाराजांना समर्थांनीं अनुग्रह दिला असें सिद्ध होतें. हें सिद्ध झाल्यावर समर्थांनीं शिवाजीमहाराजांना स्वधर्मरक्षणाची व स्वराज्यसाधनाची स्फूर्ति दिली असें सिद्ध होईल व त्यायोगानें "महाराजांना हीनपणा" येईल. श्री. केळुस्करांना आम्ही विनयपूर्वक सांगतों कीं, शके १५७१ सालीं समर्थांनीं महाराजांना शिंगणवाडी येथें अनुग्रह दिला असें ऐतिहासिक पुराव्यावरून सिद्ध झालें तरी स्वराज्याची स्फूर्ति समर्थांनीं महाराजांच्या मनांत उत्पन्न केली असें सिद्ध होत नाहीं. कारण शके १५७१ च्या पूर्वींच महाराजांनीं स्वराज्यस्थापनेच्या कामास प्रारंभ केला होता. महाराजांना स्वराज्यस्थापनेची अल्पस्वल्प स्फूर्ति हृदयस्थ नारायणानेंच केली, असें स्वत: समर्थ मागें दिलेल्या ओंवीबद्ध पत्रांत म्हणतात. त्या स्फूर्तीस समर्थांनीं प्रोत्साहन दिलें. स्वराज्य-स्थापनेच्या कल्पनेचें थोडेंसें श्रेय ही शिवाजीमहाराजांबरोबर त्यांचे वडील शहाजीराजे यांना ही देण्यास श्री. केळुस्कर नाखुष दिसतात. स्वराज्याची थोडीबहुत अंधुक कल्पना तरी शहाजीराजे यांच्या मनांत होती हें आतां उपलब्ध झालेल्या पुराव्यावरून सिद्ध झालें आहे. परंतु श्री. केळुस्कर म्हणतात, "हा स्वराज्याचा आरंभ ( शिवाजी ) महाराजांनीं आपण होऊन केला नसून शहाजीराजांच्या सांगण्यावरून दादाजी कोंडदेव व त्याच्या बरोबर असलेले दुसरे कारकून यांनीं महाराज ११।१२ वर्षांचे असतांनाच तो केला असें एका इतिहाससंशोधकाचें ( कै. राजवाडे यांचें ) म्हणणें आहे." ( पान ९० ). हें कै. राजवाड्यांचें विधान श्री. केळुस्कर यांस मान्य नाहीं. ते म्हणतात, "दादाजीनें जर शहाजीराजांस मावळांत स्वराज्य-स्थापनेची सल्ला दिली होती तर पुढें सातआठ वर्षांनीं महाराजांनीं त्या कामास सुरुवात केली तेव्हां त्यानें एवढें अकांड-तांडव कां केलें बरें?" ( पान ९१ ). दादाजीप्रमाणें शहाजीराजे यांनीं ही अकांडतांडव केलें हें श्री. केळुस्कर विसरतात असें दिसतें. दोघे ही धूर्त व सिद्धसाधकांप्रमाणें वागत होते. हत्तीप्रमाणें दाखवावयाचे दांत एक खावयाचे दांत एक, असा संशय विजापूर दरबारांतील अमीरउमरावांस महाराजांविषयीं आला होता ( शिवप्रताप, पान १०८ ). त्याप्रमाणें शहाजी राजे

यांविषयीं ही आला होता व दादाजीचें ही धोरण त्याप्रमाणेंच होतें. पुढें दादाजी-पंतांसंबंधानें श्री. केळुस्कर म्हणतात, "आतां हें मात्र खरें कीं, दादाजी कोंड-देवानें शहाजीराजांच्या जहागिरीची सुव्यवस्था लावून तीस लहानशा टुमदार स्वराज्याचें स्वरूप आणून देण्याचें काम उत्तम प्रकारें केलें; आणि त्याचा हा सगळा कारभार आमच्या अल्पवयी, कुशाग्रबुद्धि चरित्रनायकाच्या डोळ्यांसमोर झाला असल्या कारणानें हें त्यास चांगलेंच शिक्षण मिळालें. एवढ्यापुरता स्वराज्य-स्थापनेस आरंभ झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. तथापि ही जहागीर आदिलशहाच्या कृपेनें मिळाली असून तीवर त्याचा पुरा शह व ताबा होता. तो झुगारून देण्याचें धाडस प्रथम शिवाजी महाराजांनींच केलें. तें दादाजीनें किंवा शहाजीराजांनीं केलें नाहीं." (पान ९१); परंतु पुढें ९२ पानांतच श्री. केळुस्कर म्हणतात, "स्वराज्यस्थापनेचा विचार त्यांच्या (शहाजी राजे यांच्या) हृदयांत पूर्णपणें वागत होता, व त्यांस यवनांची सेवा मनापासून आवडत नव्हती हें निर्विवाद आहे. परंतु सदरील इतिहाससंशोधक (कै. राजवाडे) म्हणतो त्या वर्षींच त्यांनीं या कार्यास आरंभ केला हें म्हणणें मुळींच बरोबर नाहीं. कर्नाटकांत शहाजीराजांनीं पुढें थोडीशी चळवळ केली हें खरें; परंतु शिवाजीमहाराजांप्रमाणें त्यांनीं विजापूरसरकारशीं उघड उघड विरोध केला असें कधीं ही घडलें नाहीं. ते शेवटपर्यंत विजापूरकरांचे अंकितच राहिले." या उताऱ्यांत स्वराज्यस्थापनेचा विचार शहाजीराजे यांच्या हृदयांत पूर्णपणें वागत होता हें खुद्द श्री. केळुस्करच कबूल करतात. जेधे शकावलींत शके १५७१ सालीं ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमेस शहाजीराजे कैदेंतून मुक्त झाले, त्या वेळीं त्यांच्या-बरोबर अटकेंत असलेले कान्होजी जेधे व दादाजी कृष्णाजी लोहकरे हे ही मुक्त झाले असा उल्लेख आहे. त्या वेळीं शहाजीराजे यांनीं त्या दोघांना सैन्यासह शिवाजी-महाराजांना मावळदेशमुख ताब्यांत ठेवण्यास मदत करावी असें सांगितलें, एवढेंच नव्हे तर मोंगलांचें किंवा आदिलशाहीचें सैन्य विरुद्ध येईल तर शिवाजीच्या बाजूनें प्रामाणिकपणानें तुम्ही त्या सैन्याविरुद्ध लढावें असें सांगितलें; व भाकरी व बेल यांवर हात ठेवून त्या दोघांकडून राजनिष्ठेची शपथ घेतली असा मजकूर आहे. यावरून शिवाजीमहाराजांची मोंगल व विजापूर सैन्यांशीं लढून स्वराज्य मिळविण्याची कल्पना शहाजीराजे यांनीं शिवाजीमहाराजांना सांगितली नसली तरी ती त्यांना माहीत होती व त्यांनीं त्या कामांत साहाय्य करण्यास कान्होजी जेधे व दादाजी कृष्णाजी यांना शपथपूर्वक सांगितलें होतें; तेव्हां स्वराज्यस्थापनेच्या श्रेयाचा अल्पांश तरी शहाजीराजे यांना देणें अवश्य आहे व तो दिल्यानें शिवाजीमहाराजांची योग्यता कमी होऊन त्यांना हीनपणा येतो असें आम्हांस वाटत नाहीं. कारण उघडपणानें मोंगलशाही व आदिलशाहीबरोबर धाडसानें युद्ध करून स्वतंत्र राज्य स्थापन

करण्याचें सर्व श्रेय शिवाजीमहाराजांनाच आहे. तें काम शहाजीराजे यांच्या मनांत असलें तरी एकदां थोडा काळ कां होईना निजामशाहीचीं सर्व सूत्रें हातांत आलीं होतीं तरी त्यांच्या हातून झालें नाहीं. तेव्हां स्वराज्याच्या कल्पनेच्या कामीं थोडासा हिस्सा इतरांना द्यावा लागला तरी शिवाजीमहाराजांची योग्यता कमी होते व त्यांना हीनपणा येतो असें आम्हांस वाटत नाहीं. स्वराज्याची कल्पना अंधुक कां होईना शहाजीराजे यांच्या मनांत आली होती, त्याप्रमाणें त्यांनीं थोडासा प्रयत्न केला, परंतु अनेक कारणांमुळें त्यांना त्यांत त्या वेळीं यश आलें नाहीं व त्यांचा शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनेच्या प्रयत्नास आंतून पाठिंबा होता याबद्दल, प्रि. बाळकृष्ण यांनीं नुकतेंच *Shivaji the great* या नांवाचें पुस्तक आतांपर्यंत उपलब्ध झालेल्या देशी परदेशी इतिहासांच्या ग्रंथांतील माहिती घेऊन प्रसिद्ध केलें आहे त्यांतील कांहीं उतारे देतों, त्यांवरून वाचकांची खात्री होईल. Shahaji the Kingmaker या भागांत प्रि. बाळकृष्ण म्हणतात:—" Shahaji's effort to re-establish the Nizamshai Kingdom appeared to be an attempt of establishing Hindavi Swarāj. Hence the alliance of Shahajahan and Adilshaha can be said to be for the purpose of rooting out the budding Hindu Monarchy. This incomplete and insuperable task of creating a Hindu state was afterwards taken up by his son Shivaji who succeeded in carving out a new kingdom, comprising portions which were wrested from the Mogul, Adil-shahi and Vijayanagar Empires." ( Pages 100–101 ).

भावार्थः——शहाजीराजे यांचा निजामशाही पुन्हा स्थापण्याचा प्रयत्न हिंदु-स्वराज्य स्थापण्याकरितां आहे असें शहाजहान व आदिलशहा यांना वाटलें. म्हणून त्या दोघांनीं हिंदु-स्वराज्याच्या प्रयत्नास ' मूले कुठार ' देण्याकरितां आपसांत तह केला. हिंदु-स्वराज्य स्थापन करण्याचें हें अतिदुर्घट काम त्यांचे पुत्र शिवाजीमहाराज यांनीं करून दाखविलें. मोंगलशाही, आदिलशाही व विजयनगरचें राज्य यांतील कांहीं प्रांत जिंकून शिवाजीमहाराजांनीं नवीन राज्य स्थापन केलें.

पुढें Shahaji in the Karnatic या भागांत Secret Support to Shivaij, ' शिवाजीमहाराजांना अंतस्थ साहाय्य ' या सदराखालीं प्रि. बाळकृष्ण जेधे शकावलींतील आम्हीं निर्दिष्ट केलेल्या शके १५७१ सालांतील उताऱ्याचा सारांश देऊन म्हणतातः—

"It is evident Shahaji expected hostilities against Shivaji from the Mogals and the Bijapur ruler. To ward off the danger, he gave his son two of his most influential and trusted friends for assistance, Kanoji and Dadaji Krishnaji Lohokare." (Page 135). पुढें

Shivaji an Independent King या भागांत डॉ. बाळकृष्ण म्हणतातः— " Shahaji's dream of the establishment of Swaraja was realised by Shivaji before his death, and it was fortunate that he himself was the instrument of putting a seal upon his independence."(Page 157). विजापूरच्या बादशहास औरंगजेब आपल्या राज्यावर झडप घालील अशी भीति होती म्हणून त्यानें शिवाजीमहाराजांबरोबर गुप्त तह केला व त्यांत महाराजांचें पूर्ण स्वातंत्र्य कबूल केलें व सर्व कोंकण व दक्षिणहिंदुस्थानचा बराच भाग महाराजांना दिला व त्यांच्या वकीलास विजापूर येथें राहाण्यास परवानगी दिली. हा तह शहाजी-महाराजांच्या मध्यस्तीनें घडून आला. तहांत पूर्ण स्वातंत्र्याचें कलम घालण्याच्या कामीं शहाजीराजे यांनीं शिवाजीस मदत केली; व मरणापूर्वीं आपल्या स्वराज्याच्या अमूर्त व अव्यंक कल्पनेस आपल्या पराक्रमी पुत्रानें मूर्त स्वरूप दिलेलें पाहून त्यांना अत्यानंद झाला.

Shahaji, the Inspirer of Shivaji या मथळ्याखालीं प्रि. बाळकृष्ण म्हणतातः—" Shahaji ought to be given the full credit of bringing about favourable circumstances for a successful rebellion of his son against the foreign rule. " अर्थः—परकीय राज्याच्या उलट आपल्या पुत्रास यशस्वी बंड करण्यास अनुकूल परिस्थिति उत्पन्न करून दिल्याचें पूर्ण श्रेय शहाजीराजे यांना दिलें पाहिजे. पुढें प्रि. बाळकृष्ण म्हणतात कीं, शहाजीराजे अत्यंत धूर्त व मुत्सद्दी होते. शिवाजीमहाराज माझें ऐकत नाहींत, त्यांचें खुशाल पारिपत्य करावें असें जें शहाजीराजे यांनीं विजापूर दरबाराला उत्तर पाठविलें त्यावर पूर्ण विश्वास ठेवून आपला भलताच ग्रह होऊं देणें वाजवी होणार नाहीं. या म्हणण्याच्या सत्यतेकरितां त्यांनीं दहा कारणें दिलीं आहेत (पान १६६ ते १६८) तीं वाचकांनीं मूळ ग्रंथावरून वाचावींत. विस्तारभयास्तव तीं येथें देत नाहीं. शहाजीराजे यांच्या कामगिरीविषयीं प्रि. बाळकृष्ण यांच्या *Shivaji the great* या पुस्तकांतील वरील उतारे देण्याचा मुख्य हेतु कीं, श्री. केळुस्कर यांना शिवाजी-महाराजांना स्वराज्यस्थापनेच्या पूर्वीं शहाजीराजे यांनीं पूर्वभूमिका तयार करून व नंतर ही आपले कान्होजी जेधे व कृष्णाजी लोहोकरे हे विश्वासू व कसलेले नोकर मदतीस पाठवून महाराजांना स्वराज्यस्थापनेच्या कामांत साहाय्य केलें असें सिद्ध झाल्यास महाराजांच्या लौकिकास कमीपणा—हीनपणा—येईल असें वाटतें. हें त्यांचें मत चुकीचें आहे, हें वाचकांच्या निदर्शनास आणणें हा हेतु आहे. तसा कमीपणा येईल असें आम्हांस वाटत नाहीं. मनुष्य किती ही कुशाग्रबुद्धी व पराक्रमी असला तरी त्याला इतरांचें साहाय्य लागणारच. तें साहाय्य घेतलें म्हणजे लोकोत्तर विभूतींस हीनपणा येतो, हें म्हणणें चुकीचें आहे. जिजाबाई राणीसाहेबांनीं बालपणीं

रामायण-महाभारतांतील गोष्टी सांगून शिवाजीमहाराजांची मनोभूमिका स्वराज्याची स्फूर्ति होण्यास अनुकूल केली. नंतर शहाजी राजे यांनीं दादाजी कोंडदेव, यांच्यामार्फत महाराजांना योग्य शिक्षण देऊन व नंतर कान्होजी जेधे व कृष्णाजी लोहोकरे यांना मदतीस पाठवून परिस्थितीस अनुसरून यावच्छक्य मदत केली, असें ऐतिहासिक पुराव्यावरून सिद्ध झालें तरी शिवाजीमहाराजांच्या अलौकिक कीर्तीस मुळींच हीनपणा येतो असें आम्हांस वाटत नाहीं.

त्याचप्रमाणें शिवाजीमहाराजांनीं स्वराज्यस्थापनेस आरंभ केल्यावर, तुम्हो करतां तें चांगलें आहे, असें म्हणून समर्थांनीं त्यांना उत्तेजन दिलें, प्रोत्साहन दिलें, व बहुजनसमाजाचीं मनें आपल्या उपदेशानें स्वराज्याकडे वळविलीं असें सिद्ध झालें तरी शिवाजीमहाराजांची योग्यता कमी होऊन त्यांना हीनपणा येतो असें आम्हांस वाटत नाहीं. समर्थ कृष्णातीरीं शके १५६६ सालीं आले, त्या वेळीं शिवाजीमहाराजांनीं स्वराज्यस्थापनेस अल्पस्वल्प प्रारंभ केला होता; व शके १५७१ सालीं समर्थांनीं महाराजांना अनुग्रह दिला त्यापूर्वीं तोरणा, राजगड, सिंहगड (कोंडाणा), पुरंदर व चाकण हे किल्ले शिवाजीमहाराजांनीं युक्तिप्रयुक्तीनें व प्रसंगविशेषीं सैन्य नेऊन घेतले होते. तेव्हां अनुग्रहापूर्वीं महाराजांनीं महत्त्वाचे किल्ले पटकावून स्वराज्यस्थापनेस अल्प आरंभ केला होता. त्या वेळीं समर्थ नुकतेच कृष्णातीरीं आले होते; परंतु त्यांनीं सदरहू पांच किल्ले घेऊन स्वराज्यास आरंभ करा असें सांगितल्याचा पुरावा उपलब्ध झालेला नाहीं. तेव्हां सदरहू पांच किल्ले घेऊन स्वराज्यस्थापनेस आरंभ केल्याचें सर्व श्रेय शिवाजीमहाराजांनाच आहे. परंतु समर्थ महाराजांचे मोक्षगुरु होते, ते केवळ भक्तिमार्गी संत होते, महाराजांच्या राजकारणाशीं त्यांचा कांहीं संबंध नव्हता असें श्री. केळुस्करांचे व दुसऱ्या पक्षाचे लोक म्हणतात तें खरें नाहीं असें आम्हांस वाटतें. कांहीं मराठे सरदार शिवाजीमहाराजांस अनुकूल नव्हते, एवढेंच नाहीं तर शिवाजीमहाराजांच्या उलट विजापूरच्या आदिलशाहीस ते मदत करीत असत. खुद्द श्री. केळुस्करांनीं अशीं कांहीं उदाहरणें आपल्या पुस्तकांत दिलीं आहेत. "शिवाजीमहाराजांना महाडाहून परत येतांना पकडण्याची कपटयुक्ति आदिलशहाचा सरदार बाजी शामराज यानें जावळीच्या चंद्रराव मोऱ्यांच्या साहाय्यानें योजिली होती. शहाजी महाराजांना पकडण्याची अधमपणाची युक्ती घोरपड्यानें केली होती." (पान ५६३) मराठे सरदारांची ही आत्मघातकी व स्वराज्यविघातक वृत्ति समर्थांना तीर्थयात्रेहून कृष्णातीरीं आल्यावर तेव्हांच कळली. कांहीं मराठे सरदारांची ही स्वराज्यविघातक वृत्ति नाहींशी काण्याकारितां त्यांनीं "मराठा तितुका मेळवावा। महाराष्ट्र धर्म वाढवावा ॥ ये विषयीं न करितां तकवा। पूर्वज हासती ॥ १ ॥ अमर्याद फितवे खोर। यांचा करावा संहार। शोधला पाहिजे विचार। यथातथ्य

॥ २ ॥ मारितां मारितां मरावें। तेणें गतीस पावावें ॥ फिरोन येतां भोगावें। महद्भाग्य ॥ ३ ॥ देवद्रोही तितुके कुत्ते। मारूनि घालावे परते ॥ देवदास पावती फत्ते। यदर्थी संशय नाहीं ॥ ४ ॥" याप्रमाणें उपदेश करून मराठ्यांना स्वराज्याकारितां—महाराष्ट्रधर्मस्थापनेकारितां महाराजांच्या स्वराज्य-झेंड्याभोंवतीं एकत्र होऊन लढण्याचा उपदेश केला व महाराजांना, तुमच्या स्वराज्यकामीं तुम्हांस यश येईल असें म्हणून उत्तेजन दिलें. याजवरून दुसरा पक्ष म्हणतो, त्याप्रमाणें समर्थ केवळ भक्तिमार्गी संत नव्हते तर त्यांनीं आपल्या ग्रंथांत लोकांना राजकारणांत भाग घेणें हें आपलें कर्तव्य आहे असें सांगून शिवाजीमहाराजांच्या स्वराज्य-प्रयत्नाच्या कामीं साहाय्य केलें हें सिद्ध होतें. परंतु यायोगानें शिवाजीमहाराजांना हीनपणा येतो असें आम्हांस वाटत नाहीं.

पक्ष ३ राः—समर्थांची व महाराजांची भेट शके १५८० नंतर झाली असें या पक्षाचें म्हणणें आहे. श्री. चिं. वि. वैद्य, रे. डेमिंगप्रभृति विद्वान् ग्रंथकार या पक्षाचे आहेत.

प्रथमतः श्री. वैद्य यांच्या म्हणण्याचा विचार करूं. 'मराठी स्वराज्याचे स्थापक शिवाजी' (महाराज) या इंग्रजी पुस्तकाच्या ३३व्या भागांत "शिवाजी व रामदास" याविषयीं श्री. वैद्यांनीं विवेचन केलें आहे:—"When did he come into contact with Shivaji and begin to inspire his political actions ?" भावार्थः—"समर्थांचा व महाराजांचा संबंध केव्हां जडला व महाराजांच्या राजकारणावर त्यांचें वजन केव्हांपासून सुरू झालें ?" असा श्री. वैद्य प्रश्न करतात (पान २५७). नंतर या विषयावर महाराष्ट्रांत दोन पक्ष आहेत, पहिल्या पक्षाचें म्हणणें शिवाजीच्या राजकारणावर समर्थांची छाप अगदीं प्रथमपासून होती असें आहे व दुसऱ्या पक्षाचें म्हणणें महाराजांच्या राज्याभिषेकाच्या पूर्वी थोडे दिवसच दोघांची गांठ पडली असें आहे, असें सांगून श्री. वैद्य म्हणतात, "The truth, according to our view, lies, as usual, in the golden mean. We will discuss these points in short here, relying as before only on contemporaneous documents." (पान २५७।२५८). भावार्थः—आमच्या मतें नेहमींप्रमाणें सत्य हें सुवर्णमध्यबिंदूंत आहे. समकालीन लेखांच्या आधारानें आम्ही या मुद्द्यांचें थोडक्यांत विवेचन करतों. नंतर श्री. वैद्यांनीं दासबोध ग्रंथाच्या आधारें त्यांतील सहावा दशक शके १५८१ (सन १६५९) सालीं लिहिला असें सिद्ध केलें आहे, व अठरावा दशक अफझुलखानमृत्यूनंतर लागलीच खात्रीनें लिहिला असला पाहिजे असें अनुमान काढलें आहे. नंतर समर्थांनीं महाराजांना लिहिलेल्या ओंवीबद्दलचा उल्लेख ते पुढें लिहिल्याप्रमाणें करतातः—"There is also extant a letter, written in verse addressed to Shivaji which, by

its glowing tributes to Shivaji, and by its powerful Marathi, is undoubtedly written by Ramdas, and he complained in his letter that though he resided in his territory, the latter had not yet visited him. " भावार्थः—शिवाय कवितेमध्यें लिहिलेलें हीं एक पत्र आहे. त्यांतील शिवाजीमहाराजांच्या स्तुतिपर वर्णनावरून व जोरदार मराठी भाषेवरून तें पत्र निःसंशय रामदासांनींच लिहिलेलें आहे. " तुमच्या देशांत राहिलों तरी तुम्ही माझी अद्याप गांठ घेतली नाहीं " अशी त्यांत ते तक्रार करतात. श्री. वैद्यांची चुकीची विचारसरणी पुढील वाक्यांत दिसून येतेः— "Shivaji must have gone to Ramdas immediately after; and chapter XVIII contains the instructions then given. It is thus certain that Shivaji first came intc contact with Ramdas in 1660 after the Afzulkhan-event." भावार्थः—" शिवाजीमहाराज नंतर लागलीच रामदासांच्या भेटीस गेले असले पाहिजेत; आणि अठराव्या दशकांत त्या वेळीं महाराजांना केलेला उपदेश आहे, यावरून हें खात्रीनें ठरतें कीं, शिवाजी व रामदास यांचा प्रथम संबंध सन १६६० सालीं झाला. " अफझुलखानाच्या मृत्यूनंतर लागलीच महाराज समर्थांच्या भेटीस गेले व त्या वेळीं समर्थांनीं दासबोधाच्या अठराव्या दशकांतील सहाव्या समासांतील उपदेश महाराजांना समर्थांनीं केला हें आम्हांस मान्य आहे. पण तेवढ्यावरून सन १६६० सालीं अफझुलखानाच्या मृत्यूनंतर शिवाजीमहाराजांची व समर्थांची प्रथम भेट झाली असें खात्रीनें श्री. वैद्य कसें म्हणतात हें आम्हांस समजत नाहीं. ' निश्चयाचा महामेरु ' इत्यादि कविता व पत्र आम्हीं मागें दिलेंच आहे. तें पत्र महाराजांना पोंहचल्यावर ते लागलीच समर्थांच्या भेटीस गेले हें आम्हांसहि मान्य आहे. तें पत्र केव्हां लिहिलें याविषयीं श्री. वैद्य कांहींच लिहीत नाहींत. ते एकदम म्हणतात कीं, महाराज त्या पत्रानंतर लागलीच समर्थांस भेटावयास गेले असले पाहिजेत, त्या वेळीं केलेला उपदेश दासबोधाच्या अठराव्या दशकांत आहे. वरील विधान करण्यांत श्री. वैद्यांच्या समजुतीचा घोटाळा झाला आहे. समर्थांच्या कविताबद्ध पत्रानंतर महाराज समर्थांच्या भेटीस गेले ते शके १५७१ त गेले, शके १५८१ त गेले नाहींत व त्या वेळीं समर्थांनीं महाराजांना केलेला उपदेश दासबोधाच्या १८ व्या दशकाच्या सहाव्या समासांत नसून १३ व्या दशकाच्या सहाव्या समासांत आहे. व तो " लघुबोध " या नांवानें प्रसिद्ध आहे. या मुद्याचा विचार करतांना समकालीन लेखांचाच आम्हीं आधार घेणार आहोंत असें ते म्हणतात. परंतु समर्थ-समाधीनंतर चारच दिवसांनीं लिहिलेल्या समर्थवाकेनिशीचा उल्लेख ही ते करीत नाहींत. अनंत गोपाळ कुडाळकरकृत समर्थवाकेनिशी श्री. वैद्यांच्या दृष्टिपथांत आलीच नाहीं

असें आम्हांस वाटतें. समर्थबाकेनिशी जर श्री. वैद्य वाचून पहातील तर अनुग्रह-कालाचें वर्ष शके १५७१ हेंच खरें मानलें पाहिजे याविषयीं त्यांची खात्री होईल असें आम्हांस वाटतें. कारण त्यांच्याच सिद्धांताप्रमाणें Dates, events and names, when given by contemporary writers, cannot be questioned. भावार्थ—समकालीन लेखकांनीं दिलेल्या तारखा, घटित गोष्टी व नांवें खरीं मानलीं पाहिजेत.

तिसऱ्या पक्षाचे दुसरे अध्वर्यु रे. डेमिंग हे होत. 'रामदास आणि रामदासी' या इंग्रजी पुस्तकाचा तिसरा भाग ' रामदास व शिवाजी ' हा आहे. त्यांत ते म्हणतात:—" There is keen controversy about the date of the meeting between Shivaji and Ramadas, one opinion being that they met in 1649 or thereabouts and the other that they did not meet until 1672. Both positions are fortified by weighty arguments based upon documents and it is a difficult task to decide between them." ( Pp. 57–58 ) भावार्थ—शिवाजी व रामदास यांच्या भेटीच्या कालाविषयीं तीव्र मतभेद आहे. एक पक्ष म्हणतो कीं दोघांची गांठ सन १६४९ या वर्षीं अगर त्या सुमारास झाली; दुसरा पक्ष म्हणतो, कीं ते दोघे सन १६७२च्या पूर्वी एकमेकांना भेटले नाहींत. दोन्ही पक्षांना कागदोपत्री पुराव्याचा आधार आहे. दोन्ही बाजूंच्या लेखी पुराव्यांचा सविस्तर व तपशीलवार विचार करून ते म्हणतात, "The original meeting took place in all probability after 1659...Bhaskar's letter is the most convincing evidence against the early date, although this letter does not preclude the possibility of friendship between Shivaji and Ramadas before the conversation took place. Shivaji may have feigned ignorance, but it is unlikely. The letter stands as impressive evidence against 1649 as the date of meeting." ( P. 70 ). भावार्थ:—" पहिली भेट बहुतकरून सन १६५९ नंतर झाली असावी. पहिल्या कालाच्या ( शके १६४९ ) उलट भास्कर गोसाव्याचें पत्र हा निरुत्तर पुरावा आहे. तरी त्यांतील संभाषणाच्या पूर्वी शिवाजी व रामदास यांच्यामध्यें मैत्री नसेल असें म्हणतां येत नाहीं. शिवाजीनें रामदासाची ओळख नसल्याचें ढोंग केलें असल्याचा संभव आहे. पण तसें बहुतकरून केलें नसावें. सन १६४९ मध्यें भेट झाल्याच्या उलट तें ( भास्कर गोसाव्याचें ) पत्र बळकट पुरावा आहे." सदरहू पत्रांत भास्कर गोसावी हे महाराजांच्या भेटीस गेले असतां समर्थ कोठें राहतात वगैरे प्रश्न केले, त्यांवरून शके १५८० च्या पूर्वी दोघांची भेट झाली नसावी असें अनुमान कांहीं आक्षेपक काढतात, त्याप्रमाणेंच रे. डेमिंग यांनीं ही काढले आहे. त्यांचें सविस्तर खंडन आम्हीं याच भागांत मागें प्रो. भाटे यांच्या म्हणण्यास उत्तर देतांना केलें आहे. रे. डेमिंग भास्कर गोसाव्याच्या पत्रास

आधारभूत मानून दोघांची भेट सन १६५९ नंतर झाली असें म्हणतात तरी त्यांचें निश्चित मत बनलेलें नाहीं. कारण पुढें ते म्हणतातः—
"The exact date, however, remains uncertain in the writer's judgment; and it is quite possible that they met before 1672, granting of course that there was an important public meeting in the year, as the letter shows. As brought out in that letter, Shivaji gave 200 gold coins to the Swami in 1659. During the years 1654-1664, Ramadas had his head-quarters at Shivathar which was only a few miles from Raigad which Shivaji often visited. It is possible that the two may have met or have corresponded during these years of geographical proximity; and it is also reasonable to assume that the two knew a good deal about each other before the actual visit took place; yet though the evidence for the 1672 date is weighty, the writer is not entirely convinced that the matter is definitely settled." ( Pp. 70, 71 ).

भावार्थः—तथापि दोघांची प्रथम भेट केव्हां झाली तो दिवस निश्चितपणें सांगतां येत नाहीं, असें मला वाटतें. सन १६७२ च्या पत्रांत म्हटल्याप्रमाणें त्या दोघांची भेट त्या वर्षी एका जाहीर सभेंत झाली असें मानलें तरी त्यापूर्वी दोघांच्या भेटी झाल्या असण्याचा संभव आहे. त्या पत्रांत दर्शविल्याप्रमाणें शिवाजीमहाराजांनीं सन १६५९ सालीं २०० होन स्वामींना दिले. १६५४ ते १६६४ या दहा वर्षांत रामदासांचें मुख्य राहण्याचें ठिकाण शिवथर होतें. तें रायगडापासून अगदीं थोड्या मैलांच्या अंतरावर आहे. या सान्निध्याच्या काळांत दोघांच्या गांठी पडणें व दोघांमध्यें पत्रव्यवहार होणें संभवनीय आहे. प्रत्यक्ष भेटीपूर्वी दोघांना एकमेकांविषयीं बरीच माहिती होती असें मानणें बुद्धिवादाप्रमाणें युक्त दिसतें. सन १६७२ सालीं दोघांची गांठ पडली असें म्हणण्यास महत्त्वाचा पुरावा आहे. असें आहे तरी हा मुद्दा निश्चयात्मक ठरला आहे असें मला वाटत नाहीं, असें रे. डेमिंगसाहेब म्हणतात. तरी त्यांचा कल भास्कर गोसाव्याच्या शके १५८० च्या पत्रांतील मजकूर खरा मानून दोघांची गांठ त्या वर्षानंतर झाली असावी असें म्हणण्याकडे विशेष आहे. शके १५८० मधील भास्कर गोसाव्यांचें पत्र खरें मानलें तरी त्यावरून त्या पत्रापूर्वी दोघांची गांठ पडली नव्हती असें अनुमान काढतां येणार नाहीं असें आम्हीं पूर्वी सिद्ध केलेंच आहे. भास्कर गोसाव्यांच्या पत्रांतील अर्थ लावण्याच्या बाबतींत रे. डेमिंग-साहेबांचा व आमचा मतभेद असला तरी समर्थ व महाराज यांची प्रथम भेट केव्हां झाली या मुद्द्याचें त्यांनीं सर्व बाजूंनीं सविस्तर विवेचन केलें आहे, तें वाचकांनीं मूळ ग्रंथावरून अवश्य वाचावें अशी आमची त्यांना शिफारस आहे.

या पक्षांतील तिसरे अध्वर्यु कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजचे विद्वान् प्रिन्सिपॉल डॉ. बाळकृष्ण हे आहेत. राजाराम कॉलेजच्या मासिकाच्या ज्युबिली अंकामध्यें त्यांनीं "शिवाजी आणि स्वामी रामदास" असा एक इंग्रजी भाषेंत निबंध लिहिला आहे. त्यांनीं ही प्रो. भाटे व श्री. केळुस्कर यांच्याप्रमाणें भास्कर गोसावी व केशव गोसावी यांच्या पत्राचा अर्थ करून समर्थ व शिवाजी महाराज यांची भेट शके १५९४ सालीं झाली असें आपलें मत दिलें आहे. सदरहू मताचें खंडन आम्हीं याच भागांत पूर्वी केलें आहे. वरील इंग्रजी निबंधांत समर्थ-शिवाजींची भेट शके १५७१त झाली नसावी याविषयीं डॉक्टरसाहेब आणखी कांहीं गोष्टींचा उल्लेख करतात त्यांचा आतां विचार करूं. तुकाराममहाराजांनीं शिवाजीमहाराजांना एक अभंगबद्ध पत्र पाठवून त्यांत रामदासांनाच गुरु करा असें म्हटलें होतें ते अभंग प्रक्षिप्त आहेत असें डॉक्टरसाहेब म्हणतात. त्याचें कारण ते देतात तें चमत्कारिक आहे असें आम्हांस वाटतें. डॉ. बाळकृष्ण म्हणतात:—(*a*) Ramdas was always staying in the woods himself. Hence all the stories about the meeting of this trinity consisting of Tukaram, Ramdas and Shivaji are untrue. अर्थ:–रामदास नेहमीं अरण्यांत राहत असत. म्हणून या त्रैमूर्तींच्या म्हणजे तुकाराम, रामदास व शिवाजी यांच्या भेटी खऱ्या नसल्या पाहिजेत. अरण्यांत राहणें आणि भेटी न होणें यांचा काय संबंध आहे तें आम्हांस कळत नाहीं. शके १५९४ नंतर ही समर्थ अरण्यांत राहत होते, तेव्हां मात्र शिवाजीमहाराजांना भेटीस जाणें अशक्य नव्हतें व १५७१ सालीं अशक्य होतें असा डॉक्टरसाहेबांच्या म्हणण्याचा रोख दिसतो. त्यांच्या म्हणण्यांत काय कार्य-कारण-भाव आहे हें आम्हांस समजत नाहीं. (*b*) The institution of the Asta-Pradhanas definitely mentioned in Tukaram's letter had not been established by Shivaji in 1645 or even later, या मुद्याचें आम्हीं मागें खंडन केलें आहे. (*c*) The Swami could not have been so famous by 1645 as to deserve the high praise of Tukaram. अर्थ:–सन १६४५ मध्यें तुकारामांनीं स्वामींची स्तुति करण्याइतके ते प्रसिद्ध नसावेत.

शके १५६६ मध्यें समर्थ माहुलीस आले तेव्हां त्यांच्या तपश्चर्येची, तीर्थयात्रेची व प्रखर वैराग्याची माहिती आसपासच्या भागांत पसरून जयरामस्वामी, आनंदमूर्ति, रंगनाथस्वामी, तुकाराम महाराज, मोरया देव हे त्यांना माहुली व जरंडा येथें भेटण्यास आले होते. देहू व माहुली यांच्या मध्यें अंतर कांहीं काशी-रामेश्वराइतकें नाहीं. ३० । ४० कोसांच्या अंतरावर प्रख्यात साधु आल्याची बातमी कर्णोपकर्णी सहज कळते. साधूंना प्रख्यात होण्यास फार काळ लागतो ही डॉक्टरसाहेबांची कल्पना चुकीची आहे. शिवाय तुकारामांनीं समर्थांना पाठविलेलें

पत्र महाराजांच्या अनुग्रहानंतरचें म्हणजे समर्थ माहुलीस आल्यानंतर पांच वर्षांनंतरचें आहे. श. १५६६-१५७१ या काळांत समर्थांनीं ११ मारुति स्थापन केले होते व त्यांची कीर्ति सर्व महाराष्ट्रांत झाली होती. तेव्हां तुकारामांनीं समर्थांची स्तुति शके १५७१ सालच्या अभंगांत केली यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहीं नाहीं.

(*d*) Shivaji was merely a young boy of 15 years at the time the said letter must have been written and he had not made any conquest as yet. So he could not have been addressed by Tukaram. सदरहू पत्र लिहिलें तेव्हां शिवाजी पंधरा वर्षांचा मुलगा होता. त्यानें तोंपर्यंत कोणताही प्रांत जिंकला नव्हता, तेव्हां तुकारामांनीं तें पत्र लिहिणें शक्य नाहीं. मूळ निबंधांत 'by the Swami' असें चुकून छापलें आहे. शके १५७१ सालीं शिवाजीमहाराज १५ वर्षांचे होते असें डॉक्टरसाहेब म्हणतात तें खरें नाहीं. जुन्या जन्मतिथीप्रमाणें २२ वर्षांचे होते व नव्या जन्मतिथीप्रमाणें १९।२० वर्षांचे होते. तेव्हां त्यांनीं चाकण, राजगड व पुरंदर वगैरे पांच सहा किल्ले काबीज करून स्वराज्यस्थापनेस आरंभ केला होता. तेव्हां तरुण वयांत साहसानें, पराक्रमानें व युक्तिप्रयुक्तीनें ५।६ किल्ले काबीज करून पूर्वींची वडिलार्जित जहागीर मिळवून स्वराज्यस्थापनेस आरंभ केल्यामुळें तुकारामांनीं अभंगांत महाराजांची स्तुति केली हें साहजिकच आहे. त्यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहीं नाहीं. पुढें डॉक्टरसाहेब म्हणतात—

"Tuka says:—Let there be happiness to the King and his sons. He should go to a good preceptor for protection. Tukaram's advice that Shivaji who was a boy of 15 years only, should become the devotee of Ramdas is out of place here, since the latter was almost a nonentity before 1645. Moreover the boy's age precluded him from understanding the subtleties of religion; he was neither a king nor had he any sons and besides Shivaji did not know anything of Ramdas till 1659. Hence this letter is a pure fabrication and cannot be trusted."

वरील उताऱ्यांतील सर्व गोष्टी आक्षेपार्ह आहेत. प्रथमत: 'Let there be happiness to the King and his sons' म्हणजे राजाचें व त्याच्या पुत्रांचें कल्याण असो, असा उल्लेख तुकारामांच्या अभंगबद्ध पत्रांत नाहीं. या पत्रांत पांच अभंग महाराजांना उद्देशून आहेत. एक अष्टप्रधानांना उद्देशून आहे. पांचव्या अभंगाच्या शेवटीं "तुका म्हणे राया तुला असो कल्याण। सद्गुरु शरण राहें बापा॥" असें आहे. तुकारामांनीं महाराजांना पत्र लिहिलें त्या वेळीं महाराजांचें वय १५ वर्षांचें होतें व तेव्हां समर्थांची प्रख्याति झाली नव्हती, या मुद्याचें खंडन आम्हीं वर केलेंच आहे. महाराजांचें वय लहान होतें म्हणून त्यांना धर्माचें रहस्य त्या वेळीं

कळण्यासारखें नव्हतें असें डॉक्टरसाहेब म्हणतात. महाराजांना बालवयांत त्यांच्या मातोश्रींनीं रामायण, महाभारतांतल्या गोष्टी सांगून त्यांना त्यांतील धर्म, नीति, न्यायाच्या गोष्टी सांगितल्या होत्या असें इतिहास साक्ष देतो. तेव्हां २२व्या किंवा १९।२०व्या वर्षी महाराजांना समर्थांकडे उपदेश घेण्यास जाण्यास तुकारामांनीं सांगितलें असल्यास त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं आहे असें आम्हांस वाटत नाहीं. समर्थ बाराव्या वर्षी लग्नांतून पळून गेले. आद्य शंकराचार्यांना लहान वयांतच ज्ञान प्राप्त होऊन त्यांनीं भाष्यासारखे गहन ग्रंथ लिहिले. ज्ञानदेवांनीं भावार्थ-दीपिकेसारखा ग्रंथ अठराव्या वर्षी लिहिला, हें डॉक्टरसाहेबांना माहीत नसावेंसें दिसतें. ज्ञानप्राप्तीविषयीं सामान्य मनुष्याचे नियम थोर मनुष्यास लावणें योग्य नाहीं. "तेजसां हि न वयः समीक्ष्यते" ही रघुवंशांतील कालिदासांची प्रसिद्ध उक्ति अलौकिक मनुष्यांना लागू पडते. पुढें डॉक्टरसाहेब म्हणतात:—"And besides Shivaji did not know anything of Ramadas till 1659." समर्थ व शिवाजीमहाराज यांची गांठ केव्हां पडली हा मुख्य मुद्दा आहे. शके १५७१ सालीं दोघांची गांठ पडली, असें एका पक्षाचें म्हणणें आहे. शके १५८१ (सन १६५९) सालापूर्वी महाराजांना समर्थांची माहिती नव्हती, असें डॉक्टरसाहेबांच्या पक्षाचें म्हणणें. पहिला पक्ष आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ शके १५७१ सालीं तुकारामांनीं महाराजांना लिहिलेलें पत्र पुराव्यास दाखल करतो व तें पत्र खरें नसलें पाहिजे असें सिद्ध करण्याकरितां डॉक्टरसाहेब म्हणतात कीं, "सन १६५९ पूर्वी महाराजांना समर्थांची माहिती नव्हती, म्हणून तें पत्र खरें नव्हे." परंतु तुकारामांचें पत्र खरें नव्हे हें सिद्ध करण्याकरितां प्रथम सन १६५९च्या पूर्वी महाराजांना समर्थांची माहिती नव्हती हें सिद्ध केलें पाहिजे होतें. डॉक्टरसाहेबांच्या तर्कपद्धतींत "argument in circle" हा दोष आहे.

पक्ष चवथा:—शिवाजीमहाराजांना स्वराज्याची स्फूर्ति समर्थ कृष्णातीरीं येण्यापूर्वीच झाली होती. दोघांची प्रथमभेट शके १५६७ सालीं मसूर येथें रामनवमी उत्सवांत झाली. महाराजांना अनुग्रह शके १५७१ सालीं शिंगणवाडी येथें झाला. समर्थ राजकारणी संत होते. प्रसंगविशेषीं महाराज राजकारणांत त्यांचा सल्ला घेत असत. महाराजांना स्वराज्यस्थापनाची स्फूर्ति समर्थांच्या भेटीपूर्वीच झाली होती, तरी भेटीनंतर राजधर्म व क्षात्रधर्म सांगून त्यांना समर्थांनीं त्या कामीं प्रोत्साहन दिलें.

समर्थ केवळ भक्तिमार्गी संत नव्हते, ते राजकारणी संत होते, हें तिसऱ्या पक्षांतील श्री. वैद्य व रे. डेमिंगसाहेब प्रभृतींना ही मान्य आहे. प्रसंगविशेषीं महाराज समर्थांचा राजकारणांत सल्ला घेत असत, हें ही त्यांना मान्य आहे. फक्त त्यांचें म्हणणें असें आहे कीं, दोघांची प्रथमभेट सन १६६० नंतर झाली असावी. या म्हणण्याचें खंडण आम्हीं वर केलेंच आहे.

पहिल्या पक्षांत व चवथ्या पक्षांत मोठा भेद महाराजांना स्वराज्यस्फूर्ति कोणापासून झाली या मुद्यावर आहे. पहिल्या पक्षांतील लोक प्रत्यक्ष रीतीनें महाराजांना स्वराज्यस्फूर्ति समर्थांपासून झाली असें प्रतिपादन करीत नाहींत. समर्थ महाराजांचे गुरु होते, दर गुरुवारीं ते समर्थांच्या भेटीस जात व राजकारणाचा सल्ला विचारीत होते असे त्या पक्षाच्या लोकांनीं लिहिलेल्या बखरींत उल्लेख आहेत. तेव्हां समर्थांनीं महाराजांच्या मनांत स्वराज्यस्फूर्ति उत्पन्न केली असें त्यांच्या लिहिण्यावरून त्यांचें मत दिसतें, असा त्यांच्यावर दुसऱ्या पक्षाचा आरोप आहे. अलीकडे उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक पुराव्यावरून समर्थ कृष्णातीरीं येण्यापूर्वींच महाराजांनीं स्वराज्यस्थापनेस जोरानें आरंभ केला नसला तरी त्यांच्या मनांत स्वराज्याची स्फूर्ति झाली होती, त्याप्रमाणें ते निरनिराळ्या किल्ल्यांवर जाऊन तेथील अंतःस्थिति पहात होते, मावळे लोकांशीं स्नेह संपादन करून त्यांस स्वराज्याचें बाळकडू पाजीत होते, हिरडोशीच्या पुरातन स्वयंभू महादेवाच्या देवालयांत त्यांनीं कांहीं मावळ्यांकडून हिंदवी स्वराज्य स्थापण्याबद्दल शपथा घेतल्या होत्या असें ऐतिहासिक पुराव्यावरून सिद्ध झालें आहे. " शके १५६२ त पुणें प्रांतीं शिवाजी, जिजाबाई व दादाजी कोंडदेव गेल्यानंतर शिवाजीनें बारा मावळें काबीज केलीं, राजगड किल्ला बांधला व तोरणा हातीं घेतला." असें कै. राजवाडे म्हणतात (प्रस्तावना, राधामाधवविलास-चंपू, पान ८४). " पुढें शिवाजी वयांत येऊं लागला, आपल्या कह्यांत वागेना, त्याची स्वतंत्रतेची इच्छा अनावर झाली, असें पाहून दादोजीनें इ. स. १६४३ त (शके १५६५ त) जहागिरीचें सर्व काम त्याजवर सोंपविलें." (पान १२, श्रीमंत पंतअमात्य, सं. बावडा, यांचें वंशवृत्त). म्हणजे समर्थ कृष्णातीरीं येण्या-पूर्वींच एक वर्ष शिवाजीमहाराजांनीं दादोजी कोंडदेवाकडून आपली जहागीर आपल्या ताब्यांत घेतल्यावर स्वराज्यस्थापनेच्या कार्यास अल्पस्वल्प आरंभ केला होता हें सिद्ध होतें. समर्थ कृष्णातीरीं शके १५६६ सालीं आले आणि नंतर चारपांच वर्षांत म्हणजे शके १५७१ चे पूर्वी महाराजांनीं राजगड बांधला व तोरणा, पुरंदर, चाकण व सिंहगड हे किल्ले घेतले. या कालांत समर्थांची व शिवाजीची भेट एकदां शके १५६७ सालीं झाल्याचा दासविश्रामधामांत उल्लेख आहे (वर्ग १७, ओंवी ११२). परंतु शके १५६७ सालीं समर्थशिवाजींची गांठ पडली होती, असें ऐतिहासिक पुराव्यावरून सिद्ध झालें, तरी वरील पांच किल्ले घेण्याच्या कामीं महाराजांना समर्थांचें प्रोत्साहन होतें असा पुरावा अद्याप उपलब्ध झालेला नाहीं. महाराजांना समर्थ कृष्णातीरीं येण्यापूर्वी जी स्वराज्यस्फूर्ति झाली होती, तिच्या सिद्ध्यर्थच त्यांनीं वरील पांच किल्ले समर्थ कृष्णातीरीं आल्यावर चारपांच वर्षांत घेतले. शके १५७१ सालीं जेव्हां समर्थांनीं महाराजांना अनुग्रह दिला, ज्या वेळीं समर्थांनीं

महाराजांना राजधर्म व क्षात्रधर्म सांगितला, त्या वेळीं व नंतर प्रसंगविशेषीं भेटीचे वेळीं दोघांचें राजकारणाविषयीं बोलणें झालें असलें पाहिजे. तें टिपून घेणारा बॉस्वेल त्या वेळीं तेथें नव्हता हें आमचें दुर्दैव होय. परंतु तें बोलणें कोणत्या प्रकारचें झालें असावें याची कांहीं कल्पना राजधर्म व क्षात्रधर्म यांत केलेल्या उपदेशावरून येते. स्वराज्यस्थापनेचा महाराजांचा धाडशी प्रयत्न होता. त्यांच्या पराक्रमी वडिलांकडून तसा प्रयत्न उघडपणें करण्याचें धैर्य झालें नाहीं; थोडेंबहुत सैन्य बाळगून असणारे मोरे व घोरपडे प्रभृति सरदार महाराजांच्या प्रयत्नास उघडपणें विरोध करीत होते. अशा वेळीं समर्थासारखा तेजस्वी सत्पुरुष, " मराठा तितुका मेळवावा। महाराष्ट्र-धर्म वाढवावा।। येविषयीं न करितां तकवा। पूर्वज हासति ।। १ ।। मारितां मारितां मरावें। तेणें गतीस पावावें। फिरोन येतां पावावें। महद्भाग्य ।।२।। देशद्रोही तितुके कुत्ते। मारून घालावे परते।। देवदास पावती फत्ते। यदर्थीं संदेह नाहीं ।। ३ ।।" अशी उपदेशाची कंठरवानें घोषणा करणारा राजकारणी संत आपणांस सद्गुरु मिळाला हें पाहून महाराजांना किती तरी आनंद वाटला असेल याची कल्पनाच केली पाहिजे. 'या दोघां महापुरुषांची गांठ पडल्यावर कालिदासानें म्हटल्याप्रमाणें "पवनाग्निसमागमो ह्ययम्। सहितं ब्रह्म यदस्त्रतेजसा"—ब्रह्मतेजाची व क्षात्रतेजाची गांठ पडणें म्हणजे वारा व अग्नि यांची गांठ पडण्याप्रमाणें आहे अशी स्थिति झाली. समर्थांची गांठ पडल्यावर महाराजांना अंगीकृत कार्यांत यश येईल असें समर्थांनीं त्यांना सांगितल्यावर महाराजांना हुरूप येऊन त्यांनीं स्वराज्य-स्थापनेच्या कामास अधिक जोरानें सुरुवात केली. समर्थांच्या आशीर्वादानें स्वराज्य-स्थापनेच्या कामांत यश येत गेलें असा स्पष्ट उल्लेख ही राजांनीं समर्थांना दिलेल्या सनदेंत आहे. ( परिशिष्ट अ ).

महाराजांना स्वराज्य स्थापण्याची स्फूर्ति समर्थ कृष्णातीरीं येण्यापूर्वी झाली, तशी समर्थांना ही स्वधर्मसंस्थापनेची स्फूर्ति व त्याप्रीत्यर्थ स्वराज्यस्थापनेची आवश्यकता कृष्णातीरीं येऊन महाराजांची गांठ पडण्यापूर्वीच झाली होती. तीर्थयात्रे-करितां बारा वर्षे सर्व भरतखंडांत प्रवास करीत असतांच, हिंदूंचीं देवालयें पाडणें, हिंदूंच्या देवतांचा उच्छेद करणें, हिंदूंच्या स्त्रिया भ्रष्ट करण्याकरितां त्यांजवर बलात्कार करणें, हिंदूंना परधर्म स्वीकारण्याकरितां नाना प्रकारें छळणें वगैरे गोष्टी समर्थांना दिसून आल्या हात्यो. त्यांचें हृदयस्पर्शी वर्णन त्यांनीं 'अस्मानीसुल-तानी' व 'परचक्रनिरूपण' या स्फुट प्रकरणांत केलेलें मागें दिलेंच आहे. तेव्हां परधर्मीयांच्या वरील गोष्टींस आळा घालण्याकरितां संघटना करणें जरूर आहे, असें त्यांना वाटून त्यांनीं तीर्थयात्रा करीत असतांनाच काशी, मथुरा, हरिद्वार वगैरे ठिकाणीं मठ स्थापून तथ योग्य शिष्यांची नेमणूक केली. कृष्णातीरीं आल्यावर समर्थ पुन्हा उत्तर हिंदुस्थानांत गेले नाहींत; तेव्हां उत्तर हिंदुस्थानांतील मठ-

स्थापना कृष्णातीरीं येण्यापूर्वीच त्यांनीं केली होती. तीर्थयात्रा सुरू झाल्यावर प्रथम ते वरील ठिकाणीं गेले तेव्हांच तेथील ठिकाणचे मठ समर्थांनीं शके १५५४ नंतर दोनतीन वर्षांतच स्थापन केले असले पाहिजेत. म्हणजे शिवाजी-महाराज शिवनेरी किल्ल्यावर गंगायमुना तलावाचें मधुर पाणी पिऊन नुकतेच बाल-पणचे खेळ खेळूं लागले होते, त्या वेळीं परधर्मापासून लोकांना परावृत्त करण्याकरितां संघटना करून धर्मसंस्थापना करण्याची स्फूर्ति समर्थांना झाली होती व कृष्णा-तीरीं येण्यापूर्वी ९–१० वर्षें त्यांनीं काशी, मथुरा, हरिद्वार येथें मठस्थापना करून, धर्मसंस्थापनेच्या कामास सुरवात केली होती. तीर्थयात्रा संपविण्यापूर्वीच धर्मसंस्थापना यशस्वी होण्यास स्वराज्यस्थापनेची आवश्यकता आहे, असें त्यांना वाटलें. ते स्वतः ब्रह्मकुलोत्पन्न ब्रह्मचारी असल्यामुळें स्वराज्यस्थापनेस स्वतः पलटणी तयार करण्याच्या भरीस न पडतां क्षत्रकुलोत्पन्न राजा ज्या भागांत स्वराज्याचा प्रयत्न करीत होता तेथें आले व त्याला राजधर्म व क्षात्रधर्म सांगून स्वराज्यस्थापनेच्या कामास उत्तेजन व प्रोत्साहन दिलें व आपल्या ग्रंथानें, वाणीनें व उपदेशानें लोकांना शिवरायाच्या स्वराज्यस्थापनेच्या प्रयत्नास मदत करण्यास प्रवृत्त केलें. इतकेंच नव्हे तर "प्रपंचीं जाणे राजकारण" (दासबोध द. १९. ५.) असा लोकांना उपदेश करून राजकारणांत पडल्याशिवाय खरा प्रपंचच होत नाहीं अशी घोषणा केली. याचें अधिक विवेचन पुढें 'समर्थांचें राजकारण' या भागांत आढळून येईल.

वरील विवेचनावरून समर्थांना स्वधर्मसंस्थापनेची व स्वराज्यस्थापनेकरितां लोकांना राजकारणाचा उपदेश करण्याची स्फूर्ति त्यांची व महाराजांची गांठ पडण्यापूर्वीच झाली होती असें वाचकांना दिसून येईल. तेव्हां प्रो. भाटे, केळुस्कर प्रभृति दुसऱ्या पक्षांतील लोक महाराजांची गांठ पडल्यावर समर्थांनीं आपल्या ग्रंथांत राजकारणावर लिहिण्यास आरंभ केला असें जें म्हणतात तें खरें नाहीं हें वाचकांना कळून येईल. शिवाजीमहाराजांना स्वराज्यस्थापनेची स्फूर्ति समर्थांची गांठ पडण्यापूर्वी झाली असें सिद्ध झाल्यानें समर्थांच्या मोठेपणास कांहीं बाध अगर हीनपणा येत नाहीं व शिवाजीमहाराजांनीं स्वयंस्फूर्तीनें सुरू केलेल्या स्वराज्य-स्थापनेच्या कार्यास समर्थांच्या भेटीनंतर त्यांनी प्रोत्साहन दिलें असें सिद्ध झाल्यानें महाराजांच्या मोठेपणास ही बाध अगर हीनपणा येत नाहीं. या दोन्ही ही विभूति इतक्या थोर आहेत कीं, दोघांची गांठ आयुष्यांत कधींच पडली नव्हती असें ऐतिहासिक पुराव्यावरून सिद्ध झालें तरी दोघे ही आपआपल्या अलौकिक कृत्यांनीं इतिहासामध्यें अजरामर राहतील. "आपल्याच जातीला महत्त्व देण्यासाठीं या दोन महापुरुषांपैकीं एक दुसऱ्याहून मोठा असा विनाकारण वाद उत्पन्न करणें कोणत्या ही दृष्टीनें हल्लींच्या काळीं इष्ट नाहीं." असें प्रो. भाटे यांनीं आपल्या पुस्तकांत शेवटीं केलेलें विधान आम्हांस मान्य आहे. ते म्हणतातः—"असल्या

शुष्क वादांत न पडतां महाराष्ट्रांत समकालीन उदयास आलेल्या या दोन विख्यात विभूतींच्या चारित्रांपासून हल्लींच्या परिस्थितीला अनुरूप अशा तऱ्हेची देशसेवा करण्याची स्फूर्ति महाराष्ट्रियांस होवो अशी आशा प्रदर्शित करून वाचकांची रजा घेतों. " ( पान ११९ ). आम्ही ही तीच सदिच्छा प्रदर्शित करून समर्थ रामदास व छत्रपति शिवाजीमहाराज यांच्या भेटीचा व अनुग्रहाचा हा भाग संपवितों.

वरील भाग संपवून मुद्रकांकडे पाठविल्यावर प्रो. रा. द. रानडे यांच्या History of Indian Philosophy या इंग्रजी मालेंतील सातवा भाग हातीं आला. त्यांत १८ व्या भागांत समर्थांचें चरित्र दिलें आहे. त्यांत समर्थांच्या व शिवाजी-महाराजांच्या भेटीच्या व अनुग्रहाच्या कालासंबंधानें प्रो. रानडे म्हणतातः—It is highly probable that the earlier date is the more correct one. भावार्थ:–वादांतील भेटीच्या दोन शकांपैकीं म्हणजे शके १५७१ व शके १५९४ या शकांपैकीं पहिला शक म्हणजे १५७१ हा शकच बरोबर आहे, हीच गोष्ट अधिक संभवनीय आहे. कै. लोकमान्य टिळक, शि. म. परांजपे, वि. का. राजवाडे, वासुदेवशास्त्री खरे, द. बा. पारसनीस, श्री. सरदार मेहेंदळे, श्री. शं. श्री. देव, श्री. न. चिं. केळकर, प्रो. कृ. पां. कुळकर्णी, प्रो. रा. द. रानडे, प्रो. पोतदार, प्रो. चाफेकर, श्री. ना. गो. चापेकर, श्री. बाबासाहेब देशपांडे प्रभृति मंडळी या पक्षाची आहेत.

---

# भाग ७ वा
# समर्थांचे ग्रंथ

आम्हां-तुम्हास भववारिधिमाजि तारूं ।
जें वाचितां परिसतां मग होय तारू ॥
ते दासबोध-रचना घडली जयाला ।
वंदूं निरंतर तया गुरुराजयाला ॥ १ ॥

—रघुनाथ-पंडित

मनाचीं शतें ऐकता दोष जाती ।
मतीमंद ते साधना योग्य होती ॥
चढे ज्ञान वैराग्य सामर्थ्य अंगीं ।
म्हणे दास विश्वासतां मुक्ति भोगी ॥ २०५ ॥

—मनोबोध

समर्थांच्या जन्मापासून म्हणजे शके १५३० पासून त्यांचा शिवाजीमहाराजांना अनुग्रह होईपर्यंत म्हणजे शके १५७१ पर्यंत ४१ वर्षांची म्हणजे त्यांच्या आयुष्यांतील निम्यापेक्षां थोड्याशा अधिक भागांतील मुख्य मुख्य गोष्टींची माहिती यथाक्रम मागील पांच भागांत दिली आहे. समर्थांच्या आयुष्यांतील बाकी राहिलेल्या तीस वर्षांची माहिती यथाक्रम देण्यापूर्वी या भागांत समर्थांच्या ग्रंथांविषयीं आम्ही विवेचन करणार आहों. समर्थांनीं लहानथोर अनेक काव्य-ग्रंथ लिहिले. परंतु विशिष्ट ग्रंथ अमक्या ठिकाणीं, अमक्या वर्षी, अमक्या महिन्यांत संपविला असा उल्लेख त्यांनीं कोणत्या ही ग्रंथांत केलेला नाहीं. त्यामुळें त्यांनीं असुक ग्रंथ असुक संवत्सरीं समाप्त केला असें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. ज्ञानेश्वरीच्या अठराव्या अध्यायाच्या शेवटीं श्रीज्ञानदेव म्हणतातः—" शके बाराशें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें । सच्चिदानंद बाबा आदरें ॥ लेखकू जाहला ॥ " ( अध्याय १८, १८२१ ) ज्ञानेश्वरमहाराजांप्रमाणें समर्थांनीं दासबोध, मनोबोध, रामायणप्रभृति ग्रंथांच्या शेवटीं ग्रंथसमाप्तीचा काल कां दिला नाहीं तें समजत नाहीं. समर्थांच्या पूर्वी तीनशें वर्षांमागें ज्ञानदेवकालीं ग्रंथसमाप्तीचा काल देण्याची पद्धत होती, एवढेंच नव्हे तर जवळजवळ समर्थजन्मापर्यंत तशी पद्धति होती. समर्थजन्माच्या पूर्वी फक्त अठरा वर्षेंच श्रीएकनाथमहाराजांनीं ज्ञानेश्वरीची शुद्ध प्रत तयार केली. त्या प्रतीच्या शेवटीं नाथमहाराज म्हणतातः—" श्री. शके पंधराशें बारोत्तरीं । तारण नाम संवत्सरीं ॥ एकाजनार्दनें अत्यादरीं । गीता

ज्ञानेश्वरी प्रति शुद्ध केली ॥" ज्ञानेश्वर, एकनाथप्रभृति संतकवींप्रमाणें समर्थांनीं आपल्या ग्रंथाच्या शेवटीं ग्रंथसमाप्तीचा काल दिला असता तर त्यांनीं कोणता ग्रंथ केव्हां लिहिला हें समजण्यास उत्तम साधन झालें असतें. आतां केवळ अनुमानानेंच ग्रंथकाल ठरविणें भाग पडत आहे. कांहीं प्रासंगिक स्फुट कविता कोठें केली हें समजण्यास मार्ग आहे. परंतु ती कविता अमुक संवत्सरांतच केली हें समजण्यास मार्ग नाहीं. चवथ्या भागांत आम्हीं असें म्हटलें आहे कीं, कांहीं करुणाष्टकें समर्थांनीं पंचवटींत तपश्चर्याकालीं केलीं, कारण एका करुणाष्टकांत ते म्हणतातः— "जनस्थान गोदातटीं वास केला । प्रभू देखिला दास संतुष्ट झाला ॥" परंतु तपश्चर्येच्या बारा वर्षांपैकीं कोणत्या वर्षी त्यांनीं सदरहु अष्टक केलें हें निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. मागें चवथ्या भागांत म्हटल्याप्रमाणें करुणाष्टकें ही समर्थांची पहिली कविता होय. नंतर 'अस्मानीसुलतानी,' 'परचक्रनिरूपण' वगैरे कांहीं थोडी स्फुट कविता त्यांनीं तीर्थयात्रेच्या कालांत लिहिली असली पाहिजे असें त्याच भागांत तीर्थयात्रेविषयीं लिहितांना आम्हीं म्हटलें आहे. बाकी सर्व कविता समर्थांनीं कृष्णातीरीं आल्यावर शके १५६६ ते शके १६०३पर्यंतच्या कालांत लिहिली आहे. कृष्णातीरीं आल्यावर पहिलीं चार पांच वर्षें मारुति स्थापन करण्यांत व रामउत्सव सुरू करण्यांत गेलीं. त्या कालांत त्यांना कविता करण्यास फारसा वेळ सांपडला नसावा. सदर कालांत त्यांनीं जुना दासबोध ( एकवीस समासी ) हा छोटा ग्रंथ त्या कालांत झालेल्या शिष्यमंडळींकरितां लिहिला असावा. पुढें शिष्यसंप्रदाय उत्तरोत्तर जास्त जोरानें वाढूं लागला व चाफळ येथें राममंदिर स्थापन केल्यावर समर्थांना थोडीबहुत विश्रांति मिळूं लागली, तेव्हां त्यांनीं ग्रंथराज दासबोध लिहिण्यास सुरुवात केली असावी. यास लेखी पुरावा कांहीं प्राचीन समर्थचरित्रांतून मिळतो. शके १५७१ सालीं दिवाकरगोसावी शिवाजीमहाराजांना घेऊन चाफळहून शिंगणवाडीस जेव्हां गेले, तेव्हां कल्याणस्वामी समर्थांजवळ होते व दासबोधलेखनाचें काम चाललें होतें असा उल्लेख ह. स्वा.च्या बखरींत आहे (पान १०८). त्यावरून दासबोधलेखनाचें काम शके १५७१ च्या पूर्वी, निदान त्या वर्षी वैशाख महिन्यांत सुरू झालें असावें असें दिसतें. शके १५७१ सालीं समर्थांनीं महाराजांना अनुग्रह दिला त्या वेळीं 'लघुबोध' सांगितला, (ह. स्वा. बखर, पान ११०) तो लघुबोध दासबोधाच्या तेराव्या दशकांतील सहावा समास होय. महाराजांना अनुग्रह दिला तेव्हां दासबोधलेखनाचें काम तेराव्या दशकाच्या सहाव्या समासापर्यंत आलें होतें, कां अनुग्रहकालीं सांगितलेला लघुबोध पुढें तेराव्या दशकांत घातला हें समजण्यास मार्ग नाहीं. दासबोधाचें काम शके १५७१ पासून शके १५८१ पर्यंत चाललें होतें याबद्दल दोन लेखी पुरावे आहेत. शके १५७७ सालीं इंदूर-बोधन येथील मठांतून उद्धव गोसावी यांनीं

समर्थांना एक पत्र पाठविलें होतें, त्यांत ते म्हणतातः—" नल वाटे अंतरीं त्वां वसावें । तुझ्या दासबोधालि त्वां बोधवावें ॥ " दासबोधाचे दशक जसजसे समर्थ संपवीत तसतसे शिष्यमंडळी त्या दशकांच्या नकला करून घेत असत. तेव्हां शके १५७७ पर्यंत लिहिलेले दशक उद्धवांपाशीं असले पाहिजेत. त्या दशकांतील कांहीं कठीण भागाला उद्देशून उद्धवांनीं वरीलप्रमाणें लिहिलें असावें असें वाटतें. शके १५७८ सालीं वामन पंडित समर्थांच्या भेटीस आले, त्या वेळीं दासबोध-लेखनाचें काम चाललें होतें, असें त्या वेळीं त्यांनीं समर्थांवर संस्कृत स्तोत्र केलें त्यावरून सिद्ध होतें ( ग्रंथाश्चापि जगत्प्रबोधपटवः संसारमाशंसिनः । ). शके १५८१ सालच्या मार्गशीर्ष महिन्यांत अफझुलखानाच्या मृत्यूनंतर प्रतापगडचें युद्ध यशस्वी झाल्यावर शिवाजीमहाराज समर्थांच्या भेटीस गेले होते, त्या वेळीं अठरावा दशक चालला होता. त्या समयास अनुरूप असा ' उत्तम-पुरुष-निरूपण ' हा समास महाराजांना सांगितला. नंतर त्याच वर्षाच्या म्हणजे शके १५८१ च्या अखेर बाकी राहिलेले समास लिहून दासबोधलेखनाची समाप्ति झाली असावी. त्या वेळीं सर्व ग्रंथाची तपासणी करतांना सहाव्या दशकाच्या चवथ्या समासांत " चार सहस्र सातशें साठी । इतुकी कलियुगाची राहाटी ॥ उरल्या कलियुगाची गोष्टी । ऐशी असे ॥ " ( ६-४-७ ) ही ओंवी व पुढची ओंवी, अशा दोन ओंव्या दासबोधाचा लेखनकाल समजण्याकरितां मागाहून घातल्या असाव्यात असें वाटतें. कारण या दोन ओंव्या काढल्या तरी चवथ्या समासांतील ६ व्या ओंवीचा ९ व्या ओंवीशीं संबंध जुळतो. चवथ्या समासांत प्रारंभीं चार युगांची वर्षसंख्या दिली आहे. तेव्हां गतकलीची वर्षसंख्या देऊन दासबोधलेखनाचा समाप्तिकाल देण्यास सहाव्या दशकाचा समास चवथाच योग्य आहे, असें समर्थांना वाटलें असावें. शके १६०३ सालीं मार्गशीर्ष महिन्यांत कल्याणस्वामी डोमगांवाहून समर्थांस भेटण्यास आले त्या वेळीं समर्थांनीं दासबोधाचा विसावा दशक समाप्त केला व तो दशक कल्याणगोसावी यांनीं लिहिला असा मजकूर ह. स्वा.च्या बखरींत आहे ( पान ४१२ ). असें झालें असल्यास दासबोधाची रचना शके १५७१ पासून शके १६०३ पर्यंत ३२ वर्षे हळुहळू चालली होती, असें मानणें भाग पडतें. ही गोष्ट असंभवनीय दिसते असें मानण्याचें कारण नाहीं. कारण प्रख्यात जर्मन कवि गटे यांच्या ' फॉस्ट ' नांवाच्या उत्तम नाटकाच्या रचनेचें काम साठ वर्षे चाललें होतें असें नुकतेंच त्यांच्या शतसांवत्सरिक पुण्यतिथीच्या उत्सवांत अभिमानानें सांगण्यांत आलें होतें. परंतु दासबोधलेखनाचें काम ३२ वर्षे चाललें असावें असें आम्हांस वाटत नाहीं. तें काम शके १५७१ सालीं सुरू होऊन शके १५८१ सालअखेर संपलें असावें व शके १६०३ सालीं मार्गशीर्षांत कल्याणस्वामी समर्थांना भेटण्यास आले, तेव्हां समर्थांनीं दशकांतील समासांची

अखेर जुळवाजुळव करून कांहीं शोध स्वहस्तें घातले असावेत. कदाचित् त्या वेळीं २०व्या दशकाच्या दहाव्या समासांतील " झालें साधनाचें फळ।" या ओंवी-पासून शेवटच्या बारा ओंव्या लिहून ग्रंथसमाप्ति केली असावी. कारण त्या बारा ओंव्या सांप्रदायिक लोक नित्यनेमाचे समास वाचल्यानंतर अखेर म्हणत असतात. कै. राजवाडे म्हणतात:—" शके १५६६ त समर्थांचें वयमान ३६ होतें. या सुमारास दासबोधाला प्रारंभ होऊन त्याची समाप्ति शके १५८१ त झाली. या ग्रंथाची रचना बरोबर पंधरा वर्षे चालली होती." ( रामदास, पान ८ ). श्री. शंकरराव देव यांचें म्हणणें दासबोध ग्रंथ शके १५८१ या एकाच वर्षांत लिहिला असावा असें आहे.

दासबोधाच्या सहाव्या दशकाच्या चवथ्या समासाच्या ७व्या ओंवींत " चार सहस्र सातशें साठी। इतुकी कलियुगाची राहाटी ॥" असें म्हटलें आहे त्यावरून त्या समासाचा अगर दासबोधलेखनाचा समाप्तिकाल शके १५८१ येतो. हल्लीं ( शके १८५४ सालीं ) गत कली ५०३३ आहे हें पंचांगावरून कळून येईल. त्या वेळीं गतकली ४७६०. असें म्हटलें आहे. म्हणजे त्या गोष्टीस (५०३३—४७६०=) २७३ वर्षे झालीं. १८५४ मधून २७३ वजा केल्यास १५८१ उरतात हें पहिल्या भागांत दिलेंच आहे. श्री. शंकर श्रीकृष्ण देव म्हणतात, " एकंदर दासबोध ग्रंथ शके १५८१ या एका वर्षांतच लिहिला गेला असें आतांपर्यंत झालेल्या पुराव्यावरून अनुमान काढण्यास हरकत नाहीं." ( दासबोध—प्रस्तावना, पृष्ठ ४८, सामान्य विचिकित्सा ). परंतु सामान्य विचिकित्सेच्या आरंभीं श्री. देवांनीं पुढील श्लोक दिला आहे:—" मला वाटतें अंतरीं त्वां वसावें। तुझ्या दास-बोधासि त्वां बोधवावें ॥ अपत्यापरी पाववी प्रेमग्रासा। महाराजया श्रीगुरु रामदासा ॥ १ ॥ ( उद्धवस्वामी )". उद्धवस्वामींनीं हा श्लोक समर्थांना इंदूर-बोधनहून शके १५७७ सालीं पाठविला होता. तेव्हां श्री. देवांचें अनुमान खरें ठरत नाहीं.

दासबोधाच्या शेवटल्या दशकाच्या शेवटल्या समासांत समर्थांनीं लेखन-समाप्तीचा काल दिला नाहीं, त्याप्रमाणें ग्रंथकर्त्याचें म्हणजे आपलें स्वतःचें नांव ही दिलें नाहीं. परंतु दासबोध हा ग्रंथ समर्थांचा आहे कीं नाहीं याविषयीं शंका सन १९२१ पर्यंत कोणाला आली नव्हती. सदर सालीं श्री. विद्यामयूर भय्याशास्त्री देव जामखेडकर यांनीं विविधज्ञानविस्तारांत दोन लेख लिहून समर्थ दासबोधाचे कर्ते नव्हत, समर्थांचीं वचनें संकलित करून त्यांच्या शिष्यांनीं त्यांच्या पश्चात् तो ग्रंथ लिहिला असें प्रतिपादन केलें होतें व त्यास मुख्य आधार म्हणून पुढील विसाव्या दशकाच्या दहाव्या समासांतील ओंवी दिली होती:—" भक्ताचेनि साभिमानें। कृपा केली दाशरथीनें। समर्थ-कृपेचीं वचनें। तो हा दासबोध ॥"

( २०-१०, ३० ) समर्थ आपल्या गुरूंना म्हणजे दाशरथी रामाला 'समर्थ' म्हणत असत, ही सर्वश्रुत गोष्ट ही विद्यामयूर देवांना माहीत नसावी याचें आश्चर्य वाटतें. समर्थ भिक्षा मागतांना " जयजय रघुवीर समर्थ " असें म्हणत ही गोष्ट प्राचीन समर्थचरित्रांत दिली आहे. परंतु ती त्यांनीं वाचलीच नव्हती असें दिसतें. कारण ती वाचली असती तर वरीलप्रमाणें हास्यास्पद विधान त्यांनीं केलें नसतें. महंत अगर शिष्य जेव्हां समर्थांना भेटावयास येत तेव्हां त्यांनीं दासबोधाचें वाचन सूक्ष्म रीतीनें केलें कीं नाहीं, हें पाहण्याची समर्थांची एक विशिष्ट पद्धति होती. दासबोधाच्या हस्तलिखित पोथीचीं पानें विसकटून ते महंत-शिष्यांच्या हातीं देत. तीं पानें लवकर यथाक्रम जुळवून दिलीं तर दासबोधाचें योग्य वाचन केलें, नाहींतर दासबोधाची पूजाच केली असें समर्थ म्हणत; असा मजकूर प्राचीन समर्थग्रंथांत दिला आहे. त्याचप्रमाणें समर्थांच्या अंतकालीं जेव्हां शिष्यमंडळी शोक करूं लागली तेव्हां 'आत्माराम' व 'दासबोध' हे दोन ग्रंथ वाचण्यास त्यांना समर्थांनीं सांगितल्याचा ही उल्लेख प्राचीन चरित्रग्रंथांत आहे. तो उल्लेख असा:—" आत्माराम दासबोध । माझें स्वरूप स्वतःसिद्ध ।। असतां न करावा हो खेद । भक्तजनीं ।।१।। " पण समर्थांचीं चरित्रें वाचण्याचे श्रम घेतो कोण? श्री. भय्याशास्त्री देवांनीं समर्थांचीं पूर्वचरित्रें वाचलीं नाहींत, एवढेंच नव्हे तर समर्थांचे सर्व ग्रंथ ही वाचले नव्हते असें म्हणावें लागतें. ते वाचले असते तर समर्थशिष्यांनीं दासबोध केला असें विधान त्यांनीं केलें नसतें. 'पंचमान' या स्फुट प्रकरणांत समर्थ म्हणतात:—"एकशें बत्तीसा श्लोकीं । साधकें पहाणें बरें।। अध्यात्म शोधणें सर्वै । दासबोधीं समाप्यते ।।२३।।" ( सारासार विचारनिरूपणनाम मान पांचवें ) 'आत्माराम' या स्फुट प्रकरणांत समर्थ म्हणतातः—" दासबोधींचे समासीं । निर्मूळ केलें मीपणासी ।। त्या निरूपणीं वृत्तीसी । पालट दिसेना ।। " विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, श्री. विद्यामयूर देवांनीं वरील विक्षिप्त विधान करण्यापूर्वीं सर्व दासबोध ही सूक्ष्म रीतीनें वाचला नव्हता असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. दासबोधांतील कांहीं समासांत समर्थांनीं " दास म्हणे " असें म्हटलें आहे:—दशक १६ समास १० ३१; द. ११ स. ६. १९; द. ११ स. ७. २२; व एका समासांत " रामदास म्हणे " असें स्पष्ट म्हटलें आहे:—"म्हणोन विवेक आणि वैराग्य। तेचि जाणिजे महद्भाग्य।। रामदास म्हणे योग्य । साधु जाणती ।। ( द. १२. स. ४. २० )." समर्थांवर व समर्थग्रंथांवर टीका करण्यापूर्वीं टीकाकारांनीं समर्थांचे सर्व ग्रंथ व समर्थांचीं सर्व चरित्रें वाचून नंतर टीका करण्यास प्रवृत्त व्हावें अशी आमची त्यांना नम्र विनंति आहे.

दासबोध म्हणजे दासांनीं-समर्थ रामदासांनीं—शिष्यांना ( व शिष्यांच्या द्वारें सर्व महाराष्ट्रीयांना ) केलेला बोध होय. " दासबोध म्हणजे श्रीरामापासून जो

आत्मबोध रामदासांना झाला तोच बोध त्यांनीं या ग्रंथरूपानें मुमुक्षुजनांस सांगितला; म्हणून या ग्रंथाचें नांव दासबोध ठेविलें. " असें श्रीदासबोधगूढार्थ-दीपिकाकार कै. श्री. केशव गणेश आठले म्हणतात. स्वत: समर्थ ग्रंथाच्या समाप्तीच्या वेळीं म्हणतात:--"भक्तांचेनि साभिमानें । कृपा केली दाशरथीनें ।। समर्थकृपेचीं वचनें । तो हा दासबोध ।। ( २०. १०. ३० )" समर्थ रामदास आपल्या गुरूंना म्हणजे दाशरथी रामाला समर्थ म्हणत. जेव्हां दाशरथी रामानें समर्थ रामदासांवर कृपा केली म्हणजे अनुग्रह केला, त्या वेळीं कृपावंत होऊन समर्थ श्रीरामानें जीं वचनें सांगितलीं म्हणजे उपदेश केला, त्या उपदेश-वचनाचें फलच हा दासबोध ग्रंथ होय असें खुद्द समर्थ म्हणतात. त्यावरून गूढार्थ-दीपिकाकारांचें म्हणणें खरें दिसतें. गिरिधरस्वामी आपल्या 'श्रीसमर्थ-करुणा' नांवाच्या ग्रंथांत म्हणतात:—"दास नाम धरूनि निजबोधें। तारिले हे जन बोधुनि बोधें ।। ६९ ।।" म्हणजे रामदासांनीं नुसतें दास हें नांव धारण करून त्यांना त्यांच्या सद्गुरूपासून म्हणजे श्रीरामापासून जो निजबोध झाला होता, त्यांतील बोध जनांला करून त्यांना तारलें. समर्थप्रतापांत ही गिरिधरस्वामी तसेंच म्हणतात:—"श्रीदासबोधीं गुरुवाक्य प्रगट केलें । कर्म उपासना ज्ञानविज्ञान विस्तारिलें ।। ( २. १६ )" दासांनीं म्हणजे रामदासांनीं दासांकरितां म्हणजे श्रीरामाच्या भक्तांकरितां केलेला बोध असा ही दासबोध याचा अर्थ होईल, असें धर्म-भास्कर श्री. विनायक महाराज म्हणतात. "रामदासांनीं महाराष्ट्रांतील गुलाम बनलेल्या लोकांच्या बोधार्थ इतिहासतत्त्वनिरूपणदर्शक केलेला ग्रंथ तो दासबोध" असें इतिहासाचार्य कै. राजवाडे म्हणतात. ( प. इ. प्रस्तावना, पान ३६६ ) ग्रंथमालेंत प्रसिद्ध केलेल्या 'रामदास' या निबंधांत कै. राजवाडे म्हणतात "शके १५५४ म्हणजे इ.स. १६३२ या सालीं नाशकांतील पंचवटीस असतांना, यवनांनीं आक्रमलेल्या महाराष्ट्राचा उद्धार व सनातनधर्माची स्थापना करण्याचा संकल्प समर्थांनीं केला होता. त्या संकल्पाचा मूर्तिमंत अवतार हा दासबोध ग्रंथ होय. " ( पान. ९ ) 'श्रीसमर्थांचा गाथा' या पुस्तकाचे कर्ते श्री. गोसेवक अनंतदास म्हणतात:— "हा ग्रंथ मुख्यत: दासांसाठीं म्हणजे देवदास्य करण्यास उत्सुक झालेल्या परमार्थी जनतेसाठीं आहे. " पूर्वार्धांत मुमुक्षूंचे अवगुण जाऊन विवेक, वैराग्य व सद्भक्ति कशी होईल व उत्तरार्धांत लोकसेवा हीच परमेश्वरसेवा या तत्त्वाचा स्वानुभव घेण्यासाठीं ज्ञानोत्तर कर्म कसें करावें, अध्यात्मज्ञानानें स्वत:चें समाधान झाल्यावर त्या ज्ञानाचा उपयोग लोककल्याणार्थ कसा करावा 'याचें विवेचन केलें आहे असा त्यांच्या म्हणण्याचा आशय आहे.

दासबोधांत कोणत्या विषयाचें प्रतिपादन केलें आहे याचें विवेचन करण्या-पूर्वीं दासबोध ग्रंथ कोणत्या पद्धतीनें लिहिला आहे याविषयीं थोडेंसें विवेचन

करतो. भगवद्गीता ज्याप्रमाणें संवादात्मक आहे त्याप्रमाणें दासबोध ही संवादात्मक आहे. स्वतः समर्थ ग्रंथारंभीं म्हणतात:—"ग्रंथा नाम दासबोध । गुरुशिष्यांचा संवाद ।। (दशक १, स. १. २ )" ग्रंथ गुरुशिष्यसंवादात्मक आहे याची आठवण समर्थांनीं अनेक वेळां दिली आहे. उदाहरणार्थ:—" श्रोतीं व्हावें सावध । विमल ज्ञान बालबोध ।। गुरुशिष्यांचा संवाद । अति सुगम परियेसा ।। ( द. ८, स. १. १ )" दासबोधाच्या प्रत्येक समासाच्या शेवटीं ही " इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे " असा उल्लेख आहे. तेव्हां समग्र दासबोध ग्रंथ गुरुशिष्यसंवादात्मक आहे याविषयीं समर्थ स्वतः दासबोधाच्या प्रत्येक समासांत ग्वाही देत आहेत. परंतु कृष्णार्जुनसंवाद व दासबोधांतील गुरुशिष्यसंवाद यांत फरक आहे. गीतेंत श्रीकृष्णांचे किती श्लोक व अर्जुनाचे किती श्लोक हें नक्की सांगतां येतें, त्याप्रमाणें दासबोधांत समर्थांच्या किती ओंव्या व शिष्यांच्या किती ओंव्या हें सांगतां येत नाहीं. गीतेंत अर्जुन प्रश्न विचारतो व त्याचें उत्तर भगवान् श्रीकृष्ण देतात, तसा प्रकार दासबोधांत नाहीं. दासबोधांतील पहिला दशक 'स्तवना'चा आहे. त्यांत गणेशशारदासद्गुरुप्रभृतींचें स्तवन आहे. परंतु त्यांत शिष्यांनीं गणेशशारदाप्रभृतींविषयीं कुतूहलानें प्रश्न विचारले व समर्थांनीं त्या प्रश्नांचीं उत्तरें दिलीं असा प्रकार नाहीं; स्वतःच समर्थांनीं गणेशशारदाप्रभृतींचें स्तवन केलें आहे. पहिल्या समासांत दासबोध ग्रंथ गुरुशिष्यांचा संवादात्मक आहे असें सांगून पुढल्या नऊ समासांत गणेशशारदादिकांचें स्तवन समर्थांनीं स्वतःच केलें आहे. दुसऱ्या दशकापासून विषयप्रतिपादनास आरंभ झाला आहे.

प्रत्येक विषयाच्या प्रतिपादनाच्या वेळीं शिष्य प्रश्न विचारतो व त्याचें उत्तर समर्थ देतात असा प्रकार आढळून येत नाहीं. दुसऱ्या दशकाच्या आरंभीं पुन्हा गणेशशारदांचें वंदन करून समर्थ म्हणतात, " वंदून सद्गुरुचरण । करून रघुनाथ स्मरण ।। त्यागार्थ मूर्ख-लक्षण । बोलिजेल ।। ( २. १. ३ ) " परंतु शिष्यांच्या विशिष्ट प्रश्नाला उत्तर म्हणून सर्व ग्रंथांत विषयप्रतिपादन नसलें तरी सर्व दासबोध शिष्य अगर श्रोते पुढें बसले आहेत अशी कल्पना करून लिहिलेला आहे, असें दासबोध वाचणाराच्या सहज लक्षांत येतें. " वंदून सद्गुरुचरण " यावर दिलेल्या ओंवीनंतर पुढच्याच ओंवींत समर्थ म्हणतात:—" एक मूर्ख एक पढतमूर्ख । उभय लक्षणीं कौतुक ।। श्रोतीं सादर विवेक । केला पाहिजे ।। (२. १. ४)" स्पष्टीकरणार्थ कांहीं अधिक उदाहरणें देतों:—"श्रोतीं व्हावें सावधान । आतां सांगतों उत्तम गुण । (२. २. ४ ) सावध होऊनि श्रोते जन । ऐका नवविधा भजन ।। ( ४. १. १ ) श्रोते पुसती ऐसें । माया ब्रह्म तें कैसें । श्रोत्यांच्या वक्त्यांच्या मिसें । निरूपण ऐका ।। ( ६. ५. १ ) मागां श्रोतें पुसिलें होतें । दृश्य मिथ्या तरी कां दिसतें ।। याचें उत्तर बोलिजेल तें । सावध ऐका ।। ( ६. ८. १ ) तुम्ही सर्वज्ञ गोसावी ।

माझी शंका फेडावी ।। ऐसा श्रोता विनवी । वक्तयासीं ।। (६. ६. २)" किती एक ठिकाणीं श्रोता अगर शिष्य एकच कल्पिला आहे:—"सकळांचें अंतःकरण एक । किंवा एक नव्हे अनेक ।। ऐसें हें निश्चयात्मक । मज निरूपावें ।। (१०. १. १)" परंतु बहुतेक ठिकाणीं श्रोते अनेक कल्पिले आहेत:—"मागां श्रोतीं आक्षेपिलें । तें पाहिजे निरोपिलें ।। (६. २. १३) मागां श्रोतयांचा पक्ष । कितां दिवसां होतो मोक्ष ।। तेचि कथा श्रोते दक्ष । होऊन ऐका ।। (८. ७. १)" येथें श्रोते म्हणजे समर्थांचा शिष्यगण असाच अर्थ घेतला पाहिजे व पुढें ग्रंथांत अनेक ठिकाणीं **वक्ता** असा शब्द आला आहे त्याचा अर्थ सद्गुरु **समर्थ** असाच घेतला पाहिजे. श्रोते म्हणजे शिष्य व वक्ता म्हणजे गुरु असें मानल्यास "ग्रंथा नाम दासबोध । गुरुशिष्यांचा संवाद ।।" याचा अर्थ मग कसा करावयचा? असा सहज प्रश्न उद्भवतो. वर सांगितल्याप्रमाणें अर्थ केल्यास अनेक श्रोत्यांपुढें समर्थांनीं वक्ता या नात्यानें विविध विषयांवर अनेक प्रवचनें केलीं असा अर्थ होईल. आम्हांस असें वाटतें कीं, समर्थ कृष्णातीरीं आल्यावर प्रथमतः एकादा-दुसरा शिष्य होता त्या वेळीं एका शिष्यानें अध्यात्मिक विषयांवर प्रश्न विचारणें व लागलींच समर्थांनीं उत्तर देणें शक्य व साहजिकच होतें; परंतु उत्तरोत्तर शिष्य-संख्या वाढूं लागली, तेव्हां समर्थांच्या प्रवचनानंतर अगर कदाचित् प्रवचन-काळीं अनेक शिष्यांनीं त्यांना अनेक प्रश्न अगर शंका विचारल्या असल्या पाहिजेत. त्या सर्वांच्या प्रश्नांस अगर शंकांस निरनिराळीं उत्तरें न देतां सर्व शिष्यांना श्रोते कल्पून प्रवचन व प्रश्न संपल्यावर नंतर निरनिराळ्या विषयांवर निरनिराळे समास लिहिले असले पाहिजेत. व नंतर त्या निरनिराळ्या समासांचा एकंदर दासबोध ग्रंथ तयार केला असला पाहिजे. क्वचित्प्रसंगीं प्रश्न संपला कीं, त्याला उत्तर लागलींच दुसऱ्या ओंवींत दिलें आहे. नवव्या दशकाचा पहिला समास वाचला असतां आमच्या या विधानाचें सत्यत्व कळून येईल. "निराकार म्हणजे काय । निराधार म्हणजे काय ।। निर्विकल्प म्हणजे काय । मज निरोपावें ।। (९. १.१)" हा शिष्याचा प्रश्न आहे. त्यास उत्तर पुढील ओंवींतच आहे:—"निराकार म्हणजे आकार नाहीं । निराधार म्हणजे आधार नाहीं ।। निर्विकल्प म्हणजे कल्पना नाहीं । परब्रह्मासी ।। (९. १. २)" हा सर्व समास प्रश्नोत्तर आहे. परंतु सर्व दास-बोधांत हा एकच समास असा प्रश्नोत्तररूपी आहे. बाकी सर्व ग्रंथांतील समासांत शिष्यांनीं पूर्वीं विचारलेले प्रश्न अगर शंका जमेस धरून प्रश्नांचीं उत्तरें दिलीं आहेत व शंकांचें निरसन केलें आहे. कांहीं समास शिष्यांना प्रबंध अगर निबंधरूपानें आज्ञार्थीत सांगितले आहेत:—"आधीं प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थ-विवेका ।। येथें आळस करूं नका । विवेकी हो ।। (१२. १. १)" कांहीं समासांत शिष्यांना विध्यर्थीत उपदेश केला आहे:—"बहुतां जन्माचा शेवट । नरदेह सांपडे

अवचट ॥ येथें वर्तावें चोखट । नीतिन्यायें ॥ ( ११. ३. १ ) कर्म केलेंचि करावें । ध्यान धरिलेंचि धरावें ॥ विवरिलेंचि विवरावें । पुन्हा निरूपण ॥ ( ११. ५. १ ) जाणायाचें सांगतां नये । सांगायाचें नेमस्त नये ॥ समजल्यावीण कांहींच नये । कोणीएक ॥ ( ११. ६. ३ ) हरिकथानिरूपण । नेमस्तपणें राजकारण ॥ वर्तायाचें लक्षण । तें हीं असावें ॥ ( ११. ६. ४ ) " वरील विवेचनांवरून दासबोधांतील "गुरुशिष्यांचा संवाद" याचा अर्थ संकुचित न घेतां अत्यंत व्यापक रीतीनें घेतला पाहिजे हें वाचकांना कळून येईल.

दासबोधांतील दशकांना व समासांना डोमगांव येथील कल्याणस्वामींच्या प्रतींत जीं नांवें दिलेलीं आहेत, त्यांहून निराळा नामनिर्देश गिरिधरस्वामींनीं आपल्या 'ग्रंथान्वय' नामक ग्रंथांत केला आहे. दोन दशकांना व सोळा समासांना त्यांनीं निराळीं नांवें दिलीं आहेत, हें पुढील उताऱ्यावरून दिसून येईल.

| दशक | | कल्याणस्वामीप्रतींतील नांवें | गिरिधरस्वामींनीं दिलेलीं नांवें |
|---|---|---|---|
| १० | | जगज्योती नाम | बीजोद्भव नाम |
| १६ | | सप्ततिन्वय | तत्त्वान्वय नाम |
| दशक | समास | | |
| ३ | १ | जन्मदुःखनिरूपण | गर्भवास |
| ,, | २ | स्वगुणपरीक्षा | द्वितीय संबंध |
| ,, | ३ | ,, | तृतीय संबंध |
| ,, | ४ | ,, | चतुर्थ संबंध |
| ,, | ५ | ,, | वृद्धाप्य |
| ५ | ६ | शुद्धज्ञाननिरूपण | पूर्ण समाधान |
| ७ | ८ | श्रवण ,, | श्रवणमहिमान |
| ,, | ९ | ,, ,, | श्रवणलक्षण |
| १० | २ | आशंका ,, | देहोत्पन्न |
| ,, | ९ | पुरुषप्रकृति | प्रचीतिनिरूपण |
| १३ | ७ | चंचळ नदी | गुप्तगंगा |
| ,, | ८ | अंतरात्माविवरण | गुप्तेश्वर |
| १७ | १ | देवबलात्कार | देवसाक्षात्कार |
| १८ | ५ | करंटपरीक्षा | कष्टपरिहार |
| २० | ४ | आत्मानिरूपण | शिवशक्ति |

शिरगांव मठांतील दत्तात्रयस्वामींची शके १६०६ या वर्षी लिहिलेली प्रत हल्लीं शिरगांव मठाधिपति श्री. आबासाहेब, ग्वाल्हेर येथील त्यांच्या पूर्वजांनीं

तेथें स्थापन केलेल्या मठांत राहतात, त्यांचे जवळ आहे. ती आम्हीं तेथें जाऊन पाहिली. त्या प्रतींत तिसऱ्या दशकाचें नांव **स्वगुणपरीक्षा** याऐवजीं **सगुण-परीक्षा** असें आहे व सतरा समासांचीं नांवें निराळीं आहेत.

| दशक | समास | कल्याणस्वामींची प्रत | दत्तात्रयस्वामींची प्रत |
|---|---|---|---|
| १ | १ | ग्रंथारंभलक्षण | मंगलाचरण |
| ३ | १ | जन्मदुःखनिरूपण | गर्भवासनिरूपण |
| ३ | २–९ | स्वगुणपरीक्षा | सगुणपरीक्षा |
| ७ | २ | ब्रह्मनिरूपण | ज्ञानदर्शन |
| ,, | ७ | साधनप्रतिष्ठा | अलिप्त लक्षण |
| ,, | १० | देहांतनिरूपण | देहातीत लक्षण |
| ८ | ५ | पंचमहाभूतें स्वरूपाकाशभेद | भेदाकाश नाम |
| १० | ४ | बीजलक्षण | गुणनिरूपण |
| ,, | ९ | पुरुषप्रकृति | प्रचीतिनिरूपण |
| ११ | ४ | साराविवेक | विवेकनिरूपण |
| १२ | ३ | भक्तिनिरूपण | देवभक्ति-निरूपण |
| ,, | ९ | यत्नशिकवण | यत्ननिरूपण |
| २० | ४ | आत्मानिरूपण | शिवशक्ति |
| ,, | ६ | आत्मागुणनिरूपण | आत्मनिरूपण |
| ,, | ८ | देहनिरूपण | देहयंत्रनिरूपण |

कल्याणस्वामी व दत्तात्रयस्वामी हे दोघे सख्खे बंधु व दोघे ही समर्थांचे प्रत्यक्ष शिष्य. कल्याणस्वामी दासबोधलेखनास दत्तात्रयस्वामींच्या शिरगांव मठांत केव्हां केव्हां जात असत, असें असतां तेरा समासांच्या नांवांत दोघांमध्यें फरक आहे. गिरिधरस्वामी वेणाबाईचे प्रशिष्य; समर्थांजवळ त्यांचा कांहीं काळ गेलेला होता, असें असतां दोन दशकांच्या व सोळा समासांच्या नांवांमध्यें कल्याणस्वामी व गिरिधरस्वामी यांमध्यें फरक आहे. तेव्हां दासबोधांतील दशकांचीं व समासांचीं नांवें खुद्द समर्थांनीं दिलीं कीं त्यांच्या शिष्यांनीं दिलीं ? खुद्द समर्थांनीं नांवें दिलीं असतील तर त्यांच्या प्रत्यक्ष शिष्यांच्या व प्रशिष्यांच्या प्रतींत फरक कां असावा, अशी शंका कित्येकांना येण्याचा संभव आहे. परंतु वीस दशकांपैकीं दोन दशकांत व दोनशें समासांपैकीं १३।१४ समासांतच्या नांवांमध्यें फरक आहे; तेव्हां मूळ नांवें समर्थांनींच दिलीं असलीं पाहिजेत. थोड्या ठिकाणीं जो नांवांत फरक आहे, तो अखेर तपासणीच्या वेळीं समर्थांनींच सांगितला असावा व तो कांहीं प्रतींत घेतला नसावा असें आम्हांस वाटतें.

आतां दासबोधांतील विषयांकडे वळूं. ग्रंथारंभीं समर्थ म्हणतात:— "नवविधा भक्ति आणि ज्ञान । बोलिलें वैराग्याचें लक्षण ।। बहुधा अध्यात्मनिरूपण । निरूपिलें ।। "(१·१·२) म्हणजे नऊ प्रकारची भक्ति, ज्ञान व वैराग्याचीं लक्षणें देऊन बहुधा अध्यात्माचें निरूपण केलें आहे. 'बहुधा' या शब्दानें दासबोधांत बव्हंशानें अगर विशेषत: अध्यात्म-निरूपण केलें आहे व कांहीं समासांत प्रसंगानुसार अध्यात्मेतर विषयांचें म्हणजे प्रपंच, व्यवहार, राजकारण इत्यादि विषयांचें विवेचन केलें आहे हें सूचित केलें आहे. अध्यात्मनिरूपण हा जरी दासबोधांतील मुख्य विषय आहे, तरी प्रसंगविशेषीं प्रपंच, व्यवहार, राजकारण या विषयांचा ही अधिकारी शिष्यांना समर्थांनीं उपदेश केला आहे. "मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण ।। तिसरें सावधपण । सर्वविषयीं (११.५.४) "चौथा अत्यंत साक्षेप ।" (११.५.५)—दासबोधांतील ११ व्या दशकाच्या पांचव्या समासांतील वर उध्दृत केलेल्या ओंव्यांवरून आम्हीं बहुधा अध्यात्मनिरूपण याचा जो अर्थ केला आहे, त्याची सत्यता वाचकांना कळून येईल. (१) हरिकथानिरूपण, (२) राजकारण, (३) सर्वविषयीं सावधपण व (४) अत्यंत साक्षेप (प्रयत्न, उद्योग) ही समर्थांच्या शिकवणुकीची सुप्रसिद्ध चतु:सूत्री आहे. त्या चतु:सूत्रीचें विवेचन, स्पष्टीकरण व विवरण दासबोधांत बहुजन समाजाला सहज समजेल, अशा जोरदार व परिणामकारक भाषेंत केलें आहे. चतु:सूत्रींत समर्थांनीं पाहिला मान हरिकथानिरूपणास म्हणजे अध्यात्मनिरूपणास दिला आहे व त्याचें विवेचन-विवरण दासबोधांत प्राधान्यानें बहुतेक सर्व समासांत केलें आहे. चळवळीमध्यें सामर्थ्य आहे असें सांगतांना देखील समर्थ अध्यात्म-निरूपणाचें म्हणजे भगवंताच्या अधिष्ठानाचें महत्त्व सांगण्यास विसरत नाहींत. "सामर्थ्य आहे चळवळीचें । जो जो करील तयाचें । परंतु येथें भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ।।(२०.४.२६)" हल्लीं आपल्या देशांत राष्ट्रोन्नतीकरितां जे जे प्रयत्न होत आहेत, त्या प्रयत्नांत भगवंताच्या अधिष्ठानाकडे अंत:करणपूर्वक लक्ष्य ठेवून पुढारी व अनुयायी जर काम करतील तर समर्थकालाप्रमाणें इष्ट हेतु साध्य होण्यास विलंब लागणार नाहीं. अध्यात्मनिरूपणानंतर प्रसंगविशेषीं निरनिराळ्या समासांत 'राजकारण', 'सर्वविषयीं सावधान' व 'अत्यंत साक्षेप' यांचा समर्थांनीं जोरदार भाषेंत कळकळीचा उपदेश केला आहे. गूढार्थदीपिकाकार कै. श्री. केशव गणेश आठले यांनीं ही "बहुधा अध्यात्मनिरूपण । निरोपिलें ।।" याचा अर्थ "विशेषत: अध्यात्म-ज्ञानाचेंच निरूपण केलें आहे," असाच केला आहे. म्हणजे अध्यात्मनिरूपणास प्राधान्य दिलें आहे व प्रसंगविशेषीं परिस्थित्यनुरूप राजकारणादि तीन विषयांचें ही विवेचन केलें आहे, हा अर्थसंप्रदायपरंपरेनें दासबोधाचा अर्थ करणाऱ्या गूढार्थदीपिकाकारांना ही मान्य आहे, हें वाचकांच्या लक्षांत

येईल. समर्थवाङ्मयभक्त श्री. शं. श्री. देव हो " बहुधा " याचा अर्थ मुख्यत: असाच करितात ( दासबोध–प्रस्तावना, पृष्ठ ३१-४८ ).

दासबोधांत एकंदर बीस दशक आहेत व प्रत्येक दशकांत दहा समास आहेत. भक्ति-दान-वैराग्य-निरूपणाच्या ग्रंथांत राजकारणाचा समावेश करणें हें जसें समर्थांचें वैशिष्ट्य आहे, तसें अध्यायास अगर भागास नांव देण्यांत ही त्यांचें वैशिष्ट्य आहे. अध्यात्मनिरूपणांतील भागास सामान्यपणें अध्याय म्हणण्याची वहिवाट आहे; परंतु समर्थांनीं मुख्य भागास दशक व पोट भागास समास असें नांव दिलें आहे. दासबोध ग्रंथ ओंवीबद्ध आहे. वीस दशकांतील २०० समासांत एकंदर ७७५२ ओंव्या आहेत. पैकीं दोन ओंव्या अगदीं तशाच दोन वेळां आल्या आहेत. पहिली ओंवी:—" रूप लावण्य अभ्यासितां नये । सहज गुणास न चले उपाये ॥ कांहींतरी धरावी सोये । आगंतुक गुणाची ॥ ( २.८.३१+१४.६.१ )"; दुसरी ओंवी:—"मूळमाया गुणापरती । तेथें भूतें कैंची होती ॥ ऐसी आशंका हे श्रोतीं । घेतली मागां ॥ ( ८.३.६६+८.४.५ )". या दोन ओंव्या पुन्हा अगदीं त्याच शब्दांत आलेल्या कमी केल्यांस दासबोधाची ओंवीसंख्या ७७५० होते. वाल्मीकि-रामायण हा ग्रंथ २४००० आहे. दासबोध हा ग्रंथ रामायण-ग्रंथाच्या जवळ जवळ ⅓ आहे. दशकांच्या व समासांच्या नांवांवरून त्या दशकांत व समासांत कोणत्या विषयाचें प्रतिपादन केलें आहे हें स्पष्टपणें समजून येतें. असें असतां " सर्व ग्रंथ अत्यंत अव्यवस्थित आहे. यांत एकंदर काय सांगितलें आहे हेंच सांगणें कठिण आहे, " असें विक्षिप्त व हास्यास्पद विधान कै. श्री. रामचंद्र भिकाजी जोशी यांनीं ' मराठी भाषेची घटना ' या पुस्तकांत केलें आहे हें आश्चर्य होय. एकदोन समासांत २।३ कूट ओंव्या आहेत, त्यांचा उलगडा कै. जोशी यांना न झाल्यामुळें त्यांनीं पूर्ण विचार न करितां, सर्व ग्रंथांत काय सांगितलें आहे हें समजणें कठिण आहे, असें हास्यकारक विधान ठोकून दिलें आहे. दासबोधांतील दोनशें समास म्हणजे दोनशें स्वतंत्र व्याख्यानें अगर प्रवचनेंच आहेत व प्रतिपाद्य विषयाचें नांव समासाला दिलें आहे. असें असतां सर्व ग्रंथ अव्यस्थित आहे, असें विधान करण्याचें धाडस कै. रा. भि. जोशी करतात ! ! कांहीं विषयांवर समास २।३ वेळां लिहिले आहेत; परंतु त्यामुळें दासबोध हा ग्रंथ ' अव्यस्थित' असें मुळींच म्हणतां येणार नाहीं. पुढील विषय दोन अगर अधिक समासांतून आले आहेत:—उत्तम लक्षण २.२; उत्तम पुरुष २.१०+१८.६; स्वगुण परीक्षा ३.२+३.३+३.४+३+५; श्रवणभक्ति ४.१; श्रवणनिरूपण ७.८+७.९+१७.३; आत्मनिवेदन ४.९+१२.५; सिद्धलक्षण ५.१०+८.९; ब्रह्मनिरूपण ६.४+७.२+९.२; सगुणभजन ६.७+१०.७; विमलब्रह्मनिरूपण ७.४+२०.१०; देहांतनिरूपण ७.१०+१०.८; सूक्ष्म आशंका ८.२+८.३; आशंका ९.१+१०.२; सिद्धांत-

निरूपण ११.१+१५.१०; शिकवण ११.३+१३.१०; राजकारण ११.५ +१९.९; निस्पृह वर्तणुक १८.१०; निस्पृह लक्षण १४.१+१८.३; प्रत्यय-निरूपण १२.२+१३.७; यत्न शिकवण १२.९+१९.७; चातुर्यलक्षण १४.६ +१५.१+१५.६. वरील विषय दोन अगर अधिक वेळां निरनिराळ्या समासांत आले आहेत, तरी त्यांचें विवेचन निरनिराळ्या समासांत नवीन पद्धतीनें केलें आहे हें वाचकांच्या सहज लक्ष्यांत येईल.

कांहीं समास २।३ वेळां कां आले आहेत, याचा आतां विचार करूं. समग्र दासबोध ग्रंथ समर्थांच्या वाणींतून श्रीरामकृपेनें बाहेर पडलेलीं वचनें आहेत यांत शंका नाहीं. परंतु सर्व दासबोध एकटाकी एका बैठकींत लिहिलेला नाहीं. दासबोध हा ग्रंथ लिहिण्याचें काम क्रमाक्रमानें मधून मधून दहा वर्षे चाललें होतें. दासबोधाचे पहिले आठ दशक एकविचाराच्या बैठकींत लिहिलेले दिसतात. या आठ समासांत समर्थांचा वाक्प्रवाह एकसारखा गंगौघाप्रमाणें अव्याहत चाललेला दिसतो. त्यांत द्विरुक्ति नाहीं. कांहीं विषयांची द्विरुक्ति अथवा पुन्हा विवेचन दासबोधाच्या उत्तरार्धांत आहे. सात किंवा आठ दशक झाल्यावर दासबोध संपविण्याची समर्थांची इच्छा असावी असें दिसतें. कारण सातव्या दशकाच्या शेवटीं ते म्हणतात:–"सरली शब्दांची खटपट । आला ग्रंथाचा शेवट ॥ येथें सांगितलें स्पष्ट । सद्गुरु भजन ॥" (७. १०. ४२ ) पुन्हा नवव्या दशकांत समर्थ म्हणतात:—"हें दासबोधीं असे बोलिलें । ज्ञानदशकीं प्रांजळ केलें ॥ मूळ मायेंत दाखविलें । पंचभूतिक ॥ ( ९. ६. २ ). " यावरून नववा दशक हा दासबोधांतील भाग नाहीं असें समजावें लागेल. परंतु ज्या अर्थी ९ ते २० दशकांच्या सर्व समासांच्या शेवटीं "इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे " असें समर्थ म्हणतात, त्या अर्थी सर्व वीस दशकी दासबोध समर्थकृतच आहे यांत शंका नाहीं. शिवाय ग्रंथाच्या शेवटच्या समासांत समर्थ म्हणतात:—"वीस दशक दासबोध । श्रवणद्वारें घेतां शोध ॥ मननकर्त्यास विशद । परमार्थ होतो ॥ ( २०. १०. ३१ ) वीस दशक दोनशें समास । साधकें पहावे सावकास ॥ विवरतां विशेषाविशेष । कळों लागे ॥ ( २०. १०. ३२ )" यावरून तर वीस दशक व दोनशें समास समर्थांनीं दासबोधांतर्गत भाग म्हणूनच लिहिले यांत तिळमात्र ही शंका राहात नाहीं.

पहिले आठ दशक एकविचाराच्या एका मनःस्थितीच्या बैठकींत लिहिले व नंतरचे बारा दशक पुढें निरनिराळ्या वेळीं प्रसंगानुरूप विचार सुचले तसे लिहिले असावेत असें आम्हांस वाटतें. श्री. शंकर श्रीकृष्ण देव, कै. वि. ल. भावे व श्री. ल. रा. पांगारकर यांचें मत असेंच आहे. परंतु 'कुबडी' प्रकाशक समर्थभक्तांचें मत निराळें आहे. हंसराजस्वामींनीं 'कुबडी' नांवाचा

एक छोटा पण उत्कृष्ट ग्रंथ लिहिला आहे, त्यांत दासबोधांतील प्रत्येक समासाचें सार २।३ ओंव्यांत फार मार्मिकपणानें आणलें आहे. सदरहू कुबडी ग्रंथ शके १८२९ ( स. १९०७ ) सालीं एका समर्थभक्तांनीं नांव न देतां चांगल्या टीपा देऊन छापला आहे. ते म्हणतात कीं, "आठ दशका अखेरपर्यंतच काय तो दासबोध अशी एकवार श्रीसमर्थांची कल्पना असावी," हें श्री. देवांचें अनुमान बरोबर नाहीं. "सरली शब्दाची खटपट। आला ग्रंथाचा शेवट॥" (७.१०.४२) ही ओंवी ग्रंथ संपूर्ण होत आला हें दाखविणारी नसून दासबोधाचा पूर्वग्रंथ म्हणजे पूर्वार्ध संपत आला हें दाखविणारी आहे, असें कुबडीप्रकाशक म्हणतात. कुबडीकारांनीं दशकांना नांवें निराळीं दिलीं आहेत. सातव्या दशकास ते 'दासबोध' असें म्हणतात. व श्री. देवांचा अर्थ बरोबर घेतल्यास "बोलिले" या शब्दास अर्थ केल्याशिवाय झुगारून द्यावें लागतें, असें कुबडीप्रकाशक म्हणतात. परंतु श्री. देवांचा अर्थ घेतला असतां बाध येतो असें आम्हांस वाटत नाहीं. कारण "आला ग्रंथाचा शेवट॥" व "आला पूर्व ग्रंथाचा शेवट॥" यांत विशेष फरक आहे असें आम्हांस वाटत नाहीं व "बोलिलें" या शब्दाला ही झुगारावें लागत नाहीं. कारण बोलिलें याचें स्पष्टीकरण "प्रांजल केलें" या शब्दांनीं केलें आहे असें मानतां येईल.

पूर्वार्धांतील आठ दशक एकविचाराच्या बैठकींत लिहिलेले असल्यामुळें त्यांत द्विरुक्ति नाहीं व उत्तरार्धांतील बारा दशक प्रसंगविशेषीं शिष्य मंडळीच्या शंकांवरून व स्थलविशेषीं झालेल्या स्फूर्तीवरून लिहिलेले असल्यामुळें कित्येक ठिकाणीं द्विरुक्ति आहे. अध्यात्मविषय समजण्यास कठिण, एकदां निरूपण केलें तरी शिष्यांच्या शंका दूर होत नाहींत म्हणून तोच विषय अनेकदां सांगावा लागत आहे, याची जाणीव खुद्द समर्थांना ही होती. म्हणून ते म्हणतातः—"संदेहवृत्ति तो न भंगे। म्हणोनि बोलिलेंचि बोलावें लागे॥ आम्हांसी हें घडलें प्रसंगें। श्रोतीं क्षमा करावें॥" (६. ३. ३७ ) हें पूर्वार्धांतील क्वचित्प्रसंगाच्या द्विरुक्तीबद्दल म्हणावें लागलें; मग उत्तरार्धांत निरनिराळ्या प्रसंगीं लिहिलेल्या समासांत द्विरुक्ति कित्येक ठिकाणीं आढळून येणें साहजिकच आहे.

आतां दासबोधांतील वीस दशकांचा थोडक्यांत दशकवार विचार करूं व नंतर त्यांतील विषयांचा संकलित रीतीनें विचार करूं.

पहिला दशक 'स्तवनाचा' आहे. परंतु त्यांतील पहिला समास प्रस्तावनावजा आहे व बाकीच्या नऊ समासांत गणेशशारदासद्गुरुप्रभृतींचें स्तवन आहे. पहिल्या समासाचें नांव **ग्रंथारंभलक्षण** आहे. त्यांत दासबोधांत कोणत्या विषयांचें प्रतिपादन आहे, त्यास आधारभूत ग्रंथ कोणते व ग्रंथाची फलश्रुति काय

हें सांगितलें आहे. दुसरा दशक 'मूर्खलक्षण नाम' आहे. दासबोधांत दशकांतील एकाद्या महत्त्वाच्या समासावरून दशकास नांव दिलेलें दिसतें. बाकीचे समास कमी महत्त्वाचे आहेत असें नाहीं. उदाहरणार्थ या दशकांत ५।६।७ या समासांत रजोगुण, तमोगुण व सत्त्वगुण यांचें उत्तम वर्णन आहे. तेव्हां या दशकास 'गुण-त्रय लक्षण' हें ही नांव देतां आलें असतें. पुढील दशकांना त्यांतील एकाच्या समासावरून कां नांवें देण्यांत आलीं याची शंका वाचकांना कदाचित् येईल म्हणून हें लिहिलें आहे. तिसऱ्या समासांत 'स्वगुणपरीक्षा' हें नांव कल्याणस्वामींच्या प्रतींत आहे. दत्तात्रयस्वामींच्या प्रतींत 'सगुणपरीक्षा' हें नांव आहे. पहिल्या पांच समासांत तत्कालीन स्थितीचें उत्कृष्ट चित्र रेखाटलें आहे. कै. प्रो. आण्णा-साहेब विजापूरकर हे या पांच समासांना समर्थकृत उत्कृष्ट 'ऐतिहासिक कादंबरी' म्हणत असत. ६।७।८ या समासांत त्रिविधतापाचें सविस्तर वर्णन आहे. हे तीन समास कित्येकांना कंटाळवाणे वाटतात म्हणून सांप्रदायिक लोकसुद्धां त्यांवरून उडी मारतात, असें श्री. देव म्हणतात. (दासबोध प्रस्तावना). चवथ्या दशकास नवविधाभक्ति हें अन्वर्थक नांव दिलें आहे. १ ते ९ समासांत नवविधा भक्तीचें उत्तम वर्णन दिलें आहे. पांचव्या दशकास 'दशक मंत्राचा' हें नांव कां दिलें याचा स्पष्ट बोध होत नाहीं. चवथा समास 'उपदेशनाम' आहे. त्यांत नानाविध देवतांचे मंत्र सांगितले आहेत. म्हणून या दशकास 'मंत्राचा' दशक असें नांव दिलें असावें. या दशकांतील सहावा समास 'शुद्धज्ञाननिरूपण' हा फार उत्कृष्ट आहे. त्यांत समर्थांना त्यांच्या सद्गुरूंनीं केलेल्या उपदेशाचें उत्कृष्ट वर्णन आहे. या दशकास 'शुद्धज्ञाननिरूपण' हें नांव अधिक शोभलें असतें असें आम्हांस वाटतें. सहाव्या दशकास 'देवशोधन' हें नांव आहे. 'देवशोधन' हा पहिला समास आहे. त्यावरून या दशकास 'देवशोधन' हें नांव दिलें आहे. सातव्या दशकास 'चतुर्दशब्रह्म निरूपण' हें नांव त्यांतील तिसऱ्या समासाच्या नांवावरून दिलें आहे. आठव्या दशकास 'ज्ञानदशक मायोद्भव नाम' हें नांव आहे. दशकांतील कोणता ही समास त्या नांवाचा नाहीं. २।३ समासांना 'सूक्ष्म आशंका' हें नांव आहे. सूक्ष्म आशंकांचें निरसन करून यथार्थ ज्ञान सांगितलें म्हणून दशकास त्या दोन समासांवरून 'ज्ञानदशक' हें नांव देतां येईल. परंतु पुढें मायोद्भव हें नांव कां जोडलें हें नीट कळत नाहीं. नवव्या दशकास 'गुणरूप' हें नांव त्या दशकांतील सहाव्या समासावरून दिलें आहे. दहाव्या दशकास 'जगज्जोती' हें नांव दिलें आहे. या समासांतील कोणत्या ही समासास हें नांव नाहीं. तेव्हां हें नांव कां दिलें तें समजत नाहीं. 'पुरुषप्रकृति' नाम नववा समास आहे. त्यांतील दोन ओंव्या पुढील आहेतः—"एक जाणीव वाटली। प्राणिमात्रास विभागली ॥ जाणजाणों वांचविली। सर्व काया ॥ १४ ॥ तयेचें नांव जगज्जोती। प्राणिमात्र तिच्येन

'जिती[1] ।। याची रोकडी प्रचीति । प्रत्यक्ष पहावी ।। १५ ।। अवघ्या जगास वाचविती । म्हणोनी नामें जगज्जोती ।। ते गेलीया प्राणी मरती । जेथील तेथें ।। १८ ।।" वरील ओंव्यांतील ' जगजोती'च्या महत्त्वामुळें दशकास जगज्जोती नांव दिलें असण्याचा संभव आहे. दत्तात्रयस्वामींच्या प्रतींत या दशकास 'बीजोद्भव' असें नांव आहे. चवथा समास ' बीजलक्षण ' नाम आहे; त्यावरून तें नांव दिलें असावें. अकराव्या दशकास 'भीमदशक' हें नांव आहे. कोणत्या ही समासास तें नांव नाहीं. मग हें नांव कां दिलें ? दत्तात्रयस्वामींच्या ही प्रतींत हेंच नांव आहे. गिरिधरस्वामींनीं ही हेंच नांव मान्य केलें आहे. " मारुति हा अकरावा रुद्र आहे म्हणून या अकराव्या दशकाला भीम ( मारुति ) नांव दिलेलें दिसतें," असें श्री. शंकरराव देव म्हणतात. या दशाकांतील पांचवा समास राजकारण आहे. त्या समासावरून या दशकास 'राजकारण' हें नांव दिलें असतें तर अन्वर्थक झालें असतें असें आम्हांस वाटतें. बारावा दशक 'विवेकवैराग्यनाम' आहे. हें नांव त्या दशकांतील चवथ्या समासावरून दिलें आहे. तेराव्या दशकास ' नामरूप ' हें नांव आहे. दशकांतील कोणत्या ही समासास हें नांव नाहीं. मग दशकास नामरूप हें नांव कां असावें तें नीट कळत नाहीं. चवदाव्या दशकास ' अखंड ध्यान ' हें नांव आहे. तें आठव्या समासाच्या नांवावरून दिलें आहे. पंधराव्या दशकास ' आत्मदशक ' हें नांव आहे. कोणत्या ही समासास तें नांव नसतां दशकास तें नांव कां दिलें तें समजत नाहीं. सोळाव्या दशकास ' सप्ततिन्वयाचा ' हें नांव आहे. कोणत्या ही समासास हें नांव नाहीं. ' सप्ततिन्वयाचा ' याचा कांहीं अर्थ होत नाहीं. सप्तसप्ति म्हणजे सूर्य व अन्वय म्हणजे वंश. ' सप्तसप्त्यन्वया 'च्या ऐवजीं सप्ततिन्वय चुकीनें अगर गडबडीनें पडलें असण्याचा संभव आहे. ' सप्तसप्त्यन्वय ' म्हणजे सूर्यवंश. या दशकांतील दुसरा समास ' सूर्यस्तवन ' नाम आहे. तेव्हां ' सप्तसप्त्यन्वयाचा ' असें असण्याचा संभव आहे, असें श्री. शंकरराव देव सुचवितात तें खरें असावें असें दिसतें. सप्त+तीन याचा अन्वय असें श्री. साठे म्हणतात ( दासबोधाची रूपरेषा ). गिरिधरस्वामी आपल्या ' ग्रंथभावार्थ ' या ग्रंथांत या दशकास ' तत्त्वान्वय ' नाम देतात. सतराव्या दशकास ' प्रकृतिपुरुष ' हें नांव आहे. दशकांतील कोणत्या ही समासास हें नांव नाहीं. मग दशकास तें नांव कां दिलें तें नीट समजत नाहीं. अठराव्या दशकास ' बहुजिनसी ' हें नांव दिलें आहे. पहिल्या समासास ' बहु देवस्थान ' हें नांव आहे, त्यावरून दशकास 'बहुजिनसी ' हें नांव दिलें असावें. १९व्या दशकास ' शिकवण ' हें नांव आहे. कोणत्या ही समासास तें नांव नाहीं. परंतु या दशकांतील समासांत समर्थांच्या शिकवणीचें विवेचन आहे म्हणून दिलेलें नांव योग्य दिसतें. विसाव्या दशकास

१. जगतात.

पूर्णदशक ' हें नांव आहे. कोणत्या ही समासास तें नांव नाहीं, तरी या दशकानें दासबोध ग्रंथ पूर्ण होतो म्हणून तें नांव दिलें असावें.

दासबोधांत बहुधा म्हणजे बव्हंशानें—विशेषतः—मुख्यतः—अध्यात्मनिरूपण केलें आहे तें कोणत्या प्रकारचें आहे याचा प्रथम विचार करूं व नंतर पुढें 'राजकारण,' 'सर्वविषयीं सावधपण' व 'अत्यंत साक्षेपा 'विषयीं समर्थ काय म्हणतात तें पाहूं. पहिल्या दशकाच्या पहिल्या समासांत दासबोध लिहितांना कोणत्या ग्रंथाचा आधार घेतला आहे तें सांगितलें आहे. त्यावरून दासबोधांतील अध्यात्मनिरूपण, उपनिषदें, वेदवेदांत, भागवत, भगवद्गीतादि गीता यांच्या आधारें केलें आहे हें उघड आहे. म्हणजे ज्ञानदेव, एकनाथप्रभृति साधुसंतांनीं संस्कृतांतील ज्ञान प्राकृतांत आणून बहुजनसमाजास भक्तिमार्ग शिकविला, त्याप्रमाणेंच समर्थांनीं अध्यात्मनिरूपणांत मागच्या साधुसंतांचेंच अनुकरण केलें आहे हें खरें; परंतु अध्यात्मनिरूपणांत—हरिकथानिरूपणांत ही समर्थांनीं आपलें वैशिष्ट्य दाखविलें. हरिकथा म्हणजे सगुण देवाचें कीर्तन व निरूपण म्हणजे अद्वैताचें निरूपण. अद्वैतनिरूपणांत समर्थांनीं आद्य शंकराचार्यांच्या तत्त्वाचाच मुख्यतः अनुवाद केला आहे. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या ' परब्रह्म हेंच एक अविनाशी सत्य आहे, जग हें मिथ्या आहे; असें ब्रह्मनिरूपण, सारविवेक, दृश्यनिरसनादि समासांत प्रतिपादन केलें आहे. ब्रह्माचें उत्कृष्ट वर्णन अनेक समासांत केलेलें आहे:—" ब्रह्म निर्गुण निराकार । ब्रह्म निःसंग निर्विकार ॥ ब्रह्मासि नाहीं पारावार । बोलती साधु ॥ (७. २. १) ब्रह्म सर्वांस व्यापक । ब्रह्म अनेकीं एक ॥ ब्रह्म शाश्वत हा विवेक । बोलिला शास्त्रीं ॥ (७. २. २)......जेथें वाचा निवर्तती । मनासी नाहीं ब्रह्मप्राप्ती ॥ ऐसें बोलिली श्रुती । सिद्धांतवचन ॥ (७. २. १०)." सद्गुरुकृपेनें ब्रह्मज्ञान होतें असें पुढें सांगितलें आहे. " जें जें कांहीं साकार दिसे । तें तें कल्पांतीं नासे ॥ स्वरूप असतचि असे । सर्वकाळ ॥ (९. ९. १) जें सकळांमध्यें सार । मिथ्या नव्हे तें साचार ॥ जें कां नित्य निरंतर । संचलें असे ॥ (९. २. २) ब्रह्म निर्गुण निराकार । माया सगुण साकार ॥ ब्रह्मासि नाहीं पारावर । मायेसी आहे ॥ (६. ५. २) ब्रह्म निर्मळ निश्चळ । माया चंचळ चपळ ॥ ब्रह्म निरुपाधि केवळ । माया उपाधिरूपी ॥ (६. ५.३) माया लहान ब्रह्म थोर । माया असार ब्रह्म सार ॥ माया अर्ति, पार । ब्रह्मासि नाहीं ॥ (६.५.१०)" असें मायाब्रह्मांचें तुलनात्मक सुंदर वर्णन केलें आहे. चार वेदांतील महावाक्यें—'प्रज्ञानं ब्रह्म,' 'अहं ब्रह्मास्मि,' 'तत्त्वमसि' व 'अयमात्मा' यांचें विवरण करण्याविषयीं उपदेश केला आहे. सृष्टीची उभारणी व संहारणी यांविषयीं अनेक समासांतून द्विरुक्ति करून ही वर्णन केलें आहे. समर्थांच्या ब्रह्मांडाचा सृष्टिक्रम असा आहे:—ब्रह्म—मूळमाया—गुणमाया-पंचमहाभूतें; त्यांचा क्रम-आकाश-वायु-तेज-अप—पृथ्वी; पृथ्वीपासून चारी खाणी—अंडज, स्वेदज, उद्भिज व जरायुज..

ही सृष्टीची उभारणी. संहारणी याच्या उलट क्रमानें होते. माया, ब्रह्मसृष्टीची उत्पत्ति व संहार इत्यादि गोष्टींचें वर्णन पूर्वीच्या साधुसंतांप्रमाणेंच केलें आहे. पूर्वीच्या साधुसंतांनीं बहुजन समाजामध्यें भक्तिमार्गाचा प्रसार होण्याकरितां पंढरपूरच्या अठ्ठावीस युगें विटेवर उभा राहणाऱ्या श्रीविठ्ठलाची उपासना सांगितली. तेंच काम करण्याकरितां समर्थांनीं सुरबंधविमोचक धनुर्धारी श्रीरामाची व त्यास साहाय्य करणाऱ्या हनुमंताची उपासना सांगितली. उपासनादैवत निवडण्यामध्यें समर्थांचें वैशिष्ट्य दिसून येतें. महाराष्ट्रास कर्तव्य-जागृत करण्याकरितां वरील दोन देवतांची उपासना करण्यास सांगण्यांत समर्थांचा वैशिष्ट हेतु होता. त्याचें सविस्तर विवेचन आम्हीं मागें 'उत्सव-रहस्य' या पोटभागांत केलें आहे. समर्थांचे दासबोधेतर ग्रंथांतील अध्यात्मनिरूपण व हरिकथानिरूपण एकसारखेंच आहे, दासबोधेतर ग्रंथांत रामाच्या उपासनेप्रमाणें मारुतीची उपासना ही सांगितली आहे.

सद्गुरूवांचून ज्ञान नाहीं व ज्ञानावांचून मोक्ष नाहीं, असें समर्थांनीं अनेक ठिकाणीं प्रतिपादन केलें आहे. समर्थांचे सद्गुरु श्रीराम होते, म्हणून ते म्हणतात:— "मनीं धरावें तें होतें। विघ्न अवघेंचि नासून जातें॥कृपा केलिया रघुनाथें। प्रचीत येते॥ (६.७.३०) रघुनाथभजनें ज्ञान झालें। रघुनाथभजनें महत्त्व वाढलें॥ म्हणोनियां तुवां केलें। पाहिजे आधीं॥(६.७.३१) रघुनाथ स्मरोनि काम करावें। तें तत्काळचि सिद्धि पावे॥ कर्ता राम हें असावें। अभ्यंतरीं॥ (६.७.३३) कर्ता राम, मी नव्हे आपण। ऐसें सगुण निवेदन॥ निर्गुणीं तें अनन्य। निर्गुण होइजे॥ (६. ७. ३४)" निर्गुण परब्रह्माचें ज्ञान झालें, तरी सगुण श्रीरामउपासनेकडे दुर्लक्ष करूं नये असें समर्थ सांगतातः—" निर्गुणीं ज्ञान झालें। म्हणोन सगुण अलक्ष्य केलें॥ तरी ते ज्ञाते नागवले। दोहींकडे॥ (१०. ७, ३५)" समर्थांनीं निर्गुण उपासनेचें ठिकठिकाणीं महत्त्व गाइलें आहे; व " धातु पाषाण मृत्तिका। चित्रलेप काष्ठ देखा॥ तेथें देव कैंचा मूर्खा। भ्रांति पडिली॥ ( ६. ६. ४४ ) " असें म्हणून मूर्तिपूजेवर तडाखे मारले आहेत. असें असतां त्याच समर्थांनीं राममूर्तीचीं व हनुमंतमूर्तीचीं मंदिरें बांधून सांप्रदायिकांना मूर्तिपूजा करण्यास लाविलें, याचें रे. डेमिंगप्रभृति कांहीं लोकांना गूढ पडलें आहे. रे. डेमिंग म्हणतात:—"In dealing with the teaching of Ramadas about God, it is difficult to draw the line between pantheism and idolatry on the one hand and between idolatry and theism on the other." भावार्थ:—रामदासांच्या ईश्वराविषयींच्या शिकवणुकीचा विचार करतांना बहुदेवतोपासना, मूर्तिपूजा व एकदेवतोपासना यांच्यामध्यें भेदरेषा काढणें कठीण आहे. " When swayed by his Vedantic conceptions, he criticised idolatry as unworthy and said that Gods of metal or stone were perishable (Dasabodh, ch. X, sec. 7); yet as a Bhakt of Rama he established a number of shrines for Rama and Maruti in differ-

ent places. " भावार्थ:—त्यांच्यावर वेदांत-मतांचा जेव्हां अम्मल बसे तेव्हां ते मूर्तिपूजा योग्य नाहीं, अशी टीका करीत आणि धातूंचे व पाषाणांचे देव विनाशी आहेत असें म्हणत. परंतु रामभक्त या नात्यानें त्यांनीं अनेक ठिकाणी रामाचीं व मारुतीचीं देवालयें स्थापन केलीं.

"......As the Gita magnified the Lord Krishna, so to Ramadas Shri Rama was the Lord of his life...... It was chiefly when he was carried away by his enthusiasm for salvation by knowledge that he stressed the uselessness of idol-worship. At most other times he accepted it as a useful aid in the daily religious routine." (Pp. 99–100, *Ramadas and the Ramadasi* )

भावार्थ:—भगवद्गीतेनें श्रीकृष्णाचें माहात्म्य जसें वाढविलें आहे, तसें रामदासांनीं श्रीरामाचें माहात्म्य वाढविलें आहे. ......ज्ञानानेंच मोक्षप्राप्ती होते असें उत्साहाच्या जोरांत जेव्हां ते प्रतिपादन करीत, तेव्हां मूर्तिपूजा निरुपयोगी आहे असें ते जोरानें प्रतिपादन करीत. बाकी सर्व वेळां मूर्तिपूजा ही नित्य धार्मिक कृत्यांना उपयोगी पडते म्हणून ते तिचा स्वीकार करीत. " उत्तमा सहजा पूजा मध्यमा ध्यान-धारिणी ॥ अधमा मानसी पूजा मूर्तिपूजाऽधमाधमा ॥ " असें आद्य श्रीशंकराचार्य कंठरवानें सांगत होते, तरी स्वतः ते शारदांबेची उपासना करीत. त्यांना लोकसंग्रह करावयाचा होता. उत्तम सहजा पूजेचें आकलन होण्याची पात्रता " सहस्रेषु च पंडितः " या न्यायानें बहुजन समाजामध्यें फार थोड्यांना असते, हें आचार्यांना पूर्णपणें माहीत होतें, म्हणून " सहजा पूजा " उत्तम असें म्हणून ही बहुजन समाजाकरितां त्यांना निकृष्ट मूर्तिपूजेचा पुरस्कार करावा लागला. तोच न्याय समर्थांना ही लागू आहे. त्यांच्या अध्यात्मनिरूपणांत सगुणोपासना व निर्गुणोपासना या दोन्हींचा अंतर्भाव होतो. ज्यानें त्यानें आपला अधिकार पाहून उपासनेची निवड करावी. पहिल्या प्रस्तावनेच्या समासांतच समर्थ म्हणतातः—" आतां असो हें बोलणें । अधिकारासारिखें घेणें ॥ परंतु अभिमान त्यागणें । हें उत्तमोत्तम ॥ (१.१.२६)" रे. डेमिंगसाहेबांचें लक्ष वरील ओंवीकडे गेलें असतें तर समर्थांच्या अध्यात्मनिरूपणांत केव्हां केव्हां विसंगतता दिसून येते असें त्यांना वाटलें नसतें.

दासबोधांतील चतुःसूत्रींतील दुसरें सूत्र जें राजकारण त्याविषयीं आम्हीं पुढें 'समर्थांचें राजकारण' या भागांत सविस्तर विवेचन करणार आहों. येथें एवढेंच सांगतों कीं, दासबोधांत राजकारणावर दोन समास आहेत ( ११.५ व १९.९ ). दासबोधांत **राजकारण** शब्द २७ वेळां आलेला आहे, पूर्वार्धांत एकदां व उत्तरार्धांतील सव्वीस वेळां. या सर्व ठिकाणीं **राजकारण** या शब्दाचा अर्थ **राजकारण** आहे, चातुर्य नाहीं. कारण चातुर्य या विषयावर दासबोधांत तीन स्वतंत्र समास आहेत ( १४.६ + १५.१ + १५.६ ).

चतुःसूत्रींतील तिसरें सूत्र 'सावधपण सर्वविषयीं' हें आहे. सर्वविषयीं सावधपण म्हणजे **चातुर्य.** त्यावर तीन स्वतंत्र समास आहेत हें वर सांगितलेंच आहे. वाचकांचें या विषयाकडे लक्ष्य जाण्याकरितां ठिकठिकाणीं याचें निरूपण केलें आहे. त्याप्रमाणें चवथें सूत्र जें 'अत्यंत साक्षेप' त्यासंबंधीं ही अनेकदा उल्लेख केला आहे व शिवाय 'यत्नाशिकवण' (१२. ९) व 'यत्ननिरूपण' (१९. ७) असे दोन स्वतंत्र समास आहेत. बालबोध समर्थ-वाङ्मय-माला, पुष्प २, समर्थसुभाषित, या आम्हीं प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांतील ८, ९ व १० भागांत आम्हीं दासबोधांतील सुभाषितें दिलीं आहेत, तीं वाचलीं असतां दासबोधांत समर्थांनीं 'सर्वविषयीं सावधान' व 'अत्यंत साक्षेप' याचें किती समर्पक चित्र काढलें आहे तें कळून येईल. उदाहरणार्थ कांहीं थोडे उतारे देतों:—"पृथ्वीमध्यें लोक सकळ। एक संपन्न एक दुर्बळ। एक निर्मळ एक वोंगळ। कायनिमित्त ॥ (९. ४. १) कितीएक राजे नांदती। कितीएक दरिद्र भोगिती ॥ कितीएकांची उत्तम स्थिती। कितीएक अधमाधम ॥ (९. ४. २) हे सकळ गुणापाशीं गती। सगुण-भाग्य श्री भोगिती ॥ अवगुणासी दरिद्रप्राप्ती। यदर्थीं संदेह नाहीं ॥ (९. ४. ४) प्रपंचीं जो **सावधान**। तोचि परमार्थ करील जाण ॥ प्रपंचीं जो अप्रमाण। तो परमार्थी खोटा ॥ (१२. १. ९) सुखी असतो खबर्दार। दु:खी होतो बेखबर ॥ ऐसा हा लौकिक विचार। दिसतची आहे ॥ (१२.१. १३) बहुत जन्माचा शेवट। नरदेह सांपडे अवचट ॥ येथें वर्तावें चोखट। नीतिन्यायें ॥ (सुलभ दासबोध ११.३. १) ज्या ज्याचा जो व्यापार। तेथें असावें खबर्दार ॥ दुश्चितपणें तरी पोर। वेढा लावी ॥ (१२. ३. १५) ऐक सदैवपणाचें लक्षण। वायां जावों नेदी क्षण ॥ प्रपंच व्यवसायाचें ज्ञान। बरें पहा ॥ (११.३.१९) कष्टेंविण फळ नाहीं। कष्टेंविण राज्य नाहीं ॥ केल्याविण होत नाहीं। साध्य जनीं ॥ (१८. ७. ३) **सावधानता** असावी। नीति मर्यादा राखावी ॥ जनास मानें ऐसी करावी। क्रियासिद्धि ॥ (१२.९.१५) नर तोचि नारायण। जरी प्रयत्नें करी श्रवण ॥ मनन-शीळ अंत:करण। सर्वकाळ ॥ (२०.५.१५) धकाधकीचा मामला। घडे कैसा अशक्ताला ॥ नाना बुद्धि शक्ताला। म्हणूनि शिकवाव्या ॥ (१९. १०. १८) लहानथोर काम कांहीं। केल्यावीण होत नाहींत ॥ करंट्या सावध पाहीं। सदेव होसी ॥ (१२. ९. ५) प्रयत्नेंवीण कार्य झालें। जेविल्याविण पोट भरलें ॥ ज्ञानेंविण मुक्त झाले। हें तों घडेना ॥ (९.७.२२) अचुक यत्न करवेना। म्हणोन केलें तें सजेना ॥ आपला अवगुण जाणेना। कांहीं केल्या ॥ (१२.२.६) वर्तायाचा विवेक। राजी राखणें सकळ लोक ॥ हळु हळु पुण्यश्लोक। करीत जावे ॥ (१३. १०.१५) आळसें कार्य भाग नासतो। साक्षेपें होत होत होतो। दिसते गोष्टी

कळेना तो। शहाणा कैसा ॥ ( १४. ६. २३ ) उदंड करी गुप्तरूपें। भिकाऱ्या-सारिखा स्वरूपें ॥ तेथें यश-कीर्ति-प्रतापें। सीमा सांडिली ॥ ( १५. २. १२ ) व्याप आटोप करिती। धक्के चपेटे सोशिती ॥ तेणें प्राणी सदैव होती। देखत देखतां ॥ ( १९. ६. १८) ठायीं ठायीं शोध घ्यावा। मग ग्रामीं प्रवेश करावा ॥ प्राणिमात्र बोलवावा। आत्मपणें ॥ (१९.२.१३) आपणांस जें जें अनुकूल। तें तें करावें तात्काळ ॥ होईना त्यासि निवळ। एकांत उमजावा ॥ ( १९.६.१८ ) कीर्ति पाहतां सुख नाहीं। सुख पाहतां कीर्ति नाहीं ॥ केल्यावीण कांहींच नाहीं। कोठें तरी ॥ (१९.१०.११)" विस्तारभयास्तव अधिक उतारे देत नाहीं. परंतु वर दिलेल्या उताऱ्यांवरून दासबोधांतील चतुःसूत्रींतील तिसरें सूत्र 'सर्वविषयीं सावधपण' व चवथें सूत्र 'अत्यंत साक्षेप' हीं लोकांच्या मनावर ठसविण्याचा किती जोरदार प्रयत्न केला आहे हें दिसून येईल.

भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनास गीतेंत सांगितलेल्या अठरा अध्यायांचें रहस्य कै. लोकमान्य टिळकांनीं 'ज्ञानमूलक भक्तिप्रधान कर्मयोग' असें काढलें आहे. श्रीसमर्थांनीं महाराष्ट्रियांना दासबोधांत सांगितलेल्या वीस दशकांचें रहस्य 'धर्ममूलक विवेक-वैराग्यप्रधान प्रयत्न-वाद' असें काढतां येईल असें आम्हांस वाटतें. प्रयत्नवादावरचे उतारे वर दिले आहेत. विवेकवैराग्यांवर दासबोधांत स्वतंत्र समास आहेत ( २. ९; ३. १०; १९. १० ) व बाराव्या दशकाचेंच नांव 'विवेक-वैराग्य लक्षण' असें आहे. समग्र दासबोध ग्रंथ सूक्ष्म रीतीनें वाचल्यास असें वाटतें कीं विवेक-वैराग्यवाद व प्रयत्नवाद तत्कालीन महाराष्ट्रियांच्या मनावर बिंबवून त्यांना स्वकर्तव्य-दक्ष करण्याचा हेतु मनांत धरून समर्थांनीं दासबोध लिहिला. परंतु नुसत्या प्रयत्नानें किंवा नुसत्या विवेकवैराग्यानें, किंबहुना विवेकवैराग्ययुक्त प्रयत्नानें ही इष्टकार्यसिद्धि होणार नाहीं, म्हणून समर्थ म्हणतात:— "सामर्थ्य आहे चळवळीचें। जो जो करील तयाचें ॥ परंतु येथें भगवंताचें। अधिष्ठान पाहिजे ॥ ( २०.४.२६ )" विवेकवैराग्ययुक्त प्रयत्न केला तरी त्यास धर्माची जोड असल्याशिवाय यश मिळणार नाहीं, म्हणून परमेश्वरावर निष्ठा ठेवून विवेक-वैराग्ययुक्त प्रयत्न करा म्हणजे तुमच्या चळवळीस ( ती सामाजिक असो, राजकीय असो अगर धार्मिक असो ) खात्रीनें यश येईल असें समर्थ आपल्या अधिकारयुक्त वाणीनें सांगतात.

गीता व दासबोध यांची तुलना कै. राजवाडे यांनीं 'रामदास' या निबंधांत फार मार्मिक रीतीनें केली आहे:—"गीतेंत भगवंतांनीं अर्जुनास जो उपदेश केला त्याहून दासांनीं केलेला बोध तत्त्वदृष्ट्या कांहीं निराळा नाहीं. देश व काल यांच्या परिस्थितीच्या दृष्टीनें मात्र निरूपणांत व दृष्टांतांत जमीनअस्मानांचा भेद आहे. भगवद्गीतेंत केलेलें निरूपण गीताकालीन समाजस्थितीला अनुरूप होतें.

ती समाजस्थिति बदलल्यावर तें निरूपण नवीन परिस्थितीला लागू पडण्यासारखें नव्हतें. तेव्हां हा फरक लक्षांत घेऊन वेदांतील सिद्धांतांच्या अनुरोधानें समर्थांनीं दासबोध या स्वतंत्र प्रबंधाची निर्मिति केली. हा प्रबंध कोणत्या ही ग्रंथाची टीका नाहीं. तत्कालीन नैतिक, धार्मिक व राजकीय परिस्थितीला पूर्णपणें अनुलक्षून हा ग्रंथ स्वतंत्र बुद्धीनें रचिला आहे. गीतेंतील व वेदांतील सिद्धांत तर या ग्रंथांत गृहीत म्हणून घेतले आहेतच, परंतु गीतेंतील सिद्धांतांचा विपर्यास होऊन लोकांच्या विचारांत जो एक प्रकारचा एकदेशीपणा एव्हांपर्यंत येत होता व सध्यां ही येत असतो, तो या ग्रंथांत टाळला आहे. परमार्थज्ञानवान् जे सिद्ध त्यांनीं साधकांची भूमिका घेऊन लोकांना परमार्थाचा मार्ग दाखवावा असें प्रतिपादन समर्थांनीं दासबोधांत अनेक ठिकाणीं स्पष्टपणें व विस्तारानें केलें आहे, हा एक दासबोधांतील प्रमुख विशेष आहे. नीति व भक्ति यांची प्राप्ती व्यक्तिमात्रानें कशी करावी हें गीतेंत विस्तारानें सांगितलें आहे. परंतु समुदाय करून समाजाला नीति व धर्म यांकडे कसें न्यावें याचें दहापांच उल्लेखांपलीकडे गीतेंत विवेचन नाहीं. हें विवेचन तर दासबोधाचा मुख्य प्राण आहे. तसेंच गीतेंत राज्यसंस्थापनेसंबंधीं 'नराणां च नराधिपम्' यासारख्या कांहीं खंडवाक्यांखेरीज दुसरा स्पष्ट उल्लेख नाहीं. दासबोधांत राज्यसंस्था म्हणजे ईश्वराचें शरीर आहे, वगैरे प्रतिपादन स्पष्ट केलें आहे. सारांश, गीतेंत जो अर्थ मुग्ध आहे, तो दासबोध ढोबळ अक्षरांनीं स्पष्ट करून दाखवीत आहे." (रामदास, पृष्ठें २८।२९) हा उतारा बराच मोठा आहे, परंतु महत्त्वाचा असल्या कारणानें तो दिला आहे. त्यावरून दासबोधाची योग्यता वाचकांना कळून येईल. गिरिधरस्वामी आपल्या 'निवृत्तिराम' नांवाच्या ग्रंथांत लिहितातः—"तारावया संसारसागरु। समर्थग्रंथ मुख्य तारु॥ तेथील उपग्रंथ निवृत्तिविचारु। निवृत्तिराम या नांवें॥ (२२।१७३) समर्थग्रंथ श्रीदासबोध। तेथुनि सर्व ही बोधप्रबोध॥ विमळ ज्ञान बाळबोध। सच्छिष्यांसी बाणलें॥ (२२।१८५)" समर्थांच्या सर्व ग्रंथांत दासबोध श्रेष्ठ आहे. शीख लोक आपल्या गुरूच्या ग्रंथास **ग्रंथसाहेब** म्हणतात, तसें समर्थ-संप्रदायी आपल्या गुरूंच्या ग्रंथास 'ग्रंथराज' म्हणतात व त्याला वेदतुल्य मानतात. डॉ. केतकरांसारखे यूरोप-अमेरिका खंडांत अध्ययन करून पदव्या मिळालेले आधुनिक पंडित ही दासबोधाची थोरवी कबूल करितात. 'महाराष्ट्रियांचें काव्यपरीक्षण' या निबंधांत डॉ. केतकर म्हणतातः—"मी दासबोधास आयुष्यविषयक तत्त्वज्ञानाचा बोधग्रंथच मानतों; व हा ग्रंथ केवळ मराठीमध्येंच अपूर्व झाला आहे असें न समजतां हिंदुस्थानच्या प्राकृत वाङ्मयांत हा एक अपूर्व ग्रंथ झाला आहे, असें समजतों." यावरून दासबोध ग्रंथ, सांप्रदायिकांनाच नव्हे तर समर्थवाङ्मयभक्तांना

व आधुनिक पंडितांना व सर्वसाधारण सुशिक्षित लोकांना ही श्रेष्ठ व पूज्य वाटतां असें वाचकांना दिसून येईल.

दासबोध ग्रंथ सूक्ष्म रीतीनें वाचणाऱ्याच्या लक्षांत येईल कीं, कांहीं शब्द निरनिराळ्या समासांत निरनिराळ्या रीतींनीं लिहिले आहेतः—मैत्री–मीत्री, तृण–त्रुण, प्रकृति–प्रकुर्ति, क्षमा–क्ष्मा, मूषक–मुष्यक, अनीति–आनित्य, प्रयत्न–प्रेत्न, पाविजे– पीवजे, अहनिशी–आहिर्णेशी, ऋण–रिण, इत्यादि. विस्तारभयास्तव अधिक शब्द देत नाहीं. वरील शब्द ओंवीच्या चरणाच्या अखेर प्रास जुळविण्याकरितां घातलेले नसून चरणाच्या आरंभीं अगर मध्यभागींच घातलेले आहेत. एकच शब्द दोनशें समासांत सारखा लिहिला गेला असता तर तसें लिहिण्याची त्या वेळची पद्धत होती असें म्हणतां आलें असतें. 'सूर्याचेनि प्रकाशें', 'तुझियेचेनि अभयंकरें,' 'गुरूचेनि कृपें' अशीं रूपें सर्वत्र आढळतात, तेव्हां ते शब्द तसे लिहिण्याची पद्धत होती असें मानतां येईल. परंतु एका समासांत दुग्ध व दुसऱ्या समासांत धुग्ध ही लिहिण्याची पद्धत होती असें मानतां येणार नाहीं. किंवा इक्षुदंडाबद्दल युक्षदंड अगर अनृताबद्दल अनृत्य ही लिहिण्याची पद्धति होती असें मानतां येणार नाहीं. आम्हांस असें वाटतें कीं, दासबोध लिहिण्याचें काम पुष्कळ वर्षें चाललें होतें. सर्व ठिकाणीं कल्याणस्वामीच हजर असतील असें नाहीं. निरनिराळे समास निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या बौद्धिक दर्जाच्या शिष्यांनीं प्रथम लिहिले असावेत व नंतर ते कल्याणस्वामींकडे लिहिण्यास पाठविले असावेत व कल्याणस्वामींनीं अस्सल बरहुकूम नक्कल केली असावी. अखेर कल्याणस्वामींकडून सर्व ग्रंथाची तपासणी करून समर्थांनीं कांहीं शोध घातले असें कित्येकांचें म्हणणें आहे, तें खरें ही असेल; परंतु त्या वेळीं समर्थांची विशेष नजर अर्थाच्या शुद्धतेकडे होती, शब्दाच्या शुद्धतेकडे नव्हती असें शोधांवरून दिसून येतें. कांहीं शब्द केवळ गडबडीनें लिहिल्यामुळें व कांहीं हस्तदोषामुळें अशुद्ध पडलेले असावेत असें वाटतेंः—अस्थिबद्दल अस्ति, पर्जन्याबद्दल प्रजन्य, प्रायश्चिताबद्दल प्राश्चित इत्यादि. " अर्थ जरी बदलला नाहीं तरी समर्थांच्या मुखांतून निघालेला एक ही शब्द बदलतां कामा नये. " असें श्री. देव पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत म्हणतात, परंतु लागलीच पुढच्या वाक्यांत म्हणतात, " परंतु जेथें अर्थ ही बदलतो अशीं शेंकडों स्थळें ही वाचकांस आढळतील. " श्री. देव यांनीं समर्थांचे शब्द बदलतां कामा नये, असें म्हणून ही 'हीणा'बद्दल 'हीन,' 'भाशना 'बद्दल 'भाषण ', 'समतीस 'बद्दल 'संमतीस ' असे अनेक शब्द शुद्ध लिहिले आहेत. " संस्कृत नियमाप्रमाणें जे शब्द निर्विवाद अशुद्ध आहेत ते शब्द शुद्ध करून घेणेंच युक्त आहे, वाचकांच्या हातीं अशुद्ध पाठ देण्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं. " असें ह. भ. लक्ष्मणराव पांगारकर सुद्धां म्हणतात ( दासबोध प्रस्तावना, पृष्ठ २२ ). तेव्हां येथून पुढें दासबोध व

इतर समर्थग्रंथ प्रसिद्ध करणाऱ्यांनीं अशुद्ध शब्दांबद्दल शुद्ध लिहावें असें आम्हांस वाटतें.

श्री. वासुदेव पुरुषोत्तम साठे यांनीं 'श्रीदासबोधाची रूपरेषा आणि तदंतर्गत संघटनेची राजविद्या' या नांवाचें एक उत्कृष्ट पुस्तक शके १८४३ सालीं प्रसिद्ध केलें आहे. त्यांत एकंदर २२ भाग व १८३ पानें आहेत. दासबोधाचा मननपूर्वक अभ्यास करून त्यांनीं सदर्हू पुस्तक लिहिलें आहे व त्यांत 'श्रीदासबोधाची सविस्तर रूपरेषा सरहस्य वर्णिली आहे.' दासबोधांतील समर्थांचें अंतरंग समजून घेण्याची उत्कट इच्छा असणाऱ्या जिज्ञासू वाचकांनीं सदर्हू पुस्तक अवश्य मननपूर्वक वाचावें. श्री. साठे म्हणतात, "भक्तिमार्ग व महाराष्ट्रधर्म हे दासबोधाचे दोन मुख्य विभाग आहेत व त्यांत एक विशद बोलिला असून दुसरा गर्भित बोलिला आहे." (पान १२७) श्रीदासबोधांतर्गत महाराष्ट्रधर्माचें विवेचन त्यांनीं १५ व्या भागांत केलें आहे. भक्तिमार्गांत जसे (१) नवविधा भक्ति, (२) ज्ञान, (३) वैराग्यलक्षण व (४) बहुधा अध्यात्मनिरूपण, असे चार विभाग आहेत, तसे महाराष्ट्रधर्मांत ही (१) समर्थभक्ति व समर्थधर्म, (२) समर्थज्ञान व भीमसामर्थ्य, (३) समर्थसंघटना व समर्थजागृति, आणि (४) समर्थकृपा व समर्थप्राप्ति, असे चार विभाग आहेत, असें श्रीयुत साठे म्हणतात (पान १३१). या चार विभागांचें विवेचन त्यांनीं १६ ते १९ या चार भागांत केलें आहे. २० वा भाग 'ईश्वराचा दंडक' यांत, दासबोधास समर्थांनीं आधार घेतलेल्या अनेक गीतादि ग्रंथांचा थोडक्यांत सारांश दिला आहे. ११ ते १४ या चार भागांत भक्तिमार्गांतील चार विभागांचें वर्णन दशकवार क्रमानें केलें आहे. ११व्या भागांत १ ते ४ या चार दशकांतील नवविधा भक्तींचीं अंगें व उपांगें दिलीं आहेत. १२व्या भागांत ५ ते ११ या सात दशकांतील भक्तिजन्य ज्ञानाचीं पूर्वोत्तर साधनें दिलीं आहेत. १३व्या भागांत १२ ते १६ या पांच दशकांतील विवेकवैराग्यांचीं लक्षणोपलक्षणें दिलीं आहेत व १४व्या भागांत १७ ते २० या चार दशकांतील बहुधा अध्यात्मनिरूपणाचीं कारणोपकारणें दिलीं आहेत. शिवाय या चार भागांत दशकांतील रहस्यपूर्वक तात्पर्य सांगतांना मागील दशकांतील शेवटच्या समासांतील अखेरची ओंवी पुढील दशकांतील विषयाचा अनुवाद अथवा बीजारोपण कशी करते हें दाखवून दिलें आहे. या पुस्तकांत श्री. साठे यांनीं फक्त दशकांचीच फोड केली आहे. ओंव्यांची व समासांची फोड दुसऱ्या स्वतंत्र ग्रंथांत ते करणार आहेत. आजपर्यंत विद्वान् समर्थभक्तांनीं दासबोध प्रकाशित केले, त्यांत कठिण शब्दांचे अर्थ, टीपा, ओंव्यांचे अर्थ, श्रुतिस्मृति व साधुसंतांच्या ग्रंथांतील समानार्थक उतारे इत्यादि देऊन वाचकांना दासबोधांतील वाच्यार्थ कळण्यास उत्तम साधनें करून ठेविलीं आहेत. परंतु दासबोध

ग्रंथ कांहीं एवढ्याच साठीं नाहीं असें श्री. साठे म्हणतात. दासबोधांत विशद केलेला भक्तिमार्ग व गर्भित असलेला महाराष्ट्रधर्म सांगोपांग प्रक्रियेसह विचार, अभ्यास व साधन यांनिशीं समजावून देण्याचा प्रयत्न श्री. साठे यांनीं या ग्रंथांत केला आहे. या दुसऱ्या प्रकाराचा अवलंब करतांना शास्त्र-प्रचीतीबरोबर आत्मप्रचीति व गुरुप्रचीति यांची जोड लागते. श्री. साठे यांचा ग्रंथ सामान्य वाचकांना सहज कळण्यासारखा नाहीं, याची जाणीव त्यांना ही आहे. कारण ते म्हणतात, "कोणता ही ग्रंथ कोणी ही आधीं वरवरच्या शाब्दिक दृष्टीनें पाहतो; आणि सामान्य स्वरूप मनांत भरलें व बुद्धि त्याच्या पलीकडे धांव घेऊं लागली म्हणजेच मग गूढार्थ जाणण्याची त्याला जिज्ञासा उत्पन्न होते." (पान १७). दासबोधाचें रहस्य समजण्याची जिज्ञासा असणाऱ्या समर्थभक्तांना श्री. साठे यांनीं एक नवीन मार्ग दाखवून दिला आहे.

दासबोध हा ग्रंथ समर्थ-ग्रंथांमध्यें श्रेष्ठ म्हणून समर्थसांप्रदायिक या ग्रंथास 'ग्रंथराज' म्हणतात व त्यास वेदतुल्य मानतात, असें आम्हीं याच भागांत वर सांगितलें आहे. दासबोधास वेणाबाई किती पूज्य मानीत असत याविषयीं एक गोष्ट समर्थप्रतापांत दिली आहे. आसनस्थ बसून आदरानें दासबोध वाचण्याची सांप्रदायिकांमध्यें समर्थकालीं पद्धति होती व हल्लींही आहे. एकदां एक शिष्य पलंगावर दासबोध वाचीत असतांना वेणाबाईनीं पाहिलें, तेव्हां त्यांनीं दासबोधास साष्टांग नमस्कार घातला. गिरिधरस्वामी म्हणतातः—"समर्थग्रंथ मंचकावरीं कोण्ही एकें घेतला। महंत थोरपणें वाचित बैसला ॥ अकस्मात वेणाबाईनें देखोनि साष्टांग नमस्कार घातला। मंचकीं समर्थ दासबोध-रूपें म्हणोनियां ॥ (समर्थप्रताप, १८, ३०)" सांप्रदायिक लोक दासबोधास 'समर्थांचें साक्षात् रूप' असें समजत, असें यावरून सिद्ध होतें. खुद्द समर्थांनीं अंतकालीं "दासबोध माझें प्रत्यक्ष स्वरूप" असें म्हटल्याचें मागें सांगितलेंच आहे.

दासबोध ग्रंथ इतका महत्त्वाचा आहे, तेव्हां सदर ग्रंथाच्या वीस दशकांपैकीं अत्यंत महत्त्वाचा दशक कोणता? असा प्रश्न केव्हां केव्हां विचारण्यांत येतो. कालिदासाच्या सर्व ग्रंथांत शाकुंतल नाटक उत्तम ठरलें आहे व त्यांत ही चवथा अंक उत्तम व त्यांत ही चार उत्तम श्लोक रसिकांनीं निवडून काढले आहेत. 'काव्येषु नाटकं रम्यम्। तत्रापि च शकुन्तला ॥ तत्रापि च चतुर्थोऽङ्कः। तत्र श्लोकचतुष्टयम् ॥' हा श्लोक संस्कृतवाचकांच्या परिचयाचा आहेच. वीस दशकांपैकीं सर्वांत अधिक श्रेष्ठ कोणता दशक हें सांगणें कठिण आहे असें आम्हांस वाटतें. समर्थांनीं निरनिराळे दशक निरनिराळ्या उद्देशांनीं शिष्यांच्या अगर श्रोत्यांच्या मनावर निरनिराळ्या विषयांचें महत्त्व प्रतिपादन करण्याकरितां सांगितले आहेत. तेव्हां वरील

प्रश्न विचारणेंच युक्त नाहीं असें आम्हांस वाटतें. प्रत्येक दशक आपापल्या परी महत्त्वाचा आहे व कोणता दशक श्रेष्ठ या प्रश्नाचें उत्तर देण्याचा प्रयत्न केल्यास ' भिन्नरुचिर्हि लोकः । ' या सुप्रसिद्ध कालिदासोक्तीप्रमाणें सर्व समर्थभक्तांचें एकच उत्तर येईल असें नाहीं. गेल्या गीताजयंतीच्या आठवड्यांत जांब येथें श्री. देव यांच्या विनंतीवरून बरेच समर्थभक्त जमले होते, त्या वेळीं तेथें ग्रंथराज दासबोधावर मननीय चर्चा झाली. त्या वेळीं ' वीस दशकांत कोणता दशक श्रेष्ठ ' या विषयावर ही मनोरंजक चर्चा झाली. त्या वेळीं आम्ही वर केलेल्या विधानाची सत्यता दिसून आली. ' कोणता दशक श्रेष्ठ ' या प्रश्नावर एकवाक्यता होऊं शकली नाहीं. " सर्व दशकांत कोणी चवथा, कोणी सहावा, कोणी सातवा, कोणी आठवा, कोणी अकरावा, कोणी तेरावा, व कोणी एकोणिसावा दशक श्रेष्ठ आहे असें आपापलीं कारणें देऊन प्रतिपादन केलें."( रामदास व रामदासी, अंक १५१, पान ३२ ). " आम्हांस पांचवा दशक श्रेष्ठ वाटतो, कां तर त्यांत आम्हांला पटावें असें आम्हांसारख्या बद्धांचें वर्णन आहे म्हणून !...सद्गुरु आणि सच्छिष्य यांचीं लक्षणें त्यांत दिलीं आहेत, आणि त्यांत श्रीसमर्थांच्या जीवींचें गुज आहे." असें सुप्रसिद्ध समर्थवाङ्मयभक्त श्री. शंकरराव देव म्हणतात. या विषयावर मत देण्याचा श्रीयुत देव यांचा अधिकार फार मोठा आहे, हें आम्ही कबूल करतों. समर्थांच्या जीवींचें गुज सांगितलेला पांचव्या दशकांतील ' शुद्धज्ञाननिरूपण ' हा सहावा समास वाचतांना आम्हांस अत्यानंद वाटतो. परंतु समर्थांच्या अवताराचें हृद्गत दर्शविणारा दशक व समास निराळाच आहे असें आमच्या बुद्धीस वाटतें. महाराष्ट्राला समर्थांनीं आपली सुप्रसिद्ध चतुःसूत्री शिकवण सांगून कर्तव्यदक्ष केलें व त्यायोगानें शिवसमर्थांच्या स्वराज्यस्थापनेच्या प्रयत्नास यश येऊन महाराष्ट्र स्वराज्यसुखाचा अनुभव घेऊं लागला. ती चतुःसूत्री ज्या दशकांत व समासांत सांगितली तो दशक व समास श्रेष्ठ होय असें आम्हांस वाटतें. " मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण ।। तिसरें सावधपण । सर्वविषयीं ।। (११.५.४) चवथा अत्यंत साक्षेप ।। (११.५.५) " ही समर्थांची त्रिकालाबाधित चतुःसूत्री शिकवण ११व्या दशकांत राजकारण नाम पांचव्या समासांत आहे, म्हणून भीमदशक नाम ११ वा दशक श्रेष्ठ असें आम्ही म्हणतों. आतां समर्थांच्या इतर प्रकाशित ग्रंथांकडे वळूं. समर्थांच्या प्रकाशित ग्रंथांची यादी पुढें दिल्याप्रमाणें आहे. त्याप्रमाणेंच आम्ही त्या ग्रंथांचें विवेचन करणार आहों:-( १ ) दासबोध, या ग्रंथाचें विवेचन केलेंच आहे, (२) मनोबोध अथवा मनाचे श्लोक, ( ३ ) करुणाष्टकें, ( ४ ) जुना दासबोध, (५) आत्माराम, (६) रामायण, (७) ओंव्या, चवदा शतक, (८) स्फुट ओंव्या, ( ९ ) षड्रिपु, ( १० ) पंचीकरण योग, ( ११ ) चतुर्थमान, ( १२ ) मानपंचक, ( १३ ) पंचमान, ( १४ ) स्फुट प्रकरणें, व ( १५ ) स्फुट श्लोक.

( २ ) मनोबोधः—दासबोधानंतर समर्थांचा सर्वांना माहीत असलेला ग्रंथ म्हणजे मनोबोध अथवा मनाचे श्लोक हा होय. समर्थांचा सुप्रसिद्ध ग्रंथ 'दासबोध' ग्रंथराज या श्रेष्ठ पदवीस पावला असला तरी तो ग्रंथ सामान्य जनांच्या विशेष परिचयाचा नाहीं. समर्थसांप्रदायिकांमध्येंच विशेषतः 'ग्रंथराजा'चें नित्य-नेमानें पठण होतें. मनोबोध हा ग्रंथ महाराष्ट्रांत बहुतेक सर्व साक्षर लोकांच्या परिचयाचा आहे. "मना सज्जना भक्तिपंथेंची जावें ।। २ ।। तनू त्यागितां कीर्ति मागें उरावी ।। ८ ।। जगीं सर्व सूखी असा कोण आहे ।। १२ ।। समर्थाचिया सेवका वक्र पाहे ।। ३० ।। सदा देवकाजीं झिजे देह ज्याचा ।। ४८ ।। दिनाचा दयाळू, मनाचा मवाळू ।। ५६ ।। भजाया जनीं पाहतां राम एकू ।। १३१ ।। नसे सर्व अंगीं सदा वीतरागी ।। १३४ ।। नव्हे पिंडज्ञानें नव्हे तत्त्वज्ञानें ।। १५३ ।। तिन्ही लोक जेथूनि निर्माण झाले ।। १७९ ।।" इत्यादि सुप्रसिद्ध श्लोक पुष्कळ सुशिक्षितांना तोंडपाठ येतात. त्याचप्रमाणें "नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ।।" ( २८–३७ ) हे दहा श्लोक; "जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ।।" हे दहा श्लोक ( ४७-५६ ); "प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ।।" हे दहा श्लोक ( ६७-७६ ); "नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी ।।" हे दहा श्लोक (११६-१२५); "मना सज्जना राघवीं भक्ति कीजे ।।" हे पांच श्लोक (३८-४२); "तुटे वाद संवाद तो हीतकारी ।।" हे पांच श्लोक (१०८-११२); असे हे पन्नास 'सवेल' श्लोक सुशिक्षित लोकांच्या पूर्ण परिचयाचे आहेत. मनोबोधांत एकंदर २०५ श्लोक आहेत. त्यांत कर्म, उपासना व ज्ञान यांचा अगदीं सोप्या पण परिणामकारक व जोरदार भाषेंत मनाच्या द्वारें सर्व वाचकांना उपदेश केला आहे. मनोबोध केव्हां लिहिला हें समजण्यास मनोबोधांत कांहीं साधन नाहीं, तरी तो लिहितांना समर्थ 'जनकजापतिचे लघुसे कवी' खास नव्हते. मनोबोध लिहिला तेव्हां समर्थ काव्यरचनेंत परिणतप्रज्ञ झालेले होते, असें त्यांतील काव्यरचनेच्या सहज गंगौघासारख्या अविरत प्रवाहावरून व गंभीर विषयप्रतिपादनावरून दिसतें. कृष्णातीरीं येऊन चाफळ येथें श्रीरामाची स्थापना झाल्यावर म्हणजे शके १५७० नंतर चाळशी उलटून परिणतप्रज्ञ झाल्यावर मनोबोध लिहिला असावा असें आम्हांस वाटतें. मनोबोध हा महाराष्ट्रवाङ्मयांतील अत्यंत दैदिप्यमान असा कोहिनूर हिरा आहे. श्रीमद्भगवद्गीता जसें संस्कृतांत भगवान् श्रीकृष्णांनीं गाइलेलें उपनिषद् आहे, तसेंच मनोबोध हा मराठींत श्रीसमर्थरामदासस्वामींनीं गाइलेलें उपनिषद् आहे. त्यांत समर्थांनीं अगदीं सोप्या भाषेंत श्रुतिसार आणलेलें आहे. मनोबोधाविषयीं अधिक विवेचन आम्हीं प्रसिद्ध केलेल्या सदर ग्रंथाच्या प्रस्तावनेंत केलें आहे.

( ३ ) करुणाष्टकें:—दासबोध व मनोबोध यांनंतर समर्थांची लोकप्रिय कविता म्हणजे 'करुणाष्टकें' होत. समर्थसांप्रदायिक लोक दासबोध व मनोबोध

ज्याप्रमाणें नित्यनेमानें वाचतात, याप्रमाणें करुणाष्टकें ही नित्यनेमानें वाचतात. समर्थांच्या कांहीं करुणापर कवितेला ‘ करुणाष्टकें ’ हें नांव कां दिलें आहे, व तें कोणीं दिलें याचा कोणत्या ही समर्थचरित्रांत उल्लेख नाहीं. त्या करुणापर कवितांना दिलेलें करुणाष्टकें हें नांव मात्र अन्वर्थक आहे. करुणाष्टकांत करुणाघन—करुणासागर श्रीरामाला समर्थांनीं अत्यंत लीन होऊन परोपरी आळविलें आहे. हीं करुणाष्टकें वाचतांना प्रेमळ भक्ताच्या नेत्रांतून प्रेमाश्रु येऊन तो श्रीरामप्रेमांत समरस होऊन जातो व क्षणभर संसारांतील तापत्रयदुःख विसरून श्रीरामरूपीं विलीन होऊन जातो. समर्थ पंढरपूरच्या श्रीविठ्ठलाच्या वारकरी पंथाचे अनुयायी नव्हते, म्हणून ते अस्सल भक्त नव्हते, असा आक्षेप कित्येक घेतात त्यांस परधर्मी रे. डेमिंगच परभारें पुढीलप्रमाणें उत्तर देतात, तें आक्षेपकांनीं लक्षांत ठेवावें. Some have an impression that Ramadas was not a Bhakta as he did not belong to the Pandharpur movement and the Vedantic note in his teaching was so pronounced. This impression is erroneous and a study of the Swami's poetry reveals that he was no less devoted to Rama than others were to Vithoba......The verses imploring mercy (करुणाष्टकें) and the verses to the mind (मनोबोध) are the sections of the Swami's poetry which emphasise the Bhakti strain most clearly. समर्थांच्या करुणाष्टकांमध्यें भक्तिरस ओतप्रोत भरला आहे, असें समर्थसांप्रदायिकच म्हणतात असा आक्षेप येऊं नये म्हणून बिनसांप्रदायी हिंदु विद्वानांचा ही अभिप्राय न देतां, परधर्मी मिशनरी डेमिंगसाहेबांचा अभिप्राय आम्हीं दिला आहे.

या समर्थकृत करुणापर कवितांना अष्टकें ही संज्ञा कां दिली हें समजत नाहीं. सर्व सुप्रसिद्ध करुणाष्टकें आठ श्लोकांचीं आहेत असें नाहीं. ‘ अष्टकें ’ या शब्दास येथें विशेष संख्यावाचक अर्थ नाहीं. अष्टक म्हणजे आठ श्लोकांची कविता असा मुळींच अर्थ नाहीं. ‘रामदास व रामदासी’च्या १०व्या भागांतील सर्व अष्टकें आठ श्लोकांचीं नाहींत, एवढेंच नव्हे तर सांप्रदायिकांनीं नित्यपाठांत म्हणून निवडलेल्या व समर्थांच्या समग्र ग्रंथांत ‘करुणाष्टकें’ या सदराखालीं म्हणून छापलेल्या आठ अत्युत्तम अष्टकांमध्येंसुद्धां सर्व अष्टकें आठ श्लोकांचीं नाहींत. सदरहू सुप्रसिद्ध आठ अष्टकांमध्यें ‘ तुझा दास मी व्यर्थ जन्मास आलों ’ हें एकच अष्टक आठ श्लोकांचें आहे. बाकीच्या सात अष्टकांपैकीं ‘ अनुदिनिं अनुतापें तापलों रामराया ’ हें प्रथम घेतलेलें सुप्रसिद्ध अष्टक पंधरा श्लोकांचें आहे. ‘ नसे भक्ति ना ज्ञान ना ध्यान कांहीं ’ हें अष्टक फक्त सहा श्लोकांचें आहे. ‘ रघूनायका मागणें हें चि आतां ’ हे अष्टक नऊ श्लोकांचें आहे. ‘ बुद्धि दे रघुनायका ’ हे अष्टक वीस

अनुष्टुप् श्लोकांचें आहे. या अष्टकाविषयीं विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी अशी गोष्ट आहे कीं, हें अष्टक करुणाष्टकें म्हणून छापलेल्या ' रामदास व रामदासी'च्या १० व्या भागांत दिलेलें नाहीं. तिसऱ्या भागांत स्फुट प्रकरणांमध्यें हें अत्युत्तम अष्टक दिलेलें आहे. ' उदासीन हा काळ कोठें न कंठे ' या सहाव्या अष्टकांत दहा श्लोक आहेत. 'रघूनायका काय कैसें करावें' या सातव्या अष्टकांत फक्त पांचच श्लोक आहेत. ' तुजवीण रामा मज कंठवेना ' या सांप्रदायिकांच्या आठव्या अष्टकांत दहा श्लोक आहेत. यांवरून सांप्रदायिकांच्या नित्यपाठांतल्या आठ अष्टकांत ८३ श्लोक आहेत असें दिसून येईल. तेव्हां सृष्टिकर्त्या दयाघन परमेश्वराची करुणा भाकण्याकरितां समर्थांनीं केलेल्या या करुणापर श्लोकांना करुणाष्टकें हें नांव कां देण्यांत आलें हें समजत नाहीं. श्रीमत् शंकराचार्य यांनीं कांहीं देवतांवर स्तोत्रें केलीं आहेत तीं ' बृहत्स्तोत्ररत्नाकरां 'त प्रसिद्ध झालेलीं आहेत. त्या स्तोत्रांपैकीं कांहीं स्तोत्रांना अमुक देवताष्टकम् अशी संज्ञा दिली आहे, ती मात्र अन्वर्थक आहे. सदरहु स्तोत्रांत आठ श्लोक त्या त्या देवतेचे स्तुतिपर असून नवव्या श्लोकांत तीं देवतास्तोत्रें नित्य म्हटल्यापासून होणारी फलश्रुति दिली आहे. जगच्चालक दयाघन परमेश्वराची करुणा भाकण्याकरितां केलेली करुणापर कविता ती 'करुणाष्टकें' कविता असें वर स्थूल दृष्टीनें म्हटलें आहे. करुणाष्टकें यांतील करुणा हा शब्द दुहेरी अर्थानें योजिला आहे असें दिसतें. म्हणजे ज्या कवितेंत संसाराचा वीट येऊन करुणाघन परमेश्वराची करुणा भाकलेली आहे व ज्या कवितेंत करुणारस प्रधान आहे, म्हणजे जी म्हणतांना कविता म्हणणाऱ्याच्या मनाला गहिंवर येऊन त्याच्या नेत्रांतून प्रेमानें अगर भक्तीनें अश्रुधारा वाहतात, ती कविता करुणाष्टकें होत. ' उदासीन हा काळ कोठें न कंठे ' या अष्टकांतील तिसऱ्या श्लोकांत म्हटल्याप्रमाणें:—" नव्हे धीर नैनीं सदा नीर लोटे " अगर १३४व्या अष्टकांतील ७७व्या श्लोकांत म्हटल्याप्रमाणें—"परम कोमळ राम कठीण कां । दिन दयाळ दया नुपजेचि कां ॥ मज बहूत उदासिन वाटलें । न धरितां नयनीं निर लोटलें ॥ १ ॥ " अथवा १५ व्या अष्टकांतील १७ व्या श्लोकांत म्हटल्याप्रमाणें—"हुर हुर हुर वाटे अंतरीं बाष्प दाटे । तुजविण रघुनाथा लोचनीं नीर लोटे ॥ १ ॥ " अशी करुणाष्टकें म्हणणाऱ्याच्या मनाची स्थिति झाली पाहिजे. श्रीरामासमोर ही करुणापर कविता म्हणतांना रामभक्तांच्या अंगावर सुप्रसिद्ध सात्त्विक भाव उत्पन्न होतात म्हणून या समर्थकृत करुणापर कवितांना करुणाष्टकें हें सर्वतोपरी अन्वर्थक नांव दिलें असावें असें आम्हांस वाटतें. ते अष्ट सात्त्विक भावः—( १ ) स्तंभ, ( २ ) स्वेद, ( ३ ) रोमांच, ( ४ ) लय, ( ५ ) ऐश्वर्य, ( ६ ) वेपथु, ( ७ ) अश्रु व (८) वैवर्ण्य, हे होत. वैदिक काळीं प्राचीन ऋषींनीं परमेश्वराची स्तुति केली ती आठ ऋचांमध्यें होती, म्हणून ईशस्तवनपर कवितेस

करुणाष्टकें म्हणूं लागले असें कित्येकांचें मत आहे. करुणाष्टकांविषयीं सविस्तर विवेचन आम्हीं विविधज्ञानविस्ताराच्या स. १९२५ च्या जुलई पासून पुढील अंकांत केलें आहे तें वाचकांनीं पाहावें.

( ४ ) जुना दासबोधः—दासबोध, मनोबोध व करुणाष्टकें हे तीन ग्रंथ जसे सांप्रदायिकांच्या नित्यपाठांतले आहेत, तसा जुना दासबोध ( एकवीस समासी ) हा पुष्कळ सांप्रदायिकांच्या नित्यपाठांतला आहे. सज्जनगडच्या यात्रेंत एकदां एक रामदासी आम्हांस भेटले. त्यांच्या नित्यपठनांत जुना दासबोधच होता. तो वाचून वेळ राहिल्यास ते ग्रंथराज दासबोध वाचीत. शके १५६६ सालीं कृष्णातीरीं आल्यावर लागलीच एकवीस समासी म्हणजे जुना दासबोध लिहिला असावा व जेव्हां शिष्यसंप्रदाय वाढूं लागला, तेव्हां दोनशें समासी ग्रंथराज दासबोध लिहिण्यास आरंभ करून तो शके १५८१ सालीं संपविला. जुन्या दासबोधांतील चार समास नव्या दासबोधांत जशाचे तसे घेतले आहेत ( ४ सद्‌गुरुलक्षण, ५ सच्छिष्यलक्षण, ६ वैराग्यलक्षण व ८ आत्मनिवेदन ). जुना दासबोध समर्थांचा नसून श्रेष्ठांचा आहे असें प्रतिपादन महाराष्ट्रभाषाचित्रमयूर कै. कृ. ना. आठल्ये यांनीं केलें आहे ( समर्थांचें सामर्थ्य, पान ६४८ ). जुन्या दासबोधांत कांहीं समासांच्या शेवटीं 'रामीरामदास' असें आहे, म्हणून तो समर्थांचा नसावा असें कै. आठल्ये म्हणतात. परंतु समर्थांना अनेक नांवें होतीं, त्यांत रामीरामदास हें ही एक नांव होतें हें त्यांना माहीत नसावें असें दिसतें. स्वतः आठल्ये यांनीं आपल्या पुस्तकांत समर्थांची निःसंशय कविता म्हणून कांहीं वेंचे दिले आहेत, त्यांत कांहीं अभंगाच्या शेवटीं 'रामीरामदास म्हणे' असें आहे. जुन्या दासबोधांतील पांच समासांत ( १, ९, १५, १६ व २० ) 'रामदास' असें शेवटीं म्हटलें आहे. तिकडे कै. आठल्ये यांचें लक्ष गेलें नाहीं असें दिसतें. दुसऱ्या समासांतील पुढील ओंव्यांवरून जुना दासबोध समर्थांचाच हें निःसंशय सिद्ध होतें:—"ऐसा सर्वात्मा राजाधीश। सकल पाहती सावकाश ॥ तेथें पिसाट रामदास। उभा असे दीनरूप ॥ १ ॥ रामचंद्रा तुझा वियोग। ऐसा नको रे प्रसंग ॥ तुजकारणें सर्वसंग। त्यक्त केला ॥ २ ॥" हें वर्णन गृहस्थाश्रमी श्रेष्ठांना मुळींच लागू पडत नाहीं. कै. आठल्ये यांच्या म्हणण्याचें सविस्तर खंडन आम्ही विविधज्ञानविस्तार, अंक ऑगष्ट, सन १९२७ यांत केलें आहे.

( ५ ) आत्मारामः—समर्थांचा 'आत्माराम' नांवाचा एक छोटा ग्रंथ आहे. तो अध्यात्मदृष्टीनें फार महत्त्वाचा आहे. परंतु सामान्य जनास त्याची फारशी माहिती नाहीं व सांप्रदायिकांच्या ही नित्यपाठांत तो आढळून येत नाहीं. परंतु समर्थांना तो दासबोधाइतका महत्त्वाचा वाटत होता, हें त्यांच्या अंतकालच्या उद्गारांवरून दिसून येतें. समर्थांचा अंतकाल समीप येत चालला, तेव्हां जवळची शिष्य मंडळी खिन्न झाली. समर्थांच्या सगुण मूर्तीला व उपदेशाला आतां कायमचे

अंतरणार म्हणून सर्वांना दुःख वाटूं लागलें. त्या वेळीं समर्थ म्हणाले:—“ आत्माराम दासबोध । माझें स्वरूप स्वतःसिद्ध ।। असतां, न करावा हो खेद । भक्तजनीं ।। १ ।। ” आत्माराम ग्रंथ फार लहान आहे. त्याचे पांच समास आहेत व त्यांत १८२ ओंव्या आहेत. ज्ञानेश्वरमहाराजांचा ‘अमृतानुभव’ ग्रंथ ज्ञानेश्वरीहून फार लहान आहे. त्याप्रमाणें समर्थांचा आत्माराम ग्रंथ दासबोधाहून फार लहान आहे. परंतु तो फार महत्त्वाचा आहे. दुसऱ्या समासांत मायेचें सर्वोत्कृष्ट वर्णन आहे. तिसऱ्या समासांत चक्रव्यूहाच्या व सारीपाटाच्या दृष्टांतानें संसाराची क्षणभंगुरता उत्तम रीतीनें वर्णन केली आहे. ग्रंथ मनन करून वाचण्यासारखा आहे. दासबोधांतील वीस दशकांचा बोध ऐकून ही कांहीं शिष्य कोरडेच राहिलेले समर्थांना आढळून आले, तेव्हां त्यांच्यासाठीं ‘ आत्माराम’ ग्रंथ समर्थांनीं लिहिला असें श्री. देव म्हणतात. ( प्रस्तावना, स. प्र., पृ. ५२ )

( ६ ) रामायणः—समर्थांचें रामायण हा ग्रंथ फार महत्त्वाचा आहे. प्रकाशित ग्रंथांमध्यें रामायणाचीं सर्व कांडें नाहींत. फक्त तीनच कांडें आहेत:–(१) किष्किंधाकांड, ( २ ) सुंदरकांड, ( ३ ) युद्धकांड. परंतु किष्किंधाकांड हें समर्थांचें नव्हे असें दिसतें. कारण चाफळ, सज्जनगड, डोमगांव व टाकळी येथील सुप्रसिद्ध मठांमध्यें सांपडलेल्या बाडांत तें नाहीं. तंजावर मठाधिपति भीमस्वामीकृत समर्थचरित्रांत पुढील ओंव्या आहेत:–“ सुंदर कांडाचे केले शतश्लोक । युद्धकांड देख तेरा शतें ।। १ ।। ऐसें चौदा शतें केलें रामायण । जयाच्या श्रवणें दोष जाती ।। २ ।। ” कल्याणस्वामी हे समर्थ-कवितेचे सुप्रसिद्ध लेखक. त्यांच्या बाडांत ही सुंदर व युद्ध अशीं दोनच कांडें आहेत; व युद्ध कांडाच्या शेवटीं रामायण श्लोकसंख्या १४९२ दिली आहे तीवरून समर्थांनीं वरील दोनच कांडें लिहिलीं असावींत असें दिसतें. समर्थांचें उपास्य दैवत श्रीराम, समर्थांना अनुग्रह श्रीरामापासून झाला, असें असतांना रामायणांतील बाकीच्या पांच कांडांवर ( म्हणजे बालकांड, अयोध्याकांड, अरण्यकांड, किष्किंधाकांड व उत्तर कांड यांवर ) समर्थांनीं कविता कां केली नाहीं हें समजत नाहीं. स्फुट काव्यांत समर्थ म्हणतात:–“ रामदास म्हणे माझा । रामस्वामी दयानिधी ।। सोडिले बंध देवांचे । तो हा त्रैलोक्य-नायक ।। ” यावरून श्रीरामचरित्रांतील देवांना रावणाच्या बंदिशाळेंतून मुक्त केलेल्या भागावरच कविता करण्याचा समर्थांचा मनोदय होता असें दिसतें. समर्थांचे इतर ग्रंथ स्वतंत्र आहेत. पूर्वेतिहासावरून लिहिलेला हाच कांडद्वयात्मक ग्रंथ आहे. त्यांत वीररस उत्तम साधला आहे. महाराष्ट्रांतील बालगोपालांना लहानपणीं शिकविण्यास तो उत्तम काव्यग्रंथ आहे.

( ७ ) ओंव्या शतकें:—धुळ्याच्या सत्कार्योत्तेजक सभेनें ‘ श्रीरामदासांची कविता, प्रथमकांड ’ हा भाग प्रसिद्ध केला आहे. तो भाग कल्याणस्वामींच्या

हातच्या बाडावरून प्रसिद्ध केला आहे. त्यांत दिलेल्या क्रमावरून आम्ही त्यांतील ग्रंथाचें विवेचन करीत आहों, व त्यांत दिलेल्या क्रमानेंच समर्थांनीं ग्रंथरचना केली असावी असें दिसतें.

ओंव्या शतकें चवदा आहेत. प्रत्येक प्रकरणांत शंभर ओंव्या अशीं चवदा प्रकरणें आहेत. एकंदर ओंवीसंख्या १४०० आहे. ग्रंथमंच्या नमनामध्यें " ओंवीचे आरंभीं । वंदूं विनायक । बुद्धीचा दायक । लोकांमध्यें ॥ १ ॥ " असा आरंभ केला आहे. पहिल्या शतकाच्या आरंभीं, " नमन योगीराया । स्वामी दत्तात्रया । गाईन ओंविया । संसाराच्या ॥ १ ॥ " असा आरंभ केला आहे. येथें ग्रंथारंभीं दत्तात्रयांचें कां नमन केलें आहे तें समजत नाहीं. पहिल्या अकरा शतकांमध्यें संसाराच्याच ओंव्या आहेत. बाराव्या शतकांत प्रयत्न–प्रारब्ध-वादाचें मार्मिक वर्णन आहे व त्यांत प्रारब्धापेक्षां प्रयत्न थोर असें सिद्ध केलें आहे. तेराव्या शतकांत श्रीरामचरित्र व चवदाव्या शतकांत श्रीकृष्णचरित्र अशीं दोन चरित्रें संक्षिप्त रीतीनें वर्णिलीं आहेत.

( ८ ) स्फुट ओंव्याः—या प्रकरणास स्फुट ओंव्या कां म्हटलें हें समजत नाहीं. हें प्रकरण अभंगाच्या धाटीवर आहे व शेवटीं अभंगाप्रमाणें 'दास म्हणे' असें आहे. असे लहानमोठे ३२८ अभंग आहेत. अभंग ( १ ) यांत सीतास्वयंवराची कथा थोडक्यांत दिली आहे. अभंग (२) मध्यें "काया माया छाया हे कांहीं टगेना। वैभव जगेना जन्मवरी ॥ " याप्रमाणें संसाराची क्षणभंगुरता वर्णन करून पुढें अध्यात्म सांगण्यास सुरुवात केली आहे. या प्रकरणांत अनेक प्रकारचे विषय आले आहेत. "संतसंगें देव पाविजे तत्त्वता । शास्त्रें धुंडाळितां आढळेना ॥" असें सांगून पुढें "हेळामात्रें मुक्त करीन या जना । तरीच पावन राघवाचा ॥ १ ॥ येणें काळें मोक्ष जरी मी देईना । दास म्हणवीना राघवाचा ॥ २ ॥ " असें म्हटलें आहे. केवढा आत्मविश्वास हा ! अभंग ( १४ ) यांत समर्थसंप्रदायाचीं वीस लक्षणें दिलीं आहेत. "प्रथम लिहिणें दुसरें वाचणें । तिसरें सांगणें अर्थांतर ॥ १ ॥" इत्यादि. हीं सर्व लक्षणें पुढें 'समर्थसंप्रदाय' या भागांत दिलीं आहेत. "लोकांमध्यें तरे आणि जनां तारी । धन्य तो संसारीं दास म्हणे ॥ प्रवृत्ति सासुरें निवृत्ति माहेर । तेथें निरंतर मन माझें ॥ कां वो रामराये दुरी धरीयेलें । कठिण कैसें झालें चित्त तूझें ॥ १ ॥ पतीतपावना जानकीजीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥ २ ॥" इत्यादि सुप्रसिद्ध अभंग याच भागांत आहेत.

( ९ ) षड्रिपुः——कामक्रोधादि षड्रिपूंचें वर्णन थोडक्यांत फार मार्मिकपणानें केलें आहे. तें वाचकांनीं मुळावरून सर्व वाचावें. काम, क्रोध, मद, मत्सर व दंभ यांचें वर्णन झाल्यावर लोभाच्या ऐवजीं 'प्रपंच' हा सहावा रिपु कल्पून त्याचें वर्णन केलें आहे.

(१०) पंचीकरण योग, (११) चतुर्थमान, (१२) मानपंचक व (१३) पंचमान, हीं चार छोटीं प्रकरणें अध्यात्मपर आहेत. त्यांत दासबोधांतील विषयांचें प्रतिपादन केलें आहे. समर्थांचीं सर्व स्फुटें वाचल्यावर दासबोधांतील कांहीं भागावर चांगला प्रकाश पडतो. चतुर्थमानांतील, 'ते ब्रह्म जाणता भले।' (मान २) व "मायातींत निरंजनु" (मान ४), 'मानपंचकां'तील रामराज्यवर्णन, (मान १) व पंचमानांतील "विवेकी जाणते घेती। सारासर विचारणा" (मान ४), हीं प्रकरणें फार उत्तम आहेत.

(१४) स्फुट प्रकरणें:—हीं फार महत्त्वाचीं आहेत. हीं एकंदर ६९ आहेत. समर्थांना 'महाराष्ट्रधर्मप्रणेते' हें नांव अन्वर्थक रीतीनें दिलें आहे. महाराष्ट्रधर्माचीं बरींच तत्त्वें या स्फुट प्रकरणांत दिलीं आहेत. दिग्दर्शनार्थ कांहीं उतारे देतों:—

"(१) यत्नाचा लोक भाग्याचा। यत्नेंवीण दरिद्रता। उमजला लोक तो धाला। उमजेना तो हपापिला ॥ १ ॥ इत्यादि. (२) भाग्यासि काय ऊणें रे। यत्ना वांचूनि राहिलें। यत्न तो करावा कैंचा। हेंचि आधीं कळेचिना ॥१॥ मुख्य यत्न विचाराचा। त्यावरी बोलणें बरें ॥ चालणें सत्य नेमाचें। नीति न्याय चुकों नये ॥ २ ॥ ...... करंटे मिळाले सर्वे। जो तो बुद्धीच सांगतो। सांगावें तें आपणांला। आपणू करितां बरें ॥ ७ ॥ इत्यादि. (३)........प्रत्यहीं मागणें भिक्षा। मिळाली न मिळाली तरी। नित्य नूतन हिंडावें। धुंडावे भक्त प्रेमळ ॥ ६ ॥......सर्व लोक शोधावे। बोधावे भक्तिच्या गुणें ॥ राहावें दुर्बळाचेथें। देवाल्यें वा नदीतिरीं ॥ ८ ॥......सहावी शीतउष्णादि। पाहवीं रम्यशीं स्थळें। करावे आपणाचि कष्ट। बोधावी ते हळूहळू ॥ १० ॥ ओळखी कराव्या दाटा। एके ठायीं स्थिरों नये ॥ वादवीवाद तो खोटा। दाटावा मद मत्सर ॥ ११ ॥.........अत्यंत साक्षपी व्हावें। न व्हावें आळशी कदा ॥ घ्यावा या देहाचा लाहो। जायाचें हें म्हणोनिया ॥१८॥ ......पुण्यमार्ग प्रतिष्ठावा। लावावी धर्मवासना। देवाल्यें करावीं मोठीं। वापी कूप सरोवरें ॥ २० ॥ इत्यादि. (५)........भक्ताला काय ऊणें रे। देव त्रैलोक्य वर्तवी ॥ तो देव आपुला झाला। वैभवा कोण पूसतें ॥११॥......... रामदास म्हणे माझा। रामस्वामी दयानिधी ॥ सोडिले बंध देवांचे। तो हा त्रैलोक्य-नायकू ॥ २० ॥ (२०)......जाणणें नीति न्यायाचें। सत्य नेमस्त बोलणें ॥ यत्नाचा साक्षपी प्राणी। तो एक भाग्य मेळवी ॥ ३ ॥" इत्यादि. स्फुट प्रकरण (२३) यांत, "युक्ति नाहीं बुद्धि नाहीं। विद्या नाहीं विवेकिता ॥ नेणता भक्त मी तूझा। बुद्धि दे रघुनायका ॥ १ ॥" हें वीसश्लोकी करुणाष्टक कां दिलें आहे तें समजत नाहीं. हें करुणाष्टक समर्थ जांबेहून लग्नसमारंभांतून पळून

पंचवटींत गेल्यावर तपश्चर्याकालच्या आरंभीं लिहिलें असावें असें यांतील रामास केलेल्या प्रार्थनेवरू। दिसतें, असें आम्हीं मागें 'तपश्चर्या' भागांत सांगितलें आहेच. समर्थांचा देव जो 'यत्न' त्याचें उत्कृष्ट वर्णन स्फुट (३०) यांत आहे. तें सबंध मुळांतून वाचावें. थोडा भाग देतों......."केल्यानें होत आहे रे। आधीं केलेंचि पाहिजे ॥ यत्न तो देव जाणावा। अंतरीं धरितां बरें ॥ ४ ॥ अचूक यत्न तो देवो। चुकणें दैत्य जाणिजे ॥ न्याय तो देव जाणावा। अन्याय राक्षसी क्रिया ॥ ५ ॥ सावधु देव जाणावा। उन्मत्तु दैत्य जाणिजे ॥ होरट्या दैत्य जाणावा ॥ देव तो सौख्यदायकु ॥ ६ ॥ राक्षसी अंश देवाचे। आळशी वंश दानवी" इत्यादि. स्फुट (३९) यांत गायनी कलेचें महत्त्व दिलें आहे. लोकसंग्रहाला गायन फार उपयोगी पडतें म्हणून समर्थांनीं आपल्या संप्रदायलक्षणांत गायनकलेस स्थान दिलें आहे. (सहावें गाणें इत्यादि.) "संगीत गायनी विद्या। सर्व सद्या मनोरथा ॥ विदेश पाहतां नाहीं। धन्य ते गायनी कळा ॥ १ ॥ आवडी सकळै लोकां। प्रीतीनें भजती जनीं। इच्छिलें पुर्वि ती सवैं। धन्य ते गायनी कला ॥ २ ॥ एकाकी महंती येते। उदंड कीर्ति वाढते ॥ विख्यात सकळै लोकीं। धन्य ते गायनी कळा ॥ ३ ॥ राहती लोक ते राजी ॥" इत्यादि. सुप्रसिद्ध 'आनंदवन-भुवन गीत' हें (५८) स्फुटांत दिलें आहे. हें प्रकरण महत्त्वाचें असल्यामुळें परिशिष्ट (ब) यांत सबंध दिलें आहे. यास कोणी समर्थांचें भविष्यपुराण म्हणतात. कारण पुढें होणाऱ्या गोष्टींचें कथन या गीतांत आधींच केलें होतें असें म्हणतात. स्फुट (६७) फार महत्त्वाचें आहे. यांत 'राजकारण' शब्द नाहीं, परंतु समर्थ हे राजकारणी संत होते हें यावरून सिद्ध होतें. तें फार मोठें आहे. दिग्दर्शनार्थ थोडा भाग देतों:........"शक्तीनें पावती सुखें। शक्ति नसतां विटंबना। शक्तीनें नेटका प्राणी। वैभवें भोगिता दिसे ॥ २६ ॥ कोण पुसे अशक्ताला। रोगीसे तो बराडी दिसे ॥ कळा नाहीं कांती नाहीं। युक्ति बुद्धि दुरावली ॥ २७॥ साजिरी शक्ती तों काया। काया मायाचि वाढवी ॥ शक्ती तों सर्व ही सूखें। शक्ती आनंद भोगवी ॥ २८ ॥ सार संसार शक्तीनें। शक्तीनें शक्ति भोगिजे ॥ शक्ती तो सर्व ही भोगी। शक्तीवीण दरिद्रता ॥ २९ ॥ शक्तीनें मिळती राज्यें। युक्तीनें यत्न होतसे ॥ शक्ति युक्ति जये ठायीं। तेथें श्रीमंत धांवती ॥ ३० ॥ फितव्यानें बुडती राज्यें। खबरदारी असेचिना ॥ युक्ति ना शक्ति ना बेगी[१]। लोक राजी असेचिना ॥ ३४ ॥" इत्यादि.

(१५) स्फुट श्लोकः—समर्थांचे स्फुट श्लोक स्फुट प्रकरणाच्या जवळ जवळ निम्मे आहेत. यांत ६१ भाग आहेत. यांत ही समर्थांचा महाराष्ट्रधर्म प्रतिपादन

१. वेळेवर.

करणारी बरीच कविता आहे. ( ८ ) "अखंड सावधान रे । प्रयोग प्रयत्न मान रे । प्रसंग हा तुफान रे । नकोचि वेवधान रे ॥ इत्यादि ( १२ )......प्रसंग हा तडातडी । करा विवेक तातडी ॥ सुचित व्हा घडोघडी । प्रबोध घ्या खडाखडी ॥ ३ ॥ ( २९ ) देशकाळ वर्तमान । सर्व ही अवेवधान ॥ कोणतें ही विधी विधान । सावधान सावधान ॥ १ ॥ इत्यादि. प्रसंग रंग भंगवी । सदा सभा विरंगवी ॥ तया नराकडे कवी । हुषार खूण पालवी ॥ १ ॥ अखंड गुप्त पंथ हा । चतुर हो पहा पहा ॥ मनें मनास मीळणी । गुणास जाणती गुणी ॥ ५ ॥ ( ३९ ) विना प्रचीत ते तुला । फळेल काय रे मुला । उगाचि शीण वाउगा । बळेंचि होतसे दगा ॥ २ ॥......विचार सार तो धरे । परांतराशि बीवरे । कवी म्हणे भला भला । विवेक त्यास लाभला ॥ ५ ॥" (५८) यांत श्रीरामचरित्र ( रामरावण-युद्ध ) व ( ५९ ) यांत श्रीकृष्णचरित्र ( गोकुळचरित्र) अशीं दिलीं आहेत. या रामचरित्रास 'लघु रामायण' अशी संज्ञा आहे. त्यास 'रामायणयुद्ध' अशी ही संज्ञा आहे. यांत रामरावणयुद्धाचें वर्णन आहे. त्यांत वीररस चांगला साधला आहे. गोकुळवर्णनांत समर्थांच्या इतर वाङ्मयांत कोठें ही दृग्गोचर न होणारी थोडी शृंगाररसाची छटा दिसून येते. स्त्रियांच्या अवयवांचें वर्णन करूं नये असें दासबोधांत समर्थ म्हणतात. परंतु श्रीकृष्णगोपीक्रीडावर्णन करतांना समर्थांनीं 'नियमाः खलु सापवादाः' नियमाला अपवाद हा असावयाचाच, हें सिद्ध करण्याकरितां शृंगाररसाची थोडी चुणूक दाखविली आहे; व ती उत्तम साधली आहे. "रुपें रसाळ सुंदरी । बिभूषणें परोपरी ॥ भरें तरुण बालिका । सुढाल रत्न-मालिका ॥ २६ ॥ प्रवाळ नीळ माणिकें । बहु प्रकार आणिकें ॥ सुवर्ण रत्न भूषणें । सुरंग रंगलीं गुणें ॥ २७ ॥ चिरेंचिरें मनोहरें । बहुत प्रकार सुंदरें ॥ जाडित जाड भूषणें । झणाणिती विभूषणें ॥ २८ ॥ घवघवीतसे कळा । विशेष केश कुंतळा ॥ सुवास वास कस्तुरी । विलास ती कृशोदरी ॥ २९ ॥......बहूत जाणती कळा । विशेष कामकुशळा ॥ आवेश शुद्ध आणती । सुनयन बाण हाणती ॥ ३२ ॥ गुणें चतुर नेटक्या । तटतटीत कंचक्या ॥ सुढाल कांति कोमळा । वधू चकीत वीकळा ॥ ३३ ॥ विलोकितांच नेटका । मृगेंद्र लाजवी कटा ॥ गतीस हंस मंदले । मृगाक्ष ही विनोदले ॥ ३४ ॥...विलासती उमा रमा । तयासमान उत्तमा ॥ पवित्र शुद्ध निर्मळा । चटक दाविती कळा ॥ ३६ ॥ गुणी समस्त गायका । चकीत अष्टनायका ॥ सुरांसि सौख्यदायका । मयंक तूळिता फिका ॥ ३७ ॥" इत्यादि. यांत स्त्रियांच्या अवयवांना मृगमृगेंद्रांच्या उपमा दिल्या आहेत, त्यांवरून समर्थांनीं पंचवटींत भागवतादि काव्याबरोबर कालिदासप्रभृति महाकवींचीं काव्यें ही वाचलीं असावींत असें वाटतें.

वर ( १ ) दासबोध ते ( १५ ) स्फुट श्लोकपर्यंत समर्थांच्या कवितेचें

विवेचन केलें आहे. त्यांत (४) जुना दासबोध व (५) आत्माराम यांशिवाय सर्व कविता धुळें सत्कार्योत्तेजक सभेनें 'रामदास आणि रामदासी' या मालेंत प्रसिद्ध झाली आहे. पुढें समर्थकवितेचें आम्हीं जें विवेचन करणार आहों ती कविता समर्थांचे समग्र ग्रंथ, समर्थांची गाथा इत्यादि इतर ग्रंथांत प्रसिद्ध झाली आहे.

( १६ ) पंचकें:—'पंचकें' या नांवानें समर्थांची जी कविता प्रसिद्ध आहे ती अभंगपर आहे. त्या कवितेस 'पंचकें' हें नांव कां दिलें तें समजत नाहीं. सर्व अभंगांतील चरण पांचच आहेत असें नाहीं. पंचकांचें वर्गीकरण करून त्यांना, ' भ्रमपंचक, ' ' उन्मत्तपंचक, ' ' कलियुगपंचक, ' ' होळीपंचक ' इत्यादि जीं नांवें दिलीं आहेत तीं फार मार्मिकपणानें दिलीं आहेत. तुकारामांच्या अभंगांप्रमाणें समर्थांचे या पंचकांतील अभंग फार लोकप्रिय झाले आहेत:—"ऐसें कैसें रे सोंवळें । शिवतां होतसे ओंवळें ॥ ( उडवणीपंचक ) आलें भगवंताच्या मना । तेथें कोणाचें चालेना ॥ (कलियुगपंचक) डोळे चिरीव चांगले । वृद्धपणीं सरक्या झाले ॥ काळ जातो क्षणक्षणा ॥ मूळ येईल मरणा ॥ ( प्रास्ताविक पंचक ) कांहीं दिसे अकस्मात । तेथें वाटे आलें भूत ॥ वाजे पाऊल आपलें । म्हणे मागें कोण आलें ॥ ( भ्रमपंचक ) मज गांजिलें तें साहे । परि भक्तांचें तें न साहे ॥ " इत्यादि पंचकांचा कीर्तनांमध्यें हरिदास उपयोग करितात. तीं फार मार्मिक आहेत म्हणून लोकप्रिय झालीं आहेत.

( १७ ) राममंत्राचे श्लोक हे एकंदर ४९ आहेत. प्रत्येक श्लोकाच्या अखेर " हरे राम हा मंत्र सोपा जपा रे " असें आहे. हे श्लोक ही लोकप्रिय आहेत व सांप्रदायिकांच्या व हरिदासांच्या परिपाठांतले आहेत:—"तुला ही तनू मानवी प्राप्त झाली । बहू जन्म पुण्यें फळालागीं आली । तिला तूं कसा वीषयीं गोंविसी रे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥ ३ ॥ " विस्तारभयास्तव उदाहरणार्थ एकच श्लोक दिला आहे.

( १८ ) भीमरूपी स्तोत्रें:—हीं बारा आहेत. तीं सांप्रदायिकांच्या नित्य पाठांतील आहेत. पहिलें स्तोत्र—" भीमरूपी महारुद्रा । वज्र हनुमान मारुति ॥ वनारी अंजनी सूता । रामदूता प्रभंजना ॥ १ ॥" इत्यादि १६ चरणांचें स्तोत्र सर्वांच्या विशेष परिचयाचें आहे.

( १९ ) पंचसमासी:—हें प्रकरण पांच समासांचें लहान आहे. यांत पहिल्या समासांत शिष्यानें ' ज्ञानप्रबोध ' करण्याची विनंति केल्यावरून दुसऱ्या समासांत आत्मज्ञानाचें निरूपण केलें आहे. तिसऱ्या समासांत 'साधनलक्षण' सांगून चवथ्यांत नवविधाभक्ति थोडक्यांत सांगितली आहे. पांचव्यांत ' आत्मनिवेदन ' झाल्यावर आपण रामरूप कसे होतों याचें वर्णन आहे.

(२०) अंतर्भावः—यांत सहा समास आहेत. म्हणून या छोट्या प्रकरणांस 'सहा समासी' असें नांव द्यावें असें आम्हांस वाटतें. यांत ही 'पंच समासी' प्रमाणें शिष्यांच्या विनंतीवरून आत्मज्ञान सांगितलें आहे. तिसऱ्या समासांत नित्य-नेमाची महती उत्तम प्रकारें सांगितली आहे. ती वाचकांनीं अवश्य वाचावीः—"नित्यनेम दृढ चित्तीं। तेणें शुद्ध चित्तवृत्ति॥ होवोनि भगवंतीं। मार्ग फुटे॥ १॥ नित्यनेमें सत्त्व चढे। नित्यनेमें शांति वाढे॥ नित्यनेमें थार मोडे। देहबुद्धीचा॥ २॥" इत्यादि पंचसमासी व सहासमासी हीं दोन लहान काव्यें कृष्णातीरीं आल्यावर लागलीच एकवीस समासीच्या आधीं रचलीं असावींत असें आम्हांस वाटतें.

(२१) पूर्वारंभग्रंथः—या नांवाचें ६० ओव्यांचें एक अगदीं छोटें प्रकरण आहे. त्यांत फक्त एकच समास आहे, म्हणून त्यास आम्हीं 'एकसमासी' म्हणतों. हें प्रकरण प्रश्नोत्तररूपी आहे. शिष्यानें प्रश्न विचारले आहेत व त्याचीं उत्तरें लागलीच दिलीं आहेत. "गुरुवचनीं विश्वास। धरितां तुटे भवपाश॥ विनवी रामी रामदास। लडिवाळपणें॥ ६०॥ इति श्रीपूर्वारंभः समाप्तः" असें म्हणून या छोट्या प्रकरणाचा शेवट केला आहे. यास पूर्वारंभ असें नांव दिलें आहे. तेव्हां कृष्णातीरीं आल्यावर पंचसमासीच्या ही आधीं हें लिहिलें असावें असें वाटतें.

(२२) मानसपूजाः—या नांवाचें एक तेरा समासी लहान प्रकरण आहे. त्यास 'मानसपूजा' हें नांव कां दिलें तें नीट समजत नाहीं. यांत प्रथम पवित्र स्थळें, वृंदावनें स्वच्छ ठेवावींत, नंतर धीर, उदार, दक्ष, तत्पर, राजकारणी लोक असावेत असें सांगितलें आहे. नंतर स्वयंपाकिणी कुशल असाव्यात व त्यांनीं नाना प्रकारांचे पदार्थ उत्तम करावेत, असें सांगितलें आहे. नंतर पूजा, आरती करून भोजन झाल्यावर मृदंगटाळांच्या घोषांत कीर्तन करावें असें सांगून शेवटीं "ऐसी मानसपूजा करावी। मूर्ति अंतरीं धरावी॥ दास म्हणे विवरावी। उपासना॥" असें म्हणून हें प्रकरण संपविलें आहे. शेवटच्या ओंवीवरून यास मानसपूजा असें नांव दिलें असावें असें वाटतें. यांशिवाय (२३) जन-स्वभाव गोसावी, (२४) जुनाट पुरुष, (२५) अन्वयव्यतिरेक, (२६) ध्यान-प्रकरण, अशा स्फुट कविता श्री. गो. ना. दातार यांनीं प्रसिद्ध केलेल्या 'रामदास-स्वामींचे समग्र ग्रंथ' या पुस्तकांत आहेत.

(२७) प्रासंगिक कविताः—समर्थांनीं कांहीं ठिकाणीं विशेष प्रसंगीं त्या प्रसंगास अनुरूप अशी स्फुट कविता केली आहे. (१) 'तेंचि भूत गे माय' हें पद तीर्थयात्रा करून आल्यावर मातोश्रीस भेटले त्या वेळीं केलें. तें पद 'तीर्थ-यात्रे'च्या भागांत सबंध दिलें आहेच. (२) समर्थतुकारामांची प्रथम गांठ कृष्णा-तीरीं माहुली येथें पडली. उभयतांनीं आपापली गुरुपरंपरा व माहिती पद्यांत एक-मेकांना सांगितली, त्या वेळीं "नमो अधिष्ठाता विष्णु मुख्य साधू। तेथूनिया बोधू

विधीलागी ॥ १ ॥" इत्यादि २७ चरणात्मक पद्य रचलें. ( ३,४,५ ) राजधर्म, क्षात्रधर्म व सेवाधर्म शके १५७१ सालीं शिवाजीमहाराजांना व निळो सोनदेव व बाळाजी आवजी यांना शिंगणवाडी येथें अनुग्रह दिला त्या वेळीं वरील स्फुट कविता समयास व शिष्यांस अनुरूप अशी सांगितली. (६) भेटीच्या पूर्वी समर्थांनीं महाराजांना पाठविलेलें पत्र—"निश्चयाचा महामेरु । बहुत जनास आधारु । अखंड स्थितीचा निर्धारु । श्रीमंत योगी ॥ १ ॥ " इत्यादि स्फुट कविता पूर्वी भाग ६ यांत दिलीच आहे. ( ७ ) शिवाजीमहाराज सामानगडचा किल्ला बांधीत असतांच त्यांना आपण शेंकडों लोकांना पोसतों असा गर्व झाला, त्या वेळीं समर्थांनीं तेथील एक मोठा धोंडा फोडून आंत थोडें पाणी व जिवंत असलेली बेडकी त्यांना दाखविली. त्या वेळीं " आम्ही काय कुणाचें खातों रे, तो राम आम्हांला देतो " हें सुप्रसिद्ध पद केलें. ( ८ ) शिवाजीमहाराजांच्या मृत्यूनंतर संभाजीमहाराज अनन्वित कृत्यें करूं लागले तेव्हां त्या वेळीं पाठविलेलें—" अखंड सावधान असावें । दुश्चित कदापि नसावें ॥ तजवीजा करीत असावें । एकांत स्थळीं ॥ १ ॥ " हें वीस चरणात्मक महत्त्वाचें व मुत्सद्देगिरीचें पत्र आहे. ( ९ ) अंजनीगीत, हें बायकांकरितां केलेलें उत्तम वीररसात्मक गीत. ( १० ) भूपाळ्या, आरत्या इत्यादि.

( २८ ) स्फुट अभंग व पदें:—समर्थ झोळींत कागद, दौत व लेखणी घेऊन फिरत असत." जो लेखणीसहित कागद दौति वाहे ॥ तो सद्गुण उदंड जयांत आहे ॥ हस्तीं तयासि मिरवी, फिरवी विनोदें । श्रीरामदास गुरु तो नमिला प्रमोदें ॥ १ ॥ " असें रघुनाथपंडित म्हणतात. ज्या वेळीं जशी स्फूर्ति होईल तशी स्फुट कविता, अभंग, पदें वगैरे लिहीत असत. ती सर्व कविता अद्याप उपलब्ध झाली आहे कीं नाहीं याची शंकाच आहे. उपलब्ध झालेलीं ८३७ पदें व ९०९ अभंग व तीन श्लोक अशी समर्थांची १७४९ कविता श्री. अनंतदास यांनीं ' समर्थांचा गाथा ' या उत्कृष्ट ग्रंथांत प्रसिद्ध केली आहे.

कै. राजवाडे यांनीं ' रामदास ' या निबंधांत वर प्रकाशित केलेल्या ग्रंथांशिवाय पुढील समर्थकृत ग्रंथांची यादी दिली आहे:—( १ ) चतु:समासी, ( २ ) सप्तसमासी, ( ३ ) दासप्रबोध, ( ४ ) अक्षरमालिका, ( ५ ) कृत-निर्वाह, ( ६ ) चतुर्योग, ( ७ ) मुखवस्त्र, ( ८ ) एकविसावा दशक, (९) श्लोक-बद्ध रामगीता, ( १० ) संकल्प, ( ११ ) गद्यपद्यपंचीकरण, ( १२ ) अष्टाक्षरी पंचीकरण, (१३) अनामकप्रकरण, ( १४ ) मारुतीची आरती, (१५) भूपाळी, ( रामदास, पृष्ठ १७ ) सदरहू ग्रंथ कै. राजवाडे यांचे स्वाधीन कोल्हापूरचे श्री. शेवडे यांनीं केले होते. ( रामदास, पृष्ठ १६ ) तेव्हां ते ग्रंथ धुळें येथील ' राजवाडे संग्रहालयां'त असले पाहिजेत. सत्कार्योत्तेजक सभा ते लवकरच प्रसिद्ध करील अशी आशा आहे.

समर्थांचें एक स्फुट काव्य ‘ आनंदभुवन ’ या नांवानें प्रसिद्ध आहे, असें आम्ही वर ( १४ ) स्फुट प्रकरणें यांत सांगितलें आहेच. कोणी या स्फुट काव्यास ‘श्रीसमर्थस्मृति’ असें ही म्हणतात. हें स्फुट काव्य ५९ अनुष्टुप् वृत्तांत आहे. श्रीरामदास आणि रामदासी या मालेच्या तिसऱ्या भागांत हें स्फुट काव्य छापलें आहे. श्री. आबा चांदोरकर यांनीं नुकतीच ‘ श्रीआनंदभुवन-ग्रंथमाला ’ सुरू केली आहे. त्या मालेंतील १ लें पुष्प ‘ श्रीसमर्थांचें भविष्यपुराण अथवा श्रीवनभुवनी ’ हें आहे. या ‘ आनंदभुवन ’ स्फुट काव्यास श्री. चांदोरकर यांनीं शेवटीं भरपूर टीपा दिल्या आहेत व सूची ही दिली आहे व प्रारंभीं निवेदनांत या स्फुट काव्याचें मार्मिक विवेचन केलें आहे.

आतां समर्थ ग्रंथाचें ‘ काव्य ’ या दृष्टीनें थोडें विवेचन करणार आहों.

“ काव्यं रसात्मकं वाक्यम् ॥ ” ( काव्यप्रकाश ) समर्थांचे सर्व ग्रंथ ‘ कविताबद्ध ’ आहेत. महाराष्ट्रांतील साधुसंतांनीं गद्य लिहिलेलें नाहीं. त्याला समर्थ हे अपवाद नाहींत. दासबोध ‘ ओंवीबद्ध ’ आहे, ‘ मनोबोध ’ श्लोकबद्ध आहे, ‘ रामायण ’ श्लोकबद्ध आहे. कांहीं स्फुट कविता ओंवीबद्ध व कांहीं अभंग-बद्ध आहे. ‘ काव्यं रसात्मकं वाक्यम् । ’ ही सुप्रसिद्ध काव्यप्रकाशांतील मम्मटांची व्याख्या लागू केल्यास समर्थांच्या सर्व कवितेस काव्य ही व्याख्या लागू पडणार नाहीं, असा कित्येकांचा आक्षेप आहे. त्यांत कै. इतिहासाचार्य राजवाडे हे प्रमुख आहेत. ते म्हणतातः—“ एकंदर विचार केला असतां दासबोध हा ग्रंथ काव्य नाहीं. या ग्रंथाचें रूप पद्य आहे; परंतु यांत जे विषय निरूपिले आहेत, ते काव्याचे विषय नाहींत. गीता, अमरकोश, वैय्यासिक-न्यायमाला, ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, यथार्थ-दीपिका, अष्टांगहृदय, लीलावती हे ग्रंथ पद्य असून ही, ज्याप्रमाणें काव्य नाहींत, त्याप्रमाणें दासबोध हा ग्रंथ काव्य नाहीं. ” ( रामदास, पृष्ठ ९ ) ‘ अमरकोश ’ हा ग्रंथ कोशच आहे म्हणून त्याला तो पद्यमय आहे म्हणून काव्य म्हणतां येणार नाहीं. हें कै. राजवाडे याचें मत आम्हांस संमत आहे. परंतु ज्ञानेश्वरीस ते काव्य म्हणत नाहींत हें पाहून आश्चर्य वाटतें. ‘ उपमा ’ हा काव्याचा आत्मा आहे. ‘ उपमा कालिदासस्य ’ उपमा अशी कालीदासानेंच द्यावी, ही यथार्थ उक्ति सुप्रसिद्ध आहे. या उपमालंकारांत महाराष्ट्र आद्यकवीनें कविकुलगुरूवर वरचढ केली आहे असें आम्हांस वाटतें. ज्ञानेश्वरमहाराजांची उपमापरंपरा सुरू झाली म्हणजे जो निरतिशय आनंद होतो त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. कै. राजवाडे यांचें मत वाचल्यावर आम्ही पुन्हा एक वेळ सर्व ज्ञानेश्वरी वाचली. पुन्हा लक्षपूर्वक वाचून ज्ञानेश्वरी हें काव्य आहे हें आमचें मत दृढतर झालें. कालिदास, भवभूति या संस्कृत महाकवींच्या काव्यांप्रमाणें अगर मुक्तेश्वर, वामन पंडित या मराठी कविश्रेष्ठांच्या काव्यांप्रमाणें ज्ञानेश्वरी हा सर्व ग्रंथ कदाचित् रसात्मक नसेल, परंतु रसात्मक उपमालंकारानें

सर्व अध्यायांतील पुष्कळ भाग व्यापलेला आहे हें कोणास ही सहज कळून येणार आहे. तीच गोष्ट दासबोधाची आहे व तें पर्यायानें कै. राजवाडे कबूल करतात. "समर्थांच्या दासबोधाची गणना काव्यग्रंथांत लोक करतात, त्याला एक कारण आहे. तें हें कीं वर्णनाच्या व विवेचनाच्या भरांत दृष्टांतांची या ग्रंथांत रेलचेल उडविलेली आहे. परंतु दासबोधांत या दृष्टांतांची योजना काव्यग्रंथांतल्याप्रमाणें केवळ चमत्कृति उत्पन्न करण्याकरितां केलेली नाहीं. दृष्टान्त देण्यांत त्या त्या विषयाचा परिपोष करणें हा एक मतलब आहे." (रामदास, पृष्ठ ११) दृष्टांत देण्यांत हेतु कोणता ही असो, वाचकांच्या मनावर काव्याप्रमाणें परिणाम होतो कीं नाहीं हा मुख्य प्रश्न आहे व तो होतो हें कै. राजवाडे कबूल करितात. पुढें ते म्हणतात "शिवाय काव्यांत या ग्रंथाची गणना होण्यास दुसरें ही एक कारण झालेलें आहे तें हें कीं, हा ग्रंथ वक्तृत्वप्रचुर आहे. गचाळ किंवा मिळमिळीत असें एक ही वाक्य या ग्रंथांत नाहीं. बोलण्याचा ओघ इतका अप्रतिबद्ध आहे, शब्दांची योजना इतकी समर्पक आहे, आणि विवेचनाची सरणी इतकी चित्रवेधक आहे कीं, सिद्धांतविषय गहन असून ही तो काव्याप्रमाणें आल्हादकारक वाटतो आणि इतकें असून ही भाषा अत्यंत साधी, सोपी व सरळ आहे. या दिसावयाला सहज परंतु बहुत मेहनतीनें कमावलेल्या वक्तृत्वाला भुलून वाचकवर्गाला आपण एखादें काव्यच वाचतों कीं काय असा भास होतो." वर उद्धृत केलेल्या कै. राजवाड्यांच्या उताऱ्यावरून दासबोधवाचनाचा परिणाम वाचकांवर काव्याप्रमाणें होतो हें सिद्ध होतें, असें आम्हांस वाटतें. संसारांतील कोणता तरी एक विषय अगर प्रसंग घेऊन त्यांत नवरसांचा उपयोग करून काव्य रचणें, ही संस्कृत काव्याची व्याख्या जरी दासबोधास लागू पडत नाहीं, तरी असा आक्षेप घेणारे टीकाकार दासबोधाचा वाचकांवर काव्यासारखा परिणाम होतो हें स्वतःच कबूल करतात, म्हणून दासबोध काव्य आहे असें आम्ही म्हणतों. शिवाय दासबोध हा 'प्रतिभासंपन्न' ग्रंथ आहे हें कै. राजवाडे कबूल करतात (रामदास, पान १०) व प्रतिभा हें काव्याचें एक प्रमुख अंग आहे, म्हणून दासबोध हें काव्य आहे हें सिद्ध होतें. समर्थांनीं काव्याची व्याख्या दशक १४, समास तीन, यांत धीट, पाठ, धीटपाठ व प्रासादिक असे भाग पाडून सविस्तर केली आहे. प्रासादिक कवितेचें वर्णन ३४ ते १४ या ओंव्यांत केलें आहे. "जेणें ज्ञान हें प्रबळे। जेणें वृत्ति हे मावळे॥ जेणें भक्तिमार्ग कळे। या नांव कवित्व॥ (१४. ३. ४९) जेणें देहबुद्धि तुटे। जेणें भवसिंधु आटे॥ जेणें भगवंत प्रगटे। या नांव कवित्व॥ (१४. ३. ५०)......जेणें होय समाधान। जेणें तुटे संसारबंधन॥ जया मानिती सज्जन। या नांव कवित्व॥ (१४. ३. ५३)" तेव्हां समर्थांची वरील व्याख्या लागू केल्यास दासबोध पूर्णपणें काव्यग्रंथ ठरतो. मनाला आल्हाद देऊन रंजन करणें हाच केवळ काव्याचा उद्देश नाहीं. सदुपदेशानें समाजांतील लोकांना

कर्तव्यनिष्ठ करणें हें ही मनोरंजनाप्रमाणें कवीचें एक पवित्र कर्तव्य आहे. तेव्हां दासबोधाकडे केवळ 'रसात्मकं वाक्यम्' या दृष्टीनें न पाहतां बहुजन समाजाला भक्तिमार्ग व ज्ञानमार्ग शिकवून प्रपंच, व्यवहार व प्रसंगविशेषीं अधिकाराप्रमाणें राजकारण शिकविणारा ग्रंथ—महाराष्ट्रधर्म शिकविणारा ग्रंथ—या दृष्टीनें पाहिलें पाहिजे. "काव्यं यशसेऽर्थकृते, व्यवहारविदे शिवेतरक्षतये। सद्यःपरनिर्वृतये" इत्यादि लक्षणांच्या दृष्टीनें ही दासबोध ग्रंथाला काव्य म्हणावें लागतें. वर्डस्वर्थ हा इंग्रजी कवि म्हणतो—'Poetry is the outburst of powerful feelings.' भावार्थ—उत्कट भावनांचा जोरदार उद्गम म्हणजे काव्य होय. त्याची व्याख्या दासबोधास पूर्णपणें लागू पडते. आर्यावर्ताची, महाराष्ट्राची धार्मिक व राजकीय निकृष्ट स्थिति पाहून समर्थांच्या अंतःकरणांतून ज्या उत्कट भावना जोरानें बाहेर पडल्या तो दासबोध होय. 'महाराष्ट्रीयांचें काव्यपरीक्षण'—प्रकरण १० वें, 'रामदासांचें साहित्यशास्त्र'—यांत श्री. डॉ. श्री. व्यं. केतकर म्हणतातः—"समर्थांची कवित्वाची व्याख्या 'स्वसंप्रदायसापेक्ष' आहे. आपल्या संप्रदायांतील काव्य करूं इच्छिणाऱ्या शिष्यांना सूचना देण्याकरितां ही कवित्वाची 'रामदासी' व्याख्या त्यांनीं निर्माण केली." असें ते म्हणतात. तें कसें ही असो, तिचें अनुकरण दिनकरस्वामी, गिरिधरस्वामीप्रभृति समर्थ-शिष्यांनीं उत्तम प्रकारें केलें आहे, हें खरें आहे. दासबोधाला डॉ. केतकर 'ज्ञानकोश' म्हणतात. "त्या वेळेस मराठींत प्रत्येक विषयावर स्वतंत्र ग्रंथ व्हावा, असा काळ आला नव्हता; त्यामुळें रामदासांसारख्या अनेक विषयांवर विचार करणाऱ्या ज्या व्यक्ती होत्या, त्यांना आपले सर्व प्रकारचे विचार एकाच ग्रंथांत घालावे लागले. ...यांत मानसशास्त्र, समाजशास्त्र व मानवी आयुष्याचें अत्यंत सूक्ष्म व नवीन असें पृथक्करण आहे." (पानें ४५।४६) "दासबोध हें काव्य नसून एक मोठें विचारभांडार आहे." परंतु हें विचारभांडार डॉ. केतकरांच्या म्हणण्याप्रमाणें 'संप्रदायसापेक्ष' काव्यांत लिहिलें आहे हें त्यांना मान्य करावें लागेल. ओंवी व अभंगांत समर्थांची बरीच कविता आहे तशी श्लोकांत ही बरीच आहे. 'मनोबोध' व 'रामायण' हीं भुजंगप्रयात वृत्तांत आहेत. बरींच स्फुट प्रकरणें प्रणालिका वृत्तांत आहेत. कांहीं स्फुट श्लोक शिखरिणी वृत्तांत आहेत. ते 'महिम्न' धाटीचे श्लोक या नांवांनीं प्रसिद्ध आहेत. कांहीं थोडे शार्दूलविक्रीडित वृत्तांत आहेत. करुणाष्टकें विविधवृत्तांत आहेत. ओंवी व अभंग यांना वृत्तदर्पणाच्या शास्त्रयुक्त नियमांचा बाध येत नाहीं. परंतु श्लोकांची रचना वृत्तदर्पणाच्या नियमानुसार न झाली तर म्हणतांना कर्णकटु लागते. परंतु समर्थांच्या काव्यगंगेचा प्रवाह एकदां सुरू झाला म्हणजे त्या प्रवाहाला वृत्तशास्त्राचे नियम थांबवूं शकत नाहींत. स्फूर्ति झाली कीं, मनांत आलेले विचार ओजस्वी व तेजस्वी भाषेंत पद्यमय वाणीनें प्रगट करावयाचे हा त्यांचा दंडक होता. हवेंत बाण सुटतो त्याप्रमाणें काव्य करण्यास

स्फूर्ति व्हावी अशी त्यांनीं श्रीरामचंद्राची याचना केली आहे. " हवाया नळे बाण मांडीं अनंतें । बळें सोडितां जाति आकाशपंथें ।। बत्ति लागतां वेळ नाहीं उडाया। तयाचे परी स्फूर्ति दे रामराया ।। १ ।। " हा श्लोक व आणखी पांच श्लोक शेवटच्या चरणांत " स्फूर्ति दे रामराया " असें असलेल्या ' स्फूर्ति ' या १०५ अष्टकांत आहेत. ( करणाष्टकें वगैरे, पृष्ठ ७६ )

वृत्तशास्त्राच्या नियमांकडे समर्थ अगदीं दुर्लक्ष करीत होते असें नाहीं. मनोबोध व रामायण यांत भुजंगप्रयात वृत्ताचे नियम साधण्याकरितां त्यांनीं अनेक ठिकाणीं ऱ्हस्वाचें दीर्घ व दीर्घाचें ऱ्हस्व केलें आहे. उदाहरणार्थः—" जगीं सर्व सूखी असा कोण आहे ।।(मनोबोध ११) क्रियाभक्ति ऊपासना नित्य नेमें ।।(५७) समरंगणीं त्या विरा अंत आला ।। रणमंडळीं देह त्यागूनि गेला ।। (रामायण ६·७) बहूसाल स्फुल्लिंग जाती फणाणा । मही मंडळी घोष ऊठे दणाणा ।। १ ।। ( ८·७९ ) अगूणी तयालागिं गूणी करावें । समर्थें भवसागरीं ऊतरावें ।। ( करुणाष्टकें—रामावर भार )" ऱ्हस्व ' इ ' ची दीर्घ ' ई ' केली, अगर ऱ्हस्व ' उ ' चा दीर्घ ' ऊ ' केला तरी अर्थहानी होत नाहीं. परंतु ' अ ' चा ' आ ' केला तर अर्थ बदलतो, म्हणून कित्येक ठिकाणीं ऱ्हस्व अच ठेवला आहे. वरील शेवटच्या उदाहरणांत वृत्तनियम साधण्याकरितां ' भवासागरीं ' पाहिजे होतें. परंतु वृत्तनियमाचा भंग करून ' भवसागरीं ' असेंच ठेवलें आहे. ए स्वर असला तर त्याचें ऱ्हस्व करतां येत नाहीं, तेव्हां वृत्तनियमभंग करून ए स्वरच कायम ठेवला आहे. "दिनाचा दयाळु, मनाचा मवाळु । स्नेहाळु, कृपाळु जनीं दासपाळु।।(मनोबोध ५६)"या श्लोकांत दीनाचा बद्दल दिनाचा केलें आहे, परंतु स्नेहाळु बद्दल स्निहाळु केलें नाहीं. येथें स्नेहाळु म्हणतांना विशेष कर्णकटु यतिभंग वाटत नाहीं. परंतु ' महिम्नघाटी 'च्या श्लोकांमध्यें वृत्तनियम न पाळल्यामुळें ते श्लोक शिखरिणी वृत्ताच्या चालींत म्हणतांच येत नाहींत; व त्यायोगानें रसभंग होतो. उदाहरणार्थः—" गणाधीशा ईशा परम रमणीया कमनीया । कृपाळू बा देवा झडकरि मला करणें दया ।। समर्थानें दीनें सकळिक गुणी करणें सदा । दिनानाथा वेथा चुकवुनि बळें बसवीं सदा ।। १ ।। " पुष्पदंताचें सुप्रसिद्ध ' महिम्न ' शिखरिणी वृत्तांतच आहे. तें महिम्न म्हणतांना जो आनंद होतो, तो समर्थांचें महिम्न म्हणतांना होत नाहीं. कारण समर्थांच्या महिम्नांत एकाच श्लोकांत पुष्कळ वेळां अनेक यतिभंग असतात. काव्यस्फूर्तीच्या भरांत थोडा वेळ थांबून दुसरा शब्द घालून वृत्तनियम समर्थांसारख्या तीव्र बुद्धीच्या कवीला सहज पाळतां आले असते. परंतु स्फूर्तीचा प्रवाह थांबवून समर्थांनीं वृत्तशास्त्रदेवतेची आराधना करण्याचा मुळींच प्रयत्न केला नाहीं. कित्येक वेळां समर्थांनीं वृत्तनियम पाळण्यासाठीं दुसऱ्या शब्दांची योजना करण्याकरितां काव्यगंगेचा ओघ न थांबवितां शब्दाचें एकादें अक्षर गाळून वृत्तनियम साधला आहेः—" रतिमद पळ

पाहे, पाप कल्पांत राहे। सुख लघुतर आहे, दु:ख अंतीं न साहे ।। त्यजिं परवनितेचा लोभ ·हा अंतरींचा । यजिं पति जगतीचा नाथ योध्यापुरीचा ।। १ ।।" मराठींत ऽ असें अवतरण घालीत नाहींत. तेव्हां अ गाळून वृत्तनियम पाळला आहे, असेंच म्हणावें लागतें. ' निरंकुशाः कवय: ' असें म्हणून शास्त्रानें कवींना कांहीं सवलत दिली आहे. परंतु त्या निरंकुशत्वाला देखील कांहीं मर्यादा आहे. ती मर्यादा बहुतेक कवींनीं पाळली आहे. समर्थांच्या काव्यस्फूर्तीनें मात्र निरंकुशत्वाचा अधिकार श्लोककाव्यांत–विशेषत: महिम्न श्लोकांत–पुष्कळ ठिकाणीं चांगलाच बजावला आहे. कित्येक मोठ्या वृत्तांच्या अष्टकांत वृत्तनियम साधले आहेत तीं अष्टकें म्हणतांना फार गोड लागतात. उदाहरणार्थ २३६ नंबरचें ' राममहिमा ' हें अष्टक फार गोड आहे. त्यांतील एकच श्लोक देतों:–"आला राजा महीचा दिनकर कुळिंचा ख्यात वंशावळीचा । आला आत्मा जगाचा मुनिजन ऋषिंचा, प्राण त्या साधकांचा ।। आला दाता दिनाचा, जप पशुपतिचा, ध्यास त्या वाल्मिकाचा । आला सिंधू सुखाचा, सुरवर म्हणती काळ हा राक्षसांचा ।। १ ।। " त्याप्रमाणें २३८ नंबरचें ' रामप्रताप ' अष्टक, २४० नंबरचें ' अंतीं सोडवीता ' हें अष्टक, २४६ नंबरचें ' जैशासि तैसा बरा ' हें अष्टक, २५० नंबरचें ' रामदास्य ' अष्टक, हीं सर्व अष्टकें मोठ्या वृत्तांचीं असून ही वृत्तनियमांचा भंग न झाल्यामुळें म्हणतांना फारच गोड लागतात.

समर्थांची कांहीं कविता ' कूट ' आहे. उदाहरणार्थ:—"अक्रा अक्रा अक्र अक्रा अकक्रा ।। शक्रा शक्रा शक्र शक्रा शकक्रा ।। नक्रा नक्रा नक्र नक्रा नकक्रा।। वक्रा वक्रा वक्र वक्रा वकक्रा ।।१।।" (२) "कमळा कमळा कमळा कमळा ।।" अशा चार ओळींचा एक श्लोक आहे. एका श्लोकांत कमळा हा शब्द सोळा वेळ कां घातला तें समजत नाहीं. अशा तऱ्हेचीं अधिक उदाहरणें स. १९२५ च्या विविधज्ञानविस्ताराच्या सप्टेंबरच्या अंकांत आम्हीं दिलीं आहेत तीं वाचकांनीं पहावीं.

## भाग ८ वा

# समर्थांचे मठ-महंत व शिष्य

"समर्थें कितेक गुप्त शिष्य केले ।
ते, ते, समर्थांसि विदित भले ॥
भरतखंडिं प्रगट झाले । ते निवेद् करूं ग्रंथार्थीं ॥ १ ॥"

—गिरिधरस्वामी, समर्थप्रताप ( १०.१० )

"भक्त मंडळी भूमंडळीं कोणें मोजिलीं ॥"

—कल्याणस्वामी

"महंतें महंत करावे । युक्ति बुद्धीनें भरावे ॥
जाणते करूनि विखरावे । देशोदेशीं ॥"

—दासबोध ११.१०.२५

वयाच्या चोविसावे वर्षीं म्हणजे शके १५५४ सालीं समर्थ पंचवटीहून तीर्थयात्रेस निघाले. नंतर बारा वर्षें सर्व भरतखंडांतील तीर्थयात्रा करून वयाच्या छत्तिसावे वर्षीं म्हणजे शके १५६६ सालीं कृष्णातीरीं आले. या बारा वर्षांच्या कालांत महाराष्ट्राबाहेरील बहुतेक सर्व प्रांतांत त्यांनीं मठस्थापना केली व मठांमध्यें योग्य अधिकारी शिष्यांना महंत म्हणजे मठाधिपति नेमून संप्रदायपरंपरा सुरू ठेवण्याची व्यवस्था केली. कृष्णातीरीं आल्यावर महाराष्ट्र-कर्नाटकांत ही ठिकाठिकाणीं मठस्थापना करून संप्रदायपरंपरा सुरू केली. याप्रमाणें महाराष्ट्रांत व महाराष्ट्राबाहेरील हिंदुस्थानांतील इतर प्रांतांत संघटना व धर्मजागृति करून बहुजन समाजास कर्तव्यदक्ष करून सन्मार्गाला लावलें. ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकारामप्रभृति साधुसंतांनीं ही समर्थांपूर्वीं लोकजागृति करून बहुजन समाजास सन्मार्गाला लावून परधर्म स्वीकारण्यापासून परावृत्त केलें होतें. परंतु समर्थांप्रमाणें वरील पूज्य साधुसंतांनीं मठस्थापना करून महंत नेमून त्या काळीं शिष्यसंप्रदाय करण्याचा संप्रदाय अंमलांत आणला नव्हता. तीर्थयात्रेच्या प्रवासांत हिंदु समाजाची धार्मिक, नैतिक, सामाजिक, आर्थिक व राजकीय शोचनीय स्थिति समर्थांनीं प्रत्यक्ष पाहिली होती. ही शोचनीय स्थिति जाऊन राष्ट्राला सुस्थिति येण्यास संघटनेची आवश्यकता आहे, असें त्यांना वाटलें. व्यक्तिशः किती ही प्रयत्न केले तरी बहुजन समाजांत व्हावी तितकी जागृती

उत्पन्न होत नाहीं. संघटनेच्या जोरावर खेड्यापाड्यांतून शिष्यांमार्फत लोकजागृति करतां येते असें वाटून त्यांनीं देशांतील निरनिराळ्या भागांत मठस्थापना केली. मठांमध्यें रामाची अगर रामदूत मारुतीची स्थापना करून महंत नेमून पूजाअर्चा व वार्षिक उत्सवाची व्यवस्था केली. उत्सवांमध्यें कीर्तनद्वारां बहुजन समाजामध्यें कर्तव्यजागृति उत्पन्न करून त्यास रामराज्य स्थापन करण्याऱ्या शिवाजीमहाराजांना मदत करणें हें लोकांचें पवित्र्य कर्तव्य आहे, असें लोकांना सांगितलें. राजकारणास आपल्या शिकवणुकीच्या चतुःसूत्रींत गोंविलें, एवढेंच नव्हे तर राजकारणांत आपल्या परिस्थितीप्रमाणें शक्य तो भाग घेतल्याशिवाय प्रपंचच होत नाहीं असा उपदेश मठांतील शिष्यद्वारें बहुजनसमाजास केला ( दासबोध १९.५.१७ ).

समर्थांनीं किती मठ स्थापन केले याचा नक्की आंकडा कोणत्या ही चरित्रग्रंथांत सांपडत नाहीं. समर्थांचे सातआठशें मठ होते असें श्री. शं. श्री. देव म्हणतात. ( प्रस्तावना, समर्थांचीं जुनीं दोन चरित्रें, पृ. ११ ) समर्थांचे ११०० मठ होते असें सांप्रदायिक परंपरेनें म्हणतात. त्यास समर्थप्रतापांतील पुढील श्लोक आधार असावा असें वाटतें:—" रुद्रशत संख्या गणित मूर्ति । विख्यात ज्याच्या पुण्यकीर्ति ।। समर्थस्वामी अवतारमूर्ति । नाना महंतरूपें विस्तारले ।। " ( समर्थप्रताप ) सर्व ११ शें मठांची यादी सांपडत नाहीं. तेव्हां समर्थप्रतापांतील रुद्रशत संख्या ११०० ही संख्या मठांची नसून कदाचित् महंतांची ही असूं शकेल. ६०।७० मठांचीच माहिती आजपर्यंत लागली आहे. तेव्हां समर्थांचे ११०० मठ होते ही अतिशयोक्ति असावी असें आम्हांस वाटतें. ११०० मठांची विश्वसनीय यादी उपलब्ध झाल्यास आम्ही आमचें म्हणणें आनंदानें परत घेऊं. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भागांत पुष्कळ मठ स्थापन केले होते ही गोष्ट मात्र खरी आहे. मुसलमानी राज्यांत महत्त्वाच्या ठिकाणीं समर्थांनीं मठ स्थापन केले होते ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. खुद्द मुसलमानी राजाच्या राजधानींत अगर सुभेदाराच्या ठाण्यांत मठ स्थापन न करतां गुप्तपणें हालचाली करतां येतील. अशा ठिकाणीं जवळच कांहीं मठ स्थापलेले होते. कऱ्हाडास विजापूरकरच्या मुख्य सुभेदाराचें ठाणें होतें, म्हणून तेथें मठ न स्थापतां जवळच शहापूर, उंब्रज, मसूर येथें मठ स्थापन केले व संप्रदायाच्या मुख्य मठस्थानाची योजना चाफळ येथें डोंगराळ प्रदेशांत केली. मठस्थापना करून मोठ्या थाटानें उत्सव करण्याचा हेतु आसपासच्या लोकांना परधर्म स्वीकारण्यापासून परावृत्त करण्याचा होताच; शिवाय त्यांचीं मनें हरिकथानिरूपणानंतर राजकारणाकडे लागून त्यांनीं परदास्यांतून मुक्त होण्याचा प्रयत्न करावा हा ही होता. बेदर प्रांतांतील रामस्वामी शिष्यानें तसा प्रयत्न केल्याचें समर्थप्रतापांत वर्णन आहे ( स. प्र. १०–७२ ).

समर्थप्रतापांत कांहीं मठांचीं व मठपतींचीं नांवें दिलीं आहेत त्यांवरून व इतर ग्रंथांतून मिळविलेल्या माहितीवरून मठांची व मठपतींची यादी खालीं देत आहें. नंतर पुढें कांहीं प्रमुख मठ—मठपतींची सविस्तर माहिती देण्याचें योजिलें आहे.

| | मठ | महंत अगर मठाधिपति |
|---|---|---|
| १ | जांब | श्रीसमर्थ रामदास |
| २ | चाफळ | ,, |
| ३ | सज्जनगड | ,, |
| ४ | टाकळी | उद्धवस्वामी |
| ५ | इंदूरबोधन | ,, |
| ६ | तंजावर | भीमस्वामी |
| ७ | डोमगांव | कल्याणस्वामी |
| ८ | शिरगांव | दत्तात्रयस्वामी |
| ९ | तिसगांव | दिनकरस्वामी |
| १० | कण्हेरी | वासुदेवस्वामी |
| ११ | दादेगांव | देवदास |
| १२ | कारंजें | बाळकराम |
| १३ | ,, | प्रल्हाद |
| १४ | भालगांव | त्रिंबकराज |
| १५ | धोंडराई—गवराई | मुसलराम |
| १६ | नीलंगें | आण्णाप्पा |
| १७ | शिरवळ | बाजी |
| १८ | ,, | नारायण |
| १९ | मन्यारगुडी | अनंतस्वामी |
| २० | तेलंगण | महंत शिवराम |
| २१ | पारगांव | शंकर गोसावी |
| २२ | मनपाडळे | जयराम गोसावी |

स्त्रीशिष्य

| | | |
|---|---|---|
| १ | मिरज | वेणाबाई |
| २ | राशिवडें | अंबिकाबाई |
| ३ | वाळवें | ,, |

वरील मठ व मठाधिपतींची थोडीबहुत माहिती मिळाली आहे. ती क्रमानें

पुढें दिली आहे. मठाधिपतींची माहिती न मिळतां फक्त नांवेंच मिळालीं आहेत. त्यांची यादी येणेंप्रमाणें:—

| | मठ | मठाधिपति |
|---|---|---|
| १ | सावंतवाडी | शंभु |
| २ | पंढरपूर | अनंत |
| ३ | दंडराजपुरी | त्रिंबक गगन |
| ४ | औदुंबर | हरिदास |
| ५ | प्रयाग | वेणीमाधव |
| ६ | अयोध्या | रामकृष्ण |
| ७ | मथुरा | हरिकृष्ण |
| ८ | मायापुरी | जयकृष्ण |
| ९ | काशी | रामचंद्र |
| १० | कांची | भगवंत |
| ११ | अवंतिका | गंगाधर |
| १२ | ,, | रघुनाथ |
| १३ | द्वारका | हरि |
| १४ | बद्रिकेदार | दयाळ |
| १५ | सोरटी | विश्वंभर |
| १६ | ओंकारेश्वर | ब्रह्मदास |
| १७ | औंढ्या ( पर्वतावर ) | बल्लाळ |
| १८ | श्रीशैल्यशिखर | कोदंडराम |
| १९ | भीमाशंकर | गोपाळ |
| २० | पर्वळीनगर | मल्लारि |
| २१ | घृष्णेश्वर | आनंद |
| २२ | रामेश्वर | हनुमंत |
| २३ | मल्याळ | मारुतिदास |
| २४ | अनंतशयन | बलभीम |
| २५ | केज | उद्धव |
| २६ | बाहेगांव | मुरारि |
| २७ | सप्तशृंग | उदास |
| २८ | तापीपूर | कृष्ण |
| २९ | पाली | रंगनाथ आठमुळे |

कांहीं शिष्य अमुक प्रांतांत होते असा मोघम उल्लेख आहे.

१ नृसिंह-कृष्णातीरीं. २ जयवंत-दक्षिणदेशीं. ३ राघव-दक्षिण प्रांत. ४ मुद्गलराम-बेदरप्रांत. ५ जयराम-कर्नाटकप्रांत. ६ बालकृष्ण-वऱ्हाडप्रांत. ७ महारुद्र-वऱ्हाडप्रांत. ८ जनार्दन-सुरतप्रांत. ९ दामोदर-देवगडप्रांत. १० श्रीधर-रामटेकप्रांत. ११ गोविंद-गोमांतकप्रांत. १२ भैरव-गोकर्ण प्रांत. १३ शिवराम-तेलंगण प्रांत.

१४ सदाशिव सगर—रायचूर प्रांत. हे बरेच दिवस समर्थांजवळ होते.

१५ शंकर—श्रीरंगपट्टणप्रांत. हे उदास वृत्तीचे होते व रुद्राक्ष धारण करीत.

१६ राम—बेदरप्रांत. हे बेदरप्रांतांत संचार करीत व म्लेंच्छांच्या संहारास मदत करीत. ( समर्थप्रताप १०.१०२ )

१७ हरिश्चंद्र—अंतर्वेदीप्रांत. १८ हरिवंश—गंगासागर प्रांत.

१९ अनंतकवि—सह्याद्रि डोंगर प्रांत. यांनीं समर्थचरित्र लिहिलें आहे. कांहीं भाग प्रसिद्ध आहेत. " सह्याद्रीगिरिचा विकास विलसे मंदार शृंगापरी ॥ " हा यांचा श्लोक सुप्रसिद्ध आहे. तो पुढें सज्जनगड-मठाच्या वर्णनांत दिला आहे.

२० विश्वनाथपंडित—उत्तर हिंदुस्थान.

२१ नारायण—हे मेहमीं संचार करीत.

२२ चक्रपाणी—हे सर्वत्र संचार करीत. ते निस्पृह व उदास असत.

२३ अंबादास—बाहेगांवानजीक एके गांवीं राहत.

२४ माधव }
२५ यादव } दोघे प्रयागाहून गंगेच्या कावडी समर्थस्नानास आणीत असत.

या माधवांना माधवदास ही म्हणत. अकरा कावडी आणल्यानंतर समर्थांनीं त्यांना अनुग्रह दिला. समर्थचरित्रकार उद्धवसुताचे गुरु केशवस्वामी हे या माधवदासांचे शिष्य होत.

आतां कांहीं शिष्य मठ करून न राहतां व संचार न करितां समर्थांपाशीं असत, त्यांचीं नांवें:—( १ ) दिवाकर गोसावी—हे समर्थांजवळ राहून चाफळ-मठाची व्यवस्था पाहत. शिवाजीमहाराजांच्या दरबारचीं कामें ही त्यांच्याकडेच असत. कृष्णातीरीं समर्थ आल्यावर महाबळेश्वरीं गेले. तेथील राहणार दिवाकर गोसावी. तेथें ज्यांना प्रथम अनुग्रह झाला त्यांपैकीं दिवाकर गोसावी. ते महाबळेश्वरचे व त्यांची बुद्धी ही ' महाबळ ' आहे असें समर्थ एकदां विनोदानें म्हणाले होते. समर्थांच्या अंतकालीं दिवाकर जवळ नव्हते, उद्धवस्वामी होते. समर्थसमाधीनंतर चाफळ मठाच्या व्यवस्थेसंबंधानें उद्धवस्वामी व दिवाकर गोसावी यांच्यामध्यें वाद लागला होता. शाहुमहाराज साताऱ्यास आल्यावर त्यांनीं शिष्यमंडळीच्या संमतीनें श्रेष्ठांचे नातु गंगाधरस्वामी यांस जांबेहून आणून चाफळ मठाधिपति केलें व त्यांच्या संमतीनें दिवाकर गोसाव्यांनीं मठाची व्यवस्था पाहावी असें ठरवून वाद मिटविला.

२ भैरवराम—हे चाफळास देवापाशीं पुराण सांगत.

३ विठ्ठल—हे चाफळास देवाची पूजा करीत.

४ राम—हे समर्थांजवळ असत.

५ भास्कर—हे चाफळास असत.

६ महादेव आगलावे—हे चाफळास राहून उत्सवाची व्यवस्था पाहत असत.

७ प्रेमळशेटी—यांचे विषयीं माहिती समर्थप्रतापांत दिली आहे. अकरा वर्षे ते चाफळ मठांत राहिले. त्यांनीं श्रीरामास अकरा वर्षे नैवेद्य केला. शेवटीं ते सज्जनगडास गेले व तेथून एकाएकीं कोठें गेले त्याचा पत्ता नाहीं.

८ गणेश—हे मोठे वेदांती होते, एवढाच उल्लेख आहे.

९ कपिल—यांच्याविषयीं त्यांची शिष्यपरंपरा मोठी होती एवढाच उल्लेख आहे.

१० गोपाजी—हे मिरजेचे राहणारे. ते सुप्रसिद्ध वेणाबाईंचे वडील होत.

( ११ ) जीवन—सज्जनगडावर समर्थांच्या समाधीचे कामास यांनीं सुरुवात केली.

( १२ ) तुकोबाविडवी—हे कीर्तन करीत असत.

यांशिवाय कांहीं ही माहिती न देतां पुढील महंत अगर शिष्यांचा फक्त नामनिर्देश सांपडतो:—( १ ) गिरिधर, ( २ ) रंगबोध, ( ३ ) रंगमूर्ति, ( ४ ) निरंजन, ( ५ ) तुकोबा, ( ६ ) महादेव, ( ७ ) भोळाराम—विडा कुटून खलबत्ता देणारे प्रसिद्ध भोळाराम हेच कीं काय तें कळत नाहीं, ( ८ ) जीवन्मुक्त, ( ९ ) वामन, ( १० ) विश्वनाथ.

वरील यादीवरून असें दिसून येईल कीं, फक्त २५ मठ-महंतांची माहिती मिळते; २९ मठ-महंतांचीं फक्त नांवें मिळतात; २५ मठमहंतांचीं नांवें मिळत नाहींत; परंतु ते कोणत्या प्रांतांत संचार करीत होते तें कळतें; १२ महंत अगर शिष्य कोणतीं कामें करीत होते हें समजतें व १० महंतांचा अगर शिष्यांचा फक्त नामनिर्देश केलेला आढळतो. म्हणजे एकंदर २५+२९+२५+१२+१०=१११ महंतांचीं नांवें सांपडतात व यांपैकीं २५ महंतांची थोडीबहुत माहिती सांपडते. समर्थांच्या मठमहंतांची जी कांहीं थोडीबहुत विश्वसनीय माहिती मिळते ती गिरिधरस्वामींच्या समर्थप्रतापांत मिळते. दासविश्रामधाम एवढा मोठा समर्थ-चरित्र ग्रंथ आहे, पण त्यांत समर्थप्रतापाप्रमाणें समर्थांच्या मठ-महंतांची माहिती दिलेली नाहीं. कल्याण-स्वामींच्या मठ-महंतांची माहिती मात्र आत्मारामहाराजांनीं दिली आहे. समर्थांनीं ११०० मठ स्थापन केले ही अतिशयोक्ति असली तरी त्यांनीं हिंदुस्थानांतील



**श्रीसमर्थमंदिर–जांब**

या मंदिराचा उद्घाटनसमारंभ शके १८५४ त श्रीरामनवमीस झाला

सर्व प्रांतांत ठिकठिकाणीं शेंकडो मठ स्थापन केले होते यांत शंका नाहीं. गिरिधरस्वामी म्हणतात:—" नाना पर्वतदुर्गीं शिष्य केले । नाना भूमिदुर्गीं शिष्य केले । नाना सिंधुदुर्गीं शिष्य केले । सद्‌गुरुनाथ समर्थें ।।" ( स. प्र. १२. ३ ) त्याचप्रमाणें समर्थांच्या शिष्यांत महंत होते, तसे राजे व राज्यांतील नोकर लोक ही होते. " कित्येक शिष्य सदाचारी । कित्येक शिष्य राज्याधिकारी ।। कित्येक शिष्य राजधारी । देशाधिकारी कित्येक ।। ( स. प्र. १२. २ ) गुप्त प्रगट भरत-खंडीं । महापुरुष असती उदंडी ।। यावत् मायाविस्तार ब्रह्मांडीं । तावत्परंपरा सामर्थ्ये ।। ( स. प्र. १२. ४ ) " समर्थशिष्यप्रशिष्यांनीं लिहिलेलीं जीं बारा चरित्रें प्रकाशित आहेत, त्यांत सर्व मठांची माहिती सांपडत नाहीं. कदाचित् कल्याण-प्रभृति शिष्यांचीं चरित्रें उपलब्ध झाल्यास माहिती मिळण्याचा संभव आहे.

आतां वरील यादींतील पहिल्या पंचवीस मठ-महंतांची माहिती देतों.

**( १ ) जांब मठ—महंत समर्थ.** जांब ही समर्थांची जन्मभूमि. येथें समर्थांचा जन्म १५३० सालीं चैत्र शुद्ध नवमीस रामजन्मकाळीं झाला हें मागें सांगितलेंच आहे. जांब हें गांव हल्लीं निजामचे राज्यांत औरंगाबाद जिल्ह्यांत आहे. तें मनमाड-हैदराबाद रेल्वे रस्त्यावरील परतूर स्टेशनपासून चवदा मैलांवर आहे. समर्थांचा जन्म ज्या घरांत झाला तें घर कालवशात् पडून गेलें आहे. तेथें हल्लीं सुंदर समर्थ-मंदिर बांधलें आहे. त्याचा उद्घाटनसमारंभ गतवर्षी चैत्र शुद्ध नवमी दिवशीं हल्लींचे चाफळ मठाधिपति श्री. आबासाहेब महाराज यांच्या हस्तें मोठ्या समारंभानें झाला. जांब येथील श्रीसमर्थमंदिर बांधण्याचें श्रेय समर्थभक्त श्री. शंकर श्रीकृष्ण देव यांना आहे. ५।६ वर्षे महाराष्ट्रांत व बृहन्महाराष्ट्रांत फिरून त्यांनीं समर्थमंदिरा-करितां रु. ४०,००० मिळविले व आपल्या देखरेखीखालीं उत्तम श्रीसमर्थ मंदिर बांधिलें. मंदिरांत स्थापन केलेली श्रीसमर्थ-मूर्ति औंध संस्थानाधिपति श्रीमंत बाळा-साहेब पंतप्रतिनिधि यांच्या देखरेखीखालीं औंध येथें तयार झाली आहे व ती उत्तम साधली आहे. जांब हा गांव निजाम राज्यांत असला तरी पूर्ववहिवाटीप्रमाणें चाफळच्या स्वामींकडे इनामहक्कानें वहिवाटीस आहे. जांबगांवचें उत्पन्न सुमारें ५००० हजार आहे. तेथील पूजाअर्चा-उत्सव वगैरे सर्व व्यवस्था चाफळच्या स्वामींचे मार्फतच होत असते. समर्थकाळच्या जांबच्या समाजस्थितीचें समर्थप्रतापकारांनीं केलेलें वर्णन भाग २ यांत पूर्वी दिलें आहेच. समर्थांच्या वेळचें मारुतीचें देवालय अद्यापि बाहेर आहे. लग्नाची गोष्ट काढली असतां रागावून समर्थांनीं ज्या झाडा-वरून खालीं डोहांत उडी टाकली तें झाड हल्लीं ही दाखवितात. परंतु जेथें पूर्वी डोह होता, तेथें हल्लीं वाळवंट आहे. ' पुरा यत्र स्रोत: पुलिनमधुना तत्र सरिताम् । ' पूर्वी जेथें पाण्याचा प्रवाह होता, तेथें हल्लीं नदीचें वाळवंट आहे, असें गोदावरीचें वर्णन भवभूतीनें उत्तर रामचरित्रांत केलें आहे, तें येथें उत्तम लागू पडतें. नदीकांठीं

वरील झाडाजवळ श्रेष्ठपुत्र रामजी व शामजी यांच्या समाधि आहेत. सूर्याजीपंतांकडे जो मळा होता, त्यास हल्लीं देवमळा असें म्हणतात व त्यांच्या घराजवळच्या विहिरीस कुळकर्ण्यांची विहीर म्हणतात. कृष्णातीरीं गेल्यावर समर्थ एकदां रामनवमीच्या उत्सवास जांबेस गेले होते. त्या वेळीं तूप वेळेवर आलें नाहीं, तेव्हां समर्थांनीं या विहीरींतलें पाणी एका मातीचे घागरीनें काढलें व तूप म्हणून वाढलें. ती घागर अद्याप मठांत ठेवलेली आहे. त्या घागरीचा वरचा भाग पितळेनें व खालचा भाग तांब्यानें मढविलेला आहे. त्या घागरींतून हल्लीं ही रामनवमीच्या उत्सवांत तूप वाढतात. जांबेस राममंदिर समर्थांच्या पूर्वीच होतें व उत्सव ही समर्थांच्या पूर्वीपासूनच सुरू होता. तेथें समर्थांनीं मठ कोणत्या सालीं स्थापन केला याचा उल्लेख समर्थचरित्रांत कोठें आढळून येत नाहीं. जांबेनजीक पाटवदें, हिवरें, शेळमार्फळ, शिवणगांव, लिंबगांव, भेंडी, टांकळी, टाकरवन इत्यादि गांवीं समर्थांचे मूळ पुरुष ठोसर यांचीं घराणीं आहेत. जांबेपासून हिरवें ४ मैल गंगेच्या कांठीं आहे. समर्थांचें कुलदैवत 'मुंजाबा' यांचें हें स्थान आहे. तेथून १०।१२ कोस लिंबगांव आहे. तेथें मनोहरबाबा ठोसर हे समर्थांच्या वडील घराण्यांतील विद्यमान पुरुष राहतात. मूळ पुरुष कृष्णाजीपंत ठोसर यांचे कनिष्ठ पुत्र दशरथपंत यांचे वंशज श्रेष्ठ व समर्थ हें वाचकांच्या स्मरणांत असेलच.

**( २ ) चाफळ मठ—मठाधिपति समर्थ.** ही समर्थांची कर्मभूमि. समर्थ कृष्णातीरीं आल्यावर चाफळ हें शके १५७० नंतर त्यांच्या कार्यक्षेत्राचें केंद्रस्थान बरेच वर्षे होतें. चाफळाविषयीं बरीच माहिती मागें भाग ५ यांत दिली आहे. हा गांव हल्लीं सातारा जिल्ह्यांतील पाटण तालुक्यांत मोडतो. चाफळ हें मसूर स्टेशनपासून दहा मैल आहे. हा गांव चाफळ मठाधिपतीस इनाम आहे. हल्लींचे चाफळमठाधिपति तेथेंच राहतात. समर्थकालीन देशपांडे, उपाध्येप्रभृति घराण्यांचे वंशज ही अद्यापि येथें आहेत. येथें हल्लीं रामनवमीचा उत्सव मोठ्या समारंभानें होतो. आसपासच्या गांवांतून शेंकडों लोक येतात. समर्थकालीं शहापूर, शिराळें, अंगापूर वगैरे गांवांच्या शिष्यांकडे कांहीं कामें वांटून दिलीं होतीं. त्या गांवांच्या समर्थशिष्यांचे हल्लींचे वंशज ही उत्सवास येऊन मागें नेमून दिल्याप्रमाणें कामें करितात. परंतु उत्सवाचें बाह्य अंग तेवढें समारंभानें करण्यांत येतें. उत्सवाच्या अंतरंगाकडे कोणाचें लक्ष जात नाहीं. हल्लींचे मठाधिपति सुशिक्षित आहेत. त्यांनीं समर्थांच्या अध्यात्मिक हेतूकडे लक्ष देऊन उत्सवपद्धतींत परिस्थित्यनुरूप थोडा फरक केल्यास बरें होईल. केवळ उत्सवाच्या बाह्यांगांत शेंकडों रुपये खर्च केल्यास समर्थांचा मूळ हेतु साध्य होणार नाहीं. चाफळपासून अर्ध्या मैलावर शिंगणवाडीचा मारुति आहे. शिंगणवाडीच्या मारुतीस जातांना वाटेंत



श्रीसमर्थ

समर्थांच्या ह्यातींत मेरुस्वामींनीं काढलेली तसबीर

( सत्कार्योत्तेजक सभा, धुळे )

शिंगणवाडीच्या बागेंत समर्थांनीं शिवाजीमहाराजांना ज्या चिंचवृक्षाखालीं अनुग्रह दिला तो चिंचवृक्ष हल्लीं ही आहे, पण अत्यंत जीर्ण आहे. या वृक्षासंबंधानें कै. राजवाडे म्हणतातः—" वृक्ष समर्थांच्या वेळींच चारशें वर्षांचा वृद्ध होता. आतां त्यास जीर्ण म्हणण्यापेक्षां जख्ख म्हणणें जास्त शोभेल. सध्यां वृक्षाच्या खांद्या कुजून वृक्ष वार्धक्यानें अगदीं क्षीण व संकुचित झाला आहे. शिवसमर्थकालीं वृक्ष पूर्ण ऐश्वर्यांत होता. या वृक्षाचें वय हल्लीं सातआठशें वर्षांचें असावें. म्हणजे या वृक्षानें देवगिरीच्या यादवांचा काल पाहिला होता. शिंगणवाडी हें नांवच मुळीं यादव वीर जो सिंघण त्याच्या नांवावरून पडलें आहे. या झाडाखालून शिंघण, शिवाजी, समर्थ वगैरे इतिहासप्रसिद्ध महाराष्ट्रीय पुरुष गेलेले आहेत. महाराष्ट्रधर्मरक्षणाचा पहिला वीरमंत्र शिवराजास समर्थद्वारा या पुण्यवान व चिरंजीव वृक्षाखालीं मिळाला." ( श्रीसांप्रदायिक विविध विषय, द्वितीय खंड, लेखांक ६६, पृ. ४४ ) या वृक्षास नवें जोतें व खत घालून अधिक दिवस जगविला पाहिजे व न जगल्यास त्याच्यापुढें एखादा स्तंभ रोवून तत्स्मारक एखादी पाटी उभारावी अशी सूचना कै. राजवाडे यांनीं केली आहे. तिकडे हल्लींचे चाफळ मठाधिपति श्री. आबासाहेब महाराज यांचें लक्ष्य जाईल अशी आशा आहे. खर्च फार लागणार नाहीं. चाफळपासून ३—४ मैलांवर डोंगरांत समर्थांची सुप्रसिद्ध गुहा आहे. तिला रामघळ म्हणतात. ती दोन मजली आहे. रामघळीपासून नजीकच प्रसिद्ध कुबडी-तीर्थ आहे. शिवाजीमहाराज रामघळीस एकदां समर्थांच्या भेटीस गेले, तेव्हां त्यांना तहान फार लागली, त्या वेळीं समर्थांनीं कुबडीनें एक दगड काढला तेव्हां पाण्याचा झरा लागला अशी आख्यायिका आहे. कुबडीतीर्थाचें पाणी फार गोड आहे. रामघळ व कुबडी तीर्थ हीं स्थळें प्रेक्षणीय आहेत. शिंगणवाडी येथें पूर्वी मठ असून त्याभोंवतीं समर्थनिर्मित विस्तीर्ण पुष्पवाटिका होती. त्या ठिकाणीं शिवसमर्थांच्या वारंवार भेटी होत. कारण रायगडाहून चाफळास येतांना आधींच शिंगणवाडी लागते. महाराजांचा रस्ता विजापूरच्या ताब्यांतील उंब्रज वगैरे पूर्वेकडील गांवांतून प्रथम नसे. रायगडाहून घोड्यावरून चाफळास येण्यास महाराजांना १०—१२ तास लागत. विविध विषयांच्या वरील ६६ व्या लेखांकांत चाफळ खोऱ्यांतील ५९ रामदासी संस्मरणीय वस्तूंची माहिती दिली आहे. चाफळास जाणाऱ्या लोकांनीं विविध विषयांचा तो खंड बरोबर घेऊन जावें म्हणजे वाटाड्याप्रमाणें त्याचा उपयोग होईल. एकदां समर्थांकरितां कल्याण विड्याचीं पानें आणण्याकरितां रात्रीं जात असतां बहिरेवाडीनजीक त्यांना सर्पदंश झाला, तें ठिकाण रामघळीपासून जवळच आहे. त्यास बहिरोबाचें ठिकाण म्हणतात. दिग्विजयाकरितां निघालेल्या सदाशिवशास्त्री येवलेकरांचा पराजय समर्थांनीं मोळीविक्या बहिरू नांवाच्या एका महाराकडून केला तें ठिकाण येथेंच आहे.

ज्या दगडावर समर्थ त्या वेळीं बसत होते त्यास हल्लीं शेंदूर लावतात व त्यास 'बहिल महाराचा धोंडा' असें म्हणतात.

## चाफळमठ-परंपरा




**( ३ ) सज्जनगड मठ—मठाधिपति समर्थ.** सज्जनगडास सांप्रदायिक ने म्हणजे समाधि-दर्शनाच्या वेळीं पुढील अनंतकवीचा श्लोक म्हणतातः—
"रिवा विकास विलसे मंदारशृंगावरी। नामें सज्जन जो नृपें बसविला श्रीऊर्वे- ॥ साकेताधिपति कपी भगवती हे देव ज्याचे शिरीं। तेथें जागृत मदास विलसे जो या जना उद्धरी ॥ १ ॥"

सज्जनगड ही समर्थांची समाधिभूमि होय. परळी गांव सज्जनगड ल्याच्या पायथ्याशीं सुमारें पाऊण मैलावर उत्तरेस आहे. हा गांव चाफळ ास इनाम आहे. परळी गांवांत केदारेश्वराचें फार जुनें देवालय आहे. तें



सज्जनगड-प्रवेशद्वार

( सत्कार्योत्तेजक सभा, धुळें )




सज्जनगड-श्रीराममंदिर

हेमाडपंती शिल्पशास्त्रपद्धतीनें बांधलेलें आहे. त्यांतील नक्षीचें काम फार उत्तम आहे. सज्जनगड किल्ला समुद्रसपाटीपासून १०४५ फूट उंच आहे. येथें समर्थांनीं शके १६०३ सालीं माघ कृष्ण नवमीस समाधि घेतली. येथें दर वर्षी माघ कृष्ण प्रतिपदेपासून नवमीपर्यंत **दासनवमीचा** उत्सव होतो. नवमीदिवशीं समाधीदर्शनास लोकांची फार दाटी होते. समाधि लहान तळघरांत असल्यामुळें व जाण्याचा रस्ता आकुंचित असल्यामुळें थोडथोड्या लोकांना एका वेळीं आंत दर्शनास सोडण्यांत येतें. राममंदिरांतील श्रीराममूर्तीच्या खालीं समाधि आहे. समाधीनजीक मागच्या बाजूस पितळेच्या पेटींत समर्थांच्या पादुका आहेत व नजीकच समर्थांची कुबडी व काठी आहे. समाधीजवळ सकाळसंध्याकाळच्या पूजाआरतींच्या वेळां-खेरीज करून एकांत असतो. समर्थसमाधीचें सावकाश मनमुराद एकांतांत दर्शन घ्यावयाचें असेल तर उत्सवाशिवाय इतरवेळीं गेलें पाहिजे. समर्थसमाधीसमोर एकां-तांत समर्थांचीं करुणाष्टकें म्हणतांना समर्थभक्तांच्या अंगांवर सात्त्विक अष्टभाव उत्पन्न होतात व क्षणभर संसाराचा विसर पडून आपण क्षणैक मोक्षसुखाचा अनुभव घेत आहोंत असें वाटतें. राममंदिराच्या दक्षिण बाजूस शेजघर आहे. त्यांत समर्थकालीन कांहीं वस्तु अद्याप ठेवल्या आहेत. समर्थांची सुप्रसिद्ध गुती शेज-घरांत आहे. ती समर्थांना शिवछत्रपतींनीं दिली होती अशी आख्यायिका आहे. गुतीच्या उंचीवरून समर्थ सहा फुटांपेक्षां अधिक उंच असावेत असें वाटतें. महा-राजांनीं समर्थांना वृद्धापकाळीं विश्रांति घेण्यास दिलेला पलंग तेथें आहे. त्या वेळीं समर्थशिष्यानें काढलेली तसबीर ही येथें आहे. एक पिकदाणी व पाणी पिण्याचा तुंबा आहे. उरमुडी नदींतून ज्या मोठ्या हंड्यांतून कल्याण पाणी आणीत असत ते दोन हंडे ही शेजघरांत आहेत. किल्ला चढून दरवाजांतून वर गेल्यावर डाव्या बाजूस आंगलाईचें देवालय आहे. अंगापूरच्या डोहांत राममूर्तीबरोबर सांपडलेली आंगलाईची मूर्ति समर्थांनीं येथें स्थापन केली आहे. किल्ल्याच्या नैऋत्य बाजूस एक लहान मारुतीचें देवालय आहे. समर्थ-शिष्या सुप्रसिद्ध वेणाबाई यांनीं सज्जनगडावर शके १६०० सालीं चैत्र कृष्ण चतुर्दशी दिवशीं समर्थचरणीं वंदन करीत असतांना समाधि घेतली. त्यांच्या दहनस्थळीं पूर्वी एक चंपकवृक्ष होता. हल्लीं तेथें एक वृंदावन आहे. तें समर्थसमाधीच्या वायव्य दिशेस एका ओंवरींत आहे. समर्थांच्या दुसऱ्या प्रसिद्ध शिष्या आक्का यांनीं ही येथेंच गडावर समर्थांच्या मागून चाळीस वर्षांनीं शके १६४३ सालीं इहलोक सोडला. त्यांच्या दहनस्थळीं ही एक वृंदावन आहे, तें देवालयाच्या ईशान्य दिशेस बंदिस्त जागेंत आहे.

**सुंदरमठ–महंत समर्थ.** जांब, चाफळ व सज्जनगड या तीन मठांशिवाय समर्थांचा 'सुंदरमठ' नांवाचा एक मठ आहे. हल्लींच्या बहुतेक सांप्रदायिकांना या मठाची माहिती नाहीं असें दिसतें. कारण त्यांच्या बोलण्यांत सुंदरमठाचें

नांव कधीं येत नाहीं. हल्लींच्या चाफळमठाधिपतींना ही सुंदरमठाची विशेष माहिती नसावी असें दिसतें. कारण ते कधीं सुंदरमठांतील ' सुंदर रघुनाथभुवना'स जाऊन तेथें उत्सव करतात असें दिसत नाहीं. श्री. शंकरराव देव यांना पुष्कळ दिवस चाफळचा मठच सुंदरमठ असावा असें वाटत होतें. परंतु समर्थप्रतापांतील पुढील ओंवी वाचून त्यांना सुंदरमठ चाफळमठाहून भिन्न आहे असें वाटलें. ती ओंवीः—"समर्थे चाफळअधिष्ठांनीं श्रीराम संस्थापिले । मग सुंदरमठीं समर्थांचें रहवें जालें ।। नाना गिरिकंदरीं दास विहरे निर्मिले । नाना मठ केले लोकोद्धारा ।। ( समास ७.२ )" दत्ताजी त्रिमलचें दिवाकर गोसावी यांस लिहिलेलें पत्र वाचून सुंदरमठ निराळा आहे, अशी त्यांची खात्री झाली. तें पत्र 'रामदास आणि रामदासी' भाग ९, लेखांक २६ यांत छापलें आहे. त्यांत शिवाजीमहाराजांची व समर्थांची शिवथरप्रांतीं सुंदरमठीं भेट झाली असा उल्लेख आहे. हा सुंदरमठ रायगडनजीक शिवथरप्रांतीं आहे. तेथून प्रतापगडची ' रामवरदायिनी ' 'विश्वमाता' सन्निध आहे. या सुंदरमठाचें वर्णन स्वतः समर्थांनींच केलेलें आहेः—" सुंदर मूर्ति सुंदर गुण । सुंदर कीर्ति सुंदर लक्षण ।। सुंदरमठीं देव आपण । वास केला ।। १२ ।। गिरिकंदरीं सुंदर वन । सुंदर वाहाती जीवन ।। त्यांमध्यें सुंदर भुवन । रघुनाथाचें ।। १३ ।। कडे कपाटे दर्कुटे । पाहों जातां भयचि वाटे ।। ऐसे स्थळीं वैभव दाटे। देणें रघुनाथाचें ।। १४ ।। अंतर्निष्ठ अखंड ध्यानी । सन्निध रामवरदायिनी । विश्वमाता त्रैलोक्यजननी । मूळमाया ।। १५ ।। " या सुंदरमठांत रघुनाथाचें सुंदर देवालय आहे. परंतु तेथें रावनवमीचा उत्सव होत होता असा कोणत्या ही समर्थचरित्रांत उल्लेख नाहीं. तेथें रामनवमीचा उत्सव चाफळाप्रमाणें होत असता तर हा पृथ्वीवरचा स्वर्ग पाहण्यास कांहीं लोकांना तरी दर साल जाण्याचा सुयोग आला असता.

( ४ ) **टाकळी मठ—महंत उद्धवस्वामी.** समर्थांचे पहिले शिष्य उद्धवस्वामी व पहिला मठ टाकळी येथील होय. नाशिक-पंचवटीपासून टाकळी अदमासें तीन मैल होईल. गांव अगदीं ल्हान असून नंदिनी नदीच्या कांठीं आहे. तेथून जवळच नंदिनी-गोदावरी यांचा संगम आहे. या पवित्र संगमोदकांतच बारा वर्षें दररोज सकाळपासून दुपारपर्यंत पाण्यांत उभें राहून समर्थांनीं तपश्चरण केलें. उद्धवजन्माची कथा मागें भाग चार यांत दिली आहे. टाकळीमठाची परंपरा ब्रह्मचारीशिष्यांची आहे. आजतागायत परंपरा पुढें दिली आहे.

| | | |
|---|---|---|
| १. उद्धवस्वामी ( श्रीसमर्थशिष्य ) | पुण्यतिथिकाल | फाल्गुन शुद्ध प्रतिपदा |
| २. भीमस्वामी | ,, | कार्तिक कृष्ण प्रतिपदा |
| ३. शिवरामस्वामी | ,, | मार्गशीर्ष कृष्ण ४ |

| | |
|---|---|
| ४. रामचंद्रस्वामी | पुण्यतिथिकाल पौष कृष्ण १२ |
| ५. गोविंदस्वामी | ,, आश्विन शुद्ध ४ |
| ६. रघुनाथस्वामी | ,, कार्तिक कृष्ण ७ |
| ७. गंगारामस्वामी | ,, कार्तिक शुद्ध ७ |
| ८. नारायणस्वामी | ,, विद्यमान. |

या मठांतील कांहीं कागदपत्रें रघुनाथस्वामी अज्ञान असतांना सन १८३५ नंतर बाळाजी विश्वंभर आभालदे यांनीं लांबविल्याबद्दल मठांत सन १८३७ ची एक यादी आहे. शिल्लक कागदपत्रांत ही कांहीं महत्त्वाचे कागद संशोधकांना मिळाले आहेत. इतर मठांत न मिळालेली बरीच महत्त्वाची कविता या मठांत सांपडली आहे. या मठांत सांपडलेल्या कागदपत्रांत उपलब्ध बखरींत सर्वांत जुनी अशी एक समर्थांची लहान बखर सांपडली आहे. ती शके १७२१ श्रावण शुद्ध नवमी शुक्रवार रोजीं समाप्त झाली असा उल्लेख आहे. ती मोरो भगवंत सबनीस, किल्ले सज्जनगड, यांनीं लिहिलेली आहे.

( ५ ) इंदूरबोधन मठ–महंत उद्धवस्वामी. उद्धवस्वामींचा टाकळीमठ गोदावरीचे पूर्वेस आहे. त्यांचा दुसरा एक मठ आहे. तो गोदावरीचे पश्चिमेस इंदूर-बोधन येथें आहे. उद्धवांनीं इंदूरबोधन येथें मठ स्थापन केला. तेव्हां तेथें गोवळकोंडे-करांचें मुसलमानी राज्य होतें. हल्लीं तेथें हैदराबादकरांचें मुसलमानी राज्य आहे. होळकरसरकारच्या इंदूरशीं या इंदूरच्या नांवाचा घोटाळा पडूं नये म्हणून या इंदुरास निजामाबाद म्हणतात. तें हल्लीं जिल्ह्याचें ठिकाण आहे. हनुमंतस्वामींच्या बखरींत इंदूरमठस्थापनेची हकीकत पुढीलप्रमाणें दिली आहे. शके १५७३ सालीं समर्थ संचार करीत असतां त्यांना कांहीं ब्राह्मण पर्जन्याकरितां पाण्यांत उभे राहून अनुष्ठान करीत आहेत असें दिसलें. एका मोठ्या शिळेवर समर्थांनीं प्रताप-मारुतीचें चित्र काढलें व त्यावर आपली छाटी टाकली व त्या ब्राह्मणांना त्या मारुतीवर महारुद्राचा अभिषेक करण्यास सांगितलें. तसें केल्यावर प्रचंड पाऊस पडला. तेथें समर्थांनीं कोदंडधारी ध्यानाची श्रीरामाची मूर्ति स्थापन केली व मारुतीपाशीं मठ स्थापन केला. तें ठिकाण रम्य, भव्य व शांत आहे. या ठिकाणीं अद्यापि ही व्याघ्रादिकांची भीति आहे. तेथील लोकांनीं समर्थांना तेथें राहण्याचा आग्रह केला, तेव्हां त्यांनीं उद्धवगोसावी यांस तेथें ठेवलें. त्यांना कांहीं दिवस तेथील मठांत व कांहीं दिवस टाकळीमठांत राहण्यास सांगितलें. ( ह. स्वा. बखर, पान २१७ ) हा मठ इंदूरपासून तीन मैल लांब होता. शके १६४० सालीं तो मठ इंदूर गांवांत आणला. मूळ मठास सारंगपूरचा मठ म्हणतात. हल्लीं गांवांतून पुजारी तेथील मारुतीची पूजा करीत असतो. या मठाची ही परंपरा ब्रह्मचारी आहे:—

( १ ) श्रीसमर्थशिष्य उद्धवस्वामी, ( २ ) माधवस्वामी, ( ३ ) गोविंदस्वामी, ( ४ ) अनंतस्वामी, ( ५ ) नरसिंहस्वामी, ( ६ ) रामकृष्णस्वामी, ( ७ ) रामचंद्रस्वामी, ( ८ ) जयरामस्वामी, ( ९ ) आत्मारामस्वामी, ( १० ) वामनस्वामी, (११) केशवस्वामी ( विद्यमान ). केशवस्वामी हे सातारा जिल्ह्यांतील बोरगांवचे. तेथें त्यांनीं एक वर्षापूर्वी समर्थमंदिर बांधलें आहे. त्यांची नुकतीच इंदूरबोधनमठांत स्थापना झाली. १ ते १० यांच्या समाधी सारंगपूर येथें मठानजीक मारुतीच्यापुढें दुतर्फा आहेत. उद्धवस्वामींची खरी समाधि टाकळीस आहे. परंतु या मठांत नित्यपूजेकरितां त्यांची एक समाधि बांधली आहे. या मठांत ही पुष्कळ महत्त्वाचे कागदपत्र संशोधकांना मिळाले आहेत. या परंपरेंतील अनंतस्वामी परमार्थांत जसे थोर अधिकारी होते, तसे ते मोठे शूर ही होते. डाव्या हाताला उपरणें गुंडाळून तो एका धिप्पाड वाघाच्या तोंडांत देऊन उजव्या हातानें त्यावर वार करून त्यांनीं त्यास मारलें. त्या वाघाचें कातडें हल्लीं मठांत आहे.

( ६ ) **तंजावर मठ–महंत भीमस्वामी.** भीमस्वामी मूळ राहणारे शहापूरचे. शहापूर हें सातारा जिल्ह्यांत कऱ्हाड तालुक्यांत मसूरपासून एक मैलावर आहे. सतीबाई शहापूरकर यांना येथेंच समर्थांनीं अनुग्रह दिला व त्यांच्याकरितां येथें मारुतीची स्थापना केली. शके १५६७सालीं भीमस्वामींना ही येथेंच अनुग्रह दिला. कल्याणस्वामींच्या पूर्वी भीमस्वामींना अनुग्रह दिला असें दिसतें. कारण शहापुराहून नंतर पुढें समर्थ कोल्हापुरास गेले व तेथें 'अंबाजी'ची–कल्याणांची–गांठ पडली. अनुग्रहानंतर बरींच वर्षे भीमस्वामी शहापुरास होते. समर्थ तंजावरास गेले तेव्हां व्यंकोजी राजे यांनीं त्यांचा अनुग्रह घेतला व समर्थांना तंजावरास राहण्याचा आग्रह केला. तेव्हां तेथें समर्थांनीं मठस्थापना केली व आपण थोडे दिवस तेथें राहून भीमस्वामींची तेथील मठांत कायमची योजना केली. रघुनाथ पंडित, आनंदतनय, गोसावीनंदन, माधवप्रभृति प्रसिद्ध कवि तंजावरमठांतील रामदासी परंपरेंतील आहेत. शहापुरांत अनुग्रह झाल्यावर भीमस्वामी फार दिवस कृष्णातीरीं समर्थसन्निध होते. सद्गुरुचरणांपासून दूर राहण्याचें त्यांना फार वाईट वाटलें. त्यांना समर्थांचा वियोग सहन न झाल्यामुळें त्यांनीं एक श्लोकबद्ध पत्र तंजावराहून समर्थांना पाठविलें. त्यांतील पुढील श्लोकांवरून भीमस्वामींना समर्थदर्शनाची किती उत्कंठा झाली होती हें दिसून येईल:—" अखंडीत हे वासना भेटि व्हावी । प्रभूपाइची धूळ माथां पडावी ।। मनींचे मनीं जाणिसी स्वामिराया । किती वाढवूं हा सविस्तार वाया ।। १ ।। " भीमस्वामींच्या पत्रास समर्थांनीं उत्तर पाठविलें. त्यांतील कांहीं भाग दिग्दर्शनार्थ देतों:—" चित्रकळा नाना नाटक । म्हणोनि नामें कर्नाटक ।। तेथें जे रामउपासक । पत्र त्यांसी ।। १ ।। तुम्ही पत्र पाठविलें । वाचूनि आश्चर्य वाटलें ।। परम समाधान झालें । देव जाणे ।। २ ।। प्रवृत्तीसी पाहिजे राजकारण ।

निवृत्तीसी पाहिजे विवरण ॥ जेथें अखंड श्रवणमनन । धन्य तो काळ ॥ ३ ॥ ......तुम्हांसि प्रपंच आहे कांहीं । आम्हांसि तुम्हांवेगळें नाहीं ॥ पत्रदर्शन सर्व ही । स्मरणें होतें ॥ १६ ॥ " भीमस्वामी प्रपंची होते, तेव्हां प्रपंची मठाधिपतींची समर्थांना आठवण होत नसेल अशी त्यांना शंका आली. तेव्हां समर्थ या पत्रांत तुमच्या सारख्या शिष्यांशिवाय आम्हांस दुसरें कांहीं नाहीं, म्हणजे शिष्य हाच आमचा प्रपंच आहे, असें समर्थांनीं ध्वनित केलें. भीमस्वामींनीं समर्थांचें अल्प चरित्र लिहिलें आहे. समर्थांच्या प्रत्यक्ष शिष्यानें लिहिलेलें असें हें एकच चरित्र उपलब्ध झालें आहे. त्याविषयीं विवेचन मागें पहिल्या भागांत केलें आहे. तंजावरास समर्थसंप्रदायाचे एकंदर पांच मठ आहेत. श्रीसमर्थशिष्य भीमस्वामींचा मुख्य मठ, भीमस्वामींच्या तीन शिष्यांचे तीन मठ व अनंतमौनींच्या परंपरेंतील सेतुरामबावांचा एक मठ. भीमस्वामींचे मठांत भीमस्वामींचे हातचा दासबोध आहे. त्याला वस्त्रांचीं अकरा वेष्टनें आहेत. मठांत श्रीसमर्थांच्या व भीमस्वामींच्या तसबिरी आहेत. श्री. शंकरराव देव यांनीं त्यांचे फोटो घेतले आहेत. भीमस्वामींची समाधि मठापासून दोन मैलांवर आहे. समाधीची स्थिति चांगली नाहीं. तंजावर येथील समर्थभक्त समाधीचा लवकर जीर्णोद्धार करतील अशी आशा आहे.

**( ७ ) डोमगांव मठ–महंत कल्याणस्वामी.** उद्धवस्वामी समर्थांचे प्रथम शिष्य असले तरी, कल्याणस्वामी हे समर्थांच्या सर्व शिष्यांत प्रमुख शिष्य—पट्टशिष्य—म्हणून सुप्रसिद्ध आहेत. समर्थ शके १५६६ सालीं कृष्णातीरीं आल्यावर शके १५६७ च्या रामनवमीच्या उत्सवापूर्वीच कोल्हापूर येथें त्यांची व समर्थांची गांठ पडली. तेव्हांपासून सतत ३३ वर्षे ते समर्थांजवळ होते. शके १६०० सालीं त्यांना समर्थांनीं स्वतंत्र मठ करून डोमगांवास राहण्यास आज्ञा केली. तेथें ३६ वर्षे राहून त्यांनीं समर्थसंप्रदाय वाढविला. कर्नाटक व तेलगंण प्रांतांतील पुष्कळ लोक त्यांचे शिष्य झाले. डोमगांवीं असतांना नजीक वाहणाऱ्या सीना नदीचे कांठीं एका कड्यावर कल्याणस्वामी राहत असत. ते वर्षांतून चार महिने डोमगांवीं, चार महिने परंड्यास व चार महिने डोणज येथें देवीचे देवळांत राहत असत. डोमगांवचे मठांत समर्थांची पुष्कळ कविता संशोधकांना सांपडली आहे. ज्या बाडावरून सत्कार्योत्तेजक सभेनें समर्थांची कविता प्रसिद्ध केली, तें सुप्रसिद्ध बाड येथेंच सांपडलें. हल्लीं तें बाड धुळें येथें सत्कार्योत्तेजक सभेकडे पाहण्यास मिळतें. तें पाहण्यासारखें आहे. कल्याणस्वामींनीं स्वहस्तें लिहिलेली दासबोधाची मूळ प्रत या मठांत आहे. डोमगांव येथें जाऊन त्याच प्रतीची नक्कल घेऊन श्री. देव यांनीं शुद्ध दासबोध शके १८२७ सालीं प्रथम प्रसिद्ध केला. कल्याणशिष्य उंब्रजमठाधिपति केशवस्वामी यांनीं लिहिलेली दासबोधाची सोनेरी प्रत याच मठांत आहे. कल्याणस्वामींना समर्थांनीं लिहून दिलेला कित्ता याच मठांत आहे. तो कित्ता बाळबोध लिपींत

आहे व अक्षरें सोनेरी शाईनें लिहिलेलीं आहेत. कल्याणस्वामींचा अंत परंड्यास झाला. तेथून त्यांचा पार्थिव देह समारंभानें वाजतगाजत डोमगांवीं आणला व तेथें तो दहन करून समाधि बांधली. समाधीचें मंदिर दर्शनीय आहे. कल्याणांचा अंत झाल्यावर ५९ वर्षांनीं म्हणजे शके १६९५ सालीं समाधि-मंदिर बांधलें. समाधीवर पादुकांच्या डाव्या बाजूस समर्थांचा पुढील प्रसिद्ध श्लोक लिहिलेला आहे:—"श्रीरामदासा कल्याण व्हावें। अतिसौख्य व्हावें आनंद व्हावें॥ उद्वेग नासो वरशत्रु नासो। नाना विलासें मग तो विलासो ॥ १ ॥" डोमगांव मठाची परंपरा:—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | कल्याणस्वामी | ... | पुण्यातिथि | आषाढ शु. १३ ( शके १६३६ ) |
| शिष्य | मुद्गलबुवा | ... | ,, | ज्येष्ठ शुद्ध १४ ( शके १६७१ ) |
| ,, | भिवाजी | ... | | |
| ,, | महारुद्र | ... | ,, | पौष कृष्ण ७ ( शके १७३३ ) |
| ,, | हनुमंतबुवा | ... | ,, | पौष शुद्ध १५ ( शके १७८१ ) |
| ,, | अंबादास | ... | ,, | आषाढ शु. ११ ( शके १८२६ ) |
| पुत्र | श्रीराम | ... | ,, | विद्यमान |

कल्याणस्वामींच्या समाधीपुढें मुद्गलस्वामींची समाधि आहे. तेथें दासमारुति आहे. मठास उत्पन्न आहे. त्यांतून उत्सवाचा खर्च होतो. कल्याणस्वामींच्या पुण्यतिथीस शाहूमहाराजांच्या महाराणी सक्वारबाई यांच्याकडून दरसाल २३६५ रुपये मिळत असत. त्यांना कल्याणस्वामींचा अनुग्रह होता. समर्थांची व कल्याणांची प्रथम भेट कोल्हापुरीं त्यांच्या मामाचे घरीं झाली. मसूर येथें पहिल्या रामनवमीच्या उत्सवांत शके १५६७सालीं आंब्याची डाहळी तोडतांना कल्याणस्वामी विहिरींत पडले वगैरे सविस्तर हकीकत मागें दिलेलीच आहे. कल्याणस्वामींच्या मुद्गल, जगन्नाथप्रभृति ४२ महंतांचीं नांवें संशोधकांना मिळालीं आहेत. कल्याणांच्या मागाहून डोमगांव मठाचे अधिपति मुद्गलस्वामी झाले. त्यांच्या चवदा महंतांचीं नांवें मिळालीं आहेत. कल्याणस्वामींचे दुसरे प्रख्यात शिष्य जगन्नाथस्वामी, मठ तडवळें यांच्या सदतीस महंतांचीं नांवें सांपडलीं आहेत. सर्व शिष्यांत कल्याणांना जसें प्रमुख समजतात, तसें शिष्य-मठ-परंपरेच्या कामांत ही ते अग्रगण्य आहेत. त्यांच्या महंतांइतके महंत इतर कोणत्या ही समर्थशिष्यांचे नाहींत.

( ८ ) **शिरगांव मठ—महंत दत्तात्रयस्वामी.** कल्याणस्वामींचे धाकटे बंधु दत्तात्रयस्वामी, यांचा मठ शिरगांव. हें लहानसें गांव सातारा जिल्ह्यांत कऱ्हाड तालुक्यांत आहे. शिरगांव चाफळपासून जवळ आहे. दोन्ही गांवांमध्यें फक्त एक डोंगर आहे. कोल्हापूर येथें समर्थ गेले असतांना कल्याणस्वामींबरोबरच प्रथम



श्रीसमर्थशिष्यवर

श्रीकल्याणस्वामी

सत्कार्योत्तेजक सभा-धुळें

दत्तात्रयस्वामींची गांठ पडली. दोघे बंधु व मातोश्री असे सर्व समर्थांबरोबर कांहीं दिवस होते. नंतर शिरगांव येथें मठ स्थापून तेथें दत्तात्रयस्वामी व त्यांच्या मातोश्री यांना ठेवलें. चाफळ येथील रामनवमीच्या उत्सवांतील कामें शिष्यवर्गामध्यें वाटून दिलीं, तेव्हां ललिताचें काम दत्तात्रयस्वामी यांजकडे दिलें; कारण त्यांचा आवाज गोड होता. हल्लीं सज्जनगडच्या उत्सवांत ललिताचें काम करण्याचा मान शिरगांव मठाकडेच आहे. स्वत: समर्थ कांहीं दिवस या मठांत राहिले होते. त्यांची एकांतांत ध्यानस्थ बसण्याची जागा मठांत एका लहानशा तळघरांत होती, ती अद्यापि दाखवितात. कल्याणस्वामी समर्थांप्रमाणें ब्रह्मचारी राहिले व धाकटे बंधु श्रेष्ठांप्रमाणें गृहस्थाश्रम स्वीकारून समर्थसंप्रदायाचीं कामें करूं लागले. या मठांत समर्थांनीं स्थापलेला एक लहान मारुति आहे. या मठांत समर्थांच्या दोन तसबिरी आहेत. पैकीं मोठी तसबीर भीमस्वामींचे बंधु लक्ष्मणस्वामी यांनीं काढलेली असावी. कारण लक्ष्मणस्वामींनीं काढलेली तसबीर शिरगांवमठांत आहे, असा ह. स्वा.च्या बखरींत उल्लेख आहे. समर्थकृत ग्रंथ लिहिण्यास कल्याणस्वामी येथें कधीं कधीं येत असत. या मठास उत्पन्न चांगलें आहे. शिवाय कांहीं मराठा संस्थानिकांकडून नक्त नेमणुकी आहेत. दत्तात्रयस्वामींची समाधि येथेंच आहे. मठांत पूजाअर्चा, दासबोध-वाचन, मनोबोधाचे श्लोक वगैरे नित्यनेमानें अद्याप पूर्वींप्रमाणें चाललें आहे.

शिरगांव मठाची परंपरा:—

१ दत्तात्रयस्वामी (समर्थशिष्य), २ पुत्र राघवस्वामी, ३ पुत्र यशवंतस्वामी, ४ पुत्र भीमस्वामी (भक्तलीलामृत ग्रंथ यांनीं लिहिला), ५ बंधु लक्ष्मणस्वामी, ६ शिष्य लक्ष्मणमहाराज व ७ परशुराममहाराज.

लक्ष्मणमहाराज यांनीं बडोदें येथें मठ स्थापन केला व परशुराममहाराज यांनीं ग्वाल्हेर येथें मठ स्थापन केला. ग्वाल्हेरच्या मठास श्री. शिंदे सरकारकडून वार्षिक ५००० रु. नक्त नेमणूक आहे. या मठांत दत्तात्रयस्वामींनीं शके १६०६ सालीं लिहिलेली दासबोधाची प्रत पाहण्यास मिळते. शिवाय आणखी (१) पंच-समासी, (२) जुनाट पुरुष, (३) आत्मराम, (४) मानसपूजा, असे समर्थांचे ग्रंथ दत्तात्रयस्वामींनीं लिहिलेले या मठांत आहेत. दासबोधासह सर्व पांच ग्रंथ एकाच बाडांत लिहिलेले आहेत.

**(९) तिसगांव मठ—महंत दिनकरस्वामी.** समर्थ-शिष्य दिनकरस्वामी यांचा मठ तिसगांव येथें आहे. दिनकरस्वामींचे पूर्वज अहमदनगरनजीक भिंगार या गांवीं राहत असत. त्यांच्या पूर्वजांचें नांव मुळे होतें. ज्योतिषशास्त्राच्या अध्ययनामुळें त्यांना 'पाठक' म्हणूं लागले. दिनकरांच्या वडिलांचें नांव नरहर पाठक व आईचें नांव द्वारकाबाई. कागदोपत्रीं दिनकरांचें नांव 'बाहिणाजी' असें

आहे. दिनकरस्वामी गृहस्थाश्रमी होते, तरी त्यांचा कल लहानपणापासून परमार्थाकडे व परोपकाराकडे होता. कोणी ही भिक्षुक त्यांच्याकडून विन्मुख जात नसे. दिनकरांची आई त्यांना नेहमीं म्हणे:—" परोपकारी कां रे छळिसी आम्हांसी । काई त्या धर्मासी म्हणो तुझ्या ॥ १ ॥ " दिनकरस्वामींना दोन बायका असून, एक मुलगा व एक मुलगी अशीं दोन अपत्यें होतीं. ते शके १५७४ सालीं घरदार सोडून भिंगारपासून चवदा कोसांवर श्रीवृद्धेश्वर नांवाचें फार प्राचीन, स्वयंभु व रम्य देवस्थान आहे तेथें गेले. वृद्धेश्वराच्या चारी बाजूंना डोंगर आहेत. दिनकरांनीं या रम्य स्थानाचें उत्तम वर्णन केलें आहे. त्यांतील एक श्लोक देतों म्हणजे त्या रम्य स्थानाची वाचकांना कल्पना येईल. " अमळ जळ तुटेना, खंड ओघीं पडेना । परम सुरस ऐसें स्थान कोठें दिसेना ॥ खळखळ जळ वाहे दाटले वृक्ष जेथें । जनपद ही न पावे, राहवें स्वस्थ तेथें ॥ " वर्णनाचे शेवटीं दिनकरस्वामी म्हणतात:—" रघुपति मग तेथें आठवे नाठवीतां । रघुपति मग तेथें धांवतो दूरि जातां ॥ रघुपति मग तेथें सोडितां ही न सोडी । दिनकरवरदें हे लाविली नित्य गोडी ॥ १ ॥ " शके १५७५ च्या फाल्गुनी पौर्णिमेस दिनकरस्वामींना स्वप्नांत एक मूर्ति दिसली व तिनें त्यांच्या मस्तकावर सव्य हात ठेवला. दिनकरस्वामी नमस्कार करणार तों ती मूर्ति अदृश्य झाली. त्यांना त्या मूर्तीचा ध्यास लागला. एक वर्ष सतत त्यांनीं पुरश्चरण केलें. शके १५७६ सालच्या फाल्गुनी पौर्णिमेस शिष्यांसह समर्थ वृद्धेश्वरास आले व त्यांनीं दिनकरस्वामींना अनुग्रह दिला. एक वर्षापूर्वीं दिनकरांना स्वप्नांत भेटलेली मूर्ति समर्थांचीच होती. वृद्धेश्वरापासून तीन कोसांवर तिसगांव आहे. तेथें मठ स्थापन केला व त्यांत समर्थांनीं नित्यपूजेसाठीं दिलेल्या श्रीराममूर्तीची स्थापना केली व रामनवमीचा उत्सव तेथें दरवर्षी करण्यास सुरुवात केली. समर्थांच्या सर्व शिष्यमंडळींत दिनकरस्वामी विद्वान् व बुद्धिमान् होते अशी त्यांची ख्याती होती. त्यांच्या 'स्वानुभवदिनकर' या उत्कृष्ट ग्रंथावरून त्यांची विद्वत्ता व बुद्धिमत्ता हीं दोन्ही दिसून येतात. त्यांची कांहीं स्फुट कविता ही आहे. अनुग्रहानंतर दिनकरस्वामींचें चाफळाकडे अगर सज्जनगडाकडे विशेष जाणेंयेणें होतें असें दिसत नाहीं. समर्थांच्या चरित्रग्रंथांत त्यांच्या नांवाचा उल्लेख सांपडत नाहीं. नगरप्रांतींच राहून त्यांनीं शिष्यपरंपरा वाढविली व संप्रदायाचा जोरानें प्रसार केला. त्यांच्या शिष्यमंडळींत बऱ्याच मराठे सरदारजहागिरदारांचीं नांवें आहेत. दिनकरांचे पुत्र व शिष्य रामचंद्र यांनीं 'सीतारामसंवाद' नांवाचा एक उत्तम ग्रंथ लिहिला आहे व अभंग, श्लोक, पदें वगैरे स्फुट कविता ही केली आहे. दिनकरांची समर्थांविषयीं उत्कट भक्ति 'स्वानुभवदिनकरां'तील ११ व्या कल्पांतील किरण पांच यांतील पुढील ओंव्यांवरून व्यक्त होते:— " स्वानुभवदिनकरीं रामदास । अंतर्बाह्य

व्यापले सावकाश ॥ दिनकराचे हृदयीं स्वयंप्रकाश । रामीं रामदास स्वलीळा ॥ ( ११. ५. १०८ ) तेणें वाटे मुखीं रामदास गावे । जिव्हें रामदास उच्चारावे ॥ निजकरीं रामदास पुजावे । अनंता उपचारीं॥ ( ११. ५.१०९ ) नेत्रीं रामदास पहावे । कांनीं रामदास-चरित्र ऐकावें ॥ रामदासपदींचें जिघ्रावें । निर्माल्य घ्राणें ॥ ( ११. ५. ११० ) ओष्ठीं रामदासपदीं चुंबन । पदांगुष्ठ चोखावें चुरचुरून ॥ रामदासांपुढें करावें नर्तन । निजपदीं सहजस्थिति ।। ( ११. ५. ११२ ) निजहृदयीं रामदास सांठवावे । स्कंधीं रामदास बैसवावे ॥ पाठीसी रामदास चालावे । वामसव्य सहजस्थिति ॥ ( ११. ५. ११३ )." दिनकरस्वामींविषयीं कांहीं माहिती मागें भाग १ यांत दिली आहे.

( १० ) **कण्हेरी मठ–महंत वासुदेवस्वामी** ( पंडित ). हा मठ सातारा जिल्ह्यांत वांई तालुक्यांत आहे. वांईवावडीवरून आंबड खिंड ओलांडल्यावर मांडरदेवाचा डोंगर आहे, त्याच्या पलीकडे कण्हेरी गांव आहे. यांचें मूळचें नांव सदाशिवशास्त्री येवलेकर असें होतें. सदाशिवशास्त्री विख्यात पंडित होते. त्यांनीं संस्कृताचा फार अभ्यास केला होता व त्याबद्दल त्यांना फार अभिमान होता. श्रीशंकराचार्यांप्रमाणें ते दिवसा मशाली लावून फिरत असत. जानव्यास सुरी बांधून दिग्विजयाकरितां ते निघाले होते. आपणांस कोणीं वादांत जिंकल्यास 'जिव्हा कापून देईन' असें ते म्हणत. समर्थांना वादांत जिंकण्याकरितां ते रामघळीस समर्थ होते तेथें आले. एका मोळीविक्या महाराकडून समर्थांनीं त्यांना वादांत जिंकविलें, ही आख्यायिका प्रसिद्ध आहे. तिचें सविस्तर कादंबरीप्रमाणें वर्णन संतविजय, ह. स्वा.बखर इत्यादि प्राचीन ग्रंथांत दिलें आहे. नंतर सदाशिवशास्त्री समर्थांना शरण गेले व त्यांचा त्यांनीं अनुग्रह घेतला. समर्थांनीं त्यांचें नांव **वासुदेवपंडित** असें ठेवलें. नंतर ते कण्हेरी येथें मठ करून राहिले. येथें एक मारुतीचें देवालय आहे. तें फार मोठें आहे. पुण्याचे सावकार मांडवगणे म्हणून होते, त्यांनीं मुलगा झाल्याबद्दल नवस फेडण्याकरितां हें प्रचंड मारुतीचें देवालय बांधलें अशी आख्यायिका आहे. या मठास उत्पन्न फार नाहीं. समर्थशिष्य वासुदेवपंडित यांच्या या मठास शिवाजीमहाराजांनीं शके १५९३ सालीं दिलेली एक सनद आहे ( सांप्रदायिक कागदपत्रें ). शिरवळ, पसरणी, मर्ढें, भुईंज वगैरे मठ या मठाखालील आहेत. वासुदेवस्वामींची समाधि येथें आहे. वासुदेवस्वामींना तत्कालीन लोक समर्थांची दुसरी प्रतिमा म्हणत, इतकी त्यांची योग्यता होती. गिरिधरस्वामी म्हणतात:––" वासुदेवनामा अनुष्ठानी । समर्थप्रतिमा म्हणती जनीं ॥ उत्कट परमार्थ विस्तारूनि । समर्थचरणीं लीन राहे ॥ ( स. प्र. १०-१४ ) " शिवाजीमहाराज ही समर्थांच्या खालोखाल वासुदेवपंडितांना मानीत असत ( स. प्र. ९-५५ ). फार

दिवस समर्थदर्शन झालें नसल्यास महाराज वासुदेवपंडितांचें दर्शन घेत असत; त्या योगें त्यांना समर्थवियोग सहन होत असे असें गिरिधरस्वामी म्हणतात.

( ११ ) **दादेगांव मठ–महंत देवदास.** दादेगांव येथें समर्थ-शिष्य देवदास यांचा मठ आहे. दादेगांव हें अहमदनगर जिल्ह्यांत नगरच्या पूर्वेस चवदा कोस आहे. या मठांतील परंपरा ब्रह्मचारी शिष्यांची आहे. देवदासांची बरीच कविता उपलब्ध आहे. परंतु आश्चर्याची गोष्ट ही कीं, त्यांची कविता दादेगांव मठांत न सांपडतां इतर मठांत सांपडली आहे. कारण काय असावें तें समजत नाहीं. देवदासांनीं समर्थांचें वर्णन पुढील पद्यांत केलें आहे:—

" समर्थ रामदास हा । उदास दास तो पहा ॥ जनांस नाकळे स्थिति । मनास नाकळे गति ॥ १ ॥ प्रपंच वारिला सळें । विवेक लावला बळें ॥ समस्त हेत साधला । रिपु बळेंचि मारिला ॥ २ ॥ भला समर्थदास हा। प्रयोजितांचि या पहा ॥ उदास वृत्ति फारसी । जनांत वृत्ति गाइसी ॥ ३ ॥ जनांत रामदास रे । बहूतमान्य त्यास रे ॥ तया पदींच वास रे। करील देवदास रे ॥५॥ " या मठाची परंपरा ब्रह्मचारी शिष्यांची आहे. ( १ ) देवदास ( समर्थशिष्य), ( २ ) कृष्णाजीबुवा, ( ३ ) जनार्दनबुवा, (४) दाजीबुवा, ( ५ ) आत्मारामबुवा, ( ६ ) नारायणबुवा ( विद्यमान ).*

( १२ ) **कारंजें मठ–महंत बालकराम.** बालकराम समर्थांचे शिष्य. त्यांची परंपरा. ( १ ) बालकराम ( समर्थशिष्य ), ( २ ) रोकडराम, ( ३ ) बापुस्वामी, ( ४ ) सखारामस्वामी, ( ५ ) लक्ष्मणस्वामी, ( ६ ) मारुतिस्वामी ( विद्यमान ),

मारुतिस्वामी → सखारामबुवा, रामबुवा, गणपतिबुवा

सखारामबुवा → सीतारामबुवा

मूर्तिजापुराहून कारंजें चवदा कोस आहे. प्राचीन कालापासून कारंजें शहर संपत्तिमान म्हणून प्रसिद्ध आहे. शककर्ते शिवाजीमहाराज यांचा मोर्चा एकदां या शहराकडे वळला होता. कारंजें येथील बालकरामांचे मठांत ७४ बाडें व ६ पोथ्या श्री. देव यांना मिळाल्या. गिरिधरस्वामी, दिनकरस्वामी यांच्याप्रमाणें बालकराम यांनीं पुष्कळ कविता केली आहे:—हरिश्चंद्राख्यान ( ७२ श्लोक व पदें ), ( २ ) पार्वतीलक्ष्मीसंवाद, ( ३ ) चंद्रहास्यकथा, (४) शंकरविवाह, ( ५ ) गजगौरीव्रत,

---

* समर्थशिष्यांपैकीं फक्त देवदासांच्याच कवितेंत उत्कट स्वदेशप्रीति दिसून येते. यांनीं " गजेंद्रमोक्ष " प्रणालिका वृत्तांत केला आहे. त्याचे फक्त २४ श्लोक आहेत.

(६) पार्वतीस्वयंवर, (७) विरडें (द्रौपदीचें), (८) सुदामचरित्र, (९) प्रल्हादचरित्र, (१०) वामनचरित्र, (११) रेणुकामाहात्म्य, (१२) चेंडुफळी, (१३) कथाकल्पकेदार, (१४) एकादशी, (१५) गोपीचंदाख्यान, (१६) हनुमंतभेट, (१७) अंगदशिष्टाई, (१८) सवाया, (१९) श्रीगुरूपदेश, (२०) पदसंग्रह, (२१) स्फुट, पदें, आरत्या, अभंग व श्लोक वगैरे.

बालकरामांचें टोपण नांव रामठेंगा असें होतें. बालकरामांनीं कांहीं स्फुट प्रकरणांत शेवटीं थोडेंसें आत्मचरित्र दिलें आहे. त्यावरून पुढील माहिती मिळते. ते यजुर्वेदी माध्यंदिन शाखेचे ब्राह्मण होते. त्यांचें उपनांव कळवे होतें. तुळजापूरची अंबाबाई ही त्यांची कुलदेवता होती. त्यांचे पूर्वज अष्टीस राहत असत. अष्टी जांबेच्या पूर्वेस चार कोस आहे. तेथून बालकरामांचे वडील शिंदखेडास गेले. तेथें बालकरामांचा जन्म झाला. तेथून ते पुसगांवास गेले. ते नेहमीं फिरत असत. त्यांचे चिरंजीव रोकडराम यांनीं कारंजें येथें कायमचा मुक्काम केला. बालकरामांनीं इतकी कविता लिहिली, परंतु आपला जन्म, शक, अनुग्रहकाल वगैरे कांहीं माहिती दिली नाहीं.

(१३) **कारंजें मठ—महंत प्रल्हाद.** कारंजें येथें दोन मठ आहेत. एक बालकरामांचा व दुसरा प्रल्हादांचा. प्रल्हाद गृहस्थाश्रमी होते. प्रल्हादमठाची परंपरा:—

(१) प्रल्हाद (समर्थशिष्य), (२) रामचंद्र, (३) माधव, (४) रामकृष्ण, (५) रामचंद्र, नारायण व लक्ष्मण, (६) जनार्दन लक्ष्मण (विद्यमान).

रामकृष्णबुवांचे द्वितीय पुत्र नारायणबुवा हे सुप्रसिद्ध वैकुंठवासी परमहंस वासुदानंद सरस्वतीस्वामी (पूर्वाश्रमींचे टेंबे) यांचे गुरु होते. समाधि घेण्यापूर्वीं बरींच वर्षें ते चाफळ व सज्जनगड येथें राहत असत. ३५ वर्षांपूर्वीं त्यांनीं चाफळ येथें श्रीरामापुढें देहत्याग केला. मठाला मिळालेल्या जमिनींच्या सनदा पुष्कळ आहेत. पण त्याप्रमाणें जमिनी मात्र मठाकडे चालत नाहींत. समर्थप्रतापांत जीं नांवें दिलीं आहेत, त्यांत प्रल्हादांचें नांव नाहीं. प्रल्हादबुवांचे चिरंजीव रामचंद्रबुवा हे प्रथम कारंजें मठांत राहण्यास जाऊं लागले. प्रल्हादबुवांचें मूळ गांव धामनी. हें कारंजापासून सहा कोस आहे. त्यांच्या पूर्वजांचें उपनांव भट असें होतें. प्रल्हादबुवा धामनी गांवींच राहत असत.

(१४) **भालगांव मठ—महंत त्रिंबकराज ऊर्फ भोळाराम.** समर्थशिष्य त्रिंबकराज हे भालगांवमठाचे अधिपति. त्यांची शिष्यपरंपरा:—(१) त्रिंबकराज (समर्थशिष्य), (२) त्यांचे शिष्य हरिहर, (३) पुत्र खंडेराव, (४) पुत्र

रघुवीरस्वामी, (५) पुत्र विश्वासराव ऊर्फ रावसाहेब, (६) रघुवीरस्वामी ऊर्फ नानासाहेब, (७) रंगराव ऊर्फ आबासाहेब

विश्वासराव पंडितराव

भालगांव निजामचे राज्यांत सुकना नदीचे कांठीं आहे. या नदीचें पाणी कधीं सुकत नाहीं, म्हणून तिचें नांव 'सुकना' असें पडलें आहे. मनमाडपासून हैदराबादेस जो आगगाडीचा फांटा आहे, त्या फांट्यावर **करमाळें** नांवाचें स्टेशन आहे, तेथून तीन कोस भालगांव आहे. दुसरें एक स्टेशन चिखलगांव नांवाचें आहे. तेथून ही भालगांव तीन कोसच आहे. पूर्वी तेथें बागबागाईत फार होती. त्रिंबकराजास बागाइताचा फार नाद असे. हल्लीं ही झाडी विपुल असल्यामुळें गांव रमणीय आहे. भालगांवपासून एक कोसावर एक लहान डोंगर आहे. तेथें त्रिंबकराजांची समाधि आहे. समाधीवर वृंदावन आहे. त्रिंबकराजांची कांहीं कविता उपलब्ध आहे. त्यांचा विठोबा नांवाचा एक शिष्य होता, त्यानें त्रिंबकराजांवर एक पद केलें आहे. त्यावरून त्रिंबकराजांची योग्यता कळून येते. त्यांचे शिष्य हरिहरस्वामी यांनीं त्रिंबकराजांवर दोन आरत्या केल्या आहेत. त्रिंबकराज हेच भोळाराम असें अद्याप खात्रीनें म्हणतां येत नाहीं, असें श्री. शं. श्री. देव म्हणतात.

**(१५) धोंडराई-गवराई मठ—महंत मुसळराम.** मुसळरामांसंबंधीं समर्थप्रतापांत पुढील ओंवी आहे:—"मुसळ करीं मुसळनामा। मुसळीं हनुमानाचा दावी महिमा॥ गंगातीरीं धोंडरींत सामर्थ्यसीमा। महापुरीं मुसळ रोविलें॥ (स. प्र. १०.५१)" निजामचे राज्यांत (पूर्वीच्या बेदरप्रांतीं) गोदावरीच्या कांठीं आंबडच्या दक्षिणेस धोंडराई या नांवाचा एक गांव आहे. धोंडरी गांव नाहीं. नदीच्या मध्यभागीं मारुतीचें देवालय आहे. या मारुतीच्या देवालयानजीकच गंगेला महापूर आला असतां नदीप्रवाहांत मुसळ रोंवून हनुमंताचा महिमा लोकांच्या निदर्शनास आणून दिला म्हणून त्यांचें नांव 'मुसळराम' पडलें. त्यास अनुलक्षूनच वरील समर्थप्रतापांतलें वर्णन आहे. मुसळरामांचें मूळ नांव कळत नाहीं. कारण त्यांचे सर्व वंशज ३०।३५ वर्षांपूर्वी प्लेगनें नष्ट झाले. धोंडराईत मठ नाहीं. धोंडराईनजीक दीड कोसावर गवराई म्हणून गांव आहे, तेथें हल्लीं राममंदिर आहे व पूर्वी मठ होता. मंदिरांत पट्टाभिषिक्त रामाच्या मूर्ति आहेत. मंदिराचा जीर्णोद्धार केला आहे. परंतु प्लेगनें मुसळरामांचा नष्टांश झाल्यामुळें तेथें कोणी रहात नाहीं. मठास सरकारी कुलूप आहे. मठास वार्षिक ३३ रु. ची जमीन होती, ती तेथील राहिवासी रामकृष्ण नाईक तरवडे यांना सरू करण्यांत

आली आहे. कोणत्या ही दुसऱ्या मठाचा नष्टांश झालेला नाहीं. मठाची इनाम जमीन ज्या अर्थी रामकृष्ण नाईक यांचेकडे सुरू आहे, त्या अर्थी त्यांनींच आपणांस मुसळरामांचे वंशज समजून पूजाअर्चा करून मठकार्य सुरू करावें अशी आमची त्यांना विनंति आहे. मुसळरामांचे सात अभंग प्रसिद्ध आहेत, त्यांतील शेवटचा सातवा अभंग:--

"सीतापती राया शरण तुझ्या पाया। व्यर्थ गेला वांया जन्म माझा ॥ १ ॥ नवमास उदरीं वाहिलें शरीर। तें ही दूर अंतकाळीं ॥ २ ॥ अंतकाळीं माझे सखे कोणी नाहीं। विचारूनि पाहीं सीतापती ॥ ३ ॥ सीतापती तुझें नाम हें तारक। मूसळा अचूक बुडों नेदी ॥ ४ ॥"

( १६ ) **नीलंगे मठ--महंत आण्णाप्पा.** समर्थशिष्य आण्णाप्पांविषयीं गिरिधरस्वामी समर्थप्रतापांत म्हणतातः--" आण्णापा नामें महंत। नाना उत्तम गुणें अलंकृत ॥ शिष्यसमुदायें कित्येक प्रांत। उद्धरिला कीर्ति ॥ ( स. प्र. १०. ३० )" नागपूर प्रांतांत बालाघाट जिल्ह्यांत नलिंगें येथें आण्णाप्पाबुवांचा मठ आहे. लातूर स्टेशनपासून १०।११ कोसांवर नीलंगें आहे. आण्णाप्पांचा उल्लेख इतर समर्थचरित्रकारांच्या ग्रंथांत आढळून येत नाहीं. तेव्हां चाफळसज्जनगडांकडे ते फारसे येत नसावेत असें वाटतें. त्यांच्या मठांत जे कागदपत्र संशोधकांना मिळाले त्यांत 'पादुकाख्यान' म्हणून एक प्रकरण आहे. त्यांतलीं बरींच पानें फाटलीं आहेत. दीड पृष्ठावर चवदा श्लोक सांपडले आहेत. त्यांवरून अण्णाप्पांविषयीं पुढील माहिती मिळते. त्यांचें गोत्र कौंडिन्य होतें. तरुणपणींच त्यांना वैराग्य उत्पन्न झालें. चवथा श्लोक असा आहेः--"जन्मापासुनिया प्रमाण करितां अष्टादशाब्दें जया। झालीं, तो मग चिद्विलास गमला आत्मप्रबोधीं तया ॥ तेव्हां सर्व हि संपदा सुखमयी मानूनियां वोखटी। श्रीमद्रामउपासना मग स्वयें संपादिजे गोमटी ॥ ४ ॥" यावरून आण्णाप्पांचें घराणें श्रीमंतीचें असतां त्यांनीं अठराव्या वर्षी संसाराचा त्याग केला व श्रीरामउपासनेस आरंभ केला असें दिसतें. समर्थांनीं आण्णाप्पांस अनुग्रह दिला त्या वेळीं त्यांचें नांव आनंद असें ठेवलें. "उपाधी नसे पाहतां ज्यास कांहीं विना राघवावांचुनी काम नाहीं ॥ ५ ॥" अशी त्यांची स्थिति होती. शास्त्राभ्यास करून ते संचारास निघाले. ते भिक्षा मागत असत व समर्थांप्रमाणें पानगे करून मिठाशिवाय खात असत. फिरत फिरत ते देवगांवीं आले. नंतर कांहीं दिवस 'अटवीमाजिं' राहिले. त्यांच्या प्रचारांत जे लोक त्यांना भेटले, त्यांना कथाकीर्तनानें शांत करून मनन करण्यास लाविलें. जयराम कवीनें आण्णाप्पांवर एक आरती केली आहे, तीवरून प्रथम ते करवीर प्रांतांत राहत होते व नंतर समर्थांचा अनुग्रह झाल्यावर 'जडमूढ तारावया' ते देवगांवीं गेले असें दिसतें. नीलंगेंमठांत समर्थांचे

कांहीं ग्रंथ सांपडले, त्यांत रामदासकृत असें म्हटलेला गजेंद्रमोक्ष सांपडला आहे. त्याचे ७९ श्लोक आहेत. शेवटचा श्लोक असा आहे:—"गजेंद्रास हा पावला देव जैसा। जसा जो भजे त्यासि पावेल तैसा ॥ धरीतां मनीं होइजे पापरूपा। म्हणे रामदास यदर्थी विकल्पा ॥ ७९ ॥" यावरून हा गजेंद्रमोक्ष रामदासांनीं केला असें होतें. परंतु ७७ व्या श्लोकाचा पूर्वार्ध असा आहे:—"नसे ऊपमा सद्गुरु रामदासा। जयाचेनि हा तूटला जन्मफासा ॥" हा गजेंद्रमोक्ष खरोखर समर्थांचा असता तर 'नसे ऊपमा सद्गुरु रामदासा' असा श्लोकाचा प्रथमचरण कधीं ही झाला नसता. अशी आत्मप्रौढी समर्थांनीं स्वतःची स्वतः कधीं वर्णन केलेली समर्थवाङ्मयांत सांपडत नाहीं. 'नसे ऊपमा सद्गुरु रामदासा।' याचा अर्थ रामदासांचा सद्गुरु जो श्रीराम त्याला उपमा नाहीं असा अर्थ केला तर आत्मप्रौढीचा दोष येणार नाहीं. पण असा अर्थ केल्यास शब्दांची ओढाताण होते. या मठाची परंपरा:—(१) आण्णाप्पा (समर्थशिष्य), (२) जयराम, (३) रामाजी, (४) हरि, (५) मनोहर.




कोनेरपर्यंत शिष्यपरंपरा व नंतर पुत्रपरंपरा. पुत्रपरंपरा झाल्यावर मठामध्यें भावाभावांत अधिकार व उत्पन्नासाठीं वाद उत्पन्न झाले व चाफळस्वामींच्या संमतीनें छत्रपतींनीं ते मिटविले, असें मठांतील कागदपत्रांवरून दिसतें. आण्णाप्पांचा मठ गांवांत आहे व समाधि गांवाबाहेर शेतांत आहे. आण्णाप्पा ऊर्फ आनंदस्वामींची पुण्यातिथि मार्गशीर्ष कृष्ण तृतीया ही आहे. मठाला निजामसरकाराकडून ३७५ रु.ची नक्त नेमणूक आहे. शिवाय ५।७ जमिनी इनाम आहेत. या मठाखालीं अकरा मठ आहेत असें म्हणतात; परंतु एका कोहेरमठाशिवाय इतर मठांचा अद्याप शोध लागलेला नाहीं. मठांत आण्णाप्पांचे हातची दासबोधाची एक प्रत आहे. ती डोमगांव मठांतील कल्याणस्वामींच्या हातच्या प्रतीएवढीच तंतोतंत आहे.

( १७ ) **शिरवळ मठ–महंत बाजी.** शिरवळ हें गांव पुणें जिल्ह्यांत भोर संस्थानांत नीरा नदीचे कांठीं आहे. तें पुण्यापासून ३२ मैलांवर आहे. समर्थशिष्य बाजी गोसावी यांचें आडनांव तांबे होतें, असें श्री. पंतसचिवांच्या शके १६८२ च्या पौष कृष्ण २ चे पत्रांत नमूद आहे. त्यांची जात मराठा-क्षत्रिय असून त्यांचे वंशज हल्लीं शिरवळास आहेत. ते म्हणतात कीं, बाजी गोसावी हे समर्थांचे शिष्य नव्हते. कण्हेरमठाधिपति समर्थशिष्य वासुदेव पंडित यांचे बाजी गोसावी शिष्य होते, असें त्यांच्या वंशजांचें म्हणणें आहे; परंतु खुद्द त्यांचेच घरीं जे कागदपत्र मिळाले, त्यांवरून बाजी गोसावी हे खुद्द समर्थांचेच शिष्य होते असें सिद्ध होतें. बाजींचा वंशवृक्ष सांपडला आहे तो असा:–( १ ) (समर्थशिष्य) बाजी, ( २ ) पुत्र रामजी, ( ३ ) कुसाजी, ( ४ ) खंडाजी, ( ५ ) काशीबा, ( ६ ) येसाजी, ( ७ ) विठोजी, ( ८ ) स्त्री गजाई. पंतसचिव श्रीमंत शंकराजी नारायण यांनीं शके १६२६ त शिरवळ मठास तेल दरसाल देण्यास सनद दिली आहे तींत "हरिभक्तपरायण बाजी गोसावी श्रीरामदासस्वामींचे शिष्य होते" असें म्हटलें आहे. शके १६४० सालीं बाजी गोसावी यांच्या समाधीचें वृंदावन डोलूं लागलें, असें लोक म्हणूं लागले, तेव्हां श्रीमंत नारो शंकर पंतसचिव यांनीं देशाधिकारी यांस माहिती विचारली. "गोष्ट यथार्थ" आहे असें कळविल्यावर नैवेद्य, नंदादीप व उत्सवाकारितां संस्थानांतून वीस बिघे जमीन इनाम दिली. बाजी गोसावी शके १६२८ सालीं वारले असें कागदपत्रांवरून दिसतें. त्यांची पुण्यतिथि मार्गशीर्ष कृष्ण अष्टमीस करतात.

( १८ ) **शिरवळ मठ–महंत नारायण.** शिरवळ येथें एक मठ समर्थ-शिष्य नारायणबुवांचा आहे. शिरवळांतील श्रीराममंदिर व नारायणबुवांचें समाधि-मंदिर जवळ जवळ आहेत. नारायणबुवांचे समाधीवर त्रयोदशाक्षरी मंत्र आहे. नारायणबुवांच्या समाधीसमोर एका शिष्याची समाधि आहे. पण त्याचें नांव व मठाची शिष्यपरंपरा यांची माहिती लागत नाहीं.

( १९ ) **मन्यारगुढी मठ–महंत अनंतमुनी.** समर्थ-शिष्य अनंतमौनी यांचा मठ कर्नाटकांत मन्यारगुढी या गांवीं आहे. त्यांचे शिष्य मेरुस्वामी यांनीं 'रामसोहळा' या नांवाचा मोठा ग्रंथ केला आहे. त्यांत २ऱ्या रुद्राच्या तिसऱ्या समासांत अनंतस्वामींविषयीं थोडी माहिती दिली आहे. त्यावरून पुढील माहिती मिळते. अनंतमौनींचें गोत्र अत्रि, उपनाम मौनी; ते भव्य व आजानुबाहु होते. त्यांचें वक्षस्थळ विशाळ होतें, डोळे लाल व पोट स्थूल होतें. वेद, वेदांत, व्याकरण व षट्शास्त्रें यांचें त्यांनीं अध्ययन केलें होतें. ते अरुणाचल येथें राहत असत. ते गृहस्थाश्रमी होते. पत्नीच्या आग्रहावरून त्यांनीं मेरुस्वामींना अनुग्रह

दिला. " सद्गुरु अनंताची पत्नी । परमस्नेहाळ ते माझी जननी ।। परमरूप मजलागुनी । संभविलें तिनें ।। ( रु. ९. स. १. ४५ ) मजकारणें स्वामसि प्रार्थुनी । महवाक्य सांगितलें श्रवणीं ।। परम प्रीतीनें अंतःकरणीं । अर्थ प्रांजळ केला ।। (९ स. १. ४६ )" अनंतमौनींनीं मन्यारगुढींत मठस्थापना करून दक्षिण अयोध्याच केली असें मेरुस्वामी म्हणतात. ( ९ रु. १ स. ६५ ) अनंतमुनींचा जन्मशक अगर त्यांना समर्थांनीं अनुग्रह दिल्याचा शक मेरुस्वामींनीं दिला नाहीं. त्यांचा समाधि-काल मात्र दिला आहे. शके १६१५ श्रीमुख नाम संवत्सरीं भाद्रपद कृष्ण नवमी दिवशीं अनंतसद्गुरूंनीं अवतार पूर्ण केला, असें मेरुस्वामी म्हणतात. ( ९ रु. १. स ६८ ) अनंतमौनी विद्वान् होते. त्यांनीं ग्रंथरचना केली असली पाहिजे. मेरुस्वामींनीं गुरूंच्या ग्रंथांचा उल्लेख केला नाहीं. फक्त मोघम उल्लेख एके ठिकाणीं आहे. " अनंत सद्गुरु बोध प्रसिद्ध । कृतार्थ केले साधक सिद्ध ।। भक्तीचें रहस्य निर्वेध । वेचिलें चित्ता ।। (२ रु. ३ स. ७३) " अनंतमुनींविषयीं गिरिधर म्हणतातः—" कर्नाटकीं अनंतमौनी । अरुणाचलप्रांत अवनी ।। मन्यारगुढीसी मेरुशिष्यतरणि । अनंत बोध कीर्णी फाकला ।। ( स. प्र. १०. २६ ) " मठाची परंपराः—श्रीरामदास, अनंत मौनी, मेरुस्वामी, अनंत, जिवबास्वामी, राजाराम, मेरुस्वामी, महिपति (विद्यमान).

( २० ) **तेलंगण मठ–महंत शिवराम.** समर्थशिष्य शिवरामस्वामी यांच्या संबंधानें गिरिधरस्वामी म्हणतातः—" शिवरामस्वामी नामा समर्थ-संगें । कित्तेक दिवस अंतरंगें ।। पुढें पुढें जगदुद्धारणप्रसंगें । तेलंगण-प्रांतीं आज्ञा-पिला ।। ( स. प्र. १०. ६९ ) " कल्याणशिष्य आपचंदमठपति शिवरामाहून हे भिन्न होत. यांच्या विषयीं सविस्तर माहिती मिळत नाहीं. याचें मुख्य कारण तेलंगण प्रांतीं कोणत्या गांवीं यांचा मठ आहे याचा पत्ता अद्याप लागला नाहीं. जी कांहीं थोडी माहिती मिळाली आहे, ती समर्थप्रतापांतील वरील श्लोकांवरून व इंदूरबोधन मठांत सांपडलेल्या त्यांच्या कवितेवरून मिळाली आहे. इंदूरबोधन मठांत त्यांचीं १९ पदपदांतरें सांपडलीं आहेत. त्यांत पहिलें पद डफगाणें आहे. समर्थांनीं ही एक डफगाणें केलें आहे. परंतु त्यांत शिष्यानें गुरूवर ताण केली आहे असें दिसतें. त्यांतील ९।१० चरणः—" धन्य धन्य महापुरुष । तेचि ईश्वराचे अंश ।। शुका-सारिखे म्हणती त्यासी ।। ९ ।। शिवरामाला तारिलें । जन्मापासुनी मुक्त केलें ।। भक्त लोक मुक्त केले । रामराजें ।। १० ।। " ९व्या चरणांतील 'शुकासारिखे उदास' यावरून महापुरुष म्हणजे समर्थच असें ठरतें. परंतु अक्षरशः शिवरामस्वामी समर्थांचेच शिष्य असा पुरावा पाहिजे असल्यास तो आठव्या पदांत आहे. त्या पदाचा शेवटचा चरणः—" रामदासा शिवराम भेटला । भवसंदेह तूटला ।। " शिवाय आरंभीं दिलेल्या समर्थप्रतापांतील ओंवीवरून ही शिवराम समर्थांचेच शिष्य होते हें सिद्ध होतें. शिवरामस्वामींचें डफगाणें मार्मिक व मनोरंजक आहे म्हणून तें सर्व देतों:—

" देवें लग्न केलें नाहीं। म्हणुनी पोर झालें नाहीं ॥ पोराचें ही लग्न नाहीं। म्हणवुनी बरें ॥ १ ॥ पोर होऊनी मेलें नाहीं। सून होऊनी मेली नाहीं। तीस पोर झालें नाहीं। म्हणउनी बरें ॥ २ ॥ आणि कन्या ती ही नाहीं। अथवा विधवा झाली नाहीं ॥ तिला पोर झालें नाहीं। म्हणउनी बरें ॥ ३ ॥ पोराला ही पोर नाहीं। पोरासाठीं कर्ज नाहीं। कर्जासाठीं व्याज नाहीं। म्हणउनी बरें ॥ ४ ॥ व्याजासाठीं दिवाण नाहीं। दिवाणाचा दंड नाहीं ॥ दंडासाठीं मालें नाहीं। म्हणउनी बरें ॥५॥ माल्यासाठीं विदेश नाहीं। दांत विचकणें ही नाहीं ॥ करुनी द्या हो कांहीं नाहीं। म्हणउनी बरें ॥ ६ ॥ मागण्यासाठीं येळीत नाहीं। म्हणउनी प्राण देत नाहीं। एकासाठीं एक नाहीं। म्हणउनी बरें ॥ ७ ॥ योगी सर्वस्वीं मोकळा। पाहतां त्याची अकळ कळा ॥ पाहतां दुनियाहूनि निराळा। सर्वस्वेसीं ॥ ८ ॥ धन्य धन्य महापुरुष। तेचि ईश्वराचे अंश ॥ शुकासारिखे उदास। म्हणती त्यासी ॥ ९ ॥ शिवरामा तारिलें। जन्मापासुनी मुक्त केलें ॥ भक्त लोक मुक्त केले। रामराजें ॥ १० ॥"

**( २१ ) पारगांव मठ–महंत शंकराजी गोसावी.** समर्थांच्या सुप्रसिद्ध अकरा मारुतींपैकीं एक मारुति पारगांव येथें आहे असें मागें भाग ५ (आ) 'अकरा मारुति' या प्रकरणांत सांगितलेंच आहे. कोल्हापूरपासून हल्लीं पारगांवास मोटारीनें जातां येतें. कोल्हापूर ते सातारा रस्त्यावर वाठार १२ मैल आहे, तेथपर्यंत रस्ता चांगला आहे. नंतर वाठार ते कोडोली रस्ता साधारण आहे. वाठारहून कोडोली रस्त्यावर ५व्या मैलावर मोटारींतून उतरून एक मैल चालत जावें लागतें. येथील मारुति प्रतापमारुति आहे व मूर्ति फार लहान आहे. समर्थांनीं ही मूर्ति आपल्या झोळींत घालून आणली होती, असें गांवांतील लोक सांगतात. पूर्वीचें देवालय एकदां जळलें होतें; नंतर पुन्हा ग्रामस्थांनीं बांधलें आहे. देवालय जळलें तेव्हां मारुतीची मूर्ति शंकराजी गोसावी यांनीं स्थापन केलेल्या मठांत आणून ठेवली होती. नंतर ती नवीन देवालयांत नेली. शंकराजी गोसावी मराठे होते. या मठांतील परंपरा मराठ्यांची आहे. शंकराजी गोसावी हे मूळचे राहणारे तोरगल किल्ला येथील होते. मठाची परंपरा खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

( श्रीसमर्थशिष्य ) शंकराजी गोसावी, नारायण, केशव, जगजीवन, भीमाजी, विठ्ठल, दादा, जगजीवन. सांप्रदायिक कागदपत्रांवरून पहिल्या जगजीवनाचे शिष्य भीमाजीपर्यंतच परंपरा समजते. दुसरे जगज्जीवन नुकतेच समाधिस्थ झाले. हल्लीं उत्पन्न कोल्हापूर दरबारनें, जगज्जीवनानंतर परवानगी-वांचून शिष्य घेतला म्हणून, जप्त केलें आहे. मठांत श्रीरामाची मूर्ति आहे. हल्लींचे शिष्य भिक्षेवर उदरनिर्वाह करतात. 'रामदास आणि रामदासी' भाग ९, श्रीसांप्रदायाचीं कागदपत्रें ४००–४१७ यांत या मठाच्या उत्पन्नासंबंधीं केशव गोसावी यांनीं व जगज्जीवन गोसावी व भीमाजी गोसावी यांनीं रामनवमीच्या

उत्सवाकरितां जमिनी चालविणेबद्दल केलेल्या अर्जाचा उल्लेख आहे. पत्र-लेखांक ४०७ यांत एक महत्त्वाची आज्ञा श्रीशाहूछत्रपतींनीं श्रीनिवास पंडित पंतप्रतिनिधि यांस दिली आहे. " श्रींचे संप्रदायी गोसावी यांसी इनाम असतील ते गोसावी परळीस येऊन राजश्री गंगाधरबावा यांचे समेत वर्तणूक करतील त्यांचा इनाम त्यांच्या पत्राप्रमाणें चालविणें. जे न वर्तत त्याचे इनामाऐवज श्रींच्या महोत्सवास व इमारतीस पावता करणें. "

( २२ ) **मनपाडळें मठ—महंत जयराम गोसावी.** पारगांवाहून कोल्हापुरास परत येतांना पायवाटेनें मनपाडळें चार मैलांवर आहे. तेथून टोपेपर्यंत तीन मैल पायवाटेनें आल्यावर कोल्हापुरापर्यंत सात मैल मोटारीनें येतां येते; म्हणजे कोल्हापुराहून मनपाडळें चवदा मैल आहे. विद्यमान मठपति रामचंद्रबुवा यांना जयराम गोसावी यांजपासून क्रमवार सर्व परंपरा माहीत नाहीं. फक्त तीन पिढ्यांचीच माहिती आहे! जेवढी माहिती मिळते तेवढी परंपरा अशी आहे:—समर्थशिष्य जयराम गोसावी, भगवंत गोसावी, नारायण गोसावी, बाळबुवा गोसावी, रामचंद्रबुवा गोसावी ( विद्यमान ). विद्यमान गोसावी शाळाशिक्षकाचें काम करीत असतात! मठाचें उत्पन्न थोडें आहे, म्हणून असें करावें लागतें. मठाला इनाम अकरा बिघे आहे, परंतु भर आकार बसला आहे. येथील मठांतील मारुति प्रतापमारुति आहे व उंची ५॥ फूट आहे. मठ व देवालय लहान असून गांवाचे ईशान्येस एका टोकास आहे, पण जलप्रवाहासन्निध एका प्राचीन वटवृक्षाखालीं रम्य ठिकाणीं आहे. येथें एक दुसरें मोठें मारुतीचें प्राचीन देवालय गांवाच्या दुसऱ्या टोकास आहे.

**कोनूर मठ—महंत राघवस्वामी.** हा मठ तंजावर प्रांतांत आहे. श्रीसमर्थांचे शिष्य राघवस्वामी यांचा हा मठ. समर्थांची जुनी तसबीर व श्रीराममूर्ति मठांत आहेत. मठ अगदीं जीर्णावस्थेंत आहे. राघवस्वामींचे शिष्य माधवस्वामी. रामायण, भारत, भागवत वगैरे अनेक ग्रंथ माधवस्वामींनीं केलेले आहेत. शके १८३७ सालीं मठींत एक ८।९ वर्षांचा मुलगा व त्याची आई अशीं श्री. देव यांना आढळलीं. त्यांना मठपरंपरा माहीत नव्हती. मठांत कांहीं ग्रंथसंग्रह आहे.

**सुंदर मठ.** वर्णन पूर्वी २०७–०८ वर दिलें आहे.

## स्त्रीशिष्य

( १ ) **मिरज मठ—मठाधिपति वेणाबाई.** स्त्रीशिष्यांपैकीं फक्त वेणाबाईनाच समर्थांनीं मठ स्थापन करून तेथें राहण्यास आज्ञा केली होती. वेणाबाईचा अधिकार तसाच मोठा होता. स्त्रीशिष्यांपैकीं कीर्तन करण्यास ही फक्त वेणाबाईस

अधिकार होता. स्त्रीशिष्यांपैकीं ग्रंथकार म्हणून ही त्या एकट्याच प्रसिद्ध आहेत. शिवसमर्थकालांतच नव्हे तर प्राचीनअर्वाचीन इतिहासांत उत्तम स्त्रीकाव्य-ग्रंथकार म्हणून वेणाबाई एकट्याच प्रसिद्ध आहेत. "पुरा कवीनां गणनाप्रसंगे। कनिष्ठिका-धिष्ठितकालिदासा। अद्यापि तत्तुल्यकवेरभावात्। अनामिका सार्थवती बभूव।" भावार्थः—पूर्वी एकादां, उत्तम कवींची गणना करतांना एक म्हणून प्रथम हाताची किरंगळी कालिदासांच्या नांवावर घातली; पुन्हा दुसरा त्यांचा सारखा उत्तम कवी पाहतांना तो सांपडेना म्हणून **अनामिका** हें किरंगळीजवळील बोटाचें नांव अन्वर्थक झालें. त्याप्रमाणें प्राचीनअर्वाचीन महाराष्ट्र वाङ्मयांत स्त्रीकाव्यग्रंथकारां-मध्यें वेणाबाईसंबंधानें म्हणतां येईल असें आम्हांस वाटतें. वेणाबाईचें 'सीतास्वयंवर' व इतर स्फुट कविता वाचल्यास आम्ही म्हणतों याची सत्यता वाचकांना पटेल.

वेणाबाईचें जन्मस्थान कोल्हापूर. तेथें त्यांचा जन्म केव्हां झाला, याचा उल्लेख कोणत्या हा चरित्रांत दिलेला नाहीं. त्यांचा जन्म मध्यम स्थितीच्या कुलीन घराण्यांत झाला असल्याकारणानें पुढें त्या आपल्या उत्कृष्ट चारित्र्यानें, प्रखर वैराग्यानें, तीव्र श्रीरामभक्तीनें, अनन्य गुरुनिष्ठेनें, अनुपम ग्रंथकर्तृत्वानें व अत्यंत साध्या राहणीनें सुप्रसिद्ध होतील, असें त्यांच्या मातापितरांना ही जन्मकालीं न वाटल्यामुळें वेणाबाईची जन्मपत्रिका केली नसावी, अगर केली असल्यास जपून ठेवली नसावी. कै. सर टी. माधवराव यांनीं हिंदुस्थानांतील स्त्रियांविषयीं "Unwelcomed you come" असें म्हटलें आहे. त्यांच्या म्हणण्याचा भावार्थ असा कीं, मुली जन्मास येतात तेव्हां पुत्रजन्माप्रमाणें मातापितरांना व आप्तेष्टांना विशेष आनंद होत नाहीं. कै. सर टी. माधवरावांचें वरील म्हणणें सर्वांशीं नाहीं तरी बऱ्याच अंशीं खरें आहे. पहिला मुलगा झाला म्हणजे साखर अगर पेढे वाटण्याची पद्धति हल्लीं ही दिसून येते. राष्ट्रभक्त स्वदेशी साखर व स्वदेशी साखरेचे पेढे वाटतात व इतर लोक स्वदेशीपरदेशींचा विचार न करतां मिळेल तसली साखर व मिळतील तसल्या साखरेचे पेढे वाटतात. परंतु पहिली मुलगी झाली असतांना पेढे अगर साखर वाटण्याची सर्रास पद्धति नाहीं. केव्हां केव्हां राजे लोक पुष्कळ पुत्रांनंतर व मध्यम प्रतीचे लोक ही नवसानें कन्या झाल्यावर कन्याजन्मकालीं पेढे वाटतात. पण अशीं उदाहरणें फारच थोडीं आढळून येतील. म्हणून सर टी. माधवरावांचें म्हणणें बऱ्याच अंशीं खरें आहे असें आम्ही म्हणतों. असो. कारण कांहीं ही असो, वेणाबाईचें जन्मटिपण अगर नक्की जन्मशक कोणत्या ही चरित्रांत सांपडत नाहीं ही गोष्ट मात्र खरी आहे. शके १५५०च्या सुमारास म्हणजे समर्थजन्मानंतर वीस वर्षांनीं त्यांचा जन्म झाला असावा असें अनुमान करण्यास जागा आहे. त्यांच्या वडिलांचें नांव गोपजी देशपांडे. हे सम-र्थांचे शिष्य होते. त्यांच्याविषयीं गिरिधरस्वामी म्हणतात:—' गोपजी गोसावी

वेणुबाईजनक । ज्यासी सादृश्य श्रीरघुनायक ।। बालपणीं उपदेशिले श्लोक । अध्यात्म रामायणाचे ।। ( स. प्र. १०.३३ ). काशिराजकन्यासंतति वेणाबाई । एकनिष्ठ उपासक भक्तराज पाही ।। ( स. प्र. १०.३४)" यावरून वेणाबाईंचे वडील गोपजीपंत देशपांडे हे समर्थांचे शिष्य होते. त्यांचें चारित्र्य व वर्तन इतकें उत्तम होतें कीं, त्यांना श्रीरामाच्या चारित्र्याची उपमा दिली असतां चालेल. त्यांनीं बालपणीं वेणाबाईस अध्यात्म रामायण शिकविलें होतें. वेणाबाईंचे मातामह म्हणजे आईचे वडील काशिराज नांवाचे सद्गृहस्थ होते, ते ही समर्थशिष्य असून एकनिष्ठ उपासक व भक्त होते. यावरून वेणाबाईंचें माहेर व आजोळ हीं दोन्ही अत्यंत कुलीन व सुशील घराणीं होतीं. त्या दोन्ही कुलीन घराण्यांतील गृहशिक्षणाचा परिणाम त्यांच्या भावी चारित्र्यावर, पारमार्थिक वृत्तीवर व ग्रंथकर्तृत्वावर झाला यांत शंका नाहीं. दुर्दैवानें अगर सुदैवानें त्यांना बालपणीं वैधव्यदशा प्राप्त झाली. सुदैवानें असें म्हटल्याबद्दल कित्येक वाचक आमच्यावर रागावतील हें आम्ही जाणून आहों. परंतु असें म्हणतांना Sometimes good cometh out of evil— अनिष्टादपि इष्टं स्यात्—केव्हां केव्हां वाईट गोष्टींतून चांगली गोष्ट निष्पन्न होते, या म्हणीकडे लक्ष देऊन आम्हीं 'सुदैवानें' असें म्हटलें आहे. वेणाबाईंना वैधव्य आलें नसतें तर त्यांनीं पतिसमवेत पतिव्रताधर्माप्रमाणें वागून संसार केला असता, त्यांना मुलेंबाळें झालीं असतीं व त्यांनीं फावल्या वेळीं थोडा वेळ एकनाथी भागवत वाचलें असतें; परंतु त्यांना सर्व वेळ एकनाथी भागवत वगैरे ग्रंथ वाचून परमार्थांत घालतां आला नसता. त्यांना समर्थांचा अनुग्रह मिळून दर रामनवमीच्या उत्सवास मिरजेहून चाफळास जातां आलें नसतें. प्रसंगविशेषीं समर्थांसमोर कीर्तन करण्याचा अधिकार प्राप्त झाला नसता व सीतास्वयंवरासारखे ग्रंथ लिहिण्यास वेळ ही सांपडला नसता. सद्गुरुचरणांवर मस्तक ठेवीत असतां श्रीरामरूपीं लीन होण्याचा सुयोग आला नसता व सज्जनगडासारख्या पवित्र स्थळीं त्यांच्या समाधीवर वृंदावन उभारण्यांत आलें नसतें. परमेश्वर भक्तांवर संकटें आणून त्यांची परीक्षा घेत असतो असें म्हणतात. त्याप्रमाणें परमेश्वरानें वेणाबाईंवर बालवैधव्यदशा आणवून त्यांच्या पातिव्रत्याची परीक्षा घेतली. त्या परीक्षेंत त्या तावूनसुलाखून बावनकशी सोन्याप्रमाणें बाहेर निघाल्या. "यथा स्त्रीणां तथा वाचां साधुत्वे दुर्जनो जनः" या भवभूतीच्या उक्तीप्रमाणें सीतादेवीच्या पातिव्रत्याबद्दल दुष्ट लोकांनीं त्रेतायुगीं ही शंका घेतली; तेव्हां वेणाबाईच्या पातिव्रत्याबद्दल दुष्ट लोकांनीं कलियुगांत शंका घेतली यांत आश्चर्य नाहीं. ज्याप्रमाणें सीतादेवींनीं दिव्यांतून बाहेर पडून आपलें पातिव्रत्य लोकांच्या निदर्शनास आणलें, त्याप्रमाणें वेणाबाईंनीं ही आपलें चारित्र्य व पातिव्रत्य शिवाजीमहाराजांसारख्या अवतारी पुरुषाच्या व कुत्सित टीकाकारांच्या प्रत्ययास आणलें. अलीकडे कांहीं विद्वान् पदवीधर टीकेच्या पडद्याआड दडून चिकित्सापूर्वक

आपणच अविश्वसनीय ठरविलेल्या चरित्रांमधील थोडासा त्रोटक भाग आधारास घेऊन, स्त्रीदाक्षिण्यास अजीबात फांटा देऊन, वेणाबाईच्या चारित्र्याकडे काकदृष्टीनें पाहून त्यांच्या चारित्र्यावर शिंतोडे टाकण्याचा निंद्य प्रयत्न करीत आहेत. Never speak ill of the dead. भावार्थः— 'मृत मनुष्याविषयीं निंदात्मक टीका करूं नका,' असा सर्वसाधारण नियम सांसारिक मनुष्यांविषयीं आहे. कारण मृत मनुष्यांना आपल्यावरील असत्य आरोपाचें खंडन करतां येत नाहीं. हा साधारण सांसारिक मनुष्यांविषयीं नियम झाला. मग मृत साधुसंतांवर टीका करितांना—ज्या साधुसंतांना हजारों लोक अवतारी समजून त्यांचे उत्सव शेंकडों वर्षे करीत आले आहेत—ज्यांनीं आपल्या राष्ट्राला आचरणानें, वाणीनें व ग्रंथानें ज्ञानामृत पाजून कर्तव्यजागृत केलें, परधर्मीयांना हीं पूज्य असलेल्या अशा स्त्रीपुरुष साधुसंतांवर टीका करतांना, टीकाकारांनीं ऐतिहासिक पुरावा नसतांना स्वतःस अविश्वसनीय वाटणाऱ्या बखरीसारख्या चरित्रांतील कांहीं भाग घेऊन त्यावरून पूज्य साधुसंतांच्या चारित्र्यांवर शिंतोडे टाकण्यासारखीं अनुमानें काढणें ही चिकित्सापूर्वक प्रामाणिक टीका नव्हे, असें आम्हांस वाटतें.

वेणाबाईचें सासर मिरज येथें होतें. माहेरीं लहानपणीं त्यांना वाचण्यास शिकविलें होतें, इतकेंच नव्हे तर त्यांचे वडील त्यांना अध्यात्म रामायण शिकवीत असा समर्थप्रतापांतील उतारा वर उद्धृत केलाच आहे. तेव्हां वेणाबाईना थोडें संस्कृत ही त्यांच्या वडिलांनीं शिकविलें असावें असें वाटतें. वैधव्यदशेनंतर सासरीं आल्यावर त्या सासरीं ही धार्मिक ग्रंथ वाचीत असत. एकनाथी भागवत हा त्यांचा आवडता ग्रंथ होता. समर्थ कृष्णातीरीं आल्यावर महाबळेश्वर, वांई, माहुली, कऱ्हाड व मसूर वगैरे ठिकाणीं संचार करून मिरजेस गेले. नित्य पांच घरें कोरडी भिक्षा मागण्याचा समर्थांचा परिपाठ होता. एके दिवशीं वेणाबाईच्या घरीं समर्थ भिक्षेस गेले व 'जयजय रघुवीर समर्थ' म्हणून मनोबोधांतील पुढील श्लोक म्हटलाः—"मुखीं राम त्या काम बाधूं शकेना। गुणें इष्ट धारिष्ट त्याचें चुकेना॥ हरीभक्त तो शक्त, कामास मारी। जगीं धन्य तो मारुती ब्रह्मचारी॥ (मनोबोध, ८७)" हा श्लोक म्हणून समर्थांनीं तुंबाभर दुधाची भिक्षा मागितली. दूध आहे, पण तें मारुतीसाठीं ठेवलें आहे, असें वेणाबाईच्या सासूबाई म्हणाल्या. त्यांतीलच थोडेंसें भिक्षेस घालण्यास काय हरकत आहे? असें म्हणून थोडेंसें दूध भिक्षेस घालण्यास वेणाबाईनीं सासूबाईची परवानगी घेतली व त्या घरांत दूध आणण्यास गेल्या. आपल्या सांप्रदायी नियमाप्रमाणें अधिक वेळ वाट न पाहतां समर्थ दुसऱ्या घरीं भिक्षेस गेले. वेणाबाई दूध घेऊन आल्या, तों त्यांना समर्थ दुसरीकडे गेले असें कळलें. दुधाची वाट न पाहतां समर्थ गेलेले पाहून वेणाबाईना फार वाईट वाटलें. कांहीं दिवस गेल्यावर पुन्हा समर्थ 'जयजय रघुवीर समर्थ' म्हणून वेणा-

समर्था, कदा रोगवारें नको रे । वदे राम, लक्ष्मणा हें लिही रे ।। १७ ।। तुझ्या दर्शनीं आडकाठी नको रे । वेद राम, लक्ष्मणा हें लिही रे ।। २५ ।। प्रभो, क्लेश घेऊनि विश्रांति द्यावी ।। देहे तोंवरी भक्ति तूझी घडावी ।। वेणिस्वामि ऐशा परी कौलदे रे । वदे राम, लक्ष्मणा हें लिही रे ।।२६।। " 'श्रीरामगुहसंवाद' हें ही स्फुट काव्य गोड आहे. ' संकेत रामायण ' म्हणून एक उत्तम काव्य गिरिधरस्वामींनीं केलें म्हणून प्रसिद्धि आहे. त्यांतील पहिलीं सहा कांडें वेणाबाईंचीं असावींत असें श्री. देव यांचें मत आहे. यांशिवाय अभंग, पदें वगैरे वेणाबाईंची कविता पुष्कळ आहे.

वेणाबाई दरवर्षी नियमानें चाफळास रामनवमीच्या उत्सवास जात असत. तेथें कांहीं दिवस सद्गुरु-कथाकीर्तन ऐकून मिरजेस परत येत. एकदां मिरजेच्या यवन अधिकाऱ्यानें जयरामस्वामींचा छळ केला. तेव्हां समर्थ मिरजेस गेले. समर्थांचें दैवी सामर्थ्य पाहून यवन अधिकारी समर्थांस शरण गेला. त्यानें जयरामस्वामींस छळाल्याबद्दल समर्थांची माफी मागितली व समर्थांना मिरजेस राहण्यास विनंति केली. त्याच्या आग्रहावरून मिरजेस समर्थांनीं मठ स्थापन केला व तेथें शके १५७७ सालीं वेणाबाईंची स्थापना केली. शके १६०० सालीं चैत्र कृष्ण १४ दिवशीं सद्गुरुचरणांचें वंदन करीत असतांना वेणाबाईनीं समाधि घेतली व श्रीरामरूपांत लीन झाल्या. वेणाबाईंच्या (१) बाईयाबाई, (२) सकुबाई, ( ३ ) आक्काबाई, ( ४ ) मुक्ताबाई, ( ५ ) बाकूबाई व ( ६ ) भीमाबाईप्रभृति अनेक शिष्यिणी होत्या. बाईयाबाईचे शिष्य समर्थप्रतापकार सुप्रसिद्ध गिरिधरस्वामी.

**( २ ) मठ राशिवडें—मठाधिपति अंबिकाबाई.** स्त्रीशिष्यांपैकीं फक्त वेणाबाईचा एक मठ मिरजेस आहे अशी पुष्कळ लोकांची समजूत होती. परंतु कोल्हापूर प्रांतांत गगनबावडा संस्थानांत राशिवडें येथें अंबिकाबाईनीं एक मठ स्थापित केला होता. गिरिधरस्वामी म्हणतातः—" अंबिका नामें कोरान्नें विजयपुरीं । वाताावर्ती पातली कृष्णातीरीं ॥ करवीरप्रांतीं हरिभक्ति बरी । शिष्यसंप्रदायें केली ही ॥ ( स. प्र. ११. २० )." यावरून विजयपूर-विजापूर हें अंबिकाबाईचें मूळगांव—माहेरगांव होतें. नंतर त्या फिरत प्रथम कृष्णातीरीं आल्या व करवीर प्रांतांत येऊन हरिभक्ति करून ( मुख्य हरिकथानिरूपण ) मठ स्थापन करून शिष्यसंप्रदाय वाढविला असें दिसतें. समर्थप्रतापांत गगनबावडें संस्थानांत राशिवडें गांवीं त्यांनीं मठ स्थापन केला असा उल्लेख नाहीं. परंतु आतां तशी विश्वसनीय माहिती लागून मठपरंपरा ही कळली आहे. अंबिकाबाईचें सासरगांव कोणतें? राशिवडें होतें कीं काय याविषयीं नक्की माहिती अद्याप संशोधकांना लागली नाहीं. राशिवडें मठाची परंपराः—

( १ ) समर्थशिष्या अंबिकाबाई, ( २ ) आक्का ऊर्फ भिऊबाई, ( ३ ) शिष्य मल्हारबुवा.

( ३ ) **मठ वाळवें–मठाधिपति अंबिकाबाई.** अंबिकाबाईचा दुसरा एक मठ वाळवें येथें आहे. त्या मठाची परंपरा:—( १ ) समर्थशिष्या अंबिकाबाई, ( २ ) काशिकाबाई, ( ३ ) मल्हारबुवा, ( ४ ) गिरिबुवा, ( ५ ) व्यंकाजीबुवा, ( ६ ) मोरेश्वर, ( ७ ) पुत्र बाळाजी, ( ८ ) विद्यमान मठपति रामचंद्र. मल्हारबुवांना काशिबाईचा अनुग्रह होता असें सांगतात. परंतु मठांत एका जुन्या कागदावर संशोधकांना पुढील श्लोक आढळला त्यावरून मल्हारबुवांना भिऊबाईचा अनुग्रह होता असें सिद्ध होतें. श्लोक:—" श्रीरामदास-गुरु अद्वय अंबिकेला । तेथोनि ज्ञान पुढती भिउबाइ तीला ॥ मल्हार सद्गुरु आम्हा परिपूर्ण ज्ञानी । हे गिर्धरास्तवन मोक्षरुपी म्हणोनी ॥१॥ " भिउबाई व काशीबाई या दोघी ही अंबिकाबाईच्या शिष्यिणी. अंबिकाबाईनीं राशिवडें येथें मठ स्थापन केला, तेथें भिऊबाई राहूं लागल्या. काशीबाई वाळवें येथील दुसऱ्या मठांत राहूं लागल्या. भिऊबाईचे शिष्य मल्हारबुवा हे काशीबाईनंतर वाळवें मठांत राहून दोन्ही मठांची व्यवस्था पाहूं लागले. मल्हारबुवांपासून दोन्ही मठांची परंपरा एकच झालेली दिसते. हल्लीं राशिवडें मठाची व्यवस्था श्रीमंत पंत अमात्य बावडेकर यांचे कडूनच होते. अंबिकाबाईचें पुढील पद सुप्रसिद्ध आहे:—" मी सद्गुरुघरची सैरी शोभतें बरी ॥ धृ० ॥ बाई मज गोल्हाटीं गे राहाणें । तेथुनि श्रीहाटीं मज पाहाणें ॥ त्रिकुटीं शिखरी येउनि जाणें ॥ बोलत्यें बरी ॥ १ ॥ बाइ मी त्रिगुणीं खेळ खेळतें । चतुर्थगुणीं मी साक्षी होतें । सदा मी येतें जातें । भय न अंतरीं ॥ २ ॥ स्थूल सूक्ष्म कारण । चौथा देह महाकारण । स्थानें क्रीडायाचीं जाण । माझीं हे बरीं ॥ ३ ॥ आतां मी सर्वांसी ग्रासुनी । मोहातीत क्रीडतें अनुदिनीं । निःशंक वर्ततें हो जनीं । पहा चातुरी ॥४॥ रामदासाश्रय म्यां केला । म्हणउनि विलास सर्व ही झाला । अंबी न विसरे गुरुपदाला । प्रतिज्ञा खरी ॥ ५ ॥ " पद कितीतरी गोड आहे. अंबिकाबाईनीं अध्यात्मरामायण, एकनाथी भागवत वाचल्याचा दाखला नाहीं. सद्गुरु समर्थांचा अनुग्रह झाला—आश्रय केला म्हणून स्त्रियांना देखिल पुराणकीर्तनश्रवणानें अध्यात्मज्ञान समजून त्रिगुण, चौदेह इत्यादि तत्त्वज्ञानाच्या विषयावर देखील सोप्या भाषेंत गोड पदें करण्याची योग्यता आली. धार्मिक, राजकीय अगर सामाजिक कोणत्या ही बाबतींत समाजसुधारणा करावयाची असल्यास स्त्रियांना ही पुरुषांप्रमाणें राष्ट्रोन्नतीच्या कामांत भाग घेण्यास अवसर ठेवला पाहिजे. त्याप्रमाणें समर्थांनीं आपल्या संप्रदायांत स्त्रियांना अनुग्रह देऊन शिष्यिणी केल्या. एवढेंच नव्हे तर वेणाबाईप्रमाणें योग्य व अधिकारी शिष्यिणींना मठांत मठाधिपति करून शिष्यसंप्रदाय वाढविण्यास सांगितलें. त्याप्रमाणें वेणाबाईची शिष्यपरंपरा आहे व अंबिकाबाईची ही शिष्यपरंपरा आहे. समर्थांनीं सतराव्या शतकांत स्त्रियांना संप्रदायांत अवसर देऊन त्यांना राष्ट्रकार्य करण्यास शिकविलें. असें असतां विसाव्या

शतकांतील समाजसुधारकांचीं चरित्रें लिहिणारे कांहीं सुशिक्षित पदवीधर लोक समर्थांनीं स्त्रियांना अनुग्रह दिल्याबद्दल दोष देण्यास प्रवृत्त होतात हें देशाचें दुर्दैव होय.

आजपर्यंत उपलब्ध झालेल्या कागदपत्रांवरून व चरित्रग्रंथांवरून समर्थ-शिष्यिणींपैकीं मठाधिपति अशा दोघीच होत्या, ( १ ) वेणाबाई व ( २ ) अंबिकाबाई. त्यांच्याविषयीं माहिती वर दिलीच आहे. आतां समर्थांचा फक्त अनुग्रह घेऊन ज्या शिष्यिणी परिस्थित्यनुरूप संप्रदायाचें कार्य करीत असत त्यांच्याविषयीं थोडीबहुत उपलब्ध असलेली माहिती देतों.

( १ ) **अन्नपूर्णाबाई.** उद्धवस्वामी जसे समर्थांचे पहिले शिष्य, तशा त्यांच्या मातोश्री या समर्थांच्या पहिल्या शिष्यीण होत. त्यांच्याविषयीं गिरिधरस्वामी म्हणतात:—"अन्नपूर्णाबाई उद्धवमाता । गिरिधरमहंताची कांता ॥ केवळ अंतर्निष्ठ समर्था । ध्यानीं मनीं आठवी ॥ (स. प्र. ११. ५५)." उद्धवजन्मापूर्वी गिरिधरपंत वारल्यावर अन्नपूर्णाबाई सती जाण्यास निघाल्या होत्या, तत्पूर्वी समर्थांना नमस्कार केला तेव्हां ते 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' असें म्हणाले वगैरे माहिती पूर्वी 'तपश्चर्या' भागांत दिली आहेच.

( २ ) **सतीबाई शहापूरकर.** समर्थ कृष्णातीरीं आल्यावर पहिल्या शिष्यीण सतीबाई होत. त्यांना अनुग्रह देण्यापूर्वी अनेक प्रकारें त्रास देऊन समर्थांनीं त्यांची परीक्षा केली ( स. प्र. ११. १७+१८ ). त्यांच्याविषयीं अधिक हकीकत मागें 'कृष्णातीरीं आगमन' या भागांत दिली आहे.

( ३ ) **रुक्मिणीबाई.** या कल्याणस्वामींच्या मातोश्री. कोल्हापुरास प्रथम यांच्या बंधूंच्या घरीं समर्थांनीं 'अंबाजीस' मागितलें. तेव्हां त्या म्हणाल्या, "आम्ही सर्व म्हणजे अंबाजी, अंबाजीचा धाकटा भाऊ दत्तात्रय व स्वत: रुक्मिणीबाई असे स्वामीजवळ राहतों." तेव्हां समर्थांनीं अनुग्रह देऊन दत्तात्रयास शिरगांव येथें मठ स्थापून ठेवलें, असा प्राचीन चरित्रांत उल्लेख आहे. गिरिधरस्वामी समर्थप्रतापांत यांच्या नांवाचा निर्देश कां करीत नाहींत हें समजत नाहीं.

( ४ ) **चिमणाबाई ऊर्फ आक्का.** या कऱ्हाडचे देशपांडे रुद्राजीपंत यांच्या कन्या. यांना तीन दिवस थंड पाण्यांत ठेवून समर्थांनीं त्यांची परीक्षा घेतली ( स. प्र. ११. १९ ). या फार हुषार व धोरणी असत. यांनीं सज्जनगड मठाची व्यवस्था समर्थांचे पश्चात् ३७ वर्षें चालविली. शाहूमहाराज साताऱ्यास आल्यावर श्रेष्ठांचे नातु गंगाधरस्वामी यांस त्यांनीं जांबेहून आणून सज्जनगडाचे मठांत त्यांची स्थापना केली. ते आक्कांना मातोश्रीप्रमाणें मानीत. यांची समाधि सज्जनगडावर आहे.



श्रीछत्रपती शिवाजीमहाराज

( श्री. चिं. वि. वैद्य यांच्या शिवचरित्रांतील चित्रावरून )

( पान २३३ )

(५) **द्वारकाबाई.** या परम उदास असून समर्थचरणीं यांचा दृढ विश्वास होता; यांनीं पुष्कळ ग्रंथरचना केली पण ती उपलब्ध नाहीं.

(६) **नवाबाई.** या तापीतीरीं राहत असत. त्या भागांत त्यांनीं लोकांमध्यें परमार्थाचा विस्तार केला.

(७) **मानाबाई.** या वैराग्यशील असून श्रीगुरुचरणीं एकनिष्ठ असत. त्या जनसमूहांत येत नसत.

(८) **आपाबाई.** या कीर्तन चांगल्या करीत. यांच्याविषयीं गिरिधरस्वामी म्हणतातः—" आपाबाई संगीत कीर्तनीं । कीर्तन करी म्हणे राजांगणीं । समर्थें बहुत लौकिक जनीं । आपण कीर्तन ऐकलें (स. प्र. ११. २४)" यावरून समर्थकालीं स्त्रियांच्या कीर्तनास लोक जात नसत असें दिसतें.

(९) **सखाबाई.** या वैराग्यशील होत्या. त्या चाफळास राहत व रामनवमीच्या उत्सवाकरितां नानाप्रकारच्या वस्तू संग्रह करून ठेवीत.

(१०) **गंगाबाई.** एकदां समर्थ नेहमींप्रमाणें दार लावून भोजन करीत असतां, गंगाबाईनीं काय पाहिजे असें विचारिलें, तेव्हां त्यांना मारुतीचें दर्शन झालें (स. प्र. ११. २७).

(११) **गोदाबाई.** या फार भाविक होत्या.

(१२) **अंताबाई.** यांची परीक्षा घेण्याकरितां यांना उकिर्ड्यांत पुरलें, नदींत टाकलें व नंतर अनुग्रह दिला (स. प्र. ११. २९).

(१३) **कृष्णाबाई.** या अंध होत्या. चाफळ येथें श्रीरामाचे देवालयांत समर्थांनीं त्यांना ठेवून घेतलें होतें. त्यांना श्रीकृपेनें दृष्टि प्राप्त झाली, नंतर त्यांचें लग्न झालें.

## राजदरबारी शिष्य

(१) श्रीछत्रपति शककर्ते शिवाजीमहाराज, (२) निळो सोनदेव मुजुमदार, (३) बाळाजी आवजी चिटणीस, (४) रामचंद्र नीलकंठ, पंत-अमात्य, हुकमतपन्हा, (५) गणेशपंत, (६) प्रल्हादपंत, (७) नानाजीपंत, (८) रामकृष्णपंत, (९) विश्वंभरपंत, (१०) विश्वासराय, (११) नारायणपंत, (१२) नृसिंहराय, (१३) रायाजीपंत, (१४) रंगनाथपंत, (१५) कोनेरीपंत मल्लारीपंत, (१६) अंबाजी, (१७) बालकृष्णपंत शहापूरकर, (१८) अंताजी गोपाळ वाकनीस, (१९) अनंतभट महाबळेश्वरकर, (२०) आनंदराव देशपांडे, (२१) तिमाजीपंत.

(१) **छत्रपति शककर्ते शिवाजीमहाराजः**—छत्रपति शिवाजीमहाराज हे क्षत्रियकुलोत्पन्न आहेत. त्यांच्या महाराष्ट्रांतील पूर्वजांचें आडनांव भोसले. उदेपूरच्या सुप्रसिद्ध रजपूत शिसोदें क्षत्रिय घराण्याशीं महाराष्ट्रांतील भोसले घराण्याचा

संबंध आहे. सन १३०३ सालीं चितोडचा राणा लक्ष्मणसेन हा राज्य करीत होता. त्याचा नातु प्रख्यात राणा दिलीप याच्या कुळांत मालोजी राजे भोसले यांचा जन्म झाला, असें जयराम कवि म्हणतो. 'महीच्या महेंद्रामधें मुख्य राणा। दिलीपास त्याच्या कुळीं जन्म जाणा॥ तयाच्या कुळीं माल भूपाळ झाला। जलानें स्वयें शंभु संपूर्ण केला॥ (राधामाधवविलासचंपू)." मालोजी राजे भोसले या दिलीप राण्यापासून पंधरावे वंशज होत. भोसाजी राण्याचे पुत्र देवराजजी हे सन १४१५ मध्यें महाराष्ट्रांत आले, म्हणून देवराजजींच्या येथील घराण्याचें आडनांव भोसले पडलें असें कित्येक म्हणतात. कित्येक असें म्हणतात कीं, देवराजजी महाराष्ट्रांत प्रथम वेरूळ प्रांतांतील भोसे या गांवीं येऊन राहिले म्हणून त्यांच्या येथील वंशजांचें आडनांव भोसले असें पडलें. शिवाजीमहाराजांचे पणजे बाबाजी भोसले. त्यांना दोन पुत्र मालोजी व विठोजी. मालोजीचा जन्म सन १५५० सालीं व विठोजीचा सन १५५३ सालीं झाला. मालोजीनें प्रथम लुखजी जाधवरावाकडे व नंतर नगरच्या निजामशाहींत नोकरी धरली. फलटणचे जगपाळराव निंबाळकर यांची बहिण दीपाबाई ही मालोजीची बायको. हिच्या उदरीं शहाजीचा जन्म सन १५९४ सालीं झाला. सन १६०४ मार्चमध्यें मालोजीस निजामशाहींत १२००० स्वारांची मनसब दिली. १६०४ एप्रिलमध्यें शहाजीचे लुखजी जाधवराव यांची कन्या जिजाबाई हिच्याशीं लग्न झालें. भोसले घराणें सूर्यवंशी क्षत्रिय व जाधवरावांचें यादव घराणें चंद्रवंशी क्षत्रिय. सूर्यवंशी शहाजी राजे व चंद्रवंशी जिजाबाई, या दंपत्यापासून महाराष्ट्रराज्यसंस्थापक छत्रपति शिवाजीमहाराजांचा जन्म शिवनेरी किल्ल्यांत शके १५४९ वैशाख शुद्ध (१०-४-१६२७) द्वितीया या दिवशीं झाला असें जुने इतिहासकार म्हणतात. नवीन इतिहासकार शके १५५१ फाल्गुन कृष्ण तृतीया (१९.२.१६३०) या दिवशीं झाला असें म्हणतात. शहाजी राजे फार शूर व धोरणी होते. प्रथम त्यांनीं अहमदनगरच्या निजामशाहींत नोकरी धरली. ती सोडून नंतर विजापूरच्या आदिलशाहींत नोकरी धरली. नंतर पुन्हा निजामशाहींत नोकरी धरली. त्या वेळीं अहमदनगरचा दिवाण फत्तेखान यानें मोंगलास शरण जाऊन अल्पवयी बादशहास मोंगलांच्या स्वाधीन केलें. अशा बिकट प्रसंगीं शहाजीनें न डगमगतां सैन्य जमवून एक लहान मूल गादीवर बसवून निजामशाहीची पुन्हा स्थापना केली. याबद्दल शहाजींस King-maker असें इतिहासकार म्हणतात. या वेळीं शहाजीराजांच्या मनांत स्वतंत्र हिंदुराज्य स्थापण्याची कल्पना आली होती, परंतु परिस्थिति प्रतिकूल असल्यामुळें त्यांना यश आलें नाहीं. शहाजी स्वतंत्र हिंदुराज्य स्थापन करील, या भीतीनें मोंगल व विजापूरकर एक झाले व त्यांनीं माहुलीस शहाजीराजांचा पराभव केला. विजापूरच्या बादशाहानें निजामशाहीची पुन्हा स्थापना करण्याबद्दल शहाजींस मदत करण्याचें वचन दिलें होतें. परंतु

शहाजीराजे कदाचित् स्वतंत्र हिंदुराज्य स्थापन करतील या भीतीनें आयत्या वेळीं तो मोंगलांस मिळाला. नंतरच्या तहांत शहाजीराजे यांना पुणें, सुपें वगैरे पूर्वीच्या जहागिरी कायम ठेवल्या व त्यांनीं विजापूरच्या अदिलशाहींत नोकरी करावी असें ठरलें. शहाजीराजे यांचा बहुतेक काळ लढायांतच जात होता; म्हणून बालशिवाजीच्या शिक्षणाची जबाबदारी राजमाता जिजाबाई व शहाजीच्या पुण्याच्या जहागिरीचे व्यवस्थापक दादोजी कोंडदेव यांच्यावर पडली. जिजाबाईनीं बालशिवाजीस रामायणमहाभारतांतील गोष्टी सांगून त्याच्या मनांत धर्म, नीति, स्वातंत्र्यप्रीति व स्वराज्यस्थापना या गुणांचें बीज पेरलें. दादोजीनें बाल-शिवाजीला घोड्यावर बसणें, दांडपट्टा खेळणें वगैरे मर्दानी खेळ शिकविले; शिवाय राज्यव्यवस्थेची माहितीही करून दिली. मावळे लोकांना बरोबर घेऊन शिवाजीनें आसपासच्या सर्व किल्ल्यांची माहिती करून घेतली. कांहीं मावळे सवंगड्यांकडून हिरडोशी येथील महादेवाच्या पुरातन देवालयांत हिंदवी स्वराज्यस्थापन करण्याच्या शपथा घेतल्या व चाकण वगैरे कांहीं किल्लेही हस्तगत केले. सन १६४४ सालीं समर्थ तीर्थयात्रा संपल्यावर कृष्णातीरीं राहण्यास आले. त्यापूर्वीच शिवाजीमहाराजांनीं स्वराज्यस्थापनेस अल्पारंभ केला होता. त्यांनीं १६४६ सालीं तोरणा किल्ला घेतला. नंतर कोंडाणा व पुरंदर हे किल्ले ही घेतले. शिवाजीमहाराज फार धार्मिक व श्रद्धाळु होते. त्यांनीं स्वराज्याच्या कठिण कामास सुरुवात केली होती; पण मोरे, घोरपडे वगैरे कांहीं क्षत्रिय मराठे सरदारच त्यांच्या उलट होते. मुसलमानी बादशहांच्या राज्यांत नोकरी करण्यास त्यांस कांहीं अपमान वाटत नसे. अशा वेळीं शिवाजीमहाराजांना सर्व मराठ्यांना स्वराज्याच्या कामास साहाय्य करण्यास उत्तेजन देणारा कोणीतरी महापुरुष पाहिजेच होता. शिवाजीमहाराजांची व समर्थांची पहिली भेट सन १६४५त मसूर येथें राम-नवमीच्या उत्सवांत झाली. पुढें ३।४ वर्षांत समर्थांनीं मठ स्थापून रामनवमी व हनुमंतजयंती हे उत्सव सुरू केले व त्यायोगानें संघटना आणि लोकसंग्रहाचें काम सुरू केलें. हें महाराजांना समजल्यावर अशा लोकसंग्रह करणाऱ्या साधूचा आशी-र्वाद व सल्ला आपणाला मिळाल्यास स्वराज्यस्थापनेस फार साहाय्य होईल असें वाटून महाराज शिंगणवाडीस समर्थांना भेटण्यास गेले व शके १५७१ (स. १६४९) सालीं त्यांना तेथें समर्थांनीं अनुग्रह दिला व 'लघुबोध' सांगितला. तो दासबोधांतील तेराव्या दशकांतील सहावा समास होय. त्या वेळीं या दोन महा-पुरुषांचें काय बोलणें झालें हें समजण्यास मार्ग नाहीं. परंतु अनुग्रह दिल्यानंतर समर्थांनीं महाराजांना जो राजधर्म व क्षात्रधर्म सांगितला त्यांवरून समर्थांनीं महा-राजांना काय सांगितलें असेल याची चांगली कल्पना करतां येते. समर्थांची गांठ पडण्यापूर्वीच शिवाजीमहाराजांना स्वराज्यस्थापनेची स्फूर्ति झाली होती व

त्यांनीं अल्पारंभ ही केला होता. महाराजांची गांठ पडण्यापूर्वी समर्थांना ही धर्मस्थापनेची स्फूर्ति झाली होती व त्यांनीं मठ स्थापन करून संघटना व लोक-संग्रहास आरंभ ही केला होता. स्वधर्मस्थापनेस स्वराज्यस्थापनाची आवश्यकता आहे असें त्यांना वाटून स्वराज्यस्थापनेचें काम जेथें सुरू झालें आहे अशा ठिकाणीं येऊन त्यांनीं मठस्थापना करून लोकसंग्रहास आरंभ केला होता. समर्थांची व महाराजांची गांठ पडल्यावर परस्परांचे अंतिम हेतु एकच आहेत असें पाहून दोघांना फार आनंद झाला. दोघांच्या भेटीनंतर क्षात्रतेज व ब्रह्मतेज यांचा संगम झाल्यानें स्वराज्यस्थापनेच्या कामास अग्नि व वायु यांच्या भेटीप्रमाणें जोर आला. समर्थांनीं आपल्या संप्रदायांत राजकारणाचा अंतर्भाव केला व 'मराठा तितका मेळवावा। महाराष्ट्र धर्म वाढवावा॥' असा कंठरवानें बहुजन समाजास उपदेश केला व लोकांचीं मनें स्वराज्यस्थापनेकडे वळविलीं. सन १६५५ सालीं महाराजांनीं आपलें राज्य समर्थांच्या झोळींत भिक्षेस घातलें. तें परत देऊन 'प्रजेचें पालन करणें हाच क्षत्रियाचा धर्म आहे' असें समर्थांनीं त्यांना सांगितलें व 'जोहार'च्या ऐवजीं 'राम राम' म्हणण्यास व मराठी राज्याचा भगवा झेंडा ठेवण्यास सांगितलें. कपटानें मारण्यास आलेल्या अफझुलखानास सन १६५९त मोठ्या युक्तीनें मारलें. नंतर महाराज समर्थांना भेटण्यास गेले, तेव्हां त्यांना दासबोधांतील १८व्या दशकांतील ६व्या समासांतील 'उत्तम पुरुष लक्षण' हा समास सांगून उपदेश केला. नंतर महाराज पन्हाळ्यास गेले. त्या किल्ल्यास शिद्दी जोहारनें वेढा दिला. महाराज युक्तीनें निसटून विशाळगडास गेले. ते गडास पोहोंचेपर्यंत बाजी देशपांडे यांनीं अगदीं थोड्या सैन्यासह मोठ्या शौर्यानें शत्रूच्या प्रचंड सैन्यास घोडखिंडींत थोपून धरलें. लढतांना त्यांना अनेक जखमा झाल्या. महाराज विशाळगडावर पोंच-ल्याचा तोफेचा आवाज कानीं पडतांच या शूर योद्ध्यानें आनंदानें प्राण सोडला. १६६४ सालीं पुणें येथें षाइस्तेखानाच्या वाड्यांत मोठ्या धाडसानें शिरून त्याचीं बोटें कापलीं. खान भिऊन परत दिल्लीस गेला. १६६५ सालीं औरंगजेबानें जयसिंग व दिलेरखान यांच्या हाताखालीं प्रचंड सैन्य देऊन शिवाजीमहाराजांवर पाठविलें. जयसिंग कसलेला योद्धा होता. त्यानें शिवाजीमहाराजांच्या सर्व शत्रूंना त्यांच्या विरुद्ध उठविलें. 'हिंदूंच्या रक्तानें तूं यशस्वी होऊं पहातोस' अशा अर्थाचें पत्र महाराजांनीं जयसिंगास पाठविलें; परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं व युद्धास सुरुवात झाली. पुरंदर किल्ल्याला मोगल सैन्यानें वेढा दिला. मुरार बाजीनें शौर्यानें लढण्याची कमाल केली; परंतु शत्रूचें सैन्य प्रचंड असल्यामुळें किल्ला शत्रूनें घेतला. मुरारजी लढतां लढतां धारातीर्थी पडला आणि महाराजांना नमतें घेऊन तह करावा लागला (१९. ६. १६६५). महाराज संभाजीसह औरंगजेबास भेटण्यास आग्रा येथें गेले. जातांना ताब्यांत राहिलेल्या किल्ल्यांची व राज्याची व्यवस्था

जिजाबाई मातोश्रींच्या सल्ल्यानें करण्यास मोरोपंत पेशवेप्रभृति प्रधानांना सांगितलें होतें ( ९. ५. १६६६). दरबारांत अपमान झाल्यामुळें महाराज रागावले. औरंगजेबानें त्यांना नजरकैदेंत ठेवलें. मोठ्या युक्तीनें मिठाईच्या पेटाऱ्यांत बसून संभाजीसह कैदेंतून निसटले ( १७. ८. १६६६ ). गेल्या मार्गानें परत न येतां प्रयाग, काशी येथें प्रथम गोसाव्याच्या वेषानें गेले व कांहीं ठिकाणीं समर्थांचे मठ होते, त्या मार्गानें फिरत फिरत ते राजगडास एकटेच आले ( २०·११. १६६६ ). संभाजीस मोरोपंत पेशवे यांच्या मेहुण्याच्या घरीं ठेवलें होतें, त्यास मागाहून आणलें. आग्र्याहून परत आल्यावर मोंगल व विजापूरकर यांच्याशीं युद्ध करून गेलेले किल्ले परत घेतले. 'चार महिन्यांत २७ गड घेतले; तेव्हां औरंगजेब चिंतातुर झाला.' (सभासद बखर). सुरत शहर दोनदां लुटून अपार संपत्ति आणली. तिचा उपयोग अधिक सैन्य ठेवण्याच्या कामीं केला गेला. शूर. तानाजीनें प्राणाची आहुति देऊन सिंहगड घेतला ( ४-२-१६७० ). १६७३ सालीं महाराज कर्नाटकच्या मोहिमेवर गेले. तिकडून आल्यावर समर्थांच्या संमतीनें गागाभट्टाकरवीं रायगडावर सन १६७४ सालीं ( शके १५९६ ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमेस ) मोठ्या थाटानें महाराजांना राज्याभिषेक करण्यांत आला. नंतर महाराज सज्जनगडास येऊन समर्थांचें दर्शन घेऊन रायगडास परत गेले. राज्यारोहणानंतर १२ दिवसांनीं राजमाता जिजाबाई कैलासवासी झाल्या. सुदैवानें त्यांना महाराजांचा राज्याभिषेक डोळेभर पाहण्यास मिळाला. महाराजांच्या मनांत पराक्रम करण्याची स्फूर्ति त्यांनीं उत्पन्न केली होती. लढाईच्या धामधुमीच्या काळांत शिवनेरी किल्ल्यावर बालपणीं महाराजांचें त्यांनीं संगोपन केलें होतें, तेव्हां अनेक संकटांतून यशस्वी रीतीनें पार पडून महाराजांना राज्याभिषेक झालेला पाहून त्या माउलीला किती आनंद झाला असेल याची कल्पना वाचकांनींच करावी. नंतर महाराजांनीं कर्नाटकांत पुन्हा स्वारी केली व जिंजीचा किल्ला घेतला ( २१.८.१६७८ ). हा किल्ला महाराजांनंतरच्या घनघोर स्वातंत्र्ययुद्धांत मराठ्यांना फार उपयोगी पडला. पृथ्वीवर इतका मजबूत किल्ला दुसरा नाहीं. 'सभोंवार जिवंत पाण्याचा खोल खंदक व आंत हजारों सुसरी' असें याचें वर्णन करितात. नंतर तंजावरास व्यंकोजीची भेट घेतली, वांटणीबद्दल बराच वादविवाद झाला. शिवाजीमहाराजांनीं स्वतंत्र राज्य स्थापून विजापूरच्या सुलतानाकडून आपलें स्वातंत्र्य कबूल करविलें. परंतु व्यंकोजीराजांना विजापूरकरांचे ताबेदार म्हणवून घेण्यांत धन्यता वाटत होती. एकाच पित्याच्या दोन पुत्रांच्या स्वभावांत किती अंतर हें! गोवळकोंड्यावर मोंगल चाल करून येत आहेत, हें वर्तमान कळतांच महाराज कर्नाटकाहून परत निघाले. मागें व्यंकोजीराजे यांनीं आपली बायको दिपाबाई हिच्या सल्ल्यानें महाराजांचे कारभारी रघुनाथराव पर्वते यांच्या म्हणण्याप्रमाणें तह केला. १६८० मार्च

महिन्यांत राजाराममहाराजांची मुंज केली व पुढें आठ दिवसांनीं प्रतापराव गुजराच्या मुलीशीं लग्न करून तिचें नांव ताराबाई असें ठेविलें. हल्लींच्या कोल्हापूर संस्थानच्या संस्थापक त्या याच ताराबाई राणीसाहेब. लग्न झाल्यानंतर महाराज सज्जनगडावर जाऊन समर्थांचें शेवटचें दर्शन घेऊन आले. नंतर लवकरच आजारी पडले. पुष्कळ उपाय केले पण गुण आला नाहीं. अखेर ता. ३ एप्रिल १६८० दिवशीं ( शके १६०२ चैत्र शुद्ध १५ ) महाराजांनीं रायगड किल्ल्यावर इहलोक सोडला. ही बातमी समजल्यावर समर्थांना फार दुःख झालें. त्यांनीं बाहेर जाणें सोडलें. ते फक्त दुधावर होते.

शिवाजीमहाराजांची योग्यता हिंदुस्थानच्या इतिहासांतच नव्हे तर जगाच्या इतिहासांत फार मोठी आहे. शौर्य, पराक्रम, साहस व युक्ति इत्यादि गुणांत ते शिकंदर, सीझर, हॅनिबॉल, नेपोलियनप्रभृति जगविख्यात योद्धयांच्या बरोबरीचे होतेच; परंतु नीतिमत्तेमध्यें शिवाजीमहाराजांबरोबर वरील योद्धयांची मुळींच तुलना करतां येणार नाहीं. शिकंदर, सीझर व नेपोलियन यांचीं चरित्रें वाचलीं असतां 'परस्त्री मातेसमान' हा तुलसीदासमहाराजांचा उपदेश त्यांनीं पाळला नव्हता अशी साक्ष इतिहास देतो. शौर्य, साहस, नीति, परोपकार व परमेश्वरावर विश्वास या सर्व गुणांचा समुच्चय शिवाजीमहाराजांइतका जगप्रसिद्ध कोणत्या ही योद्धया-मध्यें दिसून येत नाहीं. ते धर्मसहिष्णु होते. त्यांनीं मुसलमानांची एक ही मशीद पाडल्याचा उल्लेख मुसलमानी इतिहासांतसुद्धां सांपडत नाहीं. लढाईत सांपडलेल्या मुसलमान किल्लेदारांच्या स्त्रियांना त्यांनीं बहिणीप्रमाणें वागवून पतिगृहीं परत पाठविलें आहे. शिवाजीमहाराजांसारखे पुण्यश्लोक शिवाजीमहाराजच होते.

( २ ) **निळो सोनदेव मुजुमदारः**—श्रीमंत पंत अमात्य, संस्थान बावडा यांचें वंशवृत्त श्री. रामचंद्र महादेव गोरे, राशिवडें, संस्थान बावडा, यांनीं प्रसिद्ध केलें आहे. त्यांतून निळो सोनदेव व रामचंद्र नीलकंठ यांविषयीं पुढील माहिती घेतली आहे.

सन १६३७ सालीं दादोजी कोंडदेवाबरोबर निळोपंत पुण्यास आले. शिवाजीमहाराजांनीं त्यांना १६४३त सर कारकून नेमलें. पुढें थोड्याच दिवसांत त्यांना सचिव नेमलें. तोरणा किल्ला घेण्याचे कामांत निळोपंताचें शौर्य व मुत्सद्दीपणा हीं पाहून त्यांना १६४७त मुजुमदार नेमलें. स्वराज्यस्थापनेच्या सर्व प्रकारच्या कामीं महाराज यांना महत्त्वाचीं कामें सांगत असत. यांचा धाकटा भाऊ आबाजी सोनदेव याला ही लष्करी हुद्याचें काम महाराजांनीं दिलें होतें. सन १६४८त आबाजी सोनदेवानें कल्याणच्या सुभेदाराबरोबर लढून तो किल्ला घेतला. सन १६४९त शिवाजीमहाराजांना समर्थांनीं अनुग्रह दिला, त्या वेळीं निळो सोनदेव व बाळाजी आबाजी चिटणीस हे बरोबर होते. या दोघांना समर्थांनीं

अनुग्रह देऊन उभयतांना सेवाधर्म सांगितला (वंशवर्णन, पृष्ठ १५). सन १६६१त चाफळ मुक्कामीं उद्धव गोसावी यांचे कीर्तनास स्वामी बसले असतां महाराजांनीं हातांत मोर्चेल व निळोपंतांनीं भालदार काठी घेतली होती ( वंशवर्णन, पृष्ठें १५। १६ ). विजापूरकरांशीं लढाया झाल्या, त्यांत निळोपंतांना लष्करी काम करावें लागलें. नंतर कांहीं दिवस जमाबंदी व हिशेबाचीं ही कामें करावीं लागलीं. त्या काळीं सर्व प्रधानांना आपापल्या हुद्याचीं कामें सांभाळून लष्करी कामें करावीं लागत होतीं. १६६४त सुरत शहर लुटलें तेव्हां निळोपंत शिवाजीमहाराजांबरोबर होते. नंतर लवकरच शहाजी राजे वारले. तेव्हां जिजाबाईनें सती जाण्याचा निश्चय केला. पुष्कळांनीं त्यांना परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्या आग्रह सोडीनात. शेवटीं निळोपंतांनीं उपदेशाच्या गोष्टी सांगून त्यांना सती जाण्यापासून परावृत्त केलें ( वंशवृत्त, पृष्ठ १९ ). १६६६त जयसिंग व दिल्लीरखान महाराजांच्या पारिपत्यास आले; तेव्हां निळोपंत त्यांच्या मंत्रीमंडळांत होते. १६७० व १६७२त मुसलमानांशीं लढाया झाल्या त्यांत निळोपंत महाराजांबरोबर होते. याप्रमाणें मराठी राज्याची सेवा करीत असतां निळोपंत सन १६७२ सालीं वारले. त्यांनीं ३२ वर्षें कारकून, सरकारकून, वतनी कारभारी, सचिव व अमात्य अशीं कामें केलीं. त्यांना नारोपंत व रामचंद्रपंत असे दोन मुलगे होते. पैकीं रामचंद्रपंत संभाजीच्या मरणानंतर स्वातंत्र्ययुद्धांत फार प्रसिद्धीस आले.

( ३ ) **बाळाजी आवजी चिटणीसः**—प्रसिद्ध चिटणीस घराण्याचे हे मूळ पुरुष. यांना ही निळोपंतांबरोबर शिंगणवाडी येथें समर्थांनीं शके १५७१ सालीं अनुग्रह दिला. यांच्यावर शिवाजी महाराजांचा फार विश्वास होता. राज्यारोहणाचे कामीं यांनीं फार मदत केली.

( ४ ) **रामचंद्र नीळकंठ पंत अमात्यः**—यांच्याविषयीं गिरिधरस्वामी म्हणतात, "रामचंद्र नीळकंठ शिवराज अमात्य। अतिशय उत्सव करी नित्य-नैमित्य ।। ज्याचीं वृंदावनें नित्य। पराशर पर्वतीं पूजिताती ।।" ( स. प्र. ११. ५ ).

रामचंद्र नीलकंठ हे निळोपंताचे दुसरे पुत्र. पहिले पुत्र नारोपंत हे निळोपंत १६७२ सालीं वारल्यावर पंत अमात्य झाले. ते फार परमार्थी होते, म्हणून शिवाजी-महाराजांनीं १६७४ सालीं रामचंद्रपंतांस अमात्य केलें. रामचंद्रपंतांचा जन्म १६५० सालीं झाला. सन १६४९ या वर्षीं महाराजांबरोबर रामचंद्रपंतांचे वडील निळोपंत यांना ही अनुग्रह झाल्याचें मागें सांगितलेंच आहे. निळोपंत घरीं गेल्यावर त्यांची स्त्री निराबाई हिनें अनुग्रहाचा हट्ट धरिला. समर्थांनीं निराबाईना अनुग्रह दिला व वर मागण्यास सांगितलें. "प्रसन्न होवोनी म्हणती मागें वरा। ते म्हणे दातारा पुत्र देईं" ।। ( भक्तलीलामृत, अभंग ३८ ). निराबाईच्या ओट्यांत नारळ घालून समर्थ गेले. एका वर्षांत मुलगा झाला. त्यास समर्थदर्शनास नेलें.

त्यांनीं ' रामचंद्र ' असें नांव ठेविलें. रामचंद्राची मुंज ही समर्थांपाशींच झाली व नंतर समर्थांनीं त्याला अनुग्रह दिला (भक्तलीलामृत, अभंग १८-१-६ ). लहानपणीं निळोपंतांबरोबर तो राजवाड्यांत जाई, तेव्हां ' हा मुलगा बुद्धिवान् व पराक्रमी होईल ' असें भविष्य केलें होतें. १६७८ सालीं महाराज समर्थांच्या दर्शनास गेले तेव्हां रामचंद्रपंत बरोबर होते. त्यांची समर्थांच्या ठिकाणीं निष्ठा असे व समर्थांची ही त्यांच्यावर पूर्ण कृपा असे. १६८० सालीं महाराज कैलासवासी झाले, तेव्हां ' आपल्या मागें रामचंद्रपंत व प्रल्हादपंत हे राज्याची चांगली व्यवस्था करतील. ' असे त्यांनीं उद्गार काढले होते. संभाजी रायगडीं आल्यावर प्रथम त्यांनीं रामचंद्रपंतांच्या घरावर चौकी बसविली होती; पण राज्याभिषेकाच्या वेळीं ती उठविली. १६८१ सालीं समर्थांनीं समाधि घेतल्यावर त्यांच्या उत्तरक्रियेला पुष्कळ द्रव्य देऊन संभाजीराजे यांनीं रामचंद्रपंतांस सज्जनगडास पाठविलें. त्यांनीं उद्धव गोसाव्यांकडून उत्तरक्रिया करविली व दहनस्थानीं समाधि व तीवर लहानसें देवालय बांधलें व नंतर मठाची पुढची व्यवस्था केली. नंतर स्वत: संभाजीराजे समाधीच्या दर्शनास रामचंद्रपंतांना घेऊन गेले, तेव्हां त्यांनीं देवालय मोठें करण्याविषयीं रामचंद्रपंतांना आज्ञा दिली व त्याप्रमाणें त्यांनीं केलें. संभाजीचा रामचंद्रपंतांवर प्रथम रोष होता, पण तो पुढें कमी झाला. तरी सर्व राज्यकारभार कलुषा ब्राह्मण मुख्य प्रधान होता त्याच्या तंत्रानें चाले. १६८९ सालीं औरंगजेबानें संभाजीला धरून हाल करून ठार मारलें. त्यानंतर रामचंद्रपंतांनीं, संभाजीचा मुलगा शाहु हा लहान होता म्हणून तो मोठा होईपर्यंत राजाराममहाराजांनीं राज्य करावें असें ठरविलें व शाहूस रायगडास बंदोबस्तानें ठेवून राजाराममहाराजांना कुटुंब व प्रधान मंडळासह सज्जनगडास पाठविलें. तेथें श्रीरामाचें व समाधीचें दर्शन घेऊन ही सर्व मंडळी पन्हाळ्यास जाऊन राहिली. रायगडास वेढा पडून किल्ला शत्रूच्या स्वाधीन झाला व शाहूस कैद करून नेलें. तेव्हां रामचंद्रपंतांनीं राजाराममहाराजांना चंदीस पाठविलें, व लायक मंडळी विशाळगडास ठेविली. चंदीस जातांना राजाराममहाराजांनीं राज्याचे सर्व अधिकार रामचंद्रपंतांस दिले व धनाजी जाधव, संताजी घोरपडे यांना फौज देऊन मोंगलांवर पाठविलें व आपण फौज घेऊन पन्हाळा व विशाळगड वगैरे प्रांतांचें रक्षण करीत राहिले. १६९१त ताराबाईस विशाळगडास मुलगा झाला, त्याचें नांव शिवाजी ठेवलें; व पुढें कांहीं दिवसांनीं खंडो बल्लाळ चिटणीस यांजबरोबर ताराबाईस मुलांसह चंदीस पाठविलें. इकडे रामचंद्रपंतांनीं शंकराजी नारायण व परशुराम त्र्यंबक यांचें शौर्य व हुषारी पाहून त्यांना मोंगलांवर पाठविलें. रामचंद्रपंतांची कामगिरी पाहून चंदीहून राजाराममहाराजांनीं ' हुकमतपन्हा ' ' हुकूम करतील तो महाराजांनीं ही मोडूं नये ' असा किताब पाठविला. पुढें चंदीस मोंगल सैन्यानें वेढा घातला. तेव्हां रामचंद्रपंतांनीं

राजाराममहाराजांना मंडळीसह विशाळगडास आणलें (डिसें. १६९७). स. १७००त राजाराममहाराज विषम ज्वरानें सिंहगडीं कैलासवासी झाले. राजाराममहाराजांच्या दोन बायका, ताराबाई व राजसबाई, त्यांचे दोन मुलगे शिवाजी व संभाजी हे विशाळगडास होते. राजाराममहाराज वारल्यानंतर औरंगजेबानें शाहिस्तेखानाबरोबर मोठें सैन्य देऊन मराठ्यांवर पाठविलें. रामचंद्रपंतांनीं पुन्हा पूर्वीप्रमाणें सैन्य जमवून मोंगलांना जेरीस आणलें. औरंगजेब बादशहा निराश होऊन १७०७ सालीं अहमदनगर येथें मरण पावला. त्याचा मुलगा कामबक्ष यानें मराठ्यांमध्यें दुफळी पाडण्याकरितां शाहूमहाराजांस बंधमुक्त केलें. शाहूमहाराज परत आल्यावर ताराबाई व शाहू यांच्यामध्यें लढाई सुरू झाली. रामचंद्रपंतांच्या मतें शाहूचा पक्ष खरा होता. परंतु ताराबाई यांनीं शंकराजी नारायण सचीव, परशराम त्रिंबक प्रतिनिधि व रामचंद्रपंत यांच्याकडून आपला पक्ष न सोडण्याबद्दल शपथा घेतल्या. तेव्हां त्यांना शाहूमहाराजांस मिळतां आलें नाहीं. सेनापति वगैरे सरदार फुटून शाहूपक्षास मिळाले व शाहूमहाराजांस जय मिळून ते साताऱ्च्या गादीवर आले. ताराबाई आपल्या मुलाला घेऊन पन्हाळ्यास गेल्या. त्यांनीं निराळें राज्य स्थापिलें व कोल्हापूरच्या गादीच्या मूळ संस्थापक झाल्या. ताराबाईंचा मुलगा शिवाजी हा १७१२त वारला व मग राजसबाईचा मुलगा संभाजी यानें कोल्हापूरची गादी पटकावली. ताराबाईच्या कारस्थानामुळें रामचंद्रपंतांस पुढें कांहीं महत्त्वाचीं कामें करतां आलीं नाहींत. ते सन १७२० सालीं कैलासवासी झाले. त्यांचा 'राजनीति' हा ग्रंथ फार उत्तम आहे. रामचंद्रपंत धर्मनिष्ठ होते. त्यांना रामदासपंथाचा अभिमान होता. त्यांनीं पुष्कळ देवस्थानांस इनामें करून दिलीं. त्यांची मोठी कामगिरी म्हणजे संभाजीच्या वधानंतर औरंगजेबाच्या प्रचंड सैन्याबरोबर लढून त्यांनीं मराठ्यांचें राज्य राखलें ही होय. बाकी वर नमूद केलेल्या राजदरबारी शिष्यांनीं इतिहासप्रसिद्ध अशीं कांहीं महत्त्वाचीं कामें केल्याचा उल्लेख नाहीं. समर्थप्रतापांत अकराव्या अध्यायांत त्यांचा रामभक्त व समर्थभक्त म्हणून उल्लेख आहे. १२ वे नृसिंहराय हे नरसोमलनाथ अंबरखाने. चाफळ खोऱ्यांत शिवाजीमहाराजांचे अधिकारी होते. चाफळ येथील श्रीराममंदिर बांधण्यास यांनीं प्रारंभ केला.

---

# भाग ९ वा

# समर्थ-संप्रदाय

"मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण ॥ तिसरें सावधपण । ... विषयीं ॥ (दासबोध ११. ५. ४) चवथा अत्यंत साक्षेप ॥ (११. ५. ५) नी... न्याय भजन मर्यादा । समर्थसंप्रदायीं चालिली सर्वदा ॥ कर्म उपासना ज्ञान विज्ञा... प्रसिद्धा । दासबोधग्रंथ निर्धारें ॥ (स. प्र. २०.३२) जो बहुत जनास चालवी । ना... मंडळें हालवी ॥ ऐसी हे समर्थपदवी । विवेकें होते ॥ (दासबोध १८. १०. ४६)

समर्थसंप्रदायावर लिहिण्यापूर्वी 'समर्थ' ही पदवी कोणाला प्राप्त होते... कशानें होते हा जो साहजिक प्रश्न उद्भवतो, त्याचें उत्तर स्वतः समर्थांनींच दि... आहे:—"जो बहुत जनांस चालवी । नाना मंडळें हालवी ॥" तोच समर्थ पदवी... विवेकानें प्राप्त होतो. किती ही मोठा विद्वान् असला, साधू असला, योगी असला तरी जनसमूहांत राहून लोकसंग्रह न करतां अरण्यांत जाऊन स्वस्थ जपजाप्य करी... अगर ध्यानस्थ होऊन ब्रह्मचिंतन करीत बसला तर त्यास 'समर्थ' ही पद... मिळणार नाहीं. तो स्वतःस तारील, स्वतःचा उद्धार करील, परंतु लोकसंग्रह करू... 'नाना मंडळां'मध्यें चैतन्य उत्पन्न करून त्यांना कर्तव्यदक्ष करून हालविल्याशिवा... 'समर्थ' पदवी प्राप्त होत नाहीं. जनाचा उद्धार करणें हें समर्थांचें आद्य कर्तव्य होतें. ते स्वतः म्हणतात, "राघवाचीं पदें मानसीं धरीन । विश्व उद्धारीन हेळा... मात्रें ॥ ४ ॥ हेळामात्रें मी मुक्त करीन या जनां । तरीच पावन राघवाचा ॥ ५ ... राघवाचा वर पावलों सत्वर । जनाचा उद्धार करावया ॥ १३ ॥ (समर्थांची करुणा... पर कविता, पृष्ठें ६५।६६)" तेव्हां समर्थ कोणास म्हणावें हें समर्थवचनाच्या आधा... रानेंच ठरतें. आतां ही समर्थ पदवी मिळविण्यास साधन कोणतें ? त्याचें ही उत्त... समर्थांनीं त्याच ओंवींत दिलें आहे. 'विवेकानें' समर्थ पदवी प्राप्त होते अ... समर्थ म्हणतात. बडा विद्वान् झाला, विश्वविद्यालयांतील सर्व पदव्या पहिल्या वर्गा... मिळविल्या, तरी 'समर्थ' पदवी मिळत नाहीं. हल्लीं विश्वविद्यालयांत दर वर्षी पहिल्या वर्गांत यशस्वी होऊन पदव्या मिळविणारे शेंकडों तरुण आहेत; परंतु बहुत जनां... चालवून नाना मंडळें हालविणारे किती पदवीधर आहेत ? कै. महर्षि दादाभा... नौरोजी, कै. लोकमान्य टिळक, कै. लाला लजपतराय व महात्मा गांधी यांच्या... सारखे लाखों लोकांमध्यें कर्तव्यजागृति उत्पन्न करून त्यांना राष्ट्रोन्नतीचा योग्य मा... दाखविणारे लोकनायक पदवीधर किती आहेत ? युरोपांत जाऊन तेथील विश्व... विद्यालयांत ही पहिल्या वर्गांत यश मिळवून पदव्या मिळविणारे बुद्धिवान का...

# आधुनिक ' समर्थ '



कै० लो. टिळक



कै० लाला लजपतराय



कै० महर्षि दादाभाई



म. गांधी



पं. म. मो. मालवीय

( पान २४२ )

थोडे नाहींत, त्यांना 'समर्थ' पदवी कां प्राप्त होत नाहीं? त्यांच्यामध्यें विवेक नाहीं हें त्याचें कारण आहे. ते विद्वान् आहेत, प्रपंचाचा व उदरनिर्वाहाचा विवेक-विचार ते उत्तम जाणतात. परंतु राष्ट्राच्या हीनदीन दशेचा विचार करून स्वार्थत्यागपूर्वक राष्ट्रसेवा करण्याचा अहोरात्र विवेकयुक्त प्रयत्न ते करीत नाहींत हें त्यांना 'समर्थ' पदवी न मिळण्याचें कारण आहे. 'चणे खावे लोखंडाचे। तेव्हां ब्रह्मपदीं नाचे ॥' हें परमार्थांत जसें खरें आहे, तसें परमार्थयुक्त व्यवहारांत—राजकारणांत ही--खरें आहे.

समर्थसंप्रदायाचीं लक्षणें देण्यापूर्वी समर्थांना नवीन संप्रदाय काढण्याची कां आवश्यकता वाटली यांचें कारण पाहूं. याविषयीं आपाततः विवेचन मागील भागांत कोठें कोठें केलें आहेच. बाराव्या वर्षी समर्थ लग्नमंडपांतून पळून गेले, तेव्हां त्यांच्या मनांत तपश्चर्या करून श्रीराम प्रसन्न करून घ्यावा एवढीच कल्पना होती. बारा वर्षे तपश्चर्या केल्यावर ते तीर्थयात्रेस निघाले, तेव्हां ही त्यांच्या मनांत संप्रदाय स्थापन करण्याची कल्पना होती असें दिसत नाहीं. तीर्थप्रवासांत निरनिराळ्या प्रांतांतील लोकांची हीनदीन स्थिति जेव्हां त्यांच्या नजरेस आली, तेव्हां त्यांना धर्मस्थापनेची आवश्यकता वाटली व त्याकरितां तीर्थयात्रेंत असतांनाच उत्तर हिंदुस्थानांत कांहीं मठ स्थापून संघटना करण्यास व लोकसंग्रह करण्यास त्यांनीं आरंभ केला. थोड्याशा अनुभवानें त्यांना असें वाटलें कीं, धर्मस्थापनेस स्वराज्यस्थापनेची आवश्यकता आहे; म्हणून त्यांनीं तीर्थयात्रा संपल्यावर सर्व भरतखंडाचा नकाशा आपल्या मनश्चक्षूंपुढें ठेवला व ज्या प्रांतांत स्वराज्यस्थापनेचें काम व धर्मस्थापनेचें काम करण्यास अनुकूल वातावरण आहे असें त्यांना दिसून आलें, त्या प्रदेशांत कृष्णातीरीं सातारा जिल्ह्यांत ते प्रथम आले व तेथें मठ स्थापन करून रामजयंतीचे व हनुमंतजतंयीचे उत्सव सुरू करून लोकांना कर्तव्यदक्ष केलें व राजकारणाशिवाय प्रपंचच होत नाहीं ('प्रपंचीं जाणे राजकारण'—दासबोध) असा उपदेश करून बहुजन समाजाचीं मनें स्वराज्याकडे वळविण्याच्या कामास ते लागले. संप्रदाय स्थापन करण्याचा समर्थांचा हेतु हा होता. आतां समर्थसंप्रदायाचीं लक्षणें कोणतीं याचें विवेचन करूं. समर्थसंप्रदायाचीं वीस लक्षणें खुद्द समर्थांनीं दिलीं आहेत तीं येणेंप्रमाणें:—"प्रथम लिहिणें। दुसरें वाचणें। तिसरें सांगणें। अर्थांतर ॥१॥ आशंका-निवृत्ति। ऐसी चौथी स्थिती। पांचवी प्रचीति। अनुभवें ॥ २ ॥ साहावें तें गाणें। सातवें नाचणें। टाळी वाजाविणें। आठवें तें ॥ ३ ॥ नववा अर्थ-भेद। दहावा प्रबंध। अकरावा प्रबोध। प्रचीतीसी ॥ ४ ॥ बारावें वैराग्य, तेरावा विवेक। चौदावा तो लोक। राजी राखे ॥५॥ पंधरावें लक्षण। तें राजकारण। सोळावें तें जाण। अव्यग्रता ॥६॥ प्रसंग जाणावा। हा गुण सतरावा। काळ समजावा। सर्वां ठायीं ॥७॥ आठरावें लक्षण। वृत्ति उदासीन। लोलंगता जाण। तेथें नाहीं॥ ८ ॥ एकोणिसावें

चिन्ह। सर्वांसी समान। राखे समाधान। ज्याचें त्याचें ॥९॥ विसावें लक्षण। राम-उपासना। वेध लावी जना। भक्तीरंगें ॥१०॥" याप्रमाणें पहिल्या दहा ओंव्यांत संप्रदायाचीं वीस लक्षणें सांगितल्यावर विसावें सारसर्वस्व लक्षण जें रामउपासना त्याचें अधिक स्पष्टीकरण पुढें करतातः—"भक्तिरंगें देव। देवाल्यें शिखरें। कोठें मनोहरें। वृंदावनें ॥११॥ बावी पोखरणी। रम्य सरोवरें। मंडपे विवरें। धर्मशाळा ॥ १२ ॥ धर्मशाळा नाना। नाना दीपमाळा। तेथें रविकुळा। वाखाणावें ॥१३॥ तरूवर पुष्प—। वाटिका जीवनें। पावनें भुवनें। होम-शाळा ॥१४॥ उदंड ब्राह्मण। ब्रह्मसंतर्पण। पुराणश्रवण आध्यात्मिक ॥ १५ ॥ जन्मासी येऊनि। अध्यात्म साधावें ॥ नित्य विवरावें। सारासार ॥ १६ ॥ असार संसार। येणें साधे सार। पाविजे तो सार। भवसिंधु ॥१७॥ आयुष्य हें थोडें। फार आटाआटी ॥ कठीण शेवटीं। वृद्धपण ॥१८॥ एकलेंचि यावें। एकलेंचि जावें। मध्येंचि स्वभावें। माया-जाळ ॥१९॥ मायाजाळ तुटे। तरी देव भेटे। दास म्हणे खोटें। भक्तीहीन ॥२०॥ ( स्फुट ओंव्या, रामदासांची कविता, प्रथम खंड, १४ पान २१३ )"

समर्थसंप्रदायाचीं कांहीं प्रमुख लक्षणें दासबोधांत व स्फुट कवितेंत अनेक ठिकाणीं सांगितलीं आहेत. येथें सर्व वीस लक्षणें एके ठिकाणीं सांगितलीं आहेत. आतां या वीस लक्षणांचा थोडक्यांत विचार करूं. पहिलीं दोन लक्षणें, लिहिणें व वाचणें अशीं आहेत, यावरून असें सिद्ध होतें कीं, समर्थांना साक्षर लोक आपल्या संप्रदायांत पाहिजे होते. याचें कारण काय असावें याचा त्यांनीं कोठें खुलासा केला नाहीं व प्राचीन चरित्रग्रंथांत ही कोठें खुलासा नाहीं. आम्हांस असें वाटतें कीं, कांहीं निर्बंध न ठेवतां सर्व निरक्षर लोकांना संप्रदायांत घेतल्यास प्रारंभीं फार घोंटाळा होईल, कारण म्लेंच्छांचें राज्य होतें, फार दक्षतेनें काम केलें पाहिजे, असें त्यांना वाटलें असावें; शिवाय साक्षर लोकांचें निरक्षर लोकांवर सहजच थोडेंफार वजन असतें. साक्षर लोकांना संप्रदायाचीं तत्त्वें शिकविल्यावर त्यांचा कांहीं तरी परिणाम निरक्षर लोकांवर होतोच. दासबोधांत समर्थ म्हणतातः—" उदंड बाजारी मिळाले। परी ते धूर्तेंचि अळविले ॥ धूर्तांपासी कांहीं न चले। बाजाऱ्यांचें ॥ ( १५.१.२५ ) या कारणें मुख्य मुख्य। तयासी करावें सख्य ॥ येणें-करितां असंख्य। बाजारी मिळती ॥ ( १५.१.२६ )." संप्रदायास त्यांनीं शिक्षणाची—साक्षरतेची—जी अट घातली त्याचें कारण, साक्षर लोक संप्रदायी झाल्यावर राष्ट्रोन्नतीचीं कामें करण्यास ते सहज प्रवृत्त होतील, असें ही समर्थांना वाटलें असावें. महाराष्ट्रांत आल्यावर कृष्णातीर पसंत करून समर्थांनीं जशी प्रथम कांहीं काळ आपल्या कार्यास भौगोलिक मर्यादा घातली, तसें साक्षर लोक संप्रदायांत घेऊन त्यांनीं शैक्षणिक मर्यादा ही घातली. नुसतें कसेंबसें लिहिणारा मनुष्य संप्रदायांत त्यांना नको होता. दासबोधांत ' लेखन-क्रिया निरूपण ' नाम एक स्वतंत्र

समास आहे. त्यांत समर्थ म्हणतात:—" ऐसा ग्रंथ जपोन लिहावा । प्राणिमात्रास उपजे हेवा ॥ ऐसा पुरुष तो पहावा । म्हणती लोक ॥ ( १९.१.१२ )" समर्थकालीं छापखाने नव्हते, सांप्रदायिक ग्रंथ प्रत्येकापाशीं नित्यपठनास पाहिजे होता, तेव्हां लिहिण्याचा अंतर्भाव सांप्रदायिक लक्षणांत करण्याची समर्थांना आवश्यकता वाटली असावी. नुसत्या लिहितांवाचतां येण्यानेंच समर्थांचें समाधान झालें नाहीं. कारण अर्थांतर सांगण्याची व आशंकानिवृत्ति करण्याची पात्रता ही समर्थांना पाहिजे होती, म्हणून त्यांनीं तिसरें व चवथें हीं लक्षणें मुद्दाम घातलीं आहेत. कारण नुसतें लिहितांवाचतां येणारे बरेच लोक आढळतात. परंतु ग्रंथांतील रहस्य समजणारे व शंकानिवृत्ति करणारे फारच थोडे असतात. पांचवें लक्षण 'प्रचीती अनुभवें' हें महत्त्वाचें आहे. शाब्दिक ज्ञान होऊन बडबडणारे लोक फार असतात, परंतु 'आधीं केलें मग सांगितलें' असें स्वतःच्या अनुभवानें सांगणारे फार थोडे असतात. गाणें व नाचणें यांचा सहाव्या व सातव्या लक्षणांत समावेश केला आहे. गायनकला समर्थांना फार महत्त्वाची वाटत होती. त्या कलेविषयीं ते म्हणतात:—"धन्य ते गायनीकला । सर्व सद्या मनोरथा ॥ विदेश पाहतां नाहीं । धन्य ते गायनीकला ॥१॥ आवडे सकळै लोकां । प्रीतीनें भजती जनीं ॥ इच्छिलें पुरविती सर्व । धन्य ते गायनीकला ॥ २ ॥एकाकी महंती येते । उदंड कीर्ति वाढते ॥ विख्यात सकळै लोकीं । धन्य ते गायनीकला ॥ ३ ॥ राहती लोक ते राजी । आवडी उपजे मनीं ॥ वर्णिती कीर्ति देवाची । धन्य ते गायनीकला ॥ ४ ॥" समर्थांना आपल्या कार्याला समुदायाची आवश्यकता होती व लोकांचीं मनें आकर्षण करण्यास गायन हें एक साधन आहे, म्हणून त्यांनीं गायनकलेचा संप्रदायाच्या लक्षणांत अंतर्भाव केला. नृत्यकलेचा अंतर्भाव कां केला हें नीटसें समजत नाहीं. कीर्तन करतांना कांहीं हरिदास विशेष प्रसंगीं नाचतात व टाळ्या वाजवितात म्हणून नृत्य व टाळी वाजविणें यांचा संप्रदायलक्षणांत अंतर्भाव केला असावा असें दिसतें. नववें लक्षण 'अर्थभेद' हें आहे. दासबोधांत समर्थ म्हणतात:—" शब्दभेद अर्थभेद । मुद्राभेद प्रबंधभेद ॥ नाना शब्दांचे शब्दभेद । जाणोनि पहावे ॥ ( १९. २. २ ) नाना शंका प्रत्युत्तरें । नाना प्रचीत साक्षात्कारें ॥ जेणें करितां जगदंतरें । चमत्कारती ॥ ( १९. २. ३ )." कीर्तनांत लोकांचें मनरंजन करण्याकरितां अर्थभेदाची आवश्यकता असते म्हणून त्याचा संप्रदायलक्षणांत समावेश केला. दहावें लक्षण 'प्रबंध' आहे, यावरून आपल्या शिष्यांनीं ग्रंथरचना करावी असें समर्थांना वाटत होतें असें दिसतें व त्याप्रमाणें घडून ही आलें. समर्थांच्या संप्रदायामध्यें जितके ग्रंथकार झाले तितके इतर संप्रदायांत झालेले आढळून येत नाहींत. अकरावें लक्षण 'प्रबोध' आहे. समुदायाचीं मनें आकर्षण करण्यास प्रबोधाची आवश्यकता आहे, म्हणून त्याचा संप्रदायलक्षणांत अंतर्भाव केला आहे. बारावें लक्षण 'वैराग्य'

हें आहे. वैराग्य म्हणजे विरक्तपणा—विरक्ति. दासबोध दशक २, समास ९; हा सर्व समास विरक्तलक्षणाचा आहे. त्यावरून वैराग्याच्या महत्त्वाची कल्पना कळून येईल. 'विवेक' हें संप्रदायाचें तेरावें लक्षण आहे. विवेकाशिवाय कोणत्या ही कामास आरंभ करूं नये असें दासबोधांत अनेक ठिकाणीं सांगितलें आहे. परमार्थ असो अगर प्रपंच असो, मनुष्यानें विवेकपूर्वक प्रयत्न केला पाहिजे, अशाविषयीं समर्थांचा कटाक्ष आहे. " विवेकामध्यें सांपडेना । ऐसें कांहींच असेना ।। एकांतीं विवेक अनुमाना । आणून सोडी ।। ( दासबोध १९. ६. २८ ) संसारत्यांग न करितां । प्रपंच-उपाधि न सांडितां ।। जनामध्यें सार्थकता । विचारेंचि होय ।। ( ६. ९. २४ ) विचार पाहेल तो पुरुषु । विचार न पाहे तो पशु ।। ऐसीं वचनें सर्वेशु । ठायीं ठायीं बोलिला ।। ( ७. ९. २८ ) विवेकें जे पैसावले । ते चि अवतारी बोलिले ।। येणेंचि न्यायें झाले । मनु चक्रवती ।। "

यावरून विवेक-विचारावर समर्थांचा किती भर होता हें स्पष्ट दिसतें. 'लोक राजी राखणें' हें संप्रदायाचें चवदावें लक्षण आहे. संप्रदाय वाढण्यास समुदायाची आवश्यकता आहे. लोक राजी राखल्याशिवाय समुदाय वाढणें शक्य नाहीं; म्हणून या लक्षणावर समर्थांनीं इतर ठिकाणीं ही भर दिला आहे. 'राजकारण' हें समर्थ-संप्रदायाचें पंधरावें लक्षण आहे. समर्थ फक्त भक्तिमार्गीच संत होते, राजकारणाशीं त्यांचा कांहीं संबंध नव्हता, असें कित्येक आक्षेपक वेळींअवेळीं टाहो फोडून सांगण्याचा प्रयत्न करीत असतात; संप्रदायाच्या लक्षणांत राजकारणाचा स्पष्टपणें अंतर्भाव करून स्वतः समर्थांनींच अशा आक्षेपकांना उत्तर दिलें आहे. 'समर्थांचें राजकारण' या विषयावर पुढें एका स्वतंत्र भागांत आम्ही सविस्तर विवेचन करणार आहों, म्हणून या विषयावर येथें अधिक लिहीत नाहीं. सोळावें लक्षण 'अव्यग्रता' हें आहे. कोणतें ही लोकोद्धाराचें काम हातीं घेतलें म्हणजे तें काम एकाग्र मनानें करणें—त्या कामांतच बुद्धिसर्वस्व व चित्तसर्वस्व घालून तें काम करणें—तें काम अनन्यभावानें करणें याचें नांव अव्यग्रता. 'प्रसंग जाणावा' हें संप्रदायाचें सतरावें लक्षण आहे. समर्थ फार दूरदर्शी राजकारणी संत होते. लोकोद्धाराचें-देशोद्धाराचें एकादें काम करावयाचें असल्यास, परिस्थितीचा सर्व बाजूंनीं विचार करून अनुकूल वेळ पाहून काम केल्यास तें लवकर साध्य होईल, हें त्यांना पूर्णपणें माहित होतें. तयारी नसतांना प्रसंग वेळ न पहातां उतावीळपणानें एखादा शिष्य एकदम एखादें महत्त्वाचें राष्ट्रोद्धाराचें काम करण्यास प्रवृत्त होईल म्हणून त्यास वेळींच इशारत देण्याकरितां समर्थांनीं हें सतरावें लक्षण मुद्दाम घातलें आहे. 'उदासीन वृत्ति' हें अठरावें लक्षण आहे. समर्थांना स्वार्थी, लोभी लोक संप्रदायांत नको होते, सर्व काळ उदासीन राहून स्वार्थत्यागपूर्वक अहोरात्र काम करणारे लोक पाहिजे होते, म्हणून हें अठरावें लक्षण घातलें आहे. सर्वांशीं

सम बुद्धि ठेवून वागणें व त्यायोगानें सर्वांचें समाधान राखणें हें एकोणिसाव्या लक्ष-णाचें रहस्य आहे. समुदायाच्या अंतःकरणाचें आकर्षण करण्यास व समुदाय राजी राखण्यास या लक्षणाची आवश्यकता आहे. संप्रदायाचें शेवटचें विसावें लक्षण श्रीरामउपासना हें आहे. समर्थांचें उपास्यदैवत श्रीराम. त्यांना अनुग्रह श्रीरामांचाच, म्हणून श्रीरामउपासना संप्रदायाचें मुख्य लक्षण असणें साहजिकच आहे. या लक्ष-णाचा निर्देश प्रथमच करणें आवश्यक होतं. हें लक्षण शेवटीं कां घातलें तें समजत नाहीं. सर्व लक्षणें महत्त्वाच्या क्रमानुसार घातलीं आहेत असें नाहीं. कदाचित् एका आंग्ल ग्रंथकारानें म्हटल्याप्रमाणें:—I reserve my best for the last. भावार्थ, माझें उत्कृष्ट मी अखेरपर्यंत गूढ ठेवणार–शेवटीं सांगणार—या म्हणण्याप्रमाणें समर्थांनीं आपल्या संप्रदायाचें अत्यंत महत्त्वाचें लक्षण शेवटीं सांगितलें असावें. संप्रदायापुढें श्रीरामाची उपासना ठेवण्याचा समर्थांचा हेतु तेहतीस कोटी देवांना कारागृहवासांतून–परदास्यांतून सोडविणाऱ्या कोदंडधारी–एकबाणी–एकवचनी–एकपत्नी श्रीरामाचें उदाहरण त्यांच्या डोळ्यांपुढें सतत ठेवण्याचें होतें. याविषयीं सविस्तर विवेचन मागें ‘ उत्सव रहस्य ’ या भागांत आम्ही केलेंच आहे. वर दिलेलीं संप्रदायाचीं वीस लक्षणें समर्थांनीं ‘ स्फुट ओंव्या ’ या प्रक-रणांत दिलीं आहेत. परंतु त्या लक्षणांचें महत्त्व सांप्रदायिकांच्या मनावर पटण्याकरितां दासबोधांत व इतर स्फुट काव्यांत अनेक वेळां उल्लेख केला आहे. दासबोधाच्या अकराव्या दशकांत वीस लक्षणांपैकीं चार लक्षणांनाच विशेष प्राधान्य देऊन आपल्या संप्रदायाची अगर शिकवणुकीची सम-र्थांनीं थोडक्यांत एक ‘ चतुःसूत्री’ दिली आहे, ती अशीः–“ मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण ।। तिसरें सावधपण । सर्वविषयीं ॥ ( दासबोध ११. ५. ४ ). चवथा अत्यंत साक्षेप ।। ( ११. ५. ५ ) ” या चतुःसूत्रींत श्रीरामउपासनेबद्दल ‘ हरिकथा निरूपण ’ असें म्हटलें आहे व हरिकथा निरूपणास अग्रमान दिला आहे, एवढेंच नव्हे तर ‘मुख्य’ हें विशेषण देऊन हरिकथा निरूपण म्हणजे श्रीरामकथा व अद्वैत-निरूपण हें मुख्य व प्रधानलक्षण आहे असें स्पष्ट शब्दांत सांगितलें आहे. समर्थांना देशोद्धाराच्या कामांत पाखंडमतवादी लोक नको होते. देवावर विश्वास ठेवून नीति, न्याय, मर्यादा राखून, लोकोद्धारार्थ अहर्निश झटणारे लोक पाहिजे होते. म्हणून त्यांनीं मुद्दाम ‘ हरिकथा निरूपणा ’स मुख्य हें विशेषण लावून भगवंताच्या अधिष्ठानाचें महत्त्व सांप्रदायिकांच्या नजरेस आणलें आहे. लोकोद्धाराकरितां-देशोद्धाराकरतां आपण कितीही झटलों, तरी देवावर विश्वास असल्याशिवाय संकटसमयीं धैर्यानें, चिकाटीनें व उत्साहानें इष्टकार्यसिद्धि होईपर्यंत काम करवणार नाहीं, हें समर्थांना माहित होतें; म्हणून त्यांनीं दासबोधांत व अन्यत्र ही भगवंताच्या अधिष्ठानाची आवश्यकता सांप्रदायिकांच्या नजरेस आणून दिली

आहे:-"सामर्थ्य आहे चळवळींचें । जो जो करील तयाचें ॥ परंतु येथें भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥" ( दा. २०. ४. २६ )

समर्थसंप्रदायाचीं जीं वीस लक्षणें समर्थांनीं स्फुटप्रकरणांत दिलीं आहेत अगर दासबोधांत त्यांनीं जी आपल्या संप्रदायाची थोडक्यांत चतुःसूत्री दिली आहे, त्यांत समर्थशिष्यांनीं नित्य नूतन हिंडावें अगर भिक्षा मागून योगक्षेम करावा इत्यादि सांगितलें नाहीं. परंतु संप्रदायाचीं वीस लक्षणें स्वतंत्र देऊन ही समर्थांनीं दासबोधांत व इतर वाङ्मयांत शिष्यांचे 'वर्तायाचे अनेक नियम' दिले आहेत. त्यांत नित्यप्रवास, भिक्षा, मृदु भाषण, क्षमा, निस्पृहता, परोपकार, बोलण्यासारिखें करणें, स्वयें करूनि बोलणें इत्यादि अनेक गोष्टी शिष्यांच्या अंगीं असाव्यात, असें त्यांनीं अनेक ठिकाणीं सांगितलें आहे. दासबोधांतील १४ व्या दशकांतील पहिल्या समासांत निस्पृहाचीं लक्षणें सांगितलीं आहेत, त्यांत शिष्यांनीं कसें वागलें असतां युक्ति, बुद्धि, शहाणपण येऊन निरंतर समाधान राहतें हें सांगितलें आहे. दुसरा समास भिक्षानिरूपण हा आहे. त्यांत समर्थांनीं भिक्षा मागण्याविषयीं जे नियम शिष्यांना व महंतांना घालून दिले आहेत ते फार कडक आहेत. भिक्षा मागणें हें साध्य नव्हतें, तें साधन होतें. कर्तव्यमूढ झालेल्या महाराष्ट्र-जनतेस कर्तव्य समजून देण्याचें तें साधन होतें. एकाच ठिकाणीं राहून भिक्षा मागून सुखानें काळक्रमणा करण्यास अधिकार शिष्यांना नव्हता. " नित्य नूतन हिंडावें । उदंड देशाटन करावें ॥ तरीच भिक्षा मागतां बरवें । श्लाघ्यबाणें ॥ ( दासबोध, द. १४ स. २. ८ )." वार लावून जेवण्यास अगर नित्य पंक्तीस जाण्यास त्यांना प्रतिबंध होता. ( दा. द. १४, स. २. ६ ) भिक्षा मागतांना कोणास त्रास देऊं नये अशी शिष्यांस आज्ञा असे. ( दा. द. १४. १० ) फार भिक्षा घेण्यास प्रतिबंध होता. "कांहीं भिक्षा आहे म्हणावें । अल्पसंतोषी असावें ॥ बहुत आणितां घ्यावें । मुष्टि एक ॥ ( दा. द. १४, स. २. २० )." यावरून दररोज एका दिवसाच्या बेगमीच्या धान्याची भिक्षा मागण्यास शिष्यांस आज्ञा होती, धान्य सांठवून ठेवण्याची परवानगी नसे असें स्पष्ट दिसतें. समर्थसंप्रदायी कधीं ही मधुकरी मागत नसत व हल्लीं ही मागत नाहींत. कोरडी भिक्षा मागून भोजन करणें हें अमृत-सेवनासारखें आहे असा समर्थांचा दंडक होता. ( दा. द. १४, स. २. ३ ) वरील सर्व नियम पाळून जी भिक्षा मागावयाची ती कांहीं पोट भरण्याकरितां नव्हे. समर्थ म्हणतात:-" भिक्षेनें ओळखी होती । भिक्षेनें श्रम चुकती ॥ ( दा. द. १४, स. २. १३ )" भिक्षेनें ओळखी होऊन मंडळ्या-समुदाय करून बहुजन समाजास धर्मकारणाकडे ( हरिकथेकडे ) व राजकारणाकडे प्रवृत्त करणें हा समर्थांचा हेतु होता व त्याकरितां भिक्षा मागण्याची दीक्षा समर्थ आपल्या शिष्यांना देत असत.

नुकतेंच इंदूरबोधनमठाचे अधिपति झालेले श्रीसमर्थदास यांनीं सांप्रदायिकांच्या आग्रहावरून ‘श्रीसमर्थसंप्रदायिक नित्यनेमसोपान’ शके १८४८ सालीं प्रसिद्ध केलेला आहे. त्यांत त्यांनीं समर्थसांप्रदायिकांच्या भिक्षेविषयीं बरीच माहिती दिली आहे. प्रथम ‘जयजय रघुवीर समर्थ’ म्हटल्यानंतर पांच श्लोक म्हणण्याचा परिपाठ असे. ‘गणाधीश जो ईश सर्वां गुणांचा’ हा मनोबोधांतील पहिला श्लोक म्हटल्यानंतर तीन श्लोक म्हणून पांचवा श्लोक हा असे:—“तुझा भिक्षकू दातया रामचंद्रा। सदा स्वस्थ चिंतीतसे गा महींद्रा॥ राजाधीश देशा उरपूर्ण द्यावें। भवदैन्य हें देशधाडी करावें॥ १॥” समर्थकालीं भिक्षेस निघाल्यापासून स्वस्थानीं परत येईपर्यंत समर्थशिष्यांचें सारखें भजन चालू असे. समर्थ स्वतः भिक्षेच्या वेळीं ‘रामा रामा हो रामा’ असें भजन करीत असत. प्रत्येक घरापुढें मनोबोधाचा एक श्लोक मोठ्यानें खड्या आवाजांत म्हणण्याचा परिपाठ असे. शिष्य मंडळी ‘गुरुराज महाराज रामदास माउली’ असें भजन करीत. मनोबोधांतील २७वा श्लोकः—“भवाच्या भयें काय भीतोस लंडी।।” यापासून क्रमानें पुढचे श्लोक म्हणण्याचा परिपाठ असे. समर्थांच्या वेळची भिक्षेची शिस्त हल्लीं सांप्रदायिक पूर्वींप्रमाणें पाळीत नाहींत, याविषयीं श्रीसमर्थदासांचे उद्गार मननीय आहेत, म्हणून ते त्यांच्याच शब्दांत देतों:—“समर्थांची सांप्रदायिकांना त्या वेळीं मोठी कडक शिस्त होती. आतां मात्र ती शिस्त बहुतेक सर्वत्रांनीं झुगारून दिली आहे, असें अनुभवास येतें. भिक्षेस निघाल्यापासून परत येईपर्यंत वाटेंत कोठें ही बसावयाचें नाहीं. प्रापंचिक लोकांपेक्षां निस्पृहाचें सोंग घेतलेल्या लोकांत हल्लीं चहा, तंबाखू आणि विडी हीं व्यसनें जास्त घुसलीं असल्यामुळें हे सोंगाडे भिक्षेस जाऊन परत येईपर्यंत तास दीड तास सुद्धां निर्व्यसनी राहत नाहींत. जागोजाग तंबाखूचे बार भरावयाचे, धुराचे लोट सोडावयाचे, यथेच्छ चहा ढोसावयाचा असे हे त्यांचे चाळे विशेषतः मोठमोठ्या शहरांतून चाललेले दिसतात; या योगानें ते दुर्लौकिकास प्राप्त होतात व निंद्य ठरतात. एवढ्याकरितां विषयांतराचा दोष पत्करून ही ही सूचना दिली आहे. भजन व मनाचे श्लोक यांव्यतिरिक्त निघाल्यापासून परत येईपर्यंत वायफळ बोलावयाचें नसल्यामुळें कोणीं कांहीं विचारलें असतां त्याचें एकदोन वाक्यांत समर्पक उत्तर देऊन निवांत स्थळीं बोलावयास येण्यास कळवावें. भिक्षा हें निव्वळ पोट भरण्याचें साधन नसून दीक्षा आहे. दीक्षेस पंच वस्त्रें असतात तीं:—(१) मेखळा, (२) शिरोवस्त्र, (३) झोळी, (४) कमरेस बांधावयाचें रामनामांकित व (५) निशाण भगवें, भगवा झेंडा. दासविश्रामधाम आत्मारामममहाराज यांच्या सूचनेप्रमाणें श्रीसमर्थाध्ययनांत भिक्षा संपवावी. श्रीसमर्थांपुढें अथवा देवतार्चनापुढें ‘मनाचीं शतें ऐकतां दोष जाती’ हा मनोबोधाचा शेवटला श्लोक म्हणून झोळी खालीं ठेवून गंधपुष्पयुक्त झोळीच्या

पूजेनंतर ‘ सुरवर बरदायिनी ’ ही आरती म्हणावी. हस्तपादप्रक्षालन किंवा स्नान करून राहिलेला नित्यनेम, जप, मानसपूजा, श्रीदासबोधपारायण हा नित्यक्रम श्रद्धायुक्त अंतःकरणानें व प्रसन्न चित्तानें करावा. ” भगवें निशाण अगर भगवा झेंडा भिक्षेच्या वेळीं घेण्याचा हल्लींच्या समर्थसांप्रदायिकांचा परिपाठ दिसून येत नाहीं, निदान आमच्या पाहण्यांत तरी आलेला नाहीं. समर्थकालीं तो होता असें श्रीसमर्थदासांच्या लिहिण्यावरून दिसतें. कित्येक समर्थसांप्रदायिकांजवळ कुबडी मात्र भिक्षेच्या वेळीं दिसून येते. चाफळमठाधिपति दरबारच्या वेळीं चांदीची कुबडी घेऊन जात असतात, असें ऐकतों. हल्लींच्या चाफळमठाच्या अधिपतींचे कैलासवासी तीर्थरूपांचें एका कामीं आम्हांकडे वकीलपत्र होतें; तेव्हां त्यांना घेऊन कलेक्टर-साहेब यांजकडे जाण्याचा आम्हांस एकदां प्रसंग आला होता, त्या वेळीं त्यांनीं चांदीची कुबडी काठीऐवजीं आपल्या हातांत घेतली होती.

हल्लीं राजकीय, सामाजिक, शैक्षणिक व धार्मिक उन्नतीकरितां निरनिराळ्या प्रांतांत ज्या संस्था स्थापन झाल्या आहेत, त्यांकरितां त्या संस्थांच्या चालकांना वर्गणीकरितां श्रीमंत लोकांचीं आर्जवें करावीं लागतात व संस्थेच्या सभासदांकडून वर्गणी घ्यावी लागते. समर्थांनीं अगर त्यांनीं स्थापन केलेल्या मठांच्या महंतांनीं राजे लोक अगर श्रीमंत लोक यांच्याकडे द्रव्य-साहाय्याकरितां हेलपाटे घातले नाहींत. कै. ना. गोपाळ कृष्ण गोखले यांनीं राष्ट्रहिताकरितां ‘ भारत-सेवक संस्था ’ स्थापन केली. त्यांनीं श्रीमंत लोकांकडून लाखों रुपये मिळवून उत्तम इमारत बांधून तींत उत्कृष्ट पुस्तकांची कायमची योजना केली आहे व भारत-सेवकांच्या योगक्षेमाची सोय केली आहे. समर्थांचे असे भारतसेवा करणारे शेंकडों मठ होते व हजारों महंत व शिष्य होते. प्रत्येक मठांत उत्कृष्ट ग्रंथांचीं पुस्तकालयें होतीं. या कामासाठीं लागणारें द्रव्य समर्थांनीं कसें मिळविलें याचें ना. गोपाळरावांना कोडें पडलें होतें. त्यांनीं या बाबतींत श्री. शंकर श्रीकृष्ण देव प्रभृतींना प्रश्नही विचारले होते. समर्थांचे सर्व मठ व त्यांतील विद्यापीठें हीं सर्व भिक्षेवर चाललीं होतीं, असें समजल्यावर कै. गोपाळरावांना फार आश्चर्य वाटलें. हल्लींच्या पदवीधरांना हजारों रुपयांच्या देणग्या देणारे श्रीमंत राजे लोक पाहिजेत. घरोघर भिक्षा—धान्यभिक्षा मागण्यास त्यांना लाज वाटते. ‘ भिक्षा मागतां लाजों नये ’ ( दासबोध द. १४, स. २. १० ) असा समर्थांचा दंडक होता. २१३ वर्षांपूर्वीं महाराष्ट्रांतील राष्ट्रीय सभेच्या कांहीं कार्यकर्त्यांनीं लाज सोडून कोरडी भिक्षा मागण्यास सुरुवात होती व त्या कामीं त्यांना यश ही आलें होतें. कारण घरोघर थोडी धान्यभिक्षा कोणास जड पडत नाहीं. समर्थ म्हणतातः—“ सामान्य भिक्षा मान्य करिती । सकळ प्राणी ॥ ( दासबोध १४–२ १० )” हल्लीं राष्ट्रसेवेच्या पवित्र कार्याला पदवीधर रामदासी पुढें आले पाहिजेत

अशी इच्छा कै. लोकमान्यांनीं प्रगट केली होती. ( 'ब्राह्मण आणि त्यांची विद्या' यावरील लेखमाला ).

समर्थांचे महंत प्रवासांत भिक्षा मागत असत. त्याप्रमाणें लोकजागृतिकरितां कीर्तन ही करीत असत. भिक्षा मागण्याविषयीं जसा समर्थांचा दंडक कडक होता, तसा कीर्तनाविषयीं ही त्यांचा दंडक कडक होता. भिक्षेचा हेतु जसा पोट भरणें अगर द्रव्य सांठवणें हा नव्हता, तसा कीर्तनाचा ही हेतु पोट भरणें अगर द्रव्य संपादन करणें हा नव्हता. पैसे घेऊन कीर्तन करूं नये, याविषयीं समर्थांचा कटाक्ष असे. एकाच समासांत याविषयीं समर्थांनीं दोन वेळां स्पष्ट उपदेश केला आहे. " नेणपण सोडूं नये । महंतपण सांडूं नये ।। द्रव्यासाठीं हिंडों नये । कीर्तन करीत ।। ( द. १४, स. १.४५ ). " " लग्नमुहुर्तीं जाऊं नये । पोटासाठीं गाऊं नये ।। मोलें कीर्तन करूं नये । कोठें तरी ।। ( द. १४, स. १.५५ ). " समर्थांच्या भिक्षेचे व कीर्तनाचे निर्बंध पाहिले म्हणजे समर्थांचे महंत अगर शिष्य होणें हें कांहीं सोपें व सुखाचें काम नव्हतें हें दिसून येईल.

भिक्षेविषयीं व कीर्तन करण्याविषयीं निर्बंध संचारांत ही कडक रीतीनें पाळण्याची संप्रदायांतील शिष्यांना समर्थांची आज्ञा होती; परंतु दासबोधांत वर दिलेल्या दिनचर्येच्या अनेक नियमांतील कांहीं किरकोळ नियम प्रवास करतांना संचारांत कडक रीतीनें पाळले नाहींत तरी चालत होतें असें दिसतें. कारण समर्थ म्हणतात:—"असतां आपले आश्रमीं । अत्यादरें नित्यनेमीं ।। सादर प्रीति लागे रामीं । तो सत्वगुण ।। ( दा. द. २, स. ७ ). " यावरून आश्रमांत—मठांत—असतांना दिनचर्येचे सर्व नित्य नेम शिष्यांनीं कडक रीतीनें पाळले पाहिजेत असा समर्थांचा दंडक होता असें दिसतें.

कै. राजवाडे यांनीं ' रामदास आणि रामदासी, भाग १५ ' यांतील ३७ लेखांक यांत प्राचीन चार संप्रदायांची माहिती दिली आहे. आद्य श्रीशंकराचार्यांनीं बौद्ध मताचें खंडन करून अद्वैत मत स्थापन केल्यावर भरतखंडांत चार दिशांस चार मठ स्थापन केले; आणि त्या मठांत चार संप्रदायांची सुरुवात केली. त्या चार संप्रदायांचीं नांवें:—( १ ) प्रकाश, ( २ ) आनंद, ( ३ ) स्वरूप व ( ४ ) चैतन्य अशीं आहेत. यांपैकीं विशिष्ट संप्रदायाचे लोक आपल्या नांवापुढें आपल्या मठांतील संप्रदायाचें नांव घालीत; ब्रह्मानंद, केशव चैतन्य इत्यादि. साधुश्रेष्ठ तुकारामांना बाबाजी चैतन्यांनीं स्वप्नांत गुरुमंत्र दिला म्हणून तुकाराम आपणांस शांकरमताचे चैतन्यसंप्रदायी समजत. ज्ञानेश्वर प्रकाशसंप्रदायी होते. याचप्रमाणें एकनाथ, रंगनाथप्रभृति महाराष्ट्र संत कोणत्या तरी एका शांकर संप्रदायाचे अनुयायी असत. शंकरसंप्रदायांत प्रवेश होण्यास मानवी गुरुकडून अनुग्रह मिळण्याची आवश्यकता असते. आणि समर्थांनीं आपले गुरु श्रीराम

असें स्पष्ट म्हटलें आहे:—" साह्य आम्हासी हनुमंत । आराध्यदैवत श्रीरघुनाथ ॥ गुरु श्रीराम समर्थ । कार्य उणें दासासी ॥ १ ॥ दाता एक रघुनंदन । वरकड लंडा देईल कोण ॥ तो सोडून आम्ही जन । कोणांप्रती मागावें ॥ २ ॥ म्हणोनि आम्ही रामदास । रामचरणीं आमुचा विश्वास ॥ कोसळोनि पडो रे आकाश । आणिकाची वास न पाहूं ॥ ३ ॥ स्वरूप-संप्रदाय अयोध्यामठ । जानकी देवी श्रीरघुनाथ दैवत ॥ मारुति उपासक नेमस्त । वाढविला परमार्थ रामदासी ॥ ४ ॥" या स्फुटांत समर्थांनीं आपणाला अनुग्रह देणारे गुरु शांकर-संप्रदायाचे कोणी मानवी गुरु नव्हते, आपले गुरु श्रीराम समर्थ होते असें स्पष्ट म्हटलें आहे. परंतु स्वरूपसंप्रदायाचा उल्लेख केला आहे, तेव्हां प्रथमदर्शनीं शंका येण्याचा संभव आहे. परंतु त्या शंकेचें निवारण समर्थांनीं लागलीच केलें आहे. 'स्वरूपसंप्रदाया' पुढें 'अयोध्या मठ' म्हटलें आहे व पुढें 'जानकीदेवी रघुनाथ दैवत' असें म्हटलें आहे. आद्य शंकराचार्यांनीं जे चार मठ स्थापन केले त्यांचीं नांवें:—(१) शृंगेरीमठ, (२) द्वारकामठ, (३) बदरीकेदारमठ व (४) जगन्नाथपुरीमठ. अयोध्यामठाचा यांत उल्लेख नाहीं, व तो शंकराचार्यांनीं स्थापन केल्याबद्दल आचार्यचरित्रांत व इतर कोठें ही उल्लेख नाहीं. तेव्हां वरील समर्थ-स्फुटांतील 'स्वरूपसंप्रदाय अयोध्यामठ' हें म्हणणें आचार्यस्थापित मठास लागू पडत नाहीं हें स्पष्ट दिसतें. समर्थांच्या स्वरूपसंप्रदायी अयोध्यामठाचें दैवत श्रीरघुनाथ आहे. आचार्यस्थापित कोणत्या ही मठाचें दैवत श्रीरघुनाथ नाहीं. तेव्हां स्वरूपसंप्रदायी अयोध्यामठाचे संस्थापक स्वतः समर्थ रामदास हेच आहेत हें निःसंशय ठरतें. आचार्यांच्या चार संप्रदायांपैकीं स्वरूपसंप्रदायाचा उल्लेख समर्थांनीं केला आहे हें खरें; परंतु तो स्वरूपसंप्रदाय आचार्यांच्या चार संप्रदायांपैकीं नव्हे. लोकरूढीप्रमाणें आपल्या अयोध्यामठाला ही एक संप्रदाय असावा म्हणून आचार्यांच्या चार संप्रदायांपैकीं एकाचें नांव कांहीं विशिष्ट हेतूनें त्यांनीं आपल्या मठाला लावलें असावें असें आम्हांस वाटतें; किंवा कै. राजवाडे म्हणतात त्याप्रमाणें स्वरूप-संप्रदायाचा उल्लेख समर्थांनीं लाक्षणिक अर्थानें घेतला आहे असें दिसतें.

स्फुट काव्यांतील समर्थसंप्रदायाचीं वीस लक्षणें व दासबोधांत संक्षिप्त सांगितलेली संप्रदायाची 'चतुःसूत्री' हीं वर दिलीं आहेत. आणखी एका स्फुटांत समर्थांनीं 'रामदास्य श्लाघ्यवाणें' होण्यास म्हणजे रामदासी संप्रदाय यशस्वी होण्यास सांप्रदायिकांच्या अंगांत कोणकोणते गुण असले पाहिजेत हें सांगितलें आहे. तें स्फुट :—'कायावाचामनें । यथार्थ रामीं मिळणें ॥ तरीच श्लाघ्यवाणें । रामदास्य ॥ १ ॥ काम क्रोध सांडणें । मद मत्सर दंडणें ॥ तरीच श्लाघ्यवाणें । रामदास्य ॥ २ ॥ परस्त्री नपुंसक होणें । परद्रव्य न पोसणें ॥ तरीच श्लाघ्यवाणें । रामदास्य ॥ ३ ॥ जैसें मुखें बोलणें । तैसी क्रिया चालणें ॥ तरीच श्लाघ्यवाणें । रामदास्य ॥ ४ ॥ माया

निवर्तक ज्ञानें । ज्ञेयाचि पैं होणें ॥ तरीच श्लाघ्यवाणें । रामदास्य ॥ ५ ॥ रामदास म्हणे । निर्गुणसुख लाधणें ॥ तरीच श्लाघ्यवाणें । रामदास्य ॥६॥" या स्फुटावरून समर्थसंप्रदायाचा दंडक किती कठीण होता हें दिसून येतें. रामदाससंप्रदायांत वाटेल त्यास येण्यास समर्थांनीं मुळींच सवड ठेविली नव्हती. सर्व सांप्रदायिकांना कामक्रोधादि सहा शत्रु जिंकण्याची व बोलण्याप्रमाणें चालण्याची आवश्यकता, हे दोन कठीण निर्बंध समर्थांनीं घालून दिले होते व संप्रदायांतील प्रपंची म्हणजे गृहस्थाश्रमी लोकांना 'परस्त्री नपुसंक होणें' म्हणजे श्रीरामचंद्राप्रमाणें कडक एकपत्नीव्रत पाळण्याचा निर्बंध समर्थांनीं घालून दिला होता.

'रामदास म्हणणें मग तेव्हां' असा श्लोकाचा शेवटचा चरण असलेले दहा श्लोक सुप्रसिद्ध आहेत. ते समर्थांचे आहेत असें कित्येक म्हणतात. परंतु आम्हांस वाटतें कीं ते समर्थांचे नसावेत. 'रामदास म्हणणें मग तेव्हां' असें स्वतः समर्थ **आढ्यतेनें** आपणाविषयीं म्हणतील असें वाटत नाहीं. समर्थवाङ्मयांत तसें त्यांनीं कोठें म्हटलेलें नाहीं. उलट काठिण निरूपण लागल्यावर कोठें कोठें द्विरुक्ति करावी लागली तेव्हां ते स्वतः **गुरु** असून ही **शिष्यांची** क्षमा मागतात. "संदेहवृत्ति तें न भंगे । म्हणोनि बोलिलेंचि बोलावें लागे ॥ आम्हांसि हें घडलें प्रसंगें । श्रोतीं क्षमा करावें ॥" (दासबोध, द. ६. स. ३. २७) 'रामदास म्हणणें' या शब्दप्रयोगावरून ही सदर्हू दहा श्लोक कोणातरी सांप्रदायिक शिष्याचे असावेत असें वाटतें. 'रामदास म्हणे' असें असतें तर ते दहा श्लोक समर्थकृत म्हणावे लागले असते. असो. सदर्हू दहा श्लोकांत संप्रदायाचीं लक्षणें उत्तम रीतीनें वर्णिलीं आहेत म्हणून ते सर्व श्लोक देतों:—"भव्य रूप अति सुंदर दीक्षा । रामनामस्मरणें करि भिक्षा ॥ वृत्ति होइल उदासिन जेव्हां । रामदास म्हणणें मग तेव्हां ॥ १ ॥ नाठवे धन सुतालय जाया । मृगजळापरि भावित काया ॥ परवधू जननीसम जेव्हां । रामदास म्हणणें मग तेव्हां ॥ २ ॥ शुद्ध भक्ति हरिची करि पूजा ॥ विश्व पाहि आपणासम जेव्हां ॥ शांति पूर्ण बरवी धरि जेव्हां । रामदास म्हणणें मग तेव्हां ॥ ३ ॥ ॥ ३ ॥ करि कथा परि न वांछित कांहीं । चित्तवृत्ति अवघी हरिपायीं ॥ कल्पना समुळ तोडिल जेव्हां ॥ रामदास म्हणणें मग तेव्हां ॥ ४ ॥ नित्य नेम बरवा जगिं ज्याचा । प्रतिदिनीं हरिचे भजनाचा ॥ गुरुपदीं रचना असे जेव्हां । रामदास म्हणणें मग तेव्हां ॥ ५ ॥ सर्व लोक भजनाप्रति लावी । लालुची धनिं कदापि नसावी । बोलण्यासम क्रिया करि जेव्हां । रामदास म्हणणें मग तेव्हां ॥६॥ विमल ज्ञान वदे जगिं स्पष्ट । ब्रह्म निर्गुण कळे जगिं श्रेष्ठ ॥ सर्व मायिक अशी मति जेव्हां । रामदास म्हणणें मग तेव्हां ॥ ७ ॥ बोलणें प्रचितिचें जगिं मान्यें । निवडु जो सकळाप्रति जाणे ॥ वांछिती जन सज्जन जेव्हां । रामदास म्हणणें

मग तेव्हां ॥ ८ ॥ निश्चयें करि रामउपासना । रामनौमि रघूत्तमपूजना । तृप्त होति द्विज याचक जेव्हां । रामदास म्हणणें मग तेव्हां ॥ ९ ॥ यत्न साधुनि करि पुढें पाठ । अर्थ जाणुनि वदे जगिं स्पष्ट ॥ मागली उजळणी करि जेव्हां । रामदास म्हणणें मग तेव्हां ॥ १० ॥" सदरहू दहा श्लोकांत रामदाससंप्रदायी म्हणजे रामदासी ओळखण्याचीं एकंदर तीस लक्षणें दिलीं आहेत.

सुप्रसिद्ध समर्थशिष्य स्वानुभवदिनकरकर्ते दिनकरस्वामी यांनीं रामदास-संप्रदायाचीं पुढील लक्षणें दिलीं आहेतः—" जितके रामदासांचे शरणांगत । झाले आणि होणार परंपरागत ॥ तितुक्यांच्या साहाकारी श्रीहनुमंत । सुखदुःखीं तो स्मरावा ॥ १ ॥ त्यानंतर रामदासांची वर्तणूक । निस्पृहता आणि प्रपंचिक ॥ त्यांत प्राक्तनयोगें ज्यासी जे योजेल सम्यक । तेणें तेंचि साधावें ॥ २ ॥ परंतु हो प्रपंचीं अथवा निस्पृह । तेणें वैराग्ययुक्त असावें निःसंदेह ॥ वर्णाश्रम धर्मकर्म समूह । प्राणांतीं ही न सोडिजे ॥ ३ ॥ अहर्निश करावी श्रीरामाची भक्ति । वर्णाश्रमधर्माचिया युक्ति ॥ श्रीरामउपासनेची अभिव्यक्ति । केली च करावी निःशंक ॥ ४ ॥ वैराग्य करावें विवेकयुक्त । प्रतिज्ञा म्हणावें श्रीरामभक्त ॥ पदार्थमात्रीं कदापि आसक्त । प्राणांतीं ही न व्हावें ॥ ५ ॥ जितुकी गोष्टी मुखें बोलावी । तितुकी क्रिया करुनि दाखवावी ॥ सत्क्रिया उत्तरोत्तर चालवावी । धर्मशास्त्रविचारेंसी ॥ ६ ॥ करावें वेदपारायण । शास्त्रचर्चा अध्यात्मनिरूपण ॥ कां तें श्रीरामगुणानुवाद कीर्तन । यथासांग करावें ॥ ७ ॥ श्रीराम जयराम जयजयराम । नित्यस्मरणाचा हाचि असावा नेम ॥ यावांचुनि सकळ मिथ्या श्रम । बायावीण करूं नये ॥ ८ ॥ " वरील आठ ओंव्यांत दिनकरस्वामींनीं समर्थसंप्रदायाचीं आठ लक्षणें दिलीं आहेत.

कल्याणस्वामींच्या परंपरेंतील दासविश्रामधामकार आत्मारामहाराज यांनीं 'श्रीरामदासपंथक्रमसार' या नावांच्या एक छोटा ग्रंथ लिहिला आहे. त्यांत समर्थसांप्रदायिकांचा प्रातःकालपासून रात्रीं निद्राकालपर्यंतचा क्रम सविस्तर सांगितला आहे. श्रीरामदासपंथक्रमसाराचे एकंदर सोळा समास आहेत. त्यांत ६ ते १० या पांच समासांत रामदाससांप्रदायी लोकांनीं नित्यक्रम कसा पाळावा हें सविस्तर सांगितलें आहे. सहावा समास 'प्रातःस्मरण' हा आहे. प्रातःकाळीं उठून पुढील गोष्टी कराव्या असें सांगितलें आहे:—(१) गुरुध्यान, (२) महा-वाक्यार्थाचें स्मरणोत्तर ध्यान, (३) तारक मंत्रस्मरण, (४) आराध्यमूर्तीचें चिंतन, (५) मंगलाचरण, भजन, स्तवन व भूपाळ्या, ( ६ ) श्रीरामाचें सगुण ध्यान, (८) देवभक्त, संतादिकांचें वर्णन, (८) काकड आरती, व (९) परब्रह्मस्वरूपाचा अभ्यास करीत अगर तारकनामाचें स्मरण करीत प्रपंचकाम. याप्रमाणें या समासांत नऊ गोष्टी करण्यास सांगितल्या आहेत. सातवा समास जपतारक-निरूपण हा आहे. त्यांत पुढील गोष्टी सांगितल्या आहेतः—(१) स्नानसंध्यादि नित्यकर्म, (२) एकांत

स्थळीं एकाग्र मनानें आराध्य मूर्तीचें स्तवन व गुरुपरंपरा आठवून मानसपूजापूर्वक तारक मंत्रजप. तुळशीच्या एकशें आठ मण्यांची माळ असावी. १०० माला जप करणें हें उचित. वेळ न फावल्यास निदान तेरा माळा तरी जपाव्या. आठवा समास 'मानस-पूजानमन' हा आहे. यांत (१) देवार्चन, (२) गुरूंना साष्टांग नमस्कार, (३) सूर्य-नमस्कार. शंकर, विष्णु, मारुतिप्रभृति देवतांना ही नमस्कार सांगितले आहेत. नववा समास 'तीर्थप्रसाद' हा आहे. यांत पुढील गोष्टी सांगितल्या आहेत. (१) स्तोत्रपठण, (२) तीर्थसेवन, (३) आराध्य दैवतास नैवेद्य समर्पण करून फराळ अगर भोजन, (४) पोषणार्थ आपला व्यापार. दहावा समास 'नित्यनेम' हा आहे. यांत पुढील गोष्टी सांगितल्या आहेत. (१) सायंकाळ–नित्यकर्म, (२) मारुतिदर्शन व प्रदक्षिणा, (३) भीमरूपी स्तोत्रें, (४) संध्याकाळचा फराळ. पंचपदी:—पंचपदींत पुढील पांच गोष्टींचा समावेश होतो:—(१) श्री-रामसमर्थ जयजयराम व गुरुनाम, (२) भजन, (३) ग्रंथवाचन—दासबोध, मनोबोध इत्यादि, (४) सिंहासनस्थ सगुण ध्यान, (प्रेमपूर्वक करुणाष्टकें व पदें म्हणत), (५) शेजारती, (६) तारकनाम स्मरत निद्रा करणें. अशा रीतीनें निद्रा केल्यावर दुःस्वप्नें कधीं ही पडणार नाहींत याविषयीं आत्मारामहाराज हमी देत आहेत.

तंजावरमठाधिपति भीमस्वामी यांच्या मठांतील एका बाडांत रामदासंप्र-दायाचीं पुढील लक्षणें दिलीं आहेतः–"जाणावा रामदासांचा हाच सांप्रदाय॥ धृ॥ व्रत ज्याचें ब्रह्मचारी। वस्त्रें ज्याचीं हुर्मुजी बरीं॥ विवेक वैराग्यातें भारी। तारी जडजीवातें॥ १॥ नित्य वाची दासबोध। साधी सारासार शोध॥ सांगे भाविकांसी बोध। करी रोध इंद्रियां॥ २॥ सदावृत्ति नित्यनेम। रामीं ज्याचें अखंड प्रेम॥ ऐसा देखोनि योगक्षेम। कांपे यम चळचळां॥ ३॥ झोळी निरा-पराकर। भिक्षा मागे घरोघर॥ देखोनियां चमत्कार। नारी नर धांवती॥ ४॥ ऐसी निस्पृहाची रीत। सांगितली यथास्थित॥ हरिरंगीं अति प्रीत। तेणें कीर्ति विस्तारे॥ ५॥"

दासविश्रामधामकार आत्मारामहाराज यांचे एक प्रसिद्ध शिष्य नरसोबा नांवाचे होते. ते जातीचे मराठे होते. प्रथम ते आत्मारामहाराजांचा घोडा संभाळीत असत. नंतर त्यांच्यावर अनुग्रह झाला. नरसोबांनीं भालकी येथें मठ स्थापिला. भालकी बालाघाट प्रांतांत लातूरपासून अदमासें २५ कोस लांब आहे. नरसोबांनीं स्थापिलेल्या भालकीमठाची मराठा-शिष्यांची परंपरा ब्रह्मचारी आहे व ती अद्याप चालत आली आहे. या मठांत आजपर्यंत मठाधिपति झालेले सर्व ब्रह्मचारी महंत लहानपणीं आईबापांनीं मठाला अर्पण केलेलीं मुलें होतीं! अशी परंपरा समर्थ-संप्रदायांत दुसऱ्या कोणत्या ही मठांत दिसून येत नाहीं. या नरसो महंतांचे अनंत

म्हणून एक गुरुबंधु होते. त्यांनीं 'वरप्रसाद' म्हणून एक छोटा ग्रंथ लिहिला आहे. त्यांत (१) गुरुप्रसाद, (२) सद्गुरु-लक्षणें व (३) सच्छिष्य-लक्षणें या विषयांचें प्रतिपादन केलें आहे. सच्छिष्यलक्षणांत समर्थसंप्रदायांतील शिष्यांनीं गुरूंच्या आश्रमांत कसें वागावें याचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे:—" गुरु-आश्रमीं पादरक्षा घालूं नये। सैरावैरा फिरों नये। म्हणोन स्वस्थ बसूं नये। कांहीं श्रवण करावें ॥१॥ गुरुसन्मुख गुरु आज्ञेविण। कोणास प्रबोध करूं नये आपण। दीक्षा व्याख्या प्रभुत्व आपलें आपण। न पुसतां वर्णूं नये गुरुसन्मुखें ॥ २॥ पुढें " गुरुआश्रमीं पर्यंकावरी निजूं नये जाण। गुरूंसी समर्पण न करितां भक्षूं नये॥ गुरुपादुका आपण घालूं नये। गुरुआसन घालून बैसूं नये। गुरुवस्त्रादि पांघरूं नये। सद्गुरु राहा म्हणतील त्या देशीं राहावें" वगैरे अनेक गोष्टी सांगून ते पुढें म्हणतात:—" **गुरु निंदकास** जाणें। यथाशक्ति **शिक्षा करा** आपणें ॥ शिक्षा होत नाहीं आपणांकडून। मग **शाप द्यावें** तपोबळें ॥ २३ ॥ आपणांस सामर्थ्य नाहीं हें दोन्ही। **उठूनि जावें** तत्क्षणीं ॥ गुरुनिंदा ऐकूं नये कानीं। सत्य जाण राघवा ॥ २४ ॥ सद्गुरुसन्मुखें मोठ्यानें बोलूं नये। सद्गुरुसन्मुखें हळूं बोलूं नये ॥ सद्गुरूंसी निग्रह करूं नये। कोणेएके विषयीं ॥ ४ ॥"

गिरिधरस्वामींनीं 'रामदासपंथक्रमसार' यासारखा 'समर्थसंप्रदायावर' स्वतंत्र ग्रंथ लिहिला नसला तरी त्यांच्या अनेक ग्रंथांपैकीं कांहीं ग्रंथांत संप्रदायाविषयीं थोडीबहुत माहिती दिली आहे. 'गुरुमार्ग' या ग्रंथांत समर्थ-संप्रदायांत प्रवेश होण्यास कोणत्या गोष्टींची आवश्यकता आहे तें सांगितलें आहे. 'गुरु दीक्षा' या ग्रंथांत गुरुसन्निध कसें वागावें हें सविस्तर सांगितलें आहे व अखेर " स्वामी यांचे ग्रंथ। विस्तारावे लोकीं। मठ ही त्या लोकीं। करवावे ॥११६॥" म्हणजे लांबच्या प्रांतीं शिष्य गेल्यास तेथें स्वतंत्र मठ स्थापण्यास ही गिरिधरस्वामी सांगत आहेत. 'श्रीस्वामीदर्शन' या ग्रंथांत समर्थांच्या दिनचर्येचाच उल्लेख आहे. चाफळ मठांत उत्सवकालीं जशी समर्थांची दिनचर्या असे, तशी इतर मठांत उत्सवप्रसंगीं महंतांची असे. 'दीक्षासंवाद' या ग्रंथांत विवेक, वैराग्य, ब्रह्मचर्य, रामोपासना, गुरूंचीं कर्तव्यें, निस्पृह लक्षणें इत्यादि विषयांचें विवेचन आहे.

आतांपर्यंत समर्थसंप्रदायाचीं लक्षणें दिलीं. त्यांत प्रथम खुद्द समर्थांनीं स्वत: स्फुट ओव्यांत दिलेलीं वीस लक्षणें व नंतर दासबोधांत त्यांची थोडक्यांत दिलेली चतु:सूत्री सांगितली. नंतर त्यांचे कांहीं प्रमुख शिष्य व प्रशिष्य यांनीं दिलेलीं लक्षणें सांगितलीं. शिष्यप्रशिष्यांनीं जीं लक्षणें आपापल्या मठांतील शिष्यांकरितां लिहून ठेविलीं, तीं समर्थांनीं मूळ दिलेल्या संप्रदाय-लक्षणांस अनुसरूनच आहेत, हें जरी खरें आहे, तरी त्यांच्या लक्षणांत मठांतील नित्यक्रमाच्या गोष्टींवरच

विशेष भर दिलेला दिसतो. समर्थांचा कटाक्ष अंतरंगावर होता, त्यांच्या शिष्य-प्रशिष्यांचा कटाक्ष विशेष बहिरंगावरच दिसून येतो. तंजावर बाडांतील लक्षणांत हुर्मुजी रंगाच्या वस्त्रावर व चमत्कार करून दाखविण्यावर जोर दिला आहे. समर्थलक्षणांत हुर्मुजी वस्त्राचा उल्लेख नाहीं व समर्थ-ग्रंथांत चमत्कार करून दाखविण्याचा निषेध केला आहे. वर दिलेल्या शिष्य-प्रशिष्यांच्या लक्षणांत राजकारणाचा मुळींच उल्लेख नाहीं. समर्थशिष्यांचें व प्रशिष्यांचें विशेष लक्ष्य समर्थांच्या चतुःसूत्रींतील पहिल्या लक्षणाकडेच म्हणजे हरिकथानिरूपणाकडेच होतें. समर्थांचे सर्वांत प्रमुख्य शिष्य जे कल्याण ते जवळ-जवळ अखेरपर्यंत समर्थांजवळ होते. समर्थांचा अंतकाल होण्यापूर्वी दोनच वर्षे त्यांना समर्थांनीं डोमगांवास मठ स्थापन करून राहण्यास पाठविलें. कल्याणस्वामींनीं डोमगांवांस जाऊन मठ स्थापन केला व तिकडे त्यांची महंतपरंपरा व शिष्य-परंपरा सर्वांत अधिक आहे. त्यांच्या शिष्यप्रशिष्यांमध्यें दासविश्रामधामकारां-सारखे प्रमुख ग्रंथकार ही निपजले आहेत. परंतु सर्व महंतांचें लक्ष्य हरिकथा-निरूपणाकडे होतें. राजकारणाकडे परिस्थित्यनुरूप कोणीं ही लक्ष्य दिलें नाहीं. उद्धवस्वामी, दिनकरस्वामी, गिरिधरस्वामीप्रभृति शिष्य समर्थांनंतरच्या स्वातंत्र्याच्या धामधुमीच्या काळांत पुष्कळ वर्षे हयात होते. शिरगांवमठाधिपति कल्याणांचे बंधु दत्तात्रयस्वामी यांच्या दोघा शिष्यांनीं बडोदें व ग्वाल्हेर येथें मठ स्थापन केले. परंतु मठाला उत्पन्नें मिळवून रामनवमी, दासनवमी, हनुमंत-जयंती इत्यादि उत्सव दरवर्षी भरून लोकांमध्यें धार्मिक भावना उत्पन्न करण्या-पेक्षां त्यांनीं कांहीं विशेष अधिक केल्याचा कोठें उल्लेख नाहीं. खुद्द चाफळ मठांत समर्थांच्या पश्चात् त्यांच्या जोमानें, उत्साहानें, कर्तव्यदक्षतेनें, अत्यंत साक्षेपानें, संप्रदाय चालविणारा दुसरा मठाधिपति झाला नाहीं. चाफळमठपरं-परेमध्यें दिनकरस्वामी, आत्मारामहाराज, गिरिधरस्वामींप्रमाणें नांवाजण्यासारखे ग्रंथकार ही झाले नाहींत. हनुमंतस्वामींनीं मठांतील प्राचीन कागदपत्रांच्या आधारें व मठाच्या कारभाऱ्यांच्या साहाय्यानें एक बखर मात्र लिहिली आहे. ती समर्थचरित्रकारांना कांहीं गोष्टींत फार उपयोगी पडते. समर्थांच्या पश्चात् तीस वर्षे दिवाकरप्रभृति शिष्यांनींच मठाचा कारभार चालविला होता. शाहू-महाराज मोंगलांच्या कैदेंतून सुटून आल्यानंतर श्रेष्ठांचे नातू गंगाधरस्वामी यांना त्यांनीं जांबेहून आणून समारंभानें चाफळमठाधिपति केलें. गंगाधरस्वामी फार योग्य भगवद्भक्त होते, परंतु श्रेष्ठांप्रमाणें फक्त हरिकथानिरूपणाकडेच त्यांचें लक्ष्य होतें. व नंतर जे चाफळमठाधिपति झाले, त्यांचें ही सर्व लक्ष्य अध्यात्माकडेच होतें. मठाचें उत्पन्न संभाळून रामनवमी, दासनवमी, हनुमंतजयंती इत्यादि उत्सव करून समर्थसंप्रदायाचें कांहीं अंशीं हरिकथानिरूपण व बाह्यांग हीं कायम ठेविलीं आहेत.

याप्रमाणें टाकळी, डोमगांव, बीड, शिरगांवप्रभृति जे २०।२५ मठ हल्लीं चालू आहेत, तेथील मठाधिपतींनीं ही उत्सवांत समर्थसंप्रदायाचें बाह्यांग तेवढें कायम ठेविलें आहे; यापलीकडे व कांहीं ग्रंथ निर्माण केले यापलीकडे त्यांनीं कांहीं विशेष केलेलें दिसत नाहीं. मठ संभाळून उत्सवाचें बाह्यांग कायम ठेविलें, ही तरी कांहीं अंशीं समाधानाची गोष्ट आहे; कारण या मठाधिपतींनीं उत्सव संभाळून बाह्यांग जें कायम ठेविलें आहे, त्यांतून समर्थकृपेनें एकादा मठाधिपति समर्थांप्रमाणें कर्तृत्ववान् संत निर्माण होऊन पुन्हा महाराष्ट्राचेंच नव्हे तर सर्व भरतखंडाचें आनंदभुवन करील अशी आशा करण्यास जागा आहे.

समर्थांच्या पश्चात् त्यांच्या शिष्यांनीं अगर प्रशिष्यांनीं समर्थांच्या चतुःसूत्रींतील चार सूत्रांपैकीं मुख्य सूत्र जें हरिकथानिरूपण त्याकडेच लक्ष्य दिलें व भगवंताच्या अधिष्ठानपूर्वक राजकारणाकडे मुळींच दिलें नाहीं; या गोष्टीवरून एका विद्वान् पदवीधर आक्षेपकांनीं ‘ शिष्यापराधे गुरोर्दंडः ’ या न्यायानें समर्थ राजकारणी संतच नव्हते असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. हाच नियम लागू केल्यास छत्रपति शिवाजीमहाराज कर्तृत्ववान् पराक्रमी योद्धे व दूरदर्शी मुत्सद्दी नव्हते असें म्हणावें लागेल; कारण त्यांच्या पश्चात् छत्रपतींच्या सिंहासनावर बसणाऱ्या त्यांच्या पुत्रपौत्रादि वंशपरंपरेंत वरील गुणसमुच्चय दिसून आला नाहीं. वरील विद्वान् चिकित्सक टीकाकारांनीं जगाच्या इतिहासाचें सूक्ष्म निरीक्षण केलें नाहीं असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें; नाहीं तर त्यांनीं “ शिष्य म्हणजे रामदासांच्या नकला किंवा प्रतिबिंबें. बिंबांत जें कांहीं असेल तेंच प्रतिबिंबांत दिसवयाचें हा सृष्टीचा नियम आहे, त्याला एकटे रामदासच अपवाद कसे होऊं शकतील ? ” असें हास्यास्पद विधान केलें नसतें. कर्तृत्ववान् सद्गुरूचे शिष्य कर्तृत्ववान् व कर्तृत्ववान् राजांचे पुत्र कर्तृत्ववान् होतात अशी साक्ष इतिहास देत नाहीं. असें असतें तर जगाचा इतिहास निराळा झाला असता. शककर्ते छत्रपति शिवाजीमहाराजांच्या मागून सर्व छत्रपति शिवाजीमहाराजांप्रमाणें कर्तृत्ववान् झाले असते तर सातारा ही आज हिंदुस्थानची राजधानी झाली असती; सर्व पेशवे कर्तृत्ववान् झाले असते तर पुणें ही आज हिंदुस्थानची राजधानी झाली असती. महादजी शिंदे यांच्या गादीवर त्यांच्या पश्चात् बसणारे सर्व अलिजा बहाद्दर त्यांच्या सारखे शूर व मुत्सद्दी झाले असते तर ग्वाल्हेर ही आज हिंदुस्थानची राजधानी झाली असती. औरंगजेबासारखा धूर्त, कावेबाज, शूर व धोरणी बादशहा त्याच्या पश्चात् निपजला नाहीं म्हणून पेशवे, शिंदे, होळकर या मराठे सरदारांना दिल्लीचें मोंगल बादशहाचें तक्त खिळखिळून कृष्णानदीकांठच्या घोड्यांना सिंधू नदीचें पाणी पाजवून अटकेला मराठ्यांचा भगवा झेंडा फडकावतां आला. रणजितसिंग महाराजांच्या मागें त्यांचे पुत्र त्यांच्यासारखे कर्तृत्ववान् झाले असते अगर त्यांच्या तालमींत तयार झालेले

शीख सरदार सेनापति त्यांच्याप्रमाणें कर्तृत्ववान् झाले असते तर आज लाहोर ही, हिंदुस्थानची नाहीं तरी उत्तर हिंदुस्थानची तरी राजधानी झाली असती व १९१२ सालीं लॉर्ड हार्डिंजसाहेबांना दिल्ली ही हिंदुस्थानची राजधानी करतां आली नसती. सारांश, गुरूमागें चांगला शिष्य होणें, राजामागें चांगला राजपुत्र निपजणें या गोष्टी सर्वस्वीं नाहीं तरी बव्हंशीं दैवाधीन आहेत अशी प्राचीन व अर्वाचीन इतिहास साक्ष देत आहेत. फार लांब कशाला, हल्लीं या विसाव्या शतकांत आपल्या या हतभागी देशापुरतेंच पाहिलें तरी सुप्रसिद्ध स्वार्थत्यागी अस्सल देशभक्तांचीं मुलें वाडिलांप्रमाणें कर्तृत्ववान् निघालीं आहेत असें विद्वान् आक्षेपक दाखवून देतील काय? कर्तृत्ववान् पुढाऱ्यांचीं मुलें कर्तृत्ववान् निघालीं नाहींत, व त्यांच्या तालमींत तयार झालेले त्यांचे शिष्य ही त्यांच्याइतके अष्टपैलू पुढारी निघाले नाहींत, म्हणून त्यांच्या पश्चात् देशाचें धुरीणत्व दुसऱ्या कर्तृत्ववान् पुढाऱ्याकडे गेलें, ही गोष्ट आक्षेपकांना माहीत नाहीं असें नाहीं. परंतु त्यांनीं ऐतिहासिक चिकित्सापूर्वक टीकेच्या आड दडून समर्थांची निंदा करण्याचें व्रत अंगिकारल्यामुळें त्यांना समर्थांच्या शिष्यांमध्यें त्यांच्या पश्चात् राजकारण दिसलें नाहीं म्हणून समर्थ ही राजकारणी संत नव्हते, फक्त भक्तिमार्गी संत होते असें म्हणण्याचा प्रसंग आला आहे. एका बापाचीं सर्व मुलें सारखीं होत नाहींत. शिवाजीमहाराज व व्यंकोजी राजे हे शहाजीराजे यांचे औरस पुत्र होते, परंतु दोघांमध्यें जमीन-अस्मानचें अंतर. शिवाजीमहाराजांनीं विजापूरच्या बादशहाचें जूं झुगारून त्याच्याकडून आपलें स्वातंत्र्य कबूल करवून त्याच्या दरबारीं आपला वकील ठेवला. तर हें भावाचें उदाहरण डोळ्यांसमोर प्रत्यक्ष पाहून ही व्यंकोजी राजे विजापूरच्या बादशहाचा मांडलिक म्हणवून घेण्यांत धन्यता मानीत होते!! जसें एका बापाचे दोन मुलगे सारखे निपजत नाहींत, तसें एका गुरूचे दोन अगर अधिक शिष्य ही सारखे निपजत नाहींत. म्हणूनच भवभूती उत्तरराम चरित्रांत म्हणतो:—"वितरति गुरुः प्राज्ञे विद्यां यथैव तथा जडे। न च खलु तयोर्ज्ञाने शक्तिं करोत्यपहन्ति वा॥ भवति च तयोर्भूयान् भेदः फलं प्रति तद्यथा। प्रभवति शुचिर्बिम्बोद्ग्राहे मणिर्न मृदां चयः॥" (अंक २.४). यावरून हें सिद्ध होतें कीं, एका बापाचे सर्व मुलगे सारखे कर्तृत्ववान् होत नाहींत व एका गुरूचे सर्व शिष्य ही सारखे कर्तृत्ववान् होत नाहींत. त्याचप्रमाणें कर्तृत्ववान् बापाचा मुलगा बापाप्रमाणें कर्तृत्ववान् होतोच असें नाहीं व कर्तृत्ववान् गुरूचा शिष्य गुरुप्रमाणें कर्तृत्ववान् होतोच असें नाहीं. तेव्हां शिवाजीमहाराज व समर्थ यांचे बाबतींत 'पुत्रस्यापराधे पितुर्दंडः' अगर 'शिष्यापराधे गुरोर्दंडः' हीं तत्त्वें लागू करणें प्रशस्त होणार नाहीं. आपल्याप्रमाणें आपल्यासमक्ष आपले शिष्य राजकारणी संत झाल्याचें पाहण्याचें समर्थांचे नशिबीं नव्हतें असें म्हणतां येईल. आपल्या पश्चात् आपल्या मागें शिष्यमंडळींत आपल्या-

प्रमाणें आपली परंपरा चालविणारा ब्रह्मचारी शिष्य त्यांना दिसला नाहीं, म्हणून त्यांनीं श्रेष्ठांचीं मुलें आणण्यास कल्याणस्वामींना पत्र लिहिण्यास सांगितलें असण्याचा संभव आहे. असें करण्यांत समर्थांनीं मोठा दूरदर्शिपणा दाखविला असें नाहीं; तर अनधिकारी शिष्यांमध्यें मठाधिपति होण्याविषयीं कलह माजविण्यापेक्षां आपला वंशज मठाधिपति केल्यास कलह-कारण नाहींसें होईल असें त्यांना वाटलें असावें. शृंगेरीमठाप्रमाणें अगर भालकीमठाधिपति नरसोबा गोसावी यांचेप्रमाणें समर्थांनीं ब्रह्मचारी शिष्य-परंपरा पुढें चालू ठेवण्यास आज्ञा दिली असती तर बरें झालें असतें असें आम्हांस वाटतें.

समर्थ हयात असतांना संप्रदायाची वाढ फार झपाट्यानें झाली. मेरुस्वामी म्हणतात:—" काशीपासूनी रामेश्वर। समर्थ संप्रदाय अपार। बोधप्रसिद्धी थोरथोर। प्रस्थानें रूढलीं ॥ "( श्रीरामसोहळा, २. ३. १७ ) यास मुख्य कारणें ( १ ) समर्थांची अद्वितीय कर्तृत्वशक्ति व ( २ ) राजसत्तेचें साहाय्य. प्रथमतः समर्थांचें तीव्र वैराग्य, तपश्चर्या, भिक्षावृत्तीनें रामजयंतीचे व हनुमंतजयंतीचे उत्सव करणें हीं संप्रदाय व शिष्यपरंपरा वाढण्यास कारणीभूत झालीं; व शिवाजीमहाराजांना अनुग्रह दिल्यानंतर राजाश्रय हा संप्रदायाचा प्रसार वाढण्यास कारणीभूत झाला. हा राजाश्रय बऱ्याच अंशीं संभाजी, राजाराममहाराज व शाहूमहाराज यांच्या कारकीर्दींत ही सुरू होता. म्हणून रे. डेमिंगसाहेब म्हणतात, 'The Ramadasi movement was practically a state religion'.—भावार्थ, रामदास-संप्रदाय हा व्यवहारदृष्ट्या महाराष्ट्राज्याचा धर्मच होऊन राहिला होता. समर्थांच्या पश्चात्, राजाश्रय असतां ही समर्थसंप्रदायास उतरती कळा लागली याचें मुख्य कारण मठांची अंतर्व्यवस्था नियमबद्ध नव्हती व त्यांच्यामागें त्यांच्यासारखा कर्तृत्ववान् मठाधिपति कोणत्या ही मठास लाभला नाहीं हें होय. कै. राजवाडे समर्थसंप्रदाय "स्वरूपतः विराम पावण्याचें " कारण निराळें देतात. " धर्मराज्यस्थापनेचें अद्भुत कार्य समर्थांच्या तारुण्यांत सुरू होऊन त्यांच्या वार्धक्यांत मूर्त झालें. पुढें धर्मराज्याची स्थापना झाल्यावर समर्थांच्या मठांना तत्कालीन सत्ताधीशांनीं कृतज्ञताबुद्धीनें कायमचीं उत्पन्नें करून दिलीं. राज्यसाधन होत असतांना मठांनीं व महंतांनीं तीस वर्षें विपत्ति भोगिली होती. तेव्हां राज्यसाधन झाल्यावर मठमहंतांच्या योगक्षेमाकडे सत्ताधीशांचें लक्ष्य सहजच गेलें. कालान्तरानें हे मठमहंत खाजगी मालमत्ता करूं लागले व आतां तर बहुतेक सर्व लहानमोठ्या कोर्टांतून दुर्बलपणें भांडत आहेत ! ज्याप्रमाणें प्रायः नोकरी संपल्यावर पेन्शनर मरतात, व संतत्युत्पादन झाल्यावर कित्येक प्राणी देह ठेवतात, त्याचप्रमाणें इष्टकार्य झाल्यावर प्रायः संस्था स्वरूपतः विराम पावतात. " ( सां. वि. वि., खंड २, पृष्ठ २७१ )

शेवटच्या वाक्यांत समर्थांचे मठ बंद पडण्याचें अगर त्यांना उतरती कळा लागण्याचें कारण कै. राजवाड्यांनीं दिलें आहे तें समर्थमठांच्या बाबतींत सर्वस्वीं खरें आहे असें आम्हांस वाटत नाहीं. समर्थांच्या वृद्धापकाळीं स्वराज्यस्थापनेचें काम—इष्टकार्य—कांहीं भौगोलिक मर्यादेपुरतें साध्य झालें होतें. परंतु शिवाजी-महाराज व समर्थ या दोघांच्या अंतकालानंतर स्वराज्यसूर्यास औरंगजेब-राहूनें ग्रासून टाकलें होतें. समर्थांनीं इहलोक सोडतां सोडतां संभाजीमहाराजांस "आहे तितुकें जतन करावें। पुढें आणीक मिळवावें॥ महाराष्ट्रराज्य करावें। जिकडे तिकडे॥"( वा. स., पुष्प २, रें पृष्ठ ५९) असा उपदेश केला होता. परंतु त्यांच्या पश्चात् त्यांच्याप्रमाणें अधिकारयुक्त वाणीनें व स्पष्टोक्तीनें उपदेश करणारा कर्तृत्व-वान् मठाधिपति महाराष्ट्राच्या दुर्दैवानें निर्माण झाला नाहीं हें समर्थमठांना समर्थांच्या पश्चात् उतरती कळा लागण्याचें मुख्य कारण आहे असें आम्हांस वाटतें. दुसरें एक कारण हें कीं, संभाजीमहाराजांच्या वधानंतर लढाईच्या धामधुमीच्या काळांत दूर प्रांतांतील महंत दरसाल चाफळास व सज्जनगडास दरवर्षी येऊन महंत-महंतांमध्यें विचारविनिमय होण्याचें ही बंद पडलें. जो तो महंत आपापल्या मठांत नित्यकर्में करीत व कांहीं बुद्धिमान् महंत धार्मिक ग्रंथरचना करण्यांतच मग्न होऊन बसले. शके १५७१ म्हणजे सन १६४९ पासून शके १६७१ म्हणजे सन १७४९ पर्यंत समर्थसंप्रदायास राजाश्रय होता. या कालापैकीं समर्थ हयात होते तोंपर्यंत पहिलीं ३०—३५ वर्षें समर्थसंप्रदायाची भरभराट होती व नंतर क्रमाक्रमानें उतरती कळा लागूं लागली. शके १६७१ म्हणजे सन १७४९ पासून शके १७७१ म्हणजे सन १८४९ पर्यंत म्हणजे सातारचें राज्य खालसा होईपर्यंत सातारच्या छत्रपतींचें चाफळसज्जनगडीं उत्सवानिमित्त प्रसंगविशेषीं जाणें येणें होतें, तेव्हां पूर्वींच्या शिवसमर्थकालीन राजाश्रयाची केव्हां केव्हां आठवण होत असे व हल्लींपेक्षां चाफळसज्जनगडावरील उत्सव समारंभानें होत असत. कोल्हापूरछत्रपतीच्या घराण्याचें चाफळ व सज्जनगड या मठांकडे कधीं जाणेंयेणें नव्हतें, म्हणून त्या संस्थानांतून वरील मठांस राजाश्रय नव्हता. कोल्हापूर संस्थानच्या संस्थापक राजकारणपटु ताराबाई-राणीसाहेब छत्रपति राजाराममहाराजांबरोबर चंदीचंदावरास जाण्यापूर्वीं सज्जनगडास एकदां समर्थसमाधीच्या दर्शनास गेल्या होत्या; परंतु पुढें चाफळ व सज्जनगड शाहूमहाराजांच्या राज्यांत असल्यामुळें व सातारा व कोल्हापूर या दोन छत्रपतींच्या घराण्यांत बरींच वर्षें लढाया सुरू असल्यामुळें ताराबाईराणीसाहेब व त्यांचे पुत्र शिवाजीमहाराज व सावत्र पुत्र संभाजीमहाराज यांचा चाफळमठाधिपतींशीं गुरु-शिष्यांचा संबंध सातारच्या छत्रपतीप्रमाणें कायम राहिला नसावा असें वाटतें. नंतर पुढें कोणत्या ही कोल्हापूरच्या छत्रपति महाराजांनीं चाफळमठाधिपतीशीं गुरुशिष्यांचा संबंध ठेवला नाहीं. त्यांनीं आपलें गुरुघराणें स्वतंत्र निर्माण केलें. ताराबाईराणी-

साहेबांना हल्लींचें कोल्हापूरचें राज्य मिळविण्याच्या कामीं प्रतिनिधींनीं सचिवां-प्रमाणें शपथ दिल्यामुळें रामचंद्रपंत पंतअमात्य यांना ही ताराबाईंना मदत करावी लागली. ते समर्थसमाधीनंतर संभाजीमहाराजांतर्फें सज्जनगडावर गेले होते, त्यांना समर्थांचा अनुग्रह झाला होता. पन्हाळगडीं त्यांच्या घरीं समर्थांनीं एकदां कीर्तन केलें होतें. परंतु सातारा व कोल्हापूर घराण्यांत युद्ध सुरू झाल्यामुळें ते ही पुढें अंतकालपर्यंत म्हणजे १७२० पर्यंत कधीं चाफळसज्जनगडांस गेले नाहींत. नंतर पुढें कोल्हापूरच्या छत्रपतिघराण्याचा अगर त्यांच्या सरदारजहागिरदारांचा राजाश्रय चाफळच्या मठाला कधीं मिळाला नाहीं.

१८४८ पासून इंग्रजांचें राज्य सुरू झाल्यानंतर साताऱ्च्या छत्रपति घराण्याचें पूर्वकालीन वैभव गेल्यामुळें चाफळसज्जनगडीं दरवर्षीं जाणेंयेणें बंद झालें. पूर्वींचीं दिलेलीं इनामें सुरू आहेत. त्यावर कसातरी वार्षिक उत्सव-समारंभ साजरा करण्यांत येतो. इतर प्रांतांतील मठांची ही स्थिति तशीच आहे. मठाधिपतीशिवाय भिक्षा मागून संचार करणारा व दरसाल सज्जनगडावर दास-नवमीच्या उत्सवास येणारा असा एक रामदासी पंथ ही हल्लीं आहे. हे संचार करणारे रामदासी समर्थांच्या ग्रंथांचें आस्थेनें अध्ययन करणारे बहुतेक ब्रह्मचारी वर्गापैकीं असतात. संचार करीत असतां, वाटेंत कथाकीर्तनें व प्रवचनें करून लोकांना समर्थसंप्रदायाचीं तत्त्वें समजून देतात व बहुजन समाजास नीतिमार्गाचा उपदेश ही करतात. हे रामदासी संचार करीत असतां समर्थांच्या आज्ञेप्रमाणें भिक्षा मागून आपला उदरनिर्वाह करितात. समाजावर कोणत्या ही प्रकारचें त्यांचें ओझें नाहीं. कऱ्हाड तालुक्यांतील मसूर येथील ब्रह्मचर्याश्रमाचे संस्थापक ब्रह्मश्री विनायकमहाराज मसूरकर हे या पंथापैकीं एक प्रमुख समर्थसंप्रदायी होत. या आश्रमामार्फत ‘ दासबोध ’ हें मासिक चाललें आहे. त्यांत उत्कृष्ट लेख येतात. शिवाय लहानलहान धार्मिक पुस्तकें प्रसिद्ध करून तरुण पिढीला शिक्षण देण्याचें पवित्र काम ही या आश्रमामार्फत होतें. ठाणें जिल्ह्यांत ‘ रुग्णालय ’ काढून लोक-सेवा करण्याचें काम ही या आश्रमाच्या संस्थापकांनीं सुरू केलें आहे. हल्लीं मसूरचा आश्रम सरकारमार्फत जप्त होऊन सामानाचा लिलांव झाला आहे. सरकारच्या ठरावाबर दिवाणी कोर्टांत दावा होणार असें म्हणतात. कांहीं गांवांत ‘ मनाचे श्लोक ’ म्हणून भिक्षा मागणारे कित्येक ‘ रामदासी ’ आहेत. ते बहुधा गृहस्थाश्रमी असतात व भिक्षेवर बायकामुलांचा निर्वाह करितात. त्यांपैकीं पुष्कळांना सर्व समर्थग्रंथांची नव्हे तर दासबोधाची ही विशेष माहिती नसते. याप्रमाणें समर्थसंप्रदायाची हल्लीं शोचनीय व निराशाजनक स्थिति आहे.

परंतु काळ्या ढगांतून जशी प्रकाशमान विद्युत् चमकते तशीं या निराशाजनक स्थितींतून ही आशाजनक किरणें चमकूं लागण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत.

दोन आधुनिक सुप्रसिद्ध समर्थसंप्रदायी



श्रीधर्मभास्कर विनायकस्वामी, मसूर ब्रह्मचर्याश्रमाचे संस्थापक

(फोटोग्राफर फडके, कऱ्हाड)





श्रीसमर्थदास केशवस्वामी, विद्यमान इंदूरबोधन मठाधिपति

(पान २६२)

"कस्यैकांतं सुखमुपगतं दुःखमेकांततो वा । नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण ॥" या मेघदूतांतील कालिदासोक्तीप्रमाणें समर्थसंप्रदायाला ही लवकरच 'अभ्युदयाचा काल येण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. अर्थात् परिस्थित्यनुरूप पूर्वीच्या व हल्लींच्या मार्गांत थोडाबहुत फरक करावा लागेल. पूर्वीच्या समर्थसंप्रदायाच्या लोकोत्तर कार्याचा बहुजनसमाजास अगदीं विसर पडला होता; त्या कार्याची आठवण करून देण्याचें काम कै. राजवाडे व श्री. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं सुरू केलें. प्रथम कै. राजवाडे यांनीं 'रामदास' हा उत्कृष्ट निबंध लिहून समर्थ-वाङ्मय शोधण्याची संशोधकांना दिशा दाखवून दिली. त्यानंतर श्री. देव यांनीं शके १८२७ सालीं डोमगांवच्या कल्याणप्रतीवरून शुद्ध दासबोध छापून प्रसिद्ध केला व त्याला उत्तम प्रस्तावना जोडून कठिण शब्दांच्या टीपा ही दिल्या. नंतर त्यांनीं समर्थांचे इतर ग्रंथ व समर्थशिष्यप्रशिष्यांचे ग्रंथ 'रामदास व रामदासी' या मालेंतून प्रसिद्ध केले. संप्रदायिक विविध विषय, संप्रदायाचीं कागद पत्रें हीं त्या मालेंतून छापलीं. श्री. देव यांनीं समर्थवाङ्मय व समर्थशिष्य व प्रशिष्य यांचें वाङ्मय उत्कृष्ट प्रस्तावनेसह प्रसिद्ध करून साक्षर महाराष्ट्राला ऋणी करून ठेवलें आहे. वरील ग्रंथप्रकाशनाचें काम श्री. देव यांनीं धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेमार्फत केलें आहे. परंतु साक्षर महाराष्ट्रानें त्यांच्या श्रमाचें विशेष चांगल्या प्रकारानें चीज केलेलें दिसत नाहीं. सत्कार्योत्तेजक सभेच्या कचेरींत हजारों रुपयांचीं समर्थवाङ्मयाचीं पुस्तकें पडलीं आहेत. साक्षर महाराष्ट्रीय लोकांच्या नाटकें, कादंबऱ्या व मनोरंजक मासिकें यांवर उड्या पडाव्या आणि समर्थ-वाङ्मयाच्या पुस्तकांना व रामदास व रामदासी या मासिकास भरपूर ग्राहक मिळूं नयेत हें महाराष्ट्राचें दुर्दैव होय. तथापि श्री. देव यांच्या सतत २५ वर्षांच्या परिश्रमामुळें समर्थसंप्रदायाकडे स्वाभिमान-दृष्टीनें पाहणारा सुशिक्षित वर्ग निर्माण होऊं लागला आहे हें सुचिन्ह होय. ह. प. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, प्रो. दत्तो वामन पोतदारप्रभृति समर्थभक्त समर्थवाङ्मयाची खरी योग्यता बहुजन समाजास पटवून देत आहेत. श्री. देव यांनीं गेल्या रामनवमीस जांब येथें समर्थांच्या जन्मस्थानीं समर्थमंदिर स्थापून तेथें जमलेल्या शेंकडों समर्थभक्तांना समर्थकार्याची महती पटवून दिली. अलीकडे १०।१२ वर्षें सज्जनगडावर सर्व रामदाससंप्रदायी व रामदासभक्त मिळून समर्थसंप्रदायाचा हल्लींच्या परिस्थित्यनुरूप जीर्णोद्धार करण्याचा विचारविनिमय करीत असतात. हल्लींच्या सुशिक्षितांमध्यें संप्रदायाची रीतसर दीक्षा घेऊन भिक्षावृत्तीनें पूर्वीप्रमाणें संचार करून काम करणारे लोक नसले तरी समर्थवाङ्मयाचें संशोधन करणारे, अध्ययन करणारे व समर्थकार्याचें महत्त्व पटवून देणारे लोक उत्पन्न होऊं लागले आहेत. हा समाज सुशिक्षितांमध्यें उत्तरोत्तर वाढत गेला पाहिजे. दासबोधांतील चतुःसूत्रींतील दुसऱ्या राजकारण-

सूक्ताकडे या सुशिक्षितांचें दिवसेंदिवस अधिक लक्ष गेलें पाहिजे. व 'प्रपंची जाणे राजकारण '-ही समर्थांची उक्ति अहर्निश त्यांच्या डोळ्यांपुढें राहिली पाहिजे. आपल्या परिस्थित्यनुरूप आपणांस झेपेल तेवढें तरी राजकारण करणें हें आपलें पवित्र कर्तव्य आहे हें त्यांनीं ध्यानांत ठेवलें पाहिजे. कोणता ही धंदा करीत असतांना भगवंताचें अधिष्ठान ठेवून निदान स्वदेशी व्रत पाळून राष्ट्रोन्नतीला यावच्छक्य अंतःकरणपूर्वक साहाय्य करणें हें आपलें पवित्र कर्तव्य आहे, ही जाणीव त्यांनीं अहर्निश बाळगली पाहिजे.

समर्थकालीं समर्थसंप्रदायामध्यें महाराष्ट्रीय लोकच प्रामुख्यानें होते. म्हणजे समर्थसंप्रदाय महाराष्ट्रीयच होता. आतां परिस्थित्यनुरूप समर्थसंप्रदाय राष्ट्रीय ही करतां येईल असें आम्हांस वाटतें. समर्थांच्या चतुःसूत्रीप्रमाणें राष्ट्रसेवासंघ काढल्यास त्यांत अन्य धर्मांच्या लोकांचा समावेश होण्यास प्रतिबंध आहे असें आम्हांस वाटत नाहीं. समर्थांच्या चतुःसूत्रींतील सूक्तांची योजना अत्यंत व्यापक आहे; आकुंचित नाहीं. समर्थांच्या चतुःसूत्रींत ग्रथित केलेलीं सूत्रें त्रिकालाबाधित आहेत. त्यांना कालाचीच नव्हे तर स्थलाची ही मर्यादा नाहीं. Great men speak for all times and for all places. भावार्थ—थोर विभूतींचें म्हणणें कोणत्या ही काळांत व कोणत्या ही देशांत लागू पडतें. कोणत्या ही आपन्न देशांतील लोकांनीं कोणत्या ही काळीं समर्थांच्या चतुःसूत्रींतील सूक्तांप्रमाणें लोकोद्धाराकरितां संप्रदाय, आश्रम अगर संस्था किंवा संघ काढल्यास त्यांस यश आल्याशिवाय राहणार नाहीं. मग समर्थसंप्रदायाच्या जन्मभूमीच्या देशांत सर्व धर्मांच्या व सर्व पंथांच्या लोकांनीं मिळून सांप्रतच्या परिस्थितीला अनुसरून गौण भागांत कांहीं फेरबदल करून सर्वधर्मपंथी समर्थसंप्रदाय काढल्यास तो यशस्वी होण्यास विशेष अडचण पडेल असें आम्हांस वाटत नाहीं. हरिकथानिरूपण प्रत्येक समाजानें आपल्या धर्माप्रमाणें करावें व इतर तीन सूक्तांप्रमाणें सर्वांनीं एकजुटीनें वर्तन करावें. हिंदुस्थानांतील सर्व धर्मांचा अंतर्भाव करून याप्रमाणें संप्रदाय स्थापन करण्यास सर्व समाजांचा विश्वास बसेल अशी लोकोत्तर विभूति पाहिजे. ही आमची कल्पना रे. डेमिंगसाहेबांना असंभवनीय वाटते व त्याप्रमाणेंच आणखी पुष्कळांना ही ती तशी वाटेल, परंतु ती अशक्य नाहीं. 'कालोह्ययं निरवधिः' या भवभूतीच्या उक्तीप्रमाणें ती केव्हां तरी अस्तित्वांत येईल.

रे. डेमिंगसाहेबांनीं आपल्या 'रामदास व रामदासी' या इंग्रजी पुस्तकांत शेवटचा भाग 'रामदास व जीझस' या विषयावर लिहिला आहे. त्यांत त्यांनीं समर्थसंप्रदायाच्या तत्त्वांची जीझस खाइस्ट यांच्या उपदेशाच्या तत्त्वांशीं तुलना केली आहे. रे. डेमिंगसाहेब म्हणतात :—" As we study the verses of Ramdas

which reveal his love for Shri Rama, we note certain similarities between his teaching and that of Jesus. Both worshipped a personal spiritual God and looked to him daily for guidance. Both believed that this personal God desires to be worshipped, through loving devotion rather than through external ceremonies and sacrifices ... ...It is thus as a bhakta that Ramdas comes closest to Jesus in his thought about God. Unfortunately he did not confine himself to his bhakti teaching but also taught the doctrine that God is impersonal." ( Chapter XI, pages 199–200 ). भावार्थः—"रामदासांची श्रीरामाविषयीं भक्तिपर कविता ( करुणाष्टकें ) जेव्हां आम्ही वाचतों तेव्हां त्यांच्या उपदेशांत व जीझस यांच्या उपदेशांत कांहीं विशेष गोष्टींत साम्य आहे असें आम्हांला दिसून येतें. दोघे ही साकार ( personal ) परमेश्वराची पूजा करीत असत आणि नित्य व्यवहारांत त्याला मार्गदर्शक समजत. या साकार परमेश्वराला भक्तीची पूजा आवडते व बाह्योपचाराची पूजा आवडत नाहीं असें दोघांना ही विश्वासपूर्वक वाटे. दोघांना ही आपला परमेश्वर भक्तांविषयीं काळजी घेतो, त्यांचें रक्षण करतो व संकटसमयीं त्यांनीं मोहांत पडूं नये म्हणून त्यांना मदत करतो असें वाटे. परमेश्वराविषयींच्या कल्पनेंत भक्त या नात्यानें रामदास व जीझस यांचें नितांत मतैक्य आहे. परंतु भक्तीच्याच उपदेशास रामदास चिकटून राहिले नाहींत. त्यांनीं निर्गुण परमेश्वराची ही उपासना सांगितली हें दुर्दैव होय." सगुणोपासना व निर्गुणोपासना यांच्यांत विसंगतता नाहीं असें कित्येक विद्वानांचें मत आहे असें रे. डेमिंग स्वतःच कबूल करतात; परंतु त्यांना तें मत पटत नाहीं. निर्गुणोपासना समजण्यास अधिकार मोठा लागतो. समर्थांना आपल्या संप्रदायांत बहुजन समाजास घ्यावयाचें होतें म्हणून त्यांनीं सगुण व निर्गुण दोन्ही उपासना सांगितल्या व "आतां असो हें बोलणें। अधिकारासारिखें घेणें॥ परंतु अभिमान त्यागणें। उत्तमोत्तम॥" ( दासबोध १.१.२६ ) असें दासबोधाच्या पहिल्या समासांतच सांगितलें आहे. "मारुति व राम यांच्या मूर्ती स्थापून मूर्तिपूजेचा उपदेश करून तर समर्थांनीं परमेश्वराविषयीं उपदेशांत फारच घोंटाळा केला. हल्लींचे हिंदु सुधारक रामदासांच्या फार पुढें ( ? ) गेले आहेत. ते रामदासांच्या मूर्तिपूजेचा स्वीकार करणार नाहींत. जीझस यांच्या ईश्वरविषयक कल्पनेची रामदासांच्या कल्पनेशीं तुलना केल्यास रामदासांचें मत चुकीचें होतें असें आम्हांस वाटतें," असें डेमिंगसाहेब म्हणतात (पान २००–२०१). डेमिंगसाहेबांचें मत आम्हांस मुळींच मान्य नाहीं. ईश्वराची भक्ति, सगुणपूजा व निर्गुणपूजा यांत कांहीं विसंगतता नाहीं. "उत्तमा सहजा पूजा। मध्यमा ध्यानधारिणी॥ अधमा मानसी पूजा। मूर्तिपूजाऽधमाधमा॥ १॥" हा आद्य श्रीशंकराचार्यांचा श्लोक आम्हीं मागें एकदां दिलेला वाचकांना आठवत

असेलच. सहजापूजा म्हणजे निर्गुणोपासना. तिला आचार्यांनीं अग्रस्थान दिलें आहे; व मूर्तिपूजा सर्वांत कनिष्ठ ठरविली आहे. परंतु बहुजनसमाजाला ईश्वराची कल्पना करून देण्याला मूर्तिपूजेचा प्रथम आश्रय करावा लागतो. नंतर पायरी-पायरीनें सहजापूजेचा अधिकार प्राप्त करून घ्यावा लागतो. आचार्यांना सहजा-पूजेचा अधिकार प्राप्त झाला होता तरी ते लोकसंग्रहाकरितां स्वतः शारदांबेची ही पूजा करीत असत. ती शारदांबेची मूर्ति हल्लींच्या श्रीशंकराचार्यांच्या मठांत ही आहे.

मोक्षप्राप्तीसंबंधीं समर्थ व जीझस यांच्यामध्यें मतभेद आहे असें डेमिंगसाहेब म्हणतात. समर्थ म्हणतात कीं, 'मोक्ष (१) ज्ञानानें, (२) निष्काम कर्मानें व (३) भक्तीनें मिळतो.' ( पृष्ठ २०२ ) "For Jesus salvation consisted with reconciliation between God, the loving Father and His human children. Christ stated that he came to tell men of God's love and God's supreme desire that all men should abide in that love." ( Pages 201-202 ) " भावार्थः–पितृवत् प्रेम करणारा ईश्वर व त्याचीं मुलें–म्हणजे मनुष्यें यांच्यामध्यें एक मिलाफ ( reconciliation ) झाला म्हणजे मोक्ष मिळतो. " परंतु देव व मनुष्यें यांमध्यें वरीलप्रमाणें एक मिलाफ होण्यास समर्थ म्हणतात त्याप्रमाणें ज्ञान, निष्काम कर्म व भक्ति हीं साधनेंच आहेत याकडे डेमिंगसाहेबांचें लक्ष्य कसें गेलें नाहीं याचें आश्चर्य वाटतें. डेमिंगसाहेबांचा जन्म अन्य संस्कृतींत (culture) झाल्यामुळें दुसऱ्या संस्कृतींतील कांहीं गोष्टी त्यांना विचित्र वाटाव्या हें साहजिकच आहे. समर्थ पुनर्जन्मावर विश्वास ठेवून चौऱ्यांशीं लक्ष योनींतून सुटका म्हणजे मुक्ति असें म्हणतात हें त्यांना पटत नाहीं. पापापासून सुटका म्हणजे मुक्ति, हें ख्रिस्तप्रणीत मत त्यांना पसंत पडतें व म्हणून ते समर्थांच्या मुक्तीविषयक कल्पनेपेक्षां जीझसची कल्पना अधिक दर्जाची आहे असें म्हणतात. आम्हांस तसें वाटत नाहीं. त्याच प्रमाणें विश्वाच्या उभारणी-संहारणी-संबंधाची समर्थांची कल्पना ही त्यांना पसंत नाहीं. अक्षरब्रह्मापासून प्रकृति, प्रकृतीपासून मूळमाया, मूळमायेपासून गुणमाया, गुणमायेपासून त्रिगुण व त्रिगुणापासून पंचमहाभूतें अशी वेदांतमताप्रमाणें समर्थांची विश्वरचनेची कल्पना आहे व विश्वाचा संहार वर सांगितलेल्या विश्वरचनेच्या उलट क्रमानें होतो असें समर्थ म्हणतात. हल्लीं आधिभौतिक शास्त्राच्या सुधारलेल्या कालांत ही समर्थांची सृष्टिरचनेची कल्पना ग्राह्य होणार नाहीं असें डेमिंगसाहेब म्हणतात. परंतु God said, let their be light and there was light ( भावार्थः––प्रकाशाची उत्पत्ति होवो असें ईश्वर म्हणाला व प्रकाश उत्पन्न झाला ) ही ख्रिस्तशास्त्रप्रणीत पंचमहाभूतांची कल्पना ही ख्रिस्त देशांतील आधिभौतिक शास्त्रज्ञांना संमत नाहीं हें डेमिंगसाहेबांना माहीत नसावें असें दिसतें. पुढें एके ठिकाणीं डेमिंगसाहेब म्हणतात:–

Another point of contrast is that Jesus confined himself to great spiritual principles, saying little about unimportant details; the Swami, on the other hand, gave his attention to vital principles and trivial details, mixing them to such a degree that one wonders whether he adequately discriminated between them. ( Page 211 )

भावार्थ—दोघांमध्यें आणखी एक फरक आहे तो हा कीं, जीझस यांनीं मुख्य अध्यात्मिक तत्त्वांकडेच विशेष लक्ष दिलें. रामदासांनीं महत्त्वाचीं तत्त्वें सांगून शिवाय ते तपशिलांत ही शिरले. आम्हांस वाटतें हा समर्थांचा दोष नसून गुण आहे. जीझस व समर्थांचा काल भिन्न होता, तशी त्यांची परिस्थिती ही भिन्न होती. समर्थांना समुदायास आपल्या संप्रदायांत आणून महाराष्ट्रांतील जनतेस जागृत करावयाचें होतें म्हणून त्यांना तसें करावें लागलें.

'जेसुइष्ट' नांवाचा एक धार्मिक पंथ युरोपमध्यें सन १५३९ सालीं स्थापन झाला. त्याची सविस्तर हकीकत 'एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका' व्हॉल्युम १५–१६ यांत ३३७–३४७ पानांत दिली आहे. कांहीं गोष्टींत समर्थ-संप्रदाय व जेसुइष्टपंथ यांचें साम्य आहे व दोन्ही पंथांना उतरती कळा लागण्याचें मुख्य कारण एकच आहे म्हणून थोडक्यांत त्या पंथाची हकिकत देतों. लायोलाचा सेंट इग्नेशियस् यानें हा पंथ सन १५३९ सालीं स्थापन केला. मार्टिन ल्यूथर यानें १० डिसेंबर १५२० या दिवशीं पोपचें बहिष्कारपत्र जाळून टाकलें व रोमन चर्चविरुद्ध प्रॉटेस्टंट पंथ सुरू केला. त्याला प्रतिस्पर्धी म्हणून हा पंथ निघाला. या पंथाला रोमच्या पोपचा आश्रय होता. या पंथाला १५४० मध्यें 'जेसुइष्ट' हें नांव त्या पंथाच्या प्रतिस्पर्धी पक्षानें दिलें. आरंभापासून आतांपर्यंत या पंथाचे २५ 'जनरल' झाले. समर्थसंप्रदायाच्या मुख्यास महंत अगर मठाधिपति म्हणतात. जेसुइष्ट पंथाच्या मुख्यास जनरल म्हणतात. जनरलाचें मुख्य ठिकाण रोममध्यें आहे. तेथून तो सर्व ठिकाणचे अधिकारी नेमतो. दुसरा सेनापति लेनिझ यानें या पंथाला विशिष्ट नियम घालून दिले. ( Poverty, Chastity and Obedience ) निष्कांचन वृत्ति, चारित्र्य व आज्ञाधारकपणा हे तीन मुख्य गुण जेसुइष्ट पंथाच्या अनुयायांमध्यें असावे लागत. या पंथानें शिक्षणद्वारां लोकांचें अज्ञान घालवून प्रॉटेस्टंट पंथाविरुद्ध कांहीं वर्षें यशस्वी काम केलें. या पंथांतील लोक राजकारणांत पडूं लागल्यामुळें इंग्लंड, स्पेन, रशिया व फ्रान्स इत्यादि देशांतून या पंथाचें उच्चाटन झालें. या पंथाच्या उलट एक मोठा आक्षेप घेतला जातो तो हा कीं, हा पंथ The end justifies the means ( यश मिळत असल्यास साधनाकडे पाहण्याची जरूरी नाहीं ) या तत्त्वाचें अवलंबन करतो. समर्थसंप्रदायांत 'नीतिन्याया 'वर फार कटाक्ष आहे. याविषयीं समर्थसंप्रदायाची रे. डेमिंग यांनीं

अनेक ठिकाणीं स्तुति केली आहे. ( भाग ६ व भाग ११ ) समर्थांच्या हयातींत समर्थसंप्रदायाचा प्रसार झाला, तसा इग्नेसिअसच्या हयातींत त्याच्या पंथाचा प्रसार झाला नाहीं. त्याला फार कष्ट भोगावे लागले, कारागृहवास ही भोगावा लागला; पण त्याच्या पश्चात् कांहीं काळ त्याच्या पंथाची भरभराट झाली. परंतु पुढें त्या पंथास ही उतरती कळा लागली. त्याचीं मुख्य दोन कारणें एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिकामध्यें दिलीं आहेत. पहिलें कारण खऱ्या कर्तृत्ववान्, थोर व बुद्धिवान् पुढाऱ्यांची उणीव ( a lack of really great intellects ). समर्थसंप्रदायाला उतरती कळा लागण्याचें हेंच एक मुख्य कारण आहे असें आम्हीं ही मागें म्हटलें आहेच. जेसुइष्ट पंथाच्या उतरत्या कळेचें दुसरें कारण पुढीलप्रमाणें दिलें आहे:— The second cause which has blighted the efforts of the society is the lesson, too faithfully learnt and practised, of making corporate interests the first object at all times and in all places. १८१४ सालीं या पंथाची पुनर्घटना झाली. परंतु त्यांत विशेष यश आलें नाहीं. या पंथाच्या संस्थापकाच्या पहिल्या पांच साथीदारांपैकीं फ्रान्सिस झेव्हियर हा हिंदुस्थानांत १५५१ त आला व त्यानें हिंदुस्थानांत व पूर्व आशियांत खिस्तिधर्मप्रसारार्थ फार श्रम केले. मुंबईचें झेव्हियर कॉलेज याच पंथाचें होय.

समर्थसंप्रदायाचें विवेचन संपविण्यापूर्वीं समर्थांची दिनचर्या व संप्रदायाविषयीं आणखी थोडी माहिती सांगून हें प्रकरण आटोपतों. 'आधीं केलें मग सांगितलें' हा समर्थांचा बाणा होता. तेव्हां समर्थांनीं दासबोधांत कांहीं समासांमध्यें जे नियम घालून दिले आहेत, त्यांप्रमाणें त्यांची दिनचर्या होती असें समजण्यास कांहीं हरकत नाहीं. सदर्हू समासांतील ओंव्यांचें गद्यांत भाषांतर करण्यापेक्षां त्या तशाच येथें देतों; कारण त्या फार सोप्या आहेत. पाठ करण्यास त्या उपयोगी पडतील. **समर्थांची दिनचर्या:**—(अ)" प्रातःकाळीं उठावें। कांहीं पाठांतर करावें। यथानुशक्ति आठवावें। परमेश्वरासी ॥ १५ ॥ मग दिशेकडे जावें। जें कोणासीच नव्हे ठावें॥ शौच आचमन करावें। निर्मळ जळें ॥ १६ ॥ मुखमार्जन प्रातःस्नान। संध्यातर्पण देवतार्चन ॥ पुढें वैश्वदेव उपासन। यथासांग ॥ १७ ॥ कांहीं फलाहार घ्यावा। मग संसारधंदा करावा ॥ सुशब्दें राजी राखावा। सकळ लोक ॥ १८ ॥ ज्या ज्याचा जो व्यवहार। तेथें असावें खबर्दार ॥ दुश्चितपणें तरी पोर। वेढा लावी ॥ १९ ॥ चुके, ठके, विसरे, सांडी। आठवण झालिया चर्फडी ॥ दुश्चितपणाची रोकडी। प्रचीत पहा ॥२०॥ या कारणें सावधान। एकाग्र असावें मन ॥ तरी मग जेवितां भोजन। गोड वाटे ॥ २१ ॥ पुढें भोजन झालियावरी। कांहीं वाची चर्चा करी ॥ एकांतीं जाऊनि विवरी। नाना ग्रंथ ॥ २२ ॥ तरीच प्राणी शहाणा होतो। नाहीं तरी मूर्खचि राहतो। लोक खाती आपण पाहातो।

दैन्यवाणा ॥ २३ ॥ ऐक सदैवपणाचें लक्षण । वायां जावो नेदी क्षण ॥ प्रपंच व्यवसायाचें ज्ञान । बरें पाहे ॥ २४ ॥ कांहीं मेळवी मग जेवी । गुंतल्या लोकांस उगवी । शरीर कारणीं लावी । कांहींतरी ॥ २५ ॥ कांहीं धर्मचर्चा पुराण । हरिकथा निरूपण ॥ वायां जावों नेदी क्षण ॥ दोहींकडे ॥ २६ ॥ ऐसा जो सर्वसावध ॥ त्यास कैचा असेल खेद ॥ विवेकें तुटला संबंध । देहबुद्धीचा ॥ २७ ॥ आहे तितुकें देवाचें। ऐसें वर्तणें निश्चयाचें ॥ मूळ सुटलें उद्वेगाचें। येणें रीति॥२॥ प्रपंचीं पाहिजे सुवर्ण । परमार्थीं पंचीकरण ॥ महावाक्याचें विवरण । करितां सुटे ॥ २९ ॥ कर्म उपासना आणि ज्ञान । येणें राहे समाधान ॥ परमार्थाचें जें साधन । तेंचि ऐकत जावें ॥ ३० ॥" (दासबोध १. १. ३) समर्थसंप्रदायाच्या महंतांचें ही वर्तन त्याचप्रमाणें असे.

**समर्थांची दिनचर्याः-(आ)** "वेषभूषण तें दूषण । कीर्तिभूषण तें भूषण । चाळणेविण एक क्षण । जाऊं च नेदी ॥ ५ ॥ त्यागी ओळखिचे जन । सर्वकाळ नित्य नतन ॥ लोक शोध पाहती मन । परी इच्छा दिसेना ॥ ६ ॥ पुर्तें कोणाकडे पाहेना । पुर्तें कोणासी बोलेना ॥ पुर्तें एके स्थळीं राहेना । उठोन जातो ॥ ७ ॥ जातें स्थळ तें सांगेना । सांगितलें तेथें जाईना ॥ आपुली स्थिति अनुमाना । येवोंच नेदी ॥ ८ ॥ लोकांस पाह्याचा आदर । तेथें याचा अनादर ॥ लोक सर्वकाळ तत्पर । तेथें याची अनिच्छा ॥ ९ ॥ एवं कल्पितां कल्पेना । ना तर्कितां ही तर्केना ॥ कदापि भावितां भावेना । योगेश्वर ॥ १० ॥ लोक संकल्प विकल्प करिती । ते अवघेची निर्फळ होती ॥ जनाची जना लाजवी वृत्ति । तेव्हां योगेश्वर ॥ ११ ॥ बहूतीं शोधून पाहिलें । बहुतांच्या मनास आलें ॥ तरी मग जाणावें साधिलें । महत्कृत्य ॥ १२ ॥ अखंड एकांत सेवावा । अभ्यासची करीत जावा ॥ काळ सार्थकाचि करावा । जनासहित ॥ १३ ॥ उत्तम गुण तितुके घ्यावे । घेऊन जनास शिकवावे ॥ उदंड समुदाय करावे । परी गुप्तरूपें ॥ १४ ॥ अखंड कामाची लगबग । उपासनेस लावावें जग ॥ लोक समजोन मग । आज्ञा इच्छिती ॥ १५ ॥ आधीं कष्ट मग फळ । कष्टाचि नाहीं तें निर्फळ । साक्षेपेंविण केवळ । वृथा पुष्ट ॥ १६ ॥ लोक बहुत शोधावे । त्यांचे अधिकार जाणावे ॥ जाणजाणोन धरावे । जवळी दुरी ॥ १७ ॥ अधिकारपरत्वें कार्य होतें । अधिकार नसतां व्यर्थ जातें ॥ जाणोनि शोधावीं चित्तें । नानाप्रकारें ॥ १८ ॥ अधिकार पाहून कार्य सांगणें । साक्षेप पाहोन विश्वास धरणें ॥ आपला मगज राखणें । कांहींतरी ॥ १९ ॥ हें प्रचीतीचें बोलिलें । आधीं केलें मग सांगितलें ॥ मानलें तरी पाहिजे घेतलें । कोणीएकें ॥ २० ॥" (सु. दा. द. ११-१० ).

**समर्थांची दिनचर्याः-( इ )** "प्रबोध शक्तींचीं अनंत द्वारें। जाणे सकाळांचीं अंतरें ॥ निरूपणें तदनंतरें । चटक लागे ॥८॥ मतें मतांतरें सगट । प्रत्यय बोलोनि

करी सपाट ॥ दंडक सांडून नीट । वेधी जना ॥ ९ ॥ प्रत्यय बोलोन उठोन गेला। चटक लागली लोकाला ॥ नाना मार्ग सांडून त्याला । शरण येती ॥ १० ॥ परी तो कोठें आढळेना । कोणे स्थळीं सांपडेना ॥ वेष पाहतां हीनदीना- । सारखा दिसे ॥ ११ ॥ उदंड करी गुप्तरूपें । भिकाऱ्यासारिखा स्वरूपें ॥ तेथें यशकीर्तिप्रतापें । सीमा सांडिली ॥ १२ ॥ ठायीं ठायीं भजन लावी । आपण तेथून चुकावी ॥ मत्सर मतांची गोंवी । लागोंच नेदी ॥ १३ ॥ खनाळामध्यें जाऊन राहे । तेथें कोणीच न पाहे ॥ सर्वत्रांची चिंता वाहे । सर्वकाळ ॥ १४ ॥ अवघड स्थळीं कठीण लोक । तेथें राहणें नेमक ॥ सृष्टीमध्यें सकळ लोक । धुंडीत येती ॥ १५ ॥ तेथें कोणाचें चालेना । अणुमात्र अनुमानेना । कष्ट घालून राजकारणा । लोक लावी ॥ १६ ॥ लोकीं लोक वाढविले । तेणें अमर्याद झाले ॥ भूमंडळीं सत्ता चाले। गुप्तरूपें ॥ १७॥" ( द. १९. स. २ )

**समर्थांची दिनचर्याः-( ई )** "प्रातःकाळीं उठत जावें । प्रातःस्मरण करावें ॥ नित्य नेमें स्मरावें । पाठांतर ॥ ८ ॥ मागील उजळणी पुढें पाठ । नेम धरावा निकट ॥ बाष्कळपणाची बटबट । करूं च नये ॥ ९ ॥ दिशेकडे दुरी जावें । शुचिष्मंत होऊनि यावें ॥ येतां कांहीं तरी आणावें । रितें खोटें॥ १० ॥ धूत वस्त्रें घालावीं पिळून । करावें चरणक्षाळण ॥ देवदर्शन देवार्चन । यथासांग ॥ ११ ॥ कांहीं फळाहार घ्यावा । पुढें व्यवसाय करावा ॥ लोक आपला परावा । म्हणत जावा ॥ १२ ॥ सुंदर अक्षर ल्याहावें । स्पष्ट नेमस्त वाचावें ॥ विवरविवरों जाणावें । अर्थांतर ॥ १३ ॥ नेमस्त नेटकें पुसावें । विशद करून सांगावें॥ प्रत्ययेविण बोलावें । तेंचि पाप ॥ १४ ॥ सावधानता असावी । नीतिमर्यादा राखावी ॥ जनास मान्‍ने ऐशी करावी । क्रियासिद्धि ॥ १५ ॥ आलियाचें समाधान । हरिकथानिरूपण ॥ सर्वदा प्रसंग पाहोन । वर्तत जावें ॥ १६ ॥ बहुतांचें समाधान राखावें । बहुतांस मानेल तें बोलावें ॥ विलग पडों नेदावें । कथेमध्यें ॥ १७ ॥ लोकांस उदंडबाजी आणूं नये । लोकांचें उकलावें हृदये । तरी मग स्वभावें होय । नामघोष ॥ १८ ॥ जैसें बोलणें बोलावें । तैसेंचि चालणें चालावें ॥ मग महंतलीला स्वभावें । अंगीं बाणें ॥ १९ ॥ उदास वृत्तीस मानवे जन । विशेष कथानिरूपण ॥ रामकथा ब्रह्मांड भेदून । पैलाड न्यावी ॥ २० ॥ सांग महंत संगीत जाणें । तेथें वैभवास काय उणें ॥ नभामाजि तारांगणें । तैसे लोक ॥" ( १२. ७. )

समर्थांची शिस्त फार कडक होती तरी भाविक भोळ्या लोकांना ते प्रेमानें जवळ घेत व त्यांच्याकडून वृद्धापकाळीं विडा कुटून घेत. गिरिधरस्वामी म्हणतातः—" थोर थोर महंतांस धारकीं धरिती । श्रीगुरुमर्यादा रक्षविती शिकविती ॥ भाविक भोळ्या लोकांसीं जवळी बैसविती । तांबूल सेवा घेती त्यांचेनि हस्तें ॥" ( स. प्र. ८. १० ). याचें प्रसिद्ध उदाहरण म्हणजे भोळाराम शिष्याचें

होय. भोळाराम ज्या खलबत्त्यांतून समर्थांना विडा कुटून देत असे, तो खलबत्ता कांहीं मत्सरी शिष्यांनीं दडवून ठेवला; तेव्हां भोळारामानें तोंड धुवून स्वमुखाचा खलबत्ता करून विडा कुटून समर्थांना दिला व तो त्यांनीं आनंदानें खाल्ला!! ही आख्यायिका सुप्रसिद्ध आहे. ती पुढें 'अद्भुत गोष्टी' या भागांत आम्ही सविस्तर दिली आहे. समर्थांची शिस्त कडक होती तरी ते प्रसंगविशेषीं दया दाखवीत. याचें एक उदाहरण गिरिधरस्वामींनीं दिलें आहे:—" सज्जनगडीं समर्थाश्रम किंचित् पर्जन्यीं गळाला। शिवरायें दुर्गाधिपत्यासी पर्वतपात आरंभिला॥ समर्थें सेवेसी सेवक मागोनि घेतला। स्वामी क्षमासिंधु दीनबंधु॥" (स. प्र. ८. १३) हुरड्याच्या गोष्टींतील समर्थांनीं आपल्या पाठीवर वळ उठेपर्यंत मारणाऱ्या पाटलास क्षमा करून उलट त्यास हुरड्याचें शेत शिवाजीमहाराजांकडून बाक्षिस देवविल्याचा कथाभाग प्रसिद्धच आहे. प्रसंगविशेषीं समर्थ थोरपणा सोडून क्षुल्लक कामें करून संप्रदायिक शिष्यांना स्वतःच्या आचरणानें धडा शिकवीत असत. याचें एक उदाहरण गिरिधरस्वामींनीं दिलें आहे:—"समर्थें एकदां सेवाप्रेम दाविलें केवळ। कोणासी न कळतां अरुणोदयीं निर्मळ॥ स्वहस्तें झाडोनि काढलें सभास्थळ। दुशाला समार्जनी करूनियां॥ (स. प्र. १८. २८) समर्थ म्हणती रे जो देवद्वार झाडी। तो नर चढे वैकुंठपहाडीं॥ थोरपणें धरतील ते ज्ञाति वेडीं। सर्वी सर्वत्र हें सांगितलें॥ (१८. २९)."

समर्थांना घोड्यावर चांगलें बसतां येत होतें. ६७व्या वर्षी हेळवाक खोऱ्यांत ते आजारी असतांना घोड्यावर स्वार होऊन तेथून चाफळास आल्याबद्दल त्यांचें स्वहस्ताचें पत्रच सांपडलें आहे. शिवाजीमहाराजांनीं त्यांना एक उत्तम घोडा दिला होता. त्याचें नांव समर्थांनीं **रामबाण** ठेविलें होतें. त्यावर समर्थ बसले तेव्हां तो घोडा भरधांव अरण्यांत पळत सुटला. उद्धवस्वामी पाणी घेऊन मागें पळत गेले व वाटेंत उन्हांत समर्थांना तहान लागतांना त्यांनीं पिण्यास पाणी दिलें इत्यादि गोष्ट प्रसिद्ध आहे. विजयादशमीस शिवाजीमहाराज व त्यांचे सरदार समर्थांच्या भेटीस जातांना आपापले घोडे शृंगारून नेत असत. समर्थ कोणातरी एकाच्या घोड्यावर स्वार होत, तेव्हां तो सरदार आपला भाग्योदय आहे असें समजत असे. " समर्थांचा प्रतिवर्षीं शकुन घेती। विजयादशमीसी दर्शनासी येती॥ ज्याचा अभ्युदय त्याच्या अश्वावरी स्वार होती। भोंवतें चालती सरदार॥" (स. प्र. १८२३) समर्थांचे कांहीं महंत मठांत घोडे बाळगीत असत व हल्लीं ही कांहीं मठाधिपतींच्या मठांत घोडे आहेत व ते घोड्यावर बसण्यांत वाकबदार आहेत. समर्थांना पोहतां चांगलें येत होतें. उंब्रजनजीक मांड नदींत महापुरांत एक गरीब मनुष्य बुडून मरत होता, त्याला समर्थांनीं उडी मारून नजीकच्या कृष्णासंगमावर जिवंत बाहेर काढलें (स. प्र. १८. ३४). समर्थसंप्रदायाचें कोणा एका व्यक्तीवर किंवा राजपुरुषावर ओझें नव्हतें. शिष्यांनीं

भिक्षा मागून आपापला योगक्षेम करावा अशी समर्थांची इच्छा होती, एवढेंच नव्हे तर मठ व देवालयें देखील भिक्षेवरच बांधावीं असा त्यांचा कटाक्ष होता. एकदां शिवाजीमहाराजांनीं 'श्रीरामाचें देवालय बांधून देतों' असें म्हटलें, तेव्हां समर्थांनीं दिलेलें उत्तर गिरिधरस्वामी देतात:—"समर्थआज्ञा पुसे शिवराजा। श्री-रघुनाथदेवालय मीं बांधेन ओजा॥ समर्थ म्हणती शिष्य-समुदाय माझा। देवालयें करीन अनंत हस्तें॥" (स. प्र. १९.१६). शिष्यांपाशीं देखील ते स्वत:करितां कांहीं मागत नसत. "आमची प्रतिज्ञा ऐशी। कांहीं न मागावें शिष्यापाशीं॥ (फक्त एक गोष्ट ते शिष्यापाशीं मागत) आपणामागें जगदीशाशीं। भजत जावें॥" (दा. द. १२; स. १३. ३४) समर्थांनीं शिष्यांना भिक्षा मागण्यास सांगितली ती पोट भरण्याकरितां नव्हे. समर्थ म्हणतात:—"भिक्षेनें ओळखी होती। भिक्षेनें भ्रम चुकती॥ स्वतंत्रता ईश्वरप्राप्ती। भिक्षागुणें॥ २॥ नित्य नूतन हिंडावें। उदंड देशाटन करावें॥ तरीच भिक्षा मागतां बरवें। श्लाघ्यवाणें॥ ३॥" (दासबोध द. १४. स. १). दासबोधांतील हा सबंध समास भिक्षानिरूपणावर आहे. भिक्षा कशी मागावी, किती मागावी वगैरे गोष्टी त्यांत सविस्तर सांगितल्या आहेत.

समर्थांची दिनचर्या दासबोधावरून वर दिली आहे. समर्थप्रतापांत निर-निराळ्या अध्यायांत ते कसे बोलत, कसे चालत वगैरे दिलें आहे व तेराव्या अध्यायांत श्रीजानकीदेवीनें श्रीरामांना समर्थांविषयीं कांहीं प्रश्न विचारले, त्या प्रश्नांना दिलेल्या उत्तरांवरून ही समर्थांविषयीं पुष्कळ माहिती मिळते. श्रीजानकी-देवीनें श्रीरामांना ४०-४२ प्रश्न विचारले आहेत. त्यांपैकीं कांहीं प्रश्नांचीं उत्तरें व इतर भागांतील जी माहिती दिली आहे त्यांवरून समर्थांविषयीं कांहीं अधिक माहिती देतों. समर्थांची स्थिति आत्मस्थिति होती, वृत्ति उदासीन होती, अवस्था उन्मनी होती, त्यांना गांवशिव कांहीं नव्हतें, धाम परंधाम होतें, परमान्न भक्षीत होते, अलक्ष परब्रह्म लक्षीत होते, खालीं पाहून पण भराभर चालत, फार थोडें बोलत, सर्वकाळ ध्यानस्थ दिसत, त्यांचा आकाशमार्गी गुप्त पंथ होता, त्यांचें वन आनंदवन होतें व भुवन त्रिभुवन होतें, त्यांची मुद्रा अगोचरी होती, त्यांचें आसन सिद्धासन होतें, उपासना हरिसंकल्प होती, ध्यान श्रीगुरुध्यान व मंत्र तारकब्रह्म होता, नवविधा भजन ते नेहमीं करीत होते, त्यांची ऐक्यभक्ति, सायुज्य मुक्ति व सहजसमाधि होती, समर्थ शिष्यवर्गांत अधिकाराप्रमाणें आपलें समाधान सांगत असत, अवघें ब्रह्मांड त्यांचा मठ होता, भगवगीत ब्रह्मचर्याश्रम त्यांचा आश्रम होता, समर्थ कधीं एके ठिकाणीं फार राहत नसत, त्यांना वनांत व गिरिकंदरांत फिरण्याचा फार नाद असे. गिरिधरस्वामी म्हणतात:—"समर्थांचें एके ठायीं स्नान संध्यावंदन। एके ठायीं फलाहार अथवा भोजन॥ एके ठायीं उदकप्राशन तांबूल चर्वण। विश्रांति शयन एके ठायीं॥" (स. प्र. १८. २) समर्थ दुपारीं थोडी

निद्रा घेत, रात्रीं क्वचित् निद्रा घेत ( स. प्र. १८. ३ ). चाफळास असतांना ते एकांतांत बसत. दूरचे महंत शिष्य भेटण्यास आले म्हणजे त्यांचा परामर्ष घेण्यास बाहेर येत व त्यांना सर्व प्रकारचें वर्तमान विचारीत असत ( स. प्र. २०. ५८ ). " बोलण्यासारिखें चालणें । स्वयें करून बोलणें ॥ "(दासबोध) असा त्यांचा बाणा असे. न्यायनीतीनें वागण्याचा समर्थवाङ्मयांत अनेकदां उपदेश केला आहे. "न्याय-नीति भजन मर्यादा । काळ सार्थक करी सदा ॥ " (दासबोध) समर्थांच्या नीतीच्या उपदेशाबद्दल रे. डेमिंगासाहेब म्हणतात:—" Few Hindu religious movements have set a higher ethical standard than that of the Ramdasis, and all those who have come in personal contact with earnest followers of the Swami testify to their high moral character. This thought we sought to bring out in chapter VI where various references were quoted illustrating the Swami's insistence of purity, unselfishness, truthfulness, sympathy, patience, humility, forgiving spirit, faithfulness to duties and the spirit of happiness. Ramdas himself set the example to his followers and he possessed a noble character." ( Pages 204–210 ). भावार्थ—रामदासी संप्रदायाच्या नीतिमत्तेपेक्षां अधिक श्रेष्ठ नीतिमत्तेचें उदाहरण दुसऱ्या कोणत्या ही हिंदु धार्मिक संप्रदायानें घालून दिलेलें नाहीं. रामदासस्वामींच्या शिष्यांशीं ज्यांचा निकट संबंध आला आहे त्यांची समर्थसांप्रदायिकांच्या श्रेष्ठ नीतिमत्तेविषयीं खात्री झाली आहे. सहाव्या भागांत आम्ही पावित्र्य, स्वार्थत्याग, सत्यप्रियता इत्यादि रामदासी लोकांच्या गुणांचें सविस्तर वर्णन केलें आहे. रामदासांचें आचरण पवित्र होतें व त्यांनीं स्वतः पवित्र आचरणाचा धडा आपल्या संप्रदायांतील लोकांना घालून दिला होता, असें रे. डेमिंग अभिमानपूर्वक म्हणतात.

समर्थसंप्रदायांत लोकापवादास न भितां समर्थांनीं स्त्रियांचा समावेश केला होता. स्त्रीशिष्यांकडून स्त्रीवर्गांत अधिक जागृति होण्याचा संभव आहे हें समर्थांनीं ओळखूनच कांहीं स्त्रियांना त्यांनीं अनुग्रह देऊन आपल्या संप्रदायांत समाजसेवेकरितां घेतलें होतें; यावरून समर्थांचे प्रगतिपोषक विचार दिसून येतात. स्त्रियांसंबंधानें समर्थांचा दंडक मात्र फार कडक असे. गिरिधरस्वामी म्हणतातः—" सहस्रावधि चालती वधुजनें । देवास ओंवाळिती नीरांजनें ॥ स्त्रियादिकांसी दुरूनी देवदर्शनें । नीतिमर्यादा स्वामींची ॥ ( समर्थप्रताप, २०. ३९ ) पुढें समर्थस्वामी आज्ञा करिताती । स्त्रियादिकांसी नीरांजनें वर्जिताती ॥ नाना युगधर्म लौकिक स्थिति । मर्यादा राहिली पाहिजे ॥ ( २०।४० )." समर्थांनीं स्त्रियांना संप्रदायांत घेतलें असें श्रेष्ठांना समजतांना त्यांनीं वडील बंधु या नात्यानें उपदेशार्थ पुढील श्लोक पाठविला:—"तारुण्य-लावण्य-संपन्न नारी । चातुर्यता चंचल चित्तहारी ॥ एकांत

काळीं पडतां संबंधु अभिलाष न करी । तो धन्य साधु ॥ १ ॥ ” समर्थांनीं स्त्रियां-विषयीं किती नीतिमर्यादा ठेविली होती हें वर दिलेल्या समर्थप्रतापांतील उताऱ्या-वरून वाचकांना कळलेंच असेल. श्रेष्ठांच्या श्लोकांस समर्थांनीं पुढील श्लोकबद्ध उत्तर पाठविलें:—“ स्वर्गांगनेसी जरि साम्य आली । तथापि तेथें दृष्टी न घालीं ॥ निजात्मबोधें निःसंगराशी । परंतु आरण्य मिरास त्यासी ॥ १ ॥ ” समर्थ स्वतः बारा वर्षें तपश्चर्या करून बारा वर्षें तीर्थयात्रा करून निःसंग झाले होतेच. परंतु आपल्या सर्व शिष्यवर्गांत ही त्यांनीं नीतिमत्ता किती उत्तम राखिली होती याबद्दल रे. डेमिंग-सारखे परद्वीपस्थ ही समर्थसंप्रदायाची स्तुति करितात याबद्दल त्यांच्या ग्रंथांतील उत्तारा वर दिलाच आहे. हल्लीं राष्ट्रोन्नतीच्या कामांत स्वयंसेविका प्रसंगविशेषीं स्वदेशी व्रतप्रसाराच्या कामीं किती उत्तम काम करितात हें अनुभवानें सिद्ध झालें आहे. तेव्हां समर्थ आपल्या वेळच्या पुढें २५०।३०० वर्षें गेले होते हें दिसून येईल. स्त्रियांना पति हाच गुरु, दुसरा गुरु कशास पाहिजे, अशी शंका कांहीं घेतील, त्यांस गिरिधरस्वामींनीं योग्य उत्तर दिलें आहे:—“ स्त्रियासी कर्म-देह-भर्तार गुरु । तयासी कासयासी व्हावें श्रीगुरू ॥ ऐसें म्हणाल तरी मोक्षार्थ सद्गुरु । बहुतां स्त्रियांही सेविलें ॥ १ ॥ ( समर्थप्रताप, स. ११.३१ ) गार्गी ध्रुवमाता अरुंधती ॥ लीला चुडाला अनुसूया देवहूति ॥ सुलभा मदलसा उमा मिरा मुक्ता मैनावती । उदंड शरण जाती समर्था ॥ २ ॥ ”

समर्थांच्या हयातींत समर्थशिष्य समर्थसंप्रदायाच्या नियमांप्रमाणें जोंपर्यंत वागत होते, तोंपर्यंत समर्थसंप्रदायाचा प्रसार काशीपासून रामेश्वरापर्यंत होत होता. समर्थांचे मागें ही कल्याणस्वामी, दिनकरस्वामीप्रभृति शिष्य व गिरिधर-स्वामी, शिवरामस्वामी, आत्माराममहाराजप्रभृति प्रशिष्य समर्थांच्या चतुःसूत्रीं-तील हरिकथानिरूपणानेंच कां होईना समाजांत धर्मजागृति करून नीतीचा उपदेश करीत होते, तोंपर्यंत नवीन मठ स्थापन होत होते व शिष्यपरंपरा ही वाढत होती. परंतु पुढें सर्व मठाधिपति मठांचीं उत्पन्नें संभाळून नित्य आन्हिक कर्मांतच वेळ घालवूं लागले, तेव्हां मठांना उतरती कळा लागली व आतां कांहीं मठाधिपति सामान्य लोकांप्रमाणें कोर्टांत जाऊन भांडूं लागल्यापासून मठाधिपतींविषयीं लोकांचा आदर नाहींसा झाला आहे. हल्लीं सज्जनगड, डोमगांव, तिसगांव व टाकळी, बीड, तंजावर वगैरे ठिकाणीं लोक जे आस्थापूर्वक जातात ते समर्थ, कल्याणस्वामी, दिनकरस्वामी, उद्धवस्वामी, गिरिधरस्वामी, भीम-स्वामीप्रभृति महात्म्यांच्या समाधींच्या दर्शनाकरितां, त्या महात्म्यांच्या संचारानें पवित्र झालेलीं स्थळें पाहण्याकरितां, त्या मठांमध्यें समर्थकृत अगर समर्थशिष्यकृत कांहीं नवीन ग्रंथ मिळतात कीं काय हें पाहण्याकरितां, कांहीं नवीन मठांचा अगर शिष्यांचा शोध लागतो कीं काय हें पाहण्याकरितां, कांहीं नवीन ऐतिहासिक पत्रें

मिळतात कीं काय हें पाहण्याकरितां जातात. हल्लींच्या परिस्थितींत राजकारणांत—नेमस्त राजकारणांतसुद्धां—भाग घेतल्यास त्यांचीं उत्पन्नें कदाचित् राहणार नाहींत, म्हणून त्यांना राजकारणांत पडण्याचा सल्ला कोणी देणार नाहीं हें उघड दिसतें. परंतु धर्मग्रंथांचें व समर्थवाङ्मयाचें उत्तम अध्ययन व परिशीलन करून व ब्रह्मचारीपरंपरा असल्यास धगधगीत ब्रह्मचर्य व गृहस्थाश्रमी असल्यास कडकडीत एकपत्नीव्रत पाळून, विद्वत्ता व उत्तम चारित्र्य या गुणांनीं मंडित होऊन लोकांना आदर्शभूत, आदरणीय, वंद्य विभूति होऊन समाजांत कीर्तनप्रवचनद्वारां नीतिशिक्षण दिल्यास समाजसेवा केल्याचें श्रेय त्यांना मिळेल.

## " रामदासी संप्रदायाची पुनरावृत्ति "

श्री. शंकर कृष्ण देव यांनीं 'रामदासी संप्रदायाची पुनरावृत्ति' या विषयावर एक उद्बोधक लेख शके १८३२ सालीं 'रामदास आणि रामदासी' या मालेच्या दुसऱ्या भागाच्या प्रस्तावनेंत लिहिला आहे. त्यांत ते म्हणतात:—"गेल्या पांचपन्नास वर्षांत आपल्या महाराष्ट्रांत पांचपंचवीस नवीन संप्रदाय उदयास आले होते असें आढळून येईल. पैकीं कांहींचा उदय आणि अस्त एकाच काळीं झाले. कांहीं कांहीं काळ राहून लयास गेले व कांहीं लयाला जाण्याची हल्लीं वाट पहात आहे. कायमचें बीजारोपण असें फक्त तीनच संप्रदायांचें झालेलें दिसतें." या तीन नवीन संप्रदायांस श्री. देव यांनीं पुढील तीन नांवें दिलीं आहेत:—( १ ) जिज्ञासु, ( २ ) चिकीर्षु व ( ३ ) ऐतिहासिक. "पहिला संप्रदाय प्राचीन विद्या आणि नीति यांचें ज्ञान करून देतो, दुसरा संप्रदाय झालेलें ज्ञान कृतींत करून देतो व तिसरा संप्रदाय ती कृति कां आणि कोणासाठीं करावयाची हें शिकवितो. पहिल्या संप्रदायांत स्वधर्माचें शिक्षण मिळतें, दुसऱ्या संप्रदायानें स्वधर्म व स्वदेश यांची सेवा घडते व तिसऱ्याच्या योगानें स्वदेशावर प्रेम जडतें. पहिला संप्रदाय ज्ञानाचा, दुसरा कृतीचा व तिसरा देशसेवेचा. अशा या तीन संप्रदायिकांपैकीं एका किंवा अनेक संप्रदायांची दीक्षा प्रत्येक विचारी महाराष्ट्रीयानें घेतलीच पाहिजे." (प्रस्तावना, पानें २—६). गेल्या पांचपन्नास वर्षांत उदयास येऊन लयास गेलेल्या महाराष्ट्रांतील संप्रदायांचीं नांवें श्रीयुत देव यांनीं दिलीं नाहींत. त्याचप्रमाणें महाराष्ट्रांत स्थिर झालेल्या तीन संप्रदायांचीं ही नांवें त्यांनीं दिलीं नाहींत. परंतु वरील तीन संप्रदायांचें जें वर्णन त्यांनीं केलें आहे, त्यावरून सदरहू तीन संप्रदाय धर्म, नीति व स्वदेशप्रीति यांचें ज्ञान महाराष्ट्रीयांस व्हावें याकरितां उदयास आले असें म्हणण्याचा श्रीयुत देव यांचा आशय दिसतो. मुंबई विश्वविद्यालय स्थापन झाल्यावर जे विद्वान् पदवीधर सदर विश्वविद्यालयांतून बाहेर पडले, त्यांनीं प्राश्चात्य देशांतील इतिहासाचें अध्ययन केलें होतें; मिल, कार्लाइल, फ्रँकलिन, बर्क, रूसो,

मॅझिनीप्रभृतींचे ग्रंथ त्यांनीं वाचले होते, तेव्हां इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका, इटली-प्रभृति देशांत राष्ट्रोन्नतीकरितां व स्वातंत्र्यप्राप्तीकरितां जसे प्रयत्न झाले, तसे आपल्या देशांत ही राष्ट्रोन्नतीकरितां व स्वातंत्र्यप्राप्तीकरितां प्रयत्न करावेत असें मुंबई विश्वविद्यालयांतून बाहेर पडलेल्या विद्वान् पदवीधरांना वाटणें साहजिक आहे. व्यक्तिविषयक प्रयत्नांपेक्षां संस्था स्थापून सामुदायिक प्रयत्न केल्यास अधिक यश येईल म्हणून त्यांनीं धार्मिक, सामाजिक व राजकीय उन्नतीकरितां महाराष्ट्रांत निरनिराळ्या संस्था स्थापन केल्या. या संस्थांना उद्देशूनच श्रीयुत देव यांनीं ' रामदास आणि रामदासी 'च्या दुसऱ्या भागांत ' श्रीसमर्थांचीं दोन जुनीं चरित्रें ' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत वर नमूद केलेल्या तीन नवीन संप्रदायांविषयीं विवेचन केलें आहे. श्रीयुत देव सदर प्रस्तावनेंत पुढें म्हणतातः—" हल्लीं महाराष्ट्रांत ज्या संस्था, चळवळी व उत्सव अस्तित्वांत आहेत, ते सर्व वरील संप्रदायांपैकीं कोणत्या एका किंवा अनेक संप्रदायांत मोडतात असें विचारांतीं आढळून येईल. महाराष्ट्राप्रमाणें हिंदुस्थानांतील इतर प्रांतांत ही विश्वविद्यालयें स्थापन होऊन विद्वान् पदवीधर बाहेर पडले होते. त्यांनीं ही आपल्या प्रांतांत धार्मिक, सामाजिक व राजकीय उन्नतीकरितां संस्था, चळवळी व उत्सव स्थापन केले. नंतर कांहीं वर्षांच्या अनुभवानें सर्व हिंदुस्थानच्या राजकीय उन्नतीकरितां सन १८८५त एकच राष्ट्रीय सभा स्थापन झाली. व कांहीं वर्षे राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाच्या ठिकाणींच राष्ट्रीय सामाजिक परिषद ही भरत होती. धार्मिक उन्नतीकरितां प्रांतांत निरनिराळ्या संस्था उत्पन्न झाल्या, व अलीकडे औद्योगिक उन्नति, व्यापारविषयक उन्नति, यांकरितां निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळ्या संस्था स्थापन झाल्या आहेत. कांहीं प्रांतांत विशिष्ट जातींच्या उन्नतीकरितां ही कांहीं जातिविषयक शैक्षणिक संस्था अलीकडे उत्पन्न झाल्या आहेत. पुणें येथें श्रीमंत सयाजीराव गाइकवाड यांनीं एका भाषणांत म्हटल्याप्रमाणें जातिविषयक संस्था आपल्या जातीची उन्नति झाल्यावर राष्ट्रीय हितवर्धक संस्थांतच लय पावतील तर देशाचें हित होणार आहे.

आम्हीं वर नमूद केलेल्या राष्ट्रीय, प्रांतिक व जातिविशिष्ट संस्थांचा अंतर्भाव श्रीयुत देव यांच्या वरील तीन संप्रदायांत होईल असें आम्हांस वाटतें. श्रीयुत देव म्हणतातः—" हल्लीं महाराष्ट्रांत ज्या संस्था, चळवळी किंवा उत्सव अस्तित्वांत आहेत ते सर्व वरील संप्रदायांपैकीं कोणत्या एका किंवा अनेक संप्रदायांत मोडतात असें विचारांतीं आढळून येणार आहे. " श्री. देव महाराष्ट्रासंबंधीं जें म्हणतात तें हिंदुस्थानांतील इतर प्रांतांस ही लागू पडेल असें आम्हांस वाटतें. समर्थांनीं राष्ट्रोद्धाराकरितां स्थापन केलेल्या संस्थेस मठ ही संज्ञा मिळाली होती. हल्लीं राष्ट्रोद्धाराकरितां स्थापन केलेल्या संस्थांना सभा, समाज, संघ, समिति, विद्यालय, कार्यालय, विद्यापीठ, मंदिर इत्यादि निरनिराळीं नांवें देण्यांत आलीं आहेत. समर्थकालीं

महंत व शिष्य गांवोगांवीं हिंडून कोरडी भिक्षा मागून मठाचें कार्य करीत असत. हल्लींचे पुढारी व अनुयायी शहरांत हिंडून व क्वचित् प्रसंगीं खेड्यांत हिंडून वर्गणी जमा करून सभा, समाज, संघ इत्यादि अनेक संस्थांचें कार्य करीत आहेत. समर्थांच्या महंतांमध्यें व शिष्यांमध्यें ब्रह्मचारी व गृहस्थाश्रमी या दोन्ही आश्रमांतील लोकांचा भरणा होता, परंतु निस्पृह अगर ब्रह्मचारी महंतांना अर्थातच बहुजन समाज अधिक मान देई. हल्लींच्या निरनिराळ्या संस्थांमध्यें गृहस्थाश्रमी लोकांचा विशेष भरणा आहे. श्री. विनायकमहाराज मसूरकर यांनीं धर्मप्रसारार्थ काढलेल्या आश्रमांत बहुतेक सर्व ब्रह्मचारी आहेत. परंतु असले आश्रम केवळ अपवादात्मक मानतां येतील. बहुतेक सर्व धार्मिक, सामाजिक, राजकीय, शैक्षणिक संस्थामध्यें गृहस्थाश्रमी लोकांचाच भरणा विशेष. हल्लींच्या राष्ट्रोद्धारार्थ स्थापना झालेल्या सर्व संस्थांत सभासद होण्यास अठरा वर्षें पूर्ण होण्याची अट असते. समर्थकालीं अट नव्हती. तेव्हां १८ वर्षांखालील तरुण ब्रह्मचारी मंडळींना ही समर्थसंप्रदायांत जातां येत असे. कांहीं काल गेल्यानंतर परीक्षा करून अशा तरुण ब्रह्मचारी मंडळींतूनच समर्थ महंत निवडीत असत. कालमानाप्रमाणें समर्थकालीन मठांच्या आश्रमांच्या व्यवस्थेंत व हल्लींच्या निरनिराळ्या संस्थांच्या व्यवस्थेंत परिस्थित्यनुरूप कांहीं फेरबदल होणें साहजिकच आहे. परंतु समर्थकालीन मठांच्या व हल्लींच्या निरनिराळ्या संस्थांचा अंतिम उद्देश एकच आहे, तो उद्देश म्हणजे राष्ट्राची सर्वांगीण उन्नति करणें हा होय. म्हणून हल्लींचे तीन संप्रदाय (१) जिज्ञासु, (२) चिकीर्षु व (३) ऐतिहासिक मिळून पूर्वींचा श्रीसमर्थांचा रामदासी संप्रदाय होय असें श्री. देव म्हणतात तें यथार्थ आहे असें आम्हांस वाटतें. समर्थसंप्रदाय व हल्लींचे तीन नवीन संप्रदाय यांचे उद्देश एकच असले तरी दोन्ही संप्रदायांमध्यें एक विशेष आहे. तो हा कीं, समर्थसंप्रदायामध्यें हरिकथानिरूपणाला म्हणजे भगवंताच्या अधिष्ठानाला आद्यस्थान होतें व नंतरचें महत्त्वाचें दुसरें स्थान राजकारणाला होतें. हल्लींच्या राजकीय, सामाजिक व शैक्षणिक संस्थांमध्यें आद्यस्थान राजकारणाला व विद्यार्जनाला आहे. भगवंताच्या अधिष्ठानाला हल्लींच्या नवीन संप्रदायांत प्राय: स्थानच नाहीं. प्राय: म्हणण्याचें कारण कांहीं शिक्षणसंस्थांमध्यें अलीकडे प्रारंभीं ईशप्रार्थना करण्यांत येते व भगवद्गीता, तुकारामांचे अभंग, समर्थांचे मनाचे श्लोक अथवा मनोबोध इत्यादि धार्मिक ग्रंथांना ही मान मिळूं लागला आहे. मिशनरींनीं स्थापलेल्या शिक्षणसंस्थांमध्यें प्रथम अर्धा तास बायबल शिकविण्यांत येतें, परंतु हिंदूंनीं स्थापन केलेल्या शिक्षणसंस्थांमध्यें प्रथम अर्धा तास गीता अगर मराठी साधुसंतांचे ग्रंथ शिकवण्यांत येत नाहींत. एकादा अपवाद सांपडेल. पूज्य पंडित मदनमोहन मालवीय यांनीं स्थापन केलेल्या बनारस (काशी) येथील हिंदु विश्वविद्यालयांत प्रथम अर्धा तास हिंदी भाषेंत भगवद्गीता शिकवितात. महात्मा गांधींच्या आश्रमांत

पहाटे चार वाजतां ईशप्रार्थना करितात, तळेगांव येथील नवीन समर्थ विद्यालयांत दररोज अर्धा तास प्रातःस्मरण करण्यांत येतें. महात्मा गांधींच्या नेतृत्वाखालीं स्थापन झालेल्या कांहीं आश्रमांत व कांहीं राष्ट्रीयशिक्षण शाळांत ही ईशप्रार्थना व प्रातःस्मरण करण्यांत येतें. वर लिहिलेले कांहीं अपवाद सोडल्यास राष्ट्रोन्नतीकरितां स्थापन झालेल्या निरनिराळ्या संस्थांमध्यें समर्थांच्या संप्रदायाप्रमाणें भगवंताच्या अधिष्ठानाकडे विशेष लक्ष्य दिलें जात नाहीं.

आतां यावर असा आक्षेप घेण्यांत येईल कीं, समर्थकालीं समर्थांनीं देशोद्धारार्थ स्थापना केलेल्या संस्थांमध्यें म्हणजे समर्थमठांमध्यें महंत, शिष्य व अनुयायी सर्व सनातन हिंदुधर्माचे होते. सनातन धर्माचेच लोक आपल्या संप्रदायामध्यें घेण्यांत समर्थांचा विशिष्ट हेतु होता असें कै. राजवाडे म्हणतातः—" लोकोद्धारणेचा निश्चय झाल्यावर फक्त सनातनधर्मीयांचाच तेवढा उद्धार करण्याचा मर्यादित व आटोपशीर प्रयत्न समर्थांनीं पसंत केला; जुलूम करणारा राज्यकर्ता समाज व त्याला साहाय्य करणारे देशीविदेशी अल्पसंख्याक समाज यांचें सनातनधर्मीयांशीं सख्य उत्पन्न करण्याच्या अस्वाभाविक खटपटींत ते पडले नाहींत. हितसंबंध व मनोरचना ज्यांच्या स्वभावतः प्रतिरोधी, त्यांच्या ठायीं सख्यबुद्धि उपजवूं पाहणें परम असमंजस आहे अशी समर्थांची बालंबाल खात्री होती." (रामदास आणि रामदासी, भाग १५, लेखांक ४४, पान २६८) २५० वर्षांपूर्वींची परिस्थिति व हल्लींची परिस्थिति एकसारखी नाहीं. बदललेल्या परिस्थितीप्रमाणें राष्ट्रोद्धाराच्या प्रयत्नांत फरक करणें क्रमप्राप्त आहे. स्वतः शिवाजीमहाराज हल्लीं अवतरले तरी ते आतां स्वराज्यप्राप्तीकरितां तोरणा किल्ला हस्तगत करण्याचा प्रयत्न करणार नाहींत व स्वतः समर्थ रामदासस्वामी हल्लीं अवतरले तरी ते आतां स्वराज्याची उत्कट भावना बहुजन समाजामध्यें उत्पन्न करण्याकरितां केवळ हनुमंतजयंती व रामजयंतीच्या उत्सवानें पूर्वीप्रमाणें यशस्वी कार्यभाग होईल म्हणून फक्त तेवढाच प्रयत्न करून स्वस्थ बसणार नाहींत. राष्ट्रोद्धार हा हेतु एकच पण बदललेल्या परिस्थितीप्रमाणें राष्ट्रोद्धार करणाऱ्या राष्ट्रनेत्यांना चातुर्यानें व मुत्सद्देगिरीनें साधनमार्ग थोडेफार बदलावे लागतात. त्याप्रमाणेंच हल्लींच्या राष्ट्रोद्धारकांचा इष्ट हेतु व उद्देश तोच पूर्वींचा राष्ट्रोन्नति हा असला तरी राष्ट्रोन्नतीचे मार्ग बदलावे लागतील. हल्लींच्या सुशिक्षितांमध्यें जिज्ञासु, चिकीर्षु व ऐतिहासिक असे तीन नवीन संप्रदाय आहेत व ते तीन मिळून पूर्वींचा श्रीसमर्थांचा ' रामदासी संप्रदाय ' होय असें जें श्री. देव म्हणतात तें यथार्थ आहे असें आम्हीं वर म्हटलेंच आहे. परंतु हल्लींच्या राष्ट्रोन्नतीच्या भारतीय संस्थाचालकांना ' रामदासी संप्रदाय' हें नांव पसंत पडणार नाहीं, एवढेंच नव्हे तर खुद्द महाराष्ट्रांतील ही कित्येक महाराष्ट्रीय चालकांना ' रामदासी संप्रदाय ' हें नांव संमत होणार नाहीं हें आम्ही जाणून आहों. नामाभिधानाबद्दल आमचा कोणत्या ही प्रकारचा आग्रह नाहीं.

(१) धर्मकारण, (२) राजकारण, (३) सर्वसावधपण व (४) अत्यंत साक्षेप म्हणजे उद्योग-प्रयत्न या रामदासी संप्रदायांतील चतुःसूत्रीचा राष्ट्रोद्धारक संस्थांमध्यें अंतर्भाव झाल्यास कोणतें ही नांव ठेवलें तरी चालेल. एका आंग्ल ग्रंथकारानें म्हटल्याप्रमाणें " The rose is a rose, by whatever name you call it. " भावार्थ—गुलाबाच्या फुलाला कोणतें ही नांव ठेवलें तरी त्याच्या नैसर्गिक सौंदर्याला व सुवासिकपणाला बाध येणार नाहीं. त्याचप्रमाणें राष्ट्रोन्नतीला आवश्यक असणाऱ्या वर नमूद केलेल्या समर्थसंप्रदायांतील मुख्य चार गोष्टींचा समावेश कोणत्या ही संस्थेच्या कार्यक्रमांत झाल्यास त्या संस्थेस कोणतें ही नांव दिल्यास हरकत नाहीं. महाराष्ट्रांतील सुशिक्षित लोक, विशेषतः ब्राह्मण व क्षत्रिय समाजांतील सुशिक्षित लोक, धर्मभावनेनें राष्ट्रोन्नतीच्या कामांत पडत नाहींत असें आम्हांस महाराष्ट्रांतील दहा जिल्हे व शंभर तालुके यांमध्यें प्रचारकामाकरितां केलेल्या प्रवासांत आढळून आलें आहे. पन्नास वर्षांपूर्वींपेक्षां हल्लीं लोकजागृति अधिक झाली आहे ही गोष्ट खरी आहे. परंतु खेड्यापाड्यांतील लोकांना आपलें कर्तव्य नीट समजावून बहुजन समाजास योग्य व न्याय्य मार्ग दाखवून स्वकर्तव्यदक्ष करण्यास सुशिक्षित ब्राह्मण व क्षत्रिय पुढारी मनःपूर्वक प्रयत्न करीत नाहींत असें आम्हांस वाटतें. कै. ना. गो. कृ. गोखले यांचें कोल्हापूर येथें राजारामिअन सम्मेलनांत सन १९०४ मध्यें एक व्याख्यान झालें होतें. त्या वेळीं 'सुशिक्षितांचीं कर्तव्यें' या विषयावर बोलतांना कै. गोखले म्हणाले:—" Can you lay your hands on your breast and honestly say that you have performed your duty towards your country ? " भावार्थः—'आपल्या छातीवर हात ठेवून आम्हीं आपलें देशासंबंधीं योग्य कर्तव्य केलें आहे असें आपण प्रामाणिकपणानें म्हणाल काय?' जो प्रश्न तीस वर्षांपूर्वी कै. गोखले यांनीं कोल्हापूर येथील सुशिक्षितांना केला, तोच प्रश्न हल्लीं महाराष्ट्रांतील सर्व सुशिक्षितांना—नव्हे सर्व हिंदुस्थान देशांतील सुशिक्षितांना—केला तर त्याचें उत्तर ते काय देतील? तीस वर्षांपेक्षां हल्लीं राष्ट्रोन्नतीविषयीं अधिक लोकजागृति झाली आहे हें जरी खरें असलें तरी त्याचें मुख्य श्रेय देशांतील सर्व सुशिक्षित लोकांना नाहीं. राष्ट्रोन्नतीच्या सर्व प्रकारच्या चळवळींत, राजकीय, सामाजिक, धार्मिक, औद्योगिक, व्यापारविषयक चळवळींत सर्व सुशिक्षित लोक धर्मभावनेनें पडले असते तर राष्ट्रोन्नतीच्या कार्यास निराळें स्वरूप आलें असतें. शेतकरी लोकांनीं दिलेल्या करावर चाललेल्या शिक्षणसंस्थांतून ब्राह्मण, क्षत्रिय, मराठे, वैश्य पदवीधर बाहेर पडतात; परंतु शेतकरी लोकांच्या उन्नतीकडे लक्ष न देतां सदर्हू पदवीधरांपैकीं बहुतेक नोकरीच्या पाठीमागें लागण्यांत धन्यता मानतात. ज्यांना नोकरी मिळणें शक्य नाहीं ते वाकिली, वैद्यकी ( डॉक्टरी ) करण्यांत इतिकर्तव्यता मानतात. कित्येक पदवीधर परदेशी मालाचे दलाल होण्यांत स्वर्गसुख मानतात. नोकरवाल्या

सुशिक्षितांपेक्षां बाकीच्या धंद्यांतील सुशिक्षितांना आपला धंदा संभाळून बरींच राष्ट्रोन्नतीचीं कामें करतां येतील; परंतु दुर्दैवाची गोष्ट ही कीं, हल्लींच्या भिक्षेकरी-सांप्रदायिकांप्रमाणें ते ही आपला धंदा संभाळून उरलेला वेळ त्यांच्याप्रमाणें व्यसनांत व चैनींत घालवितात. सुदैवाची गोष्ट ही कीं, वरील गोष्टीस शेंकडा १०–१५ अपवाद आढळून येतात व म्हणूनच निरनिराळ्या धार्मिक, सामाजिक, राजकीय व औद्योगिक संस्था कशा तरी जीव धरून चालल्या आहेत. सर्व सुशिक्षित धंदेवाल्यांनीं वरील संस्थांमध्यें स्वार्थत्यागपूर्वक व अंतःकरणपूर्वक उत्कट रीतीनें भाग घेतल्याशिवाय राष्ट्रोन्नतीचा इष्ट हेतु लवकर सफल होणार नाहीं. 'आजमितीस हे तीन नवीन संप्रदाय बाल्यावस्थेंत आहेत. नदीच्या उगमाप्रमाणें लहान आहेत,' असें श्री. देव २०।२५ वर्षांपूर्वीं बोलले. पाव शतकाचा काल होऊन गेला तरी या तीन नवीन संप्रदायांची बाल्यावस्था जाऊन त्यांना प्रौढावस्थ प्राप्त झाली नाहीं व त्यांचा प्रवाह नदीच्या उगमाजवळील प्रवाहाप्रमाणेंच अद्यापि लहान आहे. त्या प्रवाहांत नवचैतन्याचें उदक घालून त्यास मुखाजवळील विशाल व भव्य प्रवाहाचें प्रचंड स्वरूप आणणारा कोणीतरी समर्थ–महात्मा–मिळेल तोच सुदिन.

जुने संप्रदाय मोडून नवीन स्थापन केल्यास त्यावर भरतभूमींतील लोकांचा विश्वास बसणार नाहीं. जुन्या संप्रदायांतच परिस्थितीप्रमाणें फरक करून त्यांच्यामध्येंच नवचैतन्य उत्पन्न करावें असें श्रीयुत देव म्हणतात तें आम्हांस ही मान्य आहे. ही जबाबदारी सर्वस्वीं सुशिक्षित लोकांवर आहे. बहुजनसमाजामध्यें शिक्षणाचा प्रसार करून त्यांच्यामध्यें शिवसमर्थकालाप्रमाणें कर्तव्यजागृति उत्पन्न करणें हें त्यांचें पवित्र कर्तव्य आहे व तें पवित्र कर्तव्य त्यांनीं करून या आर्यभूमीला तिचें गतवैभव प्राप्त करून द्यावें अशी आमची सर्व सुशिक्षितांना–विशेषतः ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य सुशिक्षितांना–नम्र विनंति आहे.

# भाग १०

# समर्थांचें राजकारण

पंधरावें लक्षण तें राजकारण । सोळावें तें जाण अन्यग्रता ॥

( समर्थ-संप्रदायाचीं लक्षणें )

मुख्य हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण ॥

( दासबोध, ११. ५. ५ )

'समर्थांचें राजकारण' (मुख्य हरिकथानिरूपण ) इत्यादि विषयाचें विवेचन करण्यापूर्वी 'राजकारण' या सामासिक शब्दाचा काय अर्थ होतो याविषयीं आम्ही प्रथम विवेचन करणार आहों. कारण 'राजकरण' या शब्दाचा अगदीं संकुचित अर्थ करून कांहीं विद्वान् पदवीधर समर्थ राजकारणी संत नव्हते, फक्त भक्तिमार्गी संत होते, असें सिद्ध करण्याचा प्रयत्न करूं लागले आहेत.

राजकारण हा शब्द अर्वाचीन आहे. प्राचीन ग्रंथांत तो शब्द आढळून येत नाहीं. हल्लीं राजकारणाचा जो प्रचलित अर्थ आहे, त्याअर्थीं पूर्वी राजधर्म, राजनीति, अर्थशास्त्र इत्यादि शब्दांचा उपयोग प्राचीन ग्रंथकार करीत असत. महाभारतांतील शांतिपर्वांत भीष्मांनीं धर्मराजांस राज्यप्रकरणासंबंधीं केलेल्या उपदेशास 'राजधर्म' असें नांव दिलें आहे. शांतिपर्वांत 'राजधर्म' हें १३० अध्यायांचें एक उपपर्व आहे. त्यांत राजनीति, राजधर्म, क्षत्रियधर्म, अमात्यपरीक्षा, चातुर्वर्ण्य, मित्रामित्रपरीक्षा, राष्ट्रगुप्तिप्रकारादि कथन, करग्रहण, योधलक्षणकथन, युद्धस्य धर्म्यसमर्थन, राज्यप्राप्त्यादिकथन, साचिवादिगुणत्व-वर्णन, भृत्यलक्षणकथन इत्यादि अनेक विषयांचें विवेचन केलें आहे. यावरून महाभारतकारांच्या मतें राजधर्मामध्यें म्हणजे राजकारणामध्यें निरनिराळ्या अनेक विविध विषयांचा अंतर्भाव होतो हें वाचकांना कळून येईल. दुसरा राजनीति-शास्त्रावरील प्राचीन ग्रंथ कौटिलीय अर्थशास्त्र हा आहे. हा ग्रंथ चाणक्यांनीं लिहिला आहे. त्यांना विष्णुगुप्त व कौटिल्य अशीं ही दुसरीं दोन नांवें होतीं. कौटिल्यांनीं आपला अर्थशास्त्र ग्रंथ राजाकरितां लिहिला होता. "कौटिल्येन नरेंद्रार्थे । शासनस्य विधिः कृतः ।" ( अधिकरण २, अध्याय १० ) म्हणजे कौटिल्यांनीं राजाकरितां राजनीतिशास्त्रावर ग्रंथ लिहून त्यास 'अर्थशास्त्र' हें नांव दिलें असें स्वतः ग्रंथकारच म्हणतात. या ग्रंथाच्या पूर्वार्धांत चार अधिकरणें असून त्यांत नव्वद अध्याय आहेत. त्यांत प्रतिपादन केलेले विषय पाहिले असतां

राजकारण ऊर्फ राजनीतिशास्त्र किती व्यापक आहे हें वाचकांना दिसून येईल. त्यामध्यें अर्थशास्त्र, दंडनीति, राजवर्तन, राजदिनचर्या, अमात्य, मंत्री, पुरोहित यांची नेमणूक, हेरांची योजना, दुर्गरचना, कोशागार, कोठीकामगार, आयुधागाराध्यक्ष, पण्याध्यक्ष, गोपाध्यक्ष, अश्वशाला, हत्तिशाळा व पायदळ यांवरील अधिकारी व सेनापती, जमाबंदीवरील अधिकारी, समाजकंटकाचा बंदोबस्त इत्यादि राज्यासंबंधीं विविध विषयांचें विवेचन केलें आहे.

'राजकारण' या शब्दाच्या हल्लींच्या रूढ अर्थी इंग्रजी भाषेंत politics या शब्दाचा उपयोग करितात. Politics या शब्दाची थोडक्यांत व्याख्या sciene and art of government, affairs of state, political principles याप्रमाणें इंग्रज ग्रंथकार करतात; म्हणजे राजकारणाचा अर्थ राज्यशासनाचें शास्त्र व कला, राज्याचा कारभार अगर राज्यव्यवस्था, राज्यशास्त्राचीं तत्त्वें असा होतो. प्रो. सिजविकचें *Elements of Polttics*, सर जॉन सीलेचें *Introduction to Political Science*, लीकॉकचें *Elements of Political Science*, प्रो. लास्कीचें *Grammar of Politics* इत्यादि इंग्रजी वाङ्मयांतील politics म्हणजे राजनीतिशास्त्र अगर राजकारणशास्त्र याबरील ग्रंथ पाहिले म्हणजे ही राजकारणामध्यें किती विविध विषयांचा समावेश होतो, राजकारणाची व्याख्या किती व्यापक असते, हें वाचकांच्या लक्ष्यांत येईल. सैन्य तयार करणें, सैन्य घेऊन शत्रूवर चाल करून किल्ले सर करणें, समरांगणावर पराक्रमाचीं कृत्यें करून जय मिळविणें, या गोष्टींचा जसा राजकारणशास्त्रांत अंतर्भाव होतो, तसा सैन्यांत जाण्याविषयीं लोकांचीं मनें वळविणें, आळशी, दैववादी व परतंत्र लोकांना 'यत्न तो देव जाणावा' असा उपदेश करून स्वकर्तव्यदक्ष करणें, 'कष्टेंविण फळ नाहीं। कष्टेंविण राज्य नाहीं ॥ केल्याविण होत नाहीं। साध्य जनीं ॥' असा उपदेश करून स्वराज्यप्राप्तीच्या उद्योगास लोकांना प्रवृत्त करणें इत्यादि गोष्टींचा ही राजकारणांत अंतर्भाव होतो.

प्राचीन व अर्वाचीन राष्ट्रांच्या इतिहासावरून असें दिसून येतें कीं, जेव्हां एकाद्या राष्ट्राचा उदय होतो अथवा एखादें परतंत्र राष्ट्र परराज्याचें जूं झुगारून देऊन स्वतंत्र होतें, तेव्हां त्या राष्ट्राच्या उदयास अगर स्वातंत्र्यप्राप्तीस समरांगणावरील देशाभिमानी योद्ध्यांचा पराक्रम जसा कारणीभूत होतो, तसे देशाभिमानी लोकांचे चैतन्ययुक्त लेख व देशाभिमानी मुत्सद्यांचे धूर्त प्रयत्न ही कारणीभूत होतात. उदाहरणार्थ, आपण यूरोपखंडांतील इटली हा देश घेऊं. ६०–७० वर्षांपूर्वी इटली देश परतंत्र होता. ऑस्ट्रिया देशाचें जूं त्याच्या मानेवर होतें. इटलीस स्वातंत्र्य प्राप्त करून देण्यास मॅझिनी, गॅरिबॉल्डी, काव्हूर या तीन इटॅलियन देशभक्तांचे प्रयत्न कारणीभूत झाले आहेत. मॅझिनीनें आपल्या चैतन्ययुक्त लेखांनीं इटलींतील लोकांचीं मनें स्वातंत्र्यप्रवर्तक केलीं, गॅरिबॉल्डीनें आपल्या बाहुबलानें

रणक्षेत्रावर जय मिळविले, काव्हूरनें आपल्या चातुर्यानें व मुत्सद्देगिरीनें युरोपखंडांतील देशांतील परराष्ट्रांशीं राजकारणाचे डाव खेळून व्हिक्टर इमॅन्युएल यास सर्व इटली देशाचें स्वतंत्र राज्यपद दिलें. कित्येक इतिहासकार इमॅन्युएल राजाची ही इटालीच्या राष्ट्रोद्धारकांमध्यें गणना करितात. यावरून सन १८७१ सालीं रोम ही स्वतंत्र इटली देशाची राजधानी होऊन पुष्कळ वर्षें परदास्यांत खितपत पडलेल्या इटली देशास जें पूर्ण स्वातंत्र्य मिळालें, त्याला पुष्कळ निरनिराळ्या देशभक्त लोकांचे प्रयत्न कारणीभूत झाले होते हें वाचकांस दिसून येईल. त्याचप्रमाणें सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांत पुष्कळ वर्षें परदास्यांत खितपत पडलेल्या महाराष्ट्रास जें स्वातंत्र्य मिळालें, त्यास ही अनेक विभूतींचे प्रयत्न कारणीभूत झाले आहेत. कै. न्या. म. गो. रानडे यांनीं आपल्या '*Rise of the Maratha Power*' 'मराठी सत्तेचा उत्कर्ष' या पुस्तकांत या प्रयत्नांचें मार्मिक वर्णन केलें आहे. हे स्वराज्यप्राप्तीचे प्रयत्न निरनिराळ्या दिशांनीं तीनचार शतकें चालले होते. वारकरी-पंथाच्या पवित्र इमारतीवर तुकाराममहाराजांनीं कळस चढविला असें वारकरी-संप्रदायांतले लोक अभिमानानें सांगत असतात व तें खरें आहे. परंतु कळस चढविण्याचें श्रेय जरी तुकाराममहाराजांस आहे, तरी तत्पूर्वीं त्या इमारतीचे इतर भाग तयार करण्याच्या कामीं ज्ञानेश्वर, नामदेव व एकनाथप्रभृति साधुसंतांचे प्रयत्न ही कारणीभूत झाले, ही गोष्ट ही वारकरी लोक तितक्याच अभिमानानें सांगतात. वारकरी पंथाच्या भव्य इमारतीवर शिवाजीमहाराजांनीं शके १५९६ सालीं रायगडावर राज्याभिषेक करवून घेऊन कळस चढविला ही गोष्ट खरी आहे; परंतु तत्पूर्वीं त्या इमारतीचे इतर भाग तयार करण्याच्या कामीं ही अनेक विभूतींचे प्रयत्न कारणीभूत झाले आहेत असें कै. न्या. रानडेप्रभृति ग्रंथकारांचें म्हणणें आहे. परधर्म न स्वीकारतां स्वधर्मांत राहून भक्तिमार्गानें ईश्वरप्राप्ती करून घेण्याबद्दल साधुसंतांचा उपदेश, मुसलमानी राजांच्या परस्पर युद्धांमध्यें क्षत्रिय व ब्राह्मण लोकांना मिळालेलें युद्धशिक्षण, वीरजा, वीरजाया व वीरजननी जिजाबाईराणीसाहेब यांनीं बालशिवाजींना दिलेलें ओजस्वी व तेजस्वी शिक्षण, दादोजी कोंडदेवांनीं बालशिवाजींना क्षत्रियास योग्य असें दिलेलें शिक्षण व प्रौढ शिवाजीमहाराजांना यवनी राजांशीं युद्ध करून स्वातंत्र्य मिळविण्याच्या कामीं येणाऱ्या दाखविलेल्या अडचणी व त्यांतून पार पडण्याकरितां सुचविलेले उपाय, शहाजीराजे यांनीं आपले विश्वासू व कसलेले नोकर बालशिवाजीराजे यांचेकडे पाठवून त्यांना केलेली अंतःस्थ मदत, समर्थांनीं अनुग्रहानंतर शिवाजीमहाराजांना, राजधर्म व क्षात्रधर्म सांगून "मराठा तितुका मेळवावा। महाराष्ट्रधर्म वाढवावा॥" म्हणून केलेला उपदेश, तुम्ही स्वराज्य-स्थापनेचें काम सुरू केलें आहे तें उत्तम आहे, त्यांत तुम्हांस श्रीकृपेनें यश येईल, म्हणून महाराजांना दिलेलें प्रोत्साहन, राजकारणांत शिरल्याशिवाय खरा प्रपंचच होत

नाहीं असें म्हणून बहुजन समाजास राजकारणांत भाग घेण्यास सांगून शिवाजीमहाराजांच्या स्वराज्याच्या प्रयत्नास केलेलें साहाय्य, बाजी देशपांडे, मुरार बाजी, तानाजी मालुसरे, मोरोपंत पिंगळे, नेताजी पालकर, प्रतापराव गुजरप्रभृति अनेक देशभक्तांनीं स्वराज्यप्राप्तीकरितां आत्मयत्नपूर्वक व एकनिष्ठापूर्वक केलेले प्रयत्न, असे सर्व शिवाजी-महाराजांच्या वारकरी पंथाच्या भव्य इमारतीवर कळस चढविण्याच्या कामीं कारणीभूत झाले आहेत. वरील सर्व थोर विभूतींच्या प्रयत्नांचा अंतर्भाव, राजनीतिशास्त्र अगर राजकारणशास्त्र यांत होतो इतकें तें शास्त्र व्यापक आहे हें वाचकांच्या नजरेस आणण्याकरितां आम्ही हें इतकें प्राथमिक विवेचन केलें आहे.

श्री. नरसिंह चिंतामण केळकर हे आपल्या गॅरिबॉल्डीच्या चरित्रांत लिहितात:—"मॅझिनी व गॅरिबॉल्डी या गुरुशिष्यांची जोडी युरोपांत खरोखर अद्वितीय होय. आपल्या इकडील श्रीरामदास व शिवाजीमहाराजांची ही जोडी प्रसिद्धच आहे. मात्र या जोडीजोडींत थोडासा फरक आहे. तो असा कीं, रामदास हे शिवाजी-महाराजांचे जसे राजगुरु होते, तसे धर्मगुरु ही होते. त्यांना महाराष्ट्रांत साधुसंतांत गणतात. मॅझिनीची योग्यता राष्ट्रभक्त या नात्यानें आहे." (पान १८८) श्रीयुत केळकर हे समर्थांना महाराष्ट्राचे मॅझिनी म्हणतात. काव्हूरचे चरित्रकार श्रीयुत वासुदेवराव मुंडले हे काव्हूरला इटलीचे रामदास म्हणतात. मॅझिनी यानें इटली-देशांतील लोकांस आपल्या लेखांनीं स्वातंत्र्याकरितां प्रयत्न करण्यास प्रवृत्त केलें. काव्हूरनें आपल्या मुत्सद्देगिरीनें इटलीस स्वातंत्र्य मिळवून दिलें. यावरून श्रीयुत केळकर व श्रीयुत मुंडले यांच्या मतांप्रमाणें समर्थांच्या अंगीं मॅझिनीप्रमाणें आपल्या लेखांनीं लोकांचीं मतें स्वराज्याकडे प्रवृत्त करण्याचें सामर्थ्य होतें व काव्हूरप्रमाणें राजास सल्ला देण्याचे कामीं मुत्सद्दीपणाचे गुण ही होते. कोल्हापूर येथील महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाच्या १७व्या अधिवेशनाचे अध्यक्ष या नात्यानें केलेल्या भाषणांत श्रीमंत सयाजीरावमहाराज गायकवाड ही समर्थ मुत्सद्दी होते असें म्हणतात. 'रामदास हा मुत्सद्दी व चतुर पुरुष तत्कालीन भावनांचा मूर्तिमंत पुतळा होता.' (पान ६) श्री. स. आ. जोगळेकर यांनीं मॅझिनीचें चरित्र लिहिलें आहे त्यांत ते म्हणतात:—"मॅझिनीच्या राष्ट्रीय चळवळीमध्यें भगवंताचें अधिष्ठान होतें, म्हणून इटलीमध्यें यादवीचे पायीं रक्तपात झाला नाहीं व राष्ट्रनौका सुरक्षितपणें बंदरांत आणतां आली.. इटलीची राज्यक्रांति द्वेषाच्या पायावर उभारलेली नव्हती. मॅझिनीच्या राजकारणांत प्रवृत्ति व निवृत्ति यांचें एकीकरण झालें होतें."(पा. ३२) इतिहासकार मॅझिनीस युरोपखंडांतील राष्ट्रधर्माचे आद्यप्रवर्तक म्हणतात. समर्थांना हिंदुस्थानांतील महाराष्ट्रधर्माचे 'आद्यप्रवर्तक' म्हणतात. प्रो. शं. द. जावडेकर यांनीं 'राजनीतिशास्त्रपरिचय' या नांवाचा राजकारणावर एक उत्कृष्ट ग्रंथ लिहिला आहे. त्यांत ते म्हणतात:—"मॅझिनीनें

गेल्या शतकांत युरोपांत राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या तत्त्वाचा पुष्कळ प्रसार केला व राष्ट्रधर्मांची कल्पना लोकांना आणून दिली. राष्ट्रीयत्वाच्या भावनेला आध्यात्मिक किंवा धार्मिक स्वरूप देण्याचें कार्य त्यानें उत्तम प्रकारें बजाविलें आहे." (पान ६०) मॅझिनीच्या वरील मतांशीं समर्थांची सुप्रसिद्ध ओंवी तंतोतंत जुळते:—"सामर्थ्य आहे चळवळीचें। जो जो करील तयाचें॥ परंतु तेथें भगवंताचें। अधिष्ठान पाहिजे॥" (दासबोध ७. ४) पुढें श्री. जावडेकर म्हणतात:—"श्रीसमर्थ रामदासांनीं लोकमताला राजनीतीच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्व दिलें आहे." "लोकांसी राखणें राजी। तें राज्य प्रबळे बळें॥ लोक हे राखतां राजी। सर्व राजीच होतसे॥ १॥ लोक राजी राखोनी कीजे। सकळ कांहीं॥ जिकडे जग तिकडे जगन्नायक। कळला पाहिजे विवेक॥" हा समर्थांचा सिद्धांत पाश्चात्य देशांतील 'Vox populi vox dei' म्हणजे 'लोकमत हीच ईशेच्छा' या तत्त्वाशीं तंतोतंत जुळणारा आहे. (४२१) शांतिपर्वांतील राजधर्म व राजनीति, कौटिलीय अर्थशास्त्र, इंग्लंड, फ्रान्स व इटली देशांतील ग्रंथकारांचे राजनीतिशास्त्रावरील म्हणजे राजकारणशास्त्रावरील ग्रंथ, मॅझिनी, गॅरिबॉल्डी व काव्हूर यांचीं चरित्रें, यांतील राजकारणशास्त्राच्या विवेचनावरून राजकारणांत विविध विषयांचा अंतर्भाव होतो. राजकारणाची व्याख्या फार व्यापक आहे हें वाचकांच्या लक्षांत येईल. पुढें समर्थांच्या राजकारणावर विवेचन करतांना कांहीं विद्वान् पदवीधरांच्या मतांचें खंडन करण्याचा प्रसंग येणार आहे त्या वेळीं वरील राजकारणाची व्यापक व्याख्या वाचकांनीं ध्यानांत ठेवावी अशी आमची त्यांना विनंति आहे.

बाराव्या वर्षी लग्नमंडपांतून 'सावधान' हे शब्द ऐकतांच सावध होऊन पळून जाऊन पुढें बारा वर्षे तपश्चर्या करण्यांत जसें समर्थांच्या चरित्रांत एक वैशिष्ट्य आहे, तसेंच त्यांनीं आपल्या संप्रदायाच्या लक्षणांत राजकारणाचा राजरोसपणें समावेश केला, हें त्यांच्या संप्रदायाचें एक वैशिष्ट्य आहे. पूर्वकालीन साधुसंतांप्रमाणें समर्थ भक्तिमार्गी संत होतेच. समर्थांनीं आपल्या ग्रंथांत ठिकठिकाणीं भक्तिमार्गाचा गौरव करून त्या मार्गाचें महत्त्व लोकांना पटवून दिलें आहे. 'मनोबोधा'त "मना सज्जना **भक्तिपंथेंचि** जावें। तरी श्रीहरी पाविजे तो स्वभावें॥" (मनोबोध २) असें म्हणून श्रीहरीची सहजप्राप्ती होण्यास **भक्तिमार्गाचाच** स्वीकार केला पाहिजे असें सांगून परमेश्वरप्राप्तीस इतर मार्गांपेक्षां तो अधिक श्रेष्ठ आहे असें प्रतिपादन केलें आहे. ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकारामप्रभृति साधुसंतांनीं आपल्या ग्रंथांनीं व उपदेशानें बहुजन समाजास भक्तिमार्गाला लावून परधर्म स्वीकारण्यापासून परावृत्त केलें व त्यायोगें अप्रत्यक्षपणानें राजकारणास मदत करून शिवाजीमहाराजांकरितां स्वराज्यभूमि तयार करून ठेवली ही गोष्ट खरी. न्यायमूर्ति रानडे यांनीं आपल्या 'मराठी सत्तेचा उदय' (*The Rise of the Maratha Power*) या

अत्युत्कृष्ट इंग्रजी ग्रंथांतील 'महाराष्ट्रांतील साधुसंत' 'The Saints in Maharashtra' या भागांत सिद्ध केली आहे. वरील श्रेष्ठ साधुसंतांप्रमाणें समर्थांनीं बहुजन समाजाला भक्तिमार्गाला लावून धर्मांतर करण्यापासून परावृत्त तर केलेंच, परंतु त्यांनीं वरील साधुसंतांपेक्षां एक गोष्ट अधिक केली. समर्थांनीं आपल्या भक्तिमार्गाला हरिकथानिरूपणानंतर राजकारणाची जोड दिली. असें करण्यास त्यांच्या आयुष्यक्रमांत एक विशेष कारण घडलें. पंचवटींत बारा वर्षे तपश्चर्या केल्यानंतर सर्व भरतखंडांत तीर्थयात्रेकरितां प्रवास न करितां आपली जन्मभूमी जांब येथें जाऊन त्यांनीं अखेरपर्यंत परमार्थांत काळ घालविला असता, तर श्रेष्ठांप्रमाणें भक्तिरहस्यासारखे अध्यात्मविषयावर त्यांनीं ग्रंथ लिहिले असते, अथवा पंचवटींत श्रीरामसन्निध अखेरपर्यंत राहिले असते तर करुणाष्टकांसारखी आणखी कांहीं करुणापर कविता केली असती व अध्यात्मविषयावर उत्तम ग्रंथ लिहिले असते. तपश्चर्येनंतर बारा वर्षे समर्थांनीं तीर्थयात्रा केली, त्यायोगानें त्यांच्या भावी आयुष्यक्रमाला अगदीं निराळें वळण लागलें. बारा वर्षांच्या तीर्थयात्रेंत त्यांना बहुजनसमाजाची हीन स्थिति दिसून आली. परधर्मीयांनीं देवालयें पाडलेलीं, आंतील मूर्ति फोडलेल्या त्यांच्या नजरेस आल्या, परचक्र येऊन स्त्रियांना पळवून नेऊन भ्रष्ट करतात असें त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आलें व वरील सुलतानी त्रासाला दुष्काळ पडून अस्मानी त्रासाची भर पडल्याचें पाहून त्यांच्या मनास अत्यंत दुःख वाटलें. वरील उद्वेगजनक स्थितीचें वर्णन समर्थांनीं 'अस्मानीसुलतानी' या स्फुट प्रकरणांत व दासबोधांतील कांहीं समासांत केलें आहे. अस्मानीसुलतानींतील हृदयद्रावक वर्णनाबद्दल फर्ग्युसन कॉलेजांतील इतिहासाचे माजी अध्यापक कै. प्रो. लिमये म्हणतात:—Ramdas was an agitator in the higher sense of the term. It must have been his object to work up the feelings of the Maharashtrians, by narrating to them a heart-rending account of the suffering of the Hindus. भावार्थ:— रामदास हे लोकांमध्यें चैतन्य उत्पन्न करणारे फार उच्च दर्जाचे लोकनायक होते. म्लेंच्छांकडून हिंदूंना भोगाव्या लागलेल्या यातनांचें हृदयद्रावक वर्णन करून महाराष्ट्रांतील लोकांचीं मनें उद्दीपित करण्याचा त्यांचा हेतु होता. (*Fergusson College Magazine*, February 1918). मातृभूमीची हीनदीन स्थिति पाहून केवळ भक्तिमार्गानें राष्ट्रोन्नति होईल असें त्यांना वाटलें नाहीं. शेंकडों वर्षांच्या परराज्यानें बहुजन समाज विस्कळित होऊन त्यांत कांहीं त्राण व आत्मविश्वास उरला नव्हता, म्हणून लोकसंघटना करून धर्मस्थापना करावी असें त्यांना वाटलें व त्याकरितां त्यांनीं तीर्थयात्रा करीत असतांच ठिकठिकाणीं मठ स्थापन करून लोकसंग्रह करण्यास व धर्मस्थापना करण्यास आरंभ केला. नंतर कांहीं दिवसांच्या अनुभवानें त्यांना स्वधर्मस्थापनेस स्वराज्यस्थापनेची आवश्यकता

आहे असें वाटलें म्हणून बहुजन समाजाचीं मनें स्वराज्यस्थापनेकडे प्रवृत्त करण्याकरितां त्यांनीं आपल्या संप्रदायाच्या लक्षणांत राजकारणाचा समावेश केला. ज्ञानदेवांपासून सर्व साधुसंतांनीं निवृत्तिमार्गाचाच उपदेश करून बहुजन समाजास पंढरपूरच्या श्रीविठ्ठलरायाच्या भजनीं लावलें व धर्मांतर करण्यापासून परावृत्त करून स्वधर्मांतच ठेवलें व अप्रत्यक्षपणें शिवरायाकरितां स्वराज्यभूमिका तयार करून ठेवली असें वर सांगितलेंच आहे. समर्थांनीं ही वरील साधुसंतांप्रमाणें केलेंच. याशिवाय एक गोष्ट अधिक केली. प्रपंचाशिवाय, व्यवहाराशिवाय, राजकारणाशिवाय नीट परमार्थच होणार नाहीं असा सडेतोड उपदेश त्यांनीं केला. “ आधीं प्रपंच करावा नेटका। मग घ्यावें परमार्थविवेका॥ येथें आळस करूं नका। विवेकी हो॥ (दासबोध, १२–१–१) प्रपंच सांडूनि परमार्थ कराल। तेणें तुम्ही कष्टी व्हाल॥ प्रपंच परमार्थ चालवाल। तरी तुम्ही विवेकी॥ (१२–१–२) प्रपंच सांडुनी परमार्थ केला। तरी अन्न मिळेना खायाला॥ मग तया करंट्याला। परमार्थ कैंचा॥ (१२–१–३)” शेवटच्या ओंवींतील समर्थांचा उपदेश ‘ शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् ’ या कुमारसंभवांतील कालिदासोक्तीशीं अत्यंत जुळतो. साधुसंतांच्या केवळ निवृत्तिमार्गी उपदेशानें बहुजनसमाज भक्तिमार्गी बनतो. समाजाला भक्तिमार्गाची आवश्यकता आहेच; परंतु त्या वेळीं केवळ भक्तिमार्गानें इष्ट सिद्धि होणार नाहीं, म्हणून समर्थांनीं निवृत्तिमार्गालाच प्रवृत्तिमार्गाची जोड दिली. आधीं प्रपंच करण्यास जसें सडेतोडपणानें सांगितलें, तसेंच नंतर राजकारणाशिवाय खरा प्रपंचच होत नाहीं, असें निर्भीडपणानें सांगितलें. “ प्रपंचीं जाणे राजकारण। परमार्थी साकल्य विवरण॥ सर्वांमध्यें उत्तम गुण। त्याचा भोक्ता॥” (दासबोध, १९–४–१७) आपल्या इतर ग्रंथांत ही समर्थांनीं निवृत्तिपूर्वक प्रवृत्तिमार्गाचा उपदेश केला आहे. “ प्रवृत्ति सासुरे निवृत्ति माहेर। तेथें निरंतर मन माझें॥१॥ माझे मनीं सदा माहेर सुटेना। सासरें तुटेना काय करूं॥२॥” समर्थांनीं येथें निवृत्तिमार्गास माहेर म्हटलें आहे. मुलीला प्रथम माहेर व नंतर सासर असतें. माहेरीं मुलीला लहानपणीं चांगलें गृहशिक्षण दिलें म्हणजे ती लग्नानंतर सासरीं पतिसमवेत सुखाचा संसार करते. त्याप्रमाणें प्रारंभीं निवृत्तिमार्गाचीं तत्त्वें सद्गुरूपासून चांगलीं कळल्यावर नंतर योग्य वेळीं प्रौढ वयांत प्रवृत्तिमार्गांत, प्रपंचांत, व्यवहारांत व राजकारणांत शिरून लोकोद्धाराचीं व देशोद्धाराचीं महत्त्वाचीं कामें चांगलीं करतां येतात. याप्रमाणें प्रथम निवृत्तिपूर्वक प्रवृत्तिमार्गाचा अवलंब करावा व नंतर योग्य अधिकार प्राप्त झाल्यावर राजकारणांत पडावें असा समर्थांचा उपदेश होता.

कांहीं वर्षांपूर्वीं महाराष्ट्रांतील साधुसंतांत वारकरीपंथ व धारकरीपंथ असे दोन पंथ आहेत असें प्रतिपादन करण्यांत येत होतें व वारकरीपंथानें लोकांना

केवळ भक्तिमार्गी बनवून देशाचें नुकसान केलें असें म्हणणाऱ्यांचा एक पंथ निघाला होता. त्याला प्रतिक्रिया म्हणून हल्लीं वारकरीपंथाचे साधुसंत हीं राजकारणी होते, असें प्रतिपादन करणारा एक नवीन पंथ—वारकरी लोकांमध्यें नव्हे—सुशिक्षित पदवीधरांमध्यें निघाला आहे. या पंथाच्या एका अध्वर्यूंनीं 'विविधज्ञान-विस्तारा'त ( नोव्हेंबर १९२९ ) 'रामदास आणि तुकाराम' या विषयावर एक लेख लिहून दोघांच्या वाङ्मयाची तुलना करून पुढील सिद्धांत काढला आहे:— "वस्तुतः बारकाईनें पाहिल्यास रामदासांच्या वाङ्मयांत जितकें राजकारण आहे, तितकेंच तें तुकारामांच्या अभंगांत आहे असें म्हणण्याची पाळी येते. तुलनेनें जितक्या मानानें रामदासी राजकारणी ठरतील, **तितकेच तुकाराम हीं राजकारणी ठरतात.**" हें विधान वाचून आम्ही आश्चर्यचकित झालों. समर्थवाङ्मय वाचून आम्हीं 'बालबोध समर्थ-वाङ्मय-मालेंत' 'समर्थांची करुणापर कविता' म्हणून एक पुष्प प्रसिद्ध केलें आहे. त्याप्रमाणें 'तुकारामांची करुणापर कविता' या नांवाचें एक छोटें पुस्तक छापण्याकरितां आम्हीं तुकारामांची गाथा लक्ष्यपूर्वक वाचून त्यांतील करुणापर अभंगांवर खुणा करून ठेवल्या आहेत. समर्थ व तुकाराम समकालीन होते, म्हणून तुकारामांची गाथा वाचतांना त्यांच्या विविध विषयांवरील अभंगांत राजकारणाचा उपदेश आहे कीं काय हें पाहण्याकडे ही आमचें लक्ष्य होतें. परंतु सबंध गाथ्यामध्यें तुकाराममहाराजांनीं राजकारणाचा उपदेश केल्याचे अभंग आमच्या पाहण्यांत आले नाहींत. तसे अभंग आमच्या पाहण्यांत आले असते तर आम्हांस आनंद झाला असता व वारकरीपंथाला चोख उत्तर म्हणून आम्हीं 'तुकाराममहाराजांची राजकारणपर कविता' या नांवाचें एक छोटें पुस्तक आनंदानें प्रसिद्ध केलें असतें. तुकाराम हे रामदासांइतकेच राजकारणी होते, या आपल्या विधानाच्या पुष्टीकरणार्थ सदरहू लेखक आवटेकृत तुकाराम गाथ्यांतील पुढील अभंग देतात:—" ३११८—आडवाट जातां लावी नीट सोई। नाइकता सुखें करावें ताडन ॥ ३११७—दया तिचें नांव भूतांचें पाळण। आणि निर्दळण कंटकाचें ॥ पाप त्याचें नांव न विचारितां नीत। भलतेची उन्मत्त करी सदा ॥ ३१२२—परपीडक तो आम्हां दावेदार। विश्वीं विश्वंभर म्हणऊनी ॥ दंडूं त्यागूं बळें नावलोकूं डोळां। राखतो चांडाळा ऐसा दूरी ॥ ३१४२—अन्यायासी राजा न करितां दंड। बहुत ते लंड पीडिती जना ॥ न करि निगा कुणबी न काढितां तण। कैंचे येती कण हातासी ते ॥ तुका म्हणे संतां करूं नये अनृत। पाप नाहीं नीत विचारितां ॥" तुकारामांचे वरील अभंग उत्कृष्ट आहेत, नीतिमार्गदर्शक आहेत, परंतु त्यांवरून तुकारामांना राजकारणी संत कसें म्हणतां येईल हें आम्हांस कळत नाहीं. आडवाटेनें जाणाऱ्याला ताडन करावें, कंटकांचें निर्दळण करावें, या शब्दप्रयोगांवरून तुकारामांना राजकारणी म्हणण्याचा विस्तारांतील लेखकांचा

आशय दिसतो. परंतु तो न्याय लागू केल्यास आडमार्गी जाणाऱ्या मुलांना ताडन करणाऱ्या आईबापांना व शिक्षकांना राजकारणी आईबाप व राजकारणी शिक्षक म्हणावें लागेल!! अन्यायी लोकांना राजेलोकांनीं दंड न केल्यास ते लोकांना पीडा करतील असें ३१४२ व्या अभंगांत म्हटलें आहे. त्या अभंगांतील राजा या शब्दानें सदहू लेखक भ्रमांत पडले आहेत असें दिसतें. तुकारामांनीं या अभंगांत सामान्य तत्त्व सांगितलें आहे; त्या अभंगांत स्वराज्यस्थापनेचा उपदेश केला नाहीं अगर तिला प्रोत्साहन दिलें नाहीं. "रामदासांनीं जशी गृहस्थाश्रमाची स्तुति केली आहे, तशी तुकारामांनीं ही केली आहे, म्हणून ते रामदासांप्रमाणें राजकारणी होते." असें ते पुढें म्हणतात. "याकारणें गृहस्थाश्रम। सकलांमध्यें उत्तमोत्तम॥ परी पाहिजे स्वधर्म। आणि भूतदया॥ (१४-७-४)" येथें समर्थांनीं गृहस्थाश्रमाची थोरवी गाइली आहे खरी, परंतु तेवढ्यावरून त्यांना कोणी राजकारणी संत म्हणत नाहींत. तर ज्या दासबोधांत ग्रंथारंभीं "नवविधा भक्ति आणि ज्ञान। बोलिजे वैराग्याचें लक्षण॥ बहुधा अध्यात्मनिरूपण। निरोपिलें॥ (१-१-३)" असें समर्थ म्हणतात, त्याच दासबोधग्रंथांत पुढें "मुख्य हरिकथा निरूपण। दुसरें तें राजकारण॥" असें दासबोधांत ११व्या दशकांत सांगून पुढें निरनिराळ्या ठिकाणीं आणखी सव्वीस वेळां प्रसंगानुरोधानें राजकारण हा विषय वाचकांच्या नजरेपुढें आणून त्याचें महत्त्व प्रतिपादन केलें आहे; म्हणून समर्थांना राजकारणी संत म्हणतात. समर्थांचे ग्रंथ व शिकवण वाचून रे. डेमिंगसाहेबांचें ही मत समर्थांची व तुकारामप्रभृति साधुसंतांची शिकवण भिन्न होती असेंच झालें आहे. रे. डेमिंग म्हणतात:—"In this respect, the teaching of Ramdas does differ from that of Tukaram and the other Bhaktas." (p. 72) भावार्थ:—या बाबतींत रामदासांची शिकवण तुकाराम व इतर भक्तिमार्गी साधुसंत यांच्याहून भिन्न आहे. तुकाराम महाराजांच्या अभंगांत राजकारणाचा उपदेश नाहीं म्हणून त्यांच्या अभंगांची योग्यता कमी होते अशांतला मुळींच भाग नाहीं. "जयाची वदे वेदवेदांत वाणी। म्हणावें कसें हो तयालागि वाणी॥" अशी वामनपंडितांनीं त्यांच्या सुप्रसिद्ध अभंगांची मुक्तकंठानें स्तुति गाइली आहे. तुकारामांनीं आपल्या अभंगांच्या द्वारें बहुजन समाजाला नीतिशास्त्राचें व भक्तिमार्गाचें उत्तम शिक्षण दिलें आहे.

"राज्यकर्त्यांत व आपणांत जातींसंबंधानें व आचारासंबंधानें विशेष भेद मुळापासून होता, त्या धर्माची कास या साधुसंतांनीं धरली; आचारानें व विचारानें राज्यकर्त्यांसारखे होऊन व त्यांच्याशीं तादात्म्य पावून राष्ट्रत्व नष्ट होतें, हें ते पक्केपणीं जाणत होते; तेव्हां धर्माच्या बाबतींत जित व जेते यांत मूळचा जमीन-अस्मानाचा भेद होताच, तो त्यांनीं आपल्या ग्रंथांत आणून **स्वराष्ट्रियत्व कायम ठेविलें.**" (म. इ. सा. खंड ८ प्र.) वारकरी व धारकरी पंथांमध्यें पूर्वी कधीं विरोध

नव्हता व हल्लीं ही नाहीं व केव्हां ही असूं नये. कै. राजवाडे यांच्या मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १ व खंड ४ यांतील प्रस्तावनेंतील एकांगी विधानानें जो दोन पक्षांमध्यें गैरसमज झाला होता, तो त्यांच्या खंड ८ यांतील प्रस्तावनेंतील वरील विधानानें दूर झाला आहे. तेव्हां आतां हल्लींच्या स्वराज्यप्राप्तीच्या काळांत दोन्ही पक्षांनीं गतगोष्टी विसरून गुण्यागोविंदानें राष्ट्रोन्नतीच्या कार्यास लागावें अशी दोन्ही पक्षांस आमची विनंति आहे.

समर्थांचें राजकारण हा अलीकडे एक वादाचा विषय होऊन बसला आहे. त्याचें मुख्य कारण समर्थ राजकारणी संत नव्हते असें म्हणणारे लोक ' राजकारण ' या शब्दाचा अर्थ फार आकुंचित रीतीनें व एका विशिष्ट रीतीनें करतात हें होय. ' राजकारणा 'चा व्यापक व सर्वसंमत अर्थ घेतल्यास समर्थ ' राजकारणी ' संत होते असें आक्षेपकांना देखील कबूल करावें लागेल असें आम्हांस वाटतें.

समर्थ व शिवाजीमहाराज यांच्या प्रथम भेटीचा काल होतां होईल तों पुढें ढकलण्याचा प्रयत्न करणारा महाराष्ट्रांतील सुशिक्षित वर्गामध्यें एक पक्ष आहे. त्या पक्षापैकीं कांहीं लोकांचें असें म्हणणें आहे कीं प्राचीन साधुसंतांप्रमाणें समर्थ फक्त भक्तिमार्गी संत होते. समर्थवाङ्मयांत ' राजकारण ' या शब्दाचा उपयोग अनेकदां आला आहे; राजकारणाचें महत्त्व ही अनेक ठिकाणीं प्रतिपादन केलें आहे व समर्थसंप्रदायाच्या लक्षणांत राजकारणाचा समावेश केला आहे, ही गोष्ट जेव्हां त्यांना अडूं लागली, तेव्हां त्या पक्षांतील एका पदवीधर सद्गृहस्थांनीं दासबोधांत 'राजकारण' या शब्दाचा उपयोग 'राजकारण' या अर्थीं केला नाहीं, 'चातुर्य' या अर्थीं केला आहे असें प्रतिपादन करण्याचा विक्षिप्त प्रयत्न केला आहे. दासबोधामध्यें 'राजकारण' हा शब्द २७ ठिकाणीं आला आहे व त्या सर्व ठिकाणीं मागील पुढील संदर्भावरून राजकारण शब्दाचा अर्थ राजकारण आहे असें जेव्हां समर्थवाङ्मयाचा सूक्ष्म अभ्यास करणाऱ्या अनेक विद्वान लोकांकडून सप्रमाण सिद्ध करण्यांत आलें, तेव्हां दासबोधांत कांहीं ठिकाणीं राजकारण शब्दाचा अर्थ राजकारणच आहे असें आक्षेपकांना निरुपायानें कबूल करावें लागलें. परंतु नंतर त्यांनीं समर्थांच्या राजकारणावर दुसऱ्या तऱ्हेनें हल्ला करण्यास सुरुवात केली. समर्थ जर खरोखर राजकारणी संत असते तर ७।८ हजार ओंव्यांच्या दासबोध ग्रंथांत राजकारण हा शब्द अधिक वेळां यावयास पाहिजे होता असें ते म्हणूं लागले. आक्षेपक वेळीं अवेळीं कंठरवानें सांगतात कीं, प्राचीन व अर्वाचीन साधुसंतांप्रमाणें समर्थ फक्त भक्तिमार्गी संत होते. परंतु इतर साधुसंतांच्या वाङ्मयांत 'राजकारण' हा शब्द चुकूनसुद्धां सांपडत नाहीं, त्यांत राजकारणाचें महत्त्व कोठें ही प्रतिपादन केलें नाहीं; " मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा, " " महाराष्ट्र राज्य करावें जिकडे तिकडे " अशा अर्थाचा उपदेश त्यांत कोठें ही सांपडत नाहीं,

याचें कारण काय ? या प्रश्नाचें समर्पक उत्तर आक्षेपकांना देतां येत नाहीं. हजार ओंव्यांच्या दासबोधांत राजकारण हा शब्द २७ ठिकाणींच आला आहे हा आक्षेपकांचा मुद्दा गौण आहे असें आम्हांस वाटतें. दासबोधांतील दोनशें समासांत राजकारणाचे फक्त दोनच समास आहेत, समर्थ खरोखर राजकारणी संत असते तर दोनशें समासांच्या दासबोधांत राजकारणावर अधिक समास असावयास पाहिजे होते, असें आणखी एक विधान आक्षेपकांनीं कां केलें नाहीं याचें आम्हांस आश्चर्य वाटतें. असो. दासबोधांत राजकारणावर दोन समास आहेत, व त्यांत राजकारण हा शब्द सत्तावीस वेळां आलेला आहे ही गोष्ट ही खरी आहे; परंतु दासबोधांत दोन समासांऐवजीं राजकारणावर एकच समास असता, व त्यांत राजकारण हा शब्द एकच वेळां आला असता तरी त्या एका समासांतील राजकारणाच्या प्रतिपादनानें समर्थांना राजकारणी संत म्हणावें लागलें असतें असें आम्हांस वाटतें.

महाराष्ट्रांतील इतर साधुसंतांनीं मठ स्थापून संप्रदायपरंपरा सुरू केली नाहीं व समर्थांनीं मठ स्थापून संप्रदायपरंपरा सुरू केली हें आक्षेपकांना मान्य आहे. मग समर्थ स्फुटप्रकरणामध्यें आपल्या संप्रदायाच्या लक्षणांत राजकारणाचा समावेश करितात व दासबोधामध्यें चतुःसूत्री शिकवणुकींत राजकारणांचा हरिकथानिरूपणानंतर प्रामुख्यानें अंतर्भाव करितात यांत ही समर्थांचें वैशिष्ट्य आहे हें प्रांजळपणें कबूल करण्यास आक्षेपक माघार कां घेतात हें कळत नाहीं. दासबोधांत राजकारण हा शब्द २७ वेळां आला असला तरी त्या राजकारण शब्दाचा उपयोग समर्थांनीं चातुर्य या अर्थी केला आहे असें सिद्ध करण्याचा आक्षेपकांनीं प्रयत्न केला आहे; असा प्रयत्न करण्यापूर्वी त्यांनीं दासबोधांतील सर्व समासांचें अधिक लक्ष्यपूर्वक व सूक्ष्म रीतीनें अध्ययन करावयास पाहिजे होतें. समर्थ अत्यंत बुद्धिवान होते हें आक्षेपक कबूल करितात. तेव्हां दासबोधांतील समासांचें नामकरण आक्षेपकांना मान्य असलें पाहिजे. राजकारण व चातुर्य हे शब्द समर्थांच्या मतानें समानार्थक असते तर समर्थांनीं राजकारणावर कांहीं समास लिहून चातुर्यावर निराळे समास लिहिले नसते. दासबोधांत राजकारणावर जसे दोन स्वतंत्र समास आहेत. (११.५ + १९. ९ ), तसे चातुर्यावर ही तीन स्वतंत्र समास आहेत ( १४. ६ + १५.१ + १५. ६ ). तेव्हां समर्थांनीं राजकारण व चातुर्य या शब्दांचा उपयोग समानार्थी केलेला नाहीं हें निःसंशय सिद्ध होतें.

शिवकालीन पत्रसारसंग्रहांत ' राजकारण ' चा अर्थ ' चातुर्य ' न करितां सर्वसंमत अर्थींच उपयोग केला आहे. उदा. :—" या उपरी राजकारणविषयीं हजरत कुतुबशहांनीं माद्दाण्णापंतास व आम्हांस एक चित्त करून ऐसा तह केला. " ( पृ. ५६०, खंड २) अशीं अनेक उदाहरणें सदर ग्रंथांत आहेत; शिवाय शिवाजीमहाराजांच्या प्राचीन बखरींत ' राजकाण ' या शब्दाचा उपयोग ' 'चातुर्य ' या अर्थी न

करितां अनेक ठिकाणीं राजकारण या रूढ अर्थींच केला आहे. उदाहरणार्थ:—"हे औरंगजेबास कळोन मनांत चिंतातुर झाला. तेव्हां पादशहांनीं शहाअलम यांस कित्येक विचार राजकारण सांगून त्यास फौजेनिशीं रवाना केलें." ( सभासदाची बखर, पान ४९, प्रत शके १८०३). शिवदिग्विजय, चिटणीसांची बखरप्रभृति इतर बखरींत ही राजकारण हा शब्द 'राजकीय उलाढाली' या रूढ अर्थीच उपयोग केलेला आहे.

म्हणून दासबोधांत २७ वेळां राजकारण हा शब्द आला आहे त्याचा अर्थ राजकारणच आहे व चातुर्य हा नाहीं हें मागच्या पुढच्या ओंव्या देऊन सिद्ध करण्याचें कांहीं प्रयोजन उरलें आहे असें आम्हांस वाटत नाहीं. तें काम श्री. शंकर श्रीकृष्ण देव, श्री. जनार्दन सखाराम करंदीकर, प्रो. शंकर दामोदर पेंडसे, श्री. अनंत वामन वाकणकर प्रभृति विद्वान समर्थवाङ्मयभक्तांनीं साधार व सविस्तर केलेंच आहे. दासबोधांत व इतर समर्थ-वाङ्मयांत राजकारण शब्द कोठें आला आहे, हें समजण्यास वाचकांना मदत व्हावी म्हणून 'राजकारण' हा शब्द ज्या ठिकाणीं आला अशा स्थळांचें एक कोष्टक देतों. दासबोधः—

| अनु. | द. स. ओंवी | |
|---|---|---|
| ( १ ) | ३–९–१३ | मृत्यु न म्हणे राजकारणी ॥ १३ ॥ |
| ( २ ) | ९–४–३५ | नेणतां कांहीं राजकारण । अपमान करून घेती प्राण ॥ नेणतां कठिण वर्तमान । सर्वत्रास होय ॥ ३५ ॥ |
| ( ३ ) | ११–५–४ | मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण ॥ तिसरें सावधपण सर्वविषयीं ॥ ४ ॥ चौथा अत्यंत साक्षेप ॥ ५ ॥ |
| ( ४ ) | ११–५–१९ | राजकारण बहुत करावें । परंतु कळोंच नेदावें ॥ परपीडेवरी नसावें । अंतःकरण ॥ १९॥ |
| ( ५ ) | ११–५–२० | लोक पारखून सोडावे । राजकारणें अभिमान झाडावे ॥ पुन्हां मेळवून घ्यावे । दुरील दोरे ॥ २० ॥ |
| ( ६ ) | ११–५–२२ | ऐसें असो राजकारण । सांगतां तें असाधारण । सुचित |
| ( ७ ) | ११–५–२२ | असतां अंतःकरण । राजकारण जाणे ॥ २२ ॥ |
| ( ८ ) | ११–६–४ | हरिकथा निरूपण । नेमस्तपणें राजकारण । वर्तायाचें लक्षण । तें ही असावें ॥ ४ ॥ |
| ( ९ ) | १२–२–२९ | हरिकथा निरूपण । बरेंपणें राजकारण ॥ प्रसंग पाहिल्या-विण । सकळ खोटें ॥ २९ ॥ |
| (१०) | १५–२–४ | महाराष्ट्र देश थोडा उरला । राजकारणें लोक रोधिलों ॥ अवकाश नाहीं जेवायाला । उदंड कामें ॥ ४ ॥ |
| (११) | ,, ,, २५ | तेथें कोणाचें चालेना । अणुमात्र अनुमानेना ॥ कष्ट घालूनि राजकारणा । लोक लावी ॥ २५ ॥ |

(१२) १५-३-१४ नेमस्त कळेना वचन । नेमस्त नये राजकारण ॥ उगेचि धरिती थोरपण । मूर्खपणें ॥ १४ ॥

(१३) १६-८-२० अनंत राजकारणें धरणें । कुबुद्धि सुबुद्धि विवरणें ॥ कळों न देणें चुकावणें । प्राणिमात्रासी ॥ २० ॥

(१४) १८-२-१४ जाणत्याचें धूर्तपण । जाणत्याचें राजकारण ॥ जाणत्याचें निरूपण । ऐकत जावें ॥ १४ ॥

(१५) १८-६-१ नाना वस्त्रें नाना भूषणें । येणें शरीर शृंगारणें ॥ विवेकें विचारें राजकारणें । अंतर शृंगारिजें ॥ १ ॥

(१६) १८-६-४ तऱ्हे शीघ्र कोपी सदा । कदापि न धरी मर्यादा ॥ राजकारण॰ संवादा । मिळोंचि नेदी ॥ ४ ॥

(१७) १८-६-६ समयासारिखा समयो येना । नेम सहसा चालेना ॥ नेम धरितां राजकारणा । अंतर पडे ॥ ६ ॥

(१८) १९-४-१७ प्रपंचीं जाणे राजकारण । परमार्थी साकल्य विवरण ॥ सर्वांमध्यें उत्तम गुण । त्याचा भोक्ता ॥ १७ ॥

(१९) १९-६-१७ दीक्षा बरी मैत्री बरी । तीक्ष्ण बुद्धि राजकारणीं बरी ॥ आपणास राखे नाना परी । अलिप्तपणें ॥ १० ॥

(२०) १९-८-११ मोठीं राजकारणें चुकती । राजकारणें बेढा लागती ॥
(२१) ,, ,, ,, नाना चुकीची फजीती । चहूंकडे ॥ ११ ॥

(२२) १९-९-१० या अवघ्या पहिल्याच गोष्टी । प्राणी कोणी नव्हता कष्टी ॥ राजकारणें मंडळ वेष्टी । चहूंकडे ॥ १० ॥

(२३) १९-९-१८ मुख्य सूत्र हातीं घ्यावें । करणें तें लोकांकरवीं करावें ॥ कित्तेक खलक उगवावे । राजकारणामध्यें ॥ १८ ॥

(२४) १९-९-१९ बोलके पहिलवान कळकटे । तयासीच घ्यावें झटें ॥ दुर्जन राजकारणें दाटे । ऐसें न करावें ॥ १९ ॥

(२५) १९-९-२१ खळदुर्जनांसी भ्यालें । राजकारण नाहीं राखिलें ॥ तेणें अवघेंचि प्रगट झालें । बरें वाईट ॥ २१ ॥

(२६) १९-९-२७ हे धूर्तपणाचीं कामें । राजकारण करावें नेमें ॥ ढिलेपणाच्या संभ्रमें । जाऊं नये ॥ २७ ॥

(२७) १९-१०-१ जेथें अखंड नाना चाळणा । जेथें अखंड नाना धारणा ॥ जेथें अखंड राजकारणा । मनासी आणिती ॥ १ ॥

आतां दासबोधाशिवाय समर्थांच्या इतर स्फुट काव्यांत राजकारण शब्द नऊ ठिकाणीं आलेला आमच्या वाचनांत आम्हांस दिसून आला आहे, त्याचा स्थळनिर्देश करतों.

| | |
|---|---|
| १ समर्थांचें शिवाजी-महाराजांना ओंवी-बद्ध पत्र | शिवाजीमहाराजांना अनुग्रह देण्यापूर्वी समर्थांनीं एक ओंवी-बद्ध पत्र महाराजांना पाठविलें होतें; त्यांतील पंधरावी ओंवी:—उदंड **राजकारण** तटलें । तेणें चित्त विभागलें । प्रसंग नसतां लिहिलें । क्षमा केली पाहिजे ।। १५ ।। |
| २ राजधर्म | शके १५७१ सालीं शिंगणवाडीस महाराजांना अनुग्रह दिल्यावर राजधर्म सांगितला; त्यांतील ६ वी ओंवी:—धुरेनें युद्धास जाणें । अशीं नव्हेत कीं **राजकारणें**। धुराच करून सोडणें। कित्येक लोक ।। ६ ।। |
| ३ सेवकधर्म | महाराजांना अनुग्रह दिल्यावर लागलीच त्यांचे नोकर निळो सोनदेव मुजुमदार व बाळाजी आवजी चिटणीस यांना ही अनुग्रह दिला व त्यांना सेवकधर्म सांगितला, त्यांत समर्थ म्हणतात:-सुचित करुनि अंत:करण। आतां करावें **राजकारण** । प्रमाण आणि अप्रमाण । समजलें पाहिजे ।। (समास २. १). |
| ४ संप्रदायलक्षणें | स्फुट ओंव्यांत संप्रदायाचीं वीस लक्षणें दिलीं आहेत; त्यांतील ६ वी ओंवी:—पंधरावें लक्षण तें **राजकारण** । सोळावें तें जाण अव्यग्रता ।। ६ ।। |
| ५ आध्यात्मसार | आध्यात्मसार नांवाचें एक स्फुट प्रकरण आहे:—शक्तीनें मिळती राज्यें । युक्तीनें होतसे ।। शक्ति युक्ति जये ठायीं । तेथें श्रीमंत धांवती ।। २६ ।। इत्यादि स्वराज्यस्फूर्तिदायक उपदेश त्यांत आहे. त्यांतील ३६ वी ओंवी:—चोरटे होरटी तुंदे । नासकें लाच इच्छिती । लौंढिचें दुरीं घालावें । मारावें **राजकारणें**।। |
| ६ सावधानता प्रकरण | या प्रकरणांत पुढील ओंवी आहे:—पाहिलेंचि पाहावें । केलेंचि करावें ।। शोधिलेंचि शोधावें । **राजकारण** ।। |
| ७ भीमस्वामींस उत्तर | तंजावर मठाधिपती भीमस्वामी यांनीं समर्थांना एक पत्र पाठविलें होतें. त्या पत्राच्या उत्तरांत समर्थ म्हणतात:—प्रवृत्तीस पाहिजे **राजकारण** । निवृत्तीस पाहिजे विवरण ।। जेथें अखंड श्रवण मनन । धन्य तो काळ ।।३।। |
| ८ स्फुट श्लोक | श्रीसमर्थांची कविता, प्रथम खंड, स्फुट श्लोक ५१, यांत समर्थ म्हणतात:—तुझेंनि सर्व बोलणें । तुझेंनि सर्व चालणें।। तुझेंनि योग धारणें । तुझेंनि **राजकारणें** ।।३।। |
| ९ विविध पदें | **राजकारणाचीं** द्वारें । जाणती काय गव्हारें ।। समरांगणीं रांडापोरें । काय करिती ।। १ ।। ( श्रीसमर्थांची गाथा, पद १५३०, पान ४२५ ). |

संप्रदायाच्या लक्षणांत व दासबोधांतील चतुःसूत्रींतच राजकारणाचा उपदेश करून समर्थ थांबले नाहींत, तर जेव्हां जेव्हां राजकारणाचा उपदेश करण्याचा विशेष प्रसंग येई, तेव्हां तेव्हां ते आपल्या शिष्यांना व महंतांना निरनिराळ्या तऱ्हेनें राजकारणाचें महत्त्व पटवून देत होते, असें वरील दासबोधेतर ग्रंथांतील उद्‌धृत केलेल्या उताऱ्यांवरून सिद्ध होतें. अनुक्रमसंख्या ७ हा अशा प्रकारचा एक प्रसंग आहे. भीमस्वामी शहापूरकर यांना समर्थांनीं तंजावर येथें मठ स्थापून तेथें ठेविलें होतें. भीमस्वामींना सद्‌गुरूंचा वियोग सहन न होऊन त्यांनीं एक श्लोकबद्ध पत्र समर्थांना लिहिलें. त्यांतील दोन महत्त्वाचे श्लोक देतों:-"कसें दुर्भरें आणिलें या स्थळाला। पदीं स्वामिंच्या थोर वीयोग झाला ॥ जगीं धन्य त्या लाभली पाद-सेवा। नसे ते मला पूर्व माझाचि ठेवा ॥ ३ ॥ अखंडित हे वासना भेटि व्हावी। प्रभूपाईंची धूळ माथां पडावी ॥ मनींचे मनीं जाणिसी स्वामिराया। किती वाढवूं स्वामि विस्तार वायां ॥ ५ ॥" या श्लोकबद्ध पत्रास समर्थांनीं ओंवीबद्ध उत्तर पाठ-विलें:-"चित्रकला नाम नाटक। म्हणोनि नामें कर्नाटक ॥ तेथें जे रामउपासक। पत्र त्यांसी ॥ १ ॥ तुम्हीं जें पत्र पाठविलें। वाचुनी आश्चर्य वाटलें ॥ परम समाधान झालें। देव जाणे ॥ २ ॥ प्रवृत्तीसी पाहिजे **राजकारण**। निवृत्तीसी पाहिजे विवरण। जेथें अखंड श्रवण मनन। धन्य तो काळ ॥ ३ ॥ आयुष्यासी माप लागलें। ऐसें प्रचीतीस आलें ॥ तरी सार्थक पाहिजे केलें। सारासार विचारें ॥ ४ ॥" दासबोधांत "प्रपंचीं जाणें राजकारण। परमार्थीं साकल्य विवरण" ॥ (१९·४·१७) असें म्हटलें आहे. भीमस्वामींना पाठविलेल्या उत्तरांत **प्रपंचाच्या** ऐवजीं **प्रवृत्ति** हा शब्द घातला आहे, म्हणजे तोच अर्थ निराळ्या शब्दांत प्रगट केला आहे. संप्रदा-याच्या लक्षणांत राजकारणाचा समावेश करून दासबोधांत २७ वेळां त्याचें महत्त्व पटवून दिलें असतां, पुन्हा खासगी पत्रांत ही तो विषय महंतांच्या नजरेस समर्थ आणून देतात, यावरून राजकारण या विषयाला ते किती महत्त्व देत होते हें दिसून येतें.

परंतु राजकारण शब्द दासबोधांत, स्फुट प्रकरणांत व खासगी पत्रांत किती वेळां आला आहे, हा प्रश्न महत्त्वाचा असला तरी एका दृष्टीनें तितका महत्त्वाचा नाहीं असें आम्हांस वाटतें. **राजकारण** शब्दाचा प्रत्यक्ष उपयोग केल्याशिवाय समर्थवाङ्मयांत शेकडों ठिकाणीं समर्थांनीं इतर प्रोत्साहक व उत्तेजक शब्दांनीं स्वराज्यविषयक भावनांना इतक्या जोरदार भाषेनें उद्दीपित केलें आहे कीं, **राज-कारण** हा शब्द त्यांच्या वाङ्मयांत एकदांसुद्धां आढळून आला नसता तरी त्यांना राजकारणी संतच म्हणावें लागलें असतें. आमच्या म्हणण्याची वाचकांना सत्यता पटण्याकरितां राजधर्म, क्षात्रधर्म व संभाजीस पाठविलेलें पत्र यांतील कारणापुरते थोडे उतारे देतों.

**राजधर्मः**–" अमर्याद फितवेखोर । यांचा करावा संहार ।। शोधिला पाहिजे विचार । यथातथ्य ।। १ ।। मनुष्य राजी राखणें । हींच भाग्याचीं लक्षणें ।। कठीणपणें दुरी धरणें । कांहींएक ।। २ ।। उपाधीस जो कंटाळला । तो भाग्यापासून चेवला ।। समयीं धीर सांडला । तोही खोटा ।। ३ ।। संकटीं कंटाळों नये । करावे अत्यंत उपाय । तरी मग पाहतां काय । उणें आहे ।। ४ ।। बंध बांधावे नेटके । जेणें करितां चतुर तुके ।। ताबे न होतां फिके । कारभार होती ।।५।। उदंड मुद्दे असावीं । सर्वही एकत्र न करावीं ।। वेगळालीं कामें द्यावीं । सावधपणें ।। ६ ।। मोहरा पेटला अभिमाना । मग तो जीवास पाहेना ।। मोहरे मिळवून नाना । मग चपेटे मारी ।। ७ ।। देखोनी व्याघ्राचा चपेटा । मेंढरें पळती नाना वाटा ।। मस्त तो रेडा मोठा । काय करावा ।। ८ ।। तुरंगें शस्त्रें आणि स्वार । पाहिलाची पाहावा विचार ।। निवडूं जातां थोर थोर । शत्रू पळती ।।९ ऐसा प्रपंचाचा विवेक । स्वल्प बोलिलों कांहीं एक ।। एका मनोगतें स्वामी सेवक । असतां बरें ।।१०।। " शेवटच्या ओवींत ऐसा " **प्रपंचाचा विवेक** " असें म्हटलें आहे. यावरून समर्थांची **प्रपंचाची** व्याख्या किती व्यापक होती, हें सिद्ध होतें. प्रपंचांत समर्थ राजकारणाचा समावेश करीत होते हें सिद्ध होतें, व "**प्रपंचीं** जाणे राजकारण " या दासबोधांतल्या म्हणण्यावरून आम्ही म्हणतों याला पुष्टि मिळते. शिवाय वर दिलेल्या दहा ओंव्यांवरून प्रत्यक्ष राजकारण शब्दाचा उपयोग केल्याशिवाय राजकारणविषयक मनोवृत्ति प्रदीप्त करण्यांत समर्थ किती कुशल होते हें दिसून येतें. आतां क्षात्रधर्मांतील एक उतारा देतोंः–

जयास वाटे जिवाचें भय । त्यानें क्षात्रधर्म करूं नये ।। कांहीं तरी करून उपाय । पोट भरावें ।। १ ।। विन्मुख मरणीं नरक होती । वांचूनि येतां मोठी फजीती ।। इहलोक परलोक जाती । पाहाना कां ।।२।। मारितां मारितां मरावें । तेणें गतीस पावावें ।। फिरोन येतां भोगावें । महद्भाग्य ।। ३ ।। नजर करार राखणें । कार्य पाहून खत्तल करणें ।। तेणें रणशूरांचीं अंतःकरणें । चाकित होती ।। ४ ।। जैसा भांडयाचा गलोला । निर्भय भारमध्यें पडला ।। तैसा क्षत्री रिचवला । पर सैन्यामध्यें ।। ५ ।। निःशंकपणें भार फुटती । पर वीरांचे तबके तुटती ।। जैसा बाळिया घालूनि घेती । भैरी उठतां ।। ६ ।। ऐसें अवघेंचि उठतां । परदळांची कोण चिंता ।। हरणें लोळवी, चिता । देखत जैसा ।। ७ ।। मर्दे तकवा सोडूं नये । म्हणजे प्राप्त होतो जय ।। कार्य, प्रसंग, समय । ओळखावा ।। ८ ।। कार्य समजेना अंतरें । तें काय झुंजतें विचारें ।। युद्ध करावें खबरदारें । लोक राजी राखतां ।। ९ ।। दोन्ही दळें एकवटे । मिसळताती लखलखाटें ।। युद्ध करावें खणखणाटें ।। सीमा सोडूनिया ।। १० ।। देव मात्र उच्छादिला । जित्यापरीस मृत्यु भला ।। आपला स्वधर्म बुडविला असें समजावें ।। ११ ।। **मराठा तितुका**

मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा ।। येविषयीं न करतां तकवा । पूर्वज हांसती ।। १२ ।। मरण हाक तो चुकेना । देह वाचवितां वांचेना । विवेकी होऊनि समजानां । काय करावें ।। १३ ।। देवद्रोही तितुके कुत्ते । मारूनि घालावे परते ।। देवदास पावती फत्ते । यदर्थीं संदेह नाहीं ।। १४ ।। देव मस्तकीं धरावा । अवघा हलकल्लोळ करावा ।। मुलुखबुडवा कीं बडवावा । धर्मसंस्थापनेसाठीं ।। १५ ।। " उतारा किंचित् मोठा आहे. परंतु राजकारण शब्दाचा प्रत्यक्ष उपयोग न करितां लोकांच्या स्वराज्यविषयक भावनाच नव्हेत तर युद्धविषयक भावनाही उद्दीपित करण्यांत समर्थ किती बाकबगार होते ही गोष्ट वाचकांच्या मनावर पूर्णपणें बिंबण्याकरितां एवढा मोठा उतारा द्यावा लागला. समर्थांनीं दासबोधांत तमोगुणाचें वर्णन करितांना " डोळां युद्धचि पहावें । रण पडेल तेथें जावें । ऐसें घेतलें जीवें । तो तमोगुण ।। " (२·६·७) असें म्हटलें आहे, त्यावरून समर्थांना युद्ध प्रिय नव्हतें म्हणून ते राजकारणी संत नव्हते असें एक विलक्षण विधान एका विद्वान् आक्षेपकांनीं केलें आहे. त्यांना तमोगुणाचें वर्णन करितांना समर्थांची मनोभूमिका कोणत्या प्रकारची होती व ते कोणत्या अधिकाराच्या लोकांना उद्देशून लिहीत होते हें समजलें नाहीं. समर्थवाङ्मय लक्ष्यपूर्वक त्यांनीं वाचलें असतें तर " आतां असो हें बोलणें । अधिकारासारखें घेणें ।। " (दासबोध १·१·१६) ही समर्थांची सूचना ते विसरले नसते; व युद्धाच्या तमोगुणांत समावेश करणारे समर्थ शिवाजीमहाराजांना क्षात्रधर्माचा उपदेश करतांना " युद्ध करावें खणखणाटें । सीमा सांडूनिया ।। " " देवद्रोही तितके कुत्ते । मारूनि घालावे परते ।। " असें सडेतोडपणानें सांगतात, याचें मर्म त्यांना कळलें असतें. वरील उपदेश करणारे व " मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा "।। ही गर्जना करणारे समर्थ, एकनाथ, तुकारामांप्रमाणें केवळ भक्तिमार्गी संत होते असें कांहीं पदवीधर विद्वान् आक्षेपक खुशाल म्हणोत. निर्विकार चरित्रकार व इतिहासकार त्यांना भक्तिमार्गप्रेरित राजकारणी संतच म्हणतील असें आम्हांस वाटतें. रे. डेमिंगसारख्या परधर्मी व परखंडस्थ चरित्रकारांनीं तसें म्हटलें ही आहे. तिसरा उतारा शिवाजीमहाराजांच्या मृत्यूनंतर समर्थांनीं संभाजीस पाठविलेल्या ओंवीबद्ध पत्रांतील आहे:—" अखंड सावधान असावें । दुश्चित कदापि नसावें ।। तजवीजा करीत असावें । एकांतस्थळीं ।। १ ।। श्रेष्ठीं जें मिळविलें । त्यासाठीं भांडत बैसलें ।। मग जाणावें फावलें । गनीमासी ।। २ ।। ऐसें सहसा करूं नये । दोघे भांडतां तिसऱ्यास फावे ।। धीर धरूनि महत्कार्य । समजून करावें ।। ३ ।। राजी राखतां जग । मग कार्यभागाची लगबग ।। ऐसें जाणोनि सांग । समाधान राखावें ।। ४ ।। सकळ लोक एक करावे । गनीम निवटून काढावे । ऐसें करितां कीर्ति धांवे । दिगंतरीं ।। ५ ।। आधीं गाजवावे तडाखे । मग भूमंडळ धाके ।। ऐसें न करितां धक्के । राज्यास होती ।। ६ ।। समय, प्रसंग ओळखावा ।

राग निपटून काढावा ॥ आला तरी कळों न द्यावा । जनामध्यें ॥ ७ ॥ राज्यामध्यें सकळ लोक । सलगी देऊन करावे सेवक ॥ लोकांचे मनामध्यें धाक । उपजोंच नये ॥ ८ ॥ बहुत लोक मिळवावे । एक विचारें भरावे ॥ कष्टें करून घसरावे । म्लेंच्छावरी ॥९॥ आहे तितुके जतन करावे । पुढें आणिक मेळवावे ॥ महाराष्ट्र-राज्य करावें । जिकडे तिकडे ॥ १० ॥ लोकीं हिम्मत धरावी । शर्तीची तलवार करावी ॥ चढती वाढती पदवी । पावाल तेणें ॥ ११ ॥ शिवराजास आठवावें । जीवित्व तृणवत् मानावें ॥ इहलोकीं परलोकीं राहावें । कीर्तिरूपें ॥ १२ ॥ शिवराजाचें आठवावें रूप । शिवराजाचा आठवावा प्रताप ॥ शिवराजाचा आठवावा साक्षेप । भूमंडळीं ॥ १३ ॥ शिवराजाचें कैसें चालणें । शिवराजाचें कैसें बोलणें ॥ शिवराजाची सलगी देणें । कैसें असे ॥ १४ ॥ सकळ सुखाचा त्याग । करूनि साधिजे तो योग ॥ राज्यसाधनाची लगबग । कैसी असे ॥ १९ ॥ त्याहूनि करावें विशेष । तरीच म्हणावें पुरुष ॥ याउपरी आतां विशेष । काय लिहावें ॥ २० ॥"

(राजनीति, बा. स. वा., पुष्प ३ रें.)

हा ही उतार मोठा आहे. तो इतका विस्तारानें देण्यांत विशेष हेतु आहे. समर्थांनीं शिवाजीमहाराजांना राजधर्म व क्षात्रधर्म शके १५७१ सालीं अनुग्रह दिल्यानंतर सांगितले, त्या वेळीं "मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्र धर्म वाढवावा ॥" असा उपदेश केला. "सद्गुरु आणि सच्छिष्य । तेथें न लागती सायास" (५.३.७) असें दासबोधांत समर्थांनीं म्हटलें आहे. त्याप्रमाणें सद्गुरुसमर्थांच्या वचनावर विश्वास ठेवून सच्छिष्य शिवरायांनीं सर्व मावळे-मराठे—मिळवून स्वराज्य स्थापन करून महाराष्ट्र-धर्म वाढविला. समर्थांना अत्यानंद झाला. त्यावरून त्यांनीं 'आनंदभुवन' हें महाराष्ट्र-गीत तयार केलें. दुर्दैवानें शिवाजीमहाराजांचा अंतकाल लवकर झाला. समर्थांना फार वाईट वाटलें. त्यांनीं अन्नत्याग केला. फक्त दुधावर राहूं लागले. बाहेर फिरणें ही बंद केलें. महाराष्ट्राच्या दुर्दैवानें संभाजीमहाराजांनीं आपल्या पूज्य वडिलांचा कित्ता आपल्यापुढें ठेवून राज्यकारभार चालविला नाहीं. उत्तम पित्याचें प्रतिबिंब पुत्रांत उतरावयाचेंच असा सृष्टिनियम असता तर शिवाजीमहाराजांनंतर महाराष्ट्रावर दुर्धर प्रसंग ओढवला नसता. संभाजीमहाराज परप्रत्ययनेयबुद्धि व दुर्व्यसनी निघाले. शिवाजीमहाराजांच्या वेळच्या स्वराज्यप्राप्त्यर्थ साहाय्य केलेल्या इमानी नोकरांचा छळ आरंभिला, कित्येकांना हत्तीच्या पायाशीं बांधून मारलें. समर्थांचें मन शिवाजीमहाराजांच्या मृत्यूनें अगोदरच विव्हल झालें होतें; त्यांत संभाजीचीं अनन्वित कृत्यें ऐकून त्यांच्या ममाला वृद्धापकाळीं मोठा धक्का बसला. औरंगजेब मराठी सत्तेचा नाश करण्याची संधी पाहातच होता. तो प्रचंड सैन्य व ३२ कोट रुपयांचा खजिना घेऊन मराठी सत्तेचा नाश करण्याचें कंकण बांधून दिल्लीहून निघाला होता. तीस वर्षें जिवापाड मेहनत करून शिवाजीमहाराजांनीं स्थापन केलेली हिंदुपदपादशाही

लयास जातें कीं काय असें समर्थांना वाटलें. शिवाजीमहाराजांच्या मृत्यूमुळें ते दुःखांत होते, तरी हा दुःख करीत बसण्याचा काळ नाहीं असें समजून त्यांनीं लागलींच संभाजीमहाराजांना शुद्धीवर आणण्याकरितां एक ओंवीबद्ध पत्र लिहिलें. त्यांतील कांहीं ओंव्या वर दिल्याच आहेत. त्या ओंव्यांत राजकारण हा शब्द एकदां ही आलेला नाहीं; परंतु त्यांत त्यांनीं जो राजकारणाचा उपदेश केला आहे, तो हल्लींच्या विसाव्या शतकांतील सुप्रसिद्ध पाश्चिमात्य राजकारणपटु मुत्सद्यांच्या तोंडांतून ही प्रशंसेचे उद्गार काढवील इतका उत्कृष्ट आहे. शिवाजीमहाराजांनीं नुकता स्वराज्यस्थापनेस आरंभ केला होता; तेव्हां त्यांना समर्थांनीं "मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा ॥" असा उपदेश केला. त्याप्रमाणें महाप्रयासानें मराठ्यांना एकत्र करून, महाराष्ट्र धर्म वाढवून, यथाशास्त्र समारंभानें रायगडावर राज्याभिषेक करवून घेऊन शिवाजीमहाराज कैलासवासी झाले. त्यांच्या पश्चात् नवीन राज्य संपादन न करितां शिवाजीमहाराजांच्या तालमींतील लोकांचा छळ करण्यास जेव्हां संभाजीमहाराजांनीं आरंभ केला तेव्हां समर्थ त्यांना म्हणतात, "बहुत लोक मिळवावे । एक विचारें भरावे ॥ कष्ट करून घंसरावे । म्लेंच्छावरी ॥ आहे तितुकें जतन करावें । पुढें आणिक मिळवावें ॥ महाराष्ट्र राज्य करावें । जिकडे तिकडे ॥" हा प्रसंग पाहून केलेला उपदेश राजकारणांतील उत्तम धडा नाहीं असें कोण म्हणेल? त्या उपदेशांत 'राजकारण' हा शब्द नाहीं, परंतु 'राजकारण' मूर्तिमंत भरलेलें आहे.

समर्थ राजकारणी संत नव्हते, त्यांना 'राजकारण' माहीत नव्हतें, त्यांनीं 'राजकारण' केलें नाहीं व शिकविलें नाहीं, राजकारणाशीं त्यांचा बिलकुल संबंध नव्हता, ज्ञानदेव, एकनाथ, नामदेव, तुकारामप्रभृति साधुसंतांप्रमाणें ते फक्त भक्तिमार्गी संत होते; वरील साधुसंत "देह जावो अथवा राहो पांडुरंगीं दृढ भावो।" असें म्हणून श्रीविठ्ठलाचें भजन करीत, तर समर्थ "आतांच हा देह राहो अथवा जावो। भक्ति प्रेम भावो न सोडी सत्य ॥१॥ म्हणे रामदास वरी पडो आकाश राघवाची कास न सोडी सत्य ॥२॥" असें म्हणून श्रीरामाचें भजन करीत; वारकरीपंथाचें उपास्य दैवत "अठ्ठावीस युगें विटेवर कर ठेवुनि कटिं" उभा राहणारा श्रीविठ्ठल हा होता, समर्थसंप्रदायाचें उपास्य दैवत चवदा वर्षे वनवासांत फिरणारा कोदंडधारी श्रीराम एवढाच काय तो फरक, बाकी वारकरीपंथाच्या साधुसंतांप्रमाणें समर्थ हे केवळ भक्तिमार्गी संतच होते, असें म्हणून कांहीं चरित्रकार, इतिहासकार व निबंधकार समर्थांच्या राजकारणावर वेळीं अवेळीं आक्षेप घेतात; तेव्हां त्यांना राजकारण या शब्दाचा व्यापक अर्थ कळला नाहीं असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. सैन्यांचीं पथकें तयार करून समरांगणावर जाऊन शत्रूंशीं युद्ध करणें असा राजकारणाचा संकुचित अर्थ कांहीं आक्षेपक करतात. "शूर मावळे घेऊन शिवाजीमहाराजांच्या

तानाजीनें मरतां मरतां सिंहगड किल्ला घेतला, त्याप्रमाणें सशक्त सांप्रदायिक घेऊन समर्थांच्या-कल्याणानें एखादा किल्ला सर केला नाहीं म्हणून समर्थ राजकारणी नव्हते " असा राजकारणाचा संकुचित अर्थ कांहीं आक्षेपकांनीं केला आहे. आक्षेपकांचा हा कोटिक्रम लागू केल्यास वीरसुता, वीरपत्नी व वीरमाता जिजाबाई महाराणीसाहेब यांना ही राजकारण माहीत नव्हतें असें म्हणावें लागेल; कारण झांशीच्या लक्ष्मीमहाराणीसाहेब यांच्याप्रमाणें तरुण वयांत अश्वारूढ होऊन हातीं तलवार घेऊन मध्यरात्रीं किल्ल्यावरून उतरून शूर इंग्रजी शिपायांची फळी फोडून रणदेवतेप्रमाणें शौर्य गाजवीत त्या गेल्या नाहींत; व सर ह्यू रोजसारख्या युद्धकुशल सेनापतीकडून त्यांनीं महाराणी लक्ष्मीबाईप्रमाणें the best soldier on the side of the enemy is the Queen of Jhasi- शत्रुपक्षाकडील सर्वोत्तम योद्धा म्हणजे झांशीच्या महाराणीसाहेब होत, असें शिफारसपत्र ही मिळविलें नाहीं ! ! राजमाता जिजाबाई महाराणीसाहेब यांनीं बालशिवरायाला रामायणमहाभारतांतील वीररसात्मक गोष्टी सांगून, वीरपति सन्निध नसतांना व शिवनेरी किल्ल्याच्या आसपास शत्रुसैन्य घिरट्या घालीत असतांना ही न डगमगतां बालशिवरायाला क्षात्रधर्मास योग्य असें शिक्षण देऊन त्याच्या मनांत क्षात्रधर्माची स्फूर्ति उत्पन्न केली, व पुढें बालशिवराय प्रौढ झाल्यावर शूर मावळे जमा करून हिंदवी स्वराज्यस्थापनेच्या प्रयत्नास लागले, तेव्हां शिवाजीमहाराजांना अनेक संकटसमयीं धीर व आश्वासन देऊन, युक्तीच्या व मुत्सद्दीपणाच्या गोष्टी सांगून उपदेश केला व त्या योगानें त्यांना स्वराज्यस्थापनेच्या कामास प्रोत्साहन व उत्तेजन दिलें, म्हणून इतिहासकार जिजाबाईराणीसाहेबांनीं राजकारण केलें व शिकविलें असें म्हणतात.

समर्थांनीं शिवाजीमहाराजांना अनुग्रहानंतर राजधर्म व क्षात्रधर्म सांगितला व त्यांत " मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा ", " युद्ध करावें खबरदारें । लोक राजी राखतां ", " युद्ध करावें खणखणाटें । सीमा सांडुनी ", " मारितां मारितां मरावें । तेणें गती पावावें ॥ फिरोन येतां भोगावें । महद्भाग्य ", " अमर्याद फितवेखोर । त्यांचा करावा संहार " असा उपदेश केला. त्याच वेळीं निळो सोनदेव मुजुमदार व बाळाजी आवजी चिटणीस यांना सेवकधर्म सांगितला व त्यांत " सुचित करूनि अंतःकरण । आतां करावें राजकारण ॥ प्रमाण आणि अप्रमाण । समजलें पाहिजे ॥ " असा उपदेश केला. संप्रदायाच्या लक्षणांमध्यें ' राजकारण ' घालून हरिकथानिरूपणानंतर ' राजकारणा 'चा चतु:सूत्रींत उल्लेख करून सांप्रदायिकांना केवळ भक्तिमार्गी न होतां ' राजकारणा 'कडे ही लक्ष देण्याचा उपदेश केला व दासबोधांत बहुजन समाजाला " प्रपंचीं जाणे राजकारण" असा उपदेश करून राजकारणाशिवाय खरा प्रपंचच होत नाहीं अगर राजकारण हें प्रपंचाचें श्रेष्ठ स्वरूप आहे असें शिकविलें; व या योगानें परदास्यांत खितपत

पडलेल्या महाराष्ट्राला समर्थांनीं जागें करून कर्तव्यदक्ष केलें व शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनेकडे लोकांचीं मनें वळविलीं, म्हणून समर्थांनीं 'राजकारण' केलें व शिकविलें व ते 'राजकारणी' संत होते हें निःसंदिग्धपणें सिद्ध होतें.

समर्थांच्या राजकारणावर हल्ला करणारे कांहीं आक्षेपक राजकारणाचा फारच संकुचित अर्थ करून स्वतःस घोंटाळ्यांत पाडीत आहेत व दुसऱ्यांस घोंटाळ्यांत पाडण्याचा प्रयत्न करीत आहेत. मरहूम ग्लॅडस्टनसाहेब अगर डिझरायलीसाहेब यांनीं ड्यूक ऑफ मार्लबरो अगर ड्यूक ऑफ वेलिंग्टनसारखी रणक्षेत्रावर तलवार गाजविली नव्हती; परंतु त्यामुळें त्यांच्या राजकारणपटुत्वावर कोणीं हल्ला केल्याचा इतिहासांत उल्लेख नाहीं. सुप्रसिद्ध लेखक, वक्ते व राजकारणशास्त्रज्ञ एडमंड बर्क यांनीं रणांगणावर कधीं तलवार गाजविली नव्हती, तरी ग्लॅडस्टनसाहेब त्यांच्याविषयीं म्हणतात:—" If one wishes to study English politics, he must spend his days and nights over the works of Edmund Burke." भावार्थ:—" इंग्रजी राजकारणाचें अध्ययन कोणास करावयाचें असेल तर त्यानें एडमंड बर्कच्या ग्रंथांचें अहोरात्र पारायण केलें पाहिजे. " यावरून 'राजकारण' शास्त्रांतील उच्च पदवी मिळविण्यास रणक्षेत्रावरील विजयश्रीचे पट्टे छातीवर असलेच पाहिजेत असें नाहीं हें सिद्ध होतें. उलटपक्षीं रणक्षेत्रावर तलवार गाजविणाऱ्या योद्ध्यांना प्रसंगविशेषीं 'वर्तायाचे धडे' राजकारणपटु मुत्सद्दीच घालून देतात अशी साक्ष इतिहास देतो.

कित्येक असा आक्षेप घेतील कीं, समर्थ राजकारणी होते तर त्यांनीं पाश्चात्य ग्रंथकारांप्रमाणें 'राजकारण' शास्त्रावर स्वतंत्र ग्रंथ कां निर्माण केलेले नाहींत ? एडमंड बर्क यांनीं जसे *Reflections on the French Revolution* फ्रेंच राज्यक्रांतीवर विचार, *Present Discontents in America* अमेरिकेंतील सांप्रतचा असंतोष असे स्वतंत्र ग्रंथ लिहिले, त्याप्रमाणें समर्थांनीं " महाराष्ट्रांतील राज्यक्रांति " अगर " महाराष्ट्रांतील असंतोष " असा एखादा स्वतंत्र ग्रंथ राजकारणावर कां लिहिला नाहीं? याचें उत्तर असें कीं, समर्थकालीं हल्लींप्रमाणें निरनिराळ्या विषयांवर स्वतंत्र ग्रंथ निर्माण करण्याची पद्धति नव्हती, म्हणून अनेक विषयांवरील आपले विचार समर्थांना दासबोधांत निरनिराळ्या समासांत व स्फुट प्रकरणांत लिहावे लागले. दासबोधाविषयीं लिहितांना 'महाराष्ट्रीयांचें काव्यपरीक्षण' या निबंधांत डॉ. केतकरांनीं असेंच प्रतिपादन केलें. समर्थांचें इतर सर्व वाङ्मय डॉ. केतकरांनीं वाचलें असतें तर समर्थांच्या स्फुट कवितेविषयीं ही त्यांनीं असाच अभिप्राय दिला असता. शिवाय राजकारणावर अगर राजनीतिशास्त्रावर समर्थांनीं स्वतंत्र ग्रंथ कां लिहिले नाहींत, यास आणखी दोन कारणें आहेत. समर्थकालीं बहुजन समाज भक्तिमार्गी

होता. ज्ञानदेव, एकनाथ, तुकारामप्रभृति निवृत्तिमार्गी साधुसंतांचे भक्तिमार्गी ग्रंथ वाचण्याकडेच साक्षर लोकांची प्रवृत्ति होती. लहान मूल कडू औषध घेत नसलें म्हणजे त्याला खडीसाखर द्यावी लागते, त्याप्रमाणें साक्षर बहुजन समाज रूक्ष राजकारणावरील स्वतंत्र ग्रंथ वाचणार नाहींत म्हणून समर्थांना 'राजकारण' निवृत्ति-मार्गाच्या शिकवणींतून व 'भक्तिमार्ग विशद करणाऱ्या' ग्रंथांतून लोकांना शिकवावें लागलें. दुसरें कारण असें कीं त्या मोंगलाईच्या व सुलतानीच्या कालांत राजकारण अगर राज्यक्रांतीवर स्वतंत्र ग्रंथ लिहिले असते तर ते हल्लींच्या सुधारलेल्या कालाप्रमाणें नुसते जप्तच करण्यांत आले नसते, तर "इंद्राय स्वाहा, तक्षकाय स्वाहा" या न्यायानें ते एकदम अग्निसात् करण्यांत आले असते.

सुप्रसिद्ध रियासतकार श्रीयुत रावसाहेब गोविंदराव सरदेसाई म्हणतात, "इंग्लंडचा बेकन व हिंदुस्थानचा रामदास जवळ जवळ समकालीन म्हणण्यास हरकत नाहीं. बेकन हा आधुनिक पाश्चात्य विद्यांचा आद्य प्रवर्तक होता, म्हणून बेकनची व रामदासाची कामगिरी तोलून कोणती किती राष्ट्रोपयोगी झाली हें पाहणें विशेष बोधप्रद होईल." (लोकशिक्षण, वर्ष ४, अंक ६, जून १९३१) श्रीयुत सरदेसाई यांचें म्हणणें आम्हांस मान्य आहे. बेकनचा *Advancement of Learning* शिक्षणाची प्रगति—हा ग्रंथ आम्हीं वाचलेला आहे. तो पूर्वी बी. ए.च्या अभ्यासक्रमांत ठेवीत असत. त्याप्रमाणें त्याचे *Essays*—निबंध ही आम्हीं वाचले आहेत. लॉर्ड बेकन यांनीं आपल्या ग्रंथानें लोकांच्या विचाराला प्रगमनशील दिशा लावून दिली, म्हणून त्यांना Father of modern science—आधुनिक शास्त्राचा जनक असें म्हणतात. लॉर्ड बेकन यांच्या वेळीं तत्त्वज्ञानाचा कुशाग्रबुद्धीनें कीस काढणारा एक पंथ होता, त्यास Scholastic School म्हणत असत. त्या पंथाविरुद्ध लेख लिहून लॉर्ड बेकन यांनीं लोकांचें मन शास्त्रीय विषयाकडे वळविलें. समर्थकालीं महाराष्ट्रांतील साधुसंत पूर्वापार पद्धतीप्रमाणें केवळ भक्तिमार्गातील धडे बहुजन समाजाला देत होते, त्यांचा ही बराच इष्ट परिणाम झाला होता. साधुसंतांच्या भक्तिमार्गी शिकवणीनें बहुजन समाज धर्मांतर न करितां हिंदु धर्मांत राहिला व त्या योगानें स्वराज्याची भूमिका थोडीबहुत तयार झाली होती असें आम्हीं मागें म्हटलेंच आहे. परंतु केवळ भक्तिमार्गाचा अवलंब केल्यानें लोकोद्धार व देशोद्धार होणार नाहीं, असें बारा वर्षें तीर्थयात्रेकरितां सर्व देशांत फिरल्यानें समर्थांच्या नजरेस आलें व म्हणून त्यांनीं दूरदर्शीपणानें राजकारणाचा आपल्या संप्रदायलक्षणांत समावेश केला, व हरिकथानिरूपणानंतर लागलीच दासबोधांतील चतु:सूत्रींत राजकारण गोंवून दिलें. बहुजन समाजाच्या पूर्वापार चालत आलेल्या एकांगी व एकदेशी विचाराला नवीन दिशा लावून दिली, म्हणून लॉर्ड बेकन यांना 'आधुनिक शास्त्राचा जनक' असें अभिमानपूर्वक म्हणण्यांत येतें, त्याप्रमाणें समर्थांनीं भक्तिमार्गांत राजकारण

गोंवून तत्कालीन लोकांना राजकारणाविषयीं विचार करण्याची व राजकारणाशिवाय खरा प्रपंच होत नाहीं असें समजून स्वराज्यस्थापनेच्या कार्यास मदत करण्याची नवीन दिशा लावून दिली म्हणून त्यांना महाराष्ट्रांतील "धर्मयुक्त राजकारणाचे आद्य प्रवर्तक" असें अभिमानपूर्वक पदवीदान करून त्यांच्या अलौकिक कामगिरीविषयीं विद्वान् रियासतकारांनीं आपली कृतज्ञता प्रदर्शित करावयास पाहिजे होती; तसें न करितां "राजनीतिशास्त्रावरील ग्रंथांतसुद्धां मॅकेव्हिलीइतकें दासबोधास स्थान मिळणार नाहीं, बेकनच्या तोडीचें प्रगतिपोषक विवेचन समर्थांच्या ग्रंथांत आढळत नाहीं, म्हणून त्यांचे ग्रंथ पंचतंत्र, इसापनीति यांच्या मालिकेंतले सामान्य नीतीचे म्हणून गणतां येतील. अर्थात् 'समर्थ हे महाकर्तृत्वाचे राष्ट्रपुरुष होते, ते इतिहास बनविणारे महापुरुष होते' या पांगारकरांच्या विधानांचें प्रो. पेंडसे समर्थन करितात तर इतिहास बनविणारीं कोणतीं कृत्यें समर्थांनीं केलीं त्याचा पाढा वाचला जाईल तेव्हांच या विषयांत आक्षेपकांचीं तोंडें बंद होतील." असें विद्वान् रियासतकार श्री. सरदेसाई म्हणतात, (लोकशिक्षण, जून १९३१, पृष्ठ ३८८.) तेव्हां देशाचें दुर्दैव होय असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें.

श्री. सरदेसाई हे इतिहासकार या नात्यानें महाराष्ट्राच्या पूर्ण परिचयाचे आहेत. त्यांचें इतिहासाचें वाचन, अध्ययन व लेखन एकसारखें पाव शतकाहून अधिक वर्षें सुरू आहे. मराठी रियासत लिहून त्यांनीं महाराष्ट्राला उपकृत करून ठेविलें आहे. मराठी रियासत—पूर्वार्ध (सुधारून वाढविलेली नवी आवृत्ति) हें पुस्तक त्यांनीं सन १९१५ सालीं प्रसिद्ध केलें. त्याला आधारभूत अशा मराठी व इंग्रजी ग्रंथांची यादी त्यांनीं दिली आहे; तेव्हां त्यांच्या रियासतींतील समर्थविषयीं मताला महत्त्व दिलें पाहिजे असें आम्हीं पहिल्या भागांत म्हटलेंच आहे. श्री. सरदेसाई यांनीं वर नमूद केलेल्या रियासतीच्या भागांत आधारभूत दिलेल्या अनेक ग्रंथांच्या आधारें समर्थांचें यथार्थ वर्णन केलें आहे. ते आपल्या रियासतींत म्हणतातः—"स्वतः तो (रामदास) अत्यंत निरिच्छ व सदाचारसंपन्न होता...... 'बोले तैसा चाले' व 'आधीं करावें मग बोलावें' असा त्याचा बाणा असल्यामुळें कोणास ही चार गोष्टी सांगण्यास तो समर्थ होता. सर्व धर्मांचें, सर्व पंथांचें रहस्य त्यास कळलें होतें. त्याचे कोणी शत्रू नव्हते, त्याची निंदा कोणीं आजपावेतों केलेली नाहीं. तुकारामासारख्यांनींसुद्धां त्यास वंदिलें आहे. बहुतेक साधुसंत प्रथम गृहस्थाश्रमी असून, अनेक संकटें किंवा त्रास झाल्यामुळें, गुरूपदेश घेऊन मग साधु बनले. तसा ही प्रकार रामदासाचा नव्हता. सर्व गोष्टी अनुकूल असतां जन्मापासूनच तो खरा साधु होता. समाजास ऐहिक व पारमार्थिक कर्तव्य शिकविण्याला विद्वत्तेनें, अनुभवानें ब्रह्मवर्चस्वानें महाराष्ट्रांतील एकंदर संतमंडळींत त्याच्याइतका समर्थ दुसरा कोणी झाला नाहीं; म्हणून त्या एकट्यासच समर्थ असें सार्थ अभिधान मिळालें." (पृष्ठ १०७)

परंतु आतां त्यांनीं वर लोकशिक्षणांत उद्धृत केलेल्या उताऱ्यांत लिहिल्या-प्रमाणें समर्थांविषयीं आपला अभिप्राय बदलला आहे. पूर्वी समर्थांना एकेरी शब्दांत उल्लेख करून त्यांना बहुमानाची यथार्थ पदवी दिली होती. आतां त्यांचा बहुवचनांत उल्लेख करून ते त्यांच्या बहुमानाच्या स्थानापासून पदच्युत करण्याच्या विचारांत आहेत. " विचारांत आहेत " असें आम्ही मुद्दाम म्हणतों, याचें कारण वरील 'लोकशिक्षणांतील' लेखाच्या आरंभीं ते म्हणतात, "माझी मराठी रियासत स. १९१५ सालीं प्रसिद्ध झाली. तिची पुनरावृत्ति काढण्याचा योग येईल, तेव्हांच या विषयावरील माझीं मतें पुन्हा मांडण्याची जरूर पडेल." म्हणजे वर 'लोकशिक्षणां'तील उद्धृत केलेल्या उताऱ्यांत त्यांनीं जो अभिप्राय दिला आहे तो त्यांचें **अखेरचें मत** नसून " नवीन अभ्यासकां "नीं कांहीं मासिकांत जे लेख लिहिले आहेत त्यांवरून त्यांना ज्या सकृद्दर्शनीं शंका वाटतात त्या त्यांनीं सत्यान्वेषणाकरितां मराठी वाचकांपुढें मांडल्या आहेत असें दिसतें.

एवढें प्रस्तावनेदाखल म्हणून आतां त्यांच्या म्हणण्याचा अगर शंकांचा सविस्तर विचार करूं. राजनीतिशास्त्रावरील ग्रंथांत समर्थांना मॅकिव्हेलीइतकें स्थान दासबोधास मिळणार नाहीं असें श्री. सरदेसाई म्हणतात. म्हणजे दासबोध हा राजनीतिशास्त्रावरील ग्रंथ आहे हें त्यांना मान्य आहे. परंतु त्याचा दर्जा मॅकिव्हेलीच्या राजशास्त्रावरील ग्रंथाइतका श्रेष्ठ नाहीं असें त्यांना वाटतें. मॅकिव्हेलीचें चरित्र व त्याच्या ग्रंथांविषयीं माहिती थोडक्यांत देतों, म्हणजे राजकारणांत अनीतीच्या मार्गांचा अवलंब करण्यास उपदेश करण्यांत मागें-पुढें न पाहणारा मॅकिव्हेली श्रेष्ठ दर्जाचा, कीं " राजकारण बहुत करावें । परंतु कळोंचि नेदावें ।। परपीडेवरी नसावें । अंतःकरण ।।" (दासबोध ११. ५. १९) अशी नीतिन्यायाची मर्यादा राखून राजकारणाचा उपदेश करणारे समर्थ श्रेष्ठ दर्जाचे, याचा वाचकच निर्णय करतील. मॅकिव्हेली हा इटाली देशांत एक मुत्सद्दी व लेखक होऊन गेला. त्याचा जन्म सन १४६९ त झाला व तो १५२७ सालीं मृत्यु पावला. त्याचें शिक्षण बेताबाताचेंच होतें; परंतु त्याची लेखन-पद्धति विशेष जोरदार व परिणामकारक होती. सन १४९४ सालीं त्याला कारकुनाची नोकरी मिळाली. १४९८ सालीं तो प्रजासत्ताक राज्याच्या चॅन्सेलरचा चिटणीस झाला व त्यानें तें काम १५१२ पर्यंत केलें. या १४ वर्षांत त्याला निरनिराळ्या राजांकडे परराष्ट्रीय वकील या नात्यानें जावें लागत असे. हें काम करीत असतांना त्याचीं राजकारणांतील मतें बनलीं. ( These embassies were the school in which Machivelli formed his political opinions. ) १५०२ सालीं त्याचें मेरिएटा कॉर्सिनी नांवाच्या स्त्रीशीं लग्न झालें. त्याचें खासगी वर्तन अनीतीचें होतें, तरी तो तिच्याशीं चांगल्या रीतीनें

बागत असे व तिला त्याच्यापासून अनेक मुलें झालीं. याच वर्षी त्याला व्हॅलेन्टाइसचा प्रसिद्ध ड्यूक सीझर बोर्जिया याजकडे परराज्य मंत्री म्हणून पाठविलें. या जागीं असतांना या ड्यूकनें कृष्णकारस्थानें करून आपल्या सैन्यांतील अधिकाऱ्यांना कपटानें कसें ठार मारलें, हें मॅकिव्हेलीस पाहण्यास सांपडलें. हा ड्यूक सीझर बोर्जिया साहसी, धोरणी, क्रूर व कपटी होता. मॅकिव्हेलीला ह्या ड्यूकविषयीं अत्यंत आदर वाटे. मॅकिव्हेलीचा राजकारणावरील प्रसिद्ध ग्रंथ जो 'प्रिन्सिपि' यांतील काल्पनिक नायक ड्यूक व्हॅलेंटिनी याचें चित्र या ऐतिहासिक कपटी, धूर्त, साहसी, कृष्णकारस्थानी व क्रूर सीझर बोर्जियावरून रेखाटलें आहे. १५१२ सालीं त्याची नोकरी गेली व त्याला फ्लॉरेन्समधून एकदम हद्दपार करण्यांत आलें व पुढें कटांत सामील असल्याच्या संशयावरून त्यास कैद झाली. परंतु मार्च १५१३ सालीं नवीन पोप आल्यावर त्याची सुटका झाली. नंतर पुढील १५ वर्षांत त्यास पुन्हा दरबारांत नोकरी मिळाली नाहीं. या कालांत त्यानें राजकारणावरील आपले प्रसिद्ध ग्रंथ लिहिले. यानें अनेक ग्रंथ लिहिले, परंतु त्याचा प्रिन्सिपि (*Principi*) हा ग्रंथ अत्यंत प्रसिद्ध आहे. या पुस्तकाचें थोडक्यांत वर्णन असें केलें आहे:—"This famous book is an analysis of the methods whereby an ambitious man may rise to sovereign power." भावार्थः—महत्त्वाकांक्षी मनुष्यानें राजसत्ता कशी मिळवावी या विषयाच्या मार्गांचें या प्रसिद्ध पुस्तकांत विवेचन केलें आहे. राष्ट्रीय सैन्य स्थापन करून त्याच्या मदतीनें इताली देशाचें एकीकरण करावें अशी त्याची उत्कट इच्छा होती व त्या-करितां त्यानें हें पुस्तक लिहिलें. त्यांतील राजनीतिशास्त्राच्या विवेचनावरून युरोपांतील "अर्वाचीन राजकारणशास्त्राचा आद्य प्रवर्तक" असें मॅकिव्हेलीस म्हणतात. परंतु एडमंड बर्कप्रमाणें त्याचें राजकारण श्रेष्ठ दर्जाचें नाहीं. बर्कसाहेबांच्या '*Present Discontents in America*' या पुस्तकांतील राजनीतिशास्त्रांतील तत्त्वें उदात्त व त्रिकालाबाधित आहेत. हल्लींच्या इंग्लिश लोकांनीं हिंदुस्थानविषयक धोरणांत तीं अनुकरण करण्यासारखीं आहेत. मॅकिव्हेलीच्या सुप्रसिद्ध ग्रंथांतील तत्त्वें उदात्त नाहींत. मॅकिव्हेली या नांवाचा उच्चार केल्याबरोबर कुटिल व कृष्णकार-स्थानी राजकारणाची कल्पना डोळ्यांपुढें उभी राहते. "In the realm of politics, he postponed morals to political expediency," असें मॅकिव्हेलीविषयीं पाश्चात्य लोकच म्हणतात. त्याचा भावार्थ असा कीं, राजकारणांत नीतिच्या तत्त्वां-कडे लक्ष न देतां इष्टकार्यसिद्धि करावी असें त्याचें मत होतें. त्याचा मुख्य जो ग्रंथ 'प्रिन्स' याविषयीं पुढीलप्रमाणें मत आहे:—" This work contains the most pernicious maxims of government founded on the vilest principles." (Universal Information Dictorary) भावार्थः—अत्यंत नीच तत्त्वांवर उभार-

लेल्या राज्यशास्त्राच्या दुष्ट म्हणी या ग्रंथांत आहेत. समर्थांचें राजकारण फार वरिष्ठ दर्जाचें होतें, हें सिद्ध करण्याकरितां मॅकिव्हेलीचें अल्प चरित्र व त्याच्या राजकारणाच्या दर्जाचें पाश्चात्य ग्रंथकारांनींच केलेलें वर्णन द्यावें लागलें. रियासतकार म्हणतात कीं, राजकारणशास्त्रांत दासबोधास मॅकिव्हेलीइतकें स्थान मिळणार नाहीं. आम्ही ही तसेंच म्हणतों, पण निराळ्या अर्थानें म्हणतों. राजकारणावरील ग्रंथांत मॅकिव्हेलीचें स्थान, इष्टकार्याच्या सिद्धीबद्दल योग्यायोग्य कारणांचा विचार केल्यास, अत्यंत कनिष्ठ दर्जाचें आहे, असें पाश्चात्य ग्रंथकारांचें ही मत आहे. श्री. नरसिंह चिंतामण केळकर हे नवीन प्रसिद्ध केलेल्या 'राज्यशास्त्र' या ग्रंथांत म्हणतात:—"मॅकिव्हेली यानें आपल्या राजाला बोध करण्याकरितां 'प्रिन्स' या पुस्तकांत नमुनेदार राजाची कुटिल राजनीति कशी असावी हें लिहिलें; पण त्या पुस्तकाचा त्या राजाला उपयोग झाल्याचें कोणीं लिहून ठेवलेलें नाहीं." पान (४) वरील विवेचनावरून वाचकांना दिसून येईल कीं—The end justifies the means हा मॅकिव्हेलीच्या राजकारणाचा आत्मा. "राजकारण बहुत करावें। परंतु परपीडेवरी नसावें। अंतःकरण॥" हा समर्थांच्या राजकारणाचा आत्मा. शिवाजीमहाराजांना राजधर्म व क्षात्रधर्म यांत सांगितलेल्या राजकारणांत, व संभाजीमहाराजांना लिहिलेल्या ओंवीबद्ध पत्रांत, समर्थांनीं कुटिल राजनीतीचा उपदेश केलेला नाहीं. तेव्हां समर्थांचें राजकारण किती श्रेष्ठ दर्जाचें होतें हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल. पुढें वरील लेखांत विद्वान् रियासतकार म्हणतात कीं, "बेकनच्या तोडीचें प्रगतिपोषक विवेचन समर्थांच्या ग्रंथांत आढळत नाहीं म्हणून समर्थांचे ग्रंथ पंचतंत्र व इसापनीति यांच्या मालिकेंत ते सामान्य नीतीचे म्हणून गणतां येतील." हें निराधार विधान इतिहासशास्त्रज्ञ रियासतकारांनीं केलेलें पाहून आम्हांस आश्चर्य वाटतें. समर्थांचे ग्रंथ जो सूक्ष्म रीतीनें वाचून पाहील त्यास धार्मिक विषयांत, सामाजिक विषयांत व राजकीय विषयांत त्यांचें विवेचन तत्कालीन समाजाला नवीन वळण घालून देणारें व प्रगतिपोषक होतें असेंच आढळून येईल. सामान्य लोक देव्हाऱ्यांतील देवालाच खरा देव मानतात, या समाजांत रूढ झालेल्या समजुतीविरुद्ध समर्थांच्या प्रगतिपोषक विवेचनाचें उदाहरण देतों:—"देव्हाऱ्याचा उठोनि देव। करूं नेणें सर्व जीव॥ तयाचेनि ब्रह्म कटाव। निर्मिला न वचे॥ (दासबोध, ८. १. २२) देवें निर्मिली हे क्षिति। तिचे पोटीं पाषाण होती॥ तयासीच देव म्हणती। विवेकहीन॥ (८. १. २९.) जो सृष्टि निर्माणकर्ता। तो ये सृष्टीपूर्वीं होता॥ मग हे तयाची सत्ता। निर्माण झाली॥ (८. १. ३०) कुलाळ[1] पात्रापूर्वीं आहे। पात्रें कांहीं कुलाळ नव्हे॥ तैसा देव पूर्वींच आहे।

१. कुंभार.

पाषाण नव्हे सर्वथा ।। ( ८. १. ३१ )" गागाभट व वामनपंडितांसारखे जाडे विद्वान् ग्रंथरचना संस्कृतांतच केली पाहिजे, मराठींत करूं नये, अशा मताचे होते, त्यांची भीड अगर पर्वा न करितां समर्थ त्यांच्यावर कसा कोरडा उगारतात तो पहा:— "एक म्हणती मऱ्हाटी काये । हें तों भल्यासि ऐकों नये । ती मूर्खें नेणती सोये । अर्थान्वयाची ।। ( ७. १. ३२) लोहाची मांदुस¹ केली । नाना रत्नें सांठविलीं ।। ते अभाग्यानें त्यागिलीं । लोखंड म्हणोनी ।। ( ७. १. ३३) तैसी भाषा प्राकृत । अर्थ वेदांत आणि सिद्धांत ।। नेणोनि त्यागी भ्रांत । मंदबुद्धिस्तव ।। ( ७. १. ३४) आहांच सांपडतां धन । त्याग करणें मूर्खपण ।। द्रव्य घ्यावें सांठवण । पाहोंच नये ।। ( ७. १. ३५ ) परिस देखिला अंगणीं । मार्गीं पडला चिंतामणी ।। आव्हावेल महागुणी । कूपामध्यें ।। ( ७. १. १६) तैसें प्राकृतीं अद्वैत । सुगम आणि सुप्रचित अध्यात्म लाभे अकस्मात् । तरी अवश्य घ्यावें ।। (७. १. ३७ ) भाषापालटें कांहीं। अर्थ वाया जात नाहीं ।। कार्यसिद्धि ते सर्व ही । अर्थांच पासी ।।( ७. १. ४१ ) अर्थ सार भाषा पोंचट । अभिमानें करावी खटपट ।। नाना अहंतेनें वाट । रुधिली मोक्षाची ।। ( ७. १. ४४)". संस्कृत भाषेंतच ग्रंथ करावे या वृथाभिमानी अहंमन्य पंडितांच्या उलट समर्थांचें वरील प्रगतिपोषक विवेचन आहे असें विद्वान् रियासतकारसाहेबांना ही शांत विचारांतीं कबूल करावें लागेल असें आम्हांस वाटतें. उत्तरायणांत दिवसा पुण्यक्षेत्रीं मरण पावल्यानें सद्गति मिळेल असा बहुजन समाजाचा समज होता व आहे. त्या उलट समर्थांचें प्रगतिपोषक विवेचन पहा. "उत्तरायण तें उत्तम । दक्षिणायन तें अधम ।। हा संदेहीं वसे भ्रम । साधु तो निःसंदेह ।। ( दासबोध, ७. १०. १३ ) शुक्ल पक्ष उत्तरायण । गृहीं दीप दिवा² मरण ।। अंतीं राहावें स्मरण । गतीकारणें ।। ( ७. १. १४ ) इतुकें नलगे योगियासी । तो जिताचि मुक्त पुण्यराशी ।। तिलांजली पापपुण्यासी । दिधली तेणें ।। (७.१.१५) जे कां जीव मुक्त ज्ञानी । त्यांचें शरीर पडो रानीं ।। अथवा पडो स्मशानीं । तरी धन्य झालें ।। ( ७. १. २५) साधूचा देह खितपला । अथवा श्वानादिकीं भक्षिला ।। तें प्रशस्त न वाटे मनाला । मंदबुद्धिस्तव ।। ( ७. १. २६ )" बेकनसाहेबांच्या तोडीचें हें प्रगतिपोषक विवेचन आहे, असें विद्वान् रियासतकारसाहेबांनीं निर्विकारपणानें एकांतांत विचार केल्यास त्यांना खास वाटेल अशी आमची खात्री आहे. समर्थांच्या वाङ्मयांत बेकनप्रमाणें प्रगतिपोषक विवेचनाचीं अनेक स्थळें दाखवितां येतील. समर्थांचा अद्भुत चमत्कारावर कटाक्ष आहे. 'कुनाट गोसावी' या स्फुटांत त्यांनीं अद्भुत चमत्काराविरुद्ध प्रगतिपोषक विवेचन सविस्तरपणें केलें आहे. समर्थांमध्यें एक मोठा दोष होता तो हा कीं, त्यांनीं लॉर्ड बेकनप्रमाणें

---

१. पेटी. २. दिवसा.

'*Advancement of Learning*' असें चित्ताकर्षक नांव देऊन प्रगतिपोषक विवेचन-प्रधान असा स्वतंत्र ग्रंथ लिहिला नाहीं. परंतु त्या वेळीं असे निराळ्या विषयांवर स्वतंत्र ग्रंथ लिहिण्याची पद्धत नव्हती व तसा ग्रंथ लिहिला असता तर बहुजन समाजानें तो वाचला नसता व बहुजन समाजाच्या विचाराला नवीन वळण देऊन इतिहास बनविण्याचें काम म्हणजे ह. प. पांगारकर म्हणतात त्याप्रमाणें महा-कर्तृत्वाच्या राष्ट्रपुरुषाचें काम त्यांच्या हातून झालें नसतें. बहुजन समाजाच्या विचारास नवें वळण देऊन नवीन इतिहास बनविण्यास लोकांच्या मन:प्रवृत्ति पहाव्या लागतात, हें समाजशास्त्राचें आद्य तत्त्व आहे व तें समर्थांना पूर्णपणें माहीत होतें, म्हणूनच डॉ. केतकर म्हणतात कीं, "दासबोधांत मानसशास्त्र आहे व समाजशास्त्र हि आहे." (महाराष्ट्रीय काव्यविवेचन, पृ. ४५)

वरील लोकशिक्षणाच्या अंकांत रियासतकार म्हणतात:—"चिकित्सक बुद्धीचे लोक विचारतात कीं, समर्थांनीं राजकारण केलें म्हणजे कोणत्या गोष्टी केल्या?" (पृष्ठ ३८६) केवळ भक्तिमार्गी बहुजन समाजाच्या एकदेशी दृष्टीला त्यांनीं राज-कारणामध्यें पडण्याचें नवीन वळण लावून दिलें, शिवाजीमहाराजांना राजधर्म, क्षात्र-धर्म व त्यांच्या नोकरांना सेवकधर्म सांगितला, त्यांस राजकारणाचें महत्त्व पटवून दिलें, आध्यात्मिक संप्रदायांत राजकारणाचा समावेश केला, यासंबंधीं मागें आम्हीं सविस्तर विवेचन केलें आहेच. समर्थांनीं या गोष्टी केल्या ही सामान्य गोष्ट केली नाहीं, या गोष्टी करणें म्हणजेच राजकारण करणें होय, असें रियासतकारांना लागलींच वाटून ते ३८८ पृष्ठांत मुद्दा बदलून म्हणतात:—"रामदासांच्या ग्रंथांत राजकारणाचें वर्णन असेल, खुद्द त्यांना जें राजकारण पटलें त्याचें ठसकेदार वर्णन जळजळीत शब्दांनीं त्यांच्या ग्रंथांत उतरलें असेल, तर त्यांतील उत्कृष्ट वेंचे नित्यपाठाकरितां आपण वापरूं व वापरतों, परंतु त्यामुळें राष्ट्रस्थितीवर कोणता ठळक परिणाम झाला हें पुराव्यानें सिद्ध होईपर्यंत आजकालचे चिकित्सक त्यांस कृतिमान पुरुषांच्या (men of action) कोटींत बसविणार नाहींत." समर्थांनीं राजकारण केलें म्हणजे कोणत्या गोष्टी केल्या ही चिकित्सकांची शंका जाऊन आतां ते समर्थांनीं राजकारण केलें व त्याचें वर्णन ठसकेदार रीतीनें त्यांनीं आपल्या ग्रंथांत केलें हें कबूल करतात, परंतु त्याचा राष्ट्रस्थितीवर ठळक परिणाम कोणता झाला? असा प्रश्न विचारतात. पृष्ठ ३८६ मध्यें ही ते असाच प्रश्न विचारतात, "समर्थांनीं मठ स्थापिले, त्यांच्या द्वारां ते शत्रूंची बातमी आणून शिवाजीस किंवा त्याच्या हस्तकांस पोहोंचवीत, समर्थांचे शिष्य हे मराठी राज्याचे गुप्त हेर होते, अशा कांहीं गोष्टी पुराव्यानें सिद्ध केल्या पाहिजेत. अफजुलखानाचा नाश.....अशा कांहींतरी ठळक गोष्टी रामदासानें शिवाजीकडून करविल्या, असें सिद्ध केल्या-वांचून नुसतें रामदासानें राजकारण केलें या विधानाची मातबरी काय?" समर्थ-

शिष्यांनीं गुप्त हेरांचें काम केलें कीं काय, अगर अफझुलखानाचा नाश शिवाजी-महाराजांकडून समर्थांनीं करविला कीं काय, हा आमच्या मतें गौण प्रश्न आहे. मुख्य प्रश्न हा आहे कीं, केवळ भक्तिमार्गी बहुजन समाजाची समर्थांनीं राज्य-कारभाराकडे प्रवृत्ति वळवून त्यांना नवीन दिशा लावून दिली कीं काय? या मुद्याचें सविस्तर विवेचन करून त्यांनीं तशी नवीन दिशा लावून दिली हें आम्हीं वाचकांच्या नजरेस आणून दिलें आहे. आतां चिकित्सक म्हणतात त्याप्रमाणें वरील कांहीं गोष्टींचा पुरावा पाहिजे असेल तर तो ही आहे. अफझुलखान विजापुराहून निघाला तेव्हां कल्याणस्वामींनीं एक सांकेतिक ओंवीबद्ध पत्र लिहिलें होतें. सदरहू ओंवीबद्ध पत्र महत्त्वाचें असल्यानें सबंध देतों:—

विवेकें करावें कार्यसाधन । जाणार नरतनु हें जाणोन ॥
पुढील भविष्यार्थी मन । रहाटोंच नये ॥ १ ॥
चालों नये असन्मार्गीं । सत्यता बाणल्या अंगीं ॥
रघुवीरकृपा ते प्रसंगीं । दासमाहात्म्य वाढवी ॥ २ ॥
रजनीनाथ आणि दिनकर । नित्य नेमें करिती संचार ॥
घालिताती येरझार । लाविलें भ्रमण जगदीशें ॥ ३ ॥
आदिमाया मूळ भवानी । हेचि जगाची स्वामिनी ॥
एकांतीं विवंचना करोनी । इष्ट योजना करावी ॥ ४ ॥

हें पत्र पूर्वीं 'विहारी' पत्रांत व 'विजापूरच्या आदिलशाहीचा शेवट' या पुस्तकांत प्रसिद्ध झालें होतें. पहिल्या तीन ओंव्यांचीं व शेवटच्या अर्ध्या ओंवीचीं आद्याक्षरें वाचलीं म्हणजे 'विजापूरचा सरदार निघाला आहे' असें वाक्य होतें. नंतर शेवटच्या ओंवींचे शेवटले दोन चरण 'एकांतीं विवंचना करोनी । इष्ट योजना करावी ॥' असे एकदम वाचावयाचे आहेत म्हणजे लिहिणाराच्या मनांतील अर्थ समजतो. यावरून सांकेतिक पत्रांचा ही राजकीय बातमी महाराजांना पोहोंचविण्यास ते उपयोग करीत असत हें सिद्ध होतें. अशीं पुष्कळ पत्रें सांपडणें अशक्य नसलें तरी फार कठिण आहे. कारण 'इशारतीचें बोलणें नये.' अशी समर्थांची शिकवण होती. चुकून एकादें पत्र सांपडावयाचें. असलीं कामें उघड पत्रद्वारें होत नसतात, हें इजिप्त, कोरिया वगैरे देशांतील स्वातंत्र्यार्थ चळवळींच्या इतिहासांवरून चिकित्सक आक्षेपकांना समजलें पाहिजे. समर्थशिष्याचें एकतरी श्लोकबद्ध पत्र सांपडलें हें आश्चर्य होय. समर्थांनीं अफझुलखानास मारविल्या-बद्दल ही समर्थप्रतापांत उल्लेख आहे. "समर्थें आकारपूर्वक यवनासी मारविलें। मग चाफळक्षेत्र उभें केलें ॥ श्रीतुळजामाउलीसी स्थापिलें। प्रतापगडीं ॥" (स. प्र. १८. ३६) आकारपूर्वक मुसलमान म्हणजे अफझुलखान होय. एक विद्वान् चिकित्सक आक्षेपक समर्थप्रतापांतील हा श्लोक खरा नसला पाहिजे असें म्हणतात.

कारण वरील श्लोकांत "चाफळचें देवस्थान उभारण्यापूर्वी रामदासांनीं आकारपूर्वक यवन मारिल्याची कथा आहे" असें ते म्हणतात. परंतु चिकित्सकांनीं जरा अधिक लक्षपूर्वक वरील श्लोक वाचला असता म्हणजे त्यांना चाफळचें क्षेत्र उभारण्यापूर्वी अफझुलखानास मारविलें असें श्लोकांत आहे असें समजून आलें असतें. चाफळचें देवालय, पूर्वी स्मशानभूमी होती ती टेकडीवजा जागा समर्थांनीं साफ करून शके १५७० त बांधलें. त्या वेळीं हल्लीं चाफळ कसबा गांव म्हणजे **चाफळ क्षेत्र** आहे तेथें एक लहानं चाफळवाडी होती. नाणघोळ हें मुख्य गांव होतें व तेथें देशपांडे राहत असत. चाफळवाडीस 'तर्फ नाणेघोळ' अशी भाषा वापरीत असत. शके १५८१ सालीं अफझुलखानास शिवाजीमहाराजांनीं प्रतापगडावर आत्मरक्षणार्थ युक्तीनें मारलें व नंतर चाफळवाडीचें कसबा चाफळ क्षेत्र झालें व तेथें बाजारपेठेंत समर्थांनीं एक नवीन मारुती बसविला. सुप्रसिद्ध अकरा मारुती हे शके १५६७ ते १५७० या चार वर्षांत स्थापन केलेले आहेत त्या मारुतींत **चाफळ क्षेत्रांतील** मारुतीचा उल्लेख नाहीं. **चाफळ देवस्थानांतील** दोन मारुतींचाच उल्लेख आहे. शके १५८१ नंतर चाफळक्षेत्र वसविलें व नंतर नवीन मारुती बाजारपेठेंत स्थापन केला, अशी वस्तुस्थिति आहे. म्हणून समर्थप्रतापांतील वरील श्लोकाला कालविपर्यासाचा दोष येत नाहीं. 'श्रीशिवाजीप्रताप' या ग्रंथांत महाराजांनीं शाइस्तेखानावर हल्ला केला, तो समर्थांच्या सांगण्यावरून केला असा स्पष्ट उल्लेख आहे. "आणि स्वामींनीं सांगावें तसें घडावें असे कित्येक अनुभव आले. त्यावरून शाइस्तेखानावर जाण्याची मसलत स्वामींची." समर्थांचे राजकारणी शिष्य निळो सोनदेव मुजुमदार व त्यांचे सुप्रसिद्ध पुत्र रामचंद्र नीलकंठ अमात्य या पितापुत्रांना समर्थांचा अनुग्रह होता. निळोपंतांना व बाळाजी आवजी चिटणिसांना अनुग्रहानंतर सेवकधर्मांत राजकारणाचा उपदेश केला. रामचंद्र नीलकंठांना मुंज झाल्यापासून समर्थांचा सहवास मिळाला. या तीन समर्थशिष्यांनीं कोणत्या प्रकारचें राजकारण केलें व त्याचा राष्ट्रस्थितीवर काय परिणाम झाला यांचें वर्णन रियासतींत ही सांपडतें. इतर शिष्यांनीं ही आपापल्या परीनें परिस्थित्यनुरूप शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनेच्या कार्यास मदत केली आहे. असें असतां विद्वान् रियासतकार समर्थांच्या राजकारणाच्या ठसकेदार वर्णनाचा राष्ट्रस्थितीवर कोणता ठळक परिणाम झाला असें विचारतात याचें आश्चर्य वाटतें. शिवाजीमहाराज समर्थांचा राजकारणांत एकांतांत सल्ला घेत होते याविषयीं लेखी पुरावा उपलब्ध झाला आहे. समर्थ-शिष्य दिवाकर गोसावी हे समर्थ व शिवाजीमहाराज यांच्या भेटीचीं व त्यांच्या अपूर्व कृत्यांचीं टिपणें चाफळ संस्थानच्या बाकेनिशी दप्तरांत करून ठेवीत असत. शके १५९७ सालीं ज्येष्ठ मासीं केलेलें एक टिप्पण रामदास आणि रामदासी, भाग १५,

लेखांक ४२, पान २४९, यांत प्रसिद्ध झालें आहे. तें टिप्पणः–२ पुरवणी पत्र. " दक्षिणेस दिंडी उघडून बैसले. राजे यांचा एकांत प्रसंग जाणोनि खंड प्रभू संकेतें सूचना करितां आम्ही पूज्यासनिं" बैसलों इत्यादि इतर हकीकतीचें लांब पत्र आहे. या पुरवणीपत्रावरून मुख्य दोन गोष्टींचा बोध होतो. ( १ ) रायगडावरील राजवाड्याच्या एक खोलीचें दक्षिणेकडील दार उघडून समर्थ व शिवाजीमहाराज यांची कांहीं गुप्त मसलत चालली होती, ( २ ) दोघांची मसलत सुरू होण्यापूर्वी खंड प्रभूनें ( खंडो बाळाजी चिटणीस ) बाकीच्या लोकांस दूर बसण्यास खुणेनें सांगितलें. ज्याअर्थी राजगडावरील एका गुप्त मसलतीचा शोध लागला आहे, त्या अर्थी रायगडावर व इतर ठिकाणीं दोघांच्या राजकीय बाबतींत अनेक सल्ला-मसलती झाल्या असल्या पाहिजेत. तेव्हां समर्थ हे शिवाजीमहाराजांचे फक्त मोक्ष-गुरूच होते, त्यांचा महाराजांच्या राजकारणाशीं कांहीं संबंध नव्हता, असा जो कित्येक चिकित्सकांचा आक्षेप आहे तो निरर्थक ठरतो; व वर केलेल्या विवेचना-वरून व दिलेल्या दोन ठळक उदाहरणांवरून श्री. सरदेसाई यांच्या आक्षेप ही निरर्थक ठरतो.

'लोकशिक्षणां'तील वरील लेखांत पृष्ठ ३८८ मध्यें आणखी एक चमत्का-रिक विधान आहे, त्याविषयीं विचार करणें जरूर आहे:–" तुर्क लोकांनीं ख्रिस्ती लोकांवर प्राणांतिक आघात सुरू करतांच पीटर दि हरमिट या फ्रेंच साधूनें युरो-पांतील ख्रिस्ती राष्ट्रांस चेतवून इस्लामाशीं प्रचंड झगडा सुरू केला. त्याबद्दल ख्रिस्ती राष्ट्रांस पीटर साधूच्या कृतीचा विलक्षण अभिमान वाटतो. तशा तऱ्हेचा अभिमान आम्हां महाराष्ट्रीयांस **अंत्यजांसहित समस्त** लहानथोरांस वाटण्याजोगें समर्थांचें कोणतें कृत्य दाखवितां येईल ? " 'लोकशिक्षणां'तील वरील लेखांत श्री. सरदेसाई, पीटर दि हरमिटप्रमाणें अभिमान वाटण्यासारखें समर्थांनीं काय केलें ? असें विचारतात तेच श्री. सरदेसाई आपल्या रियासतींत म्हणतातः—"पीटर साधूचें व रामदासाचें बरेंच साम्य आहे. पीटरनें ख्रिस्ती राष्ट्रांस लढण्यास लाविलें, म्हणून त्याचें साधुत्व कमी झालें नाहीं; त्याच्याबद्दल सर्व ख्रिस्ती राष्ट्रांची अत्यंत पूज्य बुद्धि कायम आहे. **त्याच प्रकारचे रामदासाचे प्रयत्न असून अखिल राष्ट्रानें गर्व वाहवा, असा तो त्या काळीं निपजला.**" ( प्रकरण तिसरें, पान १०९ ) आतां ते वर लिहिल्याप्रमाणें प्रश्न विचारतात, तेव्हां त्यांच्या या म्हणण्याचा विचार करणें जरूर आहे. अगोदर वरील विधानांतील पूर्वार्धाचा विचार करूं. पीटर दि हरमिट हे फ्रान्स देशांतील अमीन्स या गांवीं धर्मोपदेशक होते. त्यांचा जन्मकाळ कळत नाहीं. परंतु ते सन ११५१ त वारले. क्लेर्मोट येथील स. १०९५ मधील प्रसिद्ध धर्मप्रवचनानंतर ख्रिस्ती धर्मोपदेशकांनीं तुर्कांविरुद्ध धर्मयुद्ध (क्रुसेड) करण्याची जी चळवळ सुरू केली त्यांत त्यांनीं भाग घेतला होता. लोकांवर त्यांच्या

उपदेशाचा चांगला परिणाम होऊन त्यांची इतकी प्रसिद्धि झाली कीं, लोक त्यांच्या गाढवाची देखील पूजा करूं लागले. सन १०९६ मध्यें पीटर कांहीं शेतकऱ्यांची एक तुकडी घेऊन एशियामायनरकडे गेले, त्यांच्या म्हणण्याविरुद्ध त्यांच्या लोकांनीं तुर्कांशीं युद्ध सुरू केलें. पीटर निराश होऊन कॉन्स्टांटिनोपलकडे गेले असतां त्यांच्या तुकडीस तुर्कांनीं कापून काढलें. नंतर तेथें पीटरसाहेबांस कोणी अनुयायी न राहिल्यामुळें राजे लोक येईपर्यंत वाट पाहून १०९७त त्यांच्या सैन्यांत पीटर जाऊन मिळाले. पहिल्या धर्मयुद्धामध्यें पीटर यांनीं कांहीं विशेष महत्त्वाचें काम केलें नाहीं. ( He played a subordinate part in the history of the 1st crusade.) सन १०९८ मध्यें ॲंटिआकच्या वेढ्यांत उपासमार होऊं लागल्यामुळें त्यांनीं पळून जाण्याचा प्रयत्न केला म्हणून त्यांना ' fallen star ' म्हणूं लागले. १०९९ मध्यें आकीच्या वेढ्यांत पीटरना 'Treasurer of the alms' भिक्षा-द्रव्याचा खजिनदार नेमलें. आस्कालानच्या लढाईच्या पूर्वी भिक्षेकऱ्यांच्या मेळ्याचा पुढारी होऊन ते जरूसलाम येथें गेले होते; त्यानंतर ते फ्रान्सकडे परत गेले व पुढें त्यांचें नांव धर्मयुद्धामध्यें दिसून येत नाहीं. सन ११५१त फ्रान्समधील एका देवळांत ते मारले असें कित्येक म्हणतात. पहिलें धर्मयुद्ध पीटरनीं सुरू केलें. १०९६ सालीं पीटर जरूसलाम येथें गेल्यावर त्यांना तेथें देवाळयांत प्रत्यक्ष जीझस खाइस्ट यांनीं दर्शन दिलें व तुर्कांच्या उलट धर्मयुद्ध करण्यास सांगितलें, अशी दंतकथा ( Legend ) आहे. परंतु या दंतकथेस कांहीं आधार नाहीं असें आधुनिक इतिहासकार म्हणतात. तें कसें ही असो, पीटरनीं धर्मयुद्धाचा लोकांस उपदेश केला व ते एकदां एक तुकडी घेऊन तुर्कांच्या राजधानीस व जरूसलामकडे गेले होते ही गोष्ट खरी मानण्यास हरकत नाहीं. रियासतकार म्हणतात, पीटरप्रमाणें समर्थांनीं इस्लामशीं प्रचंड झगडा सुरू केला नाहीं. झगडा सुरू करणें याचे दोन अर्थ होतात. प्रत्यक्ष युद्धांत सामील होणें अगर लोकांना युद्ध करण्यास उपदेश करून त्यांच्यामध्यें युद्धभावना उत्पन्न करणें. हल्लींचे पाश्चात्य राष्ट्रांतील युद्धमंत्री दुसऱ्या प्रकारांत मोडतात. पहिले वुइल्यम पिट ( लॉर्ड चॅथम ) यांनीं १७५७ मध्यें जगांतील सर्व ब्रिटिश प्रदेशांत आपल्या बुद्धिकौशल्यानें व युद्धोपदेशानें इंग्रजी सैनिकांच्या मनांतील युद्ध-भावना प्रदीप्त करून इंग्लंड देशाला जय मिळवून दिला, म्हणून त्यांची ख्याति आहे. ते स्वतः रणक्षेत्रावर कधीं गेले नाहींत. फ्रान्सच्या क्रांतीच्या वेळीं एडमंड बर्क यांनीं *'Reflections on the French Revolution'*—फ्रान्सच्या उत्क्रांतीवर विचार—हें उत्तम पुस्तक लिहून फ्रान्सच्या राणीला मारल्याबद्दल लोकांचीं मनें क्रांतिकारकांच्या उलट चेतवून देण्याचा प्रयत्न केला. यावरून असें सिद्ध होतें कीं, निसर्गतः कित्येकांची मनःप्रवृत्ति राष्ट्राकरितां रणक्षेत्रावर जाऊन पराक्रम गाजवण्याकरितां उत्सुक असते व कित्येकांची मनःप्रवृत्ति आपल्या बुद्धिबलानें राष्ट्रांतील

लोकांमध्यें धर्माभिमान व राष्ट्राभिमान उत्पन्न करून लोकांमध्यें चैतन्य उत्पन्न करण्याकडे असते. चॅथम, ग्लॅड्स्टन्, समर्थ हे दुसऱ्या प्रकारच्या मनःप्रवृत्तीच्या लोकांमध्यें येतात. समर्थ हे निसर्गतः आध्यात्मिक प्रवृत्तीचे असल्यामुळें त्यांनीं मंत्रिमंडळामध्यें अगर प्रधानमंडळामध्यें चॅथम, ग्लॅडस्टन्, मोरोपंत पिंगळे, रामचंद्र नीलकंठ यांच्याप्रमाणें नोकरी धरून राष्ट्रकार्य केलें नाहीं. समर्थ शिवरायांना व लोकांना राजकारणांत उपदेश करून फक्त योग्य दिशा दाखवीत व आपण अध्यात्मविचारांत निमग्न असत. पीटर दि हरमिट यांनीं इस्लामशीं झगडा करण्यास लोकांना प्रवृत्त केलें तसें समर्थांनीं काय केलें, असा रियासतकार प्रश्न विचारतात. शिवाजीमहाराजांच्या मृत्यूनंतर संभाजीला लिहिलेल्या ओंवीबद्ध पत्रांतील पुढील ओंवीकडे विद्वान् रियासतकारांचें लक्ष गेलें असतें तर त्यांच्या सारख्या निस्पृह व सत्याभिमानी इतिहासकारांनीं वरील विधान केलें नसतें अशी आमची खात्री आहे. ती ओंवी अशी—“ बहुत लोक मिळवावे। एक विचारें भरावे ॥ कष्टें करूनि घसरावें। म्लेंच्छावरी ॥ ”

आतां रियासतकारांच्या वरील विधानाच्या उत्तरार्धाचा विचार करूं. “ तशा तऱ्हेचा अभिमान आम्हां महाराष्ट्रीयांस, अंत्यजांसहित समस्त लहानथोरांस वाटण्याजोगें समर्थांचें कोणतें कृत्य दाखवितां येईल? ” वरील विधानांत ‘ अंत्यजांसहित समस्त ’ हा शब्दप्रयोग रियासतकारांनीं कां घातला हें स्पष्टपणें कळत नाहीं. तत्कालीन थोर विभूतींनीं अंत्यजांसह सर्व महाराष्ट्रजनतेस अभिमान वाटण्यासारखें कृत्य केलें, परंतु समर्थांनीं मात्र तसें कृत्य केलें नाहीं असें समजावयाचें कीं काय? समर्थ वर्णाश्रमधर्माचा अभिमान बाळगणारे होते हें आम्हांस मान्य आहे. त्याप्रमाणें शिवाजीमहाराज ही वर्णाश्रमाचे अभिमानी होते. “ शिवाजीचा उद्योग राष्ट्रोपकारी म्हणून सदैव ठळक दिसणारा आहे.” असें रियासतकार वरील ‘ लोकशिक्षणा’च्या अंकांत म्हणतात ( पृष्ठ ३८८). वरील विधान आम्हांस पूर्णपणें मान्य आहे. परंतु शिवाजीमहाराजांच्या राष्ट्रोपकारी उद्योगांत केवळ अंत्यजांना अभिमान वाटण्यासारखें त्यांनीं एकादें निराळें कृत्य केल्याचें इतिहासांत नमूद नाहीं, त्यांच्या रियासतींत ही नमूद नाहीं. महाराष्ट्रांतील सर्व लोकांना महाराजांनीं महत्प्रयासानें स्वातंत्र्य मिळवून दिलें, त्याप्रमाणें त्यांनीं अंत्यजांना ही तेंच स्वातंत्र्य मिळवून दिलें. शिवाजीमहाराजांच्या अष्ट प्रधानांत एखादा अंत्यज नेमल्याचें उदाहरण इतिहासांत सांपडत नाहीं, अगर अंत्यज मागसलेले म्हणून त्यांच्याकरितां शिष्यवृत्त्या ठेवून स्वतंत्र शाळा काढल्याचा ही इतिहासांत दाखला नाहीं. शिवाजीमहाराज उदार मनाचे होते. सुदैवानें ते आणखी कांहीं वर्षें जगले असते तर त्यांनीं अंत्यजांची स्थिति सुधारून त्यांच्या पलटणी ही तयार केल्या असत्या. परंतु ते हयात होते तोंपर्यंत त्यांचें सर्व लक्ष्य स्वातंत्र्य मिळविण्याच्या खटपटींत होतें. त्यांना सामाजिक शिक्षणाकडे

विशेष लक्ष देण्यास वेळच सांपडला नाहीं. त्यांतल्या त्यांत जी गोष्ट त्यांच्या विशेष नजरेस आली तिकडे त्यांनीं लक्ष दिलें. नेताजी पालकर कांहीं विशेष कामाकरितां मुसलमान झाला होता, त्याला मातोश्रींच्या संमतीनें हिंदु करून घेऊन त्यांनीं पतितपरावर्तनाचा पहिला धडा घालून दिला. महाराजांचें सर्व लक्ष्य स्वराज्यस्थापनेकडे लागलें असल्यामुळें त्यांना अंत्यजोद्धाराकडे लक्ष देण्यास वेळ सांपडला नाहीं. म्हणून महाराजांचें स्वराज्यस्थापनेचें कृत्य महाराष्ट्रीयांस, अंत्यजांसहित समस्त लहानथोरांस, अभिमान वाटण्यासारखें नव्हतें असें म्हणतां येईल असें आम्हांस वाटत नाहीं. त्याचप्रमाणें समर्थांची गोष्ट आहे. लोक धर्मांतर करीत होते, त्याला प्रतिबंध करण्याकरितां वर्णाश्रमधर्म पाळण्याचा त्यांना आपल्या ग्रंथांतून उपदेश करावा लागला. त्यांच्या सांप्रदायांत ब्राह्मणांप्रमाणें क्षत्रिय, वैश्य व शुद्र ही होते. अंत्यजांना प्रतिबंधक असें त्यांच्या सांप्रदायाच्या वीस लक्षणांत एक ही लक्षण नाहीं; एवढेंच नव्हे तर अंत्यजोद्धाराला अनुकूल असा एक उत्कृष्ट उल्लेख समर्थ-वाङ्मयांत सांपडतो; तिकडे रियासतकारांचें लक्ष गेलें नाहीं असें वाटतें. तो उल्लेख 'रामदास आणि रामदासी' भाग १०, 'करुणाष्टकें' या पुस्तकांत करुणाष्टक २१५ 'भजन' यांत आहेः--"भेटो कोणी एक नर धेड महार चांभार। त्याचें राखावें अंतर[१] याचें नांव भजन॥ दुःख नेदावें कोणाला उंचनीच जरी झाला। अंतरात्मा ओळखिला। तोचि जाणावा सज्जन॥ मिळाला तो भक्त झाला। दोष मिळेना तयाला॥ देव प्रत्यक्ष कोपला। अहंभाव दुर्जन॥ राजी राखावें सकळ। बरेंपण सर्वकाळ॥ नित्य आनंदाची वेळ। काळभरी वंदन॥ ९॥ (करुणाष्टकें पृष्ठ १६३)." समर्थांची भजनाची व्याख्या लक्षांत ठेवण्यासारखी आहे. 'उदासीन हे वृत्ति जीवीं धरावी। अती आदरें सर्व सेवा करावी॥ सदा प्रीति लागो तुझे गुण गातां। रघूनायका मागणें हेंचि आतां॥ १॥" असें म्हणून नित्य श्रीरामाचें भजन करणारे समर्थ "धेड, महार, चांभार" यांचें "अंतर राखावें" "याचें नांव भजन" अशी भजनाची व्याख्या करितात. यावरून समर्थांचे सामाजिक विचार किती प्रगतिपर होते हें दिसून येतें. अस्पृश्यांविषयीं सहानुभूति असणारा आणखी एक उल्लेख समर्थवाङ्मयांत सांपडतो, तिकडे ही रियासतकारांचें लक्ष गेलें नाहीं. तो उल्लेख, समर्थ शके १५९९त सामानगड किल्ल्यावर गेले असतांना त्यांनीं इमारत-प्रकरणावर दोन स्फुट-समास सांगून महाराजांना उपदेश केला, त्यांतील दुसऱ्या समासांत आहेतः--"लोहार सुतार कुंभार। कामगार लहानथोर॥ मांग महार चांभार। नाना याती॥ ३॥" किल्ल्यावरील कामास नाना जातींचे लोक लागतात; त्यांत मांग, महार, चांभार या जातींचे लोक ही लहानथोर कामगारांत

१. अंतःकरण.

असावेत असा स्पष्ट उपदेश समर्थांनीं महाराजांस केला आहे. इंग्रज सरकारचें राज्य १००।१५० वर्षें झाल्यावर अस्पृश्यांना नोकऱ्या देण्याविषयीं ठराव होऊं लागले आहेत. शिवाजीमहाराजांना राज्याभिषेक झाल्यावर तिसऱ्या वर्षीच समर्थांनीं महाराजांना अस्पृश्यवर्गाला लहानथोर नोकऱ्या देण्याविषयीं उपदेश केला आहे. असें असतां अंत्यजांना अभिमान वाटण्यासारखें समर्थांनीं कोणतें कृत्य केलें असा प्रश्न विचारतात याचें आश्चर्य वाटतें. "समर्थांचे ग्रंथ, पंचतंत्र व इसापनीति यांच्या मालिकेंत ते सामान्य नीतीचे म्हणून गणतां येतील," असें म्हणण्याचें रियासतकार धाष्टर्य करतात याचें आश्चर्य वाटतें. पंडित विष्णुशर्मा यांस राजपुत्रास नीति शिकविण्याकरितां एका राजानें शिक्षक नेमलें होतें. त्यानें राजपुत्राला इसापसाहेबाप्रमाणें चिमणीकावळ्यांच्या व सिंहकोल्ह्यांच्या काल्पनिक गोष्टी सांगून राजनीति शिकविली. राजधर्म, क्षात्रधर्म, सेवकधर्म व संभाजीमहाराजांना पाठविलेलें पत्र यांत समर्थांनीं शिवाजीमहाराजांना, त्यांच्या नोकरांना व राजपुत्रांना राजकारणाचा उपदेश करून जीं उदात्त राजनीतीचीं तत्त्वें शिकविलीं, त्यांत पंचतंत्र अगर इसापनीति यांतील उंदरामांजरांच्या मनोरंजक गोष्टींप्रमाणें एखादी तरी गोष्ट रियासतकार दाखवून देतील काय? तेव्हां समर्थांचें राजकारण पंचतंत्र अगर इसापनीति यांच्या मालिकेंतलें सामान्य नीतीचें नव्हतें व मॅकिव्हेलीप्रमाणें तें कुटिल नीतीचें ही नव्हतें हें वरील विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत येईल. लॉर्ड बेकनच्या तोडीचें प्रगतिपोषक विवेचन समर्थांच्या ग्रंथांत आढळतें हें आम्ही वर दाखविलेंच आहे. प्रगतिपोषक विचारांत लॉर्ड बेकन व समर्थ यांचें साम्य आहे. दोघांच्या आचारांत मात्र मोठा फरक होता. न्यायाधिशाच्या पवित्र आसनावर बसून लॉर्ड बेकन यांनीं न्यायदानांत द्रव्यराशी घेऊन आपला तळीराम गार केला, असें इंग्रज इतिहासकारच राजरोसपणें सांगतात. शिवाजीमहाराजांनीं सर्व राज्य समर्थांच्या झोळींत टाकलें तरी त्याचा स्वीकार न करतां निस्पृहपणानें तें महाराजांना परत दिलें व अखेरपर्यंत वैराग्याचा बाणा कायम ठेवला. महाराजांच्या आग्रहावरून २०।२५ वर्षांच्या अखेर चाफळमठाकरितां त्यांनीं महाराजांची सनद स्वीकारली. यावरून प्रगतिपोषक विचारांत बेकन व समर्थ यांचें साम्य होतें; तरी नीतिविषयक आचरणांत दोघांमध्यें जमीनअस्मानचें अंतर होतें. म्हणून समर्थांची राजनीति व प्रगतिपोषक विवेचन लॉर्ड बेकनची राजनीति व प्रगतिपोषक विवेचन यांपेक्षां श्रेष्ठ होतें असें आम्ही म्हणतों.

वरील विवेचनावरून रावसाहेब गोविंदराव सरदेसाई यांचे समर्थांवरील आक्षेप किती निराधार आहेत हें वाचकांना कळून येईल. राजकारण या शब्दाचा अर्थ फार व्यापक आहे व तें निरनिराळ्या प्रकारांचें असूं शकतें हें ही वाचकांना कळून येईल. समर्थांच्या महंतांच्या राजकारणाविषयीं कै. राजवाडे म्हणतातः—"राजकारण

म्हणजे धर्मराज्याला पोषक असा उद्योग. शहाजीराजे, दादाजी कोंडदेव व शिवाजीराजे यांनीं चालतें बोलतें राजकारण प्रचलित केलें होतें. त्यांच्या राजकारणाला पोषक असे उद्योग समर्थांच्या महंतांना करावे लागत व ते कर्तव्य म्हणून अवश्य करावे लागत. शहाजी, दादाजी, शिवाजी अशासारख्यांची पाठीराखी समर्थांच्या महंतांस होती व अशांच्या उपक्रमसिद्ध्यर्थ ते महंत उद्योग करीत असत. ( रामदास आणि रामदासी, भाग १५, पृष्ठ २७० ) समर्थांनीं हिंदुस्थानांत अनेक ठिकाणीं मठ स्थापन करून त्यांत महंतांची योजना केली. त्यांत त्यांचा मुख्य उद्देश धर्मजागृति करण्याचा होताच, परंतु स्वराज्याला पोषक असे उद्योग करणें हें ही त्यांचें कर्तव्य होतें, हें वरील उताऱ्यावरून दिसून येईल. रामदास आणि रामदासी, भाग १७, लेखांक ६७, पृष्ठ ६१, यांत ही कै. राजवाडे यांनीं समर्थांच्या राजकारणाविषयीं विचार प्रगट केले आहेत ते ही मननीय आहेत. त्यांतील कांहीं भाग पुढें देतों:— " लोक एका सूत्रांत आकर्षिण्यास समर्थांचा पहिला उपाय भक्ति. आकर्षिलेल्या लोकांचा धर्मरक्षणार्थ उपयोग घडून येण्यास समर्थांचा दुसरा उपाय राजकारण. मोंगलाची लष्करी किंवा मुलकी नोकरी करणें हें समर्थांचें राजकारण नव्हतें. समर्थांचें राजकारण म्हणजे धर्मरक्षी ऐसा जो शिवाजीराजा त्याला साहाय जेणेंकरून होईल तें राजकारण. मठ व मठपति यांच्या द्वारां ब्राह्मणमंडळ्या, क्षत्रियमंडळ्या, वैश्यमंडळ्या व शूद्रमंडळ्या जागोजाग स्थापून शिवराजाचें राजकारण जेणेंकरून सुगम व सुफळ होईल अशी परिस्थिति समर्थांनीं उत्पन्न केली. समर्थांनीं हें जें यंत्र निर्माण केलें त्याच्या योगक्षेमाचा बोजा समर्थांनीं शिवराजावर एका पैचा ही टाकला नाहीं. शेवटपर्यंत त्या यंत्रांतील मठाधिपतींनीं आपला योगक्षेम भिक्षेवर चालविला. लोकांची मनोरचना धर्मराज्य-प्रवण व स्वराज्य-प्रवण करण्याची ही पूर्व तयारी आपल्या अंमलांत नसलेल्या प्रांतांत शिवराजाला आणि कोणत्या ही राजाला करतां येणें शक्य नव्हतें. ही पूर्व तयारी समर्थांसारखे योगीराज गुप्त व प्रगट संस्था स्थापून करूं शकतात. ......" याच खंडांत अन्य ठिकाणीं कै. राजवाडे म्हणतातः—"श्रीसमर्थ स्थूल किंवा सूक्ष्म राजकारणांत कधीं पडत नसत. त्यांच्या हालचालीचा प्रांत देशांतील **ठळकठळक स्त्रीपुरुषांच्या मनोभूमि रामराज्याकडे प्रवण करण्याचा होता.** " वरील उताऱ्यावरून राजकारण या शब्दाचा अर्थ किती व्यापक होतो व समर्थांचें राजकारण कोणत्या प्रकारचें होतें हें स्पष्टपणें कळतें. रणांगणावर लढणारे योद्धेच फक्त राजकारणी पुरुष असें कित्येक आधुनिक चिकित्सक म्हणतात, त्यांच्या राजकरणाचा अर्थ किती आकुंचित आहे, हें यावरून व्यक्त होतें. जेव्हां राज्यक्रांति होते, तेव्हां अखेर रणांगणावर योद्धे विजयश्री मिळवून स्वातंत्र्य संपादन करितात अशी पूर्वेतिहास साक्ष देतो हें खरें आहे; परंतु त्यापूर्वीं बहुजन समाजाची बुद्धि स्वातंत्र्य-प्रवण करण्याकरितां कवि, ग्रंथकार, लेखक व वक्ते यांची

जरूरी लागते हें ही तितकेंच खरें आहे. एकोणिसाव्या शतकांत इटाली देश स्वतंत्र झाला, त्याला गॅरिबॉल्डी यांचें शौर्य जितकें कारणीभूत झालें, तितकेंच काव्हूर यांचें मुत्सद्दीपणाचें धोरण व राजकारण हीं कारणीभूत झालीं. काव्हूर यांस 'इटाली' चा रामदास असें श्री. वासुदेव दामोदर मुंडले यांनीं म्हटलें आहे तें या कारणा-करितांच होय. श्री. मुंडले यांनीं काव्हूर यांचें चरित्र लिहिलें आहे व त्या पुस्तकाचें नांवच 'इटलीचा रामदास' असें नांव ठेविलें आहे.

समर्थ राजकारणी संत होते असें म्हटल्यानें त्यांच्या साधुसंतपणास कमीपणा येतो असें कित्येकांना वाटण्याचा संभव आहे व कित्येकांनीं तसा आक्षेप ही घेतला आहे. परंतु तो आक्षेप चुकीचा आहे असें आम्हांस वाटतें. राजकारण समाज-शास्त्राचा व नीतिशास्त्राचा एक भाग आहे व बहुजन समाजाला योग्य नीतीचा मार्ग दाखवून त्यांना कर्तव्यदक्ष करणें हें मुत्सद्दी लोकांप्रमाणें साधुसंतांचें ही काम आहे. बहुजन समाजाला राष्ट्रहिताकरितां कर्तव्यदक्ष करण्याचा प्रयत्न करतांना मुत्सद्दी लोक नीतिशास्त्राच्या मूलभूत तत्त्वांकडे विशेष लक्ष देत नाहींत व केव्हां केव्हां मॅकिव्हेलीसाहेबांप्रमाणें the end justifies the means या तत्त्वाचा स्वीकार करून मुळींच लक्ष देत नाहींत. केवळ भक्तिमार्गी संत बहुजन समाजाला भक्तीचा व नीतीचा उपदेश करून राष्ट्रहिताचें एक मोठें कार्य करितात. क्वचित् कांहीं साधु-संत ज्ञानोत्तर कर्माची आवश्यकता नाहीं, म्हणून सर्वकाल अध्यात्मविचारांत निमग्न असतात. समर्थ केवळ राजकारणी मुत्सद्दी नव्हते व केवळ भक्तिमार्गी संत ही नव्हते. समर्थांच्या उपदेशांत राजकारणाचें व धर्मकारणाचें, प्रपंचाचें व परमार्थाचें—प्रवृत्तिमार्गाचें व निवृत्तिमार्गाचें मधुरमीलन झालेलें आहे. समर्थांच्या चरित्रांत राजकारण व धर्मकारण यांचें मधुर मीलन झालें हें खरें मानल्यास त्या योगानें साधुसंतांच्या सिंहासनावरील त्यांचें स्थान थोडें तरी खालीं जाईल असें कित्येक म्हणतात. राजकारणप्रांतांत प्रवेश करणें म्हणजे रजोगुणाविषयक प्रांतांत शिरणें आहे असा त्यांच्या म्हणण्याचा रोख दिसतो. रामचंद्र नीलकंठ अमात्य, मोरोपंत पिंगळे, ग्लॅडस्टनसाहेब, प्रिन्स बिस्मार्क यांच्याप्रमाणें जहागिरी अगर बडे पगार घेऊन समर्थांनीं राजकारण केलें असतें तर समर्थांच्या राजकारणास रजोगुणाची छटा लागण्याचा संभव होता. समर्थांचा तसा कल दिसत असता तर त्यांना शिवाजीमहाराजांनीं प्रधानमंडळांत अत्यंत श्रेष्ठ जागा दिली असती. महाराजांनीं पौराणिक कीर्तिमान् राजांप्रमाणें सर्व राज्य समर्थांना अर्पण केलें, तरी तें त्यांनीं परत महाराजांना अर्पण केलें व क्षात्रधर्माप्रमाणें प्रजेचें योग्य पालन करून राज्य करण्यास त्यांना उपदेश केला. तेव्हां समर्थांच्या राजकारणांत स्वार्थाची किंचित् ही छटा नसल्यानें त्यांच्या राजकारणास रजोगुण स्पर्श करूं शकत नाहीं.

रे. डेमिंगसाहेब म्हणतातः—

To make Ramdas primarily a political teacher and secondly a religious teacher, is to give the wrong emphasis, putting him in a category, where he does not belong. भावार्थ—रामदासांचा मुख्य उद्देश राजकारणाचा उपदेश करण्याचा होता व धर्मोपदेश करणें हें दुय्यमपणाचें कर्तव्य आहे असें ते समजत असें म्हणणें म्हणजे वस्तुस्थितीचा विपर्यास करणें आहे. डेमिंगसाहेबांचें म्हणणें आम्हांस मान्य आहे; परंतु समर्थ राजकारणी संत होते असें म्हणणारे लोक समर्थांनीं धर्मकारणापेक्षां राजकारणाला श्रेष्ठ समजत असत असें कधीं ही म्हणत नाहींत. डेमिंगसाहेबांचा त्यांच्यावर तो वृथा आरोप आहे. समर्थ राजकारणी संत होते असें म्हणणाऱ्या पक्षाला " मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण " ॥ हें मत पूर्ण मान्य आहे. राजकारणाच्या बाबतींत समर्थांची शिकवण तुकारामप्रभृति भक्तिमार्गी साधुसंतांपेक्षां निःसंशय भिन्न होती असें म्हटल्यानंतर डेमिंगसाहेब म्हणतात:–Yet with all his emphasis on the practical, Ramdas remained to the end of his life pre-eminently a spiritual teacher. भावार्थ:–व्यवहार-प्रपंच-राजकारण-यांवर रामदासांच्या शिकवणीचा विशेष कटाक्ष होता तरी, आयुष्याच्या अखेरपर्यंत परमार्थाचा उपदेश करणें हेंच आपलें आद्य कर्तव्य आहे असें ते समजत असत. डेमिंगसाहेबांचें हें मत आम्हांस मान्य आहे. समर्थांची नैसर्गिक प्रवृत्ति परमार्थाकडे होती म्हणून ते बाराव्या वर्षी ' सावधान ' शब्द ऐकतांच लग्न-मंडपांतून पळून गेले. समर्थांना तीर्थयात्रेच्या प्रवासांत आसेतु-हिमालय स्वधर्म व स्वराज्य दिसलें असतें, अगर त्यांना ' अस्मानी सुलतानी ' नजरेस आली नसती तर त्यांच्यावर राजकारणाचा उपदेश करण्याचा प्रसंगच आला नसता. जन्मभूमि जांब येथें अगर तपोभूमि नाशिक येथें राहून केवळ अध्यात्मविषायावरच ग्रंथ लिहिण्यांत त्यांचा काल गेला असता.

समर्थांनीं राजकारण केलें नाहीं अगर शिकविलें नाहीं असे जे आक्षेप घेतले जातात त्यांच्या राजकारणाचा अर्थ किती आकुंचित असतो याचा इतका वेळ विचार झाला. राजकारणाचा अर्थ फार व्यापक आहे. त्या दृष्टीनें विचार केल्यास समर्थ हे राजकारणी संत होते, हें निःसंशय ठरतें असें वाचकांना दिसून येईल. त्याचप्रमाणें समर्थांनीं आपल्या ग्रंथांत राजकारणाचें ठसकेदार वर्णन जळजळीत शब्दांनीं केलें असेल; परंतु त्याचा राष्ट्रस्थितीवर ठळक असा कोणता परिणाम झाला असा आक्षेप घेणारांच्या शंकेचें ही निरसन केलें. आतां आणखी एक पक्ष आहे तो, समर्थ राजकारणी संत होते, त्यांनीं राजकारण केलें व सांगितलें, शिवाजीमहाराज विशेष प्रसंगीं राजकारणांत समर्थांची सल्ला घेत होते, हें ही कबूल करतो, परंतु हें सर्व समर्थांनीं आपल्या वयाच्या अगदीं शेवटीं शेवटीं

म्हणजे शिवाजीमहाराजांनीं स्वराज्यस्थापना केल्यावर शके १५९४ (सन १६७२)च्या पुढील आठ वर्षांत केलें, असें या पक्षाचे लोक म्हणतात. शिवाजी-महाराजांचें यशस्वी राजकारण पाहून समर्थांना राजकारणावर दासबोधांत व इतर वाङ्मयांत लिहिण्याची स्फूर्ति झाली असें या पक्षांचें म्हणणें आहे.

समर्थांनीं शके १५९४ नंतर राजकारण केलें व सांगितलें असें जे सद्गृहस्थ म्हणतात त्यांचा असें म्हणण्याचा मुख्य आधार समर्थांची व महाराजांची पहिली भेट केशव गोसावी यांच्या पत्राप्रमाणें शके १५९४ सालीं झाली हाच आहे. परंतु सदरहू आक्षेपाचें सविस्तर खंडन आम्ही भाग ६ यांत केलेंच आहे. त्याच-प्रमाणें भास्कर गोसावी यांच्या पत्रावरून शके १५८० पूर्वी दोघांची गांठ पडली नव्हती, असें ही अनुमान काढतां येणार नाहीं असें ही आम्ही त्याच भागांत सिद्ध केलें आहे. समर्थांनीं राजकारण केलें व ते राजकारणी संत होते असें या पक्षाला मान्य आहे. तेव्हां समर्थांची व महाराजांची गांठ शके १५७१त पडली व त्याच वर्षी महाराजांना अनुग्रह होऊन राजधर्म व क्षात्रधर्म सांगितला, हें जर समर्थ-वाकेनिशीसारख्या समकालीन विश्वसनीय पुराव्यावरून सिद्ध झालें, तर समर्थांनीं राजकारण शके १५७१ पासूनच केलें असें म्हणणें भाग पडतें.

समर्थांना राजकारणावर लिहिण्याची स्फूर्ति शिवाजीमहाराजांची यशस्वी स्वराज्य-स्थापना पाहून झाली असें प्रो. भाटेप्रभृति विद्वान गृहस्थ म्हणतात याचें आम्हांस आश्चर्य वाटतें. त्यांचें म्हणणें खरें मानल्यास समर्थांना राजकारण या विषयावर काव्यस्फूर्ति ६६व्या वर्षी झाली असें मानावें लागेल! महाराजांच्या राज्यारोहण-कालीं समर्थांचें वय ६६ वर्षांचें होतें. समर्थांनीं प्रथमभेट झाल्यानंतर लागलीच शके १५९४ सालीं अगर राज्यारोहणानंतर समर्थांनीं दासबोध शिवभारतासारखा ग्रंथ केला असता तर प्रो. भाटेप्रभृति गृहस्थांचें म्हणणें थोडें तरी विचारार्ह झालें असतें. तीर्थयात्रा करीत असतांनाच लोकांची हीनदीन स्थिति पाहून त्यांनीं मठस्थापना केली, तेव्हां संप्रदायाच्या वीस लक्षणांचें स्फुट त्यांनीं तीर्थयात्रा करीत असतांना केलें असलें पाहिजे. तीर्थयात्रेस प्रारंभ त्यांनीं काशी, प्रयाग, अयोध्येपासूनच केला. शके १५६४ सालीं ते तीर्थयात्रेस निघाले. निदान पहिलीं चार वर्षे तरी ते उत्तर हिंदुस्थानांत तीर्थयात्रा करीत फिरत असले पाहिजेत. काशी, प्रयाग, मथुरा, द्वारका, हरिद्वार येथील मठ शके १५५४ पासून १५५८ पर्यंतच्या कालांतच स्थापन झाले असले पाहिजेत. मठ स्थापून योग्य मठाधिपति नेमून पूजा, अर्चा, उत्सवाची व्यवस्था करूनच पुढील क्षेत्रीं ते जात असत. तेव्हां मठ व संप्रदाय स्थापन केले त्या वेळींच संप्रदायाचीं लक्षणें त्यांनीं तयार केलीं असलीं पाहिजेत. शके १५५८ सालीं जुन्या तिथीप्रमाणें महाराज ९ वर्षांचे, नव्या तिथीप्रमाणें ७ वर्षांचे होते. अर्थात् ज्या वेळीं समर्थांनीं मठ-संप्रदाय सुरू करून संप्रदायलक्षणें लिहिलीं

व त्यांत राजकारणाचा स्पष्टपणें समावेश केला त्या वेळीं महाराजांच्या स्वराज्य-स्थापनेस आरंभ ही झाला नव्हता. तेव्हां संप्रदायलक्षणांत समर्थांनीं राजकारणाचा जो अंतर्भाव केला, तो महाराजांच्या यशस्वी स्वराज्यस्थापनेपासून नव्हे हें प्रो. भाटे-प्रभृतींनीं मान्य केलें पाहिजे. समर्थ कृष्णतीरीं शके १५६६त आले. शके १५६० पर्यंत अकरा मारुती स्थापून शके १५७० या वर्षी चाफळ येथें श्रीरामाची स्थापना केली. कृष्णातीरीं आल्यावर शिष्यसंप्रदाय जोरानें वाढूं लागला तेव्हां त्यांना संप्रदायाकरितां मोठा ग्रंथ लिहिण्याची आवश्यकता वाटली व तें काम त्यांनीं शके १५६६-६७तच सुरू केलें व तें क्रमाक्रमानें सावकाशपणें सतत १५ वर्षे चाललें होतें व दासबोधाची समाप्ति शके १५८१च्या फाल्गुन महिन्यांत झाली असावी असें आम्ही 'समर्थांचे ग्रंथ' या ७व्या भागांत सिद्ध केलेंच आहे. शके १५७१त महाराज समर्थांच्या भेटीस शिंगणवाडीस गेले तेव्हां दासबोध लिहिण्याचें काम सुरू होतें व त्यांना अनुग्रहाचे वेळीं 'लघुबोध' सांगितला तो तेराव्या दशकांतला सहावा समास होय. दासबोधांत 'राजकारण' हा शब्द प्रथम तिसऱ्या दशकांत ९व्या समासांत आला आहे, नंतर नवव्या दशकांतील ४ थ्या समासांत आला आहे, व नंतर ११व्या दशकांतील पांचव्या समासांत पांच वेळां आला आहे. पांचवा समास हा सर्व समासच राजकारणनिरूपणाचा आहे. तेव्हां महाराजांच्या भेटीच्या पूर्वीच समर्थांनीं दासबोधांत राजकारणावर लिहिण्यास आरंभ केला होता हें सिद्ध होतें. त्यापूर्वी महाराजांनीं स्वराज्यस्थापनेच्या कामास फक्त अल्पारंभ केला होता. दासबोधां-तील १९व्या दशकांतील ९वा समास ही राजकारणनिरूपणाचा आहे. कारण अफझुलखानाच्या वधानंतर शके १५८१त मार्गशीर्ष महिन्यांत महाराज समर्थांच्या भेटीस गेले तेव्हां समर्थांनीं १८व्या दशकांतील सहावा समास त्यांना सांगितला. तो अफझुलखानाच्या वधानंतर लिहिलेला आहे. परंतु त्या वेळीं महाराजांच्या स्वराज्य-स्थापनेचें काम नेटानें होण्यास नुकतीच सुरुवात झाली होती. प्रो. भाटे म्हणतात त्याप्रमाणें महाराजांचें स्वराज्यस्थापनेचें काम पूर्ण यशस्वी होऊन राज्यारोहणापर्यंत मजल येऊन ठेपली नव्हती. तेव्हां १९व्या दशकांतील राजकारणावरील नववा समास लिहिण्यास ही महाराजांच्या यशस्वी राजकारणानें स्फूर्ति झाली नाहीं हें सिद्ध होतें. इतर समर्थवाङ्मयांत ही राजकारण शब्द व राजकारणावर लिखाण आहे. तेव्हां महाराजांचें कोणतें विशिष्ट स्वराज्यस्थापनेचें यशस्वी कृत्य पाहून कोणता समास अगर कोणतें स्फुट लिहिलें हें सिद्ध करणें विद्वान् प्रोफेसरसाहेबांचें कर्तव्य होतें. कारण त्यांच्यावर जबाबदारी मोठी आहे. समर्थांनीं आपल्या वयाच्या ६६ वर्षांनंतर राजकारणावर लिहिण्यास सुरुवात केली असें त्यांना सिद्ध करावयाचें आहे. या चिकित्सक युगांत मोघम विधान ठोकून कोणी ऐकणार नाहीं, असें त्यांचाच पक्ष कंठरवानें सांगत आहे. शके १५९४ सालीं समर्थ-महाराजांची गांठ

पडली असें म्हणण्याबद्दल एक पत्र तरी सांपडलें आहे. (त्या पत्रावरून प्रो. भाटे यांनीं काढलेलें अनुमान चुकीचें आहे हें आम्हीं मागें सिद्ध केलेंच आहे.) त्याप्रमाणें शके १५९४च्या भेटीनंतर दासबोधांतील ११व्या दशकाचा राजकारणावरील पांचवा समास लिहिला. समर्थ-संप्रदायलक्षणें पूर्वीं लिहिलीं होतीं, त्यांत 'राजकारण' हें लक्षण मागाहून घातलें, अगर राजधर्म व क्षात्रधर्म नंतर सांगितला, असें म्हणण्याबद्दल एकादें तरी पत्र, अगर दुसरा लेखी पुरावा प्रोफेसरसाहेबांनीं पुढें आणावयास पाहिजे होता. असा विश्वसनीय लेखी पुरावा बिलकुल नसतां त्यांनीं आपल्या कल्पनातरंगाला यथेच्छ विहार करण्यास परवानगी देऊन समर्थांनीं ६६ वर्षांनंतर राजकारणावर लिहिण्यास महाराजांच्या यशस्वी राज्यस्थापनेपासून स्फूर्ति झाली असें स्वकपोलकल्पित विधान ठोकून दिलें आहे. श्रीयुत केळुसकर व प्रि. बाळकृष्ण यांनीं प्रोफेसरसाहेबांच्या स्वकपोलकल्पित विधानाला वेदवाक्य मानून त्याप्रमाणेंच आपल्या ग्रंथांत प्रोफेसरसाहेबांच्या मताचा अनुवाद केला आहे. तेव्हां त्यांच्या मताचें निराळें खंडन करण्याचें कारण नाहीं.

प्रि. बाळकृष्ण यांनीं समर्थशिवाजीमहाराजांच्या परस्पर संबंधाविषयीं राजाराम कॉलेज-मासिकाच्या ज्युबिली अंकांत लिहितांना एक चमत्कारिक विधान केलें आहे. त्याचा आतां विचार करूं. प्रिन्सिपॉलसाहेब म्हणतात :— Ramdas looked upon Shivaji as an incarnation, so he could have no part in shaping the policy of an Avatar (page 110). प्रिन्सिपॉलसाहेबांची अवताराची काय कल्पना आहे ती त्यांनीं वरील लेखांत दिली नाहीं. ज्याअर्थीं समर्थ महाराजांना अवतारी पुरुष मानीत होते असें ते म्हणतात, त्याअर्थीं समर्थांची अवतारी पुरुषांची व्याख्या त्यांना मान्य असली पाहिजे. समर्थ म्हणतात:—" विवेकें बहुत पैसावले। म्हणोनि अवतारी बोलिले॥ मनु चक्रवर्ती झाले। येणेंचि न्यायें॥" (दासबोध १५-३-५). जे जे थोर पुरुष विवेकबुद्धीनें, सारासारविचारानें आपलें कर्तव्य करून प्रसिद्धीस आले ते अवतारी पुरुष होत. याला समर्थांनीं उदाहरण मनूचें दिलें आहे. तेव्हां योग्य सारासारविचार करून आपलें क्षात्रधर्माचें कर्तव्य महाराजांनीं ओळखलें म्हणून ते अवतारी होते. अवतारी पुरुष परमेश्वराप्रमाणें ज्ञानी नसतात. विष्णूचा अंश म्हणून ज्यांची अवतारांत गणना केलेली आहे अशा रामकृष्णांना देखील गुरूंपासून ज्ञान शिकावें लागलें. मग शिवाजीमहाराजांना गुरूंपासून ज्ञान शिकावें लागलें व त्यांना स्वराज्यस्थापनेच्या कामीं इतरांच्या साहाय्याचा उपयोग झाला, असें म्हटल्यानें महाराजांना कांहीं कमीपणा येत नाहीं. खुद्द प्रिन्सिपॉलसाहेब महाराजांना स्वराज्यस्थापनेच्या कामीं शहाजीराजे यांचा व कान्होजी जेधे व कृष्णाजी दादाजी लोहोकरे यांचा उपयोग झाला असें आपल्या '*Shivaji the Great*' या

पुस्तकांत कबूल करतात. ( page 167 ). याच पुस्तकांत Shahaji the Inspirer of Shivaji——शिवाजीमहाराजांना स्वराज्य स्फूर्ति देणारे शहाजी——असें एक प्रकरण Shahaji in the Carnatic या भागांत लिहिलें आहे. ( pp. 166–168 ) राजाराम कॉलेजच्या ज्युबिलीच्या अंकांत, अवतारी पुरुषांना राजकारणाच्या धोरणाबद्दल उपदेश करण्याची आवश्यकता नाहीं, रामदासांना तसें करणें शक्य नव्हतें, असें प्रि. बालकृष्ण म्हणतात; परंतु *Shivaji the Great* या पुस्तकांत शिवाजीमहाराजांना, 'ते अवतारी होते तरी, त्यांना आपल्या वडिलांपासून स्वराज्याची स्फूर्ति झाली व त्यांच्या वडिलांना कान्होजी जेधे व कृष्णाजी दादाजी लोहकरे यांना शपथ घेऊन मोंगल व बिजापूरचे सुलतान यांच्याविरुद्ध शिवाजीमहाराजांचे मदतीस पाठवावें लागलें असें कबूल करतात. अवतारी पुरुष झाले तरी त्यांना इतरांच्या साहाय्याची जरूर लागते. श्रीराम अवतारी होते तरी त्यांना रावणास मारण्याकरितां नळ, नील, जांबुवंत, अंगद व हनुमंत यांच्या साहाय्याची जरूरी लागली, हें रामायण वाचल्यावर प्रिन्सिपॉलसाहेबांना उत्तम रीतीनें कळून येईल. श्रीराम अवतारी होते, तरी त्यांना दुसऱ्या अवतारी विभूतींच्या म्हणजे मारुतिरायांच्या साहाय्याची मदत घ्यावी लागली; व श्रीरामांनीं प्रांजलपणें मारुतीच्या आईजवळ—अंजनीमातेजवळ—मारुतीच्या मदतीची थोरवी गाइली आहे. समर्थांच्या अंजनीगीतांत राम अंजनीस म्हणतात:—"माते तुझ्या उदरीं जाण। हनुमान जन्मला रत्न॥ एवढें माझें रामायण। त्याचेनि योगें॥ १॥" शिवाजीमहाराज अवतारी होते, तसे समर्थ ही अवतारी पुरुष होते, हें महाराजांनीं स्वतः कबूल केलें आहे. शके १५९९ सालीं दत्तो त्रिमल यांनीं दिवाकर गोसाव्यांना पत्र पाठविलें त्यांत पुढील मजकूर आहे:—"श्री महापुरुष, केवळ अवतार, आणि श्रीचे हस्तीचे देवस्थान चाफळ तरी तेथें देवालय आहे तें उकलून नूतन कर्नाटकी रीतीची इमारत करावयाची आज्ञा केली पाहिजे." इत्यादि ( का. लेखांक २६ ) महाराज कर्नाटकांतून आल्यावर समर्थांच्या जवळ काय बोलले तो मजकूर वरील पत्रांत आहे. श्रीरामांनीं जसें रावणास मारण्याच्या कामीं मारुतीचें साहाय्य घेतलें व तें प्रांजलपणें कबूल केलें, तसें शिवाजीमहाराजांनीं समर्थांना दिलेल्या सनदेंत यवनांचा नाश करून स्वराज्यस्थापनेच्या कामांत समर्थांनीं केलेलें साहाय्य प्रांजलपणें कबूल केलें आहे. मारुतिरायांनीं रामरायांना रणांगणावर बाहुबलानें साहाय्य केलें, समर्थांनीं शिवरायांना बुद्धिबलानें लोकांच्या प्रवृत्ति शिवरायांच्या स्वराज्यस्थापनेकडे वळवून व शिवरायांना राजधर्म व क्षात्रधर्म सांगून साहाय्य केलें. खुद्द महाराज स्वराज्यस्थापनेच्या कामांत समर्थांच्या साहाय्याची कबुली देतात, परंतु श्री. केळुसकर, प्रो. भाटे, प्रिन्सिपॉल बाळकृष्ण, रियासतकार श्री. गोविंदराव सरदेसाई-प्रभृति विद्वान् मंडळी निरनिराळीं कारणें देऊन ती गोष्ट कबूल करीत नाहींत. वरील गृहस्थ विद्वान्, चरित्रकार, ग्रंथकार, इतिहासकार आहेत; त्यांनीं विविध

माहिती मिळवून आपलीं चरित्रें, ग्रंथ व इतिहास लिहिलेले आहेत हें आम्ही प्रांजलपणें कबूल करतों. परंतु समर्थांनीं राजकारण आपल्या उत्तर वयांत केलें व समर्थांना आपल्या ग्रंथांत राजकारणावर लिहिण्याची स्फूर्ति महाराजांचें यशस्वी कार्य पाहिल्यावर झाली व महाराज अवतारी पुरुष होते म्हणून त्यांना राजकारणांत कोणाच्या उपदेशाची जरूरी नव्हती, हीं त्यांनीं केलेलीं विधानें चुकीचीं आहेत असें उपलब्ध असलेल्या ऐतिहासिक पुराव्यांवरून सिद्ध होतें, एवढेंच आम्हांस वाचकांच्या निदर्शनास आणून द्यावयाचें आहे.

आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धाच्या अखेर समर्थ राजकारणाचा उपदेश करूं लागले, राजकाणांत पडल्याशिवाय खरा प्रपंचच होत नाहीं असें आग्रहानें प्रतिपादन करूं लागले, “ मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्र-धर्म वाढवावा ॥” अशी कळवळ्यानें घोषणा करूं लागले असें जे म्हणतात ते ‘ महाराष्ट्रधर्माची ’ प्रेरणा समर्थांना तीर्थयात्रा करतांनाच झाली हें विसरतात असें दिसतें. बारा वर्षें तपश्चर्या केल्यावर समर्थ भाविक यात्रेकरूंप्रमाणें तीर्थयात्रेस गेले ही गोष्ट खरी आहे. परंतु तीर्थयात्रेच्या कालांत देशाच्या निरनिराळ्या भागांतील लोकांची हीन, दीन, केविलवाणी स्थिति पाहून त्यांना स्वधर्म स्थापण्याची आवश्यकता भासून त्यांनीं तीर्थयात्रेंत असतांनाच मठ स्थापून लोकसंग्रह करण्यास आरंभ केला, नंतर त्यांना धर्मस्थापनेस स्वराज्यस्थापनेची आवश्यकता भासूं लागली म्हणून ते जन्मभूमि व तपोभूमि सोडून शहाजीराजे व शिवाजीराजे यांच्या जहागिरीच्या मुलुखांत कृष्णातीरीं आले व तेथें मठ स्थापून संप्रदाय करून त्यांनीं बहुजन समाजाचीं मनें राजकारणाकडे वळविलीं व शिवाजीमहाराजांना व त्यांच्या द्वारा सर्व मराठे जहागीरदारांना व देशमुखांना “ मराठा तितका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा ॥ ” असा उपदेश केला. मोरे, घोरपडे, सावंतप्रभृति मराठे जहागिरदार मुसलमानी राज्यांत जहागिरी पत्करून सुखोपभोगानें कालक्रमणा करण्यांत धन्यता मानीत होते, अशा वेळीं शिवाजीमहाराजांनीं स्वराज्य स्थापण्यास आरंभ केला, त्या वेळीं त्यांना “ मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा ॥ म्लेंच्छ दुर्जन उदंड । बहुता दिसांचें झालें बंड ॥ या कारणें अखंड । सावधान असावें ॥ ” असा उपदेश करून सर्व मराठे, देशमूख, जहागिरदार व बहुजन समाज स्वराज्याच्या झेंड्याखालीं एकत्र करण्याची जरूरी होती. स्वराज्य स्थापन केल्यानंतर राज्यारोहणाच्या वेळीं वरील उपदेशाची जरूरी नव्हती. “ महाराष्ट्र-धर्म वाढविणें ” हें समर्थांचें व शिवाजीमहाराजांचें ध्येय समान होतें. कृष्णातीरीं आल्यावर समर्थांनीं मठ स्थापून, रामजयंती व हनुमज्जयंती यांच्या उत्सवानें लोकसंग्रह-लोकसंघटना-करून, संप्रदाय स्थापून व संप्रदायांत राजकारणाचा स्पष्ट समावेश करून आपला संप्रदायप्रसार वाढविण्याचा म्हणजेच पर्यायानें महाराष्ट्रधर्म वाढविण्याच्या जोरानें प्रयत्न

सुरू केला. समर्थ कृष्णातीरीं येण्यापूर्वींच कांहीं काळ शिवाजीमहाराजांनीं ही स्वराज्यस्थापनेस आरंभ करून महाराष्ट्रधर्म वाढाविण्यास नुकतीच सुरुवात केली होती. तेव्हां दोघांचें ध्येय एकच होतें. म्हणून समर्थ व शिवाजीमहाराज एकाच प्रांतांत असतां ( कांहीं काळ समर्थ शिवथर येथें व महाराज पांच मैलांच्या अंतरावर रायगड येथें होते ) या दोघा समानध्येयी महापुरुषांची गांठ समर्थ कृष्णा-तीरीं आल्यावर लागलीच पडली असली पाहिजे, असें कोणी ही तिऱ्हाईत मनुष्यास सुद्धां वाटेल. रे. डेमिंगसाहेब ही आपल्या 'रामदास व रामदासी ' पुस्तकांत तसेंच म्हणतात. ( page 71 ) परंतु एक विद्वान् पदवीधर चिकित्सकांना दोघांची एका प्रांतांत असून ही २०।२५ वर्षें गांठ पडली नसावी असें म्हणण्यांत कांहीं आश्चर्य वाटत नाहीं. समर्थ-शिवाजीमहाराजांचें ध्येयच एक नव्हतें असें वरील विद्वान् आक्षेपक म्हणतात. समर्थांचें ध्येय तुकारामांप्रमाणें भजन करण्याचें होतें व शिवाजी-महाराजांचें ध्येय स्वराज्यस्थापना करण्याचें होतें असें ते म्हणतात. समर्थ म्हणतातः—" योगी ओळखावा योगेश्वरें । ज्ञानी ओळखावा ज्ञानेश्वरें ।। महाचतुर तो चतुरें । ओळखावा ।।" ( दासबोध. ९. ३. ११ ) महापुरुषाचें ध्येय पूर्णपणें महापुरुषासच समजतें. कै. न्या. रानडे व कै. लोकमान्य टिळक यांना समर्थांचें ध्येय कळलें होतें व त्यांनीं प्रांजलपणानें व अभिमानपूर्वक तसें कबूल केलें आहे. ( *Rise of the Maratha Power* व गीतारहस्य )

समर्थ व शिवाजीमहाराजांचें ध्येय महाराष्ट्रधर्माचा प्रसार करणें हें होतें असें आम्हीं वर म्हटलें आहे. समर्थ-वाङ्मय व समर्थशिष्य-वाङ्मय व अलीकडे उपलब्ध व प्रकाशित झालेले ऐतिहासिक ग्रंथ जे सूक्ष्म रीतीनें वाचतील त्यांना या दोघांचें ध्येय एकच होतें हें दिसून येईल. धर्मस्थापना व स्वराज्यस्थापना हेंच दोघांचें ध्येय होतें. आमच्या म्हणण्याची सत्यता वाचकांना पटण्याकरितां कांहीं उतारे देतों. " रामदासी ब्रह्मज्ञान । सारासार विचारणा ॥ **धर्मस्थापनेसाठीं** । कर्मकांड उपासना ।। ( मानपंचक, १७-२५ ) आहे तितुकें जतन करावें । पुढें आणिक मेळवावें ।। **महाराष्ट्रराज्य करावें** । जिकडे तिकडे ॥ १ ॥ ( समर्थांचें संभाजीमहाराजांना पत्र ). समर्थें सर्वसंग परित्याग केला यथार्थ । समर्थांसी आज्ञा करितील श्रीराम समर्थ ।। **धर्मस्थापना** भरतखंडीं कृतार्थ । शुद्ध परमार्थ दिसतसे ।। ( स. प्र. २-७१ ) " समर्थांचें ध्येय धर्मस्थापना व स्वराज्य-स्थापना हें होतें याविषयीं विस्तारभयास्तव अधिक उतारे देत नाहीं. आतां शहाजी-राजे व शिवाजीमहाराज यांचें ध्येय ही धर्मस्थापना व स्वराज्यस्थापना हेंच होतें याविषयीं कांहीं उतारे देतों. विजापूरच्या तुरुंगांतून शहाजीराजे शके १५७१ मध्यें सुटल्यावर बाजी घोरपडे याचें पारिपत्य करण्याविषयीं त्यांनीं शिवाजीमहाराजांना पत्र लिहिलें होतें त्यांत पुढील मजकूर आहे. " बाजी घोरपडे यांनीं स्वधर्म-

साधनता सोडून यवन दुष्ट तुरुक याचे कृत्यास अनुकूल होऊन दगाबाजीचे हुनरे करून विजापुरास येणें घडलें. तेथें गुजरला प्रकार निर्वाणीचा तो तुम्ही समजलाच आहां. तो ही प्रसंग श्री तुमचा मनोरथ सिद्धीस नेणें व **स्वधर्म राज्य वृद्धि करणें** म्हणोन पार पडला." (महाराष्ट्र-इतिहास मंजरी, पान ७७). परमानंद कवि हे शिवाजीमहाराजांच्या समकालीन होते. त्यांनीं महाराजांना प्रत्यक्ष पाहिलें होतें व त्यांना महाराजांची लहानपणापासून सर्व प्रत्यक्ष माहिती होती. ते आपल्या शिवभारत ग्रंथांत महाराजांचा स्वराज्यस्थापनेचा हेतु म्लेच्छांचा संहार करून धर्मस्थापना करण्याचा होता असें म्हणतात. अफजुलखान महाराजांना मारण्यास प्रचंड सैन्यानिशीं वांई प्रांतांत आला, तेव्हां महाराजांना काय वाटलें याचें वर्णन शिवभारताच्या १८व्या अध्यायांत केलें आहे. हे यवन गोवध करितात, ब्राह्मणांना त्रास देतात व आपल्या म्लेच्छ धर्मानें पृथ्वीला बुडवितात म्हणून:—"तस्मादेतान् हनिष्यामि दानवान्यवनाकृतीन्।। **प्रथयिष्यामि धर्मस्य पंथानम**कुतोभयम् ।।" (शिवभारत, अ. १८. ३८). अर्थ:—म्हणून या म्लेच्छरूपी राक्षसांना मी मारीन व (श्रुतिस्मृतिप्रणित) **धर्माचा निर्भय असा मार्ग प्रचलित करीन.** श्रुतिस्मृतिप्रणित धर्म व रामायणभारतांतील राजनीति ही शिवाजीमहाराजांना पूर्णपणें अवगत होती असें परमानंद कवि म्हणतात. (शिवभारत, १०. ३४-४०) राजकारणपटु प्रख्यात वीर मुत्सद्दी रामचंद्र नीलकंठ पंतअमात्य हुकमतपन्हा आपल्या 'मराठेशाहींतील राजनीति' नामक पुस्तकांत (आज्ञापत्र) म्हणतात:— "शिवाजीमहाराजांनीं ज्या ज्या उपायें जो जो शत्रु आकळावा, त्या त्या मार्गें तो तो शत्रु पादाक्रांत करून सिंहासनारूढ होऊन छत्र धरून छत्रपति म्हणविलें. **धर्मोद्धार करून** देव-ब्राह्मणसंस्थांनीं स्थापून यजनयाजनादि षट्कर्में वर्णविभागें चालविलीं." (आज्ञापत्र, प्रकरण १, पान ४). परमानंद कवीनें ही धर्मस्थापनेकरितां, म्लेच्छसंहाराकरितां शिवाजीमहाराज हे शास्त्रपुराणांत लिहिल्याप्रमाणें विष्णूच्या दहाव्या कलंकी अवताराचेच पुढें दूत म्हणून आले आहेत असें म्हटलें आहे (अध्याय ५. ६।७). चिटणीसांच्या सप्तप्रकरणात्मक शिवचरित्रांत पुढील उल्लेख आहे:—"आणि श्री जेजुरीचे देवास शहाजीमहाराजांनीं नवस केला होता, जे शिवाजीमहाराज यांनीं हेतु धरिला कीं, **राज्यसाधन करून** देवगोब्राह्मण यांची पीडा परिहार करून **धर्मस्थापना** करावी, तो हेतु सिद्धीस निर्विघ्न जावा म्हणजे लक्ष रुपयांचें सोनें घेऊन सोन्याच्या मूर्ती करून पाठवूं. याप्रमाणें तेथें कर्नाटकी कारागीर याजपासून चांगल्या मूर्ती तयार करून पाठविल्या." औरंगजेबानें शिवाजीमहाराजांचें पारिपत्य करण्याकरितां राजा जयसिंग यांस पाठविलें होतें. त्यांना महाराजांनीं एक पत्र पाठविलें होतें. तें पत्र लांब आहे. त्यांतील दोनच वाक्यें देतों:—"हिंदूंच्या हृदयाचे रक्तानें तूं

ताम्रमुखी मोंगलांना यश मिळवून देण्याची इच्छा करितोस, पण तुला हें समजत नाहीं कीं, या कृत्यानें तुझ्या तोंडास काळोखी फासली जाऊन देश व धर्म यांवर आपत्ति ओढवली आहे. ......... ही वेळ हिंदूंनीं आपापसांत लढण्याची नव्हे, कारण त्यांच्यावर मोठा प्रसंग ओढवला आहे. आमचीं पोरेंबाळें, देश, धन व देवालयें यांच्यावर आपत्ति कोसळली असून असाच प्रकार चालू राहिल्यास आमचें कोणतेंच चिन्ह पृथ्वीवर शिल्लक राहणार नाहीं. एक मूठभर मुसलमानांनीं या देशावर प्रभुत्व गाजवावें ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. हें प्रभुत्व त्यांच्या पुरुषार्थाचें फल नव्हे. कारण, आमचे पाय आमच्यांत अडकवून, आमची तरवार आमच्या डोक्यांत तो घालीत आहे. आम्ही लोकांनीं या वेळीं हिंदु, हिंदुस्थान व हिंदुधर्म यांच्या संरक्षणासाठीं फार प्रयत्न केला पाहिजे. ” ( इतिहासमंजरी, पान १४९ ). वरील उताऱ्यावरून समर्थांचें ध्येय केवळ भजनवृद्धि व धर्मस्थापना हें नव्हतें व महाराजांचें ध्येय केवळ म्लेच्छसंहार व स्वराज्यस्थापना हें नव्हतें. तर धर्मस्थापना व स्वराज्यस्थापना म्हणजे महाराष्ट्रधर्मस्थापना हें दोघांचें एकच ध्येय होतें हें वाचकांस दिसून येईल.

आतां आम्हीं ‘ महाराष्ट्र-धर्म ’ याविषयीं थोडेसें विवेचन करण्याचें योजिलें आहे; कारण त्याचा समर्थांच्या राजकारणाशीं निकट संबंध आहे. ‘ महाराष्ट्रधर्म ’ हा शब्दप्रयोग समर्थांनीं प्रथम उपयोगांत आणला, असा पुष्कळांचा समज आहे, पण तो चुकीचा आहे. ‘ महाराष्ट्रधर्म ’ हा शब्दप्रयोग समर्थांच्यापूर्वीं दोनशें वर्षें सरस्वती गंगाधर यांनीं आपल्या ‘ गुरुचरित्र ’नामक प्रसिद्ध ग्रंथांत उपयोगांत आणलेला आहे. हा ग्रंथ गुरुभक्तिपर आहे. सरस्वती गंगाधरांच्या वेळीं बेदर येथें मुसलमान बादशहा होता, परंतु तो औरंगजेबासारखा कडवा मुसलमान नव्हता. श्रुतिस्मृतींप्रमाणें वागणाऱ्या आपल्या हिंदू प्रजेचा तो छळ करीत नसे एवढेंच नव्हे तर त्याचा स्वतःचा कल श्रुतिस्मृतिप्रणित वर्णाश्रमधर्माकडे होता म्हणून त्याला मुसलमान लोक नष्ट, अनाचारी व विप्रसेवक म्हणत असत. सरस्वती गंगाधर यांनीं गुरुचरित्राच्या ५०व्या अध्यायांत ‘ महाराष्ट्र-धर्म ’ या शब्दाचा उपयोग केला आहे. “ ऐसा हा राव असता । महाराष्ट्र-धर्मीं वर्तता ।। आपला द्वेष तत्वतां । न करील कीं जाणां ।। ” ( अ. ५०.२३५ ). वेदप्रामाण्य व श्रुतिस्मृतियुक्त आचार-प्रधान धर्म म्हणजे महाराष्ट्रधर्म अशी गंगाधरस्वामींची कल्पना होती असें गुरुचरित्रावरून दिसून येतें. त्या वेळचा मुसलमान राजा कट्टर हिंदुद्वेष्टा नसल्यानें स्वराज्यस्थापनेची कल्पना त्यांच्या मनांत आली नसावी असें दिसतें.

राजधर्म, क्षात्रधर्म, गुरुधर्म, शिष्यधर्म व सेवाधर्म म्हणजे जसें राजांचें कर्तव्य, क्षत्रियांचें कर्तव्य, गुरूंचें कर्तव्य, शिष्यांचें कर्तव्य व सेवकांचें कर्तव्य असा

साहजिकपणें बोध होतो, तसें महाराष्ट्रधर्म म्हणजे महाराष्ट्राचें कर्तव्य असा साहजिकच बोध होतो व तसा अर्थ केला तरी आम्ही पुढें महाराष्ट्रधर्म याचा एक विशिष्ट अर्थ समर्थांच्या मनांत होता असें सिद्ध करणार आहों, त्यास विशेष बाध येईल असें आम्हांस वाटत नाहीं. कारण महाराष्ट्राचें कर्तव्य या व्यापक अर्थांत त्या विशिष्ट अर्थाचा अंतर्भाव होऊं शकेल.

अलीकडे ' महाराष्ट्रधर्मा 'विषयीं चर्चा होण्यास कारण कै. न्या. मू. रानडे यांनीं आपल्या " मराठी सत्तेचा उत्कर्ष " या इंग्रजी पुस्तकांत महाराष्ट्रधर्म याचा त्यांनीं केलेला अर्थ होय. कै. न्या. रानडे यांनीं " मराठा तितुका मिळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा ।। " असा उपदेश समर्थांनीं संभाजीला केला असें चुकून म्हटलें आहे. वरील उपदेश समर्थांनीं शिवाजीमहाराजांना ' क्षात्रधर्मा'त केला आहे. संभाजीला जो उपदेश केला त्यांत " महाराष्ट्र-राज्य करावें । जिकडे तिकडे ।। " असा उपदेश आहे. शिवाजीमहाराजांना केलेल्या उपदेशाचें भाषांतर कै. रानडे यांनीं " Unite all those who are Mahrattas together and propagate the Dharma ( religion ) of Maharashtra. " असें केलें आहे. याच भागांत कै. रानडे यांनीं ज्ञानेश्वरांपासून तुकारामांपर्यंत साधुसंतांनीं बहुजन समाजाला भक्तिमार्ग दाखवून स्वराज्याची भूमिका तयार केली असें म्हटलें आहे. कै. राजवाडे यांनीं मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खंड चवथा, याच्या प्रस्तावनेंत कै. रानडे यांचा 'महाराष्ट्र-धर्म' याचा अर्थ चुकीचा आहे असें प्रतिपादन केलें. नंतर कै. रानडे यांनीं महाराष्ट्रधर्म यांतील धर्म शब्दाचा अर्थ Religion असा न करितां—Patriotism—देशाभिमान असा करावा असें सुचविलें. Religion पेक्षां Patriotism या शब्दानें समर्थांचा महाराष्ट्रधर्म या शब्दांतील अर्थाचा अधिक बोध होतो, तरी त्यानें श्री. राजवाडे यांचें समाधान झालें नाहीं. शके १८३९ सालीं सातारा येथें महाराष्ट्र-धर्म-माला सुरू झाली. या मालेचें पहिलें पुष्प त्याच वर्षी प्रसिद्ध झालें. त्यांत कै. राजवाडे यांनीं महाराष्ट्रधर्माविषयीं आपले विचार प्रगट केले आहेत व मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें यांतील कांहीं खंडांच्या प्रस्तावनेंत व इतर ठिकाणीं व्याख्यानांच्या वेळीं त्यांनीं या विषयावर आपले विचार प्रदर्शित केले आहेत. त्यांवरून " श्रुतिस्मृत्युक्त धर्मस्थापनापूर्वक स्वराज्यस्थापना " असा महाराष्ट्रधर्माचा अर्थ त्यांना अभिप्रेत होता असें दिसतें. समर्थांनीं "महाराष्ट्र-धर्म वाढवावा" असा ज्या वेळीं शिवरायांना उपदेश केला त्या वेळीं त्यांच्या मनांत हीं तोच अर्थ होता असें त्यांच्या इतर वाङ्मयांतील याविषयीं प्रगट केलेल्या विचारांवरून दिसून येतें. सुप्रसिद्ध रियासतकार यांचें ही मत अशाच प्रकारचें आहे. ते म्हणतातः—" रामदासस्वामींनें ' मराठा तेवढा मेळवावा । महाराष्ट्र-धर्म वाढवावा ' ।। असा उपदेश केल्याचें प्रसिद्ध आहे. या उपदेशावरून

रामदासाची योग्यता कळणार आहे. रामदासाच्या उपदेशांतील महाराष्ट्र-धर्म म्हणजे प्राक्कालीन साधुसंतांनीं दाखविलेला प्रकार तर खराच; परंतु त्याहून कांहीं जास्त अर्थाचा समावेश त्यांत होत होता. नाहीं तर 'महाराष्ट्र' हा शब्द योजण्याचें प्रयोजन नव्हतें. त्या शब्दांत पुष्कळ अर्थ भरलेला आहे. महाराष्ट्र देशाची रचना, त्यांतील लोकांच्या आंगचें पाणी व प्रयत्न केला असतां बाहेर येणारें त्यांचें सामर्थ्य, इत्यादि गोष्टींचा रामदासांच्या मनांतील अर्थ त्या शब्दांत व्यक्त होतो. पूर्वींच्या साधूंच्या उपदेशाची दिशा केवळ वैराग्याची होती. स्वदेशाचे व स्वराष्ट्राचे संबंधानें लोकांचें कर्तव्य म्हणून कांहीं आहे व तें त्यांस समजावून दिलें पाहिजे, या गोष्टी त्या साधूंच्या विचारांत नव्हत्या. लोकांनीं ऐक्य करून स्वराज्य स्थापन करावें; स्वराज्यस्थापनेवांचून स्वधर्मोन्नति व्हावयाची नाहीं, धर्म व राष्ट्र यांचा निकट संबंध आहे, असा त्याच्या उपदेशाचा अर्थ होता. रामदास हा स्वदेशाभिमानी, दूरदर्शी, धूर्त, समाजाची व राष्ट्राची उन्नति करून इष्टकार्य तडीस नेण्याच्या विचारांत निमग्न होता असें दासबोधावरून दिसून येतें....रामदास आपल्या प्रवासांत स्वराज्याच्या इमारतीचें साहित्य जमवीत होता. कोठें काय आहे हें त्यानें समजून घेतलें होतें. महाराष्ट्रांतील राजकीय चळवळींचीं मुख्य मुख्य ठिकाणें, मुख्य मुख्य घराणीं व त्यांचें बलाबल यांविषयीं पोक्त विचार ठरवून त्यांजबद्दलची माहिती तो शिवाजीस देत असावा. तो जसा वेषानें तसा पेशानें खरा साधु होता." ( मराठी रियासत, पूर्वार्ध, पानें १०४-१०५ ). यावरून रियासतकारांचें ही मत, समर्थांनीं जो महाराष्ट्रधर्म शिवाजीमहाराजांस व महाराष्ट्रास शिकविला त्यांत स्वधर्मस्थापना व स्वराज्यस्थापना या दोन्हींचा ही अंतर्भाव होतो असें होतें हें वाचकांना दिसून येईल. समर्थांनीं महाराष्ट्रधर्माचा उपयोग केला हें सर्वांना मान्य आहे. म्हणून समर्थ हे एकांगी भक्तिमार्गी संत नसून चतुरस्र राजकारणी संत होते या विधानाची सत्यता निःसंदिग्धपणें सिद्ध होते.

कॅ. मोडककृत प्रतापगडचें युद्धः—ग्वाल्हेर संस्थानांतील लष्करी खात्यांत बड्या अधिकाराच्या जागेवर असलेले कॅप्टन ग. वा. मोडक यांनीं 'प्रतापगडचें युद्ध' या नांवाचें विविध माहितीनें परिपूर्ण असें एक उत्तम पुस्तक लिहिलें आहे. त्यांत २ऱ्या प्रकरणांत ते म्हणतातः—"ज्याप्रमाणें ( शिवाजी ) महाराजांना स्वराज्य स्थापण्याची इच्छा होती, त्याचप्रमाणें यवनांचें बंड मोडून या आनंदवनभुवनांत धर्मराज्य करण्याची उत्कट इच्छा मनांत बाळगून त्याप्रमाणें गुप्तपणें प्रयत्न करण्यास एक महापुरुष त्या वेळीं महाराष्ट्रांत नांदत होता. तो म्हणजे महाराजांचे गुरु श्रीसमर्थ रामदास होत. यांच्या आज्ञेनें व सल्लामसलतीनेंच महाराजांनीं या प्रचंड कार्यास हात घातला होता. ( महाराजांनीं समर्थांस दिलेलें सनदपत्र, 'रामदास व रामदासी' भाग २, पान, ४० ). महाराजांना समर्थांनीं

स्वराज्यस्थापना करून दुष्ट तुरुकांचा नायनाट करण्यास प्रत्यक्ष आज्ञाच केली होती...समर्थ हे नुसते निवृत्तिपर एकांगी संत नसून, प्रवृत्तिनिवृत्तींचे, शक्ति-युक्तींचे महाराष्ट्राचे प्रणेते होते. त्यांच्या महाराष्ट्रधर्मांतील अनेक अंगांपैकीं एक जें लोक पारखून सोडणें, तें साधण्यासाठीं, त्यांनीं सर्व हिंदुस्थानभर संचार करून मोठमोठ्या ठिकाणीं व तीर्थक्षेत्रीं एकंदर ७०० मठ स्थापन केले होते. या मठांच्या व तेथील मठपतींच्या द्वारें ते आपली चाळणा सर्वत्र पसरत असत. या मठपतींकडून त्यांच्या प्रांतांतील बारीकसारीक माहितीची मदत महाराजांना मिळत असे. या मदतीशिवाय समर्थांचे इतर हजारों शिष्य देशांत संचार करीत असत. देशांतील सर्व ठिकाणची बातमी मिळविण्यांत त्यांचा उपयोग होई. असल्या बातम्यांपैकीं ज्या राजकीय महत्त्वाच्या बातम्या असत व महाराजांच्या राजकारणास उपयोगी असत त्या त्यांना ताबडतोब कळविण्याची व्यवस्था ही समर्थांकडून होत असे. विजापुराहून खान निघाल्यानंतर ती बातमी असल्याच एका शिष्याकडून पुढील पत्रद्वारें समर्थांकडे आली व ती त्यांनीं महाराजांकडे पाठविली." सदहू सांकेतिक पत्र कॅप्टन मोडक यांनीं पुढें आपल्या पुस्तकांत दिलें आहे तें आम्ही याच भागांत मागें दिलेलें आहे.

श्री. जी. के. ऊर्फ बाबासाहेब देशपांडे यांनीं *The Deliverance or the Escape of Shivaji the Great from Agra* ( आग्र्याहून शिवाजीमहाराजांची सुटका ) या नांवाचें एक इंग्रजी पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. त्या पुस्तकांत शिवाजीमहाराज आग्रा येथून कैदेंतून सुटून प्रथम मथुरेंत आले व तेथें मोरोपंत पेशवे यांचे तिघे बंधु होते त्यांच्या घरीं गेले. याविषयीं श्रीयुत देशपांडे म्हणतातः— Had they been among the party of selected men on the staff of Shivaji all along from his journey from Rajgad to Agra ? or were they there in the Matha of Shri Ramadas as his disciples, purposely instructed to render any service to that great man ( Shivaji ) in case such was needed ? भावार्थः—" मथुरेंतील तीन ब्राह्मण ( मोरोपंत पिंगळ्यांचे मेहुणे ) शिवाजीमहाराजांनीं राजगडाहून आग्र्यास जातांना बरोबर नेलेल्या निवडक मंडळींपैकीं ते होते काय ? अथवा ते जरूर पडल्यास महाराजांना मदत करण्यास सांगून ठेवलेल्या मथुरेच्या मठांतील रामदासांचे शिष्य होते ? " नंतर पुढें 'नोट्स्' मधील पृष्ठ १००।१०१ मध्यें श्री. देशपांडे यांनीं उत्तर व मध्य हिंदुस्थानांतील त्या वेळीं असलेल्या रामदासांच्या मथुरा, प्रयाग, काशीप्रभृति वीस मठांचीं व मठपतींचीं नांवें दिलीं आहेत. त्यांतील कांहीं मठ शिवाजीमहाराज मथुरेहून बैरागी वेषानें परत रायगडास आले त्या मार्गावर आहेत, यावरून श्री. देशपांडे म्हणतातः—"To our mind he must have received assistance direct or

indirect from the Mahantas of these Maths through which he (Shivaji Maharaj) passed." भावार्थः—" समर्थांच्या या मठांतील महंतांकडून शिवाजीमहाराजांना परत येतांना मार्गामध्यें प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष साहाय्य झालें असलें पाहिजे असें आम्हांस वाटतें. या गोष्टीस प्रत्यक्ष पुरावा नाहीं. परंतु समर्थांच्या कांहीं मठांच्या मार्गानें महाराज परत आले यावरून वरील अनुमान काढणें चुकीचें होणार नाहीं."

श्री. देशभक्त ज. स. करंदीकर हे शिवाजी निबंधावली, भाग १, यांतील आपल्या लेखांत म्हणतात, " आग्र्याला जाऊन अवरंगजेबाच्या दरबारांत त्याची भेट घेण्याला निघण्यापूर्वी समर्थांचा ही सल्ला शिवाजीमहाराजांनीं घेतला होता, एवढा उल्लेख बखरींतून आढळतो. त्यापुढील सर्व कल्पना तर्कावर रचलेल्या असणार हें सर्व उघड आहे. पण तसा तर्क करण्याला ही आधार तसाच प्रबळ आहे."

शिवाजीमहाराज व त्यांच्या बरोबरची मंडळी ज्या ज्या प्रांतांतून वेष पालटून लपत छपत आली त्या त्या प्रांतांत त्यांना योग्य वाटाडे आकस्मिक कसे मिळणार? अर्थात् आग्र्याच्या अटकेंतून सुटतांच पुढील प्रवासाच्या सुरक्षिततेची कांहींतरी योजना झाली असली पाहिजे. आणि ज्या ठिकाणीं समर्थांचे मठ पूर्वीं स्थापले होते त्या मठांमार्फत व जेथें मठ नसेल तेथें मुद्दाम एखादा मठपति पाठवून त्याच्या-मार्फत ही योजना करण्यांत आली असावी हें स्वाभाविक आहे. ( पृष्ठ १२१। १२२ ). विश्वनाथ नांवाच्या एका समर्थशिष्यास उत्तर हिंदुस्थानांत यात्रेस जाण्यास आकाशवाणीनें प्रेरणा झाली असें समर्थप्रतापांत गिरिधरस्वामींनीं लिहिलें आहे, याचा उल्लेख श्री. देशपांडे व करंदीकर या दोघांनीं ही केला आहे. ही आकाशवाणी म्हणजे समर्थांचा गुप्त हुकूम असला पाहिजे असें वरील दोघां गृहस्थांनीं अनुमान काढलें आहे व तें आम्हांस ही खरें वाटतें. कारण " इशारतीचें बोलतां नये । बोलायाचें लिहूं नये ॥ लिहायाचें सांगूं नये ॥ " असा समर्थांचा दंडक होता. श्री. करंदीकर म्हणतात, " आपल्या कारस्थानांची कोठेंच वाच्यता न व्हावी अशी दक्षता समर्थांनीं आरंभापासून घेतली होती व ती त्यांच्या हयातीच्या अखेरपर्यंत चालली होती. त्यांच्या शिष्यांपैकीं कोणीं ही हा मंत्रभेद केला नाहीं. समर्थांच्या पश्चात् त्यांचें चरित्र लिहिणारे 'समर्थप्रताप'कार ( प्रशिष्य ) गिरिधरस्वामी यांनीं एकच मंत्रभेद केला व तो ही अर्धवट सांकेतिक आहे; तो 'आकारपूर्वक यवनास माराविलें' एवढाच होय ( पृ. १११ )"

वरील सर्व विवेचनावरून समर्थ हे केवळ भक्तिमार्गी संत नव्हते तर महाराष्ट्र-धर्म-प्रणेते, युगधर्मप्रवर्तक राजकारणी संत होते हें वाचकांना कळून येईल.

---

# भाग ११ वा

# उत्तरार्धांतील संचार

जातें स्थळ सांगेना । सांगितलें तेथें जायेना ॥
आपुली स्थिती अनुमाना । येवोंचि नेदी ॥ (११.१०.१०)
त्यागी ओळखीचे जन । सर्वकाळ नित्य नूतन ॥
लोक शोधूनि पहाती मन । परी इच्छा दिसेना ॥ दासबोध (११.१०.८)
उदंड करी गुप्तरूपें । भिकाऱ्यासारिखा स्वरूपें ॥
तेथें यशकीर्तिप्रतापें । सीमा सांडिली ॥ ( १५.२.९२ )

बालपण, तपश्चर्या व तीर्थयात्रा या भागांत समर्थांच्या जन्मापासून म्हणजे शके १५३० पासून शके १५६६ पर्यंत म्हणजे ते कृष्णातीरीं येईपर्यंत त्यांच्या चरित्रांतील ३६ वर्षांचा कथाभाग सांगितला. भाग ५ यांत समर्थ कृष्णातीरीं शके १५६६ सालीं आल्यापासून शके १५७२ सालपर्यंत अकरा मारुती स्थापन करून चाफळ येथें राममंदिर बांधून त्यांत अंगापूरच्या डोहांतील आणलेल्या मूर्ति स्थापन केल्यापर्यंतचा समर्थचरित्रांतील पांच वर्षांचा भाग सांगितला. ६ व्या भागांत शिवाजीमहाराजांना अनुग्रह देऊन राजधर्म व क्षात्रधर्म सांगितल्याचा समर्थचरित्रांतील कथाभाग सांगितला, नंतर ७ ते १० या चार भागांत समर्थांचे ग्रंथ, समर्थांचे मठ, महंत व शिष्य, समर्थसंप्रदाय व समर्थांचें राजकारण या विषयांवर लिहावें लागल्यामुळें, शके १५७२ पासून समर्थांच्या समाधीपर्यंतच्या कालांतील म्हणजे शके १५७२ ते शके १६०३ पर्यंत या कालांतील समर्थचरित्रांतील ३१ वर्षांचा कथाभाग लिहिण्याचें तसेंच राहिलें. या भागांत समर्थांच्या या उत्तरभागांतील ३१ वर्षांतील संचार व इतर महत्वाच्या गोष्टी यांविषयीं माहिती दिली आहे.

शके १५७२ पासून शके १६०३ पर्यंत समर्थचरित्रांतील संचार व कथाभाग कालानुक्रमानें देण्याचें काम बरेंच कठीण आहे. हनुमंतस्वामींच्या बखरीशिवाय कोणत्या ही प्राचीन चरित्रांत समर्थांच्या या चरित्र-भागांतील गोष्टी शकतिथिवार क्रमानें दिलेल्या नाहींत. गिरिधरस्वामींनीं समर्थांना स्वतः पाहिलें होतें, समर्थांच्या सान्निध्यांत त्यांचा कांहीं काल ही गेला होता; त्यांनीं समर्थप्रतापांत समर्थचरित्रांतील पुष्कळ विश्वसनीय कथाभाग सांगितला आहे. परंतु कोणती गोष्ट केव्हां घडली याचा कालनिर्देश त्यांनीं समर्थ-प्रतापांत केलेला नाहीं. समर्थांच्या मठमहंतांची, शिष्याशिष्यिणींची विश्वासनीय माहिती समर्थ-प्रतापाइतकी दुसऱ्या कोणत्या ही चरित्रग्रंथांत नाहीं; परंतु गिरिधरस्वामींनीं कोणत्या शकांत कोणत्या

शिष्यास अनुग्रह दिला ही माहिती दिली नाहीं. समर्थप्रतापांत समर्थचारित्रांतील इतर कथाभागासंबंधानें ही हाच शकतिथि न दिल्याचा दोष दृष्टीस पडतो. दासविश्राम-धाम, भक्तलीलामृतप्रभृति पुढें १०० वर्षांनंतर लिहिलेल्या ग्रंथांत ही हाच दोष आहे. समर्थचारित्राचें सर्वांत जुनें जें त्रोटक वाकेनिशी टिपण उपलब्ध झालें आहे त्यांत समर्थ-चरित्रांतील पुष्कळ गोष्टींची शकतिथिपूर्वक माहिती दिली आहे. हनुमंतस्वामींच्या बखरींतील शकतिथींची माहिती या अनंत गोपाळ कुडाळकरकृत समर्थवाकेनिशीवरून घेतलेली दिसते. समर्थवाकेनिशींतील निर्णायक माहिती तत्कालीन गृहस्थानें लिहिलेली, एवढेंच नव्हे तर समर्थांची नित्य दिनचर्या शिवाजीमहाराजांकडे पाठविण्याचें काम चाफळ मठांतील ज्या कारकुनाकडे असे त्या कारकुनानेंच म्हणजे अंताजी गोपाळ कुडाळकर यानें लिहून ठेविली असल्यामुळें ती विश्वसनीय आहे असें आम्ही पूर्वी भाग १ यांत सांगितलें आहेच. समर्थवाकेनिशींत ही या उत्तर भागां-तील सर्व ३१ वर्षांतील कथाभाग व संचार दिलेला नाहीं. शके १५८२ ते शके १५८८ पर्यंतच्या व शके १५८९ ते शके १५९५ पर्यंतच्या संचाराचा व कथाभागाचा उल्लेख समर्थवाकेनिशींत नाहीं; परंतु तो ह. स्वा. बखरींत आहे. "त्यागी ओळखीचे जन, सर्व काळ नित्य नूतन।" हा त्यांचा नित्यक्रम वृद्धापकाळीं ही सुरू होता. कारण शके १५९० नंतर म्हणजे वयास ६० वर्षे झाल्यानंतर ही हेळवाकची घळ व शिवथर येथील सुंदरमठ अशा अवघड ठिकाणीं पावसाळ्यांत ही चातुर्मासांत समर्थ राहण्यास गेल्याचे उल्लेक सांप्रदायिक कागदपत्रांत आहेत. शिवाजीमहाराज हयात होते तोंपर्यंत समर्थांची दिनचर्या महाराजांकडे पाठविली जात असे असा उल्लेख प्राचीन समर्थचरित्रांत आहे. ती समग्र दिनचर्या साताराच्या छत्रपतींच्या दरबारांत अगर इतर कोठें संशोधकांना दुर्दैवानें अद्याप सांपडली नाहीं, म्हणून समर्थवाकेनिशी व हनुमंतस्वामींची बखर यांवरून समर्थसंचाराचा व समर्थचारित्रांतील इतर गोष्टींचा कालनिर्णय करावा लागत आहे. अलीकडे उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक कागदपत्रांतील शक समर्थ-वाकेनिशींतील बहुतेक शकांशीं जुळत आहेत व ते समर्थकालीन लेखकानें लिहिलेले आहेत म्हणून विश्वसनीय मानले पाहिजेत. या भागांत दिलेले कांहीं शक नवीन ऐतिहासिक पुराव्यांवरून असत्य ठरल्यास त्याप्रमाणें पुढें आम्ही आनंदानें दुरुस्ती करूं. आमचा कोणत्या ही प्रकारचा आग्रह नाहीं. आमचा आग्रह फक्त समर्थ-चरित्रापासून वाचकांनीं योग्य तो बोध घेऊन देशोद्धारार्थ अहर्निश प्रयत्न करावा या गोष्टीविषयीं आहे.

शके १५७१ सालीं वैशाख शुद्ध नवमीस शिवाजीमहाराजांना समर्थांचा शिंगणवाडी येथें अनुग्रह झाल्याचें मागें ६व्या भागांत सांगितलें आहेच. त्यानंतर लवकरच घडलेल्या एका गोष्टीचा प्राचीन चरित्रकार उल्लेख करतात. महाराज

प्रत्येक गुरुवारीं समर्थदर्शनास जात असत. एकदां शत्रु चालून आले, परंतु समर्थांची गांठ पडून सल्ला मिळाला नाहीं, म्हणून महाराज चिंताग्रस्त होऊन बसले. जवळच्या कारभारी मंडळींनीं सर्वांच्या मसलतीनें प्रसंग शेवटास न्यावा असें सुचविलें. परंतु महाराजांनीं तसें करण्याचें नाकारलें. इतक्यांत समर्थ आले व म्हणाले कीं, आम्ही सतत रानावनांत फिरणारे, प्रसंगीं गांठ पडेलच असें नाहीं, तरी तुम्ही मंत्रिमंडळाच्या विचारानें कठिण प्रसंगीं वागत जावें. महाराजांना ते पटेना, तेव्हां समर्थांनीं पुढील युक्ति काढली, ती महाराजांना पसंत पडली. कुलदेवी श्रीभवानीस विनंती करून आज्ञा होईल त्याप्रमाणें करावें असें समर्थांनीं सांगितलें. संकटसमयीं महाराज व दोन कारकून यांनीं पवित्र स्थळीं एकांतांत जावें, एका कारकुनानें महाराजांना प्रश्न विचारावे व दुसऱ्यानें महाराजांचीं उत्तरें टिपून घ्यावींत, आणि ती देवीची आज्ञा समजून त्याप्रमाणें वागावें; नंतर महाराज त्याप्रमाणें वागूं लागले. महाराजांच्या अंगांत देवीचा संचार होऊन ते बोलत व कारकून टिपण करून घेत असा उल्लेख महाराजांच्या बखरींत व चरित्रांत आहे. परंतु तसें करण्यास त्यांना समर्थांनीं सांगितलें असा उल्लेख नाहीं; म्हणून समर्थ चरित्रांतील कथा समर्थशिष्यांनीं समर्थांची महती वाढविण्याकरितां रचली असावी असें प्रो. भाटे म्हणतात. परंतु समर्थमठपरंपरेंतील चरित्रें ब्राह्मणब्राह्मणेतर वाद उत्पन्न होण्यापूर्वीं १००–१२५ वर्षें लिहिलीं होतीं हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. तथापि सदरहू गोष्ट फक्त समर्थचरित्रांत आढळून येते व शिवाजीमहाराजांच्या चरित्रांत आढळून येत नाहीं हें एक त्यांत वैगुण्य आहे हें प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे. म्हणून प्रो. भाटे यांचें अनुमान खरें असण्याचा संभव आहे.

शके १५७१:—शहाजीराजे यांची विजापूरच्या तुरुंगांतून सुटका शके १५७१ सालीं जेष्ठ पौर्णिमेस झाली. याच महिन्यांत समर्थांनीं व तुकारामांनीं शिवाजीमहाराजांच्या सैन्यास भोजनास घातल्याचा उल्लेख वाकेनिशींत आहे. त्याची माहिती पुढें ' अद्भुत गोष्टी ' या भागांत दिली आहे. कुबडीतीर्थाची ही गोष्ट याच सालीं झाली असली पाहिजे. त्या गोष्टीची हकीकत आम्हीं भाग ८ यांत चाफळमठाच्या वर्णनांत दिली आहे. अनुग्रहानंतर शके १५७१ सालीं दर गुरुवारीं समर्थांच्या दर्शनास शिवाजीमहाराज जात असत त्याच वेळीं ही गोष्ट झाली असावी. आषाढांत समर्थ पंढरपुरास जाऊन आले. पंढरपुरास जाण्यासंबंधीं दोन आख्यायिका समर्थांच्या प्राचीन ग्रंथांत दिल्या आहेत. त्या आम्हांस विश्वसनीय वाटत नाहींत. परंतु त्यांवरून समर्थ शके १५७१ सालीं आषाढी एकादशीस पंढरपुरास गेले होते एवढें सिद्ध होतें; म्हणून त्याचा थोडक्यांत उल्लेख करतों. त्या वर्षीं आषाढीच्या यात्रेस पुष्कळ लोक निघाले असतां वाटेंत समर्थांची व कांहीं यात्रेकरूंची गांठ पडली. तेव्हां त्यांपैकीं कांहीं गृहस्थांनीं

समर्थांना पंढरपुरास श्रीविठ्ठलदर्शनास येण्याची विनंति केली. आम्हीं रामभक्त म्हणून येत नाहीं, असें समर्थ म्हणाले. नंतर खुद्द विठोबाराय ब्राह्मणाचें रूप घेऊन आले व पंढरीस मारुतीचें ही देवालय आहे म्हणून सांगितल्यावर समर्थ पंढरपुरास गेले. महाद्वारापाशीं गेल्यावर ब्राह्मणरूपी विठ्ठल गुप्त झाले. समर्थांनीं मंदिरांत जाऊन विठ्ठलदर्शन घेऊन एक अभंग केला त्यावरून विठ्ठलांनीं रामरूप धारण करून समर्थांना दर्शन दिलें, असें ह. स्वा.च्या बखरींत लिहिलें आहे. तो अभंग असा, "येथें उभा कां रामा । मनमोहन मेघश्यामा ।। १ ।। काय केले धनुष्यबाण ।। कर कटावरी ठेवून ।। काय केली सीताबाई । येथें राईरखुमाई ।। ३ ।। काय केलें वानरदळ । येथें वसविले गोपाळ ।। ४ ।। काय केली अयोध्यापुरी । येथें वसविली पंढरी ।। ५ ।। काय केली शरयुगंगा । येथें आणिली चंद्रभागा ।। ६ ।। रामदासीं जैसा भाव । तैसा झाला पंढरीराव ।। ७ ।।" द्वापारयुगांत रामरूप धारण करून श्रीकृष्णांनीं द्वारकेंत मारुतिरायांस जसें दर्शन दिलें, तसें कलियुगांत श्रीविठ्ठलांनीं रामरूप धारण करून समर्थांना पंढरपुरांत दर्शन दिलें, असें ही आख्यायिका सांगते. समर्थ वारकरी नसतांना पंढरपुरास गेले व तेथें त्यांनीं भाविकपणानें श्रीविठ्ठलास श्रीराम कल्पून एक पद केलें यावरून ही आख्यायिका प्रचलित झाली असावी असें दिसतें. समर्थ शके १५७१ च्या आषाढी यात्रेस पंढरपुरास गेले व तुकाराममहाराज त्याच वर्षी फाल्गुन कृष्ण द्वितीयेस वैकुंठवासी झाले; तेव्हां त्यांनीं शिवाजीमहाराजांना जें अभंगबद्ध पत्र पाठविलें तें दरम्यानच्या ७।८ महिन्यांतच पाठविलें असलें पाहिजे. सदर्हु पत्र पूर्वी भाग ६ यांत दिलेलें आहे. आषाढीचे यात्रेस पंढरपुरास जांबेकडील कांहीं मंडळी आली होती, त्यांचे जवळ समर्थांनीं मातोश्रीस एक व श्रेष्ठांस एक अशीं दोन पत्रें लिहून पाठविलीं. "सकळ गुणांची निधी । निर्गुणाची कार्यसिद्धि ।। विवेकाची दृढ बुद्धि । तुझेनि गुणें ।। १ ।।" ही मातोश्रींच्या पत्रांतील पहिली ओंवी आहे. व पुढें आणखी दहा ओंव्या गुणवर्णनपर आहेत. श्रेष्ठांच्या पत्रांतील पहिली ओवीः–"सकळ तीर्थांचें माहेर । सकळ गुणांचें भांडार ।। सकळ विद्येचा सागर । स्वरूप तुमचें ।। १ ।।" अशी आहे व पुढें आणखी नऊ ओंव्या गुणवर्णनपर आहेत. पंढरपुराहून परत येतांना वाटेंत अंताजीबुवा मेथवडकर यांना अनुग्रह दिल्याचा ह. स्वा.च्या बखरींत उल्लेख आहे. पंढरपुराहून परत आल्यावर चाफळमठाचें काम दिवाकर गोसाव्यांस सांगून ग्रंथरचनेस एकांत पाहिजे म्हणून समर्थ शिवथर येथें राहण्यास गेले. शिवथर रायगडापासून पांच कोस आहे. बरोबर कल्याणस्वामी, अनंत कवि व आक्का यांना नेलें होतें. शिवथर येथें समर्थांनीं 'सुंदरमठ' स्थापन केला. शिवथर हें अत्यंत रमणीय व भव्य स्थान आहे. येथें समर्थांच्या मनांत १० वर्षे राहून ग्रंथरचना करावयाची होती, म्हणून सांप्रदायिक या समर्थकार्यक्रमास "दहा संवत्सर

व सर्व ग्रंथ " असें म्हणतात. समर्थांच्या मनांत येथें १० वर्षें नाहीं तरी, बराच काळ राहून ग्रंथरचना करावयाची होती.परंतु त्यांची नैसर्गिक प्रवृत्ति लोकोद्धारार्थ संचार करण्याची असल्यामुळें त्यांना पुढल्याच वर्षी महाराजांच्या विनंतीवरून परळीस जावें लागलें व तेथून ही पुढें निरनिराळ्या कामांकरितां या दहा वर्षांच्या मुदतींत महाराष्ट्राबाहेर ही जावें लागलें. रामदास आणि रामदासी, भाग ९, यांत संप्रदायाचीं पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांत बऱ्याच पत्रांत शिवथर-घळीचा उल्लेख आहे, तेव्हां मध्यंतरीं बऱ्याच वेळां समर्थ तेथें गेले असले पाहिजेत. श. १५९७ च्या पत्रांत शिवथर येथें रामनगर पेठ वसविण्यास समर्थांनीं महाराजांस आज्ञा केल्याचा उल्लेख आहे.

शके १५७२ या सालीं कार्तिक महिन्यांत समर्थ परळीस नेहमीं राहण्यास आले असा उल्लेख समर्थवाकेनिशींत २१ व्या टिपणांत आहेत. नेहमीं याचा अर्थ बारा महिने असा नाहीं. कारण समर्थ नित्य नूतन प्रदेशांत फिरत असत. चाफळास मुख्य ठाणें होतें तें यापुढें परळीस झालें, एवढाच अर्थ नेहमीं या शब्दांत अभिप्रेत आहे. शके १५७२ सालीं परळी किल्ला शिवाजीमहाराजांच्या ताब्यांत नव्हता, तेव्हां तेथें समर्थांचें त्या वर्षी राहण्यास जाणें अशक्य होतें, असें प्रो. भाटे, श्री. केळुस्कर, रे. डेमिंग, डॉ. बाळकृष्णप्रभृति ग्रंथकार व दुसरे कांहीं विद्वान् चिकित्सक अनुमान काढतात; परंतु त्यांचें अनुमान चुकीचें आहे. कारण समर्थांचे मठ व मारुति हे महाराजांच्या मुलखांतच होते असें नाहीं. पारगांव व मनपाडळे हा पन्हाळ्याजवळील भाग महाराजांच्या ताब्यांत येण्यापूर्वी समर्थांनीं तेथें मठ व मारुति स्थापन केले होते. शिवथरचा भाग चंद्रराव मोरे यांच्या ताब्यांत असतांना समर्थांनीं तेथें सुंदरमठ स्थापन केला होताच. त्याचप्रमाणें परळी महाराजांच्या ताब्यांत येण्यापूर्वी तेथें समर्थ राहण्यास गेले यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. भौगोलिकदृष्ट्या परळीचा किल्ला शिव-समर्थांच्या विचारविनिमयाला व सल्लामसतीला चाफळपेक्षां अधिक सोयीचा असल्यामुळें तेथें राहण्यास महाराजांनीं समर्थांना विनंति करणें साहजिक आहे. परळीहून एका बाजूनें चाफळ व रामघळ या भागांकडे जाण्यास गुप्त पाऊलवाटा त्या वेळीं होत्या. शिवाय, शिवथर त्या वेळीं चंद्रराव मोऱ्यांच्या ताब्यांत होतें. समर्थांची गांठ घेण्यास शिवथरपेक्षां परळी महाराजांना अधिक सोयीची होती, म्हणून तेथें येण्यास महाराजांना विनंति केली असण्याचा संभव आहे. शके १५७१ सालीं शहाजीराजे कैदेंतून सुटले होते तरी पुढें चार वर्षें नजरकैदेंत असल्याप्रमाणें त्यांची स्थिति होती. त्या मुदतींत शिवाजीमहाराजांनीं विजापूर दरबाराशीं उघड-पणें वैर मांडलें नव्हतें. तेव्हां सातारा-परळी भागांत समर्थांची गांठ घेण्यास महा-राजांना प्रतिबंध असण्याचें कारण नव्हतें.

समर्थ परळी येथें आल्यावर पुष्कळ साधुसंत त्यांना भेटण्यास येऊं लागले म्हणून परळीस सज्जनगड असें लोक म्हणूं लागले. समर्थ सज्जनगड येथें राहण्यास आल्यावर महाराजांनीं जिजोजी काटकर हावलदार यांजकडून उरमोडी नदीच्या कांठीं सरकारी बागेंत संध्यामठी बांधून देवविली. त्या वेळीं समर्थांनीं महाराजांना ' बाग-प्रकरण ' सांगितलें. त्यांत २८ ओंव्या आहेत. त्यांवरून फुलझाडें व फळझाडें यांविषयीं समर्थांना किती सविस्तर माहिती होती हें दिसून येतें. बाग-प्रकरणाच्या स्फुट समासांत दिलेल्या फळझाडांचीं व फुलझाडांचीं सर्व नांवें आधुनिक वनस्पतिशास्त्रज्ञांना माहीत आहेत कीं नाहींत याची शंका वाटते.

शके १५७३ या वर्षी दोन गोष्टी झाल्याचा वाकेनिशींत उल्लेख आहे. ( १ ) विड्याची गोष्ट. नांव दिलें नाहीं तरी ही गोष्ट भोळ्यारामासंबंधीं पिकदाणीची व खलबत्त्याची असली पाहिजे. भोळाराम हा औरंगाबादेकडील राहणारा होता. त्यास अनुग्रह झाल्यावर तो समर्थांपाशीं राहत असे व समर्थांना विडा करून देत असे. एकदां समर्थांना कफाची व्यथा झाली. तेव्हां पिकदाणी कफानें भरली. कोणी मनुष्य नसेल त्या ठिकाणीं ' रिचवून धुवून ' आणण्यास भोळारामास समर्थांनीं सांगितलें. चोहोंकडे मनुष्यें होतीं, एकांत स्थळ मिळेना, तेव्हां भोळा रामांनीं " त्यांतील प्राशन करून धुवून आणिली." " पिकदाणी कोठें टाकिली ?" असें समर्थांनीं विचारलें तेव्हां " निर्वेध जागा कोठेंच मिळेना, तेव्हां मीच प्राशन करून ती धुवून आणिली," असें सांगताना समर्थ रागें भरले व पुन्हां तसें न करण्या-बद्दल ताकीद दिली. त्या दिवसापासून समर्थांनीं त्याचें नांव ' भोळाराम ' ठेवलें. भोळारामाच्या खलबत्त्याची गोष्ट व रंगनाथस्वामींच्या रेड्याची गोष्ट पुढें ' अद्भुत गोष्टी' या भागांत दिल्या आहेत. समर्थांना कफाची व्यथा झाली असें वर सांगि-तलें आहे, त्या वेळीं त्यांनीं एक अष्टक केलें. तें सुप्रसिद्ध असून सांप्रदायिकांच्या नित्य पाठांतलें आहे. सदरहू अष्टकांत रघुवीरभजनाकरितांच कफाची व्यथा दूर करण्याची करुणा मारुतिरायाची भाकली आहे. " फणिवर[1] उठवीला वेग अद्भूत केला । त्रिभुवन जन लोकीं कीर्तिचा घोष गेला ।। रघुपति उपकारें दाटलें थोर भारें । परम धिर उदारें रक्षिलें सौख्यकारें ।। १ ।। सकळ बळ मिळालें युद्ध ऊदंड झालें । कपिकटक[2] निमालें[3], पाहतां यश गेलें ।। परदळ-शरघातें कोटिच्या कोटि प्रेतें । अभिनव रणपातें दुःख बिभीषणातें ।। २ ।। कपि-रिसंघनदाटी जाहली थोर आटी । म्हणउनि जगजेठी धावणी चार कोटी ।। मृत वीर उठवीले, मोकळे सिद्ध झाले । सकळ जन निवाले धन्य सामर्थ्य चाले ।। ३ ।। बहुप्रिय रघुनाथा मुख्य तूं प्राणनाथा । उठवि मज अनाथा दूर सारूनि

---

१. शेषाचा अवतार लक्ष्मण. २. सैन्य. ३. मेले. ४. अस्वल.

बेथा ॥ झडकरि भिमराया तूं करी दृढ काया। रघुविरभजना या लागबेगेंचि जाया ॥ ४ ॥ तुजविण मज पाहे पाहतां कोण आहे। म्हणउनि मन माझें रे तुझी वास[1] पाहे ॥ मज तुज निरवीलें[2], पाहिजे आठवीलें। सकळिक निजदासालागि सांभाळवीलें ॥ ५ ॥ उचित हित करावें, उद्धरावें भरावें। अनुचित न करावें त्वां जनीं यश घ्यावें ॥ अघटित घडवावें, सेवका सोडवावें। हरिभजन वडावें, दुःख तें वीघडावें[3] ॥ ६ ॥ प्रभुवर विरराया, जाहली वज्र काया। परदळ निवटाया दैत्य-कुळें कुटाया ॥ गिरिवर उतटाया रम्य वेषें नटाया। तुजचि अलग टाया, ठेविलें मुख्य ठाया ॥ ७ ॥ बहुत सबळ सांठा, मागतो अल्प वांटा। न करि हितकाटा थोर होईल ताठा ॥ कृपणपण नसावें, भव्य लोकीं दिसावें। अनुदिन करुणेचें चिह्न पोटीं वसावें ॥ ८ ॥ जलधर-करुणेचा अंतरांमाजिं राहे। तरि तुज करुणा हे कां नये सांग पाहे ॥ कठिण हृदय झालें, काय कारुण्य गेलें। न पवसि मज कां रे, म्यां तुझें काय केलें ॥ ९ ॥ वडिलपण करावें सेवकां सांवरावें। अनहित न करावें तूर्त हातीं धरावें ॥ निपटचि हटवादें प्रार्थितों शब्द भेदें। कपि[6] वनं करुणेचा, बोलला रामवेधें ॥ १० ॥ बहुतचि करुणा या लोटली देवराया। सहजचि कफकेतें जाहली वज्र काया ॥ परत सुखविलासें सर्व दासानुदासें। पवनतनुज[9] तोषें वंदिला सावकाशें ॥ ११ ॥"

याच वर्षी ( शके १५७३ ) शहाजीराजे समर्थांना भेटण्यास सज्जनगडावर आले होते. शके १५७१ ज्येष्ठ पौर्णिमेस त्यांची सुटका झाली होती तरी त्यांच्यावर कांहीं दिवस विजापूरदरबारची गैरमर्जी होती. सुटकेनंतर पांच वर्षे त्यांना कर्नाटकांत पाठविलें नव्हतें. शहाजीराजे यांच्याबरोबर शिवाजीमहाराज, राजमाता जिजाबाई व तुकाबाई व व्यंकोजीराजे हे ही होते. सर्व मंडळी समर्थदर्शन घेऊन परत गेली. या वेळीं समर्थ शिवाजीमहाराज व शहाजीराजे यांनीं तत्कालीन स्थितीचा विचार करून तूर्त विजापूरदरबारच्या उलट शिवाजीमहाराजांनीं उघडपणें कांहीं करूं नये असें ठरलें होतें असें दिसतें. कारण शहाजीराजे कर्नाटकांत परत जाईपर्यंत शिवाजीमहाराजांनीं विजापूरकरांविरुद्ध कांहीं केलें नाहीं.

सज्जनगडावर समर्थ राहण्यास आल्यावर पुष्कळ साधुसंत त्यांना भेटण्यास येत असत. तुकाराममहाराज, जयरामस्वामी, वामन पंडित, रंगनाथस्वामी, बेणाबाई-प्रभृति येत असत व सर्वांचीं तेथें कीर्तनें होत असत, असा उल्लेख कांहीं प्राचीन समर्थचरित्रांत आहे. उद्धवसुतकृत चरित्रांत या कीर्तनांचें चटकदार वर्णन दिलें आहे. अमक्याच वर्षी अमुक संत मंडळी आली असा उल्लेख नाहीं. तुकाराम व

---

१. वाट. २. स्वाधीन केलें. ३. दूर करावें. ४. उचलण्याकरितां. ५. पावसी –प्रसन्न होसी. ६. मारुति. ७. मेघ. ८. रामचिंतनानें. ९. वायुपुत्र मारुति.

महाराज ही अशा एका कीर्तनप्रसंगीं हजर होते व त्यांनीं समर्थांच्या विनंतीवरून कीर्तन केलें व श्रोत्यांचीं मनें तल्लीन करून सोडलीं असा उल्लेख आहे. परंतु तुकारामांचें सज्जनगडावर कीर्तन होणें शक्य दिसत नाहीं. कारण तुकाराम शके १५७१ सालीं फाल्गुन कृष्ण द्वितीयेस वैकुंठवासी झाले व समर्थ सज्जनगडावर राहण्यास शके १५७२ सालीं कार्तिकांत आले. प्रो. भाटे तुकाराममहाराजांचा वैकुंठगमनकाल कदाचित शके १५७३ पर्यंत नेतां येईल असें म्हणतात. तसें मानल्यास तुकाराममहाराजांचें कीर्तन सज्जनगडावर होणें संभवनीय होऊं शकेल. एकदा समर्थांच्या आज्ञेवरून शिवाजीमहाराजांनीं ही कीर्तन केल्याचा उल्लेख कांहीं चरित्रांत आहे. त्या वेळीं महाराजांनीं पुढील स्वकृत पद म्हटलें:—

पद—महाराज गरीब नवाज । अजि हो महाराज गरीब नवाज ।। ध्रु० ।।
सेवक होकर सेवा मंगो । इतना साहेब काज ।। १ ।।
बंदा कमिन हीनमे साहेब । रखो मेरी लाज ।। २ ।।
छत्रपती तुम शेखदार । शिव रखे हमारी लाज ।। ३ ।।

सज्जनगडावर असतां एकदां शिवाजीमहाराज समर्थांच्या दर्शनास आले व 'कांहीं सेवा घडावी' असें म्हणाले. तेव्हां समर्थ म्हणाले, 'तुम्ही स्वराज्य स्थापण्याचा जो आरंभ केला आहे, त्यांत म्लेंच्छ निवारण होऊन देवब्राह्मणांची सेवा होऊन धर्मस्थापना होत आहे ही आमचीच सेवा होत आहे.' या वेळीं समर्थांनीं महाराजांना तीन गोष्टी करण्यास सांगितल्या. (१) दरवर्षीच्या श्रावण महिन्यांत कोटी पार्थिव लिंगें करणें, (२) ब्राह्मणदक्षिणा इतर महिन्यांत न देतां श्रावण महिन्यांत देणें व (३) हिंदुराज्यांत म्लेंच्छांप्रमाणें 'जोहार' न करितां 'रामराम' म्हणण्याची पद्धति सुरू करणें. या तिन्ही गोष्टी महाराजांनीं शके १५७३ खर नाम संवत्सरीं सुरू केल्या (ह. स्वा. बखर). याच वर्षीं पाडळीच्या पाटलानें समर्थशिष्यांस मारहाण करितांना श्री. मारुतीनें पाडळी गांवास आग लावली व पाटील समर्थांस शरण गेल्यावर आग विझविल्याची आख्यायिका ह. स्वा.च्या बखरींत दिली आहे.

**शके १५७४.** श्रेष्ठांचें पत्र आल्यावरून समर्थ शके १५७४ नंदन नाम संवत्सरीं जांबेस श्रीरामनवमीच्या उत्सवास गेले होते. उत्सवसमाप्तीचे भोजनसमारंभाच्या वेळीं वेळेवर तूप आलें नाहीं म्हणून समर्थांनीं विहिरींतून पाण्याची घागर काढून तेंच तूप वाढल्याची अद्भुत दंतकथा याच उत्सवांत झाल्याचा ह. स्वा.च्या बखरींत उल्लेख आहे. जांबेहून समर्थ मातापुरास गेले. बरोबर कल्याण व उद्धव होते. मातापुरास दत्ताचें स्थान आहे. तेथें ब्राह्मण अनुष्ठान करीत बसले होते. 'हंडी'ची अद्भुत गोष्ट झाली ती पुढें 'अद्भुत गोष्टी' या भागांत दिली आहे.

**शके १५७५.** या वर्षीं समर्थ मातापुराहून तेलंगण प्रांतीं गेले. तेथें सारंगपुरानजीक इंदूरबोधन येथील एका तलावांत कंबरेइतक्या पाण्यांत उभें राहून

ब्राह्मण पाऊस पडण्याकरितां अनुष्ठान करीत होते. त्यांना समर्थांनीं बाहेर बोलाविलें. तेथेंच एक मोठा दगड होता, त्यावर समर्थांनीं कोळशानें प्रताप मारुतीचें ध्यान रेखिलें, त्यावर आपली छाटी टाकली आणि त्या मारुतीवर महारुद्राचा अभिषेक करण्यास सांगितलें. तसें केल्यावर प्रचंड पर्जन्यवृष्टि झाली. इंदूरबोधनच्या लोकांनीं समर्थांचा गौरव केला व तेथेंच राहण्याची विनंति केली. समर्थांनीं मठ स्थापन करून कोदंडधारी रामाच्या मूर्तीची प्रतिष्ठा केली व त्या मठांत उद्धवस्वामींची योजना केली. ते कांहीं दिवस त्या मठांत व कांहीं दिवस टाकळी येथील मठांत राहत असत. दगडावर काढलेल्या मारुतीची सारंगपूर येथें खडीवर स्थापना केली व समर्थ चाफळास परत जाण्यास निघाले. वाटेंत तिसगांवनजीक डोंगरांत वृद्धेश्वराचें पुरातन स्वयंभु देवस्थान आहे तेथें आले. या रम्य स्थळीं भिंगारचे बहिणाजी ऊर्फ दिनकर पाठक सद्गुरूप्राप्तीकरितां पुरश्चरण करीत होते. त्यांना फाल्गुन शुद्ध पौर्णिमे दिवशीं अनुग्रह दिला. हे च ' स्वानुभव दिनकर 'कर्ते तिसगांवमठाधिपति दिनकरस्वामी होत. तिसगांवाहून ५।६ मैलांवर भातवाडी येथें श्रीनृसिंहाचें देवालय आहे. देवदर्शन घेऊन जवळच्या वडगांवीं समर्थ गेले व तेथून चाफळास जाण्यास निघाले व फाल्गुनअखेर चाफळास आले. समर्थांना जांबेहून चाफळास लवकर येण्यास महाराजांच्या मंत्रिमंडळाकडून पत्र आलें होतें. खुद्द महाराजांनीं ब्राह्मणांकडून पत्र पाठविलें होतें असा उल्लेख ह. स्वा.च्या बखरींत आहे.

शके १५७६. या वर्षींच्या रावनवमीच्या उत्सवास समर्थ चाफळास होते. दरवर्षीप्रमाणें वेणाबाई मिरजेहून चाफळास उत्सवाकरितां आल्या होत्या. उत्सवाच्या सामग्रीची सर्व व्यवस्था वेणाबाईकडे सांगून आक्का कांहीं कामाकरितां बत्तिसशिराळ्यास गेल्या. आक्का गेल्यावर वेणाबाई हिंवतापानें फार आजारी पडल्या. आजारी असतांनाच वेणाबाईंनीं उभें राहून पुढील पद म्हणून श्रीरामाची प्रार्थना केली. " पतीतपावना जानकीजीवना । अरविंद-नयना रामराया ॥ १ ॥ आक्का गांवा गेली । मज व्यथा आली । दयाळा राहिली । नवमी तूझी ॥ २ ॥ आक्का गांवा जातां । ऐका सीताकांता । वेणीच्या आकांता । पावा वेगीं ॥ ३ ॥ नवमी—समारंभा । पाहूं या बरवा । मग देह रावबा । जावो राहो ॥ ४ ॥ ऐकोनी करुणा । अयोध्येचा राणा । मूर्तीच्या नयना । अश्रू आले ॥ ५ ॥ ऐकोनी वचन । पतीतपावन ॥ कृपेचा पवन वेणी-वरी ॥६॥" हें पद ऐकल्यावर श्रीरामांनीं वेणाबाईच्या गळ्यांत हार घातला व वेणाबाईचा हिंवताप बंद झाला. ही गोष्ट समर्थांना कळल्यावर ' शरीरव्यथा निवारण करण्याकरितां श्रीरामावर इतउत्तर भार घालूं नये ' असें समर्थांनीं सांगितलें, अशी ही आख्यायिका आहे.

ह. स्वा.च्या बखरींत पुढील गोष्ट शके १५७६ सालीं झाली म्हणून उल्लेख आहे. समर्थ फाल्गुन अखेर तिसगांवाहून परत आल्यावर ती लागलीच झाली

असली पाहिजे. उडपीचे श्रीमध्वाचार्य यांनीं आपला एक ब्राह्मणशिष्य समर्थांविषयीं खरी माहिती मिळविण्यास पाठविला होता. वाटेंत एके दिवशीं त्याच्या नैवेद्यास कुत्र्यानें स्पर्श केला, आपद्धर्म म्हणून विष्णुतीर्थ सिंचन करून तुलसीसहवर्तमान त्या शिष्यानें तो नैवेद्य भक्षण केला. नंतर त्यानें चाफळास येऊन समर्थांची गांठ घेतली व त्यांना श्रीमध्वाचार्यांचें पत्र दिलें. समर्थांनीं त्यास स्नान करून भोजन करण्यास सांगितलें. 'आम्ही वैष्णव, दुसऱ्यांनीं केलेलें अन्न भक्षण करीत नाहीं' म्हणतांना त्या शिष्यास सर्व साहित्य दिलें. स्वयंपाक करून त्यानें पात्र वाढून घेतल्यावर समर्थांनीं त्याच्या पानावर द्रोण ठेवून तूप वाढलें. तेव्हां तो शिष्य म्हणाला कीं, 'दुसऱ्यानें स्पर्श केलेलें अन्न आम्ही वैष्णव भक्षण करीत नाहीं. आपण ही वैष्णव आहां, परंतु तप्तमुद्रांकित नाहीं.' 'कुत्र्यानें स्पर्श केलेलें अन्न विष्णुतीर्थानें शुद्ध होतें, परंतु मीं स्पर्श केलेलें अन्न विष्णुतीर्थानें ही शुद्ध होत नाहीं काय?' असें म्हणतांना तो वैष्णव खिन्न झाला व त्यानें समर्थांना साष्टांग नमस्कार केला व क्षमा मागितली. हें चरित्र शके १५७६ जय नाम संवत्सरीं झालें (ह. स्वा. बखर, भाग ११) ज्या भागांत ह. स्वा.च्या बखरींत वरील वैष्णव ब्राह्मणाची गोष्ट दिली आहे, त्याच भागांत या गोष्टी पूर्वीं पैठणच्या एकनाथपंत रोजगारी ब्राह्मणाची गोष्ट व कल्याणस्वामींना रामघळीनाजिक सर्पदंश झाल्याची गोष्ट अशा दोन गोष्टी सांगितल्या आहेत. (१) पैठणचे एकनाथ नांवाचे ब्राह्मण समर्थांना भेटण्यास चाफळास आले. समर्थांनीं कल्याणास 'तीन पात्रांचें साहित्य आहे, तिघांचा स्वयंपाक कर,' म्हणून सांगितलें. त्याप्रमाणें स्वयंपाक झाला. इतक्यांत राजापूरचे ६० ब्राह्मण आले. त्यांना समर्थांनीं जेवणास राहण्यास सांगितलें. तिघांचें अन्न कल्याण वाढत असतां तें अन्न ६३स पुरलें, अशी ही आख्यायिका आहे. दक्षिणा देण्यास समर्थांनीं एकसष्ट होन एकनाथपंतांपासून मागून घेतले. साठ ब्राह्मणांना प्रत्येकीं एकेक होन व एकनाथपंतांस एक होन अशी समर्थांनीं दक्षिणा दिली व भोजनोत्तर सर्वांना निरोप दिला. दोन वर्षें कष्ट करून ६१ होन मिळविलेले गेले म्हणून एकनाथपंत कष्टी होऊन गांवीं गेले. ते घरीं जाण्यापूर्वींच समर्थांनीं त्यांच्या घरीं जाऊन दुप्पट म्हणजे १२२ होन एकनाथपंतांच्या वडलांजवळ दिले अशी ही आख्यायिका आहे. यांतील उत्तरार्धांत कांहीं अविश्वसनीय भाग नाहीं. पूर्वार्ध शिवाजीमहाराजांच्या सैन्यास अन्न पुरविलेल्या दंतकथेच्या स्वरूपाचा आहे.

एकनाथपंतांची गोष्ट शके १५७७ त झाली असा स्पष्ट उल्लेख वांकेनिशींत आहे. तेव्हां तोच विश्वसनीय मानला पाहिजे.

(२) सर्पदंश:—एकदां रात्रीं समर्थांनीं शिष्यांना विड्याचीं पानें मागितलीं. 'पानें नाहींत, सुपारी आहे,' असें सर्व शिष्य म्हणाले. कल्याणास पानें मागतांना,

"आज्ञा महाराज' म्हणून मध्यरात्रीं पानें आणण्यास चाफळास निघाला. वाटेंत अंधारांत कृष्णसर्पाच्या शेंपटीवर कल्याणांचा पाय पडतांच त्यानें पोटरीस कडकडून दंश केला. 'जयजय रघुवीर समर्थ' असें मोठ्यानें ओरडून कल्याणस्वामी मूर्च्छा येऊन जमिनीवर पडले. कल्याणांचा शब्द ऐकून समर्थ शिष्यांसह धांवून आले व कल्याणाजवळच असलेल्या बहिरोबास 'माझ्या कल्याणास उठवावें, अकरा मण गूळ वांटीन,' म्हणून नवस केला व कल्याणाच्या अंगावरून हात फिरवून 'कल्याणा, ऊठ.' असें म्हणतांच कल्याणस्वामी उठले. बहिरोबास गूळ वांटून समर्थांनीं नवस फेडला.

याच भागांत सर्पदंशापूर्वी ह. स्वा.च्या बखरींत समर्थांच्या कित्त्याची गोष्ट दिली आहे. तेव्हां ती ही याच वर्षी झाली असावी असें दिसतें. कल्याणांनीं लिहिलेल्या एका ग्रंथाचें अक्षर समर्थांना पसंत पडलें नाहीं, तेव्हां "कल्याणा, अक्षर चांगलें कर," असें समर्थ म्हणाले. "कित्ता दिला असतां, मी अक्षर चांगलें करीन." असें कल्याणांनीं म्हणतांच समर्थांनीं झोळींत हात घालून कित्ता काढून दिला. कल्याणांनीं त्या कित्त्यावरहुकूम अक्षर चांगलें केल्यावर समर्थांनीं कल्याणांकडून दासबोध ग्रंथ लिहविला. म्हणजे ह. स्वा.च्या बखरीप्रमाणें शके १५७६ त दासबोध ग्रंथ लिहिण्यास आरंभ झाला असें म्हणावें लागतें. "त्या कित्त्यांत सोन्याच्या शाईचीं अक्षरें असून लिपी बाळबोध आहे व ती देवावाणी असून तिचा अर्थ समर्थ व कल्याण यां दोघांनाच ठाऊक होता." असें ह. स्वामी म्हणतात. तो कित्ता अद्यापि डोमगांवच्या मठांत आहे.

शके १५७७. या वर्षी रामनवमीच्या उत्सवास समर्थ चाफळास होते. याच वर्षी "मन्मथ नाम संवत्सरीं वैशाख शुद्ध द्वितीयेस शिवाजीमहाराज यांनीं समर्थांच्या झोळींत राज्याची चिठी टाकली." असा वांकेनिशीच्या २६ व्या टिप्पणांत उल्लेख आहे. या गोष्टीची सविस्तर हकीकत इतर प्राचीन समर्थचरित्रांत आहे. शिवाजीमहाराज सातान्यास असतांना वैशाख शुद्ध द्वितीयेच्या दिवशीं समर्थ भिक्षा मागत करंज गांवाहून सातान्यास आले. महाराज बाहेर आले व समर्थांस दंडवत घालून बाळाजी आवजी चिटणीस यांच्या हस्तें चिठी लिहून तिच्यावर आपल्या हातची मुद्रा करून ती चिठी झोळींत टाकली. 'झोळींत काय टाकलें?' म्हणतांना 'भिक्षा घातली.' असें महाराज म्हणाले. समर्थांनीं उद्धवांकडून चिठी वाचविली. "आजपर्यंत मिळविलें तें स्वामीस अर्पण असो." असा त्या चिठींत मजकूर होता. नंतर महाराजांनीं एक दिवस समर्थांबरोबर भिक्षा मागितली आणि दोघांनीं पानगे भाजून खाल्ले. नंतर समर्थांनीं महाराजांना 'राज्य करणें हाच क्षत्रियाचा धर्म आहे,' असें सांगितलें व 'सावधानता' प्रकरणाचा स्फुट समास सांगितला. तो महत्त्वाचा आहे व त्यावरून समर्थ हे राजकारणी संत होते हें स्पष्ट दिसतें. तो समास लहान आहे म्हणून संबंध देतों:—

"कोणाचा भरंवसा न धरावा । आपुला आपण विचार पहावा ॥ तकवा उदंड धरावा । हां हीं एक विषयीं ॥१॥ देहदुःखें कदरों नये । उदंड चि करावे उपाय ॥ मग सर्व सुखास काय । उणें आहे ॥ २ ॥ एकांतीं चाळणा करावी । धारणा उदंड धरावी ॥ नाना विचारणा करावी । अरिमित्रांची ॥ ३ ॥ प्रयत्नीं चुकों नये । सुखवासी कामा नये ॥ सुचावे नाना उपाय । अनेक विषयीं ॥ ४ ॥ धुरेनें धीर सोडूं नये । मुख्य प्रसंग चुकों नये ॥ उद्योगरहित कामा नये । पशु जैसें ॥५॥ उपाधीस कंटाळला । विचाराचा आळस आला ॥ म्हणजे जाणावा चेवला । बुद्धि पासुनी ॥ ६ ॥ खबरदारी आणि वेगी । तेणें सामर्थ्य चढे अंगीं ॥ नाना प्रसंगें कार्यभागीं । अंतर चि न पडे ॥ ७ ॥ कार्यकर्ते दुरी करावे । प्रसंगें सर्वेचि हातीं धरावे ॥ परंतु शोधोनि पहावें । कपटाविषयीं ॥ ८ ॥ जेथें बहु विचार । तेथें ईश्वरी अवतार ॥ मागें झाले थोर थोर । धक्के चपेटे सोसुनी ॥ ९ ॥ आपल्या मनासि रोधावें । परांतर शोधावें ॥ क्षणक्षणा संभाळावें । बदलेल म्हणुनी ॥ १० ॥ पाहिलेंचि पाहावें । केलेंचि करावें ॥ शोधिलेंचि शोधावें । राजकारण ॥ ११ ॥ इशारतीचें बोलतां नये । बोलायाचें लिहूं नये ॥ लिहायाचें सांगूं नये । जबानीनें ॥ १२ ॥" हा उपदेश ऐकून महाराजांनीं पुन्हा पूर्वींप्रमाणें राज्यकारभाराचें काम करण्याचें कबूल केलें. परंतु हें राज्य अतःपर माझें नव्हे समर्थांचें आहे म्हणून प्रसाद-चिन्ह मागितलें. तेव्हां समर्थांनीं महाराजांच्या राज्याचा झेंडा भगवा ठेवावा असें सांगितलें. महाराजांनीं तें मान्य केलें. तेव्हांपासून मराठ्यांचा भगवा झेंडा प्रसिद्ध आहे.

'श्रीसमर्थांचा गाथा' या पुस्तकांचे कर्ते गोसेवक श्री. अनंतराम यांना समर्थ भिक्षेस गेले असतां महाराजांनीं झोळींत राज्यदानाची चिठी टाकली ही गोष्ट मान्य आहे, परंतु महाराजांनीं चिठी कां टाकली याचें कारण गुरुभक्ति असून शिवाय आणखी ही एक विशेष कारण होतें असें तत्कालीन राजकीय परिस्थिति पाहून त्यांनीं सप्रमाण अनुमान काढलें आहे. ते म्हणतातः—"कर्नाटकांत बंडें उप-स्थित झाल्यामुळें आदिलशहानें शहाजीराजास पुन्हा मर्जीत घेऊन शके १५७६ च्या आरंभीं तिकडे पाठविलें. हें पाहतांच शिवरायांचा पांच वर्षें कोंडलेला उत्साह इतका उसळला कीं, ते जवळच्या मुत्सद्यांना अनावर झाले. शहाजीराजांचें पुढील धोरण स्पष्ट न कळल्यामुळें महाराजांनीं उतावळीपणानें कांहीं केलें व तें गळ्यांत आलें तर कुचंबणा होणार आणि समर्थांखेरीज दुसऱ्या कोणास ते या वेळीं वळ-णार नाहींत, असें जाणून सर्व मुत्सद्यांनीं विचार करून समर्थांना बोलावून घेतलें. त्यांनीं सर्वांचा विचार ऐकून 'पाहोन समजोन कार्य करणें । तेणें कदापि नये उणें ॥' असाच सल्ला समर्थांना द्यावा लागला. शिवरायांच्या सळसळणाऱ्या अंतःकरणास अर्थातच त्यांचा सल्ला रुचला नाहीं, म्हणून त्यांनीं कांहींसा रुसवा मनांत धरून

'सर्व संपादिलें तें चरणीं अर्पण' अशा आशयाची चिठी १५७७च्या वैशाख शुद्ध द्वितीयेस समर्थ भिक्षेस निघाले असतां त्यांच्या झोळींत टाकली. वर दिलेल्या 'सावधानता' या स्फुट समासांत समर्थांनीं महाराजांना केलेला उपदेश पाहतां महाराजांनीं समर्थांच्या झोळींत राज्यदानाची चिठी टाकण्यांत गुरुभक्तीप्रमाणें गुरुप्रेमाच्या रुसव्याचा ही भाग असावा हें श्री. अनंतदास यांचें म्हणणें खरें असण्याचा संभव आहे. आधुनिक 'दत्तकवीं'नीं या प्रसंगाविषयीं पुढील श्लोक केला आहे:—"'भिक्षा वाढ' असें समर्थ म्हणती, त्यायासनीं ऐकुनी । आला धांवत दानशूर नृपती, बोले करां जोडुनी ॥ 'लक्ष्मी ही अपुली, राज्य अपुलें मी ही असें आपुला । घ्यावी ही तलवार, हा मुकुट, हा माथा पदीं वाहिला ॥'"

कर्नाटकांत जाऊन शहाजीराजे यांना भेटून त्यांची सल्ला घेण्याची कामगिरी समर्थांनीं आपल्याकडे घेतली. मध्यंतरीं मातोश्री आजारी आहेत, असें समजल्यावर समर्थांना जांबेस जावें लागलें. राणूबाईची मरणोन्मुख स्थिति समर्थांना अंतर्ज्ञानानें कळतांच त्यांनीं शिष्यांना आपल्या खोलीचें द्वार सोळा दिवसांपर्यंत बंद करण्यास सांगितलें व ते एकदम गुप्तरूपानें जांबेस गेले अशी आख्यायिका प्राचीन समर्थचरित्रांत दिली आहे. समर्थ जांबेस गेले त्या वेळीं राणूबाई अत्यावस्थ होत्या. त्या 'नारायणा'ची वाट पाहत होत्या. समर्थ जवळ जातांच राणूबाईनीं त्यांच्या पाठीवरून हात फिरविला व 'तुम्ही उभय पुत्रांनीं आमच्या कुळाचा उद्धार केला' असें म्हणून 'जयराम' शब्द उच्चारून शके १५७७ मन्मथ नाम संवत्सरीं ज्येष्ठ शुद्ध तृतीयेच्या दिवशीं प्रात:काळीं श्रेष्ठ व समर्थ सन्निध असतां इहलोक सोडला. माता राणादेवी त्या लहानपणापासून फार धार्मिक व भाविक होत्या. विवाह झाल्यानंतर त्या सदा पतिसेवातत्पर असत. पुत्रप्राप्तीकरितां सूर्याजीपंताबरोबर त्यांनीं ही सूर्याराधनेची तपश्चर्या केली होती. श्रेष्ठ व समर्थांच्या जन्मानंतर सातव्या वर्षी सूर्याजीपंत कैलासवासी झाल्यामुळें त्यांना दु:ख झालें. दोन सुपुत्रांकडे पाहून त्या कालक्रमण करीत होत्या. समर्थांनीं लग्न करावें अशी त्यांची उत्कट इच्छा होती. परंतु लग्न न करितां ते ऐन वेळीं 'सावधान' शब्द ऐकतांच पळून गेल्यावर त्या माउलीला अत्यंत दु:ख झालें. श्रेष्ठांनीं पुष्कळ समाधान केलें तरी त्यांचा शोक कमी झाला नाहीं. २४ वर्षे त्यांनीं असा शोक करण्यांत काढलीं. त्या नंतर श्रीरामकृपेनें 'जयजय रघुवीर समर्थ' म्हणून समर्थांनीं पायांवर मस्तक ठेवतांना त्यांचा शोक दूर झाला. पुढचीं अकरा वर्षे त्यांचीं आनंदांत गेलीं. व दोघे 'परम भागवत सत्पुत्र' सन्निध असतांना त्यांनीं आनंदानें इहलोकची यात्रा संपविली. समर्थांची राणूबाईविषयीं अत्यंत पूज्य बुद्धि होती. समर्थ परम मातृभक्त होते. हें कृष्णातीरीं आल्यावर त्यांनीं जें ओंवीबद्ध पत्र मातोश्रीस पाठविलें, त्यावरून व्यक्त होतें. त्या

पत्राच्या एकंदर ११ ओंव्या आहेत. पहिली ओंवी मागें दिलीच आहे. आतां बिस्तारभयास्तव पुढल्या दोनच देतों:–"तूं भव सिंधूचें तारू । तूं भक्तांचा आधारू॥ तूं अनाथांचे अवसरू । वैष्णवी माया ॥ २॥ तूं भावार्थांची जननी । तूं विरक्तास जीवनीं ॥ तूं भावार्थांची खाणी । भजनशील ॥ ३ ॥" शिवाजीमहाराजांची ही राजमाता जिजाबाईविषयीं अत्यंत पूज्य बुद्धि होती. आजपर्यंत जगांत जे विख्यात पुरुष झाले, ते परम मातृभक्त होते अशी इतिहास साक्ष देतो. ही गोष्ट हल्लींच्या शाळेंतील मुलामुलींनीं पूर्ण लक्षांत ठेवून समर्थशिवरायांप्रमाणें त्यांनीं मातृभक्त होण्याचा दृढनिश्चय केल्यास प्रौढ वयांत त्यांच्या हातून देशोद्धाराचीं व राष्ट्रोन्नतीचीं कामें होऊन सर्व भरतखंडाचें शिवसमर्थ कालाप्रमाणें आनंदभुवन होईल. समर्थ फार दिवस जांबेस राहिले नाहींत. यथाविधि उत्तरक्रिया करून ते ज्येष्ठ कृष्ण तृतीयेस सज्जनगडास परत आले व लागलींच कर्नाटकांत जाण्यास निघाले.

वाटेंत मिरज येथील यवन अधिकारी दिलेरखान जयरामस्वामीस त्रास देत आहे असें समजलें; तेव्हां समर्थ तेथें गेले व त्या यवन अधिकाऱ्यांस किल्ल्याच्या भोंकांतून बाहेर येण्याचा चमत्कार करून दाखविला, तेव्हां तो समर्थांस शरण आला. ती गोष्ट पुढें अद्‌भुत गोष्टींच्या भागांत दिली आहे. खानाच्या विनंतीवरून मिरजेस मठ स्थापन केला व त्या मठांत वेणाबाईस राहण्यास सांगितलें. ही गोष्ट शके १५७७ च्या श्रावण महिन्यांत झाली. नंतर पुढें कर्नाटकांत जातांना वाटेंत चिकोडी येथें तिमाजीपंत देशपांडे यांस अनुग्रह दिला. कार्तिक महिन्यांत समर्थ तंजावरास पोहोंचले. तेथें शहाजीराजे यांच्याशीं विचारविनिमय केला व पुढील कार्यक्रम विश्वासू माणसाकडून शिवाजीमहाराजांना कळविला. कार्तिक महिन्यांत व्यंकोजीराजे यांस अनुग्रह दिला व त्यांच्या आग्रहावरून तेथें मठ स्थापन केला व शहापूरकर भीमस्वामी यांस तेथें संप्रदायप्रसाराकरितां ठेवलें. नंतर समर्थ रामेश्वरास गेले. पूर्वी तीर्थयात्रा करीत असतां समर्थ रामेश्वरास गेले होते. उत्तर हिंदुस्थानांत एकदां तीर्थयात्रा केलेल्या क्षेत्रास समर्थ पुन्हा गेले नाहींत. तेव्हां दक्षिण हिंदुस्थानांत रामेश्वरास येण्याचें कारण शहाजीराजे यांच्याशीं सल्लामसलतीकरितां तंजावरास येणें हेंच असलें पाहिजे. ते तंजावरापर्यंत आलेच होते, तेव्हां रामेश्वराचें दर्शन घेऊन पांचाळ, उडपी, तोरगल या मार्गानें चाफळकडे परतले. शिवाजीमहाराज तोरगलपर्यंत समर्थांना सामोरे गेले.

शके १५७८. या वर्षी वामन पंडित समर्थांच्या भेटीस चाफळ येथें आले होते. ते वारणातीरीं कोरेगांव येथील राहणारे मध्वसांप्रदायी वैष्णव ब्राह्मण. बारा वर्षे काशीस जाऊन शास्त्राध्यायन करून श्रेष्ठ पंडित झाले. प्रत्यक्ष गुरूंचा ही वादांत त्यांनीं पराभव केला. नंतर फिरत फिरत दक्षिण महाराष्ट्रांत आल्यावर चाफळास

येऊन समर्थांचें दर्शन घेतलें. 'रामदास स्तोत्र ' या नांवाचें एक संस्कृतांत समर्थांवर पांच श्लोकीं स्तोत्र केलें आहे. त्या स्तोत्रांतील प्रत्येक श्लोकाचा शेवटचा चरण 'तस्मै सद्गुरवेऽति सन्तु नतयः श्रीरामदासाय मे " असा आहे. चवथ्या श्लोकांत "ग्रंथाश्चापि प्रबोधपटवः संसारमाशंसिनः ॥ " असा दासबोधास उद्देशून उल्लेख आहे. समर्थांनीं जनांचा उद्धार करण्याकरितां त्यांना प्राकृतांत कविता करण्याकरितां सांगितली. बामन पंडित व ब्रह्मराक्षस यांच्या संवादाची आख्यायिका ह. स्वा.च्या बखरींत सविस्तर दिली आहे.

शके १५७८. या वर्षीं चातुर्मास्याच्या आरंभीं समर्थ पाटणनजीक हेळवाकच्या घळींत होते. श्रावणांत पाटणावरून चाफळास आले. वाटेंत कोयना नदींत पुरामध्यें भोंवऱ्यांत सांपडले. चांदजीराव पाटणकर यांनीं पटाईत पोहणाऱ्यांकडून नदींत तपास करविला पण शोध लागला नाहीं. चाफळास ही बातमी समजल्यावर कल्याण व उद्धव आले. चांदजीरावांनीं त्यांना समर्थ बुडालेली जागा दाखविली; तेथें कल्याणांनीं बुडी मारली व आसनमांडी घालून ध्यानस्थ बसलेल्या समर्थांना बाहेर काढले. नंतर समर्थ पाटणास गेले व तेथें कांहीं दिवस राहिले. चांदजीरावांस अनुग्रह देऊन चाफळास गेले. पौष महिन्यांत महाराज समर्थांना भेटण्यास चाफळास आले होते. माघ शुद्ध पौर्णिमेस जयरामस्वामींचे गुरु कृष्णाप्पा यांच्या पुण्यतिथीस समर्थ वडगांवास गेले होते. त्या दिवशीं रंगनाथस्वामी भागानगराहून दुपारीं घोड्यावर बसून निघाले, ते रात्रीं दहा वाजतां वडगांवास आले. घोडा लांब प्रवासानें थकला व रात्रीं बेशुद्ध पडला. कीर्तन संपल्यावर घोड्याच्या पाठीवरून समर्थांनीं हात फिरविला तेव्हां तो उठून उभा राहिला. (माघ कृष्ण १ शके १५७८). एका व्यापाऱ्याचें जहाज समुद्रांत बुडत असतां तेथें जाऊन ते तारल्याची अद्भुत गोष्ट याच वर्षीं झाल्याचा वांकेनिशींत उल्लेख आहे. याच वर्षीं उद्धवगोसावी यांचें समर्थांना श्लोकबद्ध पत्र आलें आहे. तें अष्टक 'महाराज या सद्‌गुरू रामदासा ' म्हणून प्रसिद्ध आहे. त्यांतील आठवा श्लोक असा आहे, "मला वाटतें अंतरीं त्वां बसावें । तुझ्या दासबोधासि त्वां बोधवावें ॥ अपत्यापरी पाववी प्रेमग्रासा । महाराजया सद्‌गुरू रामदासा ॥ ८ ॥" यावरून दासबोधाची एक हस्तलिखित प्रत इंदूरबोधन येथें उद्धवापाशीं होती हें सिद्ध होतें. परंतु त्या प्रतींत किती दशक होते हें समजण्यास मार्ग नाहीं. उद्धवाच्या श्लोकबद्ध पत्रास समर्थांनीं ओंवीबद्ध उत्तर पाठविलें. त्यांतील चवथी ओंवी "आत्मारामीं आत्मा पहा । जाणुनिया सुखी रहा ॥ स्वानंदामृत सेवुनि पहा । निखिल निजरूप ॥ " समर्थांचें पत्र गेल्यावर इंदूरबोधन मठांत महादेवगोसावी यांची स्थापना करून उद्धवस्वामी समर्थदर्शनास आले ते इकडेच राहिले. सज्जनगडावर असतांना

एकदां खोलींत समर्थ भोजन करीत होते. केलेला एक पदार्थ वाढण्यास विसरला होता तो वाढण्याकरितां वेणाबाईनीं खोलीचें दार थोडेंसें उघडलें तों आंत मारुति व समर्थ भोजन करीत होते. वेणाबाईंना पाहतांच मारुतींनीं भुभुःकार केला. तेव्हां वेणाबाई मूर्छित होऊन पडल्या. नंतर त्यांना समर्थांनीं उठविलें. ही अद्भुत गोष्ट शके १५७८ सालींच झाली. ( ह. स्वा. बखर. )

शके १५७९. मोरोपंत पिंगळ्यांना महाराजांनीं प्रतापगड किल्ला बांधण्याचें काम सांगितलें होतें, तें काम शके १५७८ सालीं संपलें. महाराजांनीं प्रवेशसमारंभ मोठ्या थाटानें शके १५७९ सालीं केला. पुष्कळ लोकांना आमंत्रण केलें होतें. आमंत्रणयादीची अस्सल प्रत कै. रा. ब. पारसनीस यांना प्रतापगड येथील देवीच्या पूजाऱ्याच्या घरीं संशोधनांत मिळाली होती. ती त्यांनीं वाचून पाहिली. त्या यादींत व आमंत्रित मंडळींत समर्थांचें नांव पहिलें होतें, असें कै. रा. पारसनीस यांनीं सातारा मुक्कामीं मरणाच्या पूर्वीं आम्हांस सांगितलें होतें. प्रतापगडावर देवीची स्थापना क्षत्रियांपेक्षां ब्राह्मणांकडूनच करवावी असा समर्थांचा हेतु पाहून महाराजांनीं मोरोपंत पेशवे याच्या पत्नींकडून देवीची स्थापना केली. (ऐ.ब.) याच वर्षीं माघ शुद्ध चतुर्थीस समर्थांनीं निरंजनस्वामींस अनुग्रह दिला. रामबाण घोड्याची ही गोष्ट याच वर्षीं झाली. शिवाजीमहाराजांना कोणी एकानें एक उत्तम घोडा नजर केला होता. सज्जनगडावर येऊन त्यांनीं तो घोडा समर्थांना अर्पण केला. त्या घोड्याचें सामान काढून आयाळीस धरून समर्थ त्यावर उडून बसले. घोडा किल्ल्यावरच्या दरवाजांतून बाहेर पळाला. कांहीं अंतरापर्यंत उद्धव व कल्याण समर्थांच्या पाठीमागें गेले. दोनप्रहर झाल्यामुळें समर्थांना तहान लागली; तेव्हां उद्धवांनीं चंबूंतून पाणी आणलें होतें तें समर्थांना दिलें. पाणी पिऊन समर्थ संतुष्ट झाले व त्यांनीं उद्धवाचें नांव 'शिव' असें ठेवलें. नंतर घोडा फिरवीत समर्थ चाफळास गेले. घोडा मठांत बांधून त्याचें नांव 'रामबाण' असें ठेवलें.

शके १५८०. वांकेनिशींत या वर्षीं तीन गोष्टी झाल्याचा उल्लेख आहे. त्या:— ( १ ) हुरड्याची, ( २ ) शीतज्वराची व ( ३ ) सदाशिवशास्त्री येवलेकरांची. ( १ ) हुरड्याची गोष्ट:—समर्थ निगडीहून सज्जनगडास येत असतां वाटेंत देहेगांवच्या रानांत एका आंब्याच्या झाडाखालीं बसले. शेतांत हुरडा उत्तम तयार झाला होता. शिष्यांनीं कांहीं कणसें तोडून हुरडा भाजण्यास आरंभ केला. शेताचा मालक पाटील धांवत आला व त्यानें हुरड्याच्या ताटानें समर्थांच्या पाठीवर तडाखे मारले. शिष्य पाटलास धरून मारूं लागले. तेव्हां समर्थ म्हणाले कीं, "त्याच्या शेतांतलीं हुरड्याचीं कणसें तोडून त्यास मारणें चांगलें नव्हे, त्यास सोडून द्या." शिष्यांनीं मालकास न मारतां सोडून दिलें. नंतर शिष्यांसह समर्थ साताऱ्यास गेले. तेथें त्यांना शिवाजीमहाराजांनीं बोलावून राजवाड्यांत नेलें. स्नानाच्या वेळीं

समर्थांच्या पाठीवर माराचे वळ पाहून महाराजांनीं 'वळ कशाचे?' म्हणून विचारलें. समर्थ कांहीं बोलले नाहींत. भोजन झाल्यावर समर्थ विश्रांतीस गेले असतां महाराजांनीं शिष्यांना समर्थांच्या पाठीवरील वळांची हकीकत विचारली. त्यांनीं घडलेला सर्व प्रकार सांगितला. तेव्हां महाराजांनीं मनुष्य पाठवून शेताच्या मालकास बोलावून आणलें. महाराजांच्या मनांत पाटलास जबर शिक्षा द्यावयाची होती. पाटील व त्याच्या घरचीं माणसें भयाभीत होऊन गेलीं होतीं. महाराज कोणती शिक्षा सांगतात याकडे सर्व मंडळींचें लक्ष लागलें होतें. समर्थांनीं पाटलास शेलापागोटें देऊन हुरड्याचें शेत बाक्षिस देण्यास सांगितलें!! सर्वांना अत्यंत आश्चर्य वाटलें. समर्थ म्हणाले कीं, "पाटलानें आमच्या सहनशीलतेची परीक्षा केली, हे त्याचे आम्हांवर फार उपकार आहेत!!" ही गोष्ट शके १५८० विलंबी नाम संवत्सरीं पौष मासीं घडली. या गोष्टीचें कादंबरीप्रमाणें रसभरित व चटकदार वर्णन महिपतीबुवांनीं संतविजयांत केलें आहे.

( २ ) **शीतज्वराची गोष्ट:**—चाफळास असतांना एकदां समर्थांना शीतज्वराची बाधा झाली. त्या वेळीं शिवाजीमहाराज त्यांना भेटण्यास आले. अंगावरील छाटी उशास ठेवून समर्थ उठून बसले. 'छाटी कां उडते?' असें विचारतां कल्याणांनीं 'चारपांच दिवस समर्थ हिंवतापानें आजारी आहेत,' असें सांगितलें. 'आपलें सामर्थ्य इतकें असतां शरीरक्लेश कां भोगावे लागतात?' असा महाराजांनीं समर्थांना प्रश्न केला. भागवतांतील एकादश स्कंदांतील उद्धव व श्रीकृष्ण यांचा संवाद सांगून प्रारब्धकर्म भोगल्यावांचून सुटत नाहीं अशी महाराजांची समर्थांनीं खात्री केली. आजारी असतांना कांहीं मनुष्यें आपल्या इच्छाशक्तीनें ( Will power ) कांहीं वेळ व्यावहारिक गोष्टींसंबंधीं बोलतात तेव्हां ही शीतज्वराची गोष्ट 'अद्‌भुत गोष्टी'च्या सदरांत जाईल असें आम्हांस वाटत नाहीं.

( ३ ) मोळीविक्या महारानें सदाशिवशास्त्री येवलेकर यांचा गर्व परिहार केल्याची गोष्ट पुढें अद्‌भुत गोष्टींत दिली आहे. या वर्षीं माघ मासीं सदाशिवशास्त्री येवलेकर यांना अनुग्रह देऊन त्यांचें नांव वासुदेव पंडित असें ठेवलें व त्यांना कण्हेरी येथें मठ करून राहण्यास सांगितलें. एवढेंच येथें तूर्त सांगतों. विजापूरच्या आदिलशाहीशीं उघडपणें महाराजांनीं युद्ध सुरू केलें, तेव्हां त्यांच्या पारिपत्याकरितां विजापूरदरबारनें अफझुलखानाची योजना केल्याची बातमी महाराजांना कळली; तेव्हां मोरोपंत पिंगळे, जनार्दनपंत हणमंते प्रभृति अधिकारी मंडळीसह महाराज चाफळ येथें समर्थांना भेटण्यास फाल्गुन कृष्ण ११स आले होते.

शके १५८१. या वर्षीं चातुर्मासांत समर्थ महाबळेश्वरीं होते. विजयादशमी झाल्यावर अफझुलखानास तोंड देण्यास चारी दिशांना आपल्या सेनापतींना ठेवून कसलेल्या सरसेनापतीप्रमाणें युद्धाच्या हल्ल्याचीं मुख्य ठिकाणें रोखून

धरलीं व माघ शुद्ध सप्तमी शके १५८१ रोजीं मोठ्या प्रसंगावधानानें आपल्या जिवावरील संकट टाळून युक्तीनें खानाचीं आंतडीं बाहेर काढलीं. नंतर जवळच्या लोकांनीं खानाचा शिरच्छेद केला. विजयश्री संपादन करून महाराज समर्थांच्या भेटीस आले, तेव्हां समर्थांनीं त्यांना दासबोधांतील १८व्या दशकांतील ' उत्तम पुरुषलक्षण ' हा सहावा समास सांगितला. महाराजांच्या अंगच्या उत्तम गुणांनींच बलाढय शत्रूला जिंकतां आलें, तरी ' हें सर्व देणें ईश्वराचें आहे ' असें समजावें असा महाराजांना या समासांत उपदेश केला आहे.

महाराजांनीं समर्थांना जसा एक उत्तम घोडा दिला होता, त्याप्रमाणें एक उत्तम तलवार ही एकदां दिली होती. पुनर्जन्माचें कारण महाराजांनीं समर्थांना विचारलें असतां वासना ही पुनर्जन्माचें कारण आहे, असें सांगतांना " या भवानी तलवारीवर माझी वासना आहे म्हणून ती तलवार समर्थांना अर्पण करतों. " असें म्हणून ती अर्पण केली अशी कथा ह. स्वा.च्या बखरींत आहे. एके दिवशीं ती तलवार हातीं घेऊन समर्थ सर्वांच्या अंगावर धांवत सुटले. मंडळी भिऊन पळाली. समर्थ किल्ल्यावरून उडी टाकून खालीं गेले. शिरगांवीं कल्याण ग्रंथलेखनास गेले होते. त्यांना हें समजतांच ते आले व समर्थांचा शोध करूं लागले. एका दरींत झाडाखालीं समर्थ बसले होते तेथें कल्याण गेले. समर्थ 'तोडतों' म्हणाले. ' गुरुहस्तें मरण येणें हें महापुण्य आहे. ' असें कल्याण म्हणाले. कल्याणांची दृढनिष्ठा पाहून समर्थांनीं त्यास आलिंगन दिलें व त्यांच्या बरोबर चाफळास आले. ( शके १५८१, माघ कृ. ९ ) समर्थ तलवार घेऊन धांवत सुटले त्या वेळीं " पळा पळा ब्रह्म पिसा येतो जवळीं । रामनामें हांक देउनि डोई खांडोळी ॥ धृ० ॥" हें पद केलेलें प्रसिद्ध आहे. कित्येक साधु बालवृत्ति असतात, कित्येक पिशाचवृत्ति असतात असें म्हणतात. समर्थ केव्हां केव्हां लहान मुलांप्रमाणें व केव्हां केव्हां पिशाच्चांप्रमाणें वागत असत असें त्यांच्याविषयीं प्राचीन चरित्रांत लिहिलेल्या कांहीं गोष्टींवरून दिसतें. ही भवानी तलवार कांहीं दिवस मठांत होती. नंतर दिवाकर गोसावी यांनीं ती करवीरच्या पाटलास दिली. शाहू-महाराज परत आल्यावर त्यांना हें वर्तमान कळतांच त्यांनीं ती तलवार पाटलाकडून आणाविली व राजवाड्यांत ठेवली. तिची पूजा ह. स्वा.च्या वेळेपर्यंत करीत असत, असा बखरींत मजकूर आहे. हल्लीं ही भवानी तलवार साताऱ्याच्या महाराजांच्या वाड्यांत आहे असें म्हणतात. शके १५८१ सालीं विकारी नाम संवत्सरीं श्रेष्ठांचे दर्शनास शिवाजीमहाराज जांबेस गेल्याचा उल्लेख बांकेनिशांत आहे. ह. स्वा.च्या बखरींत ही महाराजांचा मुक्काम राक्षसभुवनास असतांना ते जांबेस श्रेष्ठांच्या दर्शनास गेले व श्रेष्ठांनीं ही त्यांना समर्थांप्रमाणें चमत्कार करून दाखवि-ल्याचा उल्लेख आहे. माघ शु. ७पर्यंत महाराज अफझुलखान प्रकरणांत गुंतले

होते व नंतर ही कांहीं दिवस त्यांना राक्षसभुवनकडे जाण्यास वेळ सांपडल्याचा संभव दिसत नाहीं. तेव्हां या गोष्टीस ऐतिहासिक पुरावा मिळाल्याशिवाय ही विश्वसनीय मानतां येणार नाहीं

समर्थवांकेनिशींत शके १५८१ सालीं महाराजांनीं अफझुलखानास मारल्याचा उल्लेख नाहीं व नंतर महाराज समर्थांच्या भेटीस आल्याचा ही उल्लेख नाहीं. ३१व्या टिपणांत महाराज श्रेष्ठांच्या दर्शनास जांबेस गेल्याचा उल्लेख आहे. १८व्या टिपणांत शके १५७१ सालीं शिंगणवाडी येथें महाराजांना अनुग्रह झाल्याचा उल्लेख केल्यानंतर 'बरकड शिवछत्रपतिप्रकरण आलाहिदा लिहिलें आहे." असें म्हटलें आहे. तेव्हां त्यांत वरील माहिती दिली असण्याचा संभव आहे.

शके १५८२. या वर्षी शार्वरी नाम संवत्सरीं चैत्र वद्य पंचमीस चाफळ येथें उद्धव गोसावी यांनीं कीर्तन केलें. त्या वेळीं स्वतः मारुतींनीं मागें उभें राहून टाळ वाजविला अशी दंतकथा वांकेनिशींत आहे. याच वर्षी समर्थांनीं झोळीभर चिमण्या मारून गवताच्या पेंढ्या जाळून उठविल्या अशी आख्यायिका ह. स्वा.च्या बखरींत दिली आहे. वरील दोन्ही गोष्टी पुढें 'अद्भुत गोष्टी' या भागांत दिल्या आहेत.

शके १५८२ पासून शके १५८८पर्यंत सहा वर्षांमध्यें घडलेल्या गोष्टींचा उल्लेख वांकेनिशींत नाहीं.

शके १५८८ पराभव नाम संवत्सरीं अश्विन शुद्ध दशमीस समर्थ ब्रह्मनाळास गेले होते. तेथें रघुनाथस्वामींचें वृंदावन डोललें एवढाच उल्लेख वांकेनिशींत आहे. त्यानंतर—

शके १५९५ प्रमादि नाम संवत्सरीं शिवछत्रपति कर्नाटकांत स्वारीस गेले; तेथें तपश्चर्येस राहवें म्हणोन बोलले. यांचें चरित्र अलाहिदा आहे, असा उल्लेख आहे.

शके १५८१ नंतर समर्थांनीं शिवाजीमहाराजांच्या राजकारणांत विशेष भाग घेतला नसावा म्हणून उभयतांच्या भेटीचे कालानुक्रमानें शकतिथीपूर्वक विशेष प्रसंग वांकेनिशींत दिलेले नसावेत याचें कारण श्री. गोसेवक अनंतदास पुढीलप्रमाणें देतातः—"शके १५६७ पासून शके १५८१पर्यंत शिवरायांच्या स्वराज्याचा उषःकाल असल्यामुळें या १५ वर्षांतील राजकारणांत श्रीसमर्थांनीं जितक्या प्रामुख्यानें भाग घेतलेला दिसतो, तितक्या प्रामुख्यानें पुढें घेतलेला दिसत नाहीं आणि हें स्वाभाविकच आहे. या पंधरा वर्षांत श्रीशिवसमर्थांचा संबंध सामान्यतः असा दिसतो कीं, श्रीसमर्थांनीं एखादी मसलत योजावी व ती व शिवरायांनीं पार पाडावी किंवा शिवरायांनीं योजिलेल्या मसलतीस प्रोत्साहन देऊन, अनेक प्रकारांनीं साह्य करून समर्थांनीं ती सिद्धीस न्यावी. अफझुलखानाच्या वधानंतर ही स्थिति पालटली. शिवरायाच्या शौर्याला व साहसाला समर्थांच्या साहाय्यानें

विवेकाची जोड मिळून तिशीच्या वयांत ते उत्तम प्रकारचे मुत्सद्दी झाले. १५८०-८१ चे सुमारास त्यांच्या पदरीं अनेक शूर व विश्वासू सेनानायक व मुत्सद्दी होते. शेजारच्या शत्रूवर ही अफझलखानाच्या वधामुळें वचक चांगला बसला व त्यांचें स्वराज्य दृढमूल झालें. म्हणून शके १५८१ नंतर श्रीसमर्थांनीं शिवरायांच्या उद्योगाकडे दुरून लक्ष ठेविलें." ( प्रस्तावना, पान १२९, श्रीसमर्थांचा गाथा ). श्री. अनंतदास यांचें वरील अनुमान खरें आहे असें आम्हांस वाटत नाहीं. कारण अफझुलखानाच्या वधानंतर महाराजांचें स्वराज्य दृढमूल झालें असें म्हणतां येणार नाहीं. अफझुलखानाच्या वधानें खऱ्या स्वराज्यस्थापनेस नुकतां प्रारंभ झाला. त्यानंतर महाराजांच्या आयुष्यांत स्वराज्यस्थापनेच्या कामीं अनेक बिकट प्रसंग आले. शाइस्तेखान, दिलेरखान, जयसिंग हे दिल्लीहून अफझुलखानापेक्षां ही अधिक प्रचंड व कसलेलें सैन्य घेऊन महाराजांवर चाल करून आले. तेव्हां महाराजांच्या राज्यावर फार मोठें संकट आलें होतें. दिलेरखान व जयसिंग यांनीं जिवावर उदार होऊन लढणाऱ्या शूर मुरार बाजीचा पराभव करून पुरंदरचा दुर्ग व किल्ला घेतला, तेव्हां महाराजांना पुष्कळ क़िल्ले व राज्याचा भाग मोंगलास द्यावा लागला व संभाजीसह आग्ऱ्यास जाण्याचें कबूल करावें लागलें. अशा आणीबाणीच्या वेळीं समर्थांनीं महाराजांकडे दुरूनच लक्ष ठेविलें असेल हें संभवत नाहीं. १२९ पानांतच श्री. अनंतदास पुढें म्हणतात:—"त्या प्रसंगांतून (आग्रा येथील अटकेंतून) महाराज १५८८ चे श्रावण कृष्ण १२स मोठ्या युक्तीनें निसटले. त्यांना सुखरूपपणें स्वदेशी परत आणण्याची तरतूद श्रीसमर्थांनीं अगोदरच करून ठेवली होती." असें म्हणून पुढें त्यांनीं मथुरा, अयोध्या काशी वगैरे उत्तर हिंदुस्थानांतील व इतर मठांचीं व महंतांचीं नांवें दिलीं आहेत. हे मठ समर्थांनीं पूर्वीच स्थापन केले होते व त्यांतील महंतांना हरिकथानिरूपणानंतर राजकारणांत भाग घेण्याचा ही उपदेश केला होता. त्याप्रमाणें त्यांनीं महाराज आग्ऱ्याहून निसटल्यावर त्यांना ते ज्या मार्गानें आले त्या मार्गानें सुखरूप येण्यास यावच्छक्य मदत केली असली पाहिजे. परंतु महाराजांना आग्ऱ्यास अटक झाल्यावर समर्थ चाफळसज्जनगड येथें स्वस्थ बसले असतील हें संभवनीय दिसत नाहीं. त्या कामीं समर्थांनीं कांहींतरी भाग घेतला असला पाहिजे. त्याविषयीं लेखी पुरावा सांपडणें अर्थातच शक्य नाहीं. परंतु त्या काळच्या त्यांच्या हालचालींच्या व प्रचारांच्या स्थानांचा नुसता शक देऊन ही बांकेनिशींत उल्लेख केलेला नाहीं याचें आश्चर्य वाटतें. बांकेनिशींत कांहीं टिपणांत कित्येक गोष्टींविषयीं 'चरित्र अलाहिदा दिलेलें आहे' असा उल्लेख आहे. तीं अलाहिदा लिहिलेलीं चरित्रें संशोधकांना सांपडल्यास शिवसमर्थचरित्रांवर पुष्कळ प्रकाश पडेल. तो सुदिन केव्हां येतो तें पाहवें.

शके १५८३. भागानगरच्या केशवस्वामींनीं एका शिष्याबरोबर एक पत्र देऊन त्यांना समर्थांना भेटण्यास पाठविलें. तें पत्र ओंवीबद्ध व अभंगबद्ध होतें. त्या शिष्याचें योग्य प्रकारें आतिथ्य करून परत जातांना त्यांच्याजवळ केशवस्वामींना पुढील श्लोकबद्ध पत्र दिलें:—"पदांतीत वाक्यार्थ शोधी समाधी ॥ क्षमातीत जो निर्विकल्पास बोधी ॥ तया ऊगमीं जन्म नाहीं जिवाशीं ॥ मिळे संगमीं दास त्या केशवासी ॥ १ ॥" केशवस्वामींना पत्र पाहून आनंद झाला व ते समर्थांच्या भेटीस जाण्याचा विचार करीत होते, इतक्यांत समर्थच त्यांच्या भेटीस गेले. तेव्हां केशवस्वामींना अत्यानंद झाला व त्यांनीं पुढील छोटें पद केलें:—"रामदास माउली अनाथाची। रामदास०॥ ध्रु०॥ सच्चित्सुख धनवरद प्रतापी ॥ शांतीची साउली ॥ अना० ॥ १ ॥ अनन्य जे शरण रिघाले ॥ तयालागीं पावला ॥ अ० ॥ २ ॥ केशविं केशव निजसुख सेवी । आठवितांची धांवली ॥ अ० ॥ ३ ॥" समर्थ तेथें कांहीं दिवस राहून परत कृष्णातीरीं आले. वाटेंत कल्याणीं येथें त्यांनीं पूर्णानंदस्वामींचे शिष्य शिवरामस्वामींची गांठ घेतली. शिवरामस्वामींनीं स्वत: केलेलें 'बालबोध पंचीकरण' समर्थांना दाखविलें. तें वाचून समर्थ संतुष्ट झाले. शिवरामस्वामींच्या अत्याग्रहावरून त्या ग्रंथाच्या शेवटीं समर्थांनीं पांच ओंव्या घातल्या. ही गोष्ट शके १५८३ प्लव नाम संवत्सरीं झाली. त्याच वर्षीं समर्थांनीं वासुदेव गोसावी यांस प्राकृत भाषेंत काव्य करून धर्माचीं तत्त्वें बहुजन समाजास सुगम करण्यास सांगितलें.

शके १५८४. कल्याणस्वामी, उद्धवगोसावी, वासुदेव गोसावी, त्रिंबक गोसावी, वेणाबाई, अक्काप्रभृति शिष्यमंडळी बसली असतां प्रसंगविशेषीं अध्यात्मविषयाची चर्चा होत असे. शिष्य मंडळी अध्यात्मविषयांतील गहन प्रश्न विचारीत व समर्थ त्यांचीं उत्तरें देत असा परिपाठ असे. एकदां 'माया मिथ्या कीं सत्य?' असें विचारतां 'माया मिथ्या आहे,' असें वासुदेव पंडित म्हणाले. कांहीं दिवसांनीं मठांत गारोडी आले. त्यांचा खेळ समर्थांनीं करविला. गारोड्यानें हातांत वादी घेऊन तिचा सर्प केला. 'सर्प खरा कीं खोटा?' असें विचारतां 'सर्प खोटा' असें वासुदेव पंडित म्हणाले. मग त्यांना सर्प धरण्यास सांगितलें व तो त्यांनीं धरला. तेव्हां त्यानें हातास विळखा घातला. पंडितांच्या हातास कळ येऊन प्राणान्तिक अवस्था झाली. समर्थांनीं 'सर्प खरा कीं खोटा?' असें पुन्हा विचारलें, तेव्हां पंडित म्हणाले, 'सर्प तर खोटाच; पण प्राण जाण्याची वेळ आली.' नंतर समर्थांनीं गारोड्यास सर्पाची पूर्वीप्रमाणें वादी करण्यास सांगतांना त्यांच्या हातांतून वादी खालीं पडली. नंतर समर्थांनीं पुन्हा विचारतां पंडित म्हणाले, 'सर्प खोटा; पण प्राणाशीं गांठ पडली होती हें ही खरें.' 'सर्प खोटा कसा झाला?' विचारतांना 'गारोड्यानें खोटा केला' असें पंडित म्हणाले. परंतु गारोडी नसतां तर तो सर्प प्राणच घेत होता असें ही ते म्हणाले.

मग समर्थ म्हणाले " माया मिथ्या असें कसें पूर्वी म्हटलें ? " पंडित निरुत्तर झाले. त्या वेळीं कल्याणगोसावी व त्रिंबकगोसावी म्हणाले, " बादीचा जसा सर्प तशी माया, परंतु गारोड्याच्या योगानें सर्प जसा खोटा तशीच सद्गुरूच्या कृपेनें माया असत्य होते. नंतर पुन्हा उद्धवगोसाव्यांनीं अधिक स्पष्टीकरण करण्यास समर्थांना विनंति केली. त्या चर्चेची सविस्तर हकीकत ह. स्वा.च्या बखरींत दिली आहे. समर्थ व समर्थशिष्य यांच्यामध्यें अध्यात्मांतील गहन विषयांवर प्रश्नोत्तररूप वादविवाद होत असे, हें वाचकांना समजावें म्हणून वरील अध्यात्मचर्चेतील थोडा भाग दिला आहे. ही गारोड्याची गोष्ट शके १५८४ सालीं झाली.

शके १५८५. या वर्षी समर्थ चिंचवडास मोरयादेवाची भेट घेऊन परत चाफळास जात असतांना वाटेंत जेजूरीस जाऊन खंडोबाचें दर्शन घेतलें व त्या वेळीं 'पंचानन हयवाहन सुरभूषण लीला ' ही प्रसिद्ध आरती केली. स्वतः खंडोबांनीं शिवाजीमहाराजांचा वेष घेऊन समर्थांना जेजुरीस नेलें अशी आख्यायिका प्राचीन समर्थचरित्रांत दिली आहे.

शके १५८६. या वर्षी रंगनाथस्वामींच्या आमंत्रणावरून निरंजनस्वामींच्या पुण्यतिथीकरितां समर्थ कऱ्हाडास गेले होते. तेथें तीन दिवस राहून रंगनाथस्वामीं-बरोबर निगडीस गेले. तेथें कांहीं दिवस राहून पौषमासीं कृष्ण त्रयोदशीस चाफळास आले. याच वर्षी कल्याणानीं समर्थांच्या आज्ञेवरून मेलेल्या गाईचें दूध काढल्याची अद्‌भुत गोष्ट झाल्याची ह. स्वा.च्या बखरींत वर्णिली आहे. याच वर्षी जयरामस्वामींनीं एका ब्राह्मणाचा १० वर्षांचा मुलगा मेला होता त्यास उठविलें; तेव्हां त्यांना समर्थांनीं पोहतां येत नसतां ही विहिरींत उडी मारण्यास सांगितलें व नंतर त्यांच्या गोपाळ शिष्याच्या विनंतीवरून तीन दिवसांनीं त्यांना बाहेर काढलें व पुन्हा ' मृत मनुष्यें उठविण्याच्या भानगडींत पडूं नये ' असें सांगितलें; अशी आख्यायिका प्राचीन चरित्रांत दिली आहे.

शके १५८८. या वर्षी समर्थ बत्तिसशिराळें येथें गेले होते. तेथून करवीर-क्षेत्रीं जाऊन ब्रह्मनाळास गेले. आनंदमूर्तींनीं समर्थांचा आदरसत्कार केला व त्यांना आपले गुरु रघुनाथस्वामी यांचें समाधिवृंदावन दाखविलें. समर्थांनीं वृंदावनास प्रदक्षणा घालून साष्टांग नमस्कार घातला, तेव्हां वृंदावन डोलूं लागलें अशी आख्यायिका आहे. त्या वेळीं समर्थांनीं पुढील श्लोक केले, " अति कठिण शिला ती डोलवी वृक्ष जैसा । जननि-जठर कोशीं जन्मला कोण ऐसा ।। गुरु-भजनप्रतापें ख्याति झाली दिगंतीं । अनुदिनिं स्मर चित्ता स्वामि आनंदमूर्ती ।। १ ।। अचेतना जो बहु डोलवीतो । सचेतना काय न बोलवीतो ।। जो चिद्घनानंद आनंदमूर्ती । तदाकार राहोंचि आनंदमूर्ती ।। २ ।। "

यानंतर एकदां समर्थ सज्जनगडाहून चाफळास येत होते. वाटेंत पालीस खंडोबाची यात्रा होती. तेथें ताशेवाले, शाहीर व हरदासवाले शाहीर यांच्यामध्यें चारपांच दिवस चुरस लागून ते हट्टास पेटले होते व लोकांची गर्दी जमली होती. 'काय दंगा आहे' असें विचारतां उभय पक्षांतील प्रमुखांनीं साष्टांग नमस्कार घालून आपापली हकीकत सांगितली. त्या वेळीं समर्थांनीं स्वतः एक डफगाणें करून त्यांना कांहीं प्रश्न विचारले व ' त्याचीं उत्तरें सांगा; नाहींतर डफावरची कलगी उतरून चालते व्हा ' असें म्हणाले. तें डफगाणें:—" किती पृथ्वीचें वजन । किती अंगोळ्या गगन ।। सांगा सिंधूचें जीवन । किती टाक ।। १ ।। किती आकाशाचा तारा । किती पर्जन्याच्या धारा ।। तृण भूमीवरी चतुरा । संख्या सांगा ।। २ ।। वायुसरसे उडती । सांगा अणुरेणु किती ।। लक्ष चौऱ्याशीं उत्पत्ति । संख्या सांगा ।। ३ ।। अठरा भार वनस्पति । भूमंडळी पाणी किती ।। पुष्पें, फळें, जाती किती । संख्या सांगा ।। ४ ।। बीज वडी आणि पिंपळी । किती आहे भूमंडळीं ।। सर्व धान्यांची मोकळी । संख्या सांगा ।। ५ ।। सर्व सरितांची वाळू किती । सिंधुसागरीं वाळू किती ।। इडवू आहे किती । संख्या सांगा ।। ६ ।। सांगा माझें डफगाणें । कीं डफ ठेवा शहाणपणें ।। देह बुद्धीचीं लक्षणें । सोडवीन ।। ७ ।। ऐका जें जें पुशिलें तुम्हां । तें तें आतां सांगा आम्हां ।। अनंत ब्रह्मांड बेरीज । किती जाहली ।। ८ ।। रामदासाचा विनोद । सांडा अहंतेचें बीज ।। मग स्वरूपीं आनंद । सुखी राहा ।। ९ ।। " या डफगाण्यांतील प्रश्नांचीं उत्तरें दोन्ही पक्षांतील शाहीरांस देतां आलीं नाहींत. तेव्हां उभय पक्षांनीं आपापल्या डफावरची कलगी उतरली व समर्थांना साष्टांग नमस्कार घालून गेले. वरील डफगाणें संबंध देण्याचें कारण समर्थांचें सूक्ष्म सृष्टिनिरीक्षण, युक्ति व प्रसंगविशेषीं वाद मिटविण्याचें चातुर्य वाचकांच्या लक्षांत यावें हें होय.

याच वर्षी समर्थांनीं शिवाजीमहाराजांची आपल्यावरील भक्ति पाहण्याकरितां आपल्या व्याधीच्या शमनार्थ वाघिणीचें दूध मागितलें व महाराजांनीं तें आणून दिलें अशी आख्यायिका ह. स्वा.च्या बखरींत आहे. ती सविस्तर गोष्ट पुढें ' अद्भुत गोष्टी ' या भागांत दिली आहे. त्या प्रसंगावर एक गीत 'रंगनाथ गुरुबाई'नें केलें आहे. चाफळ प्रांत्यांत लहान मुली हें गीत प्रेमानें गातात. तें गीत महाराष्ट्र व बृहन्महाराष्ट्रांतील सर्व मुलींनीं पाठ करण्यासारखें आहे म्हणून संबंध देतों:—

" वाघिणि ग मज बाळातें । निज दुग्धाचि दे गे माये । व्याकुळ व्यथेनें केलें रामदास गुरुमायेला । तुझिया स्तनिचें दुग्ध । औषध असें हें त्याला । तद्दुःख हु घाबरलों । तुजपाशीं धांवत आलों । रूपानें तुझिया भ्यालों । काकुळती येतो ाये । वाघिणि ग मज बाळातें । निज दुग्धाचि दे गे माये ।। १ ।। गर्जना माझिया ागे । करितां वन सर्व दणाणें । तरी बाई नाहीं मी आलों । तुजपाशीं कपटपणानें ।

जिजाबाई माउली ऐशी । मानिली लीनपणानें । भक्षावें मम देहासी । मग तुजला इच्छा कैसी । देउनि दुग्ध गुरूसी । मग येतों मी लवलाही ॥ बाघिणि ग मज बाळातें । निज दुग्धचि दे गे माये ॥ २ ॥ त्या करुणावचनें तेव्हां । पाषाण-तरु पाझरले । रामदास गुरु मायेचें । हृदय बहु प्रेमें भरलें । गाय जशी बाघिण झाली । निष्ठुरपण तिचें सरलें । पाडसास प्रेमें जैशी । इच्छेनें चाटी त्याशी । कनवाळुपणानें पाहें । 'शिव-पुण्य फळाला आलें' । बाघिणि ग मज बाळातें । निज दुग्धचि दे गे माये ॥ ३ ॥ हेरंब षण्मुख तिसरा । नृप होय उमेचा तान्हा । पात्रांत धार काढी । गोकुळिचा जैसा कान्हा । तुंबपात्र भरूनी राहे । बाघिणीचे वंदुनि पाये । पण घेउनि सत्वर जाये । रंगनाथ गुरुबाईला । बाघिणि ग मज बाळातें । निज दुग्धचि दे गे माये ॥ ४ ॥" हें गाणें कै. राजवाडे यांनीं चाफळ येथें श्री. बापूराव उपाध्ये यांच्या घरीं एका मुलीच्या तोंडून ऐकिलें. गाणें जुनें आहे असें चाफळचे लोक सांगतात. भाषा बरीच अर्वाचीन दिसते. गाणें रामदास कालीं रचलें असून उत्तरोत्तर जुनी भाषा अर्वाचीन होत जाऊन ती अगदीं अलीकडील बनली असण्याचा संभव आहे, असें कै. राजवाडे म्हणतात. कवयित्रीनें आपल्याविषयीं माहिती गीतांत दिली नाहीं व चाफळास ही कोणास तीबद्दल माहिती नाहीं.

शके १५९३. या वर्षी माघफाल्गुनांत समर्थ पारगांवीं होते. त्यांचेबरोबर केशवगोसावी व भानजीगोसावी हीं होते. पारगांव पन्हाळ्यापासून ९।१० मैल आहे. मिरजेचा सुभेदार बहिलोलखान यानें पन्हाळ्यावर ठाणें ठेवून शिवाजी महाराजांवर स्वारी करावी असा बेत विजापूरच्या दरबारांत ठरला होता. पारगांव येथें होणाऱ्या कामांत दिवाकरगोसाव्याची जरूर होती. म्हणून समर्थांनीं केशव-गोसावी यांस चाफळास पाठवून दिवाकरांस पारगांवीं आणलें. महाराज पारगांवीं येणार असें कळतांच दिवाकरांनीं पत्र पाठवून केशवांना पारगांवीं बोलाविलें. केशव आजारी असल्यामुळें आले नाहींत. समर्थांचें पारगांवचें महत्त्वाचें काम रामनवमीच्या आंत संपलें नाहीं, तेव्हां त्यांनीं फाल्गुनअखेर चाफळाच्या मूर्ति उत्सवाकरितां पारगांवास आणविल्या.

शके १५९४. या वर्षी श्रीरामनवमीचा उत्सव पारगांव येथें झाला. उत्सवा-नंतर मूर्ति परत चाफळास पाठविल्या. या उत्सवांत चैत्र शुद्ध ६ दिवशीं रंगनाथस्वामींचा समर्थांनीं उद्धार केल्याची गोष्ट ह. स्वा.च्या बखरींत सांगितली आहे. रंगनाथस्वामी गाणारे फार चांगले होते परंतु व्यसनी होते. षष्ठीच्या दिवशीं त्यांचें कीर्तन ऐकून समर्थ संतुष्ट झाले व 'इच्छा असेल तें माग' म्हणाले. 'पूर्वसंचि-तानुसार मी व्यसनाधीन आहे, त्यापासून मुक्त करा,' असें रंगनाथ म्हणाले. समर्थांनीं मस्तकावर वरदहस्त ठेविला व 'तूं मुक्त झालास, आतां पालीस मठ करून राहा,' असें त्यांना सांगितलें. निगडीचे रंगनाथस्वामी निराळे होत.

याच वर्षी कऱ्हाडच्या जोशांचा निरंजन नांवाचा मुलगा चाफळास समर्थांचे दर्शनास गेला होता. त्याला समर्थांनीं स्नान करून देवालयांत श्रीरघुपतीचें ध्यान करण्यास सांगितलें. रघुपतीचें ध्यान करतांना गणपतीची मूर्ति त्याचे पुढें उभी राहिली. हें त्यानें समर्थांस सांगितलें. तेव्हां समर्थांनीं त्यास कऱ्हाडास कृष्णातीरीं गणेशतीर्थ आहे तेथें श्रीगणपतीचें ध्यान करण्यास सांगितलें. तसें केल्यावर निरंजनास शके १५९४ या वर्षी माघ शुद्ध चतुर्थीचे दिवशीं गणपतीचें दर्शन होऊन अनुग्रह ही झाला ( ह. स्वा. बखर ) हेच सुप्रसिद्ध निरंजनस्वामी होत. याच वर्षी श्रावण महिन्यांत महाराज समर्थांच्या भेटीस शिंगणवाडीस आले होते. त्याच वेळीं महाराजांना परमार्थांतील कांहीं विषय समजावून सांगितला. श्रावण शु० ९ दिवशीं दत्तो त्रिमल यास योग्य अधिकाऱ्यांमार्फत चाफळ येथील यात्रेचा बंदोबस्त करण्यास पत्र लिहिलें ( का. लेखांक १० ). फाल्गुन कृष्ण १४ दिवशीं कोंडोजी फर्जंद यानें एका रात्रींत पन्हाळा किल्ला घेतला. लागलींच ही बातमी महाराजांना रायगडास कळविली. महाराजांना फार आनंद झाला. ही आनंदाची बातमी सांगणाऱ्यास त्यांनीं १०० होन ( वराह ) दिले व त्याच्या तोंडांत साखर घातली. "महाराजस्ततस्तूर्णं वराहाणां शतं तदा। सशर्करं करे दत्वा तन्मुखांभोरुहेऽक्षिपत् ॥ ( पर्णालपर्वतग्रहणाख्यान, अ. ४. ५८ )

शके १५९५. पन्हाळा घेतल्याची आनंददायक बातमी कळल्यावर शके १५९५ च्या चैत्र शुद्ध प्रतिपदेस गुडी पाडव्याच्या दिवशीं महाराज रायगडाहून पन्हाळ्यास जाण्यास निघाले. समर्थ त्या वेळीं शिवथरनजीक पोलादपुरास ( पौलस्त्य नगरास) होते, त्यांच्या दर्शनास तेथें महाराज गेले व त्यांना नमस्कार केला. नंतर ( गोस्वामींनीं ) महाराजांच्या मस्तकावर हात ठेवून 'पूर्ण साम्राज्य मिळो' असा आशीर्वाद दिला. "मंदिराग्रं समासाद्य एक एवाग्रगोभवत्। गोस्वामी चरणद्वंद्वं नन्दयामास मंदिरे ॥ १८ ॥ गोस्वामी च ततस्तस्य हस्तं विन्यस्य मस्तके। पूर्णसाम्राज्यदात्रीभि राशिभिःपर्यतोषयत् ॥ १९ ॥" पर्णालपर्वतग्रहणाख्यान, अ. ४. १८।१९ ). नंतर महाराज चैत्र शुद्ध तृतीयेच्या दिवशीं पन्हाळ्यास पोहोंचले. नंतर समर्थ ही पन्हाळ्यास गेले व रामचंद्र नीलकंठ पंतअमात्य यांच्या घरीं कीर्तन झालें. नंतर समर्थ चाफळकडे आले व महाराज कर्नाटकांत मोहिमेवर गेले. मोहिमेवर जाण्यापूर्वी महाराज समर्थांना शिंगणवाडी येथें भेटण्यास आले होते. त्या वेळीं नित्य पूजाखर्च, वार्षिक नवमी उत्सवाचा खर्च सरकारमार्फत करण्याची महाराजांनीं दत्तो त्रिंबक यास व्यवस्था करण्यास सांगितलें. याच वर्षी चाफळ मठांत रात्रीं ५।५० चोर येऊन त्यांनीं मठांतील सर्व वस्तु मोटा बांधून नेल्या व कल्याणांनीं त्या सर्वांना अडवून आणल्याची गोष्ट ह. स्वा.च्या बखरींत दिली आहे. चोरांना समर्थांपुढें आणल्यावर 'आम्ही पोटासाठीं चोरी केली, अपराधी

आहों, क्षमा करावी, दुर्बुद्धि जाऊन सद्बुद्धि होईल,' अशी कृपा करावी असें म्हणाले. 'इच्छेप्रमाणें होईल.' म्हणून समर्थांनीं त्यांना भोजन घालून आणलेल्या वस्तु परत देऊन त्यांना घरीं पाठविलें ( शके १५९५ ).

वरील गोष्टीनंतर ह. स्वा.च्या बखरींत समर्थांच्या रामबोक्याची गोष्ट दिली आहे. समर्थांचा एक बोका होता. त्याचें नांव 'राम' ठेविलें होतें. जेवतांना ते त्यास घेऊन बसत. एके दिवशीं त्यानें दुमत्यास त्रास दिला, म्हणून कोणी एकानें त्याच्या डोळ्यांत तिखट घातलें म्हणून तो जेवणाचे वेळीं आला नाहीं. समर्थांना हें कळतांच त्यास जवळ घेऊन त्याच्या अंगावरून हात फिरवून त्याचे डोळ्यांत आपल्या हातानें तूप घातलें व त्यास जेवावयास घालून नंतर आपण जेवण केलें. कर्नाटकांत जातांना या वेळीं महाराजांनीं 'वृद्धाप काळीं यापुढें संचार करूं नये' अशी समर्थांना विनंति केली. 'प्रसंगविशेषीं संचारास जावें लागल्यास बरोबर शिष्य मंडळी व इतर सरंजाम घेऊन जावें' असें सांगितलें. कर्नाटकांत येलूर येथील कर्दलीवनांतील निवांत व रम्य स्थळ पाहून महाराजांना उपरति झाली व त्यांनीं आपल्या मुत्सद्दी मंडळींना महाराष्ट्रास परत जाऊन समर्थ सांगतील तशी राज्यव्यवस्था करण्यास सांगितलें. समर्थांच्या आज्ञेप्रमाणें देवीचा अंगांत संचार झाल्यावर देवीच्या आज्ञेप्रमाणें करावें, असें मुत्सद्दी मंडळींनीं सांगितल्यावर महाराजांना ती गोष्ट पसंत पडली. 'पूर्वींप्रमाणेंच राज्यकारभार पाहवा' अशी देवीची आज्ञा झाल्यामुळें महाराज सर्व सेनेसह परत महाराष्ट्रांत आले.

शके १५९६. या वर्षाच्या आरंभीं शिवाजीमहाराज चाफळास गेले व समर्थांच्या संमतीनें राज्याभिषेक करून घ्यावा असें त्यांनीं ठरविलें. पैठणहून गागाभट्टांना आणवून यथाशास्त्र राज्याभिषेक करण्याची सर्व व्यवस्था झाली. रायगडावर राज्याभिषेक होण्यापूर्वीं महाराज चाफळास समर्थदर्शनास आले व राजचिन्हें समर्थांस प्रथम अर्पण केलीं. नंतर रायगडास जाऊन गागाभट्टामार्फत समारंभानें राज्याभिषेक झाला. ही गोष्ट ज्येष्ठ शु. १३, १५९६ आनंदनाम संवत्सरीं झाली. राज्याभिषेकानंतर महाराज समर्थदर्शनास सज्जनगडावर उभयतां पुत्र, कुटुंब व अष्टप्रधानांसह गेले. तेथें दीड महिना राहून बहुत दानधर्म केला. महाराज समर्थांसमोर राजचिन्हें घालीत नसत. कारण राज्यारोहणापूर्वीं तीं त्यांना अर्पण केलीं होतीं ( ह. स्वा. बखर ). महाराज अष्टप्रधानांसह उत्सवास हजर असतील तेव्हां उत्सवांत सर्वांनीं पुढीलप्रमाणें व्यवस्था करण्याचें या वेळीं ठरलें. असा ह. स्वा.च्या बखरींत उल्लेख आहे:—

( १ ) महाराजः—समर्थ सभेस येऊन बसले म्हणजे मोर्चेल घेऊन उजवे बाजूस उभें राहणें.

( २ ) मोरोपंत पिंगळे, मुख्य प्रधानः—कीर्तन समाप्तीनंतर दररोज खिरापत वांटणें.

( ३ ) रामचंद्र नीलकंठ, पंतअमात्यः–भोजनसमयीं ब्राह्मणांची पूजा करणें, सभेस समर्थ आल्यावर मोर्चेल घेऊन डावे बाजूस उभें राहणें, रथाचे दिवशीं सोन्याची काठी घेऊन रथापुढें उजवे बाजूस चालणें.

( ४ ) अण्णाजी पंडित, सचिवः—भोजन-दक्षिणा देणें, छबिन्याची तयारी, कीर्तनाची बैठक.

( ५ ) दत्तोपंत, मंत्रीः—कीर्तनांत बुक्का लावणें.

( ६ ) जनार्दनपंत, सुमंतः—ब्राह्मणांना विडे देणें.

( ७ ) बाळाजी पंडित, न्यायाधीश :—पाकशाळेंतील बंदोबस्त.

( ८ ) रघुनाथराव, पंडितरावः—शूद्र व ब्राह्मण समर्थदर्शनास येतील त्यांचा आदर राखणें व मठाचे कारभारी यांचे संमतीनें संभावना करणें.

( ९ ) हंबीरराव मोहिते, सेनापतिः–छबिन्याबरोबर दारूचा बंदोबस्त ठेवणें व महाराज नसतांना कीर्तनांत समर्थांच्या उजवे बाजूस पंखा घेऊन वारा घालणें.

( १० ) प्रतापराव गुजरः—कीर्तनांत समर्थांचे डावे बाजूस पंखा घेऊन वारा घालणें.

( ११ ) बाळाजी आवजी चिटणीसः—श्रींच्या जमाखर्चाची व्यवस्था ठेवणें.

( १२ ) मुरारजी व महादजी खासनवीसः—श्रीरघुपतींचें व समर्थांचें जवाहीर ठेवणें व आणून देणें.

( १३ ) कोंडो नारायणः—समर्थांची दिनचर्या महाराजांस कळविणें. महाराजांनीं केलेलें पद लळीतसमयीं म्हणण्याची समर्थांनीं आज्ञा केली. ' महाराज गरीबनवाज ' इत्यादि. तें पद पूर्वीं दिलेंच आहे.

महाराज रायगडावर गेल्यावर समर्थ चातुर्मासांत हेळवाकचे घळींत राहण्यास गेले होते. तेथें अतिशय थंड हवा असते, कर्कश सीतलाई असते. चातुर्मास संपल्यावर समर्थ घोड्यावर बसून चाफळास आले. नंतर दिवाकराचे व्याही रघुनाथभट गोसावी यास पत्र लिहिलें तें परिशिष्टांत दिलें आहे. स्वतः समर्थांनीं पाठविलेलें असें हें एकच पत्र उपलब्ध आहे.

याच वर्षीं कपिलाषष्ठीच्या पर्वणीस समर्थ माहुलीस्नानास गेले होते. राजगुरु म्हणून ब्राह्मणांनीं दक्षिणा मागितली. समर्थांनीं नदींतील दगड दिले. त्यांचें सोनें झालें अशी दंतकथा प्राचीन चरित्रांत दिली आहे.

शके १५९७. या वर्षीं ज्येष्ठ महिन्यांत महाराज बिरवाडीस आजारी होते. तळहातास फोड होऊन वेदना होत होत्या. समर्थांचें स्मरण करीत बिछान्यावर

पडले होते. समर्थ शिवथरींत सुंदरमठांत होते. महापुरांतून रात्रीं पलीकडे जाऊन महाराजांस दर्शन व प्रसाद देऊन लागलींच रात्रीं शिवथरास परत गेले. 'चमत्काररूपें दर्शन दिलें' व 'स्वप्नीं प्रसाद देऊन अदृश्य झाले' अशी आख्यायिका प्राचीन चरित्रग्रंथांत आहे. दुसरे दिवशीं समर्थांची व महाराजांची शिवथरप्रांतीं सुंदरमठांत भेट झाली. त्या वेळीं चाफळच्या मठास लांवचीं १२१ गांवें इनाम करून घेतलीं. त्यांत कर्नाटकांतील चंदीचें ही नांव होतें.

या वर्षी भाद्रपद कृष्ण अष्टमी दिवशीं समर्थांच्या इच्छेप्रमाणें महाराजांनीं शिवथर येथें रामनगर पेठ वसविली; व व्यापाऱ्यांस बारा वर्षे जकातमाफीचा कौल दिला.

आश्विन महिन्यांत समर्थ शिवथरींत असतां महाराज साताऱ्यास फार आजारी पडले. समर्थांनीं कल्याणास प्रसाद घेऊन महाराजांकडे पाठविलें. महाराजांना स्वप्नांत कल्याण आल्याचा भास झाला. जागे झाल्यावर स्वप्नाचा पडताळा पाहण्याकरितां महाराजांनीं तपास केला. तों देवडीकर कल्याणस्वामी आल्याचें समजलें. महाराजांनीं उठून वंदन केलें, समर्थप्रसाद घेतला व म्हणाले, "समर्थांचा प्रसाद कल्याणगोसावी यांजबरोबर आला आतां 'कल्याण' आहे."

महाराजांचा निरोप घेऊन कल्याणस्वामी शिरगांव मठांत जाऊन कार्तिक महिन्यांत शिवथरास जाऊन समर्थांस भेटले. महाराजांकडून सवत्स अकरा गाई कल्याणांनीं मागून घेतल्या होत्या, त्या पोहोंचत्या करण्यास कल्याण शिरगांवास गेले होते. गांई मागून आणल्याची बातमी समर्थांना सांगतांना ते म्हणाले कीं, "राजदरबारचा सर्व अधिकार दिवाकरगोसावी यांस दिला आहे, आर्जवी वृत्तीनें मागणें हा तुम्हांसारख्या निस्पृहांचा धर्म नव्हे. या समर्थांच्या म्हणण्यांत दोन गोष्टी दिसून येतात. ( १ ) ज्याला जें काम नेमून दिलें तें त्यानें करावें, म्हणजे शिस्त राहतें व काम ही अधिक चांगलें होतें, ( २ ) निस्पृह शिष्यानें याचनावृत्ति स्वीकारली म्हणजे त्याची योग्यता कमी होते. समर्थांच्या हयातींत त्यांच्या धाकामुळें या दोन्ही गोष्टींची अम्मलबजावणी होत असे म्हणून मठांकडून व महंतांकडून उत्तम कामगिरी होत होती.

**शके १५९८.** या वर्षी चैत्र कृष्ण १३ समर्थांनीं दत्तो त्रिमल यांस रायगडीं पत्र पाठवून "या उपरी एक रुका ही द्रव्य व दाणा ही गल्ला न पाठविणें" म्हणून पत्र पाठविलें ( का. लेखांक १४ ) व सनदेप्रमाणें अलंकार वस्त्रें व पालखी ही पाठविली होती, तीं सर्व परत पाठविलीं.

या वर्षी श्रावण महिन्यांत शुद्ध दशमी दिवशीं दोन पत्रें (लेखांक १५।१६) नरसाळा सर हवलदार किल्ले महिपतगड व जिजोजी काटकर हवलदार व कार-

कून किल्ले सज्जनगड यांना पाठवून समर्थ दोन्ही किल्ल्यांवर आल्यास त्यांची उत्तम व्यवस्था ठेवण्यास महाराजांनीं सांगितलें.

या वर्षी भाद्रपद कृष्ण २स दत्ताजी त्रिमल यांनीं वेंकाजी रुद्र सुभेदार यांस पत्र दिलें (का. लेखांक २८). त्यांत चाफळ संस्थानास पूर्वीं ११ गांवें इनाम दिलीं होतीं परंतु मठास 'फक्त ११ बिघे जमीव द्यावी व बाकी देवाचा प्रसाद म्हणून राजगृहीं जमा करावी' अशी समर्थांनीं आज्ञा केली आहे असा मजकूर आहे.

शके १५९९. शके १५९८ त माघमासीं महाराज कर्नाटकांत गेले होते. तिकडील मोहिमेचें काम आटपून व्यंकोजीराजे यांचेकडून वांटणी घेण्याचें काम रघुनाथराव हणमंते यांना सांगून कार्तिकांत तोरगल प्रांतांत आले. तिकडून परत येतांच गडइंग्लजाजवळ सामानगड किल्ला बांधण्याचें काम आण्णाजी दत्तो करीत होते, तें पाहण्यास गडावर गेले. तेथें हजारों लोक काम करीत होते, त्यांचें पालन-पोषण मी करितों, म्हणून महाराजांना गर्व झाला. तेव्हां तेथें समर्थ आले व वाटेंतील एक दगड महाराजांदेखत फोडविला; तेव्हां मध्यें एक भोंक, त्यांत पाणी व बेडकी होती, असें सर्वांना दिसून आलें. "शिवबा, या बेडकीचें पालनपोषण तुम्हीच करतां काय?" असा प्रश्न केला. महाराजांनीं "अपराधी आहें क्षमा करावी," म्हणून समर्थांची प्रार्थना केली अशी ही आख्यायिका आहे. त्यांत अद्‌भुत असा कांहीं भाग नाहीं. या वेळीं समर्थांनीं एक पद केलें. त्यावरून महाराजांच्या गर्वाविषयीं आख्यायिका रचली असावी असें आम्हांस वाटतें. कारण महाराजांचा स्वभाव गर्विष्ठ होता असें इतिहासावरून दिसत नाहीं. तें पद मार्मिक व गोड आहे म्हणून सर्व देतों:—"आम्ही काय कुणाचें खातों रे। तो राम आम्हांला देतो रे।।धृ०।। बांधिले घुमट किल्ल्याचे तट। तयाला फुटती पिंपळवट।। तेथें कोण लावितो मोट। बुडाला पाणि घालीतो ।। १ ।। खडक फोडितां सजिव रोडकी। पाहिली सर्वांनीं बेडकी ।। सिंधु नसतां तियेचे मुखीं। पाणी कोण घालीतो ।।२।। पहा रे पहा मातेचिये स्तनीं। चिंतितां रक्तमांस मल खाणी ।। तिथें विमल दुग्ध घालोनी। कोण पोशीतो ।। ३ ।। नसतां पाण्याचे बुडबुडे। सदा सर्वदां गगन कोरडें ।। दास म्हणे जीवन चहूंकडे। पाडुनी सडे पीक उगावितो ।। ४ ।।"

महाराजांनीं समर्थांना सामानगड किल्ला दाखविला, त्या वेळीं समर्थांनीं विटा, इमारतीसंबंधानें दोन समासांत माहिती सांगितली. तें **इमारती प्रकरण** स्फुट समास म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांवरून समर्थांना त्या विषयाची ही किती सूक्ष्म माहिती होती हें दिसून येतें. पहिल्या समासांतील दोन ओंव्या:—"ऐका विटांचा प्रसंग। लांबीरुंदी यथा सांग ।। चौक नेमस्त, व्यंग। असोच नये ।। १ ।। वीट लांब नऊ तसू। आणि रुंदी सात तसू ।। उंची जाणिजे तीन तसू।

पोटपाट नेमस्त ॥" दुसरा समास :—" याही इमारती करणें । काय काय लागे करणें ॥ श्रोतीं अवधान देणें । म्हणे वाचा ॥ १ ॥ द्रव्य पारपत्य खबरदारी । सत्ता सामर्थ्य वेठ बेगारी ॥ गवंडी पाथरवट लोणारी । बेलदार कोळी ॥ २ ॥ लोहार सुतार कुंभार । कामगार लहानथोर ॥ माग महार चांभार । नाना याती ॥ ३ ॥ घन कुदळी संभळ । कुराळी पारा गुटी गोल । टाक्या हातोडे लोळ । लोहपोलादाचे ॥ ४ ॥ ......गड कोट महाल मळ्या । गुप्तद्वारें अंतर शिड्या ॥ छऱ्या लादण्याच्या तबकड्या । नाना भुयारीं विवरें ॥ २० ॥ धनधान्य रसखाने । दारूखाने जामदारखाने ॥ नाना अठरा कारखानें । घुमटमाशीदी मनोहरे ॥ २१ ॥ चित्रशाळा नाटकशाळा । भोजनशाळा होमशाळा ॥ पाठशाळा धर्मशाळा ॥ नाना इमारती ॥ २२ ॥" कोणत्या ही विषयावर लिहितांना त्यांतील अत्यंत सूक्ष्म अशी सर्व माहिती देण्याकडे समर्थांचें लक्ष होतें हें यावरून सिद्ध होतें. शिवाय आश्चर्यकारक गोष्ट ही कीं, संसार सोडून ब्रह्मचर्यांत काळ घालवून अध्यात्मविचारांत बहुतेक सर्व काळ जात असतां प्रसंग पडल्यास आधिभौतिकशास्त्र, वनस्पतिशास्त्र, स्थापत्यशास्त्र अशा विषयांवर लिहितांना ही, त्यांतील बारीकसारीक अंगें देखील त्यांच्या नजरेंतून सुटलीं नाहींत. ज्ञानदेवांच्या ज्ञानेश्वरींत ही हीच गोष्ट दिसून येते. ज्ञानदेव ब्रह्मचारी व २१ वर्षांच्या आंतच त्यांनीं इहलोक सोडला; परंतु प्रपंचातीत असतां ही इतक्या लहान वयांत त्यांनीं प्रपंचांतील गोष्टीसंबंधीं ज्ञानेश्वरींत ज्या शेंकडों उपमा दिल्या आहेत त्यांवरून संतसाधूंनीं प्रपंच सोडला असला तरी ते प्रपंचाकडे किती सूक्ष्म दृष्टीनें पाहत असतात हें दिसून येतें. ज्ञानदेवसमर्थ प्रभृति संतकवींचे ग्रंथ वाचतांना ' जे न देखे रवी तें देखे कवी ' या उक्तीची सत्यता पटते.

या समासांत किल्ल्यावर मशिदी ही असाव्यात व लहानथोर कामगारांत मांग, महार व चांभार ही असावेत असा उल्लेख आहे. यांवरून समर्थांना ' महाराष्ट्रराज्य ' पाहिजे होतें तरी ते मुसलमानांचा द्वेष करीत नसत व अस्पृश्य जातींतील लोकांना ही लहानथोर कामगारांत घ्यावें असा त्यांनीं महाराजांना उपदेश केला होता हें सिद्ध होतें. त्यावरून अस्पृश्यवर्गाविषयीं व परधर्माविषयीं त्यांची सहानुभूति होती हें सिद्ध होतें.

सामानगडाहून रायगडास जाण्यापूर्वी महाराज सज्जनगडास गेले होते. त्या वेळीं महाराजांचें व समर्थांचें जें भाषण झालें त्याचा सारांश दत्तो त्रिमल यांनीं याच वर्षी दिवाकर गोसावी यांना जें पत्र पाठविलें त्यांत दिला आहे ( का. लेखांक २६ ). हें पत्र जरा लांब आहे परंतु महत्त्वाचें आहे. या पत्रांत समर्थांनीं महाराजांना बिरवाडी मुक्कामीं आजारी असतां पलंगापाशीं जाऊन 'चमत्कार रूपानें दर्शन' दिल्यावर व कर्नाटकाच्या मोहिमेंत पूर्वी मोकासा दिलेली

चंदी पाहिल्याचा उल्लेख आहे व नंतर "स्थळोस्थळीं देवालयें, गोपुरें, कित्येक प्रकारीचा नित्य उत्सव व रथ उत्सव, अन्नछत्रें ऐशा धर्मस्थापना केल्या त्या पाहिल्या, तरी हें आपणांस ही घडलें पाहिजे, तरी श्रीमहापुरुष केवळ अवतार आणि श्रींचें हस्तीचें देवस्थान चाफळ, तरी तेथें देवालय आहे तें उकलून नूतन कर्नाटक रीतीची इमारत करायाची आज्ञा केली पाहिजे." असें म्हटलें आहे. ही कल्पना समर्थांना पसंत पडली नाहीं. ते म्हणाले, "हे वासना उत्तम, अंतरीं असो देणें, तूर्त प्रसंग नाहीं. पुढें श्रींची इच्छा समर्थ." मठ चांगला बांधून देण्याच्या महाराजांच्या इच्छेस समर्थांनीं अनुमति दिली व तें काम महाराजांनीं करून दिलें.

**श्रेष्ठांचें निधन.** समर्थांचे ज्येष्ठ बंधु श्रेष्ठ हे जांब येथें राहत असत. ते शिष्यसंप्रदाय वाढवून धर्मस्थापनेचें काम करीत असत. जांबेनजीक शिवळी प्रांताचे अधिकारी त्यांचे शिष्य होते. त्यांच्या आग्रहावरून त्यांचे गांवीं त्यांच्या लग्नास गेले. तिकडे जाण्यास निघतांना श्रेष्ठ म्हणाले, "कळेना पुढें काय होणार आहे। कळेना देह कोठपर्यंत राहे ॥ कळेना मरावें स्वदेशीं विदेशीं। कळेना पुढें वेळ येईल कैशी ॥ १ ॥" लग्नसमारंभ आटोपून परत येतांना मौजे दहीफळ बुद्रुक गांवीं शके १५९९ पिंगल नाम संवत्सरीं फाल्गुन कृष्ण ३ स श्रेष्ठ परधामास गेले. श्रेष्ठांविषयीं व त्यांच्या ग्रंथांविषयीं माहिती पूर्वी दुसऱ्या भागांत दिली आहे. समर्थांना श्रेष्ठनिधन अंतर्ज्ञानानें त्याच दिवशीं कळलें. तेव्हां ते स्नान करून आले. अशी आख्यायिका प्राचीन चरित्रग्रंथांत दिली आहे.

**शके १६००.** या वर्षी चैत्र शुद्ध १२स उद्धवगोसावी यांना श्रेष्ठांचे पुत्र रामचंद्रबुवा व शामजीबुवा यांना आणण्यास पाठविलें. वैशाखांत मुलें आलीं. या वर्षीं श्रीरामनवमीच्या उत्सवास वेणाबाई दरसालप्रमाणें मिरजेहून चाफळास आल्या होत्या. अंतकाळ समीप आला आहे, असें वाटून समर्थांचें दर्शन घेण्यास त्या चैत्र वद्यांत सज्जनगडास गेल्या. चैत्र कृष्ण १४ दिवशीं समर्थांच्या आज्ञेनें त्यांनीं राममंदिरांत कीर्तन केलें. नंतर समर्थांच्या चरणांवर मस्तक ठेवून वंदन करीत असतां 'जयजय रघुवीर समर्थ' म्हणून वेणाबाई परधामास गेल्या. वेणाबाईसंबंधीं सविस्तर हकीकत पूर्वी 'मठ-महंत व शिष्य' या भागांत दिली आहे.

समर्थांना याच सुमारास एक नायटा झाला. राणूबाईनीं पुत्रप्राप्तीसाठीं देवीला नवस केला होता, तो फेडण्याचा राहिला होता, त्यामुळें हा नायटा झाला असें समर्थांना वाटलें. लागलींच त्यांनीं दोन सोन्याचीं फुलें करून घेतलीं व प्रतापगडीं जाऊन देवीस फुलें वाहून नवस फेडून आले. त्या वेळीं समर्थांनीं देवीची प्रार्थना केली. "तुझा तूं वाढवी राजा। शीघ्र आम्हाची देखता ॥ दुष्ट संहारिले मागें। ऐसें उदंड ऐकलें ॥ परंतु रोकडे कांहीं। मूळ सामर्थ्य दाखवी ॥"

अशी त्यांनीं देवीची प्रार्थना केली. समर्थ रात्रीं गेले, तेव्हां देवीच्या दारास कुलूप होतें. समर्थ जातांच दारें आपोआप उघडलीं. समर्थ परत जातांना देवीनें आपल्या गळ्यांतला मोत्यांचा हार समर्थांना दिला. दुसरे दिवशीं महाराजांनीं हाराबद्दल तपास चालविला, हें समर्थांना अंतर्ज्ञानानें कळतांच समर्थांनीं कल्याणामार्फत तो हार परत करविला अशी आख्यायिका प्राचीन चरित्रग्रंथांत दिली आहे. नंतर दुसरे दिवशीं महाराज तो हार घेऊन आले व समर्थांपुढें ठेवून सेवा करण्याची आज्ञा व्हावी म्हणाले. सेवा च करण्याची इच्छा असल्यास श्रींचे देवळाला, दीपमाळा इत्यादि कराव्या असें समर्थांनीं सांगितलें. महाराजांच्या इच्छेवरून समर्थ श्रेष्ठांच्या दोन्ही पुत्रांसह दुसरे दिवशीं प्रतापगडावर गेले. तेथें समर्थ कांहीं दिवस राहिले. गडावर बालेकिल्ल्याच्या दाराजवळ मारुतीची स्थापना केली, हा समर्थकृत शेवटचा मारुति. नंतर सज्जनगडीं श्रेष्ठपुत्रांसह समर्थ परत आले व उद्धवगोसावी यांना बरोबर देऊन समर्थांनीं श्रेष्ठपुत्रांना माघ कृष्ण प्रतिपदेस जांबेकडे रवाना केलें. महाराजांनीं ही बरोबर लवाजमा दिला होता. त्यांना जांबेस पोहोंचवून उद्धवगोसावी परत आले.

या वर्षांत मध्यंतरीं व्यंकोजीराजे यांच्या विनंतीवरून समर्थ श्रावणमासीं चंदावरास गेले होते ते भाद्रपद महिन्यांत परत आले. चंदावरास असतांना तेथें अरणीकर कारागीरास श्रीराम, लक्ष्मण, सीता व मारुति अशा चार मूर्ती उत्तम तयार करण्यास सांगितलें होतें. हा कारागीर बहुत चांगला होता; परंतु त्याचे डोळे गेले होते. समर्थांनीं त्याच्या डोळ्यांवरून हात फिरवितांच त्याला डोळे आले. नंतर त्यांस मूर्ती करण्यास सांगून तयार झाल्यावर सज्जनगडावर पाठविण्यास व्यंकोजी-राजे यांस सांगून समर्थ परत आले. अशी आख्यायिका प्राचीन समर्थचरित्रांत आहे.

या वर्षी आश्विन शुद्ध दशमी दिवशीं महाराजांनीं समर्थांना एक सनदवजा पत्र पाठविलें तें पत्र फार महत्त्वाचें आहे. यांत समर्थांनीं महाराजांना "तुमचा मुख्य धर्म राज्यस्थापन करून धर्मस्थापना" करण्याचा आहे असें सांगितलें व समर्थांना महाराजांनीं 'राज्य सर्व संपादिलें तें चरणीं अर्पण केलें' असा स्पष्ट उल्लेख आहे. हें संबंध पत्र पुढें परिशिष्ट ( अ ) यांत दिलें आहे. पत्राच्या प्रारंभींच्या दोन ओळी फक्त येथें देतों. त्यावरून महाराज समर्थांना किती पूज्य मानीत होते हें वाचकांना कळून येईल.

॥ श्री ॥

श्रीरघुपति
श्रीमारुति

"श्रीसद्‌गुरुवर्य श्रीसकल तीर्थरूप, श्रीकैवल्यधाम, श्रीमहाराज, श्रीस्वामी स्वामीचे शेवेसी चरणरज शिवाजीराजे यांनीं चरणांवरी मस्तक ठेवून विज्ञापना"

असा मायना लिहून पुढें सर्व पत्र लिहिलें आहे. या वर्षी मार्गशीर्षमासीं कल्याण-स्वामींना डोमगांवीं मठ करून राहण्यास पाठविलें.

शके १६०१. सिद्धार्थी नाम संवत्सर या वर्षी पौष शुद्ध नवमीस महाराज सज्जनगडावर समर्थांना भेटण्यास आले. ते माघ शुद्ध पौर्णिमेपर्यंत तेथेंच होते. "समर्थांनीं निरोप देतेसमयीं अनेक प्रकारच्या राजधानीसंबंधें सांगोन अध्यात्मपर विषय ही श्रींनीं सांगितला. तीन दिवस समाधी लागोन राजश्री बसले होते." असा मजकूर बांकेनिशींत आहे. नंतर संभाषणांत महाराज लवकर परधामास जाणार असें समर्थांनीं सुचविलें असा मजकूर आहे. महाराज पौर्णिमेस समर्थांचा शेवटचा निरोप घेऊन गेल्यावर उद्धवांनीं समर्थांना 'महाराज किती दिवसांनीं जाणार?' अशा अर्थाचा प्रश्न केला. तेव्हां 'आजपासून साठ दिवसांचा अवकाश आहे.' असें त्यांना समर्थ म्हणाले ( बांकेनिशी ). या खेपेस महाराजांना समर्थांनीं जो उपदेश केला तो ह. स्वा.च्या बखरींत दिला आहे. त्यांतील थोडा भाग देतों. "राज्याचा बंदोबस्त यथास्थित करावा, सेवक व सरदार लोक एकचित्तें करून ठेवावे. तुरुग, कोट व किल्ले या ठिकाणीं शूर विश्वासू मनुष्य ठेवावे. त्यांनीं प्राण वेंचावे, परंतु फितूर होऊं नये. सेनेचा अधिपति नेमणें तो शूर, विश्वासू, एकपत्नीव्रत धारण करणारा व निर्व्यसनी असा असावा. सहजशत्रु, सहजमित्र यांचा विचार करीत असावें. पुत्रांचा एक विचार करून बंदोबस्त आधीं करावा. तुम्ही सुज्ञच आहां अधिक काय सांगावें?" "आज्ञेप्रमाणें व्यवस्था करतों." असें सांगून महाराज रायगडावर गेले. यानंतर या सुप्रसिद्ध गुरुशिष्यांची गांठ पुन्हा पडली नाहीं.

शके १६०२. या वर्षी चैत्र शुद्ध पौर्णिमेस महाराजांचा अंत झाला. वयाला पंधरा वर्षे लागण्यापूर्वीच स्वराज्यस्थापनेच्या कार्यास प्रारंभ करून महाराजांनीं त्याकरितां सतत ३५ वर्षे अहोरात्र प्रयत्न करून अखेर आपल्या राजधानीच्या रायगड किल्ल्यावर शके १६०२मध्यें रौद्र नाम संवत्सरीं चैत्र शुद्ध पौर्णिमे दिवशीं रविवारीं इहलोकींची यात्रा संपविली. महाराजांचें त्रोटक चरित्र समर्थांचे 'मठ-महंत व शिष्य' या भागांत दिलें आहे.

महाराजांच्या मरणाची बातमी जासुदामार्फत समर्थांना कळली, तेव्हां "श्रींची इच्छा." असें म्हणून ते खोलींत गेले व अन्न वर्ज्य केलें, फक्त दुधावर असत. बाहेर फिरणें ही सोडून दिलें. महाराजांची अवतारसमाप्ती झाल्यावर समर्थांची अवतारसमाप्ती लवकरच होणार असें सर्वांना वाटूं लागलें. समर्थांना मायेनें कधींच बद्ध केलें नव्हतें, परंतु 'महाराजांच्या मरणानें त्यांना अत्यंत वाईट वाटलें' अशा अर्थाचे उद्गार आक्कांनीं काढले. तेव्हां उद्धवगोसावी म्हणाले, "समर्थांचा अवतार केवळ राजश्रीकरितांच होता. आतां ते ही लवकरच समाप्त होतील." महाराजांच्या निधनानंतर संभाजीमहाराज रामचंद्रपंत अमात्य यांसह ज्येष्ठ मासीं

सज्जनगडावर येऊन समर्थांचें दर्शन घेऊन गेले. संभाजीची समर्थांविषयीं पूज्य बुद्धि होती.* राज्याभिषेकाची तयारी झाल्यावर संभाजीमहाराजांनीं समर्थांना येण्यास विनंति करण्याबद्दल राघो अनंत यांस पाठविलें होतें. 'आपणास येणें होत नाहीं,' म्हणून समर्थांनीं दिवाकर गोसावी यांस पाठविलें. संभाजीमहाराजांना राज्याभिषेक शके १६०२ माघ शुद्ध सप्तमी दिवशीं झाला.

शके १६०३. **दुर्मती नाम संवत्सर.** या वर्षीं चैत्रमासीं श्रीरामनवमीच्या उत्सवास समर्थ चाफळास येत होते.* श्रींच्या उत्सवाकरितां चाफळास समर्थांचें हें शेवटलें जाणें. उत्सव संपल्यानंतर समर्थ सज्जनगडास गेले ते पुन्हा चाफळास आले नाहींत. श्रीरामनवमीच्या उत्सवानंतर श्रीहनुमानजयंतीच्या उत्सवापर्यंत समर्थ चाफळ येथें होते. तेव्हां आक्काउद्धवादि शिष्यमंडळी व कारभारी म्हणाले कीं, "देवालय व दीपमाळ बांधणेची आहेत, महाराजांनीं दिलेले होन व जवाहीर आहेत. आज्ञा होईल तर त्यांतून देवालय व दीपमाळा बांधवितों." 'बरें.' म्हणतांना कारभारी यांनीं होन व जवाहीर बाहेर आणले व यादी करूं लागले. समर्थ तो विषय ब्राह्मणांना वाटूं लागले; तेव्हां आक्का व उद्धव हे नमस्कार करून म्हणाले, "महाराज, राजश्री तर समाप्त झाले, आतां देवालय व दीपमाळा कोण बांधणार?" "ज्यास आमची आज्ञा झाली तोच बांधविणार." असें समर्थ म्हणाले व वाटून राहिलेला विषय नेऊन ठेवण्यास सांगितलें.

चाफळाहून जातांना समर्थांनीं श्रीरामाचें शेवटचें दर्शन घेतलें. त्या वेळीं प्रार्थना केली कीं, "हा देह उत्पन्न करून सेवा केली ती घेतली. पुढें जे आपली सेवा करतील त्यांचें कल्याण व्हावें. या संप्रदायाचा अभिमान श्रीस आहेच." याप्रमाणें श्रीरामाची प्रार्थना करून श्रीमारुतीची आज्ञा घेऊन समर्थ सज्जनगडास गेले. तेथें गेल्यावर शिवाजीमहाराजांनीं बांधलेल्या मंदिरांत वैशाखमासीं जाऊन राहिले व निजधामास जाण्यास थोडा अवकाश आहे म्हणून बाहेर जाणें सोडलें. अशा स्थितींत ६।७ महिने गेल्यावर मार्गशीर्ष महिन्यांत कल्याणस्वामी डोमगांवाहून समर्थांच्या दर्शनास आले. त्या वेळीं दासबोधाचा विसावा दशक समर्थांनीं समाप्त केला ( ह. स्वा. बखर ). तो दशक कल्याणस्वामींनीं लिहिला. या वेळीं 'समर्थांनीं सर्व दासबोध वाचून कांहीं शोध घातले' असा कांहीं चरित्रांत उल्लेख आहे. नंतर कांहीं दिवस सज्जनगड येथें राहून समर्थांची आज्ञा झाल्यावर ते डोमगांवास निघून गेले. कल्याणस्वामी गेल्यानंतर दोनच महिन्यांनीं समर्थांनीं समाधि घेतली. यावरून कल्याण गेले तेव्हां समर्थांची प्रकृति अत्यवस्थ नसावी असें दिसतें. कारण समर्थांची प्रकृति अत्यवस्थ असती तर कल्याणस्वामी समर्थांना सोडून गेले नसते. संभाजीमहाराजांनीं शिवाजीमहाराजांच्या कांहीं विश्वासू मंडळींचा छळ आरंभिला आहे, बाळाजी आवजी चिटणीस यांना हत्तीच्या

पायाशीं बांधून मारलें, आण्णाजी दत्तो, विठोजी फर्जंद, शामजी, आबाजी व बल्लाळ यांना चुन्याचे भट्टींत घालून मारविलें असें समर्थांना कळलें; तेव्हां त्यांना आश्चर्य वाटून ते म्हणाले, “ शिवाजीमहाराजांच्या पोटीं असा पुत्र झाला, काल-महात्म्यास उपाय नाहीं. ” आपण उपदेश करून त्यांना सुमार्गावर आणण्याचा प्रयत्न करावा म्हणून त्यांनीं संभाजींना पौष मासीं पत्र लिहिलें. “ अखंड सावधान असावें । दुश्चित कदापि नसावें ।। तजवीजा करीत जावें । एकांत स्थळीं ।। १ ।।” हें सर्व पत्र महत्त्वाचें आहे तें पूर्वी ‘ समर्थांचें राजकारण ’ या भागांत दिलें आहे. माघ शुद्धांत समर्थांची प्रकृति विशेष अशक्त होऊं लागली असावी असें दिसतें. महाराजांनीं पितळेच्या खुराचा पलंग दिला होता, त्यावर बसून असत. बोला-वल्याशिवाय खोलींत कोणास येऊं देत नसत. उद्धव व आक्का खोलींत जाऊन दूध देत असत. ‘ सज्जनगडावरील हवेपेक्षां चाफळची हवा चांगली, तेथें गेल्यावर प्रकृतीस बरें वाटेल ’ असें शिष्य मंडळी म्हणूं लागली. तेव्हां ‘आतां दुसरीकडे जाव-याचें नाहीं’ असें समर्थ म्हणाले. चाफळास समाधि घेतली असतां शिष्य मंडळी आपली पुण्यतिथी तेथें करतील, त्यायोगें रघुपतीची अमर्यादा होईल, असें समर्थांना वाटत होतें. भीमस्वामी अंतकालच्या ओंव्यांत म्हणतात, “ जेथें होईल हो प्रांत । तेथें भजतील हो भक्त ।। उत्सव चाफळीं बहुत । राहील तेव्हां ।। २७ ।। म्हणूनि सज्जनगडीं वास । आम्हांस करणें सावकाश ।। जें होईल देहास । तें घडो येथें ।। २८ ।।” व्याधिशमनार्थ वैद्योपचाराची अगर अनुष्ठानाची ही परवानगी समर्थांनीं दिली नाहीं.

आक्का व उद्धव यांनीं ‘ मठांतील पूजा उत्सव वगैरेसंबंधीं कांहींतरी व्यवस्था करावी ’ असें चार पांच वेळां विचारल्यावर समर्थ म्हणाले कीं, “शिष्य मंडळींचे द्वारें संप्रदाय वाढला आहे त्यांत जो सेवा करील त्यावर श्रीकृपा करतील. ” असें होऊन समर्थ-संप्रदाय वाढविणारा व समर्थांच्या शिकवणीप्रमाणें स्वत: वागून लोकांमध्यें कर्तव्यजागृति उत्पन्न करणारा योग्य शिष्य चाफळच्या मठाचा अधिपति होण्याची व त्याचप्रमाणें व इतर समर्थशिष्यांच्या व प्रशिष्यांच्या मठांचे ही अधि-पति होण्याची पद्धत सुरू झाली असती तर फार बरें झालें असतें असें आम्हांस वाटतें. ‘सर्वांनीं कोणा एकाचे आज्ञेत वागावें असा नियम घालून द्यावा’ असें आक्का म्हणाल्या. तेव्हां ‘ तूंच हें काम कर. ’ असें समर्थ म्हणाले. ‘ मी अनधिकारी स्त्री आहे व पुढें वंश ही नाहीं, असें आक्का म्हणाल्या. तेव्हां समर्थांनीं उद्धवांना मठाची व्यवस्था संभाळण्यास सांगितलें. “ स्वामींची आज्ञा प्रमाण, परंतु माझे हातून होणार नाहीं.” असें उद्धव म्हणाले. नंतर कांहीं दिवस तसेच गेले. आक्कांनीं पुन्हा विचारतां समर्थ म्हणाले, “ आमुची प्रतिज्ञा ऐशी । कांहीं न मागावें शिष्यासी ॥ आपणा-मागें जगदीशाशीं । भजत जावें ।। १ ।। ( भीमस्वामी अंतकालवर्णन, १९ ).”

नंतर पुन्हा कांहीं दिवस गेल्यावर मठाच्या व्यवस्थेविषयीं विचारतांना समर्थ म्हणाले, " श्रेष्ठांचीं मुलें जांबेंत आहेत, त्यांना आणवून त्यांचे स्वाधीन संस्थान करावें व त्यांच्या आज्ञेंत राहून श्रींची पूजा करून उत्सवादि कामें करावींत." समर्थांनीं श्रेष्ठांच्या मुलांना आणण्यास सांगितलें. तेव्हां " जांबेकडे दंगा असल्यामुळें तूर्त आणतां येत नाहीं. " असें दत्तोबा गोसावी व दिवाकर गोसावी यांनीं सांगितलें. " दंगा संपल्यानंतर त्यांना आणवून, त्यांच्या आज्ञेंत राहून सर्वांनीं श्रींची सेवा करावी " असें समर्थ म्हणाले.

समर्थांची प्रकृति दिवसेंदिवस अशक्त होत चालली. एकदां पंढरपूरचे एक हरिदास आले, त्यांचें कीर्तन ऐकण्यास समर्थ खोलीच्या बाहेर येऊन बसले. तेव्हां शरीरकांति तेजःपुंज दिसत होती. त्यावरून जिजोजी काटकर हवलदार-प्रभृतींना समर्थांची प्रकृति बरी होत चालली असें वाटलें; परंतु समर्थांना आपला अंतकाल समीप येत चालला आहे याची खात्री होती.

माघ शुद्ध ६चे दिवशीं सर्व शिष्यमंडळी जवळ बसली होती त्या वेळीं आपणांस इहलोक लवकर सोडावा लागणार हें त्या मंडळींपैकीं कोणास कळलें आहे कीं नाहीं हें पाहण्याकरितां समर्थांनीं पुढील अर्धा श्लोक म्हटलाः—" रविकुळ टिळकाचा वेध सन्नीध आला । तदुपरि भजनाशीं पाहिजे सांग केला ॥" हा पूर्वार्ध ऐकल्या बरोबर उद्धवगोसावी यांनीं लागलींच उत्तरार्ध म्हणून उत्तर दिलें:— " अनुदिनि नवमी हे मानसीं आठवावी । बहुत लगबगीनें कार्यसिद्धी करावी "॥ तेव्हां समर्थांना संतोष वाटला व ते " शाबास, उद्धवा, शाबास " असें म्हणाले.

समर्थ चंदावरास गेले होते. तेव्हां त्यांनीं तेथील कारागीरास मूर्ती करण्यास सांगितल्या होत्या, त्या मूर्ती व्यंकोजीराजे यांनीं बंदोबस्त करून नेत्रांस मेण लावून मल्हारराव लिंबदेव थेऊरकर व केशव गोसावी यांच्याबरोबर पाठविल्या. सदरहू मूर्ती माघ कृष्ण ५ दिवशीं सज्जनगडावर येऊन पोहोंचल्या. समर्थांनीं मूर्तींच्या नेत्रांवरील मेण काढिलें व आपण सांगितल्याप्रमाणें मूर्तींचें ध्यान आहे हें पाहून समाधान व्यक्त केलें. ( भीमस्वामीकृत अंतकाळच्या ओंव्या, ३२ ते ३६ ) समर्थांनीं आपल्या खोलींत सिंहासन करून मूर्तींची स्थापना केली व यथासांग पूजा अर्चा करविली व पुढें " या मूर्तींचें जे पूजन व अर्चन करतील त्यांजवर श्री कृपा करतील असें बोलले. " नंतर आक्काउद्धवादि मंडळींस बोलावून आज्ञा केली कीं, " पुढें या मूर्तींची व चाफळच्या मूर्तींची पूजा करून संस्थान संभाळून उपासनामार्ग चालवा. "

माघ कृष्ण नवमी दिवशीं प्रातःकाळीं समर्थ उठले. श्रीराममूर्तीस साष्टांग नमस्कार घातला व दिगंबर होऊन सन्मुख भूमीवर बसले. जिजोशी काटकर हवलदार, मुद्राधारी व समस्त गडकरी मंडळी खोलीबाहेर दर्शनाकरितां आली होती.

आंत आक्का व उद्धवगोसावी होते. त्यांच्या विनंतीवरून बाहेरच्या मंडळीस आंत येण्यास परवानगी दिली. सर्व आंत आले व पुढें साखर व मनोका ठेवल्या. 'नऊ दिवस झाले, पोटांत अन्नरस नाहीं, उदक स्पर्श ही केला नाहीं; कृपा करून थोडें साखरपाणी घ्यावें.' अशी मंडळींनीं प्रार्थना केली, तेव्हां समर्थ वाटीभर साखर-पाणी प्याले व मंडळींना बाहेर जाण्यास सांगितलें. नंतर आक्का व उद्धवांनीं पलंगावर बसण्यास विनंति केली. 'उठवत नाहीं तुम्हीच उठवा,' म्हणाले. त्या दोघांना उचलेनात. चवघे बोलविले, त्यांना ही उचलेनात. (ह. स्वा. बखर). भीमस्वामी म्हणतात:—"तुम्ही बैसवाल तरी पाहा। म्हणोन उचलती जाण दहा ।। शक्तवंत करीती आहा। नुचलती आमुतें ।। ४२ ।। करितां बहुतचि यत्न। नुचले अणुमात्र आसन ।। तेव्हां आज्ञापिलें वचन। बाहेर बसा ।। ४३ ।। (भीमस्वामीकृत, अंत-कालवर्णन)".

तेव्हां समर्थांनीं सर्वांना बाजूस होण्यास सांगितलें व आपण मूर्तीकडे अव-लोकन करून ध्यान धरिलें. आक्काउद्धवादि शिष्य मंडळी घाबरली. तेव्हां समर्थ म्हणाले, "इतके दिवस अध्यात्म ऐकून हेंच फळ काय?" "या सगुण मूर्तीचें दर्शन इत:पर होणार नाहीं म्हणून दु:ख होतें." असें आक्का म्हणाल्या. तेव्हां समर्थ म्हणाले, तो अभंग:—"माझी काया गेली खरें, परि मी आहें जगदाकारें ।। ऐका स्वहित उत्तरें सांगेन तीं ।।१।। नका करूं खटपट। पहा माझा ग्रंथ नीट। तेणें सायुज्याची वाट। ठायीं पडे ।। २ ।। राहा देहाच्या विसरें। वर्तू नका वाईट, बरें ।। तेणें मुक्तीचीं हीं द्वारें। चोजवीती ।। ३ ।। रामदास म्हणे। सदा स्वरूपीं अनुसंधान ।। करा श्रीरामाचें ध्यान। निरंतर ।। ४ ।।" हा अभंग सांगून समर्थांनीं सर्वांचें समाधान केलें. नंतर आक्का म्हणाल्या, "परमार्थ दृष्टीनें स्वामी जगदंतरीं आहेत हें खरें, परंतु आतां प्रत्यक्ष भाषण व दर्शन होणार नाहीं म्हणून खेद वाटतो." तेव्हां समर्थ म्हणाले, "आत्माराम दासबोध। माझें स्वरूप प्रसिद्ध ।। असतां न करावा हो खेद। भक्त-जनीं ।। (४६ भीम. अंतकालवर्णन)." या दोन ग्रंथांचीं पारायणें करावींत म्हणजे माझ्याशीं भाषण केल्यासारखें होईल. त्या वेळीं सर्व मंडळी खोलीच्या बाहेर होती. उद्धवगोसावी, केशवगोसावी, शिवरामगोसावी व त्यांची बहीण इतकी मंडळी दाराजवळ होती. समर्थांचे सन्निध आक्का होत्या. समर्थांनीं एकवीस वेळां 'हरहर' शब्द करून 'श्रीराम' असें म्हणून मूर्तीकडे अवलोकन केलें, तों त्यांच्या मुखांतून दिव्य तेज निघून मूर्तीच्या मुखांत प्रविष्ट झालें. ही गोष्ट शके १६०३ दुर्मुख नाम संवत्सरीं माघ कृष्ण नवमी शनिवारीं दोन प्रहरीं झाली (ह. स्वा. बखर). संत-विजयांत महिपतिबुवा, पुढील हकीकत देतात. शेवटचे दिवशीं स्नान करून गोपीचंद लावून तुळसीची माळ घालून समर्थांनीं पद्मासन घातलें व पुढील अभंग म्हटला. "जन्मोनियां तुज भजो याच बुद्धि। प्राणत्याग संधी सांभाळिसी ।। १ ।।

उचित न चुके अचिंत्य श्रीरामा। स्वस्वरूपीं आम्हां ठाव देई ॥ २ ॥ जन्मभरी तूज धरिलें हृदयीं। अंतीं या समयीं पावे बा गा ॥१॥ निष्काम ती तूज सेवायाची आशा। अंतीं रामदासा सांभाळावें ॥२॥" हा अभंग म्हटल्यावर 'जयजय रघुवीर समर्थ' म्हणून समर्थ रामरूपीं मिळाले (संतविजय). अंतःकाळीं समर्थांचीं जीं भाषणें झालीं तीं तीं भक्त मंडळींनीं व दिवाकरगोसावी यांनीं अलाहिदा लिहून ठेविलीं आहेत, असें बांकेनिर्शीत शेवटच्या ३९ व्या टिपणांत लिहिलें आहे. तीं संशोधकांना सांपडतील तो सुदिन होय. भीमस्वामीच्या अंतकालच्या वर्णनांतील "आत्माराम दासबोध। माझें स्वरूप स्वतःसिद्ध ॥" ही ४६ वी ओंवी वर दिली आहे. पुढें भीमस्वामी म्हणतातः—"ती न वेळां स्मरण केलें। अंबर अवघें गर्जिन्नलें ॥ रामनामें कोंदाटलें। जिकडेतिकडे ॥ ४७ ॥ मुहूर्त एक हो गर्जना। गगनीं कोंदाटिले हो जाणा ॥ विस्मय पावतो निज जना। प्रेम आलें ॥ ४८ ॥ ध्वनी जाहाली संपूर्ण। जाहाला अवतार हो पूर्ण ॥ देशोदेशीं भक्तजन। जाते झाले ॥४९॥" हनमंतस्वामींच्या बखरींत अंतकालचें बहुतेक वर्णन भीमस्वामींच्या अंतकाळच्या ओंव्यांवरूनच घेतलेलें आहे.

श्रीरामदास आणि रामदासी भाग ९, श्रीसांप्रदायांचीं कागदपत्रें लेखांक, ४३, यांत पौष कृष्ण ९ चें एक पत्र आहे, त्यांत संभाजी राजे यांस समर्थांनीं "कृपापूर्वक बोललेलीं (११) वचनें" दिलीं आहेत, व शेवटीं अंतकालच्या दोन दिवसांची हकीकत दिली आहे. तें पत्र बरेंच मोठें आहे. पण तें महत्त्वाचें असल्यानें सर्वच येथें देतों. त्यांत वचनें ११ आहेत व पुढें दोन ओंव्या आहेत. नंतर माघ शुद्ध ९मीची हकीकत आहे.

लेखांक ४३ १६०३ पौष वद्य ९ नकल, बालबोध

## श्रीरामदासस्वामींचीं वचनें

दुर्मति संवत्सरी पौष वद्य नवमीस श्री नीं आपला संपूर्ण प्रसंग सन्निधच आहे ऐसें म्हणोनि तेसमयीं राजश्री (संभाजीमहाराजांस) यांसि कित्येक कृपापूर्वक बोलिलें वचनें :—

१ श्रीशिवराज कैलासवासी यांचे वंशपरंपरेसी राज्यभोग बहुत आहे.

२ वर्षें पांचपर्यंत अति कठिण आहे दैवी प्रार्थना सावधानतेनें रक्षिलें पाहिजे.

३ पूर्वीं राजश्रीस (शिवाजीमहाराजांस) राजधर्म; क्षात्रधर्म व अखंड सावधान ऐसीं पत्रें पाठविलीं होतीं. तीं पत्रें प्रसंगानुसार वाचून मनासि आणून वर्तणूक होईल तर (त्या) वचनाचा अभिमान श्रीदेवासि आहे.

४ नलसंवत्सरीं (शके १५९८) शिवथरीं १८ वस्त्रें समर्पिलीं तेसमयीं श्रींचे इच्छेनें राजश्रियासी (शिवाजीमहाराजांस) कित्येक आशीर्वादवचनें

प्राप्त झाली. तो अर्थ कांहीं घडला असेल. आणिक ही द्वादश वर्षांउपरि उत्कट भाग्य आहे. ते समर्थीचा संकल्प वाक्य लेखी लेख होता; स्मरण मात्र द्यावें. कोणे समयीं कोणासी काय घडणार तें सुखें घडेल.

५ संन्निध वस्त्रपात्रादिक जो पदार्थ होता तो सर्व श्रींस समर्पिला. चाफळीं प्रसंगानुसार श्रींच्या देवालयाचा कार्यभाग घडोन येईल. हा ही पदार्थ राजश्रींच्या विचारें त्याचि कार्यासी लावावा अथवा महाद्वारीं दीपमाळा कराव्या.

६ प्रमादी संवत्सरीं ( शके १५९५ ) शिंगणवाडीचे मठीं राजश्रींनीं ( शिवाजीमहाराजांनीं ) श्रींच्या सर्व कार्याचा आईकार केला, त्याप्रमाणें त्यांनीं नित्य उत्सव व यात्रा समारंभ उत्तम चालविला पुढें इमारतीचें ही स्मरण द्यावें हें त्यांनीं मान्य केल्यावर आपण सज्जनगडीं सुखें वास्तव्य केलें.

७ श्रींच्या मागें मूर्ति आणविल्या त्यांची प्रतिष्ठा मल्हारी निंबदेव यांच्या बंधूंच्या हस्तें करावी.

८ कर्नाटकरीतीचा रथ करून त्या भोगमूर्ति आणवून प्रतिवर्षीं रथोत्सव केल्यानें राज्यासी कल्याण आहे. वार्षिक चिह्न दिसोन येईल. विशेष चिह्न दिसोन येईल. त्याउपरी श्रींचे इमारतीस आरंभ करावा. एक शत एकवीस खंडी धान्य-संकल्पाची गती असावी.

९ श्रींचें देवालय अशक्त झालें, नदी संन्निध आहे.

१० पूर्वी एक प्रसंग झाला होता. राजश्री ( संभाजीमहाराज ) श्रींच्या दर्शनास सज्जनगडीं येणार म्हणोनि स्थळसिद्धी करणें मनुष्य आले होते ते समयीचें वर्तमान, उत्तरेकडील राजपुत्राचें ( औरंगजेबाचा मुलगा अकबर ) आगमन झालें म्हणोनि ऐकिलें. तें समयीं आतां काय आला म्हणोनि बोलिलें. परंतु या-उपरी ही ते प्रांतींचे लोक अनुकूल करून घेतील तरी उभयतां योगें कार्यसिद्धी च आहे. परंतु त्वरा पाहिजे. प्रतिवर्षीं श्रींचे यात्रेची राजगृहीहून एक भले मनुष्य संरक्षणासी पाठवीत जावे व समारंभ ही रथोत्सवसमयीं हत्ती २, कर्णे २, वाद्यें जोड २, तीवाशे २, जमखाने २, शामिने २. येणेंप्रमाणें पाठवून श्रींची यात्रा-समारंभ संपवून पदार्थ फिरावून आणीत जावे ( परत नेत जावें ) हा निश्चय पूर्वी-चाच आहे. लेख ही होता.

११ श्रींचें पेठेचें पत्र हस्य करावें. कार्यकर्ते नीति वंदावी। श्रीकार्यासीं अतितत्पर ऐशा पुरुषांच्या योगें धर्मवृद्धि आहे, धर्मवृद्धीनें राज्यवृद्धि आहे.

"इतुकें बोलिलों स्वभावें। यांत मानेल तितुकें घ्यावें॥ श्रोतीं उदास न व्हावें। बहु बोलिलों म्हणोनि ॥ १ ॥ औदार्यें धर्ममूर्ति । काय लिहिणें तयाप्रती ॥ धर्मस्थापनेची कीर्ति । संभाळली पाहिजे ॥ २ ॥"

ऐसें म्हणोन मज आज्ञा दिली लागलीच आज्ञा वे अवकाश थोडा आहे. त्या उपरी मासा एका माघवद्य अष्टमीस दो प्रहरां निद्रा करून उठले तें समर्थी "वचनें दोन प्रत्येकीं एकादशाक्षरें ॥ देवद्रोही यांचा नाशची आहे ॥ १ ॥ समुद्र-तीरस्थांचा नाश आहे ॥ २ ॥" त्याउपरी दुसरे दिवशीं नवमी दो प्रहरां दर्शनासी बहुतलोक आले, त्यासी सुखें आज्ञा दिली. ते लोक द्वारापाशीं उभेचि आहेत. सन्निध कोणास ही येऊं दिलें नाहीं. तेचि समर्थी पलंगावरून उतरोन पादुकावरी उत्तरामुख बैसले व श्रींचें स्मरण मोठ्यानें केलें । श्रीरामदासस्वामी अवतार पूर्ण केला ॥ श्री ॥ श्री ॥ श्री ॥ श्री ॥

समर्थांचें देहावसान झाल्यावर आक्का, उद्धवप्रभृतींना समर्थांची सगुण मूर्ती इहलोक सोडून गेली म्हणून अत्यंत दुःख झालें. परंतु लागलींच त्यांनीं तें दुःख आवरून समर्थांच्या उत्तरकार्याविषयीं तयारी सुरू केली. मठाच्या उत्तरेस एक खळगा होता, तो भरून काढण्यास शिवाजीमहाराजांनीं सांगितलें असतां समर्थ म्हणाले होते कीं, "खळगा आहे तसाच असूं दे, भरून काढूं नका, पुढें उपयोगी पडेल." या गोष्टीची आक्कांना आठवण झाली. तेव्हां सर्वांनीं त्याच जागीं दहन करण्याचें ठरविलें. त्या जागेची स्थलशुद्धि केली व तेथेंच तुलसीकाष्ठें व बिल्वकाष्ठें यांनीं समर्थांच्या आधिभौतिक देहाचें दहन केलें. उत्तरकार्य समर्थांनीं लहानपणीं पुत्रवत् मांडीवर घेऊन खेळविलेले समर्थांचे पहिले प्रसिद्ध शिष्य उद्धवस्वामी यांनीं केलें. ते समर्थांच्या अंतकाळीं जवळ होते हा योगायोगच समजला पाहिजे. समर्थ कृष्णातिरीं शके १५६६ सालीं आल्यावर त्याच वर्षी कल्याणस्वामी समर्थांचे शिष्य झाले; कारण ते शके १५६७त चैत्रमासीं मसूरच्या श्रीरामनवमीच्या उत्सवास हजर होते. तेव्हांपासून म्हणजे शके १५६६पासून समर्थांच्या आज्ञेनें डोमगांवास जाऊन मठस्थापना करून तिकडे राहण्यास जाईपर्यंत म्हणजे शके १६०१ पर्यंत सतत ३४ वर्षें त्यांनीं समर्थांच्या सन्निध राहून त्यांची अत्यंत एकनिष्ठपणें सेवा केली. सद्गुरु व सच्छिष्याची उपमा द्यावयाची असल्यास समर्थकल्याणांचीच उपमा देतात. सर्व शिष्यांमध्यें समर्थांच्या निकष-ग्रावेस—तीव्र कसोटीस एकटे कल्याणस्वामीच उतरले होते. डोमगांवास मठ करून राहिल्यावर ही शके १६०३च्या मार्गशीर्ष महिन्यांत कल्याणस्वामी सज्जनगडावर समर्थांच्या दर्शनास आले होते. असें असतां कल्याणस्वामी मार्गशीर्षांत समर्थांचें दर्शन घेऊन गेल्यावर दोनच महिन्यांनीं समर्थांनीं इहलोक सोडावा व सद्गुरु व सच्छिष्य यांची अंतकाळीं ताटातूट पडावी ही अतर्क्य विधिघटनाच समजली पाहिजे. पट्ट शिष्य नसले, तरी प्रथम शिष्य समर्थांची उत्तरक्रिया करण्यास हजर होते हें भाग्यच समजलें पाहिजे. संभाजीराजे यांना समर्थसमाधीची बातमी समजतांच रामचंद्रपंत अमात्य यांस पुष्कळ द्रव्य देऊन पाठविलें. अमात्यांनीं राजगुरूंना शोभेल अशा

रीतीनें दानधर्म करून उद्धवांकडून समर्थांचें उत्तरकार्य केलें. नंतर दहनस्थळीं समाधी बांधून चंदनाचा ओटा समर्थशिष्य तारळेकर गोसावी यांचेकडून करवून त्यावर पादुकांची स्थापना केली. अस्थि जमा करून भागीरथीस नेण्याकारितां चाफळ येथें मठासमोर वृंदावन करून तेथें ठेविल्या. त्या केशवस्वामींनीं कल्याण-स्वामींच्या अस्थींबरोबर शके १६३६ सालीं काशीस नेल्या व गुरुशिष्यांच्या अस्थी एकदम एका वेळीं श्रीक्षेत्र काशी येथें श्रीभागीरथीप्रवाहांत विसर्जन केल्या.

सद्गुरुंच्या अंतकाळीं जरी सद्गुरु व सच्छिष्य यांची भेट झाली नाहीं, तरी सच्छिष्याचा अंत होईपर्यंत ३३ वर्षें सद्गुरूंच्या अस्थि चाफळ येथें वृंदावनांत राहाव्या व नंतर केशवस्वामी चाफळाहून, अस्थि घेऊन काशीस निघालें, म्हणून कल्याणस्वामींचा निरोप घेण्यास गेले त्याच दिवशीं सच्छिष्याचा अंत व्हावा व केशवस्वामींच्या हस्तें सद्गुरुसच्छिष्यांच्या अस्थि श्रीक्षेत्र काशी येथें श्रीभागीरथी-प्रवाहांत एकदम विसर्जन व्हाव्या ही तरी अतर्क्य विधिघटनाच समजली पाहिजे.

समर्थसमाधीनंतर लवकरच आक्का, उद्धवप्रभृति शिष्यमंडळींनीं समर्थ-समाधीवर एक लहान देवालय बांधलें व त्यांत तंजावराहून आणलेल्या मूर्तींची स्थापना केली. नंतर लवकरच रामचंद्रपंत अमात्य यांस बरोबर घेऊन स्वतः संभाजीमहाराज समर्थसमाधीच्या दर्शनास गेले. तेव्हां त्यांनीं समाधीसुद्धां मोठें देवालय बांधण्याचा हुकूम दिला व दीड महिन्यांत मोठें देवालय तयार करविलें. मठाच्या खर्चास द्रव्य पुरविण्याची रामचंद्रपंत अमात्य व खंडो बल्लाळ यांस आज्ञा दिली. यावरून संभाजीमहाराज यांची समर्थांविषयीं पूज्य बुद्धि होती असें दिसून येतें. समर्थांचें संभाजीमहाराजांवर विशेष प्रेम नव्हतें. पन्हाळ्याहून सुटून रायगडावर आल्यावर लागलीच त्यांनीं जीं अत्याचाराचीं कृत्यें केलीं त्यांमुळें समर्थांचें मन अत्यंत उद्विग्न झालें होतें. संभाजीमहाराज पुन्हा दर्शनाकरितां आले होते; तेव्हां 'दर्शन घेण्याची इच्छा नाहीं' असा निरोप संभाजीमहाराज गडाखालीं असतांनाच त्यांना पाठविला होता, तरी तो राग मनांत न धरितां समर्थांना त्यांनीं राज्यारोहणास आमंत्रण पाठविलें व समर्थनिधनाची वार्ता ऐकल्यावर रामचंद्रपंतां-बरोबर विपुल द्रव्य देऊन त्यांस उत्तरकार्यास गडावर पाठविलें. त्या वेळीं दिवाकर-गोसावी रायगडावर होते. त्यांना साद्यंत हकीकत कळविण्यास सांगितलें व नंतर स्वतः आपण रामचंद्रपंतांस बरोबर घेऊन समाधिदर्शनास आले व मोठें देवालय बांधण्यास आज्ञा करून तें दीड महिन्यांत पुरें करविलें. समर्थांविषयीं संभाजीमहाराजांची पूज्य बुद्धि असण्याचें कारण ते स्वतः कांहीं वेळां छत्रपति शिवाजीमहाराजांबरोबर समर्थदर्शनास आले होते व समर्थ रायगडावर व इतर ठिकाणीं शिवाजीमहाराजांच्या भेटी घेत असत, तेव्हां अनेक वेळां ते शिवाजी-महाराजांबरोबर येत असत. तेव्हां शिवाजीमहाराजांची समर्थांवर किती निस्सीम

भक्ति होती हें त्यांनीं स्वतः समक्ष पाहिलें होतें. राज्यारोहणाचे पूर्वी महाराजांनीं सज्जनगडावर जाऊन समर्थांना राज्यचिह्नें अर्पण केल्याचें त्यांना माहीत होतें. राज्यारोहणानंतर सर्व राण्यांसह व राजपुत्रांसह शिवाजीमहाराज सज्जनगडावर दर्शनास गेले होते तेव्हां संभाजीमहाराज ही त्यांच्या बरोबर होते. शूर संभाजीमहाराजांनीं महाराजांच्या इतर सद्गुणांचें अनुकरण केलें नसलें तरी शिवाजीमहाराजांच्या समर्थांविषयीं पूज्य बुद्धीचें त्यांनीं अनुकरण केलें होतें. पुढें सातारचें राज्य खालसा होईपर्यंत सातारच्या सर्व छत्रपतींनीं चाफळमठाधिपतींशीं गुरुशिष्यांचा संबंध कायम ठेवून चाफळ व सज्जनगड येथें उत्सवास व पुण्यतिथीस जाण्याची परंपरा कायम ठेविली होती.

समर्थांच्या समाधीनंतर त्यांच्या मठाच्या व्यवस्थेविषयींची थोडक्यांत हकीकत पुढीलप्रमाणें आहे. समर्थांच्या आज्ञेप्रमाणें जांबेहून श्रेष्ठांच्या मुलांना त्या धामधुमीच्या काळांत लवकर आणतां आलें नाहीं. संभाजीमहाराजांना धरून औरंगजेबानें अत्यंत क्रूरपणानें तुळापूर येथें शके १६१० सालीं मारलें. नंतर बाल शाहूमहाराजांना धरून दिल्लीस नेलें. पुढें राजाराममहाराज गादीवर बसले, तेव्हां मराठे व मोंगल सैन्यांचीं युद्धें सुरू झालीं. मोंगल सातारा भागांत आले. तेव्हां रामचंद्रपंत अमात्य यांच्या संमतीनें चाफळ येथील श्रींच्या मूर्ती चाफळखोऱ्यांत बाघापूरच्या सड्यावर नेल्या व तेथें उत्सव करूं लागले. पंत अमात्य साहित्य पुरवीत. परशुराम त्र्यंबक यांनीं गडावरील समाधीचें दार चिणून तेथें श्रीमारुतीची मूर्ति ठेविली व श्रीराममूर्ती व इतर मूर्ती उद्धवगोसावी यांच्याबरोबर वासोट्यास नेऊन ठेवल्या. पुढें सातारा व सज्जनगड मोंगलांपासून परत घेतल्यावर वासोट्याहून श्रींच्या मूर्ति परत आणल्या. राजाराममहाराज चंदीहून परत आल्यावर बाघापूर येथें नेलेल्या मूर्ती ही चाफळास आणविल्या व पूर्वीप्रमाणें मठाचें काम चालविण्यास उद्धवगोसावी यांस सांगितलें व जांबेहून श्रेष्ठांचे चिरंजीव रामचंद्रबुवा यांस आणण्यास सांगून ते मोहिमेवर गेले. तिकडेच त्यांचा अंत शके १६२२ सालीं सिंहगडावर झाला. रामचंद्रपंत अमात्य यांनीं रामचंद्रबुवा यांस आणण्यास मनुष्य पाठविला. तों त्यांचा अंत झाल्याचें कळलें. नंतर पुढें शके १६२९ सालीं शाहूमहाराज मुक्त होऊन साताऱ्यास आले. त्यांनीं राज्यसूत्रें हातीं घेतलीं व नंतर सज्जनगडावर जाऊन समर्थसमाधीचें दर्शन घेतलें. नंतर चाफळास जाऊन श्रींचें दर्शन घेतलें व पूजेअर्चेची व उत्सवाची पूर्वीप्रमाणें व्यवस्था सुरू केली. आक्कांनीं समर्थांची सर्व हकीकत सांगितली. तेव्हां शाहूमहाराजांनीं कारकून व पालखी पाठवून रामचंद्रबुवांचे ज्येष्ठ चिरंजीव गंगाधरबुवा व त्यांचे धाकटे बंधु यांस बोलावून आणलें. ते माहुलीस आल्यावर शाहूमहाराज त्यांचें दर्शन घेऊन आले. नंतर दुसरे दिवशीं पंतप्रधान व पंतप्रतिनिधि यांना लवाजम्यानिशीं पाठवून मोठ्या समारंभानें त्यांना

साताऱ्यास नेलें. शाहूमहाराज स्वतः पोईपर्यंत आले होते. नंतर सुमुहूर्तानें शके १६३२ माघ शुद्ध पंचमी दिवशीं त्यांना सज्जनगडावर नेलें. आक्काउद्धवप्रभृति मंडळींनीं त्यांचें स्वागत केलें व दोघां बंधूंना समर्थसमाधीचें दर्शन करविलें. नंतर साखर वांटली व तोफा उडविल्या. नंतर तिसरे दिवशीं शाहूमहाराज स्वतः गडावर गेले, तेव्हां उद्धवगोसावी म्हणाले कीं, "मुलें अज्ञान आहेत, मठाचा अभिमान महाराजांस असावा." "राज्य त्यांचेंच आहे." असें शाहूमहाराज म्हणाले व खंडो बल्लाळ चिटणीस यांस मठाची व्यवस्था पूर्वीप्रमाणें ठेवण्यास सांगितलें. उद्धवगोसावी यांचा अंत लवकरच टाकळी येथें फाल्गुन कृष्ण १ बुधवारीं झाला. पुढें आक्का ११ वर्षें हयात होत्या. त्यांचा अंत शके १६४३ सालीं कार्तिक शुद्ध प्रतिपदेस सज्जनगडावर झाला. त्यांचें उत्तरकार्य गंगाधरबुवा यांनीं यथासांग केलें. समर्थांच्या मठाचें व उत्सवाचें काम आक्कांनीं ४० वर्षें केलें. त्या फार कार्यकुशल व धोरणी होत्या. त्यांचा मठास फार उपयोग झाला. त्यांच्या समाधीचें वृंदावन सज्जनगडावर श्रींच्या देवालयाच्या ईशान्येस आहे. पुढें तेरा वर्षें गंगाधरस्वामी मठाचा कारभार करीत होते. त्यांचा अंत शके १६५६ मार्गशीर्ष कृष्ण १२ दिवशीं झाला. त्यांच्या ज्येष्ठ पत्नीनें माहुलीस सहगमन केलें. कनिष्ठ पत्नी गरोदर होत्या. त्यांना कन्या झाली. तेव्हां शाहूमहाराज शके १६५७ सालीं चैत्रमासीं चाफळास रामनवमीच्या उत्सवास गेले व गंगाधरस्वामी यांचे कनिष्ठ बंधु रामजीबुवा यांचे चिरंजीव लक्ष्मणबुवा यांना लक्ष्मण गंगाधर असें नांव ठेवून मठाधिपति केलें. त्यांचे पुत्र प्रसिद्ध समर्थबखरकार हनुमंतस्वामी हे शके १७०५ पासून शके १७४० पर्यंत चाफळमठाधिपति होते. पुढील परंपरा 'मठ-महंत व शिष्य' या भागांत दिली आहे.

# भाग १२

## समर्थांचें कार्य

" केल्यानें होत आहेरे । आधीं केलेंची पाहिजे ॥
यत्न तो देव जाणावा । अंतरीं धरितां बरें ॥ १ ॥
शक्तीनें मिळती राज्यें । युक्तीनें यत्न होतसे ॥
शक्तियुक्ति जये ठायीं । तेथें श्रीमंत धांवती ॥ १ ॥
मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा ॥
येविषयीं धरतां तकवा । पूर्वज हांसती ॥ २ ॥
आहे तितकें जतन करावें । पुढें आणीक मिळवावें ॥
महाराष्ट्र-राज्य करावें । जिकडेतिकडे ॥ ३ ॥ "

'समर्थांचें कार्य' या विषयावर आम्हीं या भागांत विवेचन करण्याचें योजिलें आहे. मागील भागांत समर्थांचा जन्म जांब येथें शके १५३० सालीं चैत्र शुद्ध नवमीस झाल्यापासून सज्जनगडावर शके १६०३ सालीं माघ कृष्ण नवमीस ते समाधि घेईपर्यंत त्यांचें जें चरित्र दिलें आहे, त्यावरून त्यांच्या कार्याविषयीं यथार्थ कल्पना वाचकांच्या मनांत आली असेलच. मागें निरनिराळ्या भागांत त्यांनीं केलेल्या कार्यांचा प्रसंगानुसार उल्लेख केला आहे. या भागांत त्यांनीं केलेल्या कामगिरीचें संकलित रीतीनें विवेचन करण्याचें योजिलें आहे. तसें करण्यापूर्वी समर्थ प्रौढ होऊन कार्यास लागण्यापूर्वी महाराष्ट्राची किंबहुना हिंदुस्थान देशाची राजकीय, सामाजिक व धार्मिक स्थिति कशी होती हें पाहिलें म्हणजे त्यांनीं केलेल्या कामगिरीचा राष्ट्राच्या राजकीय, सामाजिक व धार्मिक स्थितीवर काय परिणाम झाला हें कळेल व त्यांच्या कार्यांचें महत्त्व दिसून येईल.

समर्थपूर्वकालीन व समर्थकार्यारंभकालीन समाजस्थितीचें वर्णन समर्थवाङ्मय व इतर ऐतिहासिक ग्रंथ आणि कागदपत्रें यांवरून आम्ही करणार आहों. 'अस्मानी व सुलतानी' या स्फुट प्रकरणांत समर्थांनीं राजकीय व सामाजिक स्थितीचें हुबेहुब वर्णन केलें आहे. दिग्दर्शनार्थ कांहीं श्लोक देतों. प्रबंध पहिला—
" कितीएक ग्रामेंचि तें ओस झालीं । पिकें सर्व धान्यें चि नाना बुडालीं ॥ कितीएक धाडीवरी धाडि येती । द्वयां सैनिकाचेनि संहार होती ॥ १ ॥ कितीएक ते धान्य लुटूनि नेती । कितीएक ते पेंव खाणोनि नेती ॥ कितीएक ते पूरिले अर्थ नेती । किती पूरिलीं सर्व पात्रेंचि नेती ॥ २ ॥ किती एक ते प्राण कोंचि घेती । किती उत्तमा त्या स्त्रिया भ्रष्टवीती । किती मोट बांधोनि ते बूडवीती । पिछोडेंचि बांधोनी हीरोनि नेती ॥ ३ ॥ किती गुज्रिणी ब्राह्मणी भ्रष्टवील्या । किती शामुखी जाहजीं फांकविल्या ॥ कितीएक देशांतरीं त्या विकील्या । किती सुंदरा हाल होऊनि मेल्या ॥ ४ ॥ "

प्रबंध दुसराः–" देश नासला नासला, उठे तोचि कूटी। पीकें होतांचि होतांचि, होते लुटालुटी ॥ काळाकरितां जीवलगां, झाली तुटातुटी। अवघ्या कुटुंबा कुटुंबा, होते फुटाफुटी ॥१॥ कैंचा आधार आधार, नाहीं सौदागर। कांहीं चालेना चालेना, उदीम व्यापार ॥ सर्व सारिखे सारिखे झाला एकंकार। काळ कठिण कठिण, कैसा पावे पार ॥२॥ नदी भरतां भरतां घालोनियां घेती। वीष घेऊनी घेऊनी उदंड मरती ॥ अग्नि लाउनी लाउनी, जळोनियां जाती। मोठी फजिती फजिती, सांगावें तें किती ॥ ३ ॥ उदंड चाकरी चाकरी, मिळेना भाकरी। लोक नीलंड नीलंड, काढूनी नेती पोरी ॥ न्याय बुडाला बुडाला, जाहाली शिर्जोरी। पैक्या कारणें कारणें, होते मारामारी ॥ ४ ॥"

प्रबंध तिसराः—" गुरें वीकिलीं, सर्व वस्त्रेंच पात्रें। भटें वीकलीं सौवळीं ओलिं धोत्रें ॥ कधीं देव पावेल हें कळेना ॥ १ ॥ किती वीकिती जेन झोरें चवाळीं। किती घावळ्या माल चंवू गवाळीं ॥ कधीं देव पावेल हें कळेना ॥ २ ॥ किती एक जाती, किती खलबत्ते। तरी तें नव्हें काम कांहींच फत्ते ॥ कधीं देव पावेल तें कळेना ॥ ३ ॥ स्त्रियांचे अलंकार नानापरीचे। किती थोरथोरांचि, सुंदरींचे। कधीं देव पावेल तें कळेना ॥ ४ ॥ " दासबोध हा ग्रंथ निरूपणात्मक असल्यामुळें 'असमानी व सुलतानी' या स्फुट प्रकरणाप्रमाणें तत्कालीन स्थितीचें चटकदार वर्णन त्यांत सांपडत नाहीं. तरी प्रसंगविशेषीं सामाजिक, राजकीय व धार्मिक स्थितीचें वर्णन हीं आढळून येतें. तिसऱ्या दशकांतील पाहिल्या पांच समासांत एक काल्पनिक मनुष्य घेऊन त्याचें समर्थांनीं गर्भवासापासून व अंतकालापर्यंत वर्णन दिलें आहे. त्यांत तत्कालीन मध्यम स्थितींतील मनुष्यास असमानी म्हणजे अवर्षण व दुष्काळ आणि सुलतानी म्हणजे परधर्मी राज्य, परचक्र व शत्रूच्या धाडीपासून कसा त्रास होत असे, याचें चटकदार वर्णन दिलें आहे. त्यावरून परधर्मी लोक वृद्ध मनुष्याच्या तरुण स्त्रीस पळवून नेऊन भ्रष्ट करीत–बाटवीत–असत असें सिद्ध होतें:–" तंव तो गलबला झाला। परचक्र आलें ॥ २७ ॥ अकस्मात धाडी आली। कांता बंदी करून नेली ॥ वस्तभाव ही गेली। प्राणियांची ॥ २८ ॥ तंव तिची वार्ता आली। तुमची कांता भ्रष्टली ॥ ऐकुनियां अंग घाली। पृथ्वीवरी ॥ २९ ॥" ( दासबोध स. ५ ). उच्च वर्णाच्या लोकांना नीच जातींना विकीत असत. तेथें दुर्दशा झाल्यामुळें उच्च लोक प्राण सोडीत असत. " परचक्रीं धरून नेले। नीच यातीस दिधले। दुर्दशा होऊन मेले। या नांव आधिभौतिक ॥" (दशक ३. ७. २९) याच समासांत पुढें परकीय राजदंडाचे म्हणजे शिक्षा देण्याचे अनेक प्रकार दिले आहेत (३. ७. ६३ ते ७६) ते वाचले म्हणजे अंगावर कांटे उभे राहतात. कर्णच्छेद, घ्राणच्छेद, हस्तच्छेद, पादच्छेद, जिव्हाच्छेद, अधरच्छेद, सुळावर देणें, नेत्र, वृषण काढणें, तोफेच्या तोंडीं देणें वगैरे अनेक प्रकारांच्या राजदंडाच्या शिक्षेचे प्रकार वरील ओंव्यांत दिले

आहेत. समर्थकालीं लोक वेठीस धरून नेण्याची ही चाल होती. शहरच्या कोत-वालास–अधिकाऱ्यास न भेटल्यास वेठीस धरीत व चोरी न करितां चोरीचा आळ ठेवून शिक्षा करीत (६. १. ६). परधर्मी राज्याधिकारी असल्यामुळें हिंदु लोकांना अधिक त्रास सोसावा लागे. याप्रमाणें अवर्षण, दुष्काळ, परकीय व परधर्मी राज्य यांपासून देशाची सामाजिक व राजकीय स्थिति अगदीं शोचनीय झाली होती. धार्मिक स्थिति ही त्याप्रमाणेंच शोचनीय होती. त्याचें वर्णन समर्थांनीं दासबोधांत पुढें लिहिल्याप्रमाणें दिलें आहे:—“ब्राह्मण बुद्धीपासून चेवले । आचारापासून भ्रष्टले ।। गुरुत्व सांडून झाले । शिष्य शिष्यांचे ।। ( ६. १४. स. ७. ३१ ) कित्येक दावलमलकास जाती । कित्येक पीरास भजती ।। कित्येक ‘तुरुक’ होती । आपुले इच्छेनें ।। ( १४. ७. ३२ ) ऐसा कलियुगाचा आचार । कोठें राहिला विचार । पुढें पुढें वर्णसंकर । होणार आहे ।। ( १४. ७. ३३ )” चार वर्णांमध्यें मुख्य ब्राह्मण तेच आपल्या इच्छेनें ‘तुरुक’ होऊं लागले तर इतर तीन वर्णांनीं त्यांचें अनुकरण ‘**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः**’ या न्यायानें करणें साहजिकच आहे. कांहीं पाटील घराणीं वतनाच्या इच्छेनें ‘तुरुक’ झालीं. सातारा जिल्ह्यांत एका गांवीं एका भावाचे वंशज हिंदु व दुसऱ्या भावाचे वंशज मुसलमान असल्याचें आढळून येतें. कांहीं गांवांत सुतार वगैरे कांहीं धंदेवाले लोक मुसलमान आहेत; परंतु त्यांच्या घरीं हिंदु देवतांचे टाक आहेत व त्यांची ते पूजा करतात. दक्षिण हिंदुस्थानमध्यें चार ही वर्णांचे कांहीं लोक स्वार्थाकरितां धर्मभ्रष्ट झाले होते, तरी उत्तर हिंदुस्थानप्रमाणें त्यांची संख्या अधिक नव्हती; त्याचें कारण बहामनी राज्य मोडून ज्या पांच शाह्या दक्षिण हिंदुस्थानांत स्थापन झाल्या, त्यांचे कांहीं सुलतान राजे धर्माच्या बाबतींत विशेष कडवे नव्हते. तेव्हां दक्षिण हिंदुस्थानांत धर्मांतर करून धर्मभ्रष्ट झालेल्या लोकांची संख्या विशेष अधिक नव्हती. तरी अपमान सहन करून परराज्यांत आनंदानें नोकरी करून जहागिरी मिळविणाऱ्या मानभ्रष्ट झालेल्या लोकांची संख्या पुष्कळ होती. निजामशाही, आदिलशाही व कुतुबशाही यांच्या राज्यांत कांहीं दिवाण व वरिष्ठ मुलकी अधिकारी ब्राह्मण होते व पुष्कळ मनसबदार, जहागीरदार, मोकासदार, देशमुख मराठे होते. निजामशाहींतील नांवाजलेली सारापद्धति मलिकंबर याच्या नांवाखालीं मोडते, तरी ती सर्व वसुलीव्यवस्था चतुर साबाजीच्या बुद्धिचातुर्याचें काम आहे. त्या वेळीं मलिकंबर दिवाण होता, म्हणून त्याचें नांव त्या वसुलीपद्धतीस दिलें आहे. आदिलशाहींत मुराररावाकडे सेनापतीचें ही काम प्रसंगविशेषीं देण्यांत येत होतें. आक्काणा व मादणा हे बंधुद्वय कुतुबशाहींत दिवाणापर्यंत चढले होते. लुकजी जाधवराव, बाजी घोरपडे, मालोजीराजे भोंसले, शहाजीराजे भोंसले, चंद्रराव मोरे, सावंतवाडीचे देसाई वगैरे क्षत्रिय मराठे हे सर्व दक्षिणेंतील कोणत्या ना कोणत्या

तरी सुलतानशाहींत मनसबदारांची नोकरी करून सुखानें संसार करण्यांत धन्यता मानीत होते. सुलतानांच्या व मनसबदारांच्या सैन्यांत जे लोक जात असत ते प्रायः शेतकरी वर्गांतून जात असत. पावसाळ्यांत शेतकीचें काम करून बाकीच्या ऋतूंत हे लोक शिपाईगिरीच्या धंद्यावर पोट भरण्यास शिकले होते. " जो जास्त पैसा देईल त्याची शिपाईगिरी करण्यास व त्याचा पाइक होण्यास हा वर्ग उत्सुक असे; मग तो धनी हिंदु असो कां यवन असो, देव फोडणारा असो कां देव जोडणारा असो. शिपाईगिरीची धामधूम करून लढाऊ राज्ययंत्राचा अंश होणारा असा हा कुणबीवर्ग महाराष्ट्रांत होता......शूद्र कुणबी निराळा व मराठा कुणबी निराळा. शूद्र कुणबी फावल्या वेळांत सामान्य पायकी करी. आणि मराठा कुणबी पाटील, देशमुख इत्यादि हवलदारापासून सरलष्करपर्यंतच्या लहान मोठ्या हुद्देदाऱ्या करी. शूद्राप्रमाणेंच यांना ही मुसलमान अगर हिंदु वाटेल तो धनी चाले. एक भाऊ पातशाही नोकर व एक भाऊ शिवशाहीचा नोकर असलीं उदाहरणें महाराष्ट्राच्या इतिहासांत शेंकडों आहेत. तात्पर्य, शूद्रांप्रमाणें या मराठे लोकांत ही स्वराज्य व स्वराष्ट्र यांचा निस्सीम अभिमान बाळगणारे लोक शहाजीकालीं फार विरळा असत. एतत्कालीन मराठे केवळ आयुधोपजीवी गण बनले होते. स्वराज्यसंरक्षक क्षात्रियत्वाचें वारें त्यांच्यांतून लुप्त झालें होतें. क्षत्रिय जे मराठे त्याचप्रमाणें ब्राह्मणांची दशा होती. मुसलमान किंवा हिंदु अशा वाटेल त्या धन्याची सेवा करण्यास हे सारखेच राजी असत." ( राधामाधवविलास चंपू, प्रस्तावना, पान ४५ ).

कर्नाटकांत विजयनगरचें साम्राज्य चवदाव्या शतकापासून सोळाव्या शतकाच्या अर्धापर्यंत २५० वर्षें चाललें होतें. बहामनी राज्य मोडून दक्षिणेंत पांच स्वतंत्र्य शाह्या झाल्या, तरी विजयानगरचें राज्य स्वतंत्रपणें चाललें होतें. अखेर पांच मुसलमानी शाह्या एकत्र झाल्या व सन १५६५ सालीं त्या सर्वांनीं तालीकोट ऊर्फ राक्षसतागडीच्या लढाईत विजयानगरच्या रामराजाचा पराभव केला. विजयानगरचें साम्राज्य मोडून अनेक मांडलिक हिंदु संस्थानें स्वतंत्र होण्याचा प्रयत्न करूं लागलीं. रामराजाचा भाऊ तिम्मराज यानें विजयानगरहून राजधानी धमणी ऊर्फ पेनुकोंडा येथें केली व पूर्वींच्या साम्राज्याचें पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न केला. परंतु आदिलशाही व कुतुबशाहीपुढें त्याचें कांहीं चाललें नाहीं. हैदराबाद व विजापुराहून मीरजुमला व मुस्तफखान यांना विजयानगरच्या अवशिष्ट राज्याचा व इतर हिंदु मांडलिक व अर्ध स्वतंत्र संस्थानांचा नाश करण्यास सैन्य घेऊन पाठविलें होतें. या युद्धास धर्मयुद्धाचें स्वरूप आलें होतें. मोंगल बादशाहीविरुद्ध आदिलशाहीस अगर कुतबशाहीस लढावें लागलें; तेव्हां तें युद्ध दोन मुसलमानांना सत्तांमधील होतें. मोंगल बादशहा सुनी पंथाचे होते. दक्षिणेंतील पांच शाह्या शियापंथी होत्या. त्या सर्वांना गिळंकृत करण्यास मोंगल बादशाहा

प्रयत्न करीत होते. त्या उभयतांमधील युद्धास धर्मयुद्ध समजत नसत. विजापूरच्या महमूद आदिलशहा यांच्या मनांत दक्षिणेंतील विजयानगरचें अवशिष्ट राज्य व इतर मांडलिक संस्थानिक व नाईक यांना जिंकून धर्मप्रसार करण्याची इच्छा झाली व गोवळकोंड्याच्या कुतुबशाही सुलतानानें ही तोच हेतु मनांत धरिला होता. म्हणून या युद्धास जिल्हादचें स्वरूप आलें होतें, असें ' बुसातिने सलातीन 'कार ही आपल्या मुसलमानी इतिहासग्रंथांत म्हणतो (पान ४९५). शहाजीराजे यांना कर्नाटकच्या मोहिमेंत मुस्तफखानाबरोबर महम्मदशहानें पाठविलें होतें. शहाजीराजे यांना विजापूरच्या आदिलशाहीचे सरदार म्हणून दक्षिणेंतील हिंदु राजाच्या उलट मना-विरुद्ध कां होईना लढावें लागलें. मुस्तफखानास शहाजीराजे कदाचित् हिंदूंना अंतस्थ मदत करतील असा संशय आला व त्यानें शहाजीराजे यांना कैद करण्या-बद्दल विजापुराहून महमदशहाकडून परवानगी मागितली. रणदुल्लाखान मेल्या-वर महमदशहानें पाठविलेले सर्व सेनापति शहाजीराजे यांच्या तंत्रानेंच वागूं लागले म्हणून त्यानें शहाजीराजे यांना कैद करण्यास मुस्तफखानास आज्ञा केली ( शिव-भारत, अध्याय ११, श्लोक ११।१२ ). नंतर मुस्तफखानानें शहाजीराजे यांस गोड बोलून एके दिवशीं ते बेसावध असतांना त्यांना कैद करण्यास आपलें सैन्य व सर-दार पाठविले. त्यांत पुढील सात मराठे सरदारांचीं नांवें परमानंद कवीनें शिव-भारतांत दिलीं आहेत ( शिवभारत, अ. १२-१६-२० ). तीं नांवें—( १ ) खंडोजी, ( २ ) अंबाजी व ( ३ ) मानाजी हे त्रिवर्ग बंधु, ( ४ ) बाजी घोरपडे, ( ५ ) यशवंतराव वाडळे, ( ६ ) मालोजी पवार, (७) व तुळाजी राजे भोंसले. हीं नांवें मुसलमान इतिहासकार—(बुसातिने सलातीनकार ) यानें ही दिलीं आहेत. शहाजी-राजे यांनीं महाराष्ट्रांत हिंदु राज्य स्थापण्याचा दोनदां प्रयत्न केला ( शके १५५१ व शके १५५७ ) तो सफल झाला नाहीं. तेव्हां विजापुराहून लांब असलेल्या प्रांतांत ते हिंदु राज्य स्थापण्याचा अर्धवट कां होईना प्रयत्न करीत होते; त्यांना मदत करण्याचें काम राहिलेंच; परंतु त्यांना कैद करण्याच्या कामीं क्षत्रिय मराठे सरदार सामील झाले होते. मुस्तफखानाच्या सैन्यांत कांहीं ब्राह्मण ही होते. कर्नाट-कच्या मुस्तफखानाच्या मोहिमेंतील हें शहाजीराजे-कैद-प्रकरण सविस्तर देण्याचें कारण, तत्कालीन ब्राह्मण व मराठे या वर्णांतील लढणारे लोक पोटाकरितां मुसलमान राजांची नोकरी करीत; एवढेंच नव्हे तर हिंदु राज्य स्थापन करणाऱ्या आपल्याच ज्ञातियांक्यांतील सरदारांना कैद करण्यास मदत करीत हें वाचकांच्या नजरेस यावें हें आहे. शिवाजीमहाराजांना महाराष्ट्रांत स्वराज्यस्थापनेच्या कामांत तोच अनुभव आला. चंद्रराव मोऱ्यासारखे पिढीजाद क्षत्रिय मराठे महाराजांच्या उलट विजापूर-करांना मदत करीत असत. अशा वेळीं मावळे लोक, देशमुख लोक एकत्र करून स्वराज्य स्थापण्याचा धडाडीचा आरंभ शिवाजीमहाराजांनीं केला व " मराठा

तितुका मेळवावा । महाराष्ट्र धर्म वाढवावा" असा उपदेश समर्थांनीं महाराजांना व त्यांच्या द्वारां सर्व मराठे-क्षत्रिय सरदारांना व सर्व महाराष्ट्राला केला. आजपर्यंत कोणत्या ही मुत्सद्यानें, सरदारानें अगर साधुसंतानें उघडपणें अशी गर्जना करून महाराष्ट्राला जागें करण्याचा प्रयत्न केला नव्हता. समर्थांनीं तसा उपदेश करून महाराष्ट्राला जागृत केलें ही त्यांची राजकारणांतील मोठी कामगिरी होय.

शहाजीराजे यांनीं शिवाजीमहाराजांना बेंगळूराहून महाराष्ट्रांत आपल्या जहागिरीवर पाठविलें तेव्हां त्यांच्याबरोबर स्वराज्यस्थापनेस लागणारें सैन्य, अमात्य व द्रव्य ही पाठविलें होतें ( शिवभारत, अध्याय १०-२५-२७ ). शके १५७१ सालीं शहाजीराजे बिजापूरच्या कैदेंतून सुटल्यानंतर त्यांनीं त्यांच्याबरोबर कैदेंत असलेल्या कान्होजी जेधे व दादाजी कृष्णाजी लोहोकरे यांना शिवाजीमहाराजांना मदत करण्यास पाठविलें व मोंगलांचें किंवा आदिलशहाचें सैन्य महाराजांवर चालून आल्यास महाराजांशीं राजनिष्ठ राहण्याची शपथ घेतली ( जेधे शकावलि, शके १५७१, विरोधीनाम संवत्सर, ज्येष्ठ शुद्ध१५ ). यावरून शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनेच्या कामास शहाजीमहाराजांची पूर्ण मदत होती. डॉ. बाळकृष्ण यांनीं ही आपल्या 'शिवाजी दि ग्रेट' या इंग्रजी पुस्तकांत ही गोष्ट कबूल केली आहे. यावरून शिवाजीमहाराजांना स्वराज्यस्थापना-स्फूर्ति उत्पन्न होण्यासारखी अनुकूल स्थिति शहाजीराजे यांनीं करून ठेवली होती व त्यांनीं त्या कामीं लहानपणापासूनच मदत करण्यास दादाजी कोंडदेवांसारखे चाणाक्ष कारभारी त्यांच्याजवळ ठेवले होते हें सिद्ध होतें. राजमाता जिजाबाईसाहेब यांनीं ही लहानपणीं महाराजांना रामायणमहाभारतांतील युद्धाच्या गोष्टी सांगून त्यांच्या मनांत स्वराज्यस्थापनेचें बीं पेरलें होतें. तेव्हां महाराजांच्या स्वराज्यस्थापनेच्या कामगिरींत समर्थांनीं कोणत्या प्रकारची मदत केली असा प्रश्न साहजिकच उद्भवतो. या विषयासंबंधीं कै. राजवाडे यांनीं राधामाधवविलासचंपू या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत ५४व्या कलमांत सविस्तर विवेचन केलें आहे. त्यांतील कांहीं भाग प्रथम देतों:—

"शहाजी वगैरेंनीं जरी शिवाजीचा स्वतंत्र राज्य आक्रमिण्याचा मार्ग आंखून ठेविला होता, तर रामदासाचा शिवाजीच्या चारित्राबर कोणता परिणाम घडला? अथवा हाच प्रश्न दुसऱ्या तऱ्हेनें विचारितां येतो कीं, महाराष्ट्रराज्यसंस्थापनेंत रामदासाचें कार्य काय?......रामदास झाला नसता तर स्वराज्यसंस्थापनेच्या कार्यांत काय व्यंग राहिलें असतें? रामदासाच्या शिकवणीनें शिवाजीच्या स्वराज्यसंस्थापनेच्या रूपांत असा कोणता स्पृहणीय फरक पडला कीं, ज्यामुळें शिवाजीनें व शिवोत्तर मराठ्यांनीं रामदासाचें सदा ऋणी व्हावें? शहाजीनें गोब्राह्मणप्रतिपालन, वैदिक संस्कृतीचें संगोपन इत्यादि हिंदु-संस्कृतीची प्रोत्साहक कृत्यें थोडीफार परिस्थितीला संभाळून आरंभिलींच होतीं. तीं शिवाजीनें, रामदास नसता तरी, जास्त प्रमाणावर

चालविली असती यांत बिलकुल शंका नाहीं. या आक्षेपाला उत्तर असें आहे कीं, शहाजीला जें करतां आलें नाहीं, असें एक कृत्य करण्याची सल्ला रामदासांनीं शिवाजीला दिली, आणि तसली सल्ला रामदासापर्यंत दुसऱ्या कोणीं ही शहाजीला किंवा शिवाजीला दिली नाहीं. आजपर्यंत शहाजीच्या कारकीर्दींत काय होत असे कीं, देशांतील मराठ्यांची बहुमत संख्या यवनराजांची सेवा करण्यांत पाप मानावयाच्या ऐवजीं प्राय: भूषणच मानीत असे. तो देशघातक व राष्ट्रघातक अवे बदलून देशांतील सर्व मराठा असेलनसेल तेवढा एका ठायीं म्हणजे स्वराज्याठायीं मेळवावा, ही उच्चतम राष्ट्रीयकरणाची सल्ला रामदासानें शिवाजीस दिली. शिवाजीला रामदासानें एकजात मराठे सरदार व शिपाई ठेवण्याची सल्ला दिली, ती अशाकरितां कीं स्वराज्य आपलें आहे व तत्प्रीत्यर्थ जीव खर्ची घातला असतां महाराष्ट्रधर्म टिकावयाचा आहे अशी बुद्धि बाळगण्यांत प्रत्येक मराठ्याला अभिमान वाटावा. मराठा तेवढा मेळवावा आणि आपला महाराष्ट्रधर्म राखावा व वाढवावा या उपदेशाची देणगी रामदासांनीं शिवाजीस व तत्कालीन मराठ्यांना दिली, म्हणजे रामदासांनीं राष्ट्रीयत्व • व राष्ट्रभावना म्हणून जी म्हणतात ती उत्पन्न केली. कल्पक रामदास व कर्ता शिवाजी. या महाराष्ट्रधर्माच्या ऊर्फ राष्ट्रभावनेच्या समानधर्माचा मराठ्यांत अवतार झाल्यानें, शिवाजीच्या पश्चात् संभाजी व राजाराम यांच्या कारकीर्दींत, धनी नसतां ही, मराठे सरदारांनीं औरंगजेबास मेटाकुटीस आणिलें. ही राष्ट्रभावना जर नसती तर शिवाजीच्या मृत्यूनंतर त्यानें स्थापिलेलें राज्य थोड्याच दिवसांत लयास गेलें असतें. आतां, रामदासाला प्रथम कल्पक म्हटल्यानें व शिवाजीस कर्ता म्हटल्यानें असें समजावयाचें नाहीं कीं, महाराष्ट्रधर्माची म्हणजे समान-राष्ट्रधर्माची जाणीव शिवाजीच्या ठायीं मूलतः अगदीं नव्हती. शिवाजीच्या ठायीं ही कल्पना अभावरूपानें म्हणजे यवनांच्या द्वेषरूपानें बाल्पणापासूनच होती, इतकेंच. तिला भावरूप अद्याप आलें नव्हतें. तें रामदासांनीं उच्च स्वरानें पुकारल्यामुळें व त्याची सोपपत्तिक तत्त्व म्हणून मांडणी केल्यामुळें, भावरूपानें म्हणजे मराठ्यांची एकजूट करण्याच्या रूपानें शिवाजीच्या मनांत उत्कटत्वानें वास करितें झालें." हा उतारा बराच लांब आहे. परंतु शिवाजीमहाराजांनीं जी स्वराज्यस्थापना महाराष्ट्रांत केली ती करण्यांत समर्थांची कामगिरी कोणती होती व ती कोणत्या प्रकारें त्यांनीं केली हें कै. राजवाडे यांनीं वरील उताऱ्यांत उत्तम रीतीनें स्पष्ट करून दाखविलें आहे हें वाचकांच्या निदर्शनास यावें म्हणून आम्हीं वरील उतारा दिला आहे. "मराठा तितुका मेळवावा। महाराष्ट्रधर्म वाढवावा।" असा उपदेश समर्थांनीं महाराजांस केला म्हटल्यानें महाराजांच्या मनांत स्वराज्यस्थापनेची कल्पना मुळींच नव्हती व ती समर्थांच्या उपदेशानंतर झाली असा अर्थ होत नाहीं. स्वराज्याची

स्फूर्ति महाराजांच्या मनांत समर्थ कृष्णातीरीं येण्यापूर्वीच झाली होती व त्यांनीं तत्प्राप्त्यर्थ अल्पारंभ केला होता. समर्थांची व महाराजांची भेट होऊन समर्थांनीं महाराजांना शके १५७१ सालीं शिंगणवाडी येथें अनुग्रह दिला व नंतर महाराजांनीं पूर्वी आरंभ केलेल्या स्वराज्यप्राप्तीच्या कार्यांत यश येण्याकरितां "मराठा तितुका मेळवावा। महाराष्ट्रधर्म वाढवावा।" असा उपदेश समर्थांनीं महाराजांना केला व त्यांतील रहस्य महाराजांच्या तीव्र बुद्धीला पटल्यामुळें त्याप्रमाणें त्यांनीं केलें; असें म्हटल्यानें महाराजांना हीनपणा येतो असें आम्हांस वाटत नाहीं. "हा प्रवाद महाराजांना हीनपणा आणणारा आहे" असें श्री. अर्जुनराव केळुस्कर म्हणतात तें त्यांचें म्हणणें बरोबर नाहीं हें आम्हीं पूर्वीच 'समर्थांचें राजकारण' या भागांत सिद्ध केलें आहे.

शहाजीमहाराजांजवळ ४०।५० हजार सैन्य होतें. म्हणून विजापूरचा आदिलशहाच त्यांना भीत असे असें नव्हे तर दिल्लीच्या शहानजान बादशहास ही शहाजीराजे यांची भीति होती. फत्तेखानानें अल्पवयी निजामशहा व औरंगाबाद किल्ला मोंगलांच्या ताब्यांत दिल्यानंतर शहाजीराजे यांनीं शके १५५५च्या श्रावणांत निजामशाहीच्या घराण्यांतील एका लहान मुलास गादीवर बसवून निजामशाही पुढें चालविली व त्यांना विजापूरचा आदिलशहा व मुरारराव यांचा पाठिंबा होता. लहान मुलास पुढें करून शहाजीराजे यांनीं दोन वर्षे आठ महिने स्वतंत्र रीतीनें राज्यकारभार केला. शहाजीराजे स्वतंत्र हिंदुराज्य स्थापन करतील अशी शहाजहानास भीति वाटून त्यानें आदिलशहास फोडलें व प्रचंड सैन्यानिशीं माहुलीस वेढा दिला. आदिलशहा आयत्या वेळीं मोंगलांस मिळाल्यामुळें शहाजीराजे यांचा लहान निजामशहास पुढें करून राज्य स्थापण्याचा बेत फसला. हा ऐतिहासिक कथाभाग सांगण्याचें कारण एवढेंच कीं, शहाजीराजे हे आपल्यापाशीं मोठें सैन्य बाळगीत, त्यामुळें आदिलशहाप्रमाणें मोंगल बादशहास ही त्यांची भीति असे. शहाजीराजे आपल्या सैन्याला बारमाही खूष ठेवण्याची काळजी घेत असत. परंतु त्यांच्या सैन्यांत मराठ्यांप्रमाणें पंजाबी, मुसलमान, पुरभय्ये, बेरड वगैरे निरनिराळ्या जातींचे व धर्मांचे लोक असत. ते केवळ पोट भरण्याकरितां सैन्यांत नोकरी करीत. याचा कटु अनुभव शहाजीराजे यांना, बाजी घोरपडे यानें मुस्तफखानाच्या सल्ल्यानें कर्नाटकांत कैद केलें, त्या वेळीं आला. शहाजीराजे यांचेपाशीं हजारों सैन्य होतें; परंतु एकटा खंडोजी पाटीलच बाजी घोरपड्यावर चालून गेला ( शिवभारत, अ. १२. २४।२५ ) व मरेपर्यंत शौर्यानें लढला. इतर सैन्य पळून गेल्यामुळें शहाजीस बाजी घोरपड्यानें कैद करून विजापुरास नेलें. शहाजीराजे यांना कर्नाटकांतील मोहिमेकरितां सैन्यभरती करावी लागल्यामुळें त्यांना अन्य जातींचे व अन्य धर्मांचे ही लोक सैन्यांत घ्यावे लागले. परंतु शिवाजीमहाराजांनीं स्वराज्यस्थापनेचा

आरंभ महाराष्ट्रांत केल्यामुळें त्यांना महाराष्ट्रराज्य व महाराष्ट्रधर्म यांविषयीं अभिमान बाळगणारे लोक सैन्यांत ठेवणें अवघड नव्हतें. लहानपणचे मावळे संवगडी तानाजी मालुसरे, येसाजी कंक व बाजी फसलकर यांच्या मदतीनें महाराजांनीं मावळे लोकांचेंच सैन्य जमवून स्वराज्यस्थापनेस आरंभ केला होता. तीर्थयात्रेकरितां समर्थ सर्व देशभर फिरले होते व त्यांनीं सूक्ष्म रीतीनें सर्व परिस्थितीचें निरीक्षण केलें होतें. तेव्हां शिवाजीमहाराजांना अनुग्रह दिल्यानंतर केलेल्या क्षात्रधर्माच्या उपदेशांत त्यांनीं "मराठा तितुका मेळवावा" हा उपदेश केला, याचें रहस्य, मराठे लोक मराठी राज्याकरितां व महाराष्ट्रधर्माकरितां राष्ट्रभावनेनें, राष्ट्राभिमानानें व धर्माभिमानानें लढतील असें समर्थांना वाटलें हें होय. "मराठा तितुका मेळवावा" याबरोबर "महाराष्ट्रधर्म वाढवावा" या उपदेशाची ही जोड समर्थांनीं केली. त्याचें कारण, स्वराज्ययुद्धाला स्वधर्मयुद्धाची जोड मिळून बहुजन समाजानें त्या युद्धांत पडावें हें होय. उत्कट धर्मभावनेनें जगांत उत्क्रांत्या झाल्या आहेत अशी इतिहास साक्ष देतो, त्यावरून स्वराज्ययुद्धास स्वधर्मयुद्धाची जोड देण्यांत समर्थांचा दूरदर्शीपणा दिसून येतो. "देवद्रोही तितुके कुत्ते। मारून घालावे परते ॥" असा उपदेश करण्यांत ही समर्थांचा उद्देश महाराजांच्या मनांत व बहुजन समाजाच्या मनांत उत्कट धर्मभावना उत्पन्न करण्याचा होता.

मालोजीराजे यांना स्वप्नांत देवी येऊन, तुमचे वंशांत शंकराचा अवतारी पुरुष निर्माण होऊन म्लेंच्छांपासून पृथ्वीचें निवारण करणार आहे, असें सांगितल्याचें बखरींत वर्णन आहे. शहाजीराजे यांच्या स्वप्नांत शंकर येऊन त्यांनीं शहाजीराजे यांना, शिवाजीमहाराज विष्णूचा अवतार आहेत, त्यांच्या हातून यवनांचा संहार होणार आहे, त्यांना पुणें प्रांतांत पाठवा, असें सांगितल्याचें परमानंद वर्णन करितात (शिवभारत, अ. १०. १३–१८). बहुजन समाजांत या स्वप्नकथा व आख्यायिका प्रचलित होत्या. समर्थांच्या कानावर ही त्या गेल्या होत्या व प्राचीन समर्थचरित्रांत समर्थांची तपश्चर्या संपल्यावर ते तीर्थयात्रेस जातांना त्यांना श्रीरामांनीं "दक्षिणेंत शिवनामें राजा उत्पन्न झाला आहे, त्यांना तुम्ही मदत करावी" असें सांगितल्याचा उल्लेख आहे. मालोजीराजे यांचीं स्वप्नें व समर्थांचा साक्षात्कार यांच्या खरेखोटेपणाविषयीं आम्ही या ठिकाणीं विवेचन करीत नाहीं. बहुजनसमाजांत त्या दंतकथा, आख्यायिका प्रचलित होत्या व जेव्हां जेव्हां शिवाजीमहाराज समर्थांना "श्रींची कांहीं सेवा माझ्या हातून घडावी अशी माझी इच्छा आहे" असें म्हणत तेव्हां समर्थ "फार दिवस म्लेंच्छमय पृथ्वी झाली आहे, त्यांचें निवारण तुमचे हातून करावें अशी रघुपतींची इच्छा आहे." "बहुतां दिवसांचें हें बंड। म्लेंछ झाले उदंड ॥ यांचें करून दुखंड। राज्य करावें ॥ १ ॥" असा महाराजांना उपदेश करीत. मुसलमानांचें फार दिवसांचें बंड आहे, त्या बंडाचा

धींमोड करून स्वराज्य करावें असा उघड उपदेश पूर्वी कोणत्या ही साधुसंतानें, इतकेंच नव्हे तर कोणत्या ही ब्राह्मण अगर क्षत्रिय राजकारणी सरदारानें अगर मुत्सद्यानें अगर योद्ध्यानें ही केला नव्हता तो समर्थांनीं महाराजांना केला. ही त्यांची राजकारणांतील कामगिरी समाजांत राष्ट्रभावना व धर्मभावना उत्पन्न करण्याइतकीच मोठी आहे.

दक्षिणेंत तीन सुलतानशाह्या व उत्तरेंत त्या तिन्ही शाह्यांहून बडी मोंगलशाही अशा चार शाह्यांशीं टक्कर देऊन शिवाजीमहाराजांनीं स्वराज्यस्थापनेच्या बिकट कामास आरंभ केला होता. या चारी शाह्यांमध्यें हिंदु लोक लष्करी व मुलकी हुद्यांचीं कामें करीत होते. तेव्हां महाराजांनीं कितीही खबरदारी घेतली तरी स्वराज्यस्थापनेच्या कार्यांतील कांहीं गोष्टी फितुरी लोकांकडून मुसलमानी राज्यकर्त्यांना कळणें कठीण नव्हतें. त्या वेळीं राज्यकर्त्यांच्या कुटिल राजनीतीमुळें फितवेखोरांची संख्या विशेष झाली होती असें दिसतें. कारण 'राजधर्मा'-मध्यें समर्थ महाराजांना सांगतात:—"अमर्याद फितवेखोर। यांचा करावा संहार ।। शोधिला पाहिजे विचार। यथातथ्य ।। १ ।।" शिवाजीमहाराजांनीं तारुण्यांतच स्वराज्यस्थापनेस आरंभ केला होता, तेव्हां समर्थांनीं त्यांना 'राजधर्म व क्षात्रधर्म' या स्फुट प्रकरणांत एकाद्या राजकारणपटु अनुभवी मुत्सद्याप्रमाणें स्वराज्यस्थापनेच्या कामांत उपयोगी पडणाऱ्या "अमर्याद फितवेखोर। यांचा करावा संहार।। युद्ध करावें खबरदार। लोक राजी राखावा।।" अशा प्रकारें राजनीतीच्या गोष्टी सांगून उपदेश केला आहे, ही ही शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनेंत समर्थांची अत्यंत महत्त्वाची कामगिरी आहे.

शिवाजीमहाराज क्षत्रिय होते, त्यांनीं स्वराज्यस्थापनेस आरंभ केला होता, म्हणून समर्थांनीं त्यांना राजधर्म व क्षात्रधर्म सांगून स्वराज्यस्थापनेच्या कार्यांत उपयोगी पडेल असा योग्य उपदेश केला. समर्थ एवढेंच करून थांबले नाहींत. त्यांना बहुजन समाजाचीं मनें महाराजांच्या स्वराज्यस्थापनेच्या कार्याकडे आकर्षण करावयाचीं होतीं, म्हणून त्यांनीं आपल्या अध्यात्मप्रधान संप्रदायांत ही राजकारणाचा अंतर्भाव केला. समर्थपूर्वीच्या साधुसंतांनीं संस्कृत ग्रंथांतील ज्ञानभांडार मराठींत आणून बहुजन समाजाला भक्तिमार्ग शिकविला, वारकरी संप्रदाय स्थापून धर्मांतर करण्याची लाट थांबविली व शिवाजीमहाराजांचा स्वराज्यस्थापन करण्याचा मार्ग सुकर केला; परंतु त्यांच्या ग्रंथांत अगर शिकवणींत राजकारणाचा अंतर्भाव त्यांनीं केला नव्हता. आपल्या संप्रदायांत राजकारणाचा समावेश करून समर्थ थांबले नाहींत. दासबोधांतील सुप्रसिद्ध चतुःसूत्रींत त्यांनीं 'हरिकथा निरूपणा'ला अग्रमान देऊन नंतर लागलींच राजकारणाचा उल्लेख केला आहे. "मुख्य हरिकथा निरूपण। दुसरें तें राजकारण। तिसरें सावधपण। सर्वविषयीं ।। (११. ५. ४.) चवथा

अत्यंत सावेध ।। ( ११. ५५ ). " ही चतुःसूत्री पूर्वी दिलीच आहे. समर्थांच्या राजकारणांतील कामगिरीची यथार्थ कल्पना वाचकांना येण्यास ती पुन्हा येथें दिली आहे. समर्थांच्या शिकवणुकींत परमार्थ व प्रपंच, अध्यात्म व व्यवहार, धर्मकारण व राजकारण यांचें मधुरमीलन झालेलें आहे. परंतु समर्थांची प्रपंचाची व्याख्या सामान्य जनांप्रमाणें बायकामुलांत व संपत्तीच्या ऐषआरामांत रमणें अशी नाहीं. दासबोधांत १९व्या समासांत ते म्हणतातः—" प्रपंची जाणे राजकारण । परमार्थी साकल्य विवरण । सर्वांमध्यें उत्तम गुण । त्याचा भोक्ता ।। ( १९. ४. १७ ) " म्हणजे परमार्थांत श्रवणानंतर पूर्ण विवरण केल्याशिवाय ज्याप्रमाणें खरा परमार्थ होत नाहीं, त्याप्रमाणें प्रपंचांत राजकारण समजून घेऊन तें आचरणांत आणल्याशिवाय खरा प्रपंचच होत नाहीं, असा उपदेश बहुजन समाजाला करून लोकांना राजकारणांत भाग घेण्यास लावलें ही समर्थांची मोठीच कामगिरी होय.

वर केलेल्या विवेचनावरून समर्थांनीं महाराष्ट्रांत राष्ट्रीयत्वाची भावना व धर्माभिमानाची भावना या उत्पन्न करून म्हणजे महाराष्ट्रधर्माची कल्पना लोकांमध्यें उत्पन्न करून त्यांचीं मनें राजकारणाकडे प्रवृत्त केलीं हें वाचकांना दिसून येईल. परंतु समर्थांनीं महाराष्ट्राला अगर महाराष्ट्रातर्फे सर्व हिंदुस्थानाला जो एक अमूल्य उद्देशाचा धडा शिकविला त्याबद्दल महाराष्ट्रानें व हिंदुस्थानानें समर्थांचें सदैव ऋणी असलें पाहिजे. समर्थांची राजकीय क्षेत्रांतील कामगिरी हा त्या उपदेशाचा केवळ एक भाग होय. शेंकडों वर्षांच्या पारतंत्र्यानें व परधर्मीयांच्या धर्मांतर करविण्याच्या प्रयत्नानें पराधीनपणा, निरुत्साह, धर्मशैथिल्य व औदासिन्य प्राप्त झालें होतें. तो पराधीनपणा, तो निरुत्साह, तें धर्मशैथिल्य व तें औदासिन्य घालवून लोकांमध्यें कर्तव्यजागृति उत्पन्न करण्याकरितां समर्थांनीं महाराष्ट्राला प्रयत्नवाद शिकविला. थोड्याशा लोकांनीं येऊन तलवारीच्या जोरावर स्वातंत्र्य हरण केल्यामुळें व मूर्तिच्छेद करून लोकांना धर्मांतर करण्यास लावण्याचा प्रयत्न सुरू झाल्यामुळें लोक कर्तव्यमूढ होऊन स्वस्थ देवावर हवाला ठेवून बसले होते. पुढें काय करावें हें त्यांना सुचेनासें झालें होतें; अशा वेळीं समर्थांनीं त्यांना प्रयत्नवाद शिकविला. गेलेलें वैभव व राज्य दैवावर हवाला ठेवून स्वस्थ बसल्यानें कधीं ही परत मिळणार नाहीं, त्याला प्रयत्नच केला पाहिजे, हें बहुजन समाजाला समजण्याकरितां समर्थांनीं " केल्यानें होत आहे रे । आधीं केलेंचि पाहिजे । यत्न तो देव जाणावा " हा अमूल्य उपदेश महाराष्ट्रांतील लोकांना केला. समर्थवाङ्मय सूक्ष्म रीतीनें वाचल्यास " आळस सोडा—प्रयत्न करा, उद्योग करा " असाच उपदेश समर्थांनीं अनेक वेळां केल्याचें आढळून येईल. दिग्दर्शनार्थ कांहीं उतारे देतोंः—" लहान थोर काम कांहीं । केल्यावीण होत नाहीं ।। करंट्या सावध पाहीं । सदैव होसी ।। ( दासबोध १२. ९. ६ ) अंतरीं नाहीं सावधानता । यत्न ठाकेना पुरता ।।

सुखसंतोषाची वार्ता । तेथें कैची ।। ( १२. ९. ७ ) म्हणोनि आळस सोडावा । यत्न साक्षेपें जोडावा ।। दुश्चितपणाचा मोडावा । थारा बळें ।। ( १२. ९. ८ ) आधीं कष्ट मग फळ । कष्टचि नाहीं तें निर्फळ ।। साक्षपेंवीण केवळ । वृथापुष्ट ।। ( ११. १०. २० ) एकाग्र करूनियां मन । बळेंचि धरावें साधन ।। यत्नीं आळसाचें दर्शन । होऊं नये ।। ( १८. ३. १२ ) रेखा तितकी पुसोन जाते । प्रत्यक्ष प्रत्यया येतें । डोळेझांकणी करावी ते । कायनिमित्त ।। ( १५. ६. ९ ) जेंही कष्ट उदंड केले । ते भाग्य भोगूनि ठेले ।। थेर ते बोलतचि राहिले । करंटे जन ।। ( १८. ७. १६ ) कष्टेंविण फळ नाहीं । कष्टेंविण राज्य नाहीं ।। केल्याविण होत नाहीं । साध्य जनीं ।। (१८. ७. ३ )" हे उतारे दासबोधांतील आहेत. इतर समर्थवाङ्मयांत ही समर्थांनीं लोकांना अनेक ठिकाणीं प्रयत्नवादाचा उपदेश केला आहे. ओंव्या शतकांपैकीं बाराव्या शतकांत दैववाद व प्रयत्नवाद यांचें फार मार्मिक रीतीनें वर्णन करून प्रयत्नवाद श्रेष्ठ ठरविला आहेः—"प्रयत्न झाला आधीं । म्हणोनियां थोर ।। प्रारब्ध—विचार । ऐलीकडे ।। ( १२. ९३ )" स्फुट प्रकरणांत अनेक ठिकाणीं प्रयत्नाची थोरवी सांगितली आहे. "केल्यानें होत आहे रे । आधीं केलेंचि पाहिजे ।। यत्न तो देव जाणावा । अंतरीं धरितां बरें ।। " हा वर दिलेला उतारा स्फुट प्रकरणांतीलच आहे. साध्य कठीण असल्यास नुसता फावल्या वेळीं प्रयत्न करून उपयोगी नाहीं. महायत्न केल्याशिवाय साध्यप्राप्ति होणार नाहीं. हें लोकांना पटण्याकरितां समर्थ म्हणतातः—" महायत्न देखोनियां काळ धाके । प्रयत्नें बळें गाजवावे तडाखे ।। " महायत्नानें प्रत्यक्ष काळाला—यमराजाला—धाक पडतो. मग मानवी प्राण्यांची काय कथा ?

यत्नानें कार्यसिद्धि होते, परंतु कार्यसिद्धि तावडतोब पाहिजे असल्यास 'अचूक' यत्न केला पाहिजे. म्हणून समर्थ म्हणतातः—"अचूक यत्न तो देवो' हा अचूक यत्न साधण्यास समर्थ म्हणतात कीं, प्रयत्नाला विवेकाची—विचाराची जोड पाहिजे. परमार्थ असो अगर प्रपंच असो मनुष्यानें विवेकपूर्वक प्रयत्न केला पाहिजे, अशाविषयीं समर्थांचा कटाक्ष आहे. कोणतें ही काम करावयास उत्साहानें आरंभ करावयाचा व संकटें आलीं असतां तें काम सोडून द्यावयाचें असा साधारण मनुष्याचा स्वभाव आहे. "प्रारभ्य विघ्न-विहता विरमन्ति मध्याः ।।" ( भर्तृहरि ). संकटें प्राप्त झालीं असतां मागें न घेतां एकांतांत सावधानपणानें विचार करून पुढें काम सुरू करावें म्हणजे मार्ग सुलभ होतो. समर्थ म्हणतातः—"आपणांस जें जें अनुकूल । तें तें करावें तत्काळ ।। होईना त्यास निव्वळ । विवेक उमजावा ( १९. ६. २७ ) विवेकांमध्यें सांपडेना । ऐसें कांहींच असेना ।। एकांतीं विवेक अनुमाना । आणून सोडी ।। ( १९. ६. २८ )." केवळ व्यवहारांतच नव्हे तर कोटिगुणें अधिक अध्यात्मविषयांत देखील विचारानेंच इष्टप्राप्ति

होतें. " संसारत्याग न करितां । प्रपंचउपाधि न सांडितां ।। जनांमध्यें सार्थकता । विचारेंचि होय ।। ( ६. ९. २४ )." बुद्धिहीन कीटक देखील विचार करून पाय टाकतात, यावरून बुद्धिमान मनुष्यानें बोध घेतला पाहिजे. " पर्णालि पाहोनि उचले । जीवसृष्टि विवेकें चाले ।। आणि पुरुष होऊन भ्रमले । यासी काय म्हणावें ।। ( १२. १. ११ )." बुद्धीचा टेंभा मिरविणाऱ्या मनुष्यानें विचाराशिवाय पाऊल टाकल्यास समर्थ त्याची पशूंत गणना करितात:–" विचार पाहे तो पुरुषु । विचार न पाहे तो पशु ।। ऐसीं वचनें सर्वज्ञु । ठायीं ठायीं बोलिला ।। ( १०. ९. २८ )." येथें भगवद्वचनाचा आधार घेऊन समर्थांनीं विचाराची श्रेष्ठता महाराष्ट्रीयांपुढें ठेविली आहे.

प्रयत्नाला जशी समर्थांनीं विवेकाची जोड दिली त्याप्रमाणें वैराग्याची ही जोड दिली आहे. दासबोधांतील ' विवेक-वैराग्य ' या समासांत ( १२. ४ ) विवेकवैराग्यांचें महत्त्व फार मार्मिकपणानें वर्णन केलें आहे. परमार्थांत वैराग्य फार उत्कट असावें लागतें. राजकारणादि व्यवहारांत उदात्त स्वार्थत्याग म्हणजेच वैराग्य होय. विवेकवैराग्ययुक्त प्रयत्न झाला तरी साध्यप्राप्ती होण्यास आणखी एका अलौकिक गुणाची जोड असावी लागते. कोणत्या ही देशांतील लोकांनीं राष्ट्रोन्नतीकरितां विवेकवैराग्ययुक्त प्रयत्न केला तरी अंतिम यशप्राप्ती होण्यास परमेश्वरावर पूर्ण विश्वास ठेवून प्रयत्न केला पाहिजे. म्हणून समर्थ म्हणतातः—" सामर्थ्य आहे चळवळीचें । जो जो करील तयाचें ।। परंतु येथें भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ।। ( २०-४-२६ )." समर्थांनीं यशप्राप्ती होण्यास प्रयत्नास जशी विवेकवैराग्यांची जोड दिली, त्याप्रमाणें भगवंताच्या अधिष्ठानाची म्हणजे धर्माची जोड दिली. राजकीय, धार्मिक, सामाजिक, औद्योगिक अगर इतर कोणती ही राष्ट्रोन्नतीची चळवळ सुरू केली तरी त्या चळवळींत पूर्ण यश येण्यास भगवंताच्या अधिष्ठानाची आवश्यकता आहे, असें समर्थ अनेक ठिकाणीं फार कळकळीनें सांगतात. भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलेल्या अठरा-अध्याय गीतेचें रहस्य कै. लोकमान्य टिळकांनीं ' ज्ञानमूलक भक्तिप्रधान कर्मयोग ' असें काढलें आहे. समर्थ रामदासांनीं महाराष्ट्रास सांगितलेल्या वीस-दशक दासबोधाचें व इतर समर्थवाङ्मयाचें रहस्य थोडक्यांत सांगणें झाल्यास ' धर्ममूलक विवेकवैराग्यप्रधान प्रयत्नवाद ' असें सांगतां येईल असें आम्हांस वाटतें. अनेक शतकांच्या पराराज्यानें व परदास्यानें महाराष्ट्रच नव्हे तर सर्व हिंदुस्थान कर्तव्यमूढ झाला होता. त्याला कर्तव्यदक्ष करण्यास समर्थांनीं एक अत्यंत परिणामकारक असा मंत्र सांगितला. धर्ममूलक विवेकवैराग्यप्रधान प्रयत्नवाद हा तो मंत्र होय. या अमृततुल्य मंत्रोपदेशाप्रमाणें महाराष्ट्र वर्तला, तेव्हां महाराष्ट्राचें आनंदभुवन झालें व महाराष्ट्र वैभवशिखरावर चढलें. शिवसमर्थकालानंतर

चाललेल्या इतिहासप्रसिद्ध स्वातंत्र्ययुद्धांत रामचंद्र नीलकंठ पंतअमात्य, धनाजी जाधव, संताजी घोरपडेप्रभृति सुप्रसिद्ध मुत्सद्दी व योद्धे यांनीं स्वार्थत्यागपूर्वक राष्ट्रहितैक दृष्टीनें समर्थांच्या वरील मंत्रोपदेशाप्रमाणें प्रयत्न केला, तेव्हां ही त्यांना त्या प्रयत्नांत यश आल्याची इतिहास साक्ष देत आहे.

समर्थांची व शिवाजीमहाराजांची गांठ महाराजांच्या पूर्व वयांत पडली कां उत्तर वयांत पडली ? समर्थांनीं महाराजांना राजधर्म व क्षात्रधर्म सांगून 'मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्र-धर्म वाढवावा ॥' हा उपदेश महाराजांच्या पूर्व वयांत केला कां उत्तर वयांत केला, याविषयीं कांहीं आधुनिक विद्वान टीकाकारांत मतभेद आहे. परंतु समर्थांनीं आपल्या ग्रंथांतून व संप्रदायांतून कर्तव्यमूढ महाराष्ट्राला 'धर्ममूलक विवेकवैराग्यप्रधान प्रयत्नवाद' सांगून कर्तव्यदक्ष केलें, याबद्दल दुमत होईल असें आम्हांस वाटत नाहीं 'धर्ममूलक विवेकवैराग्य-प्रधान प्रयत्नवाद' हें त्रिकालाबाधित तत्त्व आहे. कोणत्या ही देशांत, कोणत्या ही काळीं, कोणत्या ही धर्माच्या लोकांनीं आपल्या देशाची निकृष्ट स्थिति घालविण्यास या तत्त्वाप्रमाणें प्रयत्न केल्यास त्यांना त्या प्रयत्नांत यश आल्याशिवाय राहणार नाहीं. असें त्रिकालाबाधित महत्त्वाचें तत्त्व सांगून समर्थांनीं महाराष्ट्रांतील कर्तव्य-मूढ लोकांना जागृत केलें हें समर्थांचें महत्तम कार्य होय.

# भाग १३ वा

# अद्भुत गोष्टी

"म्हणे दासरे वास जेथें भुतांचा ।
भुतें सांडुनी शोध घ्या अद्भुतांचा ।।
नसे भूत, अदभूत त्यातें म्हणावें ।
विवेकें देहभूत सर्वै जिणावें ।।५।।" समर्थ—करुणाष्टकें (२३)

प्राचीन कालाच्या सर्व देशांतील साधुसंतांच्या चरित्रांत त्यांनीं केलेल्या अद्भुत गोष्टींचें वर्णन केलें आहे. अर्वाचीन कालच्या साधुसंतांचीं चरित्रें अद्भुत कथांपासून अलिप्त नाहींत. ज्ञानेश्वरमहाराजांपासून समर्थतुकाराम-महाराजांपर्यंत सर्व साधुसंतांच्या चरित्रांत ही अद्भुत कथांचा उल्लेख आहे. समर्थ-कालीन चरित्रांमध्यें अगर चरित्रटिपणांमध्यें देखील हाच प्रकार आढळून येतो. जुन्या चरित्रकारांनीं अगर बखरकारांनीं या अद्भुत कथा स्वकपोलकल्पित लिहिल्या असाव्यात असें आम्हांस वाटत नाहीं. कर्णोपकर्णी बाडवडिलां-पासून ऐकलेल्या व त्यांच्या कालीं बहुजन समाजांत प्रचलित असलेल्या आख्या-यिका व दंतकथा यांवरून आपण लिहिलेल्या टिपणांत, चरित्रांत, अगर बखरींत त्यांनीं अंधश्रद्धेनें व भाविकपणानें 'अद्भुत गोष्टी' दिल्या आहेत. 'व्यक्ति तितक्या प्रकृती' या न्यायानें कित्येक चरित्रकारांनीं व बखरकारांनीं कर्णोपकर्णी ऐकलेल्या अद्भुत गोष्टी तिखटमीठ लावून अतिशयोक्तीनें वर्णन केल्या आहेत. ही गोष्ट समर्थांच्या जुन्या चरित्रकारांमध्येंच आढळून येते असें नाहीं, तर विसाव्या शतकांत पाश्चात्यविद्याविभूषित अर्वाचीन चरित्रकारांमध्यें ही आढळून येते. श्री. भीमराव सखाराम पारळकर यांनीं 'श्रीरामदासकथासारामृत' शके १८३९ सालीं म्हणजे फक्त पंधरा वर्षांपूर्वीच लिहिलें. कपिलाषष्ठीस समर्थ कृष्णास्नानास गेले, तेव्हां त्यांनीं दक्षिणा म्हणून दिलेल्या दगडाचें सोनें झालें, ही साधी अद्भुत गोष्ट देतांना त्यांनीं त्या सोन्याचे ब्राह्मणाच्या बायकोनें विशिष्ट प्रकारचे दागिने केल्याचें सविस्तर वर्णन केल्याचा उल्लेख आम्हीं मागें केलाच आहे. तर्कप्रधान विसाव्या शतकांतील चरित्रकारांची ही गोष्ट, तर श्रद्धाप्रधान पूर्वकालांत लिहिलेल्या चरित्रांत अद्भुत गोष्टींचें अतिशयोक्तीनें वर्णन केलें असेल हें सांगावयास नकोच. उदाहरणार्थ, मोळीविक्या अंत्यजानें सदाशिवशास्त्री येवलेकरांचा गर्व-परिहार समर्थांच्या आज्ञेवरून केला, तो अत्यंज पूर्वी माल्यवान गंधर्व होता व नारदऋषींच्या शापानें घोडा, रेडा व शेवटीं महार होऊन समर्थांच्या कृपेनें पुन्हा

गंधर्व होऊन विमानांत बसून गेला, ही साधी अद्भुत गोष्ट. या गोष्टीचें प्रमाणातीत सविस्तर रसभरित वर्णन संतविजयकारांनीं व दासविश्रामधामकारांनीं केलें आहे. असो. प्रस्तावनेंत सांगितल्याप्रमाणें आम्हीं समर्थचरित्रांतील प्रमुख अद्भुत गोष्टींचें या भागांत थोडक्यांत सार देतों.

समर्थचरित्रांतील अद्भुत गोष्टींचे स्थूल मानानें चार भाग पाडतां येतील. ( १ ) साक्षात्कार, दृष्टान्त, स्वप्नदृष्टान्त वगैरे, ( २ ) मृत मनुष्यांस, पशुपक्ष्यांस जिवंत करणें, ( ३ ) अन्न नसतां सिद्धीच्या जोरावर हजारों लोकांना आयत्या वेळीं भोजन घालणें व ( ४ ) हिंस्र पशूंशीं खेळणें, जमिनींत व पाण्यांत राहणें, लहान रूप धारण करणें, अंत्यजांकडून वेद वदविणें इत्यादि अलौकिक कृत्यें करून दाखविणें.

( १ ) साक्षात्कार, दृष्टान्त इत्यादि. साक्षात्कार, दृष्टान्त, स्वप्नदृष्टान्त, स्वप्न-अनुग्रह इत्यादि गोष्टींचा अद्भुत गोष्टींमध्यें अंतर्भाव करतां येणार नाहीं असें आम्हांस वाटतें. सात्त्विक श्रद्धेच्या—धर्मभावनापूर्वक श्रद्धेच्या—त्या गोष्टी आहेत. तुकाराममहाराजांसारखे भगवद्भक्त स्वतः स्वकृत अभंगांमध्यें स्वप्नामध्यें आपणांस बाबाजी चैतन्यानें अनुग्रह दिला असें सांगतात; तेव्हां ते खोटें सांगतील असें आम्हांस वाटत नाहीं. प्रत्यक्ष भेटीच्या पूर्वीं स्वप्नांत समर्थ आपणांस भेटले होते असें दिनकरस्वामी म्हणतात, ती गोष्ट खोटी असण्याचा संभव नाहीं. मानसशास्त्राच्या सिद्धांताप्रमाणें या गोष्टी खऱ्या असण्याचा संभव आहे. सात्त्विक व श्रद्धाळू सदाचारसंपन्न साधकाला अहोरात्र एखाद्या गोष्टीचा निदिध्यास लागला म्हणजे स्वप्नांत त्या गोष्टी येणें साहजिकच आहे. अहोरात्र देवदर्शनाचा ध्यास घेतल्यास साहजिक मुमुक्षूस अगर साधकास देवदर्शनाचा भास होणें, देवाबरोबर संभाषण केल्याचा अगर देवानें अनुग्रह दिल्याचा भास होणें साहजिक आहे, असें आम्हांस वाटतें. ध्यास लागल्यामुळें प्राणी तद्रूप होतो. तुकाराम म्हणतात, ‘ तुका म्हणे आळी आपण भुंगेची वेगळी । ’ साधककोटींतून सिद्धकोटींत गेल्यावर सिद्ध साधुसंतांनीं सांगितलेला अगर लिहिलेला अनुभव अन्यथा मानण्यास बद्ध मनुष्यास अधिकार नाहीं असें आम्हांस वाटतें. कारण खोटें सांगून अगर लिहून साधुसंतांना कांहीं स्वार्थ साधण्याचा नसतो. साक्षात्कार, दृष्टान्त, देवाबरोबर भाषण इत्यादि गोष्टी या श्रद्धेच्या प्रांतांतील ( Region of faith ) आहेत.

(२) व (३) मृत मनुष्यास व पशुपक्ष्यांस उठविणें व हजारों मनुष्यांस एकदम सुग्रास अन्न घालणें या अद्भुत गोष्टी या सदरांत येतात. स्वतः समर्थांनीं अद्भुत गोष्टी करणाऱ्यांचा आपल्या वाङ्मयांत उपहास केला आहे. मृत मनुष्य उठविल्या-बद्दल त्यांनीं जयरामस्वामींस दोष दिला आहे. स्वतः त्यांच्या चरित्रांत मृत मनुष्य

उठविल्याचें एकच उदाहरण आहे. तें उद्धवस्वामींच्या पित्याचें होय. त्याचा उल्लेख आम्हीं मागें 'तीर्थयात्रा' या प्रकरणांत केलाच आहे.

(४) हिंस्र पशूंशीं खेळणें, जमिनींत, पाण्यांत राहाणें, लहान रूप धारण करणें, अंत्यजांकडून वेद वदविणें इत्यादि गोष्टींत कांहीं गोष्टी अभ्यासानें शक्य आहेत. योगाचा अभ्यास केल्यास कांहीं विशिष्ट स्थितींमध्यें कांहीं कालपर्यंत मनुष्य जमिनींत व पाण्यांत जिवंत राहूं शकतो. समर्थलीलाअनुग्रहांत के. आठल्ये यांनीं पंजाबांत रणजितसिंग व कांहीं इंग्रज लोक यांनीं पहारा ठेवून पुरलेला एक फकीर दहा महिन्यांनंतर पुरलेल्या स्थितींत जिवंत निघाल्याचें उदाहरण दिलें आहे. तेव्हां माहुलीच्या वाळवंटांत समर्थांना मुलांनीं पुरलें होतें व थोड्या दिवसांनीं ते जिवंत निघाले ही गोष्ट खरी असण्याचा संभव आहे. त्याप्रमाणें कोयना नदीच्या पुरांत १२ दिवस बुडून राहून जिवंत निघण्याचा ही संभव आहे. पतंजलीचें योगशास्त्र आम्हीं वाचलें आहे. त्यांतील अनुभव आम्हांस कांहीं नाहीं; शब्दज्ञान आहे. तेवढ्यावरून योगाभ्यासानें कांहीं अद्भुत गोष्टी करतां येतील असें आम्हांस वाटतें. मात्र त्या कष्ट-साध्य आहेत. कांहीं अद्भुत वाटणाऱ्या गोष्टींचा कार्यकारणभाव योगाभ्यासाच्या अनु-भवानें लागेल असें आम्हांस वाटतें. असें झाल्यास 'Science explained, no miracle remains' भावार्थ—'शास्त्रीय ज्ञानानें कार्यकारण भावाची उत्पत्ति लागल्यावर चमत्कारच राहत नाहींत.' या न्यायानें कांहीं अद्भुत गोष्टींचा उलगडा होईल. परंतु कांहीं अद्भुत गोष्टींचा कार्यकारणभाव योगाभ्यासानें ही उलगडेल असें आम्हांस वाटत नाहीं. समर्थांचा मोठेपणा अद्भुत गोष्टींवर अवलंबून नाहीं असें आम्हीं प्रस्तावनेंत सांगितलेंच आहे. तेव्हां या अद्भुत गोष्टींविषयीं आम्ही अधिक विवेचन करीत नाहीं व तसें साधार विवेचन करण्याचा आमचा अधिकार ही नाहीं. तेव्हां समर्थ-चरित्रांतील कांहीं अद्भुत गोष्टी थोडक्यांत सांगतों.

साक्षात्कार—साक्षात्कारकालीं अनुग्रह, दृष्टान्त, स्वप्न—स्वप्नांत अनुग्रह या गोष्टी सात्त्विक, भाविक, श्रद्धामय अंतःकरणाच्या आहेत; म्हणून आम्ही त्या अद्भुत गोष्टींच्या सदरांत घालीत नाहीं असें वर म्हटलेंच आहे. म्हणून त्या गोष्टींचा उल्लेख येथें करीत नाहीं. चरित्रांत ज्या वर्षीं त्या गोष्टी घडल्या त्या वर्षी त्यांचा थोडक्यांत उल्लेख केलाच आहे. बाकीच्या अद्भुत गोष्टींपैकीं कांहीं प्रमुख गोष्टी खालीं वर्षानुक्रमानें देतों.

(१) शके १५४५, मृत मनुष्यास उठविल्याची अद्भुत गोष्ट. शके १५४२ त समर्थ लग्नमंडपांतून पळून पंचवटीनजीक टाकळी येथें तपश्चर्येस येऊन राहिले. नंतर तीन वर्षांनीं उद्धवस्वामींची माता अनुपूर्णाबाई या पतिनिधनानंतर सती जाण्यास निघाल्या. वाटेंत समर्थांना त्यांनीं नमस्कार केला. 'अष्टपुत्रा सौभाग्य-

बती भव ' असें समर्थ म्हणाले व मग गंगोदक सिंचन करून अन्नपूर्णाबाईच्या मृत पतीस उठविलें. ही गोष्ट सविस्तर 'तपश्चर्या' या भागांत दिली आहे. गंगोदक-सिंचन व मृत मनुष्य उठणें यांत कार्यकारणभाव कोणता ? असा प्रश्न या तर्क-प्रधान युगांतील चिकित्सक आक्षेपक विचारणार. प्रखर तपश्चर्येनंतर श्रीरामस्मरण-पूर्वक गंगोदकसिंचनांत संजीवनी विद्येचें सामर्थ्य येतें असें भाविक श्रद्धाळू मनुष्यानें उत्तर दिल्यास आक्षेपकांचें समाधान होईल असें आम्हांस वाटत नाहीं.

( २ ) **शके १५५४, पुष्पाची गोष्ट.** तपश्चर्येच्या उत्तरार्धांत समर्थ पंचवटींत पुराण सांगत असत. रामायणावर पुराण सुरू असतां प्रत्यक्ष मारुति बटूचा वेष घेऊन पुराणास येत असत. रावण शंकरभक्त होता. तो पांढऱ्या कण्हेरीच्या फुलानें शंकराची पूजा करीत असे असें समर्थांनीं पुराणांत सांगितलें. बटुवेषधारी मारुति "रावणाच्या बागेंत तांबड्या कण्हेरीचीं झाडें आहेत." असें म्हणाले. दोघांचा वाद लागला. दुसरे दिवशीं मारुतिराय लंकेंत जाऊन रावणाच्या बागेंत कण्हेरीचीं झाडें पाहून आले. समर्थांच्या म्हणण्याप्रमाणें रावणाच्या बागेंत पांढऱ्या कण्हेरीचींच झाडें होतीं. दुसरे दिवशीं मारुतींनीं समर्थांना "रावण पांढऱ्या कण्हेरीचीं फुलें शंकरास वाहत होता असें तुम्हांस कसें कळलें ?" असें विचारिलें. "मीं लंकेंत पाहिलीं तेव्हां तांबड्या कण्हेरीचीं फुलें मला दिसलीं," असें मारुति म्हणाले. तेव्हां समर्थ म्हणाले, "तुम्ही ही बरोबर आहां व मी ही बरोबर आहें. रावणानें सीतादेवींना चोरून नेलें म्हणून तुमचे डोळे रागानें लाल झाले होते, म्हणून तुम्हांला पांढरीं फुलें तांबडीं दिसलीं. रावण शंकरभक्त होता, म्हणून तो पांढऱ्या फुलांनीं शंकराची पूजा करीत असेल असें समजून मीं पांढऱ्या कण्हेरीचीं फुलें रावणाच्या बागेंत होतीं असें तर्कानें सांगितलें." ही अद्भुत गोष्ट येथेंच संपत नाहीं. मारुतिराय रावणाच्या बागेंत गेले तेव्हां त्यांची व बिभीषणाची गांठ पडली. बिभीषणांनीं "कां आलां ?" असें विचारतां समर्थांच्या पुराणांतील पुष्पांच्या वादाची गोष्ट त्यांनीं रावणबंधूंना सांगितली. तेव्हां रामभक्त रावणबंधूनें समर्थांची भेट घेण्याची इच्छा व त्यांचें पुराण ऐकण्याची इच्छा प्रगट केली. "रामेश्वराच्या यात्रेस ते इकडे येतील त्या वेळीं त्यांची व तुमची गांठ घालीन" असें मारुति-रायांनीं वचन दिलें. नंतर समर्थ उत्तर हिंदुस्थानांतील यात्रा संपवून रामेश्वराजवळ आल्यावर मारुतींनीं त्यांना लंकेंत नेऊन बिभीषणसमर्थांची भेट करविली. बिभीषणांनीं समर्थांचें आदरपूर्वक स्वागत केलें. बिभीषणाच्या इच्छेवरून "समर्थांनीं एक मास लंकेंत राहून कीर्तन केलें ! !" असें ह. स्वा.च्या बखरींत वर्णन आहे. ही अद्भुत गोष्ट सर्वथैव अविश्वसनीय आहे असें आम्हांस वाटतें. समर्थ पंचवटींत पुराण सांगत होते ही गोष्ट खरी आहे. एकादे दिवशीं पुष्पांचा

वाद ही तेथें निघाला असेल त्यावरून कोणीं तरी ही दंतकथा रचली असावी असें वाटतें.*

( ३ ) शके १५६५, **मृत घार उठविल्याची गोष्ट.** उत्तर हिंदुस्थानांतील तीर्थयात्रा संपवून पंचवटीस येऊन गंगा-प्रदक्षिणेकरितां दक्षिण-प्रांतीं जात असतां समर्थ पैठणास उतरले होते. तेथें समर्थांनीं गलोल मारून एक घार खालीं पाडली. समर्थांनीं ब्राह्मणांच्या सांगण्यावरून सक्षौर प्रायश्चित्त घेतलें; परंतु घार उठली नाहीं. समर्थांनीं तिच्या अंगावरून हात फिरवितां ती उठली. ही गोष्ट आम्ही मागें ' तपश्चर्या ' या भागांत समर्थांची प्रायश्चित्ताची कल्पना काय होती हें कळण्याकरितां दिली आहे.

( ४-५ ) शके १५६५-७७, **राणूबाईस व कारागीरास दृष्टी आली:** समर्थ लग्नमंडपांतून गेल्यावर शोकानें राणूबाईची दृष्टी मंद होत होत अखेर त्यांना अगदीं दिसेनासें झालें होतें. तीर्थयात्रा करून परत आल्यावर समर्थ भेटले तेव्हां राणूबाईंना आनंद झाला. परंतु त्या अंध झाल्यामुळें पाहतां येईना; तेव्हां समर्थांनीं त्यांच्या डोळ्यांवरून हात फिरवितांच राणूबाईंना पूर्वीप्रमाणें दृष्टि प्राप्त झाली, असें सर्व जुन्या चरित्रांत सांगितलें आहे.

समर्थ चंदावरास गेले तेव्हां त्यांनीं व्यंकोजीराजे यांस पंचधातूंच्या थोर मूर्ती ( राम, लक्ष्मण, सीता व मारुति यांच्या ) करण्यास सांगितलें. सभेंत रघुनाथराव हणमंते मुजुमदार होते, ते म्हणाले कीं, "येथें उत्तम कारागीर आहे, पण त्याचे नेत्र गेले आहेत." समर्थांनीं त्या अंध कारागिरासच बोलावून आणविलें, व त्याच्या नेत्रांवरून हात फिरविला. लागलीच त्यास पूर्वीप्रमाणें दृष्टि आली. नंतर समर्थांनीं मेणाच्या चार मूर्ती तयार करून दिल्या होत्या त्याबरहुकूम त्यानें तेरा मण पंचधातूंच्या चार मूर्ती तयार केल्या. त्यानंतर व्यंकोजीराजे यांनीं त्या व्यवस्थेनें सज्जनगडास पाठविल्या. अंधांना दृष्टि दिल्याच्या या दोनच गोष्टी समर्थचरित्रांत दिल्या आहेत.

( ६-७ ) शके १५७१ ज्येष्ठ, **शिवाजीमहाराजांच्या सैनिकास समर्थ-तुकारामांचें भोजन.** शके १५७१ सालीं महाराजांना समर्थांचा अनुग्रह वैशाखमासीं झाला. नंतर ज्येष्ठ महिन्यांत महाराज दोन हजार सैन्य घेऊन चाफळ खोऱ्यांतून चालले होते. समर्थ जवळच आहेत असें समजतां महाराज २।४ निवडक लोक घेऊन समर्थांच्या दर्शनास गेले. "दुपारची वेळ, भोजन करून जावें," म्हणतांच "बरोबर २००० सैन्य आहे" असें महाराज म्हणाले. "हरकत नाहीं, सर्वांना श्रीकृपेंकरून अन्न मिळेल," असें समर्थ म्हणाले. महाराजांचे लोक स्नानास गेल्यावर समर्थांनीं कल्याणास एका जवळील गुहेच्या तोंडाची शिळा काढण्यास सांगितलें. शिळा काढून कल्याण आंत पाहतात तों २००० पात्रांची पाट रांगोळ्या

घालून पक्वान्नांसहित पानें तयार होतीं. महाराज थक्क झाले व "हें कसें झालें ?" याबद्दल समर्थांना विचारलें. "तुकारामबुवांकडे जा, म्हणजे तुम्हांस ते कारण सांगतील" असें समर्थ म्हणाले. महाराज लागलींच २००० सैन्यासह तुकारामबुवांकडे गेले. ते एका मोडक्या पडवींत भजन करीत होते. त्यांनीं ही समर्थांप्रमाणेंच इंद्रायणीच्या कांठीं २००० लोकांची समर्थांप्रमाणें भोजनाची उत्तम व्यवस्था केली. महाराजांनीं "हें कसें झालें ?" हें विचारतां "ऋद्धिसिद्धी या आमच्या दासी आहेत." असें तुकाराममहाराज म्हणाले. याप्रमाणें या दोन समर्थतुकारामांच्या दंतकथा शके १५७१ त ज्येष्ठमासीं घडल्याबद्दल जुन्या चरित्रांत उल्लेख आहे. त्या वर्षी महाराज वरील दोघां सत्पुरुषांना भेटण्यास गेले होते ही गोष्ट खरी आहे. भाविक लोकांनीं ऋद्धिसिद्धींच्या जोरावर महाराजांच्या लोकांना उभयतां साधूंनीं भोजनसमयीं अन्न पुरविलें अशा दंतकथा प्रसृत केल्या असाव्यात असें दिसतें. समर्थ पुढें एकदां जांबेंत श्रेष्ठांना भेटण्यास गेले होते, त्या वेळीं त्यांनीं वरीलप्रमाणेंच महाराजांच्या दोन हजार सैन्यास अन्न पुरविल्याची अद्भुत गोष्ट ह. स्वा.च्या बखरींत दिली आहे.

(८) कुबडीतीर्थ. शिवाजीमहाराज एकदां समर्थांस भेटण्याकरितां दोन प्रहरीं रामघळीस आले असतां त्यांना फार तहान लागली. आसपास पाणी नव्हतें, तेव्हां समर्थांनीं आपल्या कुबडीनें एक धोंडा काढतांना तेथें पाणी लागलें, अशी दंतकथा सर्व जुन्या चरित्रांत दिली आहे. अद्यापि ती जागा 'कुबडीतीर्थ' म्हणून प्रसिद्ध आहे व तेथें गोड पाण्याचा झरा अद्याप आहे. माधव ज्युलियन वगैरे आधुनिक कवींनीं कुबडीतीर्थावर वरील गोष्टीचें एक छोटें काव्य केलें आहे, त्यांतील शेवटची आर्या अशी आहेः—"तेव्हांपासुनि झाली ती भूमी सुप्रसिद्ध या लोकीं ॥ कुबडीतीर्थ सुनामें, वर्णियली माधवानुजें श्लोकीं ॥ १ ॥"

(९) पंढरपूरचे विठोबाराय अयोध्येचे रामराय झाले (१५७१). ब्राह्मणरूपी विठ्ठलांच्या आग्रहावरून समर्थ पंढरीस यात्रेस गेले. तेव्हां समर्थांच्या प्रार्थनेवरून विठ्ठलांनीं रामरूप धारण केलें. पंढरी अयोध्या बनली व भीमा शरयूरूप दिसूं लागली; तेव्हां तुकारामबुवा, माणकोजी बोधले, जयरामस्वामी, शेख महमद प्रभृतींनीं समर्थांना विनंती केली कीं, "क्षेत्र व श्रींचें रूप पूर्ववत् करावें." समर्थांनीं श्रीपांडुरंगांची प्रार्थना केल्यावर श्रीमूर्ती व क्षेत्र पूर्ववत् झालें, अशी ही दंतकथा ह. स्वा.कृत बखरींत सविस्तर दिली आहे. समर्थ पंढरपुरास गेले, तेव्हां त्यांनीं "येथें उभा कां श्रीरामा। मनमोहन मेघःशामा॥" इत्यादि सुप्रसिद्ध पद केलें त्यावरून ही दंतकथा प्रचलित झाली असावी असें वाटतें.

(१०) भोळारामाचा खलवत्ता (श. १५७३). कल्याणाप्रमाणें समर्थांची एकनिष्ठपणानें सेवा करणारा औरंगाबादेकडील एक शिष्य समर्थांजवळ होता. त्याचें

नांव समर्थांनीं भोळाराम असें ठेविलें होतें. समर्थांचे दांत दुखूं लागले तेव्हां त्यांना भोळाराम नित्य विडा कुटून देत असे. इतर शिष्यांनीं मत्सर बुद्धीनें खलबत्ता लपवून ठेवला. समर्थांनीं विडा लवकर आणण्यास सांगितल्यावर भोळारामानें मुखप्रक्षालन करून विडा चावून समर्थांना दिला. "आजचा विडा बहुत गोड लागतो, असाच विडा दररोज करून देत जा." म्हणून समर्थांनीं भोळारामास सांगितलें. तेव्हां भोळाराम त्याप्रमाणें नित्य करूं लागला. शिष्यांनीं ही हकीकत शिवाजीमहाराजांना कळविली. तेव्हां महाराज लागलीच आले. समर्थांनीं भोळारामास विडा मागतांना, "मी विडा तयार करून देतों," असें महाराज म्हणाले. "भोळारामानेंच तयार केलेला विडा पाहिजे," असें समर्थ म्हणाले. "**तुम्ही स्वतः जाऊन** भोळाराम याजपासून विडा कुटलेला खलबत्ता स्वतः घेऊन यावें" असें महाराजांना सांगितलें. "खलबत्त्यासह विडा तयार करून समर्थांनीं मागितला आहे असें महाराजांनीं समर्थाज्ञेबरहुकूम सांगतांना भोळारामानें नित्याप्रमाणें विडा तयार करून मुखानें चावला; आणि उजवे हातीं सुरी घेऊन डावे हातीं शेंडी धरली आणि उजवे हातानें आपली मान कापली व मस्तकासह महाराजांपुढें केली. तें पाहून महाराज चळचळां कापूं लागले. त्या समयीं कंठनाळांतून ध्वनि निघाला कीं, "आपण भिऊं नये, खलबत्ता स्वामींस नेऊन द्यावा." महाराजांना आश्चर्य वाटलें. आपण या खलबत्त्याच्या प्रकरणांत विनाकारण पडलों असें त्यांना वाटलें. जलद खलबत्ता आणण्यास समर्थांनीं पुन्हा सांगतांना महाराज खलबत्त्यासह समर्थासन्निध आले व समर्थांनीं हात पुढें केला, तों दांत विडा चावीत आहे हें पाहून समर्थांनीं त्या मस्तकाची डाव्या हातानें शेंडी धरली व तोंडाजवळ हात पसरला, तेव्हां तोंडांतून विडा हातांत पडला. तो समर्थांनीं प्रेमानें खाल्ला व महाराजांच्या हातांत भोळयारामाचें शिरकमळ दिलें व होतें त्या ठिकाणीं सरळ ठेवण्यास सांगितलें. त्याप्रमाणें भोळारामाचे धडावर महाराजांनीं तें शिरकमळ ठेवलें. महाराजांचा हात थोडासा चळला म्हणून तें वांकडें बसलें. भोळाराम लागलींच सावध झाला व म्हणाला "मस्तक थोडेंसें वांकडें बसलें. असो, श्रींची इच्छा." नंतर समर्थ महाराजांना म्हणाले, "शिवबा, या खलबत्त्यांतील विडा खावा कीं नाहीं?" महाराजांनीं माफी मागून समर्थांना नमस्कार घातला. अशी ही भोळारामाच्या खलबत्त्याची अद्भुत गोष्ट आहे. भोळारामानें सुरीनें शीर कापून महाराजांच्या हातांत देई-पर्यंत या गोष्टींत कांहीं अविश्वसनीय भाग दिसत नाहीं. भोळारामाच्या आत्यंतिक स्वामिनिष्ठेचें तें एक उत्कृष्ट उदाहरण होऊं शकेल. समर्थांच्या आज्ञेनें महाराजांनीं धडावर शीर ठेवतांच तें पूर्वीप्रमाणें जडलें व भोळाराम जिवंत होऊन बोलूं लागला, हा सामान्य जनांस न उलगडणारा अद्भुतपणा आहे. शीर कापून लागलींच धडावर ठेवलें असतां धडांतील व शिरांतील ऊर्ध्वगामी व

अधोगामी रक्तप्रवाह एकमेकांत मिसळून शीर व धड हीं बेमालूम जुळतात व पुन्हा प्राण येतो असें आमचे एक विद्वान् वैद्य म्हणतात. शस्त्रक्रियाकुशल वैद्यांनीं प्रसंग पडल्यास प्रयोग करून पाहण्यासारखी ही गोष्ट आहे. पुढें समर्थांनीं भोळारामास करंजप्रांतीं वराड येथें मठ बांधून दिला व तेथें राहण्यास सांगितलें व त्या गांवचें सनदपत्र महाराजांकडून करवून दिलें. तो प्रांत महाराजांच्या ताब्यांत नव्हता. महाराजांच्या सदनपत्राप्रमाणें भोळाराम तेथें गेल्यावर तो प्रांत महाराजांच्या ताब्यांत आला.

**( ११ ) रंगनाथस्वामींनीं रेडा कापल्याची गोष्ट ( श. १५७३ ).** एके समयीं महाराजांनीं समर्थांना जरंड्याहून साताऱ्यास बोलावून आणलें. रंगनाथ-स्वामी तेथें समर्थांच्या दर्शनास आले. ते पंच हत्यारें बांधून घोड्यावर बसले होते व बरोबर ५।२५ लंगोटबंद शिष्यमंडळी होती. हा देखावा पाहून महाराजांच्या मनांत त्यांच्याविषयीं शंका आली. समर्थांनीं हें अंतर्ज्ञानानें जाणलें व रंगनाथांचें सामर्थ्य महाराजांस दाखवावें असें मनांत आणलें. महाराजांनीं समर्थांस व रंगनाथ-स्वामींस दोघांना ही राजवाड्यांत भोजनास बोलावलें होतें. समर्थ महाराजांना म्हणाले, " रंगनाथ भ्रष्ट आहे, आम्ही त्याच्या पंक्तीस बसत नाहीं. त्यांना, तुम्ही भ्रष्ट आहां, भोजनास येऊं नये, असा निरोप कारकुनामार्फत पाठवा. " त्याप्रमाणें कारकुनानें जाऊन सांगितलें. तेव्हां रंगनाथस्वामींनीं भर दोन प्रहर झाली होती म्हणून, "रस्त्यांत जें सांपडेल तें घेऊन यावें व पाकसिद्धि करावी," असें शिष्यांस सांगितलें. तेव्हां रस्त्यांत सांपडलेला रेडा आणला व तो रंगनाथस्वामींनीं स्वतः कापला. ही गोष्ट कारकुनानें स्वतः पाहिली व महाराजांना कळविली. नंतर समर्थ महाराजांना बरोबर घेऊन रंगनाथस्वामींच्या बिऱ्हाडीं लालपुऱ्यांत महादेवाच्या देवालयांत गेले. समर्थ येतांच रंगनाथांनीं साष्टांग नमस्कार करून बसण्यास आसन दिलें. इतक्यांत शिष्यांना नैवेद्य आणावयास सांगतांच त्यांनीं रेड्याच्या मांसाचीं चार मडकीं आणलीं. तेव्हां समर्थ म्हणाले, " रंगोबा, तूं भ्रष्ट खरा, पण आम्हांस पंक्तीस घेतोस काय ? " " भाग्य माझें. मर्जी असल्यास पान मांडतों." असें रंगनाथ म्हणाले. " मेलेला रेडा उठवून बाहेर लावून दे, मग भोजन करूं." असें समर्थ म्हणाले. रंगनाथस्वामींनीं समर्थांच्या पायांचें तीर्थ शिंपडल्यावर रेडा जिवंत होऊन बाहेर गेला. नंतर सर्व मंडळी तेथें भोजनास बसली. चार मडकीं उघडलीं. त्यांत मांस नसून दिव्यान्न आहे असें दिसलें. नंतर सर्वांनीं भोजन केलें. त्या वेळीं रंगनाथ-स्वामींनीं समर्थांवर एक कटिबंध केला. त्याचें ध्रुपद असें आहे:—" रामदास चतुराक्षर मंत्र जप वारंवार ॥ दुस्तर भवसागर तारक सच्चित्सुख सार ॥ ध्रु० ॥ " अशी ही रंगनाथस्वामींनीं रेडा कापल्याची दंतकथा आहे. महाराज व समर्थ

सातान्यास असतां रंगनाथस्वामी घोड्यावर बसून तेथें गेले असण्याचा संभव आहे. पुढील रेडा कांपल्याची गोष्ट विश्वसनीय आहे असें आम्हांस वाटत नाहीं.

( १२ ) **मारुतिरायांनीं आग लावली व विझवली.** एकदां समर्थ कल्याण, उद्धवप्रभृति कांहीं शिष्यांसह संचार करून सज्जनगडास परत येतांना दोन प्रहरीं पाडळीचे रानांत आंबराईत उतरले. कांहीं शिष्यांना गांवांत भिक्षेसाठीं पाठविलें व आपण कल्याण व उद्धव आंबराईत बसले. गांवचा कमावीसदार महा दुष्ट होता. त्यानें शिष्यांच्या झोळया व कुबडया हिसकावून घेऊन त्यांना घालवून दिलें. समर्थांकडे येऊन त्यांनीं घडलेला मजकूर सांगितला. समर्थ शिष्यांसह पुढें जाण्यास निघाले. इतक्यांत सर्व गांवांत अग्नीचा भडका उठला. हातांत चूड घेऊन एक वानर गल्लोगल्लीं फिरत आहे असें सर्वांना दिसलें. तेव्हां कमावीसदारांसह गांवचे लोक पळत जाऊन समर्थांस शरण गेले. तेव्हां तो वानर खांद्यावर पर्वता-एवढी घागर घेऊन आग विझवीत आहे असें सर्वांना दिसलें. अग्नीचा महा प्रळय झाला होता तरी कोणाचें कांहीं नुकसान झालें नव्हतें. सर्वांनीं समर्थांची पूजा केली व आशीर्वाद मागितला. तेव्हां "तुमच्या गांवास यापुढें अग्नीचा उपद्रव होणार नाहीं." असें समर्थ म्हणाले. ही प्रचीत अद्यापपर्यंत तेथें आहे असें हनुमंतस्वामी बखरींत म्हणतात. हुरड्याच्या गोष्टींत शिष्यांनीं हुरड्याकरितां कांहीं ताटें काढतां पाट-लानें समर्थांस पाठीवर मारलें; परंतु समर्थांनीं महाराजांकडून त्या पाटलास शिक्षा न करतां उलट तें शेत त्यास इनाम देवविलें. या गोष्टींत कांहीं अद्भुतपणा नाहीं. समर्थांच्या सहनशीलतेचें व उदार मनाचें तें एक उदाहरण आहे. परंतु या आगीच्या गोष्टींत तसा कांहीं भाग दिसत नाहीं. कमावीसदारानें शिष्यांच्या झोळया व कुबड्या हिसकावून घेणें संभवनीय आहे. पुढील भाग चिकित्सक मनुष्यास विश्व-सनीय वाटणार नाहीं.

( १३ ) **तुपाची घागर.** शके १५७५ सालीं चैत्रमासीं रामनवमीच्या उत्सवास समर्थ जांब गांवीं होते. उत्सवाच्या शेवटच्या दिवशीं स्वयंपाक सिद्ध झाल्यावर श्रेष्ठांनीं नैवेद्य आणावयास सांगितलें. "अष्टीगांवास तूप आणण्यास मनुष्य गेला आहे तो अद्याप तूप घेऊन आला नाहीं, म्हणून नैवेद्य येत नाहीं." असें श्रेष्ठांचे पुत्र रामचंद्रबुवा यांनीं समर्थांना सांगितलें. एक मातीची घागर धुवून विहिरींतून भरून आणण्यास समर्थांनीं सांगितलें. मुंजे उपनांवाचा श्रेष्ठांचा शिष्य होता, त्यानें घागर भरून आणली. घागरीवर वस्त्र झाकून समर्थांनीं हस्तस्पर्श केला व मुंजे यास घागरींतून तूप काढून नैवेद्यावर घालण्यास व पंक्तींत वाढण्यास सांगितलें. सर्व पंक्तीला तूप पुरलें. नंतर समर्थांनीं रामचंद्रबुवास सांगितलें कीं, "ही घागर धुवून जतन करून ठेवावी, पुन्हा उत्सवांत दशमीस पारण्याचे दिवशीं या घागरींत तूप घालून तिची पूजा करावी आणि मुंजे यांचे हातून तूप काढून वाढवीत जावें,

म्हणजे सर्व तूप पात्रांना पुरेल." अद्याप ती घागर मठांत जतन करून ठेवलेली आहे. हल्लीं तिचा वरचा भाग पितळेनें व खालचा भाग तांब्यानें मढविलेला आहे. उत्सवांत त्या घागरींतूनच अद्याप तूप वाढतात. तुकारामांनीं व समर्थांनीं सिद्धि-सामर्थ्यानें शिवाजीमहाराजांच्या दोन हजार सैन्यास उत्तम अन्नाचें भोजन घातलें असें म्हणतात. त्याप्रमाणें विहिरींतील पाण्याचें तूप करणें व एक घागर सर्व पंक्तींना पुरविणें हें ही सिद्धिसामर्थ्याचेंच एक उदाहरण आहे असें म्हणतां येईल. परंतु या गोष्टींत एक वैगुण्य दिसतें. ही गोष्ट शके १५७५ सालीं झाली व त्या वर्षी श्रेष्ठांचे चिरंजीव रामचंद्रबुवा हे उत्सवांत हजर होते व त्यांनीं नैवेद्यास उशीर होण्याचें कारण समर्थांना सांगितल्याचा उल्लेख आहे. तेव्हां रामचंद्रबुवा त्या वर्षी निदान दहा वर्षांचे तरी असले पाहिजेत. श्रेष्ठांचा अंतकाल शके १५९९ सालीं झाला. तेव्हां रामचंद्रबुवांचें वय अर्थातच ३४ वर्षांचें असलें पाहिजे. परंतु बखरींत श्रेष्ठांच्या अंतकालाचें वर्णन करतांना रामचंद्रबुवांचें वय १६ वर्षांचें होतें असें स्पष्ट म्हटलें आहे. तेव्हां या अद्भुत गोष्टीच्या सत्यतेविषयीं संशय येतो. शके १५७५ सालीं रामनवमीच्या उत्सवांत समर्थ जांबेस होते, तेव्हां त्यांनीं उत्सवांत स्वतः घागरींतलें तूप वाढलें असेल. तेवढ्यावरून ही दंतकथा नंतर रचली असावी असें वाटतें.

( १४ ) दत्तात्रयांनीं रेडा कापल्याची गोष्ट ( १५७४ ). जांबेहून समर्थ मातापुरास गेले. देवीचें दर्शन घेऊन दत्तात्रयदर्शनास गेले. तेथें कांहीं ब्राह्मण दत्तदर्शनाकरितां अनुष्ठान करीत होते. समर्थ ही कल्याण व उद्धवांसह तेथें दत्त-दर्शनाकरितां अनुष्ठानास बसले. नंतर कांहीं वेळानें दत्तात्रय स्वतः एका मातंग फकिराचा वेष घेऊन तेथें आले. बरोबर बायको ( माया ), तीन मुलें ( त्रिगुण ), २५ कोंबडी, सहा बकरीं ( षड्रिपु ) व एक रेडा ( अहंकार ) असे होते. चांगली जागा पाहून दत्तात्रय स्त्रीला म्हणाले, "ह्यां खाना खानेको इरादा है, वास्ते, हंडी पकाना." स्त्रीनें चूल तयार करून वर हंडी ठेवली व "हंडी मे क्या डालना ?" असें विचारलें. तेव्हां फकिरानें कोंबडीं, तिन्ही मुलें, सहा बकरीं क्रमानें हंडींत कापून घालण्यास सांगितलें. हंडी भरली नाहीं; तेव्हां रेडा कापण्यास सांगितलें, तरी ही हंडी भरली नाहीं. तेव्हां "इस बमनोकू काटकर डालो" असें म्हणाले. तेव्हां ब्राह्मण आसन, जपविधि, माळा व गोमुखी टाकून पळाले. नंतर ती बाई फकिराच्या आज्ञेवरून सुरी घेऊन समर्थांकडे धांवली. तेव्हां समर्थांनीं हास्ययुक्त मुद्रेनें मान पुढें केली. असें पाहून बाई कल्याणउद्धवांकडे गेली, त्यांनीं ही आपापल्या माना पुढें केल्या. हें पाहून दत्तात्रय प्रसन्न झाले व खरें स्वरूप प्रगट केलें. बाई वगैरे सर्व गुप्त झाले. नंतर समर्थांनीं दत्तात्रयांची पूजा केली व ब्राह्मणांस दर्शन देण्याविषयीं प्रार्थना केली. "ते अनाधिकारी आहेत" असें दत्तात्रय म्हणाले व त्यांना अधिकारी करण्यास सांगून ते गुप्त झाले. तेव्हां समर्थांनीं सर्व ब्राह्मणांना बोलावून अनुग्रह

दिला. नंतर स्मरण करतांच दत्तात्रय प्रगट होऊन सर्वांना दर्शन दिलें. त्या वेळीं समर्थांनीं श्रीदत्ताची एक आरती केली, अशी ही अद्‌भुत गोष्ट आहे. जांबेहून समर्थ मातापुरीं दत्तात्रयदर्शनास गेले व तेथें कांहीं ब्राह्मण अनुष्ठान करीत होते ही गोष्ट खरी आहे. ते ब्राह्मण दांभिक होते हें दाखविण्याकरतां कोंबडीं, रेडा कापल्याची दंतकथा मागाहून रचली असावी असें वाटतें.

( १५ ) **पर्जन्यवृष्टीची अद्भुत कथा.** मातापुराहून समर्थ इंदूरबोधन येथें गेले. तेथें पाऊस पडला नाहीं म्हणून एका तलावांत साठ ब्राह्मण कंबरेइतक्या पाण्यांत उभे राहून अनुष्ठान करीत होते. त्यांना समर्थांनीं बाहेर बोलाविलें. नंतर समर्थांनीं एका मोठ्या दगडावर कोळशानें प्रतापमारुतीचें ध्यान रेखलें व त्यावर आपली छाटी टाकली आणि त्या मारुतीवर महारुद्राभिषेक करण्यास सांगितलें. "अभिषेकानंतर पूजा होऊन भोजन झाल्यावर पाऊस पडेल" असें समर्थांनीं सांगितलें. अभिषेकानंतर दगडाचे मूर्तीवरील छाटी काढली, ती टाक्यांनीं घडवून मूर्ति तयार करावी त्याप्रमाणें दिसूं लागली. समर्थांनीं त्या मूर्तीची पूजा करून नैवेद्य दाखवून ब्राह्मणांसह भोजन केलें. इतक्यांत आकाशांत ढग उत्पन्न होऊन प्रचंड पर्जन्यवृष्टि झाली; परंतु समर्थ बसले होते त्या ठिकाणीं मात्र पाऊस पडला नाहीं. अशी ही पर्जन्यवृष्टीची दंतकथा आहे. नंतर गांवचे लोक येऊन समर्थांना शिष्यांसह सत्कारपूर्वक गांवांत घेऊन गेले. तेथें समर्थांनीं मठ स्थापन करून कोदंडधारी श्रीरामाची मूर्ति स्थापन केली व मारुतीपाशीं ही मठ स्थापन केला. गांवकऱ्यांनीं समर्थांना तेथेंच राहण्यास आग्रह केला. तेव्हां उद्धवगोसावी यांस तेथील मठांत ठेवलें व त्यांना कांहीं दिवस तेथें व कांहीं दिवस टाकळीस राहाण्यास सांगितलें. मारुति स्थापन केला त्याच्यामागें डोंगर आहे. त्यावरून पाण्याचा मोठा झोत पडत होता. त्या जागीं कड्यांत बसण्याजोगी जागा होती. तेथें दगडावर समर्थांनीं पुढील सवाई लिहिली:—
"श्रीरामभक्त मूळ रे । प्रसन्न सानुकूळ रे ।। समर्थ तो तया गुणें । तयास सर्व ठेंगणें ।। १ ।।" ती अद्याप तेथें आहे ( ह. स्वा. बखर ). समर्थ इंदूरबोधनास गेले होते, तेथें त्यांनीं मठ करून उद्धवगोसावी यांना ठेवलें वगैरे गोष्टी खऱ्या आहेत. महारुद्राभिषेकानें पर्जन्यवृष्टी झाली एवढीच अद्‌भुत गोष्ट आहे.

(१६) **किल्ल्याच्या भोंकांतून बाहेर आल्याची अद्‌भुत गोष्ट, स. १५७७.** एकदां जयरामस्वामी शिष्यांसह मिरजेस गेले व तेथें कीर्तन करीत होते. तेथील यवन ठाणेदार दिलेरखान "ये क्या तमाशा है ?" असें म्हणाला. "हिंदूका फकीर आनंदसे देवभजन करता है." असें सांगतांना तो उभा राहिला. "साधूंचा समागम मुहूर्तमात्र झाला असतां ते साधु साक्षात् श्रीरामदर्शन करवितात." असें जयरामस्वामी कीर्तन करीत असतां म्हणाले. दुसरे दिवशीं दिलेरखानानें जयरामस्वामींस पालखींतून बोलावून आणलें व हात जोडून म्हणाला,

" कल अपने भजनमें कहा जो फकीर( साधु )का मिलाफ घडीभर होनेसे वो साधु श्रीराम बघते है, तो हमकूं आपका मिलाफ चार घडी हुवा और राम रहिम ये दो नही है ( येक ही ) वास्ते हमकू राम दिखलाना चाहिये." असें म्हणतांना जयरामस्वामी म्हणाले, "साधूंनीं सांगितलेल्या गोष्टी निरंतर भजन केलें असतां कालें करून घडतात." "काल तुम्ही असें म्हणालां नाहीं. राम दाखवा नाहीं तर मुसलमान करतों, " असें म्हणून खानानें भांड्यांत झाकून ठेवलेलें मांस दाखविलें. " आमचे गुरु आहेत, त्यांना आणवितों, चार घटका वाट पाहा." असें जयरामस्वामी म्हणाले. तें खानानें कबूल केलें.

इकडे समर्थ कर्नाटकास जाण्यास निघाले होते ते मिरजेस कृष्णास्नान करीत होते. तेथें जयरामस्वामींचे शिष्य गोपाळगोसावी गेले आणि त्यांनीं सर्व हकीकत सांगितली. समर्थ यवनाच्या कचेरींत गेले व खानास " रामदर्शन पाहिजे काय?" म्हणून विचारिलें. " होय हजरत " असें खान म्हणाला. "साधु ज्या मार्गानें जातील त्या मार्गानें तूं येशील तर तुला रामदर्शन होईल." असें समर्थ म्हणाले. " आप हुकूम करोगे उस रस्तेसे मै आऊंगा " असें म्हणून खानानें कबूली दिली. नंतर समर्थ जयरायस्वामींसह किल्ल्याच्या सफेलीवर आले व जंगीच्या भोंकांतून आपण बाहेर गेले व जयरामांना येण्यास सांगतांना, ते ही त्या भोंकांतून बाहेर गेले. नंतर खानास सांगितलें कीं, " तुम्ही ही याच मार्गानें खालीं या, म्हणजे श्रीराम येथें उभा आहे, तुम्हांस दाखवितों. " खानास त्या मार्गाची गति नसल्यामुळें त्याला जातां आलें नाहीं. " हिंदू के फकीर अवलीया है. " असें म्हणून खानानें समर्थांना साष्टांग दंडवत करून माफी मागितली. नंतर समर्थांना तेथें राहण्याची विनंति केली. तेव्हां "आम्ही एके ठिकाणीं राहत नाहीं." असें समर्थ म्हणाले व तेथें मठ स्थापून वेणाबाईस राहण्याची आज्ञा केली, अशी ही अद्भुत गोष्ट आहे. शके १५७७ सालीं समर्थ कर्नाटकांत जातांना मिरजेस उतरून तेथें मठ स्थापन करून वेणाबाईस राहण्यास आज्ञा केली ही गोष्ट खरी आहे. किल्ल्याच्या भोंकांतून बाहेर आल्याची गोष्ट आठ सिद्धींपैकीं एक सिद्धि समर्थांना अवगत होती, हें दाखवण्याकरितां दिली असावी असें वाटतें. समर्थ जयरामस्वामींचे गुरू नव्हते.

( १७ ) वेणाबाईची मूर्च्छा (शके १५७७.) समर्थ नित्य-पंक्तीस बहुधा भोजन करीत नसत. सगळे पदार्थ एकदम वाढून तें ताट त्यांच्या खोलींत नेऊन ठेवण्याची वहिवाट असे. नंतर समर्थ दार लावून भोजन करीत. शिवाजीमहाराजांनीं विस्तीर्ण ताट करून त्यास चवसष्ट वाट्या खिळून दिल्या होत्या. सज्जनगडावर असतांना एकदां वेणाबाईनीं ताटांत पदार्थ वाढून ताट खोलींत ठेवून दार लावून त्या बाहेर आल्या. स्वयंपाकघरांत गेल्यावर एक पदार्थ वाढण्याचा चुकून राहिला आहे असें त्यांना समजलें; तो पदार्थ घेऊन आंत जाण्यास दार उघडलें

तेव्हां मारुतीसह समर्थ भोजन करीत आहेत असें त्यांना दिसलें. वेणाबाईस पाहतां मारुतींनीं भुभुःकार केला, तेव्हां त्या मूर्च्छा येऊन खालीं पडल्या. नियमभंग केला म्हणून समर्थ वेणाबाईवर रागावले. नंतर मंडळींच्या विनंतीवरून समर्थांनीं त्यांना सावध केलें.

(१८) मुंजे यांचें जहाज वाचविल्याची गोष्ट (शके १५७८). एकदां समर्थ चाफळास असतांना महाराज कांहीं उत्तम वस्त्रें घेऊन आले व तीं समर्थांना समर्पण केलीं. महाराज समर्थांशीं बोलत असतांना समर्थांचीं सर्व वस्त्रें भिजलीं. वस्त्रें कशीं भिजलीं असें महाराजांनीं विचारलें. वस्त्राचा एक पदर पिळून समर्थांनीं पाणी महाराजांच्या हातावर घातलें व परीक्षा करण्यास सांगितलें. समुद्राच्या पाण्याप्रमाणें पाणी खारट लागलें असें महाराज म्हणाले. पंधरा दिवसांनीं खुलासा करूं म्हणतांना महाराज पुन्हा पंधरावे दिवशीं आले. राजापूरचे मुंजे सावकार हीं तेव्हां आले. "समुद्रांत जहाज बुडत होतें, समर्थांचें स्मरण करतांच जहाज सुरक्षित बाहेर निघालें. तेव्हां नवस केल्याप्रमाणें एक चतुर्थांश द्रव्य व उत्तम पदार्थ घेऊन कुटुंबासुद्धां समर्थांचे दर्शनास आलों आहों." असें सांगून त्यांनीं समर्थांना दंडवत प्रणाम केला. या अद्भुत गोष्टींतील उत्तरार्ध शक्य आहे. परंतु महाराजांपाशीं बोलत असतांना समर्थ समुद्रापर्यंत जाऊन त्यांनीं जहाज कसें बुडूं दिलें नाहीं याचा उलगडा होत नाहीं.

(१९) पद्मासन घालून पाण्यांत तीन दिवस बसल्याची गोष्ट (शके १५७८). या वर्षी समर्थ कोंडवळीचे घळींतून चाफळास येण्यास निघाले. वाटेंत कोयना नदीस महापूर आला होता. चांदजीराव पाटणकर यांच्या सांगडीस उशीर लागल्यामुळें समर्थ पोहून येण्यास निघाले व मध्यभागीं भोंवऱ्यांत सांपडून तळाशीं गेले. दुसरे दिवशीं चांदजीराव आले व आसपास एक कोस सांगडी घालून शोध केला. समर्थ सांपडले नाहींत म्हणून शोक करीत घरीं गेले. चांदजीरावांनीं चाफळास, समर्थ नदींत बुडून मेले म्हणून निरोप पाठविला. तेव्हां कल्याण व उद्धव मंडळीसह धांवत आले व चांदजीरावांस समर्थ बुडाले ती जागा दाखविण्यास सांगितलें. कल्याणांनीं 'जयजय रघुवीर समर्थ' म्हणून तेथें बुडी मारली. तेव्हां स्वामी पद्मासन घालून बसले आहेत असें त्यांना दिसून आलें. समर्थांच्या पद्मासनांत डोकें घालून त्यांना खांद्यावर घेऊन कल्याण वर आले. चांदजीरावांनीं समर्थांसह सर्व मंडळींस पाटणास नेलें. तेथें कांहीं दिवस राहून समर्थ शिष्यमंडळीसह चाफळास गेले.

(२०) अंत्यजाकडून वेद वदविल्याची गोष्ट (शके १५८०). समर्थ रामघळीस असतां काशीस विद्याभ्यास करून सदाशिवशास्त्री येवलेकर दिवसा मशाली लावून जानव्याला सुरी बांधून दिग्विजय करीत निघाले. धर्मात्मा शिवाजीमहाराजांची कीर्ति ऐकून त्यांच्या जवळील विद्वान् गागाभट्ट पंडितांस

जिंकण्यास ते आले. महाराजांनीं गागाभट्टास सभा भरविण्यास सांगितलें. गागाभट्टास आपण सदाशिवशास्त्री यांस वादांत जिंकूं कीं नाहीं याची शंका आली म्हणून त्यांनीं सदाशिवशास्त्र्यांना समर्थांकडे पाठवावें असें ठरविलें. " स्वामी अरण्यावासी आहेत, हा विषय त्यांचा नव्हे. शास्त्री यांचा वाद, शास्त्री यांजपाशींच व्हावा." असें महाराज म्हणाले. समर्थांकडेच चलावें असा दोघा पंडितांचा आग्रह पडतांना महाराज रायगडाहून सर्व मंडळींसह चाफळसन्निध रामघळीस समर्थ होते तेथें आले. समर्थ एका मोठ्या दगडावर बसले होते. कल्याण जवळ उभे होते. त्यांनीं महाराज व पंडित आल्याची वर्दी दिली. महाराजांनीं समर्थांना साष्टांग नमस्कार केला. समर्थांनीं सदाशिवशास्त्री यांना दगडावरून खालीं न उतरतां नमस्कार केला. सदाशिवशास्त्री म्हणाले, " आपली व आमची बरोबरी झाल्यास नमस्कार करूं, नाहींतर आशीर्वाद म्हणूं." समर्थ म्हणाले, " आपण साक्षात् भूदेव. आशीर्वाद द्यावा." " परीक्षा झाल्यावांचून नमस्कार किंवा आशीर्वाद म्हणणार नाहीं," असें सदाशिवशास्त्री म्हणाले. तेव्हां समर्थ म्हणाले, " परीक्षा ती काय ?" सदाशिवशास्त्री बोलले, " आमची वाद-भिक्षा आहे. आपणांस जिंकल्यास जय-पत्र घेऊं. आपण आम्हांस जिंकल्यास दिवसा मशाल लावली आहे ती विझवूं व यज्ञोपवीतास सुरी बांधली आहे तिनें जीभ उतरून पुढें जाऊं." समर्थ म्हणाले कीं " आम्ही शास्त्री नाहीं, विद्वान नाहीं, रामाचे दास, अरण्यवासी, आपल्या बरोबरीचे असतील त्यांचेबरोबर आग्रहपुरःसर वाद करावा. बहुरत्ना वसुंधरा आहे." समर्थांचें हें भाषण ऐकून शास्त्री म्हणाले, " साधुपणाच्या गोष्टी ऐका-वयास मी आलों नाहीं. वाद चालावा किंवा जयपत्र द्यावें." समर्थ नम्रपणें बोलतात पण आम्ही आल्यावर उभेसुद्धां राहिले नाहींत, अशी शास्त्री यांच्या मनांत भावना उत्पन्न झाल्याचें पाहून समर्थ कल्याणास म्हणाले, " तो महार जात आहे त्याला बोलाव." महार आला व " तूं कोण आहेस ?" असें विचारतां "महार आहें, मोळी देऊन भाकर नेत असतों" असें सांगितलें. समर्थांनीं आपली कुबडी कल्याणाच्या हातांत दिली व तिनें रेषा ओढून त्यास त्या रेषेच्या आंत बोलावण्यास सांगितलें. नंतर तो आंत आल्यावर " तूं कोण आहेस ?" म्हणून विचारलें. तेव्हां " मी शूद्र आहें" असें तो म्हणाला. पुन्हा कुबडीनें दुसरी रेषा काढून त्यास आंत घेतलें; तेव्हां " मी वैश्य आहें" असें तो म्हणाला. तिसरी रेषा काढून आंत घेतल्यावर " मी क्षत्रिय आहें" असें म्हणाला. नंतर चवथी रेषा काढून आंत घेतल्यावर " मी ब्राह्मण आहें" असें म्हणाला. " तूं पढला आहेस काय ?" असें विचारतां " मी सर्व पढलों आहें. कोणाशीं वाद करूं ?" असें म्हणाला. तेव्हां समर्थांनीं त्याला सदाशिवशास्त्री येवलेकरांशीं वाद करण्यास सांगितलें. चाफळच्या मोळीविक्या अंत्यज पंडितानें काशीकर पंडितांचा तीन वेळां पराजय केला. तेव्हां सदाशिवशास्त्री

यांनीं पूर्वी बोलल्याप्रमाणें आपल्या हातानें मशाल विझविली व जानव्यांतील सुरी काढून आपली जीभ कापूं लागले. तेव्हां समर्थांनीं कल्याणाकडून त्यांचा हात धरविला, अति दुराग्रहाची गोष्ट करूं नये असें सांगून त्यांचें सांत्वन केलें व त्यांना अनुग्रह देऊन त्यांचें नांव वासुदेवपंडित असें ठेवलें व त्यांना कण्हेरी येथें मठ स्थापून तेथें राहण्यास सांगितलें. अंत्यजाकडून वेद वदविले व विद्वान शास्त्र्याचा त्याचेकडून पराजय केला हें पाहून महाराज, गागाभट्ट, मोरोपंत पिंगळे, निळोपंत मुजुमदार, बाळाजी आवजी चिटणीस, जनार्दनपंत हणमंते प्रभृति मंडळींना आश्चर्य वाटलें. नंतर मोळीविक्या महारानें आपली जन्मकथा पुढें लिहिल्याप्रमाणें सांगितली. "मी चित्रसेन गंधर्व, स्त्रियांसह जलक्रीडा करींत असतांना नारदऋषि आले. मी त्यांचा आदर सत्कार न करतां तशीच जलक्रीडा करूं लागलों, हें पाहून त्यांनी मला शाप दिला कीं, तुला दोन वेळ पशुयोनींत व एक वेळ अंत्यज योनींत जन्म घ्यावा लागेल. मी शरण गेल्यावर त्यांनीं उ:शाप दिला कीं साधूंच्या कृपेनें तुझा उद्धार होईल. प्रथम जयपाळ राजाच्या घरीं तूं घोड्याच्या जन्माला जाशील, तेव्हां श्रीसांबअवतार मुकुंदराज तुझा उद्धार करतील; नंतर पैठणक्षेत्रीं ब्राह्मणाचे घरीं तूं रेड्याच्या जन्माला जाशील तेव्हां श्रीविष्णुअवतार ज्ञानदेव तुझा उद्धार करतील; नंतर तूं चाफळक्षेत्रीं अंत्यजाच्या जन्मास जाशील तेव्हां श्रीमारुतीअवतार रामदास तुझा उद्धार करतील. याप्रमाणें मी आतां दिव्यदेही झालों आहें." इतक्यांत एक दिव्य विमान आलें व त्यांत बसून चित्ररथ गंधर्व गेला. जाते समयीं त्यानें समर्थांस पुढील विनंति केली. "रथोत्सवांत श्रींची स्वारी दीपमाळेपर्यंत येते, त्या वेळीं माझ्या वंशजास मानाचा नारळ मिळावा." विनंती समर्थांनीं मान्य केली. ती वहिवाट अद्याप चालू आहे. मोळीविक्या अंत्यजाचें नांव बहिरू होतें. समर्थ ज्या दगडावर बसले होते, त्या दगडाखालीं खळगा काढून बहिरूचा पार्थिव देह पुरला; त्यास 'बहिरू धोंडा' म्हणतात. त्यास हल्लीं शेंदूर लावून पूज्य मानतात. अशी ही अंत्यजाकडून वेद वदविल्याची अद्भुत गोष्ट आहे. महिपतिबुवांनीं या गोष्टीस संतविजयांत तीन अध्याय दिले आहेत व वर्णन कादंबरीसारखें रसभरित केलें आहे. ह. स्वा. च्या बखरींत ही अद्भुत गोष्ट थोडक्यांत मार्मिक रीतीनें दिली आहे. पुष्पाच्या अद्भुत गोष्टींत समर्थ व बिभीषणाची गांठ वगैरे कथा जशा अविश्वसनीय आहेत, त्याप्रमाणें यांत ही अंत्यजानें गंधर्व होऊन विमानांत बसून जाणें वगैरे कांहीं भाग अविश्वसनीय आहे. सदाशिवशास्त्री येवलेकर हे विद्वान शास्त्री समर्थांच्या दर्शनास आले व त्यांचें नांव वासुदेवपंडित ठेवून त्यांना कण्हेरी मठांत राहण्यास सांगितलें एवढा भाग ऐतिहासिक आहे. चित्ररथास नारदांचा शाप, त्याचा तीन निरनिराळ्या योनींत जन्म इत्यादि काय गौडबंगाल आहे याचा कांहीं उलगडा होत नाहीं.

(२१) वासुदेवपंडितांची वाचा बंद झाल्याची अद्भुत गोष्ट. कण्हेरी मठांत असतां वासुदेवपंडितांनीं एक नवीन पुस्तक तयार केलें. समर्थांनीं सांगितलेला त्रयोदशाक्षरी स्वाभाविक मंत्र वसिष्ठकल्पांतील लघुविषय आहे; म्हणून त्यांनीं रामार्चनचंद्रिकेंतील विधि पाहून मंत्रपद्धतीप्रमाणें हें नवीन पुस्तक तयार केलें होतें. तें पुस्तक घेऊन पंडित सज्जनगडावर आले, व समर्थांना नमस्कार करून तें पुस्तक त्यांच्यापुढें ठेविलें. "बा, योग्य केलें" असें म्हणून पुस्तक परत केलें. तें पुस्तक उचलून घेतांना पंडितांची वाचा बंद झाली. पंडितांचा अपराध कोणता असें शिष्यमंडळींनीं विचारलें. "श्रींच्या आज्ञेप्रमाणें आम्हीं यांस उपदेश केला, त्यावर पंडितांचा विश्वास नाहीं. हा श्रींचा अपराध घडला," असें समर्थ म्हणाले. शिष्य मंडळींच्या प्रार्थनेवरून श्रींनीं कृपायुक्त भाषण करून पंडितांना पुन्हा वाचा दिली. नंतर श्रींच्या आज्ञेप्रमाणें वाराण्यास पंडितांस समर्थांनीं आज्ञा केली. या अद्भुत गोष्टींतील पूर्वार्ध संभवनीय आहे, वासुदेवपंडित विद्वान होते, त्यांनीं रामार्चन-चंद्रिकेंतील विधीप्रमाणें नवीन पुस्तक करून समर्थांना दिलें असेल व समर्थ रागावले असतील. नवीन पुस्तकाबद्दल स्तुति करण्याऐवजीं समर्थ रागावले म्हणून पंडित कांहीं काळ आश्चर्यचकित होऊन स्तब्ध बसले असतील, त्यावरून पंडितांची वाचा बंद झाली अशी आख्यायिका प्रचलित झाली असावी असें वाटतें.

(२२) मारुतींनीं टाळ वाजविल्याची अद्भुत गोष्ट (शके १५८१). चाफळास समर्थ असतांना एकदां समर्थांच्या आज्ञेनें उद्धवगोसावी कीर्तन करीत होते. शिवाजीमहाराज, वासुदेवपंडित प्रभृति मंडळी कीर्तनास हजर होती. कीर्तनास मागें कोणी टाळकरी नव्हता. कीर्तनास रंग बहुत भरला तेव्हां स्वतःच मारुतीराय टाळ घेऊन मागें उभे राहिले. उद्धव गोसावी कीर्तनांत गिरक्या घेत असतां त्यांच्या झग्यास मारुतीच्या अंगाचा शेंदूर लागला. समर्थांनीं हें पाहिलें तेव्हां समर्थ म्हणाले, "उद्धवा, कीर्तन बंद कर व मागें नमस्कार कर." नंतर आपण उभे राहिले. उद्धवांनीं आरती करून समर्थांस नमस्कार केला, तेव्हां समर्थ म्हणाले, "उद्धवा, शाबास! तुझ्या कीर्तनास मारुतीराय उभ्यानें टाळ वाजवितात; तेव्हां त्यांना श्रम होतात. सबब उभ्यानें कीर्तन करूं नको." उद्धवाचे वंशजांत कीर्तन करतांना आरंभीं व नंतर शेवटीं मागें नमस्कार करण्याची चाल आहे. अशी ही मारुतींनीं टाळ वाजविल्याची गोष्ट आहे. कीर्तन करीत असतांना उद्धवांच्या शेल्यास मारुतीच्या अंगावरचा शेंदूर लागला असेल त्यावरून ही अद्भुत कथा प्रचलित झाली असण्याचा संभव आहे.

(२३) समर्थांची चिलम्याची शिकार (शके १५८३). समर्थांनीं पूर्वी पैठणास मृत घार उठविली होती. आतां समर्थ राजगुरु झाले आहेत; तेव्हां त्यांची-त्या महंतीची परीक्षा घ्यावी म्हणून पैठणहून शेंरकास ब्राह्मण माहुलीस आले.

महाराज व समर्थ सातान्यास आहेत हें कळतांना त्यांनीं निरोप पाठविला कीं आपली व समर्थांची गांठ केव्हां पडेल. समर्थांच्या आज्ञेवरून महाराजांनीं, आम्हीच तिसरे प्रहरीं आपल्या भेटीस येतों, असा निरोप पाठविला. समर्थ महाराजांना म्हणाले, "आम्ही शिकार करून येतों, आपण पुढें चलावें." "शिकार कशाची?" असें महाराज म्हणाले. "तेथें तुम्हांस दाखवूं" असें समर्थ म्हणाले. कल्याणासह समर्थ गोंडाळीच्या खोऱ्यांत गेले व गलोलानें झोळीभर चिमण्या मारून आणल्या. पैठणचे ब्राह्मण व महाराज माहुलीच्या रस्त्यावर बोलत बसले होते, इतक्यांत समर्थ आले. सर्वांनीं एकमेकांस नमस्कार केल्यावर महाराज समर्थांस म्हणाले, "कोणीकडे गेलां होतां?" "गोंडाळीच्या खोऱ्यांत शिकारीस गेलों होतों," असें समर्थ म्हणाले. हें ऐकून ब्राह्मण एकमेकांकडे पाहूं लागले. इतक्यांत कल्याणांनीं झोळींतून मृत चिमण्यांचा ढीग महाराजांपुढें ओतला. समर्थांची महती दृष्टीस पडली असें ब्राह्मण एकमेकांत बोलूं लागले. संध्याकाळीं घरीं जाण्यास निघतांना समर्थ म्हणाले, "कल्याणा, चिमण्यांचीं पिलें चिमण्यांची वाट पहात असतील, त्यांना निरोप दे." कल्याण स्तब्ध उभे राहिले, तेव्हां समर्थांनीं गवताच्या पेंडया आणून चिमण्यांवर पसरून पेटवून देण्यास सांगितलें. सर्व मंडळी हंसूं लागली. जाळांचा भडका झाल्यावर चिमण्यांचा कळप उडून गेला. नंतर सर्व ब्राह्मणांनीं समर्थांना साष्टांग नमस्कार घातला. अशी ही समर्थांच्या चिमण्यांच्या शिकारीची अद्‌भुत गोष्ट आहे.

**( २४ ) मेलेल्या गाईचें दूध काढल्याची अद्‌भुत गोष्ट.** पाटगांवीं मौनीबुवा नांवाचे समर्थांचे एक स्नेही साधुसंन्यासी होते. त्यांची आज्ञा न जुमानतां त्यांचे कांहीं शिष्य समर्थांच्या चमत्कारांची परीक्षा करण्यास निघाले व माहुलीस मुक्कामास उतरले हें अंतर्ज्ञानानें जाणून समर्थ कल्याणासह माहुलीस स्नानास आले. स्नानानंतर ओलेत्यानेंच समर्थांनीं कल्याणास कांहीं खाण्यास मागितलें. कल्याणांनीं थालीपीठ होतें तें दिलें. समर्थ उभ्यानेंच खाऊं लागले; तें पाहून मौनीबुवांची शिष्यमंडळी हंसूं लागली व समर्थांची योग्यता समजली, असें म्हणाले. थालीपीठ खात असतां समर्थांना घास लागला, तेव्हां समर्थांनीं कल्याणांना वाळवंटांत एका ब्राह्मण स्त्रीच्या मरून पडलेल्या गाईचें दूध काढून आणण्यास सांगितलें. समर्थांना घास लागला आहे, धार दे, म्हणतांना गाय खाडकन् उठली. कल्याणांनीं दूध काढून समर्थांना नेऊन दिल्यावर समर्थांनीं दुधाबरोबर थालीपीठ खाल्लें व ब्राह्मण स्त्रीस आपली गाय घेऊन जाण्यास सांगितलें. नंतर मौनीबुवांच्या शिष्यांनीं समर्थांना चुकलों म्हणून साष्टांग नमस्कार घातला. अशी ही मेलेल्या गाईचें दूध काढल्याची अद्भुत गोष्ट आहे. या गोष्टींत समर्थांचा अगर कल्याणाचा हस्तस्पर्श न होतां व समर्थांनीं उद्धवपित्याच्या मृत देहावर गंगोदक शिंपडलें तसें गंगोदक ही न शिंपडतां कल्याणमुखांतून समर्थसंदेश ऐकतांच गाय

खाडकन् उठली हें विशेष आश्चर्यकारक आहे. तरी मेलेल्या चिमण्या आग लावून उठविण्याइतकी ही गोष्ट अद्भुत नाहीं. मौनीबुवांचे कांहीं शिष्य समर्थांची महती पाहण्यास गेले असणें साहजिक आहे. समर्थ केव्हां केव्हां पिशाचवृत्ति-साधूप्रमाणें तऱ्हेवाईक रीतीनें वागत असत. तेव्हां ओलेत्यानें थालीपीठ खात उभे राहणें ही संभवनीय आहे. गाय नुकतीच कड्यावरून पडली होती, तेव्हां ब्राह्मण स्त्रीला ती मेली असें वाटलें असेल, कांहीं वेळानें कल्याण जवळ गेल्यावर ती उठली असेल व नंतर कल्याणांनीं धार काढून दूध आणलें असण्याचा संभव आहे.

( २५ ) **जयरामस्वामींस तीन दिवस पाण्यांत बसविल्याची अद्भुत कथा.** एकदां समर्थ जयरामस्वामींचे भेटीस वडगांवास गेले होते. तेथें एक मुलगा पवनतीर्थी स्नानास गेला असतां बुडून मेला. जयरामस्वामींनीं त्यास अंगावर हात फिरवून जिवंत केलें. हें समर्थांना समजतांच ते दुसरे दिवशीं जयरामस्वामींना बरोबर घेऊन स्नानास निघाले. वाटेंत एक विहीर होती. त्यांत जयरामांना उडी मारण्यास सांगितलें. मला मुळींच पोहतां येत नाहीं, असें ते म्हणाले तरी, बुडालां तर मी काढीन, म्हणून त्यांना उडी मारण्यास सांगितलें व आपण उडी टाकली. समर्थ एकटेच वर येऊन चाफळास गेले. नंतर जयरामस्वामींचा व समर्थांचा शोध करीत जयरामस्वामींचे शिष्य गोपाळस्वामी चाफळास आले व समर्थांना घेऊन वरील विहिरीजवळ आले व जयरामस्वामींना हांक मारली; तेव्हां ते वर आले व समर्थांना नमस्कार करून म्हणाले, "मला पाण्यांत तीन दिवस बसविण्याचा दंड कां केला ?" "तुम्ही मेलेलीं माणसें उठवूं लागून ब्रह्मदेव झालां, आतां दररोज तुमचे वरीं एक मेलेलें मनुष्य येईल" असें समर्थ म्हणाले. तेव्हां पुन्हा आपल्या आज्ञेशिवाय कांहीं करणार नाहीं असें जयरामस्वामी म्हणाले. अशी ही मृत मनुष्य उठविल्याबद्दल जयरामस्वामींना शिक्षा दिल्याची अद्भुत गोष्ट आहे.

( २६ ) **शिवाजीमहाराजांनीं वाघिणीची धार काढल्याची अद्भुत गोष्ट.** एकदां समर्थ महाबळेश्वरीं श्रींचे दर्शनास गेले होते. तेव्हां शिवाजीमहाराज त्यांच्या दर्शनास जाण्याकरितां निघाले. दऱ्याखोऱ्यांत पुष्कळ शोध केल्यावर अखेर एका डोंगरांत वायव्यकोनीं एक लहानशी गुहा होती तेथें समर्थ जमिनीवर गडबडां लोळत आहेत असें महाराजांनीं पाहिलें. "कोणती व्यथा होते व त्यावर औषधोपाय कोणता ?" असें महाराजांनीं विचारलें. तेव्हां समर्थ म्हणाले कीं, "मला तीन दिवस पोटशूळाची व्यथा पीडा देत आहे व त्यास औषध आहे, पण तें असाध्य आहे." महाराजांनीं आग्रह केल्यावर समर्थ म्हणाले कीं, "या व्यथेवर वाघिणीचें दूध हें रामबाण औषध आहे. परंतु तें दगडावर पडून वाळलेलें उपयोगी नाहीं, प्रत्यक्ष धार काढून आणलेलें पाहिजे. मी वाघिणीचा अरण्यांत शोध करितों पण अद्याप मला सांपडली नाहीं." यानंतर समर्थ व महाराज यांचा संवाद झाला तो

रघुवंशांतील दिलीपराजा व सिंहाच्या संवादासारखा मनोरंजक आहे. महाराज म्हणाले, "मी वाघिणीचें दूध आणतों, आपणापेक्षां मला माझे प्राण अधिक नाहींत." समर्थ म्हणाले, "शिवबा, तुम्ही नरपति, लक्षावधि मनुष्यांचें पालन करणारे, धर्मसंस्थापक राजे. म्हणून ही गोष्ट तुम्ही करूं नये. माझ्यावर पूर्वी वाघिणीनें दोनचार वेळां कृपा केली होती, तशीच आतां ही करील व भाक्षिल्यास ही चिंता नाहीं. आम्ही एकटे गोसावी." महाराज म्हणाले, "देह अमर नाहीं, केव्हां तरी मरणें आहे; सद्गुरु-करितां मरण आल्यास कैवल्यप्राप्ती होईल." असें म्हणून समर्थांस नमस्कार करून तुंबा घेऊन वाघिणीचा शोध करीत रानांत गेले. एका जाळींत वाघिणीचीं पिलें पाहून तेथें वाघिणीची वाट पहात बसले. पिलांजवळ मनुष्य पाहून ती क्रोधानें धांवत आली व महाराजांच्या मानेस धरून हिसका दिला. समर्थांना दूध दिल्या-नंतर मरण आलें तर बरें म्हणून त्यांनीं समर्थांचें स्मरण केलें. श्रींच्या कृपेनें मांजरी आपलीं पिलें तोंडांत धरते, तशी महाराजांची मान वाघिणीनें तोंडांत धरिली. या प्रसंगावरील एक गीत चाफळ खोऱ्यांत मुली म्हणत असतात, तें पूर्वी या चरित्रांत भाग ११ यांत दिलें आहे. त्यांत महाराजांची मान वाघिणीनें धरल्यावर महाराज म्हणतात, " गर्जना माझ्या रागें करितां वन सर्व दणाणे । तरि बाई नाहीं मी आलों तुजपाशीं कपटानें । जिजाबाई माउली ऐशी । मानिली लीनपणानें । भक्षावें मम देहासी । मग तुजला इच्छा कैशी । देऊनि दुग्ध गुरूसी । मग येतों मी लवलाही । वाघिणी, ग मज बाळातें । निज दुग्ध देइगे माते ॥ १ ॥

नंतर वाघिणीनें महाराजांची मान सोडली व ती गायीप्रमाणें उभी राहिली. महाराजांनीं वाघिणीचें दूध तुंब्यांत काढलें व वाघिणीस नमस्कार करून तुंबा घेऊन निघाले, तों तेथें प्रत्यक्ष समर्थच पुढें दिसले. " आपली व्यथा कशी दूर झाली ? "असें महाराज म्हणाले. "तुमच्यासारखा राजवैद्य मिळाल्यावर व्यथा कशी राहील ?" असें म्हणून महाराजांना उचलून पोटाशीं धरिलें व " शिवबा, तुमच्या धैर्याची पराकाष्ठा झाली " असें म्हणाले. अशी ही महाराजांनीं वाघिणीची धार काढल्याची अद्भुत कथा आहे.

**( २७ ) ब्रह्मनाळ येथील वृंदावन डोलल्याची अद्भुत गोष्ट.** शके १५८८ पराभव नाम संवत्सरीं आश्विन शुद्ध दशमी. एकदां समर्थ शिराळे—कोल्हा-पुराहून फिरत फिरत ब्रह्मनाळ येथें गेले. तेथें आनंदमूर्ति होते. त्यांनीं समर्थांचा आदरसत्कार केला व त्यांना आपले गुरु रघुनाथस्वामी यांच्या समाधीच्या तुलसी-वृंदावनाजवळ नेलें. समर्थांनीं वृंदावनास प्रदक्षिणा करून साष्टांग नमस्कार करतांच वृंदावन डोलूं लागलें. तेव्हां समर्थांनीं आनंदमूर्तींच्या गुरुसेवेची स्तुती केली व आनंदमूर्तींवरून तेथेंच दोन श्लोक केलेः—" अति कठिण शिला ती डोलवी वृक्ष जैसा । जननि-जठर-कोशीं जन्मला कोण ऐसा ॥ गुरुभजनप्रतापें ख्याति झाली

दिगंतीं। अनुदिनीं स्मर चित्ता स्वामी आनंदमूर्ती ॥ १ ॥ अचेतना जो बहु डोलवीतो। सचेतना काय न बोलवी तो ॥ जो चिद्घनानंद आनंदमूर्ती। तदाकार राहोंचि आनंदमूर्ती ॥२॥" त्या वेळीं आनंदमूर्तींनीं समर्थांवरून पुढील श्लोक केलाः—"समर्थ हें नामचि साच मानूं। समर्थ हें नाम दुज्या न मानूं॥ समर्थ-कृपेनें जडजीव तरती। समर्थ हें नाम सद्यःप्रतीती ॥१॥" अशी वृंदावन डोलल्याची ही अद्‌भुत गोष्ट आहे.

**( २८ ) दक्षिणेचे दगड सोनें झाल्याची अद्‌भुत गोष्ट (शके १५९७).** शके १५९७ सालीं कपिलाषष्ठीचा योग होता. त्या महापर्वकाळीं सज्जनगडाहून समर्थ स्नानाकरितां माहुलीस कृष्णानदींतीरीं गेले होते. समर्थ स्नान करून परत जात असतांना ब्राह्मण म्हणाले, "आपण राजगुरु आहां, ब्राह्मणांना दक्षिणा द्यावी." वाळवंटांतील कांहीं गोटे घेऊन समर्थांनीं प्रत्येक ब्राह्मणास एकेक गोटा दिला. एका वृद्ध ब्राह्मणाशिवाय सर्वांनीं गोटे फेंकून दिले. त्या वृद्ध ब्राह्मणानें, समर्थ महा सत्पुरुष आहेत, म्हणून त्यांनीं दिलेल्या गोट्याची शालिग्रामाप्रमाणें पूजा करावी या हेतूनें तो घरीं धोतरांत बांधून नेला. त्याचें सोनें झालें. तें पाहून दुसरे दिवशीं ते ब्राह्मण नदींतील गोटे घेऊन सज्जनगडास गेले व समर्थांना नमस्कार करून क्षमा मागितली व आपल्याजवळील दगडास हस्तस्पर्श करण्यास विनंति केली. समर्थ म्हणाले, "काल कपिलाषष्ठीचा योग होता, आज नाहीं." सर्वांना भोजन घालून एकेक रुपया दक्षिणा दिली व घरीं जाण्यास सांगितलें. ब्राह्मणांनीं अत्याग्रह करतांना समर्थांनीं त्यांना परत जातांना उरमोडी नदींतील एकेक दगड घरीं न्यावा म्हणजे श्रीरघुपति तुमचे मनोरथ पूर्ण करतील असें सांगितलें. समर्थांनीं सांगितल्याप्रमाणें ब्राह्मणांनीं उरमोडी नदींतून दगड नेले व त्यांचें सोनें झालें. अशी ही समर्थांनीं दिलेल्या दगडांचें सोनें झाल्याची अद्‌भुत गोष्ट आहे.

**( २९ ) शिवाजीमहाराजांस बीरवाडीस स्वप्नीं प्रसाद देऊन समर्थ अदृश्य झाल्याची अद्‌भुत कथा. ( शके १५९७ ).** एकदां शिवाजीमहाराज बीरवाडीस असतांना त्यांच्या तळहातास बागचवड्याची व्यथा झाली व असह्य वेदना होऊं लागल्या. तेव्हां महाराजांनीं समर्थांचें स्मरण केलें, तेव्हां वेदना कमी होऊन महाराजांना झोंप लागली. त्या वेळीं समर्थ शिवथर येथें होते. बीरवाडी व शिवथरमध्यें नद्या, ओढ्यांना पावसामुळें पूर आला होता, अशी स्थिती होती तरी समर्थ अकस्मात् महाराजांच्या पलंगापाशीं आले व चमत्काररूपें स्वप्नांत दर्शन देऊन अदृश्य झाले. दुसरे दिवशीं शिवथर येथें सुंदरमठांत महाराजांची व समर्थांची प्रत्यक्ष भेट झाली. अशी ही महाराजांना समर्थांनीं स्वप्नांत दर्शन दिल्याची अद्‌भुत गोष्ट आहे.

**( ३० ) प्रतापगडच्या देवीनें समर्थांना आपल्या गळ्यांतील मोत्याचा हार घातल्याची अद्‌भुत गोष्ट ( शके १६०० ज्येष्ठ ).** समर्थांना एकदां

नायटा झाला. समर्थांच्या मातोश्रींनीं देवीला एक नवस मागून घेतला होता. तो फेडण्याचा राहिला आहे असें समर्थांना वाटून ते एक सुवर्ण पुष्प घेऊन मध्यरात्रीं प्रतापगडच्या देवीच्या देवळांत गेले. समर्थ जातांच कुलूप घातलेलीं दारें एकदम उघडलीं. समर्थांनीं देवीच्या चरणांवर मस्तक ठेवून सुवर्ण पुष्प वाहिलें. देवीनें समर्थांच्या गळ्यांत आपल्या गळ्यांतील हार घालून वर मागण्यास सांगितलें. तेव्हां समर्थांनीं पुढील वर मागितला. "तुझा तूं वाढवी राजा। शीघ्र आम्हांचि देखतां ॥ दुष्ट संहारिले मागें ऐसें उदंड ऐकतों। परंतु रोकडें कांहीं मूळ सामर्थ्य दाखवी ॥ १ ॥" नंतर समर्थ रात्रींच चाफळास परत गेले. दुसरे दिवशीं देवीच्या गळ्यांत मोत्यांचा हार नाहीं म्हणून बोभाटा झाल्याचें समर्थांना अंतर्ज्ञानानें कळलें तेव्हां समर्थांनीं तो हार कल्याणस्वामींमार्फत महाराजांकडे पाठविला. हार महाराजांना देऊन कल्याण समर्थांकडे परत आले. पाठोपाठ महाराज ही तो हार व कांहीं जवाहीर घेऊन समर्थांकडे आले व समर्थांना व श्रेष्ठांच्या मुलांना घेऊन प्रतापगडास गेले. अशी ही समर्थांच्या गळ्यांत देवीनें हार घातल्याची अद्भुत गोष्ट आहे.

## भाग १४ वा

# समर्थशतकांतील संत, कवि व त्यांचें कार्य

जो जाणेल भगवंत । तया नांव बोलिजे संत ।
जो शाश्वत आणि अशाश्वत । निवाडा करी ॥

दासबोध ( ६. १. १६ )

जो जनामधें वागे । परी जनावेगळी गोष्टी सांगे ॥
ज्याचे अंतरीं ज्ञान जागे । तोचि साधु ॥

दासबोध

जेणें ज्ञान हें प्रबळे । जेणें वृत्ति हे मावळे ॥
जेणें भक्तिमार्ग कळे । या नांव कवित्व ॥

दासबोध ( १४. ३. ४१ )

जेणें सद्‌बुद्धि लागे । जेणें पाषांड भंगे ॥
जेणें विवेक जागे । या नांव कवित्व ॥

दासबोध ( १४. ३. ११ )

**काव्यं यशसेऽर्थकृते व्यवहारविदे शिवेतरक्षतये**
**सद्यः परनिर्वृत्तये काव्यं रसात्मकं वाक्यम् ॥** काव्यप्रकाश—मम्मट

या भागांत आम्हीं 'समर्थशतकांतील संत, कवि व त्यांचें कार्य' या विषयावर लिहिण्याचें योजिलें आहे. समर्थांची इहलोकींची यात्रा शके १५३० पासून शके १६०३ पर्यंत होती. परंतु या भागांत आम्ही सबंध सोळाव्या शतकांतील प्रमुख संतांचीं व कवींचीं अल्प चरित्रें देणार आहों. श्रीएकनाथप्रभृति कांहीं संतकवींचा जन्म सोळाव्या शतकाच्या पूर्वी झाला होता, तरी त्यांचीं अल्प चरित्रें व कांहीं कवि १६व्या शतकाच्या अखेर जन्म पावून सतराव्या शतकाच्या प्रारंभीं इहलोक सोडून गेले त्यांचीं ही अल्प चरित्रें आम्ही देणार आहों. म्हणजे स्थूल मानानें मालोजीराजे, शहाजीराजे, शिवाजीमहाराज, संभाजीमहाराज व राजाराममहाराज यांच्या कारकीर्दींत जे संत व कवि होऊन गेले, त्यांपैकीं प्रमुख संत व कवि यांचीं चरित्रें आम्ही देणार आहों व नंतर शेवटीं त्यांच्या कार्याविषयीं विवेचन करणार आहों. गिरिधरस्वामींनीं समर्थप्रतापांत ( अध्याय १६।१७ ) समर्थांच्या पंक्तीस जसे कांहीं प्रसिद्ध महापुरुष बोलाविले आहेत, तसे

आम्हीं ही या समर्थचरित्रांत कांहीं महापुरुष समर्थांच्या पंक्तीस बोलाविले आहेत. विस्तारभयास्तव समर्थशतकांतील सर्व संतकवींना आमंत्रणें दिलीं नाहींत. कित्येक वाचकांच्या आवडीचे कांहीं संत कवि राहिले असल्यास त्यांनीं क्षमा करावी.

( १ ) **श्रीएकनाथस्वामी**:—एकनाथस्वामी हे महाराष्ट्रांतील अत्यंत सुप्रसिद्ध व लोकप्रिय संत-कवींपैकीं आहेत. श्रीज्ञानेश्वर, श्रीएकनाथ, श्रीतुकाराम, श्रीरामदास या संत-कवींच्या ग्रंथांना महाराष्ट्रांतील लोक वेदतुल्य मानतात. यांपैकीं श्रीज्ञानेश्वर व श्रीरामदास हे ब्रह्मचारी होते व श्रीएकनाथ व श्रीतुकाराम हे गृहस्थाश्रमी होते. एकनाथस्वामींचीं अनेक चरित्रें लिहिलेलीं आहेत; त्यांतील प्रमुख येणेंप्रमाणें:—( १ ) एकनाथपरंपरेंतील केशवकृत श्रीएकनाथचरित्र, ( २ ) महिपतीबाबाकृत भक्तलीलामृतांतील एकनाथचरित्र, हीं दोन चरित्रें पद्यात्मक आहेत; ( ३ ) श्री. सहस्रबुद्धेकृत एकनाथचरित्र; ( ४ ) ह. प. ल. रा. पांगारकरकृत एकनाथचरित्र, ( ५ ) कै. श्री. भावेकृत महाराष्ट्र-सारस्वतांतील एकनाथचरित्र, ( ६ ) श्री. ज. र. आजगांवकरकृत श्रीएकनाथमहाराजांचें चरित्र, हीं गद्यात्मक आहेत.

एकनाथमहाराजांचा जन्म शके १४७० सालीं पैठण येथें झाला व त्यांनीं शके १५२१ सालीं समाधि घेतली. इ. स्वा. च्या बखरींत व सहस्रबुद्धेकृत चरित्रांत शके १५२१ हा नाथांचा समाधिकाल दिला आहे व १८५८ च्या नवनीतांत शके १५४६ हा समाधिकाल दिला आहे. परंतु एकनाथांच्या समाधिमंदिरावरील श्लोकावरून शके १५२१ सालीं फाल्गुन वद्य षष्ठीस नाथ समाविस्थ झाले असें विश्वसनीय पुराव्यावरून ठरतें. पैठण येथें भानुदास नांवाचे एक सुप्रसिद्ध भगवद्-भक्त होऊन गेले. ते देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होते. विजयानगर येथें नेलेली पंढरपूर येथील श्रीविठ्ठलमूर्ति या भानुदासांनीं पुन्हा पंढरपूर येथें आणिली. त्यांचे पुत्र चक्रपाणी, त्यांचे पुत्र सूर्यनारायण व त्यांचे पुत्र एकनाथस्वामी. नाथांच्या आईचें नांव रुक्मिणी. नाथांचे आईबाप लहानपणींच वारले. त्यांचें सर्व शिक्षण त्यांचे आजे चक्रपाणी यांचे हातून झालें. त्यांची मुंज ६ व्या वर्षीं झाली. त्यांची बुद्धि तीव्र असल्यामुळें ब्रह्मकर्माचें अध्ययन लवकर झालें. नंतर त्यांना देवगिरी येथील सुप्रसिद्ध देवभक्त जनार्दनस्वामी यांचा अनुग्रह घेण्याविषयीं दृष्टांत झाला. नाथ जनार्दनस्वामींकडे गेले व शके १४८० सालीं त्यांनीं स्वामींपासून अनुग्रह घेतला. ज्ञानेश्वरी व अमृतानुभव या ग्रंथांचें अध्ययन नाथांनीं गुरूंपाशींच केलें. गुरूंच्या आज्ञेवरून नाथांनीं त्र्यंबकेश्वर येथें चतुःश्लोकी भागवतावर मराठींत टीका केली. नंतर गुरूंच्याच आज्ञेवरून पैठण येथें नाथांनीं भागवताच्या एकादश स्कंधावर टीका करण्यास आरंभ केला व ती टीका श्रीक्षेत्र काशी येथें शके १४९५ सालीं श्रीमुखसंवत्सरीं समाप्त केली. नाथांच्या भागवताचे

३१ अध्याय आहेत व ओंवीसंख्या अदमासें २०,००० आहे. हा ग्रंथ नाथकाळीं लवकरच लोकप्रिय झाला व हल्लीं ही तो फार लोकप्रिय आहे. याशिवाय नाथांनीं रुक्मिणी-स्वयंवर, भावार्थ-रामायण, प्रल्हादचरित्र, बालक्रीडा, शुकाष्टक प्रभृति पौराणिक ग्रंथ लिहिले व स्वात्मसुख, आनंदलहरी, गीतासार, मुद्राप्रकाश, आनंदानुभव, हस्तामलक प्रभृति वेदांतपर ग्रंथ लिहिले. यांशिवाय नाथांनीं पदें, अभंग वगैरे केले आहेत. 'भारुड' या नांवाची कविता फारच चटकदार व परिणामकारक आहे. नाथांची कविता ६०,००० होईल. नाथांनीं भावार्थ-रामयण अगदीं वृद्धापकाळीं लिहिण्यास प्रारंभ केला. युद्धकांडाच्या ४४व्या अध्यायानंतर नाथांची प्रकृति फार अशक्त झाली. तेव्हां त्यांच्या आज्ञेवरून त्यांचा शिष्य गावबा यानें ग्रंथ पुरा केला. तो नाथांप्रमाणें उत्तम साधला आहे. ग्रंथलेखना-शिवाय नाथांनीं दोन महत्त्वाचीं कामें केलीं. (१) आळंदी येथील श्रीज्ञानेश्वरांच्या समाधीचा जीर्णोद्धार (शके १५०५) व (२) ज्ञानेश्वरी ग्रंथाचा जीर्णोद्धार (शके १५०६). ज्ञानेश्वरीच्या अनेक हस्तलिखित प्रती नाथकाळीं होत्या व त्यांत कांहीं अपपाठ नक्कल करणारांनीं केलेले असावेत असें दिसतें. त्या सर्व प्रती वाचून नाथांनीं "गीता-ज्ञानेश्वरी प्रति शुद्ध केली." शेवटीं नाथ म्हणतात:—"ज्ञानेश्वरीपाठीं । जो ओंवी करील मऱ्हाठी ॥ तेणें रत्नखचिता ताटीं । जाण नरोटी ठेविली ॥ ५ ॥"

नाथांचा विवाह एका सदाचारी ब्राह्मणाच्या कन्येशीं झाला. नाथांच्या पत्नीचें नांव गिरिजाबाई. या फार सुशील, प्रेमळ असून सर्वकाळ नाथांच्या आज्ञेप्रमाणें वागत असत. या सुशील पत्नीच्या सहवासानें नाथांना गृहस्थाश्रम फार सुखदायक झाला. नाथांना हरिपंडित नांवाचा एक मुलगा होता.

नाथांनीं भागवतग्रंथ काशी येथें संपूर्ण केला असें वर सांगितलें आहेच. काशींतील पंडितांनीं नाथांचा फार छळ केला. नाथांनीं भागवत मराठींत लिहिलें म्हणून ते नाथांवर फार रागावले. त्यांनीं नाथांचा मराठी ग्रंथ गंगानदींत फेंकून दिला. नाथभागवताला गंगाजलाचा स्पर्श होण्यापूर्वी श्रीगंगादेवीनें आपल्या रत्नकंकणयुक्त हातांनीं तो वरच्यावर झेलला, अशी आख्यायिका एकनाथ-चरित्रांत दिली आहे.

दौलताबादेस जनार्दनस्वामींचा अनुग्रह झाल्यावर कांहीं दिवस नाथ तेथें होते, त्या वेळीं एकदां दौलताबादेवर परचक्र आलें. ती बातमी जनार्दनस्वामींना कळविण्याकरितां बादशाहाचे नोकर आले. स्वामी प्रातःस्नानसंध्या आटोपून ध्यानस्थ बसले होते. गुरूंचा ध्यानभंग होऊं नये म्हणून नाथांनीं गुरूंचे कपडे अंगावर घालून बादशाहाची गांठ घेतली व गुरूंचीं शस्त्रें घेऊन शत्रूंच्या सैन्यावर हल्ला केला व त्याचा पराभव केला असें वर्णन महिपतीकृत भक्तलीलामृतांत आहे.

यावरून जनार्दनस्वामी व एकनाथस्वामी या उभयतांना युद्धकलेची माहिती होती व प्रसंगविशेषीं ते स्वतः रणांगणावर जाऊन युद्धांत भाग घेत होते असें दिसतें. परंतु त्या वेळीं म्लेंच्छ राज्य होतें तरी स्वराज्यस्थापनेचा प्रयत्न त्यांनीं केल्याचा कोठें उल्लेख नाहीं; व त्यांच्या ग्रंथांत ही बहुजन समाजानें राजकारणांत पडून स्वराज्यस्थापना करण्याविषयीं उपदेश नाहीं. नाथांनीं तीर्थयात्रा बरीच केली. नाशिक, त्र्यंबकेश्वर, काशी वगैरे ठिकाणीं नाथ गेले होते व तेथें त्यांनीं ग्रंथरचना केली. त्या वेळीं वरील ठिकाणीं मुसलमानांचीं राज्यें होतीं. परंतु मुसलमानी सत्तेपासून हिंदु प्रजेला झालेल्या त्रासांचें वर्णन समर्थांप्रमाणें त्यांच्या ग्रंथांत कोठें आढळून येत नाहीं.

( २ ) दासोपंतः—एकनाथकालीन कवींत दासोपंत हे सुप्रसिद्ध आहेत. काशीहून परत येतांना नाथ दासोपंतांचे घरीं कांहीं दिवस राहिले होते. दासोपंतांचा जन्म शके १४७३ सालीं झाला. त्यांच्या बापाचें नांव दिगंबरपंत. ते गाल्वगोत्री देशस्थ ब्राह्मण. ते बेदर प्रांतांत नारायणपेठ गांवीं राहात असत. तेथील ते देशपांडे होते. दासोपंतांच्या आईचें नांव पार्वतीबाई. एका दुष्काळांत दिगंबरपंतांकडून सरकारी सारा वेळेवर पोहोंचला नाहीं म्हणून बादशहानें दासोपंतांस वाड्यांत नेऊन बाटवून मुसलमान करण्याची भीति घातली. परंतु ईशकृपेनें सारा पोहोंचविण्याची व्यवस्था झाल्यामुळें दासोपंतांस न बाटवितां सोडून दिलें. नंतर दासोपंतांचें लक्ष परमार्थाकडे लागलें. ते आंबेजोगाई ( मोमिनाबाद ) येथें राहात असत. यांनीं अनेक ग्रंथ केले आहेत. फक्त गीतेवरच पंतांच्या ५।६ टीका आहेत. सर्वांत मोठी टीका गीतार्णव ही आहे. हिची ग्रंथसंख्या सव्वा लक्ष आहे. मराठींत गीतेवर गीतार्णवाएवढी सविस्तर दुसरी टीका नाहीं. “ व्यासकृत महाभारत लक्षग्रंथ प्रसिद्ध हा भारी ” असें मोरोपंत म्हणतात. महाभारतांतील भीष्मपर्व या एका पर्वामधील भगवद्गीतेवरील दासोपंतांची टीका सव्वा लक्ष आहे. फक्त १८ व्या अध्यायाच्या १६००० ओंव्या आहेत. हा प्रचंड ग्रंथ लिहिण्यास पंतांना वीस वर्षें लागलीं. हा ग्रंथ लिहीत असतांना दासोपंत कडुलिंबाचीं पानें व फळें यांवर राहत असत. या प्रचंड टीकेंत भाष्याच्या आधारानें विवेचन न करितां स्वानुभवानें विवेचन केलें आहे, असें पंत म्हणतात. “ स्वानुभवचि येथींचें प्रमाण । स्वानुभव हेंचि साधन ॥ अन्यत्र शास्त्रश्रवण । तैसें हें नव्हे ॥ १ ॥ ” गीतेवरील टीकेशिवाय त्यांनीं ( १ ) अवधूतराज, ( २ ) ग्रंथराज, ( ३ ) वाक्यवृत्ति, ( ४ ) पंचीकरण, हे वेदांतपर ग्रंथ लिहिले आहेत. पैकीं वाक्यवृत्ति हा ग्रंथ गद्यात्मक आहे. पंतांनीं संस्कृतांत ही कांहीं कविता केल्या आहेत:— ( १ ) उपनिषदर्थप्रकाश, ( दशोपनिषदांवरील भाष्यें ), ( २ ) स्तोत्रें व ( ३ ) अष्टकें. यांशिवाय यांनीं शेंकडों पदें ही केलीं आहेत. यांना ग्रंथरचना करण्यास

दररोज दोन पैशांची शाई लागत असे, अशी आख्यायिका आहे. पंत उत्तम संस्कृतज्ञ होते. यांची भाषा शुद्ध आहे. ते शके १५३७ सालीं माघ कृष्ण अष्टमीस समाधिस्थ झाले. दासोपंतांच्या वेळीं यवनांची सत्ता होती. परंतु त्यांनीं स्वराज्यस्थापनेकरितां बहुजन समाजास ग्रंथद्वारां उपदेश केल्याचा त्यांच्या ग्रंथांत उल्लेख नाहीं. खुद्द त्यांच्यावर बाटवून मुसलमान होण्याचा प्रसंग आला होता. ईशकृपेनें त्यांतून ते सुटले. परंतु असे प्रसंग आपल्या हिंदु बांधवांवर न येण्यास स्वराज्यस्थापनेची आवश्यकता आहे हा विचार त्यांच्या मनांत आला नसावा असें दिसतें.

( ३ ) जनीजनार्दन:—नाथकालीन दुसरे प्रसिद्ध कवि जनीजनार्दन हे होत. यांचा जन्मकाल उपलब्ध नाहीं. नाथांनंतर दोन वर्षांनीं म्हणजे शके १५२३ सालीं यांनीं समाधि घेतली. यांचें जन्मस्थान मौजे बीड. यांचें आडनांव गोसावी. हे विजापूर बादशहाच्या दरबारीं नोकर होते. एकदां दुष्काळ पडला असतां यांनीं सरकारी कोठारांतील धान्य गरीब लोकांना वाटलें. विजापूरचा बादशहा फार रागावला व त्यानें जनीजनार्दनपंतांना देहान्त शिक्षा फर्माविली. परंतु ईशकृपेनें त्या शिक्षेचा अम्मल होण्याचा प्रसंग आला नाहीं. बादशहाच्या कृतीचा जनीजनार्दनांना अत्यंत वीट आला व त्यांनीं स्वत: बादशहाची नोकरी सोडली, इतकेंच नव्हे तर आपल्या वंशांत पुढें कोणीं ही नोकरी करूं नये असा निर्बंध घालून ठेवला. नोकरी सोडल्याबर त्यांनीं सर्व काळ परमार्थांत व ग्रंथरचनेंत घालविला. ‘ महावाक्यविवरण ’ व ‘ निर्विकल्पग्रंथ ’ ग्रंथ प्रसिद्ध आहेत. ‘ निर्विकल्पग्रंथ ’ हा गीतेप्रमाणें संवादरूप आहे. यांत उद्धव प्रश्न विचारतात व त्याचें उत्तर श्रीकृष्ण देतात असा कथाभाग आहे. एकदां यमुनातीरीं श्रीकृष्णउद्धव बसले असतांना एका कावळ्यानें एक बेडूक नेऊन भक्षण केला. तेव्हां उद्धव म्हणतात:— “ शरीरें शरीराचें केलें भक्षण । तरी हें केल्याचें काय पुण्य । तुझे कर्तृत्वीं माझें मन । कंटाळलें श्रीहरी ॥ १ ॥” नंतर श्रीकृष्णानें उत्तर दिलें. त्यानंतर उद्धवानें पुन्हा प्रश्न केला. असा प्रश्नोत्तररूपी हा ग्रंथ आहे. हा ग्रंथ एका कार्तिक एकादशीस यमुनेंत स्नान करून सकाळीं प्रारंभ करून तिसरे प्रहरीं संपविला असें स्वत: कवींनीं सांगितलें आहे.

जनीजनार्दनांना विजापूरच्या बादशहानें गरीब लोकांस दुष्काळांत धान्य वाटल्याबद्दल देहान्त शिक्षा दिली याचा राग येऊन त्यांनीं नोकरी सोडली व आपल्या वंशांत पुढें कोणी ही नोकरी करूं नये असा निर्बंध घातला; परंतु त्यांनीं स्वराज्यस्थापनेकरितां बहुजन समाजास राजकारणांत पडण्याचा उपदेश केल्याचा त्यांच्या चरित्र-ग्रंथांत उल्लेख नाहीं.

वरील तीन प्रसिद्ध संतकवि म्हणजे (१) श्रीएकनाथस्वामी (२) दासोपंत व (३) जनीजनार्दन व नाथकालीन आणखी दोन कवि (१) विठारेणुकानंदन व (२) रामाजनार्दन यांना एकनाथपंचक असें म्हणतात. परंतु शेवटले दोन कवि व त्यांची कविता विशेष प्रसिद्ध नसल्यामुळें आम्हांस त्यांचीं त्रोटक चरित्रें देण्याचें कांहीं प्रयोजन दिसत नाहीं. रामाजनार्दनांची श्रीज्ञानदेवावरील आरती "आरती ज्ञानराजा। महाकैवल्य तेजा॥" ही मात्र महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहे. एकनाथ-पंचकाशिवाय एकनाथकालीं आणखी कांहीं कवि झाले. त्यांपैकीं कांहीं प्रमुखांचीं त्रोटक चरित्रें आतां देतों.

( ४ ) **विष्णुदासनामा:**—मराठी भाषेंत महाभारतांतील अठरा पर्वांवर कविता करणारा हा पहिला कवि मुक्तेश्वरापूर्वी होऊन गेला. ज्ञानेश्वरकालीन नामदेवांहून हा निराळा आहे, हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें. कारण नामदेव स्वतःस केव्हां केव्हां विष्णुदास 'नामा' असें ही म्हणतात. ज्ञानेश्वरकालीन नामदेवाचा गुरु विसोबा खेचर व नाथकालीन विष्णुदासनामाचा गुरु चिंतामणी. विष्णुदास-नामाचें भारत मुक्तेश्वरांना माहीत होतें असें दिसतें. यांच्या भारताची ओवी-संख्या अदमासें २०,००० आहे. यांच्या ग्रंथाच्या प्रती शके १५३० नंतर केलेल्या आहेत. त्यांत फार फरक दिसून येतात. यांचें बुध-भावनी नांवाचें एक छोटेंसें काव्य आहे. हें काव्य दासबोधांतील १४व्या दशकांतील ५व्या समासा-प्रमाणें आहे. यांत अपासून ज्ञपर्यंत अक्षरें घेऊन प्रत्येक अक्षरास एकेक ओवी याप्रमाणें उपदेशपर ओंव्या केल्या आहेत. यांचा मृत्युकाळ सोळाव्या शतकाच्या प्रारंभीं असावा. नक्की वर्ष माहीत नाहीं.

( ५ ) **मृत्यंजयस्वामी:**—हा प्रथम मुसलमान होता. बेदरच्या बहामनी राज्यांतील राजघराण्यापैकीं तो होता. तो प्रथम फार विषयलंपट होता. याला उपरति झाल्याची कथा मनोरंजक आहे. एकदां तो आपल्या स्त्रीसह राजवाड्यां-तील खिडकींत फळें खात होता व साली खालीं टाकीत होता. त्या एका भिका-ऱ्यानें खाल्ल्या, त्याबद्दल त्यानें त्या भिकाऱ्यास शिक्षा केली. "साली खाणाऱ्यास इतकी शिक्षा, तर फळें खाणाऱ्यास केवढी शिक्षा पाहिजे?" असें भिकारी म्हणाला. त्याबरोबर त्यास उपरति झाली व तो भक्तिमार्गांत शिरला. त्यानें सहजा-नंदस्वामींपासून उपदेश घेतला. त्यांनीं त्याचें नांव मृत्यंजय असें ठेविलें. नंतर हा नारायणगांवीं राहूं लागला. याचे पुढील ग्रंथ उपलब्ध आहेत:—( १ ) अनु-भवसार, ( २ ) गुरुलीला, ( ३ ) अमृतसार, ( ४ ) अद्वैतप्रकाश, ( ५ ) सीता-बोध, ( ६ ) पंचीकरण, ( ७ ) स्वरूपसमाधान व ( ८ ) सिद्धसंकेतप्रबंध. यांशिवाय कांहीं अभंग व पदें ही आहेत.

( ६ ) **माधवदास**:–याचा जन्मशक व मृत्युशक माहीत नाहीं. परंतु त्यानें आपल्या दोन ग्रंथांचे समाप्तिशक दिले आहेत, त्यांवरून तो सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेला असें दिसतें. याच्या गुरूचें नांव नारायण व याची कुलदेवता चंडिका. याला गुरूच्या अनुग्रहानंतर काव्यस्फूर्ति झाली. यानें योगवासिष्ठावर व गीतेवर टीकात्मक कविता केली आहे. योगवासिष्ठावरील टीकेस यानें 'लघुवासिष्ठ टीका' हें नांव दिलें आहे. त्यांत १० अध्याय आहेत व ग्रंथसंख्या १००० आहे. ही टीका कवीनें शके १५१४ सालीं संपविली. गीतेवरील टीकेस 'नारायणकीर्ति' असें आपल्या गुरूचें नांव दिलें आहे. ही टीका त्यानें १५२१ सालीं म्हणजे नाथसमाधिवर्षांत तापीकाठीं बृहत्पुरीं संपविली.

( ७ ) **महालिंगदास** :–हा कवि नाथकालांत होता. १५ व्या शतकाच्या अखेर व सोळाव्या शतकाच्या आरंभीं हा होऊन गेला. याचा गुरु रामकृष्णपंत. शिंगणापूरचा शंभु महादेव हें याचें उपास्य दैवत. हा कवि खानदेश जिल्ह्यांत चाळिसगांव तालुक्यांतील गिरणा नदीच्या कांठावरील वाडें या गांवीं राहात असे. ( १ ) पंचोपाख्यान, ( २ ) शालिहोत्र, ( ३ ) विक्रमबत्तिशी हे त्याचे मुख्य ग्रंथ आहेत. यानें आपल्या ग्रंथांत म्लेंच्छसेवा करणाऱ्या ब्राह्मणांचा तीव्र निषेध केला आहे. तो स्वतः सूर्यवंशी विप्र होता, असें त्यानें आपल्या ग्रंथांत लिहिलें आहे. तो वर्णाश्रम धर्माचा फार अभिमानी होता. वर्णाश्रमधर्माची बिघडलेली घडी पुन्हा नीट केल्याशिवाय महाराष्ट्रीय समाजाचा उद्धार होणार नाहीं असें त्याचें मत होतें. त्याच्या ग्रंथांत स्वधर्मप्रीतिप्रमाणें स्वदेशप्रीती ही दिसून येते.

( ८ ) **त्र्यंबकराज** :–यास माधवदास असें ही म्हणतात. हा कवि नाथांशीं अगदीं समकालीन होता. दोघांचे सुप्रसिद्ध ग्रंथ बहुतेक समकालींच लिहिलेले आहेत. त्र्यंबकराजाचा प्रसिद्ध ग्रंथ बालबोध; तो शके १४९४ सालीं लिहिण्यास आरंभ केला व १५०० सालीं संपविला. एकनाथी भागवत शके १४९५ सालीं संपलें. बालबोध हा ग्रंथ कवीस दोनदां लिहावा लागला. हा ग्रंथ प्रथम लिहिला, तेव्हां एका संन्याशास तो फार उत्तम वाटला व त्यानें तो चोरून नेला ! तेव्हां त्र्यंबकराजास तो ग्रंथ पुन्हा लिहावा लागला. या ग्रंथाचे तीन खंड आहेत, व ओंव्या ५००० पेक्षां अधिक आहेत. यांत त्र्यंबकराजानें परमार्थविषय बहुजन समाजास अगदीं सुलभ करून दाखविला आहे.

याच्या आईचें नांव आंबाबाई व बापाचें नांव भैरवपंत. तुळजापूरच्या भवानीदेवीच्या आशीर्वादानें भैरवपंतास तीन पुत्र झाले. त्यांपैकीं त्र्यंबक हा मधला. 'देवीनें' हा पुत्र मदंश आहे व तो योगी होईल असें सांगितलें होतें म्हणून भैरवपंतांनीं त्याचें लग्न केलें नव्हतें. परंतु वडील मेल्यानंतर त्र्यंबकराजांनीं लग्न केलें. यांना चंद्रिकादेवी प्रसन्न झाली होती व तिच्या इच्छेनुरूप यांनीं सिद्धेश्वरसंप्रदायाची

स्थापना केली. महालिंगदासांप्रमाणें हा कवि ही स्वधर्माभिमानी व स्वदेशा-भिमानी होता ( म. म. पूर्वरंग ). महालिंगदासांप्रमाणें हा कवि ही वर्णाश्रम-धर्माचा अभिमानी होता व सर्वांनीं वर्णाश्रमधर्माप्रमाणें वागलेंच पाहिजे अशी त्याची शिकवणूक होती.

(९) कृष्णदास मुद्गलः—एकनाथकालीं तीन कृष्णदास होऊन गेले. त्यांत रामायणकार कृष्णदास मुद्गल हा फार प्रसिद्ध आहे. याच्या बापाचें नांव नृसिंह व गुरूचें नांव कृष्ण. याच्या रामायणापैकीं फक्त युद्धकांडच उपलब्ध आहे. त्याचे ७८ अध्याय आहेत. हा ग्रंथ दहा हजार आहे. रामायणांतील कोणत्या ही कांडा-वर एवढा मोठा विस्तृत ग्रंथ नाहीं. ग्रंथारंभीं मराठी भाषेची योग्यता यानें फार मार्मिकपणानें वर्णिली आहे. " कथापंथी महाराष्ट्र-वचनें । परी तीं रसिकें अति गहनें ।। जैसीं वनमक्षिकांचीं वदनें । मधूतें स्रवती ।। १ ।। नाना संस्कृत हें चंद्रमंडळ । महाराष्ट्र चंद्रिका केवळ ।। संस्कृत स्वातीचें जळ । मराठी मुक्ताफळें ।। २ ।। जैसें दधीचें मंथन केलें । त्यांतून नवनीत निवडिलें ।। तैसें संस्कृतापासून झालें । महा-राष्ट्र-कवित्व ।। ३ ।। इक्षुदंडू रस नायकू । शर्करापुढें तयाचा पाकू ।। गोडीचा विचार अधिकू । रस नायकीं जाणावा ।। ४ ।।"

मराठी राज्यांत प्रत्येक किल्ल्यावर कृष्णदास मुद्गलाच्या युद्धकांडाचीं पारायणें होत असत. या युद्धकांडाच्या पारायणानें अंगांत युद्ध-सामर्थ्य येऊन युद्धांत जय मिळतो अशी तत्कालीन लोकांची भावना होती. रणांगणावर योद्ध्याच्या अंगीं युद्धचैतन्य उत्पन्न करण्याचें सामर्थ्य कृष्णदास मुद्गलाच्या काव्यांत होतें. बहुजन समाजास राजकारणांत पडून स्वराज्यस्थापन करण्याचें सामर्थ्य उत्पन्न करणारें एकादें स्वतंत्र वीररसप्रधान काव्य कृष्णदास मुद्गलांनीं केलें असतें तर फार चांगलें झालें असतें.

( १० ) कृष्ण याज्ञवल्कीः—यानें स्वतः आपल्या ग्रंथांत आपल्या आईचें नांव कमलजा, बापाचें नांव अंबऋषी व गुरूचें नांव अनंत असें दिलें आहे. हा कौंडिण्यगोत्री ब्राह्मण. याचे देवीमाहात्म्य व कथाकल्पतरु हे ग्रंथ उपलब्ध आहेत. कथाकल्पतरु हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. याचा पूर्वार्धच या कवीनें नाशिक येथें लिहिला. त्याचे सात स्तबक आहेत. सातव्या स्तबकाचीच पृष्ठसंख्या २९४६ आहे. यांत पौराणिक कथानकाशिवाय भूगोलवर्णन, खगोलवर्णन, जोतिषशास्त्र, चारी वर्ण व जातींची उत्पत्ति इत्यादि विषय आले आहेत. या कवीच्या व्यापक दृष्टींतून राजकारण कसें सुटलें याचें आश्चर्य वाटतें. हा कवि सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धात विद्यमान होता.

( ११ ) मुक्तेश्वरः—मुक्तेश्वरांचा जन्म शके १५२१ सालीं म्हणजे नाथांनीं ज्या वर्षी समाधी घेतली त्याच वर्षी झाला. नाथांचे हे नातू म्हणजे कन्येचे पुत्र.

त्यांच्या आईचें नांव गोदावरी ऊर्फ गंगा व बापाचें नांव चिंतामणी. त्यांचें गोत्र अत्रि. हे प्रथम पैठण येथें राहत असत. नंतर ते सोनारीस गेले व तेथें त्यांनीं जोशीपणाची वृत्ति संपादन केली. मुक्तेश्वर मौजे तेरवाड येथें वारले. तेथें यांचें वृंदावन आहे व तेथें त्यांची पुण्यतिथि होते. मुक्तेश्वरांचा मराठींतील भारतग्रंथ फार प्रसिद्ध आहे. त्यांनीं अठरा पर्वें लिहिलीं असें म्हणतात. परंतु पांचच पर्वें प्रसिद्ध आहेत:—( १ ) आदिपर्व, ( २ ) सभापर्व, ( ३ ) वनपर्व, ( ४ ) विराटपर्व व ( ५ ) सौप्तिकपर्व. यांनीं रामायण ही रचलें आहे. परंतु तें भारताइतकें सरस नाहीं. तें प्रथम रचलें असावें. परिणतप्रज्ञ झाल्यावर त्यांनीं भारत लिहिलें. इतर कवि व्यासकृत भारतास सोडून वर्णन करतात त्याबद्दल त्यांना मुक्तेश्वरांनीं दोष दिला आहे. "परि हें व्यास-ऋषीश्वरें। कथिलें नाहीं भारतीं ॥" याप्रमाणें अनेक ठिकाणीं त्यांनीं म्हटलें आहे. इतर कवींप्रमाणें कालविपर्यासाचा दोष यांच्या कवितेंत दिसून येतो. सोळाव्या शतकांतील चालीरीतींचें वर्णन मुक्तेश्वरांनीं पांडवकालच्या समाजास लागू केलें आहे. १६व्या शतकांतील पोर्तुगीज, इंग्रज वगैरे परद्वीपस्थ लोक दुष्यंतराजाच्या अंमलाखालीं होते असें वर्णन केलें आहे. महाराष्ट्रकवींपैकीं फक्त ज्ञानेश्वर व एकनाथ यांचा मुक्तेश्वरांनीं गौरवपर उल्लेख केला आहे. ते आपणांस 'महाराष्ट्रासी काव्यगुरु' असें म्हणून घेतात. त्यांचें काव्य श्रेष्ठ दर्जाचें आहे यांत शंका नाहीं. यांच्या काव्यांत श्रृंगारकरुणादि नवरसांचीं अनेक उत्तम उदाहरणें आहेत. यांच्या उपलब्ध पांच पर्वांत आदिपर्व सर्वांत उत्तम आहे.

( १२ ) **रमावल्लभदास**:—या संतकवींचा जन्म शके १५३२ सालीं म्हणजे समर्थांनंतर फक्त दोन वर्षांनींच झाला. यांचे वडील अंबाजीपंत ऊर्फ यमाजीपंत राळेरासकर. हे देवगिरी येथील राजाचे कारभारी होते. त्यांना पुष्कळ दिवस मुलगा झाला नव्हता. नंतर श्रीअंबाबाईचे कृपेनें पुत्र झाला, तेव्हां त्यांनीं हत्तीवरून साखर वांटली. तेच हे पुत्र रमावल्लभदास. त्यांचें मूळचें नांव तुकोपंत होतें. त्यांची मुंज सातवे वर्षी झाली, व लग्न बारावे वर्षी झालें. पुढें त्यांना लढाईवर जाण्याचा प्रसंग आला. त्यांत त्यांना यश मिळालें व लुटींत भागवताच्या एकादश स्कंधावरील एकाजनार्दनाच्या टीकेची पोथी सांपडली. ते ती पोथी नित्य वाचूं लागले. नंतर त्यांना लक्ष्मीधर नांवाच्या साधूनें अनुग्रह दिला, श्रीगोपाळविद्येची उपासना सांगितली व रमावल्लभदास हें नांव ठेवलें. अनुग्रहानंतर बहुधा ते गोदातटीं राहत असत. 'दशकनिर्धार' हा ग्रंथ त्यांनीं वयाच्या तेविसावे वर्षी म्हणजे शके १५५५त लिहिला. त्या वेळीं समर्थांनीं तीर्थयात्रेस नुकता आरंभ केला होता. वरील ग्रंथांत त्यांनीं श्रीकृष्णजन्मकथा वर्णिली आहे. त्यांनीं गीतेवर 'चमत्कारी' नांवाची टीका लिहिली आहे, ती त्यांनीं शके १५५८ सालीं लिहिली. त्यांचा प्रमुख ग्रंथ 'वाक्यवृत्ति.' त्याचा लेखनकाल त्यांनीं दिलेला नाहीं.

हा ग्रंथ शंकराचार्यांच्या बृहद्वाक्यवृत्ति या ग्रंथावर टीकात्मक आहे. यांशिवाय त्यांनीं वैष्णवगीती हा ग्रंथ व कांहीं अभंग व पदें केलीं आहेत. यांची शिष्यपरंपरा गोंवें प्रांतीं आहे. आवडाबाई नांवाच्या यांच्या एक शिष्या होत्या. त्यांचें उपनांव उभयकर. त्यांचा मठ व परंपरा अद्याप कारवार जिल्ह्यांत चंदावर येथें आहे. कै. न्या. चंदावरकर हे त्यांचे वंशज होत. रमावल्लभदासांना अनुग्रहाचे पूर्वी एकदां लढाईवर जाण्याचा प्रसंग आला होता व त्यांना विजयश्री ही मिळाली होती. परंतु त्यांनीं स्वराज्यस्थापनेस स्फूर्तिदायक काव्यरचना केल्याचें आढळून येत नाहीं.

( १३ ) **शिवकल्याणः**—या संतकवींची जन्मभूमि जोगाईचें आंबें. यांच्या वडिलांचें गृहस्थाश्रमांतील नांव त्रिमलपंत व चतुर्थाश्रमांतील नांव नित्यानंद स्वामी. यांनींच शिवकल्याणांना अनुग्रह दिला. शिवकल्याणांचा जन्मशक व समाधिशक सांपडत नाहींत. परंतु त्यांच्या एका ग्रंथाचा रचनाकाल दिला आहे. ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभवावर यांनीं 'नित्यानंददीपिका' हा टीकात्मक ग्रंथ दिला आहे. मागें सांगितलेला कथाकल्पतरूचा कर्ता जो कृष्ण याज्ञवल्की त्याचा मुलगा गोपाळ याच्या सांगण्यावरून यांनीं हा ग्रंथ लिहिला. त्याचा रचनाकाल शके १५५७ हा कवींनीं स्वतः दिला आहे. म्हणजे समर्थांनीं तीर्थयात्रा सुरू करून तीन वर्षे झाल्यावर शिवकल्याणांनीं हा ग्रंथ लिहिला. हा मुख्य व प्रसिद्ध ग्रंथ भागवतांतील दशम स्कंधावरील टीका आहे. तो भारताप्रमाणें जवळ जवळ एक लाख आहे. या ग्रंथाचा रचनाकाल ग्रंथांत दिला नाहीं पण रचनास्थळ दिलेलें आहे. "श्रीपंढरी नामें करूनि । श्रीविठ्ठल महाराजधानी ।। हा ग्रंथ येथें आरंभुनी । संपला येथेंचि ॥ १ ॥" असा या ग्रंथांत उल्लेख आहे. या ग्रंथांत संसारी लोकांना श्रीकृष्ण-अवतारांचें रहस्य उत्तम रीतीनें समजावून सांगून त्यांना प्रवृत्तिमार्गाकडून निवृत्तिमार्गाकडे वळविण्याचा उपदेश केला असून तो उत्तम साधला आहे व मुमुक्षूंना मार्गदर्शक होणारा आहे. शिवकल्याण समर्थांचे अगदीं समकालीन असून त्यांच्या ग्रंथांत प्रवृत्तिमार्गाचें व निवृत्तिमार्गाचें समर्थांप्रमाणें मधुर मीलन आढळून येत नाहीं.

( १४ ) **लोलिंबराजः**—हा कवि शिवकल्याणस्वामींच्या समकालीन होता व यानें ही दशमस्कंधावर टीका केली आहे. याच्या बापाचें नांव दिवाकरभट व उपनांव जोशी. जन्मगांव जुन्नर. याचे वंशज अद्याप तेथें आहेत. हा कवि पूर्ववयांत फार स्वच्छंदी होता. यानें एका तरुण रूपवती यवनीशीं लग्न लावून तिचें नांव रत्नकला असें ठेवलें. ती मेल्यावर याला उपरति झाली व मग हा साधु झाला. यानें सप्तशृंगी भवानीची आराधना केली, तप केलें व नंतर उत्तरवयांत लोकादरास पात्र झाला. पूर्ववयांतील याच्या कवितेंत बीभत्स रस फार आहे. लोलिंबराज कविता फार जलद करी व आपणांस 'कवि पातशहा' म्हणत असे. लोलिंबराज आख्यानांत

तो म्हणतोः—" ज्याची कीर्ति जगत्रयीं प्रगटली मंदाकिनीचे परी। जो एके घटिकांत शंभर नवीं पद्यें विनोदें करी ॥ ज्याला ही 'कवि पातशाह' पदवी विद्वज्जनीं दीधली । तो हा, रत्नकले, तुला विनवितो लोलंदराजः कवी ॥ १ ॥" याचा 'वैद्यजीवन' नांवाचा एक संस्कृत ग्रंथ आहे. त्याचा रचनाकाल शके १५५५ आहे.

( १५ ) शामराजः—यास शामसुंदर ही म्हणत असत. याचें आडनांव आराध्ये. याचा जन्मकाळ नक्की कळत नाहीं. परंतु हा सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेला. शिवकल्याणांप्रमाणें याची कविता फार प्रचंड आहे. भारत, भागवत व रामायण यांतील आख्यानांवर याची टीका आहे. गीतेवर ही याची एक टीका आहे. आश्वलायन सूत्रमाला, नित्यानित्यविचार व ज्ञानोदय सिंधु हे वेदांतपर ग्रंथ यानें लिहिले आहेत. कैवल्योपनिषदावर याचें एक भाष्य आहे. 'पद्यमाला' या ग्रंथांत यानें ज्ञानेश्वरींतील कठीण शब्दांचा अर्थ दिला आहे. यानें कांहीं अभंग व पदें ही केलीं आहेत. दहा श्लोकांचें एक अंबाभवानीस्तोत्र यानें केलें आहे.

आतां समर्थांच्या व त्यांच्या गांठी वऱ्याच वेळां पडल्या होत्या अशा पांच कवींचीं त्रोटक चरित्रें देतों.

( १६ ) श्रेष्ठ व रामीरामदासः—हे समर्थांचे बंधु. यांचें चरित्र पूर्वी भाग २ यांत दिलें आहे.

( १७ ) जयरामस्वामी वडगांवकरः—ह. स्वा. बखरींत जयरामस्वामींचा उल्लेख वऱ्याच वेळां आला आहे. जयरामस्वामींचा जन्म शके १५२१ श्रावण कृष्ण अष्टमीस (गोकुळअष्टमी) दिवशीं झाला. यावरून ते समर्थांपेक्षां नऊ वर्षांनीं वडील होते हें सिद्ध होतें. दासपंचायतनांत समर्थ सर्वांत वडील होते, असा सांप्रदायिकांमध्यें समज आहे तो चुकीचा दिसतो. जयरामस्वामींनीं समाधि शके १५९४ परिधावी नामसंवत्सरीं म्हणजे समर्थांच्या आधीं नऊ वर्षें घेतली. यावरून दोघांची इहलोकींची यात्रा ७३ वर्षेंच होती हें सिद्ध होतें. जयरामस्वामींच्या वडलांचें नांव भिकाजीपंत, गोत्र वासिष्ठ, आडनांव कसरे. ते कात्राबाज मांजणगांवचे देशपांडे. जयरामस्वामींच्या आईचें नांव कृष्णाबाई. जयरामस्वामी लहान असतांनाच त्यांचे वडील वारले व त्यांच्या मातोश्रींनीं गरीबींत त्यांचें पालनपोषण केलें. जयरामस्वामींनीं पंढरपूर येथें मधुकरी मागून विद्याभ्यास केला. श्रीविठ्ठलाची अनन्यभावें सेवा करीत असतां वडगांवच्या कृष्णाप्पास्वामींचा अनुग्रह घेण्याची त्यांना आज्ञा झाली. कृष्णाप्पा शांतलिंगाप्पांचे शिष्य होते. वडगांवच्या मठाची मूळ स्थापना शांतलिंगाप्पांनीं केली. ते जंगम होते म्हणून वडगांवच्या मठास जंगमाचा मठ म्हणतात. कृष्णाप्पांविषयीं बरीच माहिती ह. स्वा.च्या

बखरींत दिली आहे. कृष्णाप्पानें अज्ञानपणें एका न्हाव्याच्या मुलीशीं लग्न केलें. पुढें तिला दिच्या आईनें ओळखल्यानंतर ती माहेरीं गेली. त्याबद्दल ब्राह्मणांनीं कृष्णाप्पांवर बहिष्कार घातला होता ( संतविजय ). कृष्णाप्पांनीं वरील हकीकत जयरामस्वामींना सांगितली व त्यांना दुसऱ्यांकडून अनुग्रह घेण्यास सांगितलें. परंतु जयरामस्वामींचा आग्रह पडल्यावर कृष्णाप्पांनीं त्यांना अनुग्रह दिला. शके १५४५ सालीं कृष्णाप्पांनीं समाधि घेतली. त्या वेळीं ते ज्ञानेश्वरीचा नववा अध्याय वाचीत होते. कृष्णाप्पांच्या समाधीनंतर जयरामस्वामी वडगांवास गोकुळअष्टमीचा उत्सव दरवर्षीं करीत असत. जयरामस्वामींच्या आमंत्रणावरून समर्थ एकदां वडगांवास गोकुळअष्टमीच्या उत्सवास गेले होते. जयरामस्वामी माहुली, जरंडा वगैरे ठिकाणीं समर्थांना भेटण्यास जात असत. जयरामस्वामींनीं समर्थ वडगांवास गेल्या वेळीं एकाचें मृत मूल उठविलें, तेव्हां समर्थांनीं त्यांना असें पुन्हा न करण्यास सांगितलें. जयरामस्वामींविषयीं ह. स्वा.च्या बखरींत कांहीं गोष्टी आहेत, त्या समर्थचरित्रांत योग्य प्रसंगीं थोडक्यांत दिल्या आहेत. जयरामस्वामी कवि होते. त्यांचे ( १ ) सीतास्वयंवर, ( २ ) रुक्मिणीस्वयंवर, ( ओवीसंख्या ४००० ), ( ३ ) अपरोक्षानुभूति व ( ४ ) दशम स्कंधावर टीका ( ओवीसंख्या ९९५९ ) हे मुख्य ग्रंथ आहेत. ज्ञानी भक्तसंवाद, शांतिपंचीकरण इत्यादि लहान स्फुट-प्रकरणें ही त्यांनीं केलीं आहेत. अभंग व पदें ही त्यांनीं पुष्कळ केलीं आहेत. वेदान्तासारखा गहन विषय लोकांना सहज समजेल अशा रीतीनें सांगण्याची कला त्यांना साधली होती. त्यांचें शरीर स्थूल होतें. ते सर्वदा 'श्रीकृष्ण' म्हणत असत.

( १८ ) **रंगनाथस्वामी निगडीकर**:—यांचा ही उल्लेख ह. स्वा.च्या बखरींत बऱ्याच वेळां आला आहे. रंगनाथस्वामींचा जन्म शके १५३४ सालीं झाला. त्यांच्या वडिलांचें नांव बोपाजीपंत. आश्रम घेतल्यानंतर ते आपणांस 'निजानंद' म्हणवीत असत. रंगनाथस्वामींच्या आईचें नांव बयाबाई. रंगनाथांची पितृपरंपरा:—( १ ) राघोपंत, ( २ ) दत्तात्रयपंत, ( ३ ) रंगोपंत, व ( ४ ) बोपाजीपंत. राघोपंत हे माध्यंदिन शाखेचे वासिष्ठगोत्री ब्राह्मण. त्यांचें नांव खडके. हे विजापुरीं आदिलशाहीच्या दरबारांत शिपाईगिरी करून असत. रंगनाथांची गुरुपरंपरा:—( १ ) सहजानंद, ( २ ) पूर्णानंद, ( ३ ) निजानंद व ( ४ ) रंगनाथ. चवदा वर्षांचे असतांना ते बदरिकाश्रमास गेले व तेथें विद्याभ्यास करून परत घरीं आले. नंतर वडिलांनीं त्यांना अनुग्रह दिला व स्वतः कऱ्हाड येथें कृष्णा-कोयनेच्या प्रीतिसंगमावर जलसमाधि घेतली. नंतर रंगनाथस्वामी निगडी येथें राहूं लागले. त्यांना लहानपणापासून शिपाईगिरीचा नाद असे. त्यांच्यापाशीं लंगोटबंद शिष्यसमुदाय असे. संचारास गेले म्हणजे ते त्यांना घेऊन राजाच्या थाटाप्रमाणें निघत असत. एकदां अशा थाटानें ते समर्थांस भेटण्यास साताऱ्यास गेले, तेव्हां

शिवाजीमहाराजांना त्यांच्या साधुत्वाविषयीं शंका आली. तिचें निवारण समर्थांनीं केलें ती गोष्ट 'अद्भुत गोष्टी' या भागांत दिली आहे. रंगनाथस्वामी घोड्यावर बसण्यांत पटाईत असत. त्यांचा 'मनोहर' नांवाचा घोडा होता, त्यावर बसून ते एकदां भागानगराहून एका दिवसांत वडगांवास गोकुळअष्टमीच्या उत्सवास गेले होते. त्यांनीं बऱ्याच कविता केल्या आहेतः—( १ ) गुरुगीता, ( २ ) सुदामचरित्र, ( ३ ) शुकरंभासंवाद, ( ४ ) पंचीकरण, ( ५ ) भानुदासचरित्र, ( ६ ) योगवासिष्ठसार व ( ७ ) गजेंद्रमोक्ष. गजेंद्रमोक्षीं त्यांनीं सवाई वृत्तांत रचला आहे. तो फार लोकप्रिय आहे. कंठ मधुर असून समर्थांजवळ कीर्तन करणारे पालीचे रंगनाथस्वामी हे निगडीकर रंगनाथस्वामींहून भिन्न होत. रंगनाथस्वामींनीं शके १६०६ सालीं रक्ताक्षीनाम संवत्सरीं मार्गशीर्ष कृष्ण दशमी दिवशीं समाधि घेतली.

( १९ ) **केशवस्वामी भागानगरकर** :—केशवस्वामी हे भागानगर ( दक्षिण हैदराबाद ) येथें राहत असत. हल्लीं तेथें त्यांचा मठ नाहीं. त्यांचे शिष्य रंगारी लोकांत फार आहेत. निजामशाही स्थापन होण्यापूर्वी म्हणजे सन १७२४ पूर्वी केशवस्वामींचा मठ तेथें होता असें म्हणतात. केशवस्वामींनीं समाधि भागानगर येथेंच घेतली. सुलेमाज्याच्या बागेपलीकडे मुसा नदीच्या कांठीं एका शेतांत केशवस्वामींचें समाधिवृंदावन होतें. आतां तेथें कांहीं नाहीं. समाधीच्या सर्व बाजूंची जमीन यवनांच्या मालकीची झाली आहे. समाधीचे दगड लोकांनीं काढून नेले आहेत. प्रत्यक्ष पादुका ही ठिकाणावर नाहींत.

केशवस्वामींच्या वडिलांचें नांव आत्मारामपंत. ते कल्याणी येथील कुळकर्णी होते. त्यांच्या आईचें नांव गंगाबाई. त्यांना ८०व्या वर्षी केशवस्वामी हे पुत्र झाले. ( भक्तमंजरी ) केशवस्वामींनीं काशिराजांचा अनुग्रह घेतला होता. केशवस्वामींचें 'एकादशचरित्र' नांवाचें एक स्फुट काव्य आहे. त्यांचीं पदें व अभंग हीं प्रसिद्ध आहेत. हैद्राबाद येथें रंगाऱ्यांच्या घरीं केशवस्वामींच्या कवितेचीं बाडें अद्याप सांपडतात. त्यांच्या शिष्यांनीं ही बऱ्याच कविता केल्या आहेत. शिवराम व बसंतराम त्यांचे शिष्य होते. त्यांच्या बऱ्याच कविता प्रसिद्ध आहेत. केशवस्वामींनीं शके १६०४ सालीं दुंदुभिनाम संवत्सरीं गुरुवारीं पौष शुद्ध त्रयोदशी दिवशीं समाधि घेतली. केशवस्वामींनीं एकदां आपल्या शिष्याबरोबर समर्थांना कविताबद्ध पत्र देऊन त्यांच्याकडे पाठविलें होतें. समर्थांनीं त्याच शिष्याबरोबर केशवस्वामींना कविताबद्ध उत्तर पाठविलें व नंतर स्वतः आपण त्यांना भेटण्यास भागानगरास गेले.

( २० ) **आनंदमूर्ति**:—आनंदमूर्तींचा उल्लेख ह. स्वा.च्या बखरींत अगर इतर समर्थचरित्रांत फारसा आढळून येत नाहीं. शके १५८८ सालीं समर्थ ब्रह्मनाळास गेले होते, त्या वेळीं आनंदमूर्तींनीं आपले गुरु रघुनाथस्वामी यांची

समाधि समर्थांना दाखविली. त्या वेळीं समाधि-वृंदावन डोलूं लागलें, ही गोष्ट व त्या वेळीं समर्थांनीं केलेलें पद पूर्वी ११ व्या भागांत दिलें आहे. आनंदमूर्ति ब्रह्मनाळ, तालुका तासगांव, येथें राहत असत. तेथें हल्लीं त्यांचा मठ आहे व गांवा-नजीक कृष्णा व वरेळा यांच्या संगमावर आनंदमूर्ति व रघुनाथस्वामी यांच्या समाधि आहेत. दरवर्षी महाशिवरात्रीस तेथें मोठा उत्सव होतो. त्या वेळीं अद्यापि ही रघुनाथस्वामींचें समाधि-वृंदावन डोलतें असें म्हणतात. आनंदमूर्तींच्या वडिलांचें नांव ब्रह्मदेवभट व आईचें नांव सावित्री. आनंदमूर्तींची स्वतंत्र कविता प्रसिद्ध नाहीं. त्यांचीं पदें प्रसिद्ध आहेत. ते कीर्तन करीत असत. त्यांची वाणी रसाळ होती. त्यांच्या मागून कृष्णमूर्ति मठाधिपति झाले. त्यांनीं मठाकरितां बरेंच उत्पन्न मिळविलें. हल्लीं मठाच्या उत्पन्नाची व्यवस्था व उत्सव पंचांमार्फत होतो. आनंदमूर्तींनीं शके १६१६ सालीं कार्तिक शुद्ध १४ दिवशीं समाधि घेतली.

( १ ) समर्थ, ( २ ) जयरामस्वामी, ( ३ ) रंगनाथस्वामी, ( ४ ) केशव-स्वामी व ( ५ ) आनंदमूर्ति, या पांच संतकवींना 'दासपंचायतन' असें म्हणतात. शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनेच्या कालांत हे सर्व कवि झाले; परंतु समर्थांप्रमाणें दासपंचायतनांतील इतर चार संतकवींनीं आपल्या काव्यांत अगर अभंगांत किंवा पदांत राजकारणाचा उपदेश केलेला नाहीं.

आतां प्राचीन समर्थचरित्रग्रंथांत समर्थांशीं संबंध आल्याविषयीं ज्यांचा उल्लेख आहे अशा दोन महाकवींचीं त्रोटक चरित्रें देतोंः—( १ ) संत-शिरोमणी तुकाराम व ( २ ) कविश्रेष्ठ वामन पंडित.

( २१ ) तुकाराममहाराजः—तुकारामांचीं जुनीं लहान चरित्रें बरींच आहेत. ह. भ. पांगारकर यांनीं तुकाराममहाराजांचें सविस्तर व उत्कृष्ट चरित्र लिहिलें आहे. तुकारामांच्या जन्मशकाविषयीं मतभेद आहे. कै. राजवाड्यांना एका वारकऱ्याजवळ एक वंशावळ सांपडली, तींत १४९० हा जन्मशक दिला आहे. कै. भावे शके १४९९ किंवा कदाचित् श. १५२९ हा जन्मशक असावा असें म्हणतात. ह. प. पांगारकर यांनीं सर्व शकांचें विवेचन करून शके १५३० हा जन्मशक ठरविला आहे. म्हणजे तुकाराममहाराज व समर्थ रामदास या उभयता महाविभूतींचा जन्मशक एकच ठरतो. तुकारामांच्या आजोबांचें नांव कान्हया, वडिलांचें नांव बाल्होबा व आईचें नांव कनकाई. त्यांचें आडनांव मोरे. बाल्होबास तीन पुत्र होते—( १ ) सावजी, ( २ ) तुकाराम व ( ३ ) कान्होबा. तुकाराम-महाराजांना चार पुत्रः—( १ ) संतु, ( २ ) महादेव, ( ३ ) विठ्ठल व ( ४ ) नारायण. नारायणाचा जन्म तुकारामांच्या मृत्यूनंतर लागलीच झाला. तुकारामांच्या पहिल्या बायकोचें नांव रखमाबाई व दुसऱ्या बायकोचें नांव जिजाबाई. पहिली बायको लहानपणींच वारली. जिजाबाई साध्वी होत्या. तुकाराम असतील तेथें

त्यांना भोजन पोहोंचविल्याशिवाय त्या भोजन करीत नसत. परंतु आपल्या पतीचें सर्वकाळ विठ्ठल-भजन त्यांना आवडत नसे. एकनाथस्वामींना पत्नीपासून गृहसुख मिळालें, तसें तुकाराममहाराजांना मिळालें नाहीं. तुकारामांच्या सतराव्या वर्षी त्यांचे आईबाप वारले, वडील भावाची बायको वारली व नंतर तो तीर्थयात्रेस गेला, तेव्हां सर्व प्रपंच त्यांच्या अंगावर पडला. त्यांचा धंदा उदम्याचा होता. व्यापारांत बूड येऊन उदरनिर्वाहाची पंचाईत पडली. संसाराविषयीं त्यांचें मन विटलें व त्यांनीं श्रीविठ्ठल-चरणाचा ध्यास घेतला. देहूंत एक विठोबाचें पडकें देऊळ होतें, तें बांधून तेथें ते भजन करूं लागले. " कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें ॥ " असें ते स्वत: म्हणतात. देहूजवळील भंडारा टेकडीवर जाऊन तेथें एकांतांत त्यांनीं ज्ञानदेव, नामदेव व एकनाथ यांच्या ग्रंथांचीं पारायणें केलीं. स्वप्नांत बाबाजी चैतन्य येऊन त्यांनीं तुकारामांना अनुग्रह दिला. श्रीविठ्ठलांनीं व नामदेवांनीं त्यांच्या स्वप्नांत येऊन नामदेवांची शतकोटि अभंगांची प्रतिज्ञा पुरी करण्यास सांगितलें. तुकारामांची कविता अभंगात्मक आहे. त्यांची कविता सोपी, प्रासादिक व परिणामकारक आहे. ते कीर्तन करीत असत. तुकाराम विद्वान् पंडित नव्हते तरी त्यांना भागवत समजण्याइतकें संस्कृत येत होतें. त्यांनीं आपल्या अभंगांत वेद व वेदांत यांचें उत्कृष्ट प्रतिपादन केलें आहे, म्हणून वामन पंडित त्यांच्याविषयीं म्हणतातः—"जयाची वदे वेद-वेदांत वाणी । म्हणावें कसें हो तया-लागि वाणी ॥ " तुकारामांनीं जातिभेदाच्या तीव्रपणावर, सोंवळयाओंवळयावर व कर्मठपणावर आपल्या अभंगांत मर्मभेदक टीका केली आहे, म्हणून रामेश्वरभट, मंबाजीबुवाप्रभृति कांहीं कर्मठ ब्राह्मणांनीं त्यांचा फार छळ केला; परंतु अखेर तुकाराममहाराजांच्या सात्त्विक वृत्तीचा विजय झाला व वरील ब्राह्मण त्यांना शरण गेले व त्यांचे शिष्य झाले.

तुकारामांनीं स्वतंत्र असा काव्यग्रंथ लिहिला नाहीं. बहुजन समाजाला धर्माचा व नीतीचा उपदेश करण्याकरितां त्यांनीं प्रसंगानुसार अभंगरचना केली आहे. श्री. पांगारकर म्हणतातः—"गीता, भागवत, कांहीं पुराणें, भर्तृहरीचीं शतकें व महिम्नादि स्तोत्रें या संस्कृत व ज्ञानेश्वरी, नाथभागवत, नामदेवकबीरादि संतांच्या उक्ति या प्राकृत भाषेंत प्रगट झालेल्या भागवत धर्ममान्य ग्रंथांच्या सूक्ष्म अध्ययनाचा तुकोबाच्या आचारविचारावर व भाषेवर परिणाम झाला." ( श्रीतुका-रामचरित्र, पान २१८ ) " समर्थ, तुकोबा व शिवराय यांच्या भेटी शके १५६८ ते १५७१ च्या दरम्यान झाल्या असण्याचा पूर्ण संभव आहे. तुकोबा, शिवराय, समर्थ यांचे अवतार वर्णाश्रमधर्माची विघडलेली घडी नीट बसविण्यासाठीं झाले. तुकोबांनीं कलिप्रभावाच्या अभंगांत सर्व वर्ण आचारभ्रष्ट कसे झाले आहेत, हें सांगितलें असून "वर्णधर्म कोणी न धरी विटाळ। घालिती गोंधळ एके ठायीं ॥ "

याप्रमाणें संकराचा निषेध केला आहे. लोकांची दैना धर्मभ्रष्टतेमुळें झाली आहे हें पाहून त्यांना कळवळा येई. लोकांच्या दुःस्थितीबद्दल त्यांना खेद वाटे. स्वधर्माच्या जागृतीस स्वराज्याचा दुजोरा पाहिजे हें त्यांस माहीत होतें. त्यांनीं ‘दया तिचें नांव भूतांचें पालन। आणि निर्दळन कंटकांचें ॥’ याप्रमाणें दयेचें लक्षण केलें आहे. ‘मुख्य हरिकथा निरूपण। दुसरें तें राजकारण’ असें समर्थ ही म्हणतात. सर्वांचें तात्पर्य एकच आहे. ब्राह्मतेज व क्षात्रतेज प्रगट व एकवट झाल्याशिवाय राष्ट्राचा अभ्युदय व निःश्रेयसरूप धर्म उदय पावत नाहीं. शापादपि शरादपि असें उभयविध सामर्थ्य जेव्हां राष्ट्राच्या अंगीं येतें, तेव्हांच राष्ट्रधर्माचा विजय होतो. तुकोबांनीं या दोन कार्यांपैकीं एक कार्य अंगावर घेतलें व तें उत्कृष्ट प्रकारें पार पाडलें. त्याला स्वधर्मीय राजसत्तेचा पाठिंबा पाहिजे होता हें ते जाणून होते. ‘काय करूं देवा ऐसी नाहीं शक्ती। दंडूनी पुढती लावूं वाटे ॥’ असें त्यांनीं म्हटलें आहे. तुकोबांनीं देवाला प्रार्थना केली होती, त्याप्रमाणें त्यांच्या हयातींत घडून आलें. शेवटच्या ३।४ वर्षांत तरी त्यांना स्वराज्यासाठीं धडपडणारा क्षात्रवीर डोळ्यांनीं पाहतां आला. शिवरायांना धर्माविषयीं तसें धर्मप्रसारक साधूंविषयीं जिव्हाळ्याचें प्रेम होतें. साधुसंतांच्या कृपाशीर्वादाचा पाठिंबा असल्यावांचून तुझ्या राजकारणाला यश येणार नाहीं, अशी त्यांना जिजाबाईची व दादाजींची शिकवण होती. त्यांनीं अखेर समर्थांचा समागम केला व त्यांचा उपदेश घेतला ही गोष्ट प्रसिद्धच आहे ” ( श्रीतुकारामचरित्र, पानें ४३६–४३८ ). वरील उताऱ्यांतील ह. प. पांगारकर यांचें मत आम्हांस मान्य आहे. हिंदुधर्मांतील कांहीं लोक स्वाचारविन्मुख झाले, त्यांना ताळ्यावर आणून सन्मार्गं लावण्यास आपणांजवळ दंडशक्ति नाहीं म्हणून तुकारामांनीं देवाची करुणा भाकली. परंतु परधर्मी लोकांनीं हिंदुधर्मांतील देवतांवर, हिंदु स्त्रियांवर व हिंदुधर्मावर जे हल्ले चालविले होते, त्यांना दंड करण्याबद्दल तुकाराममहाराजांच्या अभंगांत देवाची करुणा भाकल्याबद्दल कोठें आढळून येत नाहीं. तुकाराममहाराज आणखी कांहीं वर्षें जगले असते तर समर्थांप्रमाणें महाराष्ट्रधर्म वाढविण्याची व महाराष्ट्रराज्य जिकडे तिकडे करण्याची घोषणा त्यांनीं आपल्या अभंगांतून केली असती असें त्यांच्या कांहीं अभंगांवरून अनुमान काढतां येण्यासारखें आहे. परंतु आमच्या एका विद्वान मित्रांनीं वि. ज्ञा. विस्तारांत म्हटल्याप्रमाणें समर्थ जितके राजकारणी संत होते तितकेच तुकाराममहाराज राजकारणी संत होते, असें म्हणतां येईल असें आम्हांस वाटत नाहीं.

तुकाराममहाराजांच्या वेळीं चिंचवडचे मोरया देव, धामणगांवचे बोधलेबुवा, निरंजनबुवा, पाटगांवचे मौनीबुवा प्रभृति संत होऊन गेले. त्यांची कविता विशेष प्रसिद्ध नाहीं. त्यांनीं आपल्या ईश्वरभक्तीनें व सदाचरणानें बहुजन समाजास भक्तिमार्गास लाविलें.

( २२ ) वामनपंडित:—समर्थांच्या समकालीन दुसरे प्रख्यात कवि वामन पंडित होत. ते महाभगवद्भक्त होते, तरी त्यांची गणना संतकवींमध्यें कां करीत नसत हें समजत नाहीं. त्यांच्या पांडित्यामुळें तर हें झालें नसेल ना? त्यांच्या दोन ठिकाणीं समाधि आहेत. तरी ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास प्रभृति संतकवींप्रमाणें तेथें अगर इतर ठिकाणीं त्यांच्या पुण्यतिथीचा उत्सव मोठ्या समारंभानें साजरा करण्यांत येत नाहीं. त्यांची कविता मात्र त्यांच्या हयातीपासून फार प्रसिद्ध व लोकप्रिय आहे. "सुश्लोक वामनाचा अभंग-वाणी प्रसिद्ध तुकयाची। ओंवी ज्ञानेशाची किंवा आर्या मयूरपंताची ॥" ही आर्या महाराष्ट्रांत सुशिक्षितांमध्यें सर्वांना माहीत आहे. तुकाराम, ज्ञानदेव, एकनाथ व मोरोपंत यांच्या चरित्रांप्रमाणें वामनपंडितांचें सविस्तर चरित्र अद्याप प्रसिद्ध झालेलें नाहीं. वामनपंडितांची कविता अर्ध लाख आहे अशी आख्यायिका आहे. पैकीं तीस हजार कविता प्रसिद्ध आहे. एका यथार्थ-दीपिकेचीच ओंवीसंख्या २२,२६६ आहे. वामनपंडितांनीं आपल्या ग्रंथांत आपलें कुलवृत्त, जन्मकथा वगैरे माहिती दिलेली नाहीं. कांहीं ग्रंथांत अनुग्रहाबद्दल माहिती दिलेली आहे. 'निगमसार' या ग्रंथांत ती माहिती सविस्तर दिली आहे. निगमसाराचा रचनाकाल शके १५९५ असें स्वतः पंडीतच सांगतात. म्हणजे शिवराज्याभिषेकाच्या आधीं एकच वर्ष सदर ग्रंथ पंडितांनीं लिहिला. शिवरायांच्या राज्याभिषेकाच्या वेळीं गागाभट्टादि अनेक विद्वान् पंडित जमले होते; परंतु त्यांत वामनपंडितांचा कोठेंच उल्लेख आढळत नाहीं.

वामनपंडित हे ऋग्वेदी वासिष्ठगोत्री ब्राह्मण. त्यांचें मूळ गांव विजापूर. राजाराम प्रसादी आपल्या भक्तमंजरींत म्हणतात:—"विजापुरीं द्विजोदरीं। जन्मले वामन निर्धारीं ॥ ज्ञान जयाचें वसिष्ठापरी। वासिष्ठ-गोत्री ते जाणा ॥" परंतु "वसिष्ठापरी ज्ञान योगेश्वराचें ॥" हा समर्थांविषयीं श्लोक जसा सर्वतोमुखीं ऐकूं येतो, तशी वरील राजाराम प्रसादींची वामनपंडितांविषयीं अन्वर्थक ओंवी सर्वतोमुखीं ऐकूं येत नाहीं.

वामनपंडितांचें आडनांव 'शेषे'. पंडितांचे वेळीं विजापूर येथें आदिलशाहीचें राज्य होतें. पंडित फार बुद्धिमान् होते. लहानपणीं सुद्धां फारशी भाषेवर त्यांचें प्रभुत्व होतें. तें पाहून विजापूरचा बादशहा त्यांना बाटवून मुसलमान करणार होता. ही बातमी बाल वामनपंडितांस समजतांच ते विजापूर सोडून अन्य प्रांतीं गेले व नंतर काशीक्षेत्रीं अध्ययनास गेले व तेथें अध्ययन संपवून पंडितांच्या सभेंत अजिंक्य पत्रें घेऊन दक्षिणदेशीं परत आले.

काशींतील पंडितांला जिंकून 'पंडित' ही पदवी मिळविली, तरी वामनपंडितांच्या मनाचें समाधान झालें नाहीं. तत्कालीन अनेक साधुसंतांकडे ते गेले. वामनपंडित प्रथम तुकारामांकडे गेले, नंतर त्यांच्या सांगण्यावरून समर्थांकडे गेले. समर्थांनीं

त्यांना बद्रिकाश्रमीं जाऊन तपश्चर्या करण्यास सांगितलें. तेथें तपश्चर्या केल्यावर साक्षात् विष्णूंनीं दर्शन दिलें, परंतु पुन्हा समर्थांकडे जाण्यास सांगितलें. समर्थांनीं पुन्हा त्यांना श्रीशैल पर्वतावर कदलीवनांत श्रीअवधूतमूर्तींकडे पाठविलें. त्यांनीं पुन्हा समर्थांकडे पाठविलें. रामघळींत समर्थांची व पंडितांची गांठ पडली व नंतर पंडितांचें शंकानिरसन होऊन समाधान झालें, अशी कथा ह. स्वा. च्या बखरींत आहे. पंडित समर्थांच्या भेटीस आले होते ही गोष्ट खरी असली, तरी त्यांनीं समर्थांचा अनुग्रह घेतला होता असें दिसत नाहीं. पंडितांना समर्थांचा अनुग्रह झाला असता तर त्यांनीं त्याचा उल्लेख आपल्या ग्रंथांत कोठें तरी केला असता. उलट सच्चिदानंदबावा यतींनीं दर्शन देऊन अनुग्रह दिला असा स्पष्ट उल्लेख अनेक ठिकाणीं आहे, व निगमसारांत त्याचें सविस्तर वर्णन आहे. पंडितांना अनुग्रह दिल्यावर सच्चिदानंदबावा यतींनीं त्यांना पूर्वीं वरुणानें भृगूस शिकविलेली 'भार्गवी वारुणी विद्या' शिकविली व पुढीलप्रमाणें उपदेश केला. "भवभयें येतील शरण। त्यांसि हे विद्येचा उपदेश करणें ।। आपण तरोनि तारणें । हें ज्ञानिया आवश्यक ।। " ( निगमसार ) परंतु पंडितांनीं त्याप्रमाणें करून शिष्यशाखा वाढविल्याचा कोठें उल्लेख नाहीं.

पंडितांनीं अनेक ग्रंथ केले. त्यांतील प्रमुख:–( १ ) समश्लोकी, ( २ ) निगमसार, ( ३ ) यथार्थदीपिका, ( ४ ) वनसुधा, ( ५ ) रासोत्सव, ( ६ ) बालक्रीडा, ( ७ ) राधाविलास, ( ८ ) राधाभुजंग, ( ९ ) कात्यायनीव्रत, ( १० ) प्रियसुधा. यांशिवाय भर्तृहरीच्या शतकांचीं भाषांतरें त्यांनीं केलीं आहेत, तीं उत्तम साधलीं आहेत. पंडितांचे दोन संस्कृत ग्रंथ उपलब्ध आहेत:—( १ ) अनुभूतिलेश व ( २ ) श्रुतिसार.

यथार्थदीपिकादि आध्यात्मिक ग्रंथ लिहिणारे वामनपंडित एक व राधाविलास इत्यादि शृंगारिक ग्रंथ लिहिणारे वामनपंडित दुसरे असें प्रतिपादन करणारा एक पक्ष आहे. श्री. वालकृष्ण अनंत भिडे हे या पक्षाचे अध्वर्यू आहेत. त्यांनीं वामनपंडित ( वृत्त व ग्रंथ ) असा एक विवेचनात्मक छोटा ग्रंथ लिहिला आहे. वामनपंडितांच्या दोन समाधि आहेत, म्हणून दोन वामनपंडित होते असें या पक्षाचें एक म्हणणें आहे. परंतु या म्हणण्यांत विशेष अर्थ नाहीं. एकाच थोर पुरुषाच्या दोन समाधि असणें अशक्य नाहीं. समर्थशिष्य उद्धवगोसावी यांच्या दोन समाधि निरानिराळ्या ठिकाणीं आहेत. यथार्थदीपिका लिहिणाऱ्या वामनपंडितांच्या हातून श्रीकृष्णाच्या शृंगारिक कथा कशा निर्माण होऊं शकतील असें श्री. भिडे म्हणतात. यांत ही विशेष अर्थ आहे असें आम्हांस वाटत नाहीं. कै. भावे यांचें म्हणणें आम्हांस ग्राह्य वाटतें. ते म्हणतात:—"भागवतांतील शृंगारात्मक अनेक कथा खुलवून सांगणारा वामन आणि यथार्थदीपिका लिहिणारा वामन हे एकच पुरुष होत.

हाच वामन रामदासांच्या आश्रितवर्गांत असून त्यानें रामदासांच्या धर्तीवर मनाचे श्लोक, अष्टकें वगैरे रचलीं असणें शक्य आहे." ( महाराष्ट्र सारस्वत, पान २६२ ). कै. भावे यांच्या वरील उताऱ्यांतील उत्तरार्धाचा आम्हांस नीट बोध होत नाहीं. वामनपंडित समर्थांच्या आश्रितवर्गांत होते म्हणजे काय ? पंडित एकदां समर्थांकडे गुरुपदेश घेण्याकरितां गेले होते असें श्री. भिडेसुद्धां कबूल करतात. परंतु पंडित समर्थांचे आश्रित होऊन राहिल्याचा कोठें उल्लेख नाहीं. समर्थांच्या मनाच्या श्लोकांप्रमाणें पंडितांनीं ही मनाचे श्लोक केले आहेत; परंतु तेवढ्यावरून ते समर्थांचे शिष्य अगर आश्रित होते असें म्हणतां येणार नाहीं.

पंडितांची श्रीकृष्णचरित्रावरील कविता व भर्तृहरीच्या शतकांची भाषांतरित कविता फार गोड, सरस व आल्हादकारक आहे. पंडितांची हीच कविता अधिक लोकप्रिय आहे. कित्येक ठिकाणीं भर्तृहरीच्या मूळ संस्कृत श्लोकांपेक्षां पंडितांचा भाषांतरित श्लोक अधिक गोड व सरस वाटतो.

पंडित हे शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनाकालीं हयात असतांना स्वराज्यस्थापनेला प्रोत्साहक उद्गार त्यांच्या विविध कवितेंत कोठें सांपडून येत नाहीं हें आश्चर्य होय. पंडितांच्या कवितेचें सूक्ष्म रीतीनें अध्ययन केलेले श्री. भिडे म्हणतात:—" पंडितांचा काळ म्हणजे महाराष्ट्रानें स्वराज्य स्थापण्याचा अकटोविकट प्रयत्न केला व अखेर यश मिळविलें तो होय. परंतु पंडितांनीं त्याविषयीं कोठें अवाक्षर ही काढलें नाहीं" (पान ४०, वामनपंडित ).

विजापूरच्या बादशहानें पंडितांना बाटवून मुसलमान करण्याचा प्रयत्न केला होता, तो टाळण्याकरितां त्यांना विजापूर सोडावें लागलें. परंतु जुलमी राजसत्ता दूर करावी अशाबद्दल बहुजन समाजाला कविताद्वारां अगर संप्रदायद्वारां त्यांनीं प्रोत्साहनपूर्वक उपदेश केला नाहीं. शिवाजीमहाराजांच्या राज्याभिषेकाच्या वेळीं ते हयात होते. त्यांच्या सारख्या कविश्रेष्ठांनीं त्या इतिहासप्रसिद्ध समारंभाचें रसभरित वर्णन काव्यद्वारां कां केलें नाहीं तें समजत नाहीं.

( २३ ) **रघुनाथपंडित**:—समर्थकालीन कवींमध्यें रघुनाथपंडितांची योग्यता फार मोठी आहे. वामनपंडितांप्रमाणें विविध विषयांवर त्यांनीं अनेक ग्रंथ लिहिले नाहींत. (१) नलदमयंतीस्वयंवराख्यान, (२) रामदासवर्णन, (३) गजेंद्रमोक्ष असे त्यांचे तीनच ग्रंथ उपलब्ध आहेत. महाराष्ट्र वाचकांना नलदमयंतीस्वयंवराख्यानावरून रघुनाथपंडित माहीत आहेत. पंडितांचें सदहू स्वयंवराख्यान फार लहान आहे. त्याचे एकंदर २४२ श्लोक आहेत. ते निरनिराळ्या मधुर वृत्तांत आहेत. पंडितांचें नलदमयंतीस्वयंवराख्यान लहान असून इतकें उत्कृष्ट साधलें आहे कीं, त्यांच्या या एका छोट्या काव्यावरून त्यांची गणना मराठी भाषेंतील उत्तम कवींमध्यें झाली आहे. पंडितांनीं हें स्वयंवराख्यान मूळ संस्कृत नैषध-काव्या-

वर्णन केलें आहे. सदहू आख्यानांत उपमादि अलंकार उत्कृष्ट साधले आहेत. पदलालित्य ही उत्तम साधलें आहे. क्वचित् प्रसंगीं पंडितांनीं क्लिष्ट रचना केली असल्यानें कांहीं श्लोक प्राकृत लोकांना कठीण वाटण्याचा संभव आहे.

'रामदासवर्णना'चे फक्त अकराच श्लोक आहेत. ते पुढें परिशिष्ट ( आ ) यांत दिले आहेत. त्यांत "वंदू निरंतर तया गुरुराजयाला ॥ ( १ ), तो रामदास गुरुवर्य नमोनमोजी ॥ ( ५ ), तो रामदास गुरु तो अमुचा विसांवा ॥ ( ६ ), श्रीरामदास गुरु तो नमिला प्रमोदें ॥ ( ८ ) व श्रीरामदासगुरुवर्णन रूपपद्यें ॥ ११ ॥" अशा पांच श्लोकांत पंडितांनीं समर्थांचें वर्णन 'गुरु' या शब्दानें केलें आहे. समर्थ राजगुरु अगर राष्ट्रगुरु म्हणून कदाचित् पंडितांनीं 'गुरु' म्हणून त्यांचा नामनिर्देश केला असें वाटण्याचा संभव आहे. परंतु ९व्या श्लोकांत, "तो मी स्तवीन निज सद्गुरु वाग्विलासें।" असें स्पष्ट म्हटलें आहे. तेव्हां रघुनाथपंडित समर्थांचे शिष्य होते असें सिद्ध होतें. परंतु समर्थप्रतापांत गिरिधरस्वामींनीं दिलेल्या समर्थशिष्यांत रघुनाथपंडितांचा उल्लेख नाहीं. समर्थ तंजावरास गेल्यावेळीं त्यांनीं तिकडे रघुनाथपंडितांना अनुग्रह दिला असला पाहिजे. दिनकरस्वामींप्रमाणें अनुग्रहानंतर ते चाफळ-सज्जनगडाकडे कधीं आले नसावेत असें दिसतें. 'गजेंद्रमोक्ष' हें पंडितांचें तिसरें स्फुट काव्य. यांत एकंदर ५८ श्लोक आहेत. गजेंद्रास नक्रानें धरिलें तेव्हां त्यानें श्रीविष्णूचा धांवा केला व श्रीविष्णूनें तत्काळ येऊन दोघांचा ही उद्धार केला. ही भागवताच्या अष्टम स्कंधांतील ४थ्या अध्यायांतील कथा पंडितांनीं ५८ श्लोकांत उत्तम रीतीनें वर्णिली आहे. रघुनाथपंडितांचें जन्मगांव अरणी. ते दरिद्री होते व मरणसमयीं वृद्ध होते, असें त्यांच्या पुढील श्लोकावरून दिसतें:—"म्हातारा बहु जाहलों कवण ही त्राता नसे भेटला। भाताची तजवीज तेच उदरीं भाता असे पेटला ॥ हातामाजिं नसेच एक कवडी, हा ताप, आतां हरीं ॥ दातारा, मज वांचवी, सदय हो, मातापिता तूं हरी ॥" नलदमयंतीस्वयंवराख्यानासारखें उत्कृष्ट काव्य रचणाऱ्या कविश्रेष्ठाजवळ वृद्धापकाळीं एक कवडी नसावी इतका श्री-सरस्वतींचा विरोध अन्यत्र क्वचितच आढळेल. अरणीचे ब्राह्मण दरिद्री पण शूर होते असें दिसतें. "कंगाल ते ब्राह्मण आरणीचे ॥ परंतु ते शूर रणांगणींचे ॥" हा श्लोकार्ध त्या प्रांतीं सर्वांच्या मुखीं असतो. स्वत: रघुनाथपंडितांनीं रणांगणावर वीरश्री दाखविल्याचा कोठें उल्लेख नाहीं. कदाचित् त्यांना रणांगणावर जाण्याची संधि मिळाली नसेल; परंतु त्यांनीं स्वराज्यस्थापनेच्या प्रयत्नावर एखादें छोटें स्फुट काव्य ही लिहिलेलें नाहीं याचें आश्चर्य वाटतें. प्राचीन काळच्या एका सुप्रसिद्ध पुण्यश्लोक नृपावर त्यांनीं एक उत्कृष्ट काव्य रचलें; परंतु समकालीन सुप्रसिद्ध पुण्यश्लोक शिवछत्रपतींवर त्यांनीं एखादें स्फूर्तिजनक काव्य लिहिलें नाहीं हें महाराष्ट्राचें व मराठी भाषेचें दुर्दैव होय.

( २४ ) **आनंदतनयः**—आनंदतनय हे रघुनाथपंडितांचे व्याही. पंडितांची मुलगी यांच्या मुलास दिली होती. हे ही मद्रास इलाख्यांतील अरणीगांवचे राहणारे. शहाजीराजे कर्नाटकांत असतांना त्यांना पकडून आणण्याकरितां जे लोक विजापूरच्या बादशाहानें पाठविले होते त्यांत वेदोभास्कर या नांवाचा एक गृहस्थ होता. शहाजीराजे यांस कैद करून विजापुरास नेल्याबर वेदोभास्कर यास अरणी-गांव इनाम मिळाला. वेदोभास्कराबरोबर महाराष्ट्रांतील जे लोक अरणीस राहण्यास गेले त्यांत आनंदतनयकवींचे वडील आनंदराव हे होते. त्यांचे पुत्र गोपाळराव. ते आपणांस आनंदतनय असें म्हणत. हे ऋग्वेदी भारद्वाजगोत्री देशस्थ ब्राह्मण. यांना संस्कृत व फारशी भाषा चांगल्या येत होत्या. त्यांची कविता सोपी व गोड आहे. यांचीं पदें बायकामुलांना फार आवडतात. कीर्तनकार यांच्या कांहीं पदांचा कीर्तनप्रसंगीं उपयोग करितात. " कोण तुझ्या मनास येतो, सांग हो सीते । " हें सीतास्वयंवरावरील पद फार लोकप्रिय आहे. यांचीं अदमासें एक हजार पदें उपलब्ध आहेत. सीतास्वयंवर व राधाविलास हीं त्यांचीं दोन स्फुट काव्यें प्रसिद्ध आहेत. त्यांचें सीतास्वयंवर हें काव्य पाहून त्यांचे व्याही रघुनाथपंडित यांना नल-दमयंतीस्वयंवराख्यान लिहिण्याची स्फूर्ति झाली असें काव्यसंग्रहकार म्हणतात. भक्तमंजरींत यांचा मृत्युशक १६४५ दिला आहे. रघुनाथपंडितांप्रमाणें आनंद-तनय ही फार वृद्ध होऊन वारले असें दिसतें. त्यांच्याप्रमाणें त्यांनीं ही पौराणिक पुण्यश्लोक राजांवर कविता केल्या, परंतु समकालीन असे महाराष्ट्र-राज्य-संस्थापक शिवरायांवर एकादें काव्य केलें नाहीं.

( २५ ) **गोसावीनंदनः**—रघुनाथपंडित व आनंदतनय यांच्याप्रमाणें दक्षिण हिंदुस्थानांतील तिसरे समर्थकालीन कवि गोसावीनंदन हे होत. हे ही अरणी गांवचे राहणारे. यांचें नांव वासुदेव, परंतु काव्यांत हे आपणांस गोसावी-नंदन असें म्हणवितात. यांच्या वडिलांचें नांव गोस्वामी व आईचें नांव नागाई. यांचे ' सीतास्वयंवर ' व ' ज्ञानमोदक ' हे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. यांचीं स्तोत्रें, अष्टकें, पदें व आरत्या ही प्रसिद्ध आहेत.

( २६ ) **अनंत कविः**—आनंदतनयांप्रमाणें अनंत कवीची कविता लोक-प्रिय आहे. याचीं पुढील तीन काव्यें प्रसिद्ध आहेतः—( १ ) सुलोचना-गहिंवर, ( २ ) सुलोचना-आख्यान व ( ३ ) गोपीगीत. हा अनंत कवि मेरुस्वामींचे गुरु समर्थशिष्य अनंत यांहून निराळा आहे. याचें मूळचें गांव सातारा जिल्ह्यांतील मेथवड. यांस समर्थांनीं निलंगावादेस मठ करून दिला. नंतर तो तेथेंच राहत असे. समर्थ-प्रतापांत या अनंत कवीचा उल्लेख नाहीं. रघुनाथपंडित, अनंत कवि-प्रभृति दक्षिण हिंदुस्थानांतील समर्थशिष्यांची माहिती गिरिधरस्वामींना नव्हती असें दिसतें. याचें मुख्य कारण दक्षिण टोकाचे शिष्य चाफळ अगर सज्जनगडास कधीं

येत नसत हें असावें. हा अनंत कवि रामदाससंप्रदायी असून विठ्ठलभक्त ही होता. तो पंढरीची वारी करीत असे. याची १०००।१५०० कविता प्रसिद्ध आहे. या कवीचें गोपीगीत हें काव्य फार प्रसिद्ध आहे. सुलोचनागहिंवर व सुलोचनाख्यान हीं काव्यें अनुक्रमें शके १६४३ व शके १६४५ या वर्षी त्यानें संपविलीं. तेव्हां हा सतत ५० वर्षे कविता करीत होता असें दिसतें.

(२७) **माधवः**—तंजावर प्रांतांत समर्थांचे राघवस्वामी या नांवाचे शिष्य होते. त्यांचे शिष्य माधव. दक्षिण हिंदुस्थानांत माधवांइतकी कविता कोणीं केली नाहीं. महाभारत हा यांचा सर्वांत मोठा ग्रंथ. त्याचे ९२४ अध्याय आहेत. या प्रचंड ग्रंथलेखनास चार वर्षे लागलीं. (शके १६२५ ते १६२९) कावेरी नदीच्या कांठीं गौरीमयूर या गांवीं श्रीरघुनाथासमोर बसून हा ग्रंथ माधव कवींनीं लिहिला. माधवांचीं रामायणें दोन आहेत. एक ओंवीबद्ध व एक श्लोकबद्ध. यांशिवाय (१) गणेशपुराण, (२) विष्णुपुराण, (३) योगवासिष्ठ, (४) अश्वमेधप्रभृति अनेक ग्रंथ यांनीं लिहिले आहेत.

माधवांशिवाय तंजावर प्रांतांत श्रीरंगपट्टणाच्या आसपास कावेरीतीरीं (१) रघुनाथ, (२) दासानुदास, (३) भगवंत, (४) वैद्यनाथ, वगैरे कवी होऊन गेले. त्यांनीं पौराणिक कथांवर पुष्कळ कविता केली आहे. पण ती विशेष प्रसिद्ध नसल्यामुळें त्यांचीं त्रोटक चरित्रें देत नाहीं. आतां दक्षिण महाराष्ट्रांतील १६व्या शतकांतील कवी संपवून खुद्द महाराष्ट्रांतील आणखी दोन कवींकडे वळूं.

(२८) **नागेशः**—नागेश हा वामनपंडितांचा समकालीन व वामनपंडितां-प्रमाणें श्लोकबद्ध कविता यानें केली आहे. पंडितांची कविता यानें वाचली असावी असें दिसतें. नागेश कवीचें गांव नगर जिल्ह्यांतील भिंगार हें होय. याच्या बापाचें नांव मोर जोशी व आईचें नांव जानकी असें हा कवि आपल्या 'चंद्रावळी' काव्यांत म्हणतो. याची बरीच कविता प्रसिद्ध आहे. (१) सीतास्वयंवर, (२) चंद्रावळी, (३) रुक्मिणीस्वयंवर, (४) रसमंजरी, (५) शारदाविनोद हे नागेश कवीचे प्रमुख ग्रंथ आहेत. नागेश विद्वान् नव्हता, परंतु त्यास काव्य करण्याची सहजस्फूर्ति होती. याला एका खुशालचंद श्रीमंताचा आश्रय होता. याच्या काव्यांतील अश्लीलतेचें व असभ्य वर्णनाचें हें एक कारण असावें. याची कांहीं विनोदी कविता लोकप्रिय आहे. "गणेश बोले बहु आदरानें । उंदीर नेला मुनि-मांजरानें ।।" हा श्लोक कीर्तनांत हरिदास आवडीनें म्हणून दाखवितात.

(२९) **विठ्ठलः**— हा कवि ही वामनपंडितांचा समकालीन होता. हा ऋग्वेदी कौशिकगोत्री ब्राह्मण. याचें संपूर्ण नांव विठ्ठल अनंत क्षीरसागर. हा व्यापारी होता. हा पंढरीची वारी करीत असे. याचे पुढील ग्रंथ प्रसिद्ध आहेतः—(१) रुक्मिणीस्वयंवर, (२) पांचालीस्तवन, (३) सीतास्वयंवर,

( ४ ) रसमंजरी, ( ५ ) द्रौपदीवस्त्रहरण, ( ६ ) विद्वज्जीवन व ( ७ ) बिल्हणचरित्र. हे सर्व ग्रंथ शके १५९६ ते १६०२ या कालांत लिहिले आहेत. परंतु या कालां-तील अत्यंत महत्त्वाची जी गोष्ट शिवराज्यारोहण तीबद्दल काव्य लिहिण्याची विठ्ठल कवीस स्फूर्ति कां झाली नाहीं हें समजत नाहीं.

याच्या काव्यांत शब्दकौशल्य फार आहे. परंतु याचें शब्द-भांडार मर्यादित आहे. एका काव्यांतले चरण केव्हां केव्हां दुसऱ्या काव्यांत घेतलेले आहेत. रसमंजरी व बिल्हणचरित्र हीं दोन संस्कृताचीं भाषांतरित काव्यें आहेत; पण तीं चांगलीं साधलीं आहेत. यांशिवाय शंकराचार्यकृत 'सौंदर्यलहरी'चें भाषांतर या कवीनें केलें आहे. विठ्ठल कवीची कांहीं कूट कविता ही आहे. पहिल्या तीन चरणांत आपलें कूट अगर कोडें सांगून शेवटच्या चरणांत, "बोले बिठ्ठल हा पदार्थ उमगा षण्मासचा बायदा" ॥ असें हा कवि आव्हान देतो.

( ३० ) देवदास:—हे देवदास चैतन्यशिष्य. दादेगांव मठाधिपति समर्थ-शिष्य देवदासाहून हे भिन्न होत. यांचें कुलदैवत व्यंकटेश. या देवदासांचें 'व्यंक-टेशस्तोत्र' हें समर्थांच्या मनोबोधाप्रमाणें आबालवृद्धांच्या तोंडीं आहे. किंबहुना व्यंकटेशस्तोत्र नित्य पठण करणारे लोक मनोबोध नित्य पठण करणाऱ्यांपेक्षां महाराष्ट्रांत अधिक आहेत असें आम्हांस वाटतें. यांनीं भगवद्गीतेवर एक ओंवीबद्ध टीका केली आहे. यांची एक संतमालिका ही प्रसिद्ध आहे. "अशाच वीर-मालिका ही अवश्य असावयास पाहिजे होत्या" असें कै. भावे म्हणतात ( महाराष्ट्र-सारस्वत, पान २५६ ). या देवदासांचीं कांहीं पदें ही प्रसिद्ध आहेत.

( ३१ ) मुकुंद:—दत्तमुद्रांकित हा भारद्वाजगोत्री, त्रिप्रवरी, यजुर्वेदी ब्राह्मण. याच्या बापाचें नांव नारायण, आईचें नांव साखराबाई. याची पांचव्या वर्षी मुंज झाली, सातव्या वर्षी लग्न झालें व नंतर लवकरच याचा बाप वारला. नंतर तो खानदेश जिल्ह्यांत जैतापूर येथें राहण्यास गेला. शके १६२३ सालीं त्याला स्वप्नांत अनुग्रह झाला. दहा वर्षे एका राजाच्या पदरीं नोकरी केल्यावर याला संसाराचा वीट आला व नंतर त्यानें तीर्थयात्रा केली. पुढें कांहीं वर्षें औरंगजेबाचा मुलगा मोअ-ज्जीम याचे पदरीं यानें नोकरी धरली व नंतर ती नोकरी सोडून पुन्हा तीर्थयात्रा केली. यानें आपल्या तीर्थयात्रेचें वर्णन केलें आहे. याला अनेक भाषा येत होत्या व त्यांत त्यानें कविता केली आहे. याच्या तीर्थयात्रेच्या आधीं कांहीं वर्षे औरंगजेबानें काशीचें पवित्र विश्वनाथाचें मंदिर पाडून तेथें मशीद बांधली होती. परंतु त्याचें हृदयद्रावक वर्णन यानें केलेलें नाहीं. कदाचित् औरंगजेबाच्या मुलाच्या पदरीं कांहीं दिवस नोकरी केल्याचा हा परिणाम असेल.

( ३२ ) मुकुंद:—'सातारकर ताराबाईचा अंकित' असें या कवीस कै. भावे महाराष्ट्र-सारस्वतांत म्हणतात ( पान २८६ ). कोल्हापूर गादीच्या संस्थापक

महाधोरणी ताराबाईराणीसाहेब या प्रसिद्ध आहेत. सातारकर ताराबाई या कोण याचा खुलासा श्री. भावे यांनीं केलेला नाहीं. ताराबाईचे सावत्र पुत्र संभाजी-महाराज यांनीं कोल्हापूरची गादी बळकावल्यावर त्या सातान्यास शाहुमहाराजां-पाशीं येऊन राहिल्या होत्या, म्हणून त्यांना सातारकर ताराबाईचा आश्रित असें म्हटलें असण्याचा संभव आहे. कसें ही असलें तरी या मुकुंद कवीस राजाश्रय होता. याच्या बापाचें नांव यादव व गुरूचें नांव विठ्ठल. सुप्रसिद्ध एकनाथ-स्वामींचा हा शिष्य. यानें अनेक-देवतांवर स्तोत्रें व अष्टकें केलीं आहेत. याची एक संतमालिका प्रसिद्ध आहे. या कवीस राजाश्रय असतां यानें संतमालिकेप्रमाणें वीरमालिका कां रचली नाहीं हें कळत नाहीं.

(३३) काशी कवी:—यानें आपल्या ग्रंथांत आत्मचरित्र बरेंच दिलें आहे. याच्या बापाचें नांव अबचितराव. गोत्र अत्रि व आडनांव सोळंखी. यांनीं नाशिक जिल्ह्यांत 'भारम' नांवाचें गांव वसविलें तेथेंच ते राहात असत. नंतर या गांवाजवळ गोपाळगिरि नांवाचा किल्ला होता तो किल्ला जबरीनें हस्तगत करून तेथें उभयता पितापुत्र राहूं लागले. पुढें मोगल सैन्यानें तो किल्ला घेतला व पितापुत्रांना कैद करून दिल्लीस नेलें. पुढें कांहीं दिवसांनीं दोघांची सुटका झाली. हा कवि महानुभाव पंथाचा अनुयायी होता. याचे ग्रंथ त्या पंथाच्या लोकांत फार प्रसिद्ध आहेत. यानें द्रौपदीस्वयंवरावर दोन काव्यें केलीं आहेत. एक श्लोकबद्ध व एक ओंवीबद्ध. ओंवीबद्ध ग्रंथ अधिक सरस आहे. तो त्यानें शके १६१८ सालीं संपविला. या कवीला युद्धकलेची माहिती होती असें दिसतें. त्यानें दिल्लीहून सुटून आल्यावर पौराणिक कथांवरच काव्यें केलीं. स्वतःच्या वेळीं चाललेल्या स्वातंत्र्य-युद्धावर अगर शिवचरित्रावर त्यानें एकादें स्फुटकाव्य केलें नाहीं.

(३४) शिवरामस्वामी:—यांचा जन्म शके १५५४ मध्यें झाला. त्यांनीं शके १६०१ सालीं समाधि घेतली. दासपंचायतनांतील रंगनाथस्वामींच्या परंपरें-तील हा आहे. हा काश्यपगोत्री ऋग्वेदी ब्राह्मण. याचा पिता व गुरु पूर्णानंद. शिवरामस्वामींचा विद्याभ्यास विजापूर येथें सुप्रसिद्ध विद्वान् रुक्मणापंत यांचे जवळ झाला व ते स्वतःही नामांकित विद्वान झाले. त्यांचें पहिलें लग्न दहावे वर्षीं व दुसरें लग्न चवदावे वर्षीं झालें. शिवरामस्वामींचा मठ व परंपरा अद्याप आहेत. त्यांचे पुष्कळ काव्यग्रंथ उपलब्ध आहेत. त्यांनीं कांहीं गद्य ग्रंथ ही लिहिले आहेत. त्यांनीं भागवताच्या एकादश स्कंधावर टीका केली आहे. त्यांचे बहुतेक ग्रंथ वेदांतपर व भक्तिपर आहेत. "गुरुवाक्याचे निजशेप चाखावया मांजर आजी होऊं ॥ मी येऊं मी येऊं मी येऊं ॥ म्याऊं म्याउं म्याऊं ॥" हें त्यांचें पद लोकप्रिय आहे.

(३५) मुचकुंद:—हा कवि शिवरामस्वामींचा समकालीन होता. सुप्रसिद्ध मुक्तेश्वर कवीची बरोबरी करील इतकी यांची कविता सरस आहे असें श्री. देव

म्हणतात. श्रीभार्गवचरित्र हा यांचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. यांत परशुराम–अवताराचें चरित्र वर्णिलें आहे. अर्थात् हा ग्रंथ वीररसप्रधान आहे. मुचकुंदकवींना वीररसप्रधान काव्य लिहिण्यास पौराणिक कथांतील नायक हुडकावा लागला. खुद्द त्या वेळीं स्वातंत्र्ययुद्धाकरितां हातीं शिर घेऊन लढणारे अनेक वीर होते व त्या सर्वांत महाराष्ट्र-राज्य-संस्थापक रणगाजी छत्रपती शिवाजीमहाराज होते. श्रीभार्गव-चरित्राप्रमाणें मुचकुंदकवींनीं श्रीशिवाजीचरित्र लिहिलें असतें तर त्यांत त्यांना वीररसप्रधान काव्य लिहिण्याची इच्छा द्विगुणित तृप्त करून घेतां आली असती.

( ३६ ) रंगनाथः—हे एकनाथकालीन रंगनाथ समर्थपंचायतनांतील रंगनाथस्वामींहून निराळे आहेत. यांचें गांव मोगरें, हें गोदावरीतीरीं आहे. यांच्या बापाचें नांव आपेराज ऊर्फ आप्पाराव. यांचें गोत्र कपि. यांच्या गुरूचें नांव कृष्णानंद. यांचे पुढील तीन ग्रंथ प्रसिद्ध आहेतः––( १ ) चित्सदानंदलहरी, ( २ ) योगवासिष्ठ व ( ३ ) पंचराज. चित्सदानंदलहरी ही भगवद्गीतेवरील टीका आहे. हिची ग्रंथसंख्या ११,१३४ आहे. योगवासिष्ठाची श्लोकसंख्या ७००० आहे. हा ग्रंथ शके १५३० सालीं म्हणजे समर्थांच्या जन्मसालीं संपविला. पंचरत्न हा ग्रंथ " वेदो नित्यमधीयतां तदुदितं कर्म स्वनुष्ठीयताम् " या श्रीशंकराचार्यांच्या ' सोपानपंचका 'वर आहे. त्याची ग्रंथसंख्या २०३५ आहे.

समर्थकाळीं ज्याप्रमाणें महाराष्ट्रांत अनेक संत-कवी झाले, त्याप्रमाणें कांहीं संत-कवयित्री झाल्या. त्यांपैकीं पांच प्रमुख आहेत.

( १ ) वेणाबाईः–मिरजमठाधिपति. यांचें चरित्र, पूर्वीं 'मठ–महंत व शिष्य ' या भागांत दिलें आहे.

( २ ) अंबिकाबाईः–राजिवडें व वाळवें मठाधिपति. यांचें ही चरित्र पूर्वीं वरील भागांत दिलें आहे.

( ३ ) बयाबाईः–वेणाबाईच्या शिष्यीण व गिरिधरस्वामींच्या गुरु बाईया-बाई यांहून या बयाबाई भिन्न होत. प्रत्यक्ष रामदासस्वामी आपले गुरु असल्याचा या उल्लेख करितात. परंतु यांचा उल्लेख गिरिधरस्वामींच्या समर्थप्रतापांत नाहीं. यांनीं कविता आर्या वृत्तांत केली आहे. यांनीं हिंदी भाषेंत ही कांहीं कविता केली आहे. कै. भावे यांच्याविषयीं म्हणतात–" हिची रचना स्त्रीस्वभावाप्रमाणें कोमल नसून जरा ठसक्याची दिसते. मराठीपेक्षां हिंदी रचना तर अधिक ठसकेदार आहे. " ( म. सा. पान २४१ ) यांच्या कांहीं आर्या मोरोपंतांच्या आर्यांप्रमाणें साधल्या आहेतः–" श्रीमुखचंद्र पाहतां, लवती या पापण्या, न सोसवती ।। स्वसुखें पतिशीं रमतां, त्या समयीं अन्य हे नसो, सवती ।। १ ।। रमतांना एकांतीं द्वैताचा टाकुनी दिला पदर ।। श्रोधरसानें भरुनी निजवदनीं लाबिला असे अधर ।। २ ।। "

( ४ ) बहिणाबाई:—समर्थ रामदासस्वामींप्रमाणें, तुकाराममहाराजांच्या शिष्यवृंदांत कांहीं शिष्यिणी होत्या असें दिसतें. त्या सर्वांमध्यें संत बहिणाबाई या प्रसिद्ध आहेत. वेणाबाईनीं 'सीतास्वयंवर' हें स्वतंत्र काव्य केलें आहे तसें बहिणाबाईनीं स्वतंत्र काव्य केलेलें नाहीं. त्यांनीं अभंग केले आहेत. जनाबाईच्या अभंगांप्रमाणें ते सोपे व प्रेमळ आहेत. त्यांच्या अभंगांत भक्तिरस पूर्ण भरलेला आहे. बहिणाबाईचें एक वैशिष्ट्य असें आहे कीं, कांहीं अभंगांत त्यांनीं आत्मचरित्र दिलें आहे. शेवटीं इहलोक सोडतांना आपल्या मागील बारा जन्मांची हकीकत आपला मुलगा विठ्ठल यास त्यांनीं सांगितली. त्यांच्या आत्मचरित्रपर अभंगांवरूनच आधुनिक चरित्रकारांनीं त्यांचीं चरित्रें लिहिलीं आहेत.

बहिणाबाईचा जन्म शके १५५० सालीं म्हणजे वेणाबाईच्या जन्मवर्षींच झाला. बहिणाबाईच्या वडिलांचें नांव आऊदेव व आईचें नांव जानकीबाई. आऊदेव हे वेरुळनजीकच्या गांवचे कुलकर्णी. ते मानसगोत्री ब्राह्मण होते. देवगांवांतील लक्षतीर्थावर अनुष्ठान केल्यावर आऊदेव यांना एक कन्या व दोन पुत्र झाले. कन्येचें नांव बहिणाबाई असें ठेविलें. बहिणाबाईचें लग्न लहानपणींच गौतमगोत्री पाठक उपनांवाच्या तीस वर्षांच्या बिजवराशीं केलें. त्याचें नांव कोठें दिलेलें नाहीं. सोयीकरितां उपनांवावरून आम्हीं त्यांना पुढें या चरित्रांत 'पाठकपंत' असें म्हटलें आहे. चार वर्षांनंतर भाऊबंदांच्या भांडणामुळें बहिणाबाईच्या आईबापांना देवगांव सोडावें लागलें. त्यांनीं पाठकपंतांना पत्र लिहिलें. त्याप्रमाणें लागलींच ते सर्वांना गोदातीरीं घेऊन गेले. नंतर सिद्धनाथाचें दर्शन घेऊन शंभु महादेव, पंढरपूर, शिंगणापूर येथें जाऊन रहिमतपुरास गेले. ते प्रवासांत भिक्षेवर निर्वाह करीत होते. त्या वेळीं बहिणाबाईचें वय नऊ वर्षांचें होतें. रहिमतपूर येथील रत्नाकर ज्योतिषी यांनीं पाठकपंतांस आपली उपाध्यायपणाची वृत्ति एक वर्ष करण्यास सांगितली व ते काशीस गेले. ते काशीहून परत आल्यावर एक वर्षानें पाठकपंत मंडळीसह कोल्हापुरास गेले. तेव्हां बहिणाबाईचें वय ११ वर्षांचें होतें. तेथें पाठकपंत बहिरंभट नांवाच्या एका विद्वान् अग्निहोत्री ब्राह्मणाच्या घरीं राहिले. बहिरंभटांना एक सवत्स कपिला गाय दान मिळाली, ती त्यांनीं दृष्टांताप्रमाणें पाठकपंतांस दिली. त्या गाईच्या वासराचा बहिणाबाईस फार ळळा लागला. तें वासरूं सर्वकाळ त्यांच्याबरोबर असे. शके १५६१ सालीं म्हणजे समर्थ तीर्थयात्रेहून परत येण्यापूर्वीं पांच वर्षें जयरामस्वामी वडगांवकर कोल्हापुरास येऊन कीर्तन करीत होते. एकदां त्यांच्या कीर्तनास बहिणाबाई गेल्या, त्यांच्यामागून तें वासरूं ही गेलें. लोकांनीं वासरास बाहेर घालविलें. तें ओरडूं लागलें, तेव्हां बहिणाबाई रडूं लागल्या. जयरामस्वामींस ही गोष्ट कळल्यावर त्यांनीं वासरास आणवून कथेंत बसविलें. दुसऱ्या दिवशीं पाठकपंतांस ही गोष्ट कळतांच त्यांनीं बायकोस

बेदम मारलें व तिची . मोट बांधून ठेविली. गायवासरांनीं खाणेंपिणें सोडलें, इतकेंच नव्हे, तर जागेवरुन उठण्याचें ही सोडलें. नंतर चवथ्या दिवशीं वासरूं मेलें. जयरामस्वामींना ही हकीकत कळतांच ते संतमंडळींसह आले व त्यांनीं दिंडीपताकांसह वासराची मिरवणूक काढून त्यास पुरलें. बहिणाबाई या चार दिवस अचेतन पडल्या होत्या. नंतर मध्यरात्रीं स्वप्नांत एक ब्राह्मण आला, त्यानें "सावध होऊन विवेक धरण्यास सांगितलें." नंतर त्यांना पांडुरंग व जयरामस्वामी दृष्टीपुढें दिसूं लागले. पुढें एकदां तुकारामांचे अभंग कीर्तनांत ऐकल्यावर बहिणाबाईंना त्यांचा छंद लागला. सातव्या दिवशीं तुकारामांनीं स्वप्नांत येऊन त्यांना अनुग्रह दिला. बायकोच्या दर्शनास शेंकडों लोक येऊं लागले, याचा पाठकपंतांस राग आला. त्यांनीं घर सोडून वनांत जाण्याचा निश्चय केला व ते सासूसासऱ्यांस म्हणाले, "माझ्या बायकोस तिसरा महिना आहे, तिची काळजी घ्या व तिचें वेड घालवा." पति अरण्यांत जाणार हें पाहून बहिणाबाईंना फार वाईट वाटलें. पाठकपंतांनीं त्यांचा फार छळ केला होता, तरी त्या वेळीं बहिणाबाईनीं केलेले अभंग वाचले म्हणजे बहिणाबाई फार श्रेष्ठ दर्जाच्या पतिव्रता होत्या हें कळून येतें. ते सर्व अभंग वाचकांनीं वाचावे. त्यांतील एकच देतों:—"भ्रतारें वैराग्य घेतलियावरी । जीव हा निर्धारें देईन मी ।। वत्सासाठीं देह अचेतन पडे । हा तंव, रोकडें परब्रह्म ।। भ्रताराचें तीर्थ न सांपडे जरी । पापें माझ्या शिरीं त्रैलोक्याचीं ।। चित्त हें भ्रताराविण जरी जाय। तरी केंवि राहे प्राण माझा ।।१।।" पुढल्या अभंगांत त्या म्हणतातः—"भ्रताराची सेवा पतिव्रता करी । तरी ते उद्धरी उभय कूळें ।।" पाठकपंत अरण्यांत वैतागून निघाले, परंतु ईश्वरी संकेत निराळाच होता. निघण्यापूर्वींच ते फार आजारी पडले. एक महिना ते अन्नाशिवाय होते. बहिणाबाईनीं अहोरात्र पतीची अनन्यभावानें सेवा केली. पांडुरंगाची व तुकोबाची निंदा केली त्याचें हें फल आहे, असें पाठकपंतांना वाटलें व त्यांना पश्चात्ताप झाला. तेव्हां एक ब्राह्मण स्वप्नांत येऊन त्यांना म्हणाला, "तूं स्त्रीचा अंगिकार कर म्हणजे तुझी व्यथा दूर होईल." यापुढें पाठकपंत बहिणाबाईशीं प्रेमळपणानें वागूं लागले. ते दोघे तुकारामांच्या दर्शनासाठीं देहूस गेले. कपिल गाय बरोबर होतीच. उभयतांनीं पांडुरंगाचें दर्शन घेऊन तुकारामांना वंदन केलें. बहिणाबाईंना स्वप्नांत जसें दिसलें, तसें तुकारामांचें प्रत्यक्ष दर्शन त्यांना घडलें. देहूंत असतां या उभयतांचा मंबाजी गोसाव्यानें फार छळ केला. त्यांच्या गाईस कोंडून मारलें; तेव्हां तुकारामांच्या पाठीवर वळ उठले. नंतर मंबाजीचे घरास आग लागली. गाईस बाहेर काढलें, तेव्हां तिच्या आंगावर माराचे वळ लोकांनीं पाहिले. नंतर ती गाय पाठकपंतांस परत दिली. पुढें कांहीं दिवस हें दंपत्य महादजीपंत कुलकर्णी यांचे घरीं राहिलें. त्या काळांत बहिणाबाईस एक मुलगी झाली. तिचें नांव

काशीबाई. कोल्हापुरीं मेलेलें बालक आपल्या पोटीं आलें असें त्यांना वाटलें. नंतर त्यांना एक मुलगा झाला, त्याचें नांव विठ्ठल. ७२व्या वर्षी बहिणाबाईस आपला काळ नजीक आला आहे असें वाटलें. त्यांनीं शिवापुरास विठ्ठलास बोलावून आणलें. "गोदावरीचे कांठीं शुक्लेश्वरक्षेत्रीं तुझ्या समाधीचें स्थळ ठरविलें आहे," असें विठ्ठल बहिणाबाईस म्हणाला. "आतां वेळ नाहीं. शिवापूर हेंही क्षेत्रच आहे, तेव्हां येथेंच आश्विन प्रतिपदेस मी इहलोक सोडणार. हल्लीं उत्तरायण नाहीं, परंतु सद्गुरुकृपा असल्यास व प्रपंचांतून मुक्त झालेल्यास उत्तरायणाची जरूर लागत नाहीं. प्रपंचरत झालेल्या लोकांस सदा दक्षिणायनच असतें." असें त्या म्हणाल्या. बहिणाबाईनीं विठ्ठलास अंतकालच्या अभंगांत आपल्या मागील तेरा जन्मांची हकीकत दिली आहे:—

| जन्माचा अनुक्रम | गांव | जात | वय | पुरुष अगर स्त्री | नांव | बाप | आई | पूर्वजन्मीं पुत्र कोण होता |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | बेशपद | वैश्य | १३ | स्त्री | वारुणी. | केदार | रुपवंती | सेवक |
| २ | कुमचप (फल्गुतीरीं) | ,, | २८ | ,, | ० | सात्विक | ० | गुरुपुत्र |
| ३ | ब्रह्मगिरी (गोदातीरीं) | ,, | २४ | ,, | हेमकला. | वर्धमान. | भामिनी | भाऊ. |
| ४ | ० | गवळी | ० | ,, | ० | ० | ० | ० |
| ५ | ० | ० | ० | ,, | ० | ० | ० | ० |
| ६ | ० | ० | ० | ,, | ० | ० | ० | ० |
| ७ | ० | ० | ६६ | ,, | ० | ० | ० | ० |
| ८ | बेरुळ | क्षेत्री | १८ | ,, | ० | धर्मदत्त | ० | ० |
| ९ | ० | ,, | ९ | ,, | ० | तेधि | ० | ० |
| १० | ० | ब्राह्मण | ४२ | ,, | ० | कौशिक | ० | पहिला पुत्र |
| ११ | प्रवरा-संगम | ,, | ४३ | ,, | सौजन्या. ० | गोकर्ण. | सगुणा | गुरुबंधु पुत्र ० |
| १२ | लाख-खणी | ,, | ३६ | ,, | | रामचंद्र. | जानकी | पुत्र |
| १३ | देवगांव | ,, | ७२ | ,, | बहिणा. बाई | आऊदेव | ,, | ,, |
| | | | ३५१ | | | | | |

[ वरील तक्त्यांत जेथें पूज्य ( ० ) आहे त्या सदराविषयीं मूळ अभंगांत कांहीं माहिती दिलेली नाहीं. या तेरा जन्मांविषयीं कै. प्रो. शि. म. परांजपे यांनीं

चित्रमयजगतच्या स. १९१४ च्या मे महिन्याच्या अंकांत सविस्तर माहिती देऊन पूर्वजन्म व पुनर्जन्माविषयीं सूक्ष्म व मार्मिक विवेचन केलें आहे.]

बहिणाबाई अंतकाळीं सिद्धासनारूढ उत्तरोन्मुख होत्या. त्या वेळीं त्या आपला पुत्र विठ्ठल यास म्हणतात:—"अवघेचि जन्म आठवती मज। अंतरींचें गुज मृत्युवेळां ॥ आरशांत जैसें दिसे प्रतिमूख। तैसे जन्म देख दिसती डोळां ॥ लटकेचि शब्द व्यवहारी मानिती। मूर्ख तयांप्रती बोलों नये ॥ तेरा जन्मांपूर्वी आठवे समस्त। परी तैसा हेत नाहीं मज ॥ बहिणी म्हणे देव कृपा करी जेव्हां। सर्व ही तें तेव्हां कळे मनीं ॥ १ ॥"

अंतकाळीं सिद्धासनारूढ झाल्यावर संत बहिणाबाईंना पूर्वजन्म आरशांतल्या प्रतिबिंबाप्रमाणें समजण्याची जी दिव्य दृष्टि प्राप्त झाली होती, तशी दिव्य दृष्टि महाराष्ट्रांतील नव्हे तर सर्व हिंदुस्थानांतील कोणत्या ही साधुसंतांस प्राप्त झाल्याचा उल्लेख कोणत्या ही साधुसंतांच्या चरित्रांत दिसून येत नाहीं. यावरून बहिणाबाईंची आध्यात्मिक योग्यता किती श्रेष्ठ होती हें कळून येतें. बहिणाबाईंची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणें आहे:—( १ ) गोरखनाथ, ( २ ) गहिनीनाथ, ( ३ ) निवृत्तिनाथ, ( ४ ) ज्ञानदेव, ( ५ ) सच्चिदानंद, ( ६ ) विश्वंभर, ( ७ ) राघव चैतन्य, ( ८ ) केशव चैतन्य, ( ९ ) बावाजी चैतन्य, (१०) तुकाराम, (११) बहिणाबाई.

( ५ ) प्रेमाबाई:—समर्थकालीन संतकवयित्रींपैकीं या शेवटल्या होत. या सोळाव्या शतकाच्या अखेर होऊन गेल्या. परंतु त्यांचा जन्मशक व समाधिशक इतिहाससंशोधकांस कळलेला नाहीं. कै. राजवाडे यांनीं त्यांचा कालशक १५८० हा दिला आहे. बहिणाबाईप्रमाणें त्यांनीं आत्मचरित्र दिलेलें नाहीं. त्यांच्या मातापितरांचीं नांवें माहीत नाहींत, एवढेंच नव्हे तर, त्यांचें स्वत:चें माहेरचें अगर सासरचें नांव अद्याप उपलब्ध नाहीं. प्रेमाबाई हें त्यांचें नांव नव्हे. त्या पुराणश्रवणास बसल्या म्हणजे करुणरसपर कथा ऐकतांना त्यांच्या नेत्रांतून प्रेमळपणानें अश्रुधारा पडत असत; या त्यांच्या नैसर्गिक प्रेमळपणामुळें त्यांचें नांव प्रेमाबाई असें पडलें.

बहिणाबाईप्रमाणें प्रेमाबाईंना कांहीं दिवस पतिसुख मिळून एक मुलगा झाला; परंतु मुलगा झाल्यावर त्यांना लवकरच वैधव्य प्राप्त झालें असें दिसतें. सुप्रसिद्ध संतचरित्रकार महिपतिबुवा यांनीं आपल्या प्रसिद्ध भक्तलीलामृतांत प्रेमाबाईचें चरित्र दिलें आहे ( अध्याय ४२ ). दुर्दैवानें वैधव्य प्राप्त झाल्यावर सर्व काळ प्रेमाबाई परमार्थसाधनांत घालवून जन्माचें सार्थक करीत असत. वेणाबाईप्रमाणें त्यांना लिहितांवाचतां येत होतें असें दिसत नाहीं. त्या नित्य पुराणास जात असत. त्या नित्य गोदास्नान करीत असत असें चरित्रकार म्हणतात. तेव्हां त्यांचें गांव गोदावरीच्या कांठीं असावें असें दिसतें. संतसज्जन

अथवा अतिथि घरीं आल्यास त्या कधीं त्यास विन्मुख पाठवीत नसत. एकदां प्रेमाबाई पुराणास निघाल्या तेव्हां कांहीं संत मंडळी त्यांच्या घरीं आली. ते उपाशी होते. पुराणश्रवणाचा नित्य नेम मोडून त्यांनीं अतिथींना भोजनास घालण्याचें ठरविलें. परंतु सर्व चित्त पुराणाकडे होतें. त्यांनीं आपल्या दहा वर्षांच्या मुलास पुराणास पाठविलें व पुराण ऐकून आल्यावर त्यास त्या दिवशींचा कथाभाग सांगावा अशी आज्ञा केली. नंतर संतांचें भोजन झाल्यावर तो मुलगा घरीं आला व त्यानें आईच्या आज्ञेप्रमाणें तिला त्या दिवशींचा कथाभाग सांगण्यास आरंभ केला. त्याचें वर्णन महिपतबावांनीं फार उत्कृष्ट रीतीनें केलें आहे, तें वाचकांनीं भक्तलीलामृतांतून सर्वच वाचावें, म्हणजे प्रेमाबाईच्या उत्कट श्रीकृष्णभक्तीची थोडीशी कल्पना वाचकांना होईल. श्रीकृष्ण यशोदेचें स्तनपान करीत असतां स्वयंपाकघरांतील दूध उतू येऊन करपल्याचा वास यशोदा-मातेस आला. तेव्हां ती श्रीकृष्णाला तसाच टाकून आंत गेली. स्तनपान देतांना आपणांस टाकून यशोदा आंत गेल्याबद्दल बालकृष्णास राग आला, त्यानें ताकाचा डेरा लवंडला व आसपासचीं मुलें आणून त्यांना लोणी वाटून टाकलें. हातांत वेताची छडी घेऊन यशोदा श्रीकृष्णास धरूं लागली, तो सांपडेना; पुष्कळ गवळणी जमल्या व यशोदेसह सर्व कृष्णास दाव्यानें बांधण्याचा प्रयत्न करूं लागल्या व कांहीं वेळानें सर्वांनीं मिळून दाव्यानें कृष्णास बांधलें. हा कथाभाग ऐकतांना प्रेमाबाईच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. “ संसार तुझ्यावर सोंपवून मी गोकुळांत जाऊन श्रीकृष्णास बंधमुक्त करितें,” असें त्या आपल्या मुलास म्हणाल्या व लागलीच या क्षणभंगुर देहाचा त्याग करून सच्चिदानंदस्वरूपीं जाऊन मिळाल्या ! ! प्रेमाबाई-इतकी उत्कट श्रीकृष्णभक्ती क्वचितच आढळून येईल. त्यांच्या घरीं आलेल्या संतअतिथींना प्रेमाबाईची उत्कट श्रीकृष्णभक्ती पाहून फार आश्चर्य वाटलें.

वेणाबाई अगर बहिणाबाईप्रमाणें प्रेमाबाईनीं कविता केली नाहीं असें दिसतें. निदान अद्याप त्यांची कविता संशोधकांना उपलब्ध झालेली नाहीं. त्यांचीं दोन तीन पदें मात्र प्रसिद्ध आहेत. “ गडे हो कृष्णगडी आपुला । यमुनाडोहीं बुडाला ।। धृ० ।। ” हें प्रेमाबाईचें पद फार लोकप्रिय आहे. यांचें दुसरें लोकप्रिय पदः—“ गडे हो कृष्णगडी आपुला । राजा मथुरेचा झाला ।। धृ०।। ” “ माझा भरत देखिला काय । ” हें प्रेमाबाईचें तिसरें सुप्रसिद्ध पद होय.

येथपर्यंत समर्थशतकामध्यें महाराष्ट्रांत होऊन गेलेले संत, कवि व कव-यित्री यांचीं अल्प चरित्रें दिलीं व त्यांच्या प्रमुख काव्यग्रंथांचा नामनिर्देश केला. महाराष्ट्रांतील बहुतेक सर्व संत कवि होते, परंतु सर्व कवि संत नव्हते. तथापि सर्व कवि वर्णाश्रमधर्माचा अभिमान बाळगणारे सनातन धर्माचे अभिमानी असे होते. सर्वांनीं आपापल्या परी, आपल्या ग्रंथांनीं व उपदेशांनीं समाजामध्यें धर्मजागृति उत्पन्न

करण्याचा प्रयत्न केला. श्रीएकनाथस्वामी व श्रीतुकाराममहाराज यांचें कार्य इतर संतकवींपेक्षां अत्यंत श्रेष्ठ दर्जाचें होतें. त्यांनीं धर्मजागृति केली व बहुजन समाजाला आपल्या ग्रंथांतील वेदतुल्य वाणीनें अध्यात्मज्ञानाचे व नीतीचे उत्कृष्ट पाठ दिलेच, परंतु यांशिवाय त्यांची बहुमोल कामगिरी म्हणजे त्यांनीं आपल्या भक्तिमार्गानें बहुजन समाजाचें लक्ष पंढरपूरच्या श्रीविठ्ठलाच्या उपासनेकडे लावलें व त्यांना परधर्माचा स्वीकार करण्यापासून परावृत्त केलें. इतर सनातनधर्माभिमानी कवींनीं संस्कृतांतील वाङ्मय मराठींत आणून तद्द्वारां प्राकृत लोकांना श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माचें ज्ञान करून दिलें. त्यांच्या ग्रंथांच्या नांवावरून त्यांच्या कार्याची साधारण कल्पना करितां येते. समर्थपूर्वशतकांतील व समर्थशतकांतील साधुसंतांनीं व कवींनीं नाटकें, कादंबऱ्या लिहून बहुजन समजास नीतीचीं तत्त्वें शिकविण्याचा प्रयत्न केला नाहीं. ज्ञानेश्वर, नामदेव प्रभृति महाराष्ट्रांतील तेराव्या शतकांतील सुप्रसिद्ध साधुसंतांपूर्वी अनेक शतकें नाटकें व कादंबऱ्या लिहिण्याची पद्धत रूढ होती. कालिदास, भवभूति, बाण, दंडी प्रभृति संस्कृत महाकवींनीं नाटकें व कादंबऱ्या लिहून बहुजन समाजास नीतितत्त्वें शिकविण्याच्या मार्गाचा अवलंब केला होता. कालिदासानें 'मालविकाग्निमित्र' नाटकांत म्हटल्याप्रमाणें नाटक हें समजांतील भिन्न रुचींच्या लोकांचें बहुत प्रकारांनीं मनोरंजन करण्याचें एक प्रमुख साधन आहे ( नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनम् ॥ ). अर्वाचीन सुशिक्षित नाटककार व कादंबरीकार यांची ही प्रवृत्ति आपल्या वाङ्मयकृतींनीं बहुजन समाजास नीतीचीं तत्त्वें शिकविण्यापेक्षां त्यांचें मनोरंजन करण्याकडेच अधिक दिसून येते. नाटकें, कादंबऱ्या व विनोदपर कविता करून बहुजन समाजाचें मनोरंजन करूं नये व तद्विषयक साहित्यसेवा करूं नये असें आमचें म्हणणें नाहीं. परंतु राष्ट्र परदास्यांत खितपत पडलें असतां ज्यांच्यावर शारदेची कृपा आहे अशा आधुनिक पदवीधर व सुशिक्षित कवींनीं कांहीं कविता तरी बहुजन समाजास स्वराज्योन्मुख करण्यास प्रवृत्त करणारी अशी करावी एवढीच आमची त्यांना विनंति आहे.

सांप्रत कालचे कवि व त्याचप्रमाणें नाटककार, कादंबरीकार, लघुकथाकार प्रभृति वाङ्मयाची सेवा करणाऱ्या गृहस्थांनीं प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें आपल्या ग्रंथांतून बहुजन समाजाच्या मनांत स्वराज्यप्रोत्साहक भावना उत्पन्न करण्याचें ध्येय आपल्यापुढें ठेविलें पाहिजे. बहुजन समाजाचीं मनें विशिष्ट राष्ट्रोद्धारक कामाकडे प्रवृत्त करण्यास देशी भाषांतील वाङ्मय फार परिणामकारक होतें. गुर्जरदेशाधिपति श्रीमंत सयाजीरावमहाराज गायकवाड यांचे पुढील विचार हल्लींच्या वाङ्मयभक्तांनीं मनन करून कृतींत आणण्यासारखे आहेत. कोल्हापूर येथें भरलेल्या १७ व्या महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष या नात्यानें केलेल्या भाषणांत ते म्हणतात, "राष्ट्राची उन्नति व्हावयाची असली कीं, तिचीं चिन्हें सूर्योदयाच्या

पूर्वीच्या अरुणाप्रमाणें वाङ्मयांत दिसतात. यांतहि वाङ्मय समाजाची प्रवृत्ति बदलूं शकतें ...... सर्व वाङ्मयनिर्मात्यांनीं केवळ स्वार्थाकडे नजर न ठेवितां समाजास हितकारक अशाच वाङ्मयाची रचना करावी." स्फूर्तिदायक कविता वाचण्याकडे लोकांची, बहुजन समाजाची विशेष प्रवृत्ति असते. हल्लींच्या बहुतेक कवींची प्रवृत्ति शृंगारात्मक व विनोदात्मक काव्य करण्याकडे विशेष दिसते. नाशिक येथील सुप्रसिद्ध शाहीर कवी कै. 'गोविंद' यांच्या प्रमाणें कांहीं सन्माननीय अपवाद आहेत. शृंगाररसाला व विनोदरसाला अजीबात फाटा द्यावा असें आम्ही म्हणत नाहीं; परंतु शृंगारात्मक व विनोदात्मक वाङ्मय उदात्त विचाराचें असावें व त्यांत ही स्वराज्यप्रोत्साहक भावना बहुजन समाजाच्या मनांत बिंबविण्याचा प्रयत्न करावा. देशभक्त प्रो. वा. म. जोशी यांच्या 'रागिणी' या उत्कृष्ट कादंबरींत काव्य-शास्त्रविनोद भरपूर आहे, परंतु त्यांच्या हृदयांतील जाज्वल्य देशाभिमान तींत दिसून येत नाहीं. कै. गोविंद शाहीर यांची कोणती ही कविता वाचली तर तींत त्यांच्या हृदयांतील प्रज्वलित देशाभिमान व उत्कट स्वराज्येच्छा हीं दिसून येतात. त्यांचें अनुकरण मराठी वाङ्मयभक्तांनीं करावें अशी आमची त्यांना विनंति आहे. महाराष्ट्रांतील साधुसंतांनीं व कवींनीं बहुजनसमाजाची हीन स्थिति सुधारण्याकरितां या लौकिक व मनोरंजक मार्गाचा अवलंब केला नाहीं. वेद, वेदांत, गीता, भागवतादि अध्यात्मग्रंथ यांतील धर्माचीं व नीतीचीं तत्त्वें व रामायणमहाभारतादि राष्ट्रीय काव्यग्रंथांतील रामकृष्णादि अवतारिक विभूतींचीं चरित्रें आपल्या ग्रंथ-द्वारां त्यांनीं बहुजन समाजास शिकविलीं. मुकुंदराज, ज्ञानेश्वर, नामदेवप्रभृति साधुसंतांनीं आपल्या जगमान्य विवेकसिंधु, ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, व नीतिपर व अध्यात्मपर अभंग यांच्या द्वारां हें कार्य फार उत्कृष्ट रीतीनें केलें. ज्ञानेश्वरांचा काल हा महाराष्ट्रसाम्राज्याचा सौभाग्यकाल होता. ज्ञानेश्वरीच्या समाप्तिकालीं यदुकुलभूषण श्रीरामचंद्रराव राज्य करीत होता, त्याचा उल्लेख श्रीज्ञानदेवांनीं मोठ्या अभिमानानें ज्ञानेश्वरीच्या १८व्या अध्यायाच्या शेवटीं केला आहे. परंतु ज्ञानेश्वरांच्या समाधी-नंतर थोड्याच वर्षांनीं देवगिरीच्या यादवांचें महाराष्ट्रसाम्राज्य लयास गेलें. दिल्लीचा बादशहा जलालुद्दिन खिलजी याचा पुतण्या अल्लाउद्दिन खिलजी यानें शके १२२८ सालीं देवगिरीवर स्वारी केली व रामरावाचा पराभव करून त्यास कैद करून दिल्लीस नेलें. खंडणी व कांहीं मुलूख देण्याचें कबूल केल्यावर सहा महिन्यांनीं त्यास त्यानें सोडून दिलें, रामराव शके १२३१ सालीं वारला. त्यानंतर त्याचा मुलगा शंकरदेव यानें शके १२३४ पर्यंत व नंतर जांवई हरपालदेव यानें शके १२४० पर्यंत महाराष्ट्र-राज्य राखण्याचा प्रयत्न केला; परंतु महाराष्ट्राच्या दुर्दैवानें देवगिरीचें राजघराणें व त्याचे मांडलिक संस्थानिक यांच्यामध्यें एकजूट नसल्यानें व हेमाद्रीसारखा राजकारणपटु सचिव मरण पावल्यानें शके १२४० सालीं

देवगिरीच्या यादवांचें राज्य लयास गेलें. त्या वर्षी दिल्लीचा सरदार मलक काफूर यानें हरपालदेवाचा पराभव केला व त्यास हाल हाल करून ठार मारिलें. परंतु दिल्लीचें राज्य देवगिरी येथें फार दिवस टिकलें नाहीं. तीस वर्षांच्या आंतच जाफरखान याच्या महत्त्वाकांक्षी गुलामानें शके १२६९ (सन १३४७) सालीं दक्षिण हिंदुस्थानांत गुलबर्गा येथें स्वतंत्र मुसलमानी राज्याची स्थापना केली. तो पूर्वी एका ब्राह्मणाच्या घरीं गुलाम होता व त्या ब्राह्मणानें त्यास "तूं पुढें राजा होशील" असें भविष्य सांगितलें होतें, म्हणून त्यानें आपल्या राज्यास 'बहामनी' राज्य अशी संज्ञा दिली होती. तें राज्य शके १४४८ (स. १५२६) पर्यंत चाललें. बहामनी राज्य स्थापन होण्यापूर्वी बारा वर्षे शके १२५७ (सन १३३५) सालीं राज्यधुरंधर माधवाचार्य यांच्या प्रयत्नानें त्याचे शिष्य राजपुत्रद्वय हरिहर व बुक्क यांनीं विजयानगर येथें स्वतंत्र हिंदु साम्राज्याची स्थापना केली होती. तें हिंदु साम्राज्य शके १४८७ (सन १५६५) पर्यंत चाललें. पंधराव्या शतकाच्या अखेर शेवटच्या बहामनी राज्याच्या कारकीर्दींत दक्षिण हिंदुस्थानांत पांच स्वतंत्र मुसलमानी राज्यें स्थापन झालीं. बहामनी राज्यांत व तें मोडून स्थापन झालेल्या आदिलशाही, निजामशाही, कुतुबशाही, बेरीदशाही व इमादशाही या पांच मुसलमानी सुलतानशाह्यांच्या कारकीर्दींत हिंदु देवतांच्या मूर्ती फोडणें, हिंदु स्त्रियां-वर बलात्कार करून त्यांना भ्रष्ट करणें, हिंदु लोकांना जबरीनें बाटवून मुसलमान करणें, प्रसंगविशेषीं त्यांची कत्तल करणें हीं कृत्यें कमीअधिक प्रमाणांत राजरोस चाललीं होतीं. अशा वेळीं १४व्या व १५व्या शतकांतील साधुसंतांनीं उत्तम कामगिरी केली. त्याचें उत्कृष्ट वर्णन कै. ना. कृ. गद्रे यांनीं 'महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग' या पुस्तकांत केलें आहे. श्रीपादश्रीवल्लभस्वामी, श्रीनृसिंहसरस्वती, मुधेश, चांगदेव, राघवचैतन्यप्रभृति साधुसंतांनीं बहुजन समाजास भक्तिमार्गास लावून परधर्म स्वीकारण्यापासून परावृत्त केलें. सरस्वतीगंगाधरानें आपल्या सुप्रसिद्ध 'गुरु-चरित्र' या ग्रंथांत श्रीपादश्रीवल्लभ व श्रीनृसिंहसरस्वती यांचीं चरित्रें व कामगिरी यांचें उत्कृष्ट वर्णन केलें आहे. कै. गद्रे म्हणतात:—"या साधुद्वयांनीं मुसलमानांच्या धर्मवेडास आळा घातला आणि मराठ्यांच्या व दाक्षिणात्यांच्या मनामध्यें स्वर्णाश्रम धर्मपद्धतीविषयीं आणि श्रुति, स्मृति व पुराणादिकांविषयीं पूर्ण आदर व दृढ श्रद्धा उत्पन्न करून महानुभव पंथासारख्या आपल्यांतीलच वर्णाश्रम झुगारून सर्व खिचडी करून टाकणाऱ्या धर्मपंथावर वेळींच प्रत्याघात करून सनातन धर्माची पुनः स्थापना केली." (महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग, पान १५६). एक बेदरचा बादशहा श्रीनृसिंहसरस्वतींचा शिष्य होता. श्रीपादश्रीवल्लभस्वामींनीं एका रजकास "तूं राजा होशील," असा वर दिला होता. तोच बेदरचा अल्लाउद्दीन सुलतान. त्याच्या-विषयीं सरस्वतीगंगाधर म्हणतात:—"विप्रकुळ समस्त देख । संतोषें

करिती अति कौतुक ।। राजा झाला विप्रसेवक । आले बरवें राज्यासी ।। (गुरुचरित्र, अ. ५०. २१४). ऐसा हा राव असतां । महाराष्ट्र-धर्मी वर्ततां । आपला द्वेष तत्त्वता । न करील हा जाण पां ।। २३९ ।। ''
'महाराष्ट्रधर्म' या शब्दप्रयोगाचे जनक सरस्वती गंगाधर होत. समर्थां-पूर्वी त्यांनीं या शब्दाचा उपयोग गुरुचरित्रांत केल्याचा उल्लेख आम्हीं पूर्वी 'समर्थसंप्रदाय' या भागांत केला आहेच. कै. गद्रे हे गुरुचरित्र ग्रंथाविषयीं म्हणतात:—'' संस्कृत भाषेचा लोप होऊन जें अज्ञान माजलें होतें, तें दूर करून धर्माचाराची उत्तम ओळख लोकांना जिवंत भाषेंत करून देणारा असा दुसरा ग्रंथच नाहीं. '' (म. म. पूर्वरंग, पान १३० ). श्री. भा. वा. भट म्हणतातः—''वेदा-विषयीं प्रामाण्यबुद्धि, श्रुतिस्मृतिप्रणीत वर्णाश्रमधर्मपरिपालन, गोहत्या, जीव-हत्या, मद्यमांस इत्यादिकांचा त्याग व प्रतिमापूजन इत्यादि बाबींचा प्रामुख्यानें 'महाराष्ट्रधर्म' या संज्ञेंत अंतर्भाव होत असल्याचा गुरुचरित्रग्रंथकर्ता सरस्वती गंगाधर याचा समज दिसतो. '' ( महाराष्ट्रधर्म, पान १५२ ) श्री. भट आपल्या 'श्रीसमर्थ रामदास आणि श्रीछत्रपती शिवाजीमहाराज यांचा अन्योन्य संबंध' या पुस्तकांत म्हणतातः—'' ज्ञानेश्वरांच्या समाधीनंतर महाराष्ट्रांत थोड्याच दिवसांत मुसलमानांची राजकीय सत्ता स्थापन होऊन श्रुतिस्मृतिधर्मावर एक भयंकर संकट प्राप्त झालें. वेद व चातुर्वर्ण्यव्यवस्था यांची वाताहत होऊन श्रुतिस्मृतिधर्मानुयायी लोकांस प्रिय अशा ब्राह्मण, गाई, देवळें, देवता, तीर्थें, क्षेत्रें इत्यादिकांची विटंबना व पायमल्ली होऊं लागली. श्रुतिस्मृतिप्रणीत धर्म या संकटांत नष्ट होतो अशी धास्ती वाटूं लागली. अशा प्रकारच्या परिस्थितींत उपासना, विठ्ठल-भजन, विठ्ठल-नामकीर्तन इत्यादि अत्यंत स्वल्प गोष्टींचा उपदेश महाराष्ट्रीय संतांनीं जनतेस करून तिजला जेमतेम हिंदुधर्माचे गोटांत ठेवलें. '' ( पान ८।९ ) तेराव्या शतकांतील ज्ञानदेवनामदेवप्रभृति साधुसंतांचें कार्य व सोळाव्या शतकांतील एकनाथ-तुकारामप्रभृति साधुसंतांचें कार्य यांचा संबंध वाचकांच्या नजरेस आणण्याकरितां चवदाव्या व पंधराव्या शतकांतील साधुसंतांच्या कार्याचा जातांजातां वरील थोडासा उल्लेख करावा लागला.

आतां सोळाव्या शतकांतील एकनाथ, तुकाराम प्रभृति साधुसंतांच्या व वामन पंडित, रघुनाथ पंडितप्रभृति कवींच्या कार्याचा विचार करूं. 'शिवाजी-निबंधावली' भाग १, या पुस्तकांत 'शिवकालीन संतांची कामगिरी' हा एक उत्कृष्ट लेख आमचे सन्मित्र श्री. प्रो. शं. वा. दांडेकर यांनीं लिहिला आहे. शिवकालीन संत म्हणजे समर्थकालीन संत म्हणजे सोळाव्या शतकांतील संत होत. सदरहू लेखांत संतांचा चरित्रविषयक भाग न देतां त्यांच्या उपदेशाचा अथवा शिकवणुकीचा तत्कालीन महाराष्ट्रास काय उपयोग झाला याचें प्रो. दांडेकर यांनीं विवेचन केलें

आहे. प्रो. दांडेकर म्हणतात:—"शिवकालीन महाराष्ट्रांतील मोठा वर्ग हा आपल्या धर्ममातेस जवळजवळ पारखा होत चालला होता. अशा स्थितींत महाराष्ट्रांत वर्ण-व्यवस्था शेष राहिली, शेंडी जानवें राहिलें यास कारण या साधुसंतांचे प्रयत्न होत. व याबद्दल महाराष्ट्रानें सदैव त्यांचें ऋणी राहिलें पाहिजे....साधुसंतांचा उपदेश ब्राह्मण व क्षत्रिय या वर्गास तर होताच. पण याखालच्या समाजांत ( हिंदु समाजाच्या मोठ्या भागांत ) आपण वैदिक धर्माचे घटकावयव आहोंत, वर्णाश्रम-व्यवस्था किती ही मोडकळीस आली तरी तीच श्लाघ्य आहे व प्रत्येकास स्वधर्मानेंच इहलोकीं सुख मिळणार, त्यांत जात अथवा पंथ आड येऊं शकत नाहींत, असली विश्वासयुक्त जाणीव उत्पन्न केली; ही जी जाणीव व हें जें धार्मिक व्यवस्थेचें प्रेम उत्पन्न केलें गेलें, त्याचा उपयोग शिवाजीमहाराजांस झाला....आज जी सत्यसमाजाची वृत्ति आहे तीच जर शिवकालीन बहुजन समाजाची मनोभूमिका असती तर शिवाजी महाराजांना "मी गोब्राह्मणांचें परिपालन करतों," या वाक्याचा कितीसा उपयोग झाला असता बरें ? त्या वेळीं महाराष्ट्राची मनोभूमिका तशी बनली नव्हती याचें श्रेय या साधुवर्गाच्या प्रयत्नासच आहे." ( पानें १४६-१४७ ). "प्रसंग-विशेषीं स्वधर्माविरुद्ध व स्वाभिमानी नरास चीड आणणाऱ्या म्लेंच्छ सेवेवर, म्लेंच्छ दैवत व म्लेंच्छ राजे यांच्या सेवेवर यांनीं कोरडे ही ओढले." ( पान १६९ ). प्रो. दांडेकर यांची वरील विचारसरणी आम्हांस मान्य आहे. सदहू लेखांत एकनाथ-स्वामी व तुकाराममहाराज प्रभृति संत व समर्थ रामदास यांच्या अध्यात्मिक उप-देशांत व नीतिपर उपदेशांत फरक नव्हता असें प्रो. दांडेकर म्हणतात तें ही आम्हांस मान्य आहें. भक्तिमार्गाचे व वारकरी पंथाचे आद्य प्रवर्तक श्रीज्ञानेश्वर "जयां ऐहिक धड नाहीं । तयांचें परत्र पुससी कांहीं ॥" ( ज्ञानेश्वरी, अ. ४. १९५ ) अशी मेघगर्जना करून बहुजन समाजास निवृत्तिमार्गाप्रमाणें प्रवृत्तिमार्गाकडे लक्ष्य देण्याचा उपदेश करितात हें ही आम्हांस मान्य आहे. असें असून ही सदर सुप्रसिद्ध पंथाचे अनुयायी एकनाथ, तुकारामप्रभृति साधुसंत व समर्थ यांच्या व्यावहारिक उपदेशांत फरक होता असें आम्हांस वाटतें. ही गोष्ट प्रोफेसरसाहेब ही सदहू लेखांत दोन ठिकाणीं मान्य करितात. "पारमार्थिक मार्गाच्या दृष्टीनें विचार केला तर रामदासस्वामी व तत्पूर्वी झालेले इतर साधु यांत कांहीं फरक नाहीं. गुरुकृपा, ज्ञान-ध्यान याच मार्गानें देवाची प्राप्ति होते असें इतर साधूंप्रमाणें रामदास ही म्हणतात. फरक जर असेल तर दोहोंनीं केलेल्या कर्ममार्गाच्या चर्चेच्या व्याप्तींत आहे." ( पान १६१ ) कर्ममार्गाच्या चर्चेच्या व्याप्तीचा खुलासा प्रो. दांडेकर यांनीं स्पष्ट केला असता तर बरें झालें असतें. असो. पुढें ते म्हणतात, "रामदासांच्या शिकवणुकी व इतर साधुसंतांच्या शिकवणुकींत फारसा फरक नाहीं व पडणें ही शक्य नाहीं." (पान १६५) म्हणजे थोडासा तरी फरक आहे हें त्यांना ही मान्य आहे. तो फरक कोणत्या

प्रकारचा आहे या बाबतींत त्यांचा व आमचा मतभेद आहे. प्रोफेसरसाहेब म्हणतातः—“ या दोघांमधील फरक जातीचा ( of a kind ) नाहीं, तर तो अंशात्मक ( of a degree ) आहे.” ( पान १६६ ). प्रो. दांडेकर यांचें हें म्हणणें आम्हांस मान्य नाहीं. दोघांच्या व्यावहारिक उपदेशांतील फरक अंशात्मक नसून मूलात्मक ( of a kind ) आहे असें आम्हांस वाटतें. या संबंधांत कै. गद्रे व श्री. भट यांचें म्हणणें आम्हांस अधिक पटतें. सन १५६५ सालीं तालीकोटच्या लढाईंत विजयानगरच्या रामराजानें आदिलशाही, निजामशाही व कुतुबशाही यांच्या एकत्र जमलेल्या सैन्याबरोबर युद्ध झालें व त्यांत रामराजा यास आदिलशाही सुल्तानानें द्वंद्वयुद्धास बोलावून त्यास कपटानें मारलें, म्हणून त्याच्या सेनेचा पराभव झाला. याविषयीं लिहितांना कै. गद्रे म्हणतात:—“ राजस्थानांत ज्याप्रमाणें हस्तिनापूरचें स्वराज्य करण्याची संगानें आणून दिलेली उत्तम संधि बुद्धोल रजपुतांनीं वांया दवडली, त्याचप्रमाणें महाराष्ट्रांत हो कृष्णराय व रामराजा यांनीं स्वपराक्रमानें अनार्य मुसलमानांस खडे चारून आर्यसंस्कृतीच्या सर्व दाक्षिणात्यांस एक होण्याची व सर्व महाराष्ट्रांत व दक्षिण प्रांतांत हिंदु साम्राज्य अनुभवण्याची आणून दिलेली उत्तम संधी त्यांनीं ( मराठे सरदारांनीं ) वांया दवडली. विशेषतः जसे वर जयपूरकरादि रजपूत क्षत्रिय, तसेच इकडे निंबाळकरादि अनेक मराठे क्षत्रिय, १५६० च्या सुमारास मुसलमान बादशहांची सरदारी मिळविण्यांत धन्यता मानूं लागलेले दिसतात. वास्तविक पाहतां त्यांनीं या वेळीं घरापासून जरा लांब कां होईना, परंतु स्वतंत्र व पराक्रमी रामराजासारख्या हिंदु क्षत्रिय राजाची सेवा प्रयत्नपुरस्सर स्वीकारून, जेव्हां जेव्हां तो वर महाराष्ट्रांत येईल तेव्हां तेव्हां आपल्या घराभोंवतालचा प्रदेश त्याजकडून जहागिरीदाखल करवून घ्यावयाचा व त्याच्या पाठबळावर आपल्या जहागिरीचा मुलूख वाढवीत राहून मोठ्या युक्तीनें परराज्याचा बरवंटा झिजवून झिजवून अगदीं नाहींसा करून टाकावयाचा. परंतु असें होण्यास लोकांस कोणीतरी ईश्वरी प्रसादाचा, प्रवृत्तिमार्गींतील लोकांचें ही इष्ट साधून देणारा निस्पृह साधूच उपदेष्टा असावा लागतो. त्या काळीं स्वधर्माभिमानी संत महाराष्ट्रांत मुळींच नव्हते अशांतला भाग नाहीं; परंतु केवळ स्वधर्माची निवृत्तिप्रधान पारमार्थिक बाजू तेवढीच संभाळणारे या काळाचे साधु असत. प्रवृत्तिमार्गांत लोकांस इष्ट वळण लावून, स्वसमाजाच्या ऐहिक सुखांत अचुक भर टाकतां येण्याचा मार्ग सुचलेला अशा वरिष्ठ धोरणाचा सत्पुरुष महाराष्ट्रास अजून लाभावयाचा होता. मुकेश, चांगदेव, रावब चैतन्य ही मंडळी सत्पुरुषांच्या कोटींतील, परम वैराग्यशील, उत्कट स्वधर्माभिमानी खरी, तरी वरीष्ठ दृष्टीनें केवळ निवृत्तीची साधक आणि वाऱ्याला पाठ देणारीच म्हणावी लागते. स्वयंप्रकाश, स्वयंसिद्ध आणि परिस्थितीचें अनिष्ट स्वरूप बदलून, तिला अनुकूल करून घेण्यास

ही मंडळी समर्थ असून, सर्व समाजांत महत्त्वाकांक्षा भरवून त्यास कार्यतत्पर करण्याची लोकोत्तर कल्पकता यांच्यांत वसत नव्हती, असेंच खरें. तसें नसतें, आणि जर कोणी खरा स्वधर्म-देश-निष्ठ, समाजधुरीण, निस्पृह, ईश्वरभक्त कार्यकर्ता साधु पुरुष या वेळीं उत्तरेंत किंवा दक्षिण हिंदुस्थानांत असता तर, खचितच दोहींकडे असणाऱ्या मुसलमान राज्यपीठांचीं तो आपल्या स्वधर्मीयांकडून पाळेंमुळें खणल्यावांचून राहताच ना." (म. म. पूर्वरंग, पानें २४८-२५० ). हा उतारा बराच लांब आहे, परंतु अंशात्मक वृत्ती व मूळात्मक वृत्ति यांतील फरक नीट कळावा म्हणून तो देणें भाग पडलें. श्री. मा. वा. भट यांनीं साधुवर्य तुकाराममहाराजांची कामगिरी मान्य करून ही त्यांच्या व समर्थांच्या कार्यांत थोडा फरक होता असें म्हटलें आहे. श्री. भट म्हणतातः—"तुकारामबोवांनीं आपलें सर्व आयुष्य श्रीपांडुरंगाचें उत्कटत्वानें भजनपूजन करण्यांत घालविलें. त्यांची नीतिमत्ता अत्यंत श्रेष्ठ दर्जाची होती. श्रीपांडुरंगाशीं समरस होण्यास त्यांनीं आपल्या संसाराची राखरांगोळी करण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं. स्वतःच्या आत्मिक उन्नतीकरितां या प्रकारचें आचरण करीत असतां त्यांनीं महाराष्ट्रीय जनतेची अवहेलना केली नाहीं. भजन करतांना महाराष्ट्रीय जनतेस अध्यात्माचा व नीतीचा उपदेश करण्यांत त्यांनीं आपलें आयुष्य वेंचलें. तथापि त्यांनीं समर्थ रामदासस्वामींप्रमाणें शेंकडों शिष्य तयार करून त्यांच्या करवीं महाराष्ट्रांत व भरतखंडांतील इतर प्रांतांत मठस्थापना करण्याचा व आपल्या संप्रदायाच्या तत्त्वाचा प्रसार करण्याचा खटाटोप केला नाहीं." ( महाराष्ट्रधर्म, पानें १८८।१८९ ) पंढरपूरच्या श्रीविठ्ठलोपासनेचे व भक्तिसंप्रदायाचे तुकाराममहाराज हे शिवसमर्थकाळीं प्रमुख अध्वर्यु होते. त्या भक्तिसंप्रदायाचा पाया तेराव्या शतकांत ज्ञानदेवमहाराजांनीं घातला. त्या पवित्र संप्रदायमंदिराबरचे मजले नामदेवमहाराज व एकनाथमहाराजांनीं बांधले व त्यास दैदिप्यमान कळस तुकाराममहाराजांनीं चढविला, असें तुकाराममहाराज स्वतः अभिमानानें सांगतात. "संतकृपा झाली । इमारत फळा आली । ज्ञानदेवें रचिला पाया । उभारलें देवालया । नामा तया किंकर । तेणें केला हा विस्तार । जनार्दन भागवत । ध्वज उभारिला हा भागवत । तुका झालासे कळस । भजन करा सावकाश ॥" ( तुकारामगाथा ) तेव्हां ज्ञानदेव व नामदेव-प्रभृति समर्थपूर्वशतकांतील साधुसंतांचें ध्येय व समर्थशतकांतील एकनाथ-तुकारामप्रभृति साधुसंतांचें ध्येय एकच मानलें पाहिजे. तें ध्येय म्हणजे बहुजन समाजाला अध्यात्माचा, नीतीचा व भक्तिमार्गाचा उपदेश करून त्यांना ईश्वरप्रातीचा मार्ग सुलभ करून देणें हें होय. समर्थांचें पारमार्थिक मार्गांतील ध्येय हेंच होतें हें प्रो. दांडेकर यांना ही मान्य आहे. परंतु लौकिक मार्गांत—व्यवहारांत बहुजन समाजास उपदेश करण्याच्या मार्गांत एकनाथतुकारामप्रभृति संत व समर्थ

यांच्यामध्यें फरक होता व तो अंशात्मक नसून, मूलात्मक होता. उभयतांच्या वाङ्मयांतील उदाहरणांवरून आमच्या म्हणण्याची सत्यता वाचकांस पटेल. कलियुगांत बहुजन समाजांतील लोक वर्णाश्रमधर्माचा आचार सोडून, सनातन देवतांची पूजा सोडून वागलेले पाहून तुकारामांना फार संताप येई. कलियुगावरील अभंगांत तो संताप त्यांनीं व्यक्त केला आहे:—" आचारभ्रष्ट होती लोक कलीं । पुण्य क्षीण, बळी झालें पाप......थोर या युगाचें आश्चर्य । ब्रह्मकर्म उत्तम सार ।। सांडुनियां द्विजवर । दावलपीर स्मरताती ।। १ ।। पुत्र ते पितयापाशीं । सेवा घेती सेवका-ऐसी ।। पापा देती अनुमोदन । करिती हेळण संतांचें ।। ऐसें अधर्माचें बळ । लोक झकविले सकळ ।। केलें धर्माचें मूळ । प्रळयकाळ आरंभित ।। " लोक आचारभ्रष्ट झाले, लोक आपला उपदेश ऐकत नाहींत, याबद्दल सात्त्विक संताप येऊन ते एका अभंगांत म्हणतात:—" काय करूं देवा ऐशी नाहीं शक्ती । दंडुनी पुढती लावूं वाटे ।। " दुसऱ्या एका अभंगांत ते म्हणतात:—" तुका म्हणे देवा । काय निद्रा केली धांवा ।। " मुसलमानी राज्यांत हिंदुधर्मांतील कांहीं लोक श्रुति-स्मृतिप्रणीत धर्माविरुद्ध राजरोसपणानें वागूं लागले, तेव्हां तुकारामांचें अंतःकरण कळवळलें व त्यांनीं देवाचा धांवा केला; परंतु हिंदुधर्मावर, हिंदु देवतांवर व हिंदु स्त्रियांवर राजरोस हल्ला करणाऱ्या परकी व परधर्मी सत्तेपासून सोडविण्याबद्दल त्यांनीं श्रीविठ्ठलाचा धांवा केलेला त्यांच्या अभंगांत दिसून येत नाहीं. एकनाथ-तुकारामप्रभृति साधुश्रेष्ठांच्या व्यावहारिक उपदेशांत राजकारणाचा उल्लेख सांपडत नाहीं. " तुझा तूं वाढवी राजा । शीघ्र आम्हांचि देखतां ॥ " अशी अत्यंत कळकळीची प्रार्थना देवतेस केलेली त्यांच्या ग्रंथांत आढळत नाहीं. " मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्र-धर्म वाढवावा ।। महाराष्ट्र-राज्य करावें । जिकडे तिकडे ।।" असा प्रोत्साहक, चैतन्योत्पादक व उत्तेजक उपदेश तत्कालीन क्षत्रिय राजपुत्रांना केलेला त्यांच्या वाङ्मयांत आढळत नाहीं. समर्थांनीं तसा उपदेश केला, हें प्रो. दांडेकरांना ही मान्य आहे. ते म्हणतात:—" समर्थांच्या ठिकाणीं जाज्वल्य देव-राष्ट्र-धर्म-प्रेम होतें हें आम्हांस मान्य आहे. त्यांनीं राजकारणाचा व व्यवहाराचा उपदेश केला हें ही आम्हांस मान्य आहे. " ( पान १५५ ). प्रोफेसरसाहेबांच्या या मान्यतेवरून एकनाथतुकारामप्रभृति साधु-संतांच्या व्यावहारिक शिकवणुकींत फरक अंशात्मक नसून मूलात्मक होता हें त्यांना ही मान्य करावें लागेल. पुढें पर्यायानेंच ते स्वतः ही गोष्ट कबूल करतात. प्रोफेसर-साहेब म्हणतात:—" परिस्थिति कळून ही, स्वदेशाभिमान असून ही कित्येकांस प्रकृतिस्वभावास्तव व स्वतःचे संकल्पित ध्येयामुळें राजकारणांत भाग घेतां येत नाहीं, पण याचा अर्थ त्यांस परिस्थितीचें ज्ञान नसतें, अथवा स्वदेशाभिमान नसतो अशी कल्पना करणें चुकीचें आहे. " ( पान १६८ ) प्रोफेसरसाहेबांच्या वरील

विधानाचा रोख शिवसमर्थकालीन संतसाधूंपेक्षां राजकारणांत न पडणाऱ्या आधुनिक सुशिक्षित पदवीधरांवर विशेष आहे असें दिसतें. तें कसें ही असो, प्रकृति-स्वभावामुळें व ध्येयभिन्नत्वामुळें जे राजकारणामध्यें पडत नाहींत व जे पडतात त्यांच्यामध्यें फरक अंशात्मक नसून मूलात्मक आहे असें प्रोफेसरसाहेबांच्या वरील म्हणण्यावरून सिद्ध होतें. प्रो. दांडेकर पुढें म्हणतातः—"स्वदेश, स्वभूमि यांचा अभिमान असणारा प्रत्येक मनुष्य राजकारण करूनच राष्ट्रोन्नतीस मदत करतो असें नाहीं. इतर अंगांची उन्नति होण्यास मदत करून तो राष्ट्रसेवक होऊं शकतो. शस्त्र धारण करून धारा-तीर्थीं पडणें अथवा दुसऱ्यास पाडणें ऐवढाच एक मार्ग राष्ट्रोन्नतीस मदत करण्याचा आहे असें नाहीं." (पान १७०) राष्ट्रसेवक होऊन राष्ट्रोन्नती करण्याचे पुष्कळ मार्ग आहेत हें प्रो. दांडेकरांचें म्हणणें आम्हांस मान्य आहे. परंतु राष्ट्रसेवेचे सर्व मार्ग सारख्याच योग्यतेचे नसतात, हें प्रो. दांडेकर यांना ही मान्य आहे असें त्यांच्या १६८ पानावरील विधानावरून दिसतें. १७० पानावरील विधानांतील उत्तरार्धाविषयीं विवेचन आम्ही 'समर्थांचें राजकारण' या भागांत केलें आहे.

प्रोफेसर दांडेकर आपल्या लेखाच्या शेवटीं म्हणतातः—"या साधुसंतांची शिकवणूक श्रीहरि प्राप्त करून घेण्याची होती, पण ती ऐहिक सुखाच्या आड येणारी नव्हती. स्वराज्य गेलें व धार्मिक ऱ्हास अधिक जोरानें होऊं लागला; अशा परिस्थितींत संतांनीं महाराष्ट्रांत धार्मिक भावना जागृत ठेवली व धर्म जगवला." (पान १६९). हें त्यांचें म्हणणें आम्हांस मान्य आहे. पुढें १७० पानांत ते म्हणतातः—"लोकांच्या मनाची तयारी झाल्याशिवाय राष्ट्रांत क्रांति होऊं शकत नाहीं, ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. अशाच जातीची पण निराळ्या स्वरूपाची कामगिरी या साधुसंतांनीं केली." या विधानांतील पूर्वार्ध इतिहासशास्त्रांतील जगमान्य तत्त्व आहे. उत्तरार्धाचा नीट बोध होत नाहीं. संतांच्या निराळ्या स्वरूपाच्या कामगिरीचा खुलासा केला असता तर बरें झालें असतें. आपल्या लेखाच्या शेवटच्या वाक्यांत प्रो. दांडेकर म्हणतातः—"संतांच्या तपःसामर्थ्यानें तयार केलेल्या भूमिकेवरच स्वधर्मध्वजांकित अशा हिंदवी स्वराज्याचें अलौकिक मंदिर धर्मवीर शिवाजीराजे यांस उभारतां आलें. हीच संतांची कामगिरी." संतांनीं तपःसामर्थ्यानें तयार केलेल्या भूमिकेवर शिवाजीमहाराजांनीं स्वराज्याचें मंदिर उभारलें ही गोष्ट खरी आहे. परंतु तें मंदिर उभारण्यास शिल्प-शास्त्रज्ञ कुशल कारागीर पाहिजे होते, ते "मराठा तितुका मेळवावा। महाराष्ट्र धर्म वाढवावा।" या समर्थांच्या मेघगर्जनेनें शिवाजीमहाराजांभोंवतीं गोळा झाले व त्यायोगानें शिवाजीमहाराजांचें स्वराज्यमंदिर बांधण्याचें काम सुकर झालें. संतांच्या कामगिरीचा शिवाजीमहाराजांना स्वराज्यस्थापनेस अधिक उपयोग झाला,

कीं समर्थांच्या कामगिरीचा अधिक उपयोग झाला या वादांत न पडतां संतभक्तांनीं व समर्थभक्तांनीं हल्लीं आपापल्या परिस्थितीप्रमाणें राष्ट्रोन्नति करण्याचे राष्ट्रांत जे प्रयत्न चालविले आहेत त्यांना धर्मभावनेनें अंतःकरणपूर्वक प्रयत्न करून महाराष्ट्राचें किंबहुना सर्व हिंदुस्थानचें आनंदभुवन करण्यास अहर्निश प्रयत्न करावा म्हणजे ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम, समर्थ व शिवाजीमहाराज या सर्वांच्या स्वर्गस्थ आत्म्यांस अत्यंत आनंद होईल.

समर्थशतकांतील साधुवर्य-एकनाथतुकारामांप्रमाणें अनेक कवींचीं अल्प चरित्रें आम्हीं या भागांत प्रारंभीं दिलीं आहेत. ते सर्व कवि होते, परंतु वरील दोन अलौकिक विभूतींप्रमाणें त्रिगुणातीत संत नव्हते. वामनपंडित, दासोपंतप्रभृतीं-प्रमाणें कांहीं अत्यंत सात्त्विक वृत्तीचे कवि होते व बाकीचे ( लोलिंबराजाचा एक अपवाद खेरीज करून ) वर्णाश्रमधर्माप्रमाणें वागणारे पापभीरु सनातनधर्मानुयायी होते. त्यांनीं यथार्थदीपिका, गीतार्णव प्रभृति उत्तम अध्यात्मिक ग्रंथ लिहून धर्माचीं व नीतीचीं तत्त्वें बहुजन समाजास शिकविलीं. त्यांपैकीं कोणीं ही स्वधर्म-रक्षणार्थ व स्वराज्यस्थापनार्थ संघटनात्मक प्रयत्न केला नाहीं अगर एखादें स्वतंत्र वीररसात्मक काव्य लिहून बहुजन समाजांत स्वराज्यस्फूर्ति उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला नाहीं. वरील सर्व कवींच्या हयातींत हिंदु धर्मावर, हिंदु देवतांवर व हिंदु स्त्रियांवर परधर्मीयांचे त्यांच्या देखत राजरोस हल्ले चालले होते, परंतु त्याचा प्रति-ध्वनि त्यांच्या बहुविध प्रचंड वाङ्मयांत दिसून येत नाहीं हें आश्चर्य होय.

कांहीं कवींना मुसलमानी बादशाहाचा जुलमी त्रास भोगण्याचा प्रसंग आला होता, त्याचा उल्लेख त्यांच्या अल्प चरित्रांत मागें केला आहेच. प्रस्तुत विषयाच्या विवेचनापुरताच येथें अल्प उल्लेख करितों. ( १ ) **दासोपंत** हे नाथांचे अगदीं समकालीन. त्यांचे वडील देशपांडे होते. त्यांनीं एकदां सरकारी सारा वेळेवर दिला नाहीं म्हणून " पितुरपराधे पुत्रस्य दंडः " या विपरीत न्यायानें दासोपंतांस सरकारी वाड्यांत नेऊन जबरीनें मुसलमान करण्याचा धाक घातला. ईशकृपेनें सारा वेळेवर पोहोंचण्याची व्यवस्था झाली व दासोपंत सुटले. त्यांनीं सव्वा लाख गीतार्णव ग्रंथ व दुसरे अनेक ग्रंथ लिहून महाराष्ट्रवाङ्मयाची उत्कृष्ट सेवा केली हें सर्व खरें आहे. परंतु आपणांवर जुलमानें बाटण्याचा प्रसंग आला तसा आपल्या बांधवांवर येऊं नये, म्हणून स्वराज्यप्रोत्साहक काव्य निर्माण करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला नाहीं. (२) **जनीजनार्दन** हे ही नाथकालीन कवि असून विजापूरच्या बादशाहाच्या दरबारांत नोकर होते. दुष्काळांत सरकारी कोठारांतील धान्य गरीब लोकांना वांटल्याबद्दल बादशाहानें त्यांना देहांत शिक्षा दिली होती. ईशकृपेनें ते सुटले. अन्यायानें दिलेल्या देहांत शिक्षेचा प्रतिकार त्यांनीं स्वतः नोकरीचा राजीनामा देऊन व आपल्या पुत्रपौत्रादिकांना नोकरी न करण्याविषयीं निर्बंध

घालूनच केला. ( ३ ) वामन पंडित यांचेवर ही जबरीनें बाटून मुसलमान होण्याचा प्रसंग येणार होता; परंतु वेळेवर विजापूर सोडून त्यांनीं आपल्यावरील तो प्रसंग टाळला. नंतर काशीस जाऊन ते अद्वितीय पंडित झाले व ६०,००० उत्तम ग्रंथरचना करून त्यांनीं महाराष्ट्र-वाङ्मयास उत्कृष्ट शोभा आणली. परंतु आपल्याप्रमाणें आपल्या हिंदु बांधवांवर जुलमानें बाटविण्याचा प्रयत्न करण्याचे प्रसंग येऊं नयेत म्हणून त्यांनीं कांहीं प्रतिकारार्थ प्रयत्न केल्याचा त्यांच्या ग्रंथांत अगर चरित्रांत उल्लेख नाहीं. ती गोष्ट राहो, पण पंडित शिवसमर्थकालीन होते. शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनेच्या यशस्वी प्रयत्नाबद्दल त्यांनीं एकादें स्वतंत्र काव्य केलें असतें तर तें अत्युत्कृष्ट साधलें असतें. प्राचीन कथाभागांवर काव्य करितांना महाकवि मिल्टन यानें पुढील उद्गार काढले ते प्रसिद्ध आहेत:— Better to reign in hell than serve in heaven, Awake, arise or be forever fallen ( *Paradise Lost* ) भावार्थ:—स्वर्गामध्यें नोकरी करण्यापेक्षां नरकांत राज्य केलेलें अधिक चांगलें. उठा, जागे व्हा. नाहींतर यावच्चंद्र-दिवाकरौ पतितावस्थेमध्यें रहाल. ( पॅराडाइज लॉस्ट ). पौराणिक कथांवरील काव्यांत ही मिल्टनसारखे उद्गार काढून पंडितद्वयप्रभृति महाराष्ट्रकवींना बहुजन समाजास स्वराज्योन्मुख करितां आलें असतें; परंतु तसा प्रयत्न त्यांनीं केलेला त्यांच्या काव्यांत आढळून येत नाहीं. एकनाथ, तुकाराम, समर्थांसारख्या श्रेष्ठ दर्जाच्या साधुसंतांची प्रवृत्ति राजस्तुतिपर काव्यें करण्याकडे न होणें स्वाभाविकच आहे; परंतु वामनपंडित अगर रघुनाथपंडित प्रभृतींसारख्या लौकिक पंडितांनीं शिवाजीमहाराजांच्या चरित्रावर अगर त्यांच्या राज्यारोहणावर महाकाव्य कां केलें नाहीं तें समजत नाहीं. या पंडितद्वयांना सरस्वतीचा वरदहस्त होता. त्या उभयतांनीं पुण्यश्लोक शिवछत्रपतींवर मराठींत काव्यें केलीं असतीं तर तीं कालिदासाच्या काव्याप्रमाणें उत्कृष्ट झालीं असतीं व महाराष्ट्र-साहित्याला अलौकिक शोभा आली असती. प्रो. दांडेकर म्हणतात त्याप्रमाणें वरील पंडितद्वयांचा व इतर शिवसमर्थ-कालीन कवींचा प्रकृतिस्वभावच समकालीन पुण्यश्लोक राजांवर महाकाव्यें निर्माण करण्याच्या उलट होता असें म्हणावें लागतें.

दासोपंत, जनीजनार्दन व वामनपंडितांप्रमाणें समर्थशतकांतील इतर कवींवर परधर्मी परसत्तेची झळ लागण्याचा प्रत्यक्ष प्रसंग आला नसला तरी त्यांना तत्कालीन राजकीय परिस्थितीची पूर्ण माहिती होती. त्यांच्या हातून व खुद्द समर्थांचे बंधु श्रेष्ठ व दासपंचायतनांतील समर्थेतर चार संतकवींच्या हातून ही स्वराज्यस्थापने-विषयीं प्रसंगविशेषीं उद्गार निघूं नयेत हें आश्चर्य होय. पुरुषकवींची जेथें ही स्थिति तेथें शिवसमर्थकालीन स्त्रीकवियत्रींनीं एकादें ‘ शिवचरित्र ’ अगर ‘ राज्या-रोहण-काव्य ’ लिहिलें नाहीं यांत आश्चर्य नाहीं. वर उल्लेख केलेल्या पांच ही

कवयित्री फार श्रेष्ठ दर्जाच्या भगवद्भक्त होत्या. वेणाबाईला अहोरात्र श्रीरामावांचून कांहीं दिसत नव्हतें. बहिणाबाई अहोरात्र श्रीविठ्ठलभजनांत मग्न असत. प्रेमाबाईला सर्व जग श्रीकृष्णमय दिसत होतें. त्या तिघी ही त्रिगुणातीत भगवद्भक्त होत्या. अंबिकाबाई व दयाबाई ही परमार्थांतच निमग्न असत. शिवचरित्रासारख्या विषया-वर काव्य लिहिण्याचें त्यांच्या स्वप्नीं ही आलें नसेल.

पुरुष संतकवींपैकीं कृष्णदास मुद्गल व मुचकुंद कवि यांनीं वीररसप्रधान काव्यें लिहिलीं आहेत. कृष्णदास मुद्गल यांचें रामायणांतील फक्त युद्धकांडच उपलब्ध आहे. समर्थांनीं फक्त सुंदरकांड व युद्धकांड यांवरच कविता केली आहे, त्याप्रमाणें कदाचित् कृष्णमुद्गलानें फक्त रामायणांतील युद्धकांडावर कविता केली असण्याचा संभव आहे. कृष्णमुद्गलाच्या रामायणपठनानें योद्ध्यांच्या अंगीं युद्धसामर्थ्य येतें अशा समजुतीनें सदर रामायणग्रंथ मराठी राज्यांत प्रत्येक किल्ल्यावर ठेवीत असत. रामायणमहाभारतांतील वीरांच्या कथा ऐकून शिवाजीमहाराजांच्या अंगीं पौराणिक वीरांप्रमाणें पराक्रम करून स्वराज्य स्थापण्याची स्फूर्ति झाली, अशी इतिहास साक्ष देतो. कृष्णमुद्गलांनीं स्वतंत्र असें वीररसप्रधान काव्य केलें नाहीं. असा प्रयत्न पौराणिक कथानकांवर फक्त मराठी कवींपैकीं एका कवीनेंच केला आहे. तो कवि म्हणजे मुचकुंद हा होय. हा कवि १६ व्या शतकाच्या उत्तरार्धांत झाला. यानें 'श्रीभार्गवचरित्र' हा ग्रंथ लिहिला आहे. विष्णूचा पांचवा अवतार परशुराम अवतार होय. परशुराम म्हणजेच भार्गव. परशुरामचरित्र वीररसकथापरिपूर्ण आहे, तेव्हां या कवीनें वीररसप्रधान काव्य लिहिण्याची इच्छा तृप्त करण्यास उत्तम पौराणिक चरित्र शोधून काढलें. त्याप्रमाणें त्याला शिवाजी-महाराजांच्या चरित्रांत वीररसप्रधान अनेक प्रसंग मिळाले असते. परंतु मराठी कवींचा प्रकृतिस्वभाव विद्यमान वीरांपेक्षां पौराणिक वीरांच्या अद्भुत कथांवर कविता करण्याकडे अधिक होता. तथापि मुचकुंद कवीनें पौराणिक नायकांवर कां होईना एक वीररसप्रधान काव्य लिहिलें हे महाराष्ट्र-वाङ्मयावर त्याचे उपकार मानले पाहिजेत. पौराणिक अथवा स्वकालीन राजांवर वीररसप्रधान काव्य न करितां समर्थशतकांतील वर नमूद केलेल्या एका कवीनें बहुजन समाजास परमार्था-प्रमाणें व्यवहाराचा उपदेश केला आहे. तो कवि एकनाथसमकालीन महालिंगदास हा होय. 'राजनीति' हा शब्द याच्या ग्रंथांत प्रथम आढळून येतो. आपल्या 'विक्रम बत्तिशी' या ग्रंथाच्या शेवटीं हा कवि म्हणतो:— "ऐसी बत्तिस पुतळि-यांची कथा । येथोन संपली आतां ।। सांग ऐकतां सुलभ्यता । संतोष होय मना ।। ३५ ।। हा ग्रंथ प्रास्ताविक । राज्यनीति आत्यंतिक ।। डोळस होय लोक । आयकीलिया ।। ४५ ।। बरवा वोखटा समय देखिजे । तेथवा हा वाक्यार्थ आठ-वीजे ।। मार्गें मनीं कीजे । विचार देखें ।।४६।।" आपल्या प्रास्ताविक 'राज्यनीति'

ग्रंथांतील शिकवणूक कृतींत आणण्याविषयीं या कवीनें बहुजन समाजास विनंति केली आहे. महालिंगदासाचा उद्देश मराठ्यांनीं स्वतंत्र होण्याचा उपक्रम करावा असा स्पष्ट होता असें त्याच्या ग्रंथांवरून स्पष्ट दिसतें, असें कै. ना. कृ. गद्रे म्हणतात ( म. म. पूर्वरंग, पान. २६९ ).

झालें, आमचें श्रीसमर्थचरित्र संपलें. 'समर्थशतकांतील संत, कवि व त्यांचें कार्य' हा आमच्या श्रीसमर्थचरित्रांतील शेवटचा भाग होय. १५ वा भाग परिशिष्टांचा आहे. श्रीसमर्थचरित्र लिहिण्यांत आमचा मुख्य हेतु श्रीसमर्थांचें चरित्र शकतिथीवार देऊन त्यांच्या चरित्रांतील कथाभागच फक्त सांगण्याचा नव्हता. हल्लीं राष्ट्रोन्नतीकरितां व राष्ट्रोद्धाराकरितां आसेतु-हिमालय प्रांतांतील सर्व लोक प्रयत्न करीत आहेत. स्वराज्य मिळावें अशी आबालवृद्ध, गरीबश्रीमंत, सुशिक्षितअशिक्षित, स्त्रीपुरुष सर्व लोकांची इच्छा आहे. नुसत्या सदिच्छेनें कार्यभाग होत नाहीं. फलसिद्धीकरितां क्रिया करावी लागते. सत्ताधारी लोक स्वराज्य देण्यास तयार आहोंत असें म्हणत आहेत. परंतु "स्वराज्य मिळविण्यास प्रथम पात्र व्हा व नंतर स्वराज्याची मागणी करा" असें राज्यकर्त्यांचें मुत्सद्दीपणाचें म्हणणें आहे. तेव्हां राष्ट्रांतील सर्व धर्मांच्या, सर्व जातींच्या, सर्व पक्षांच्या लोकांनीं स्वराज्य मिळविण्याची पूर्ण पात्रता अंगीं आणण्याविषयीं अंतःकरणपूर्वक प्रयत्न केला पाहिजे. असा अंतःकरणपूर्वक प्रयत्न परिस्थित्यनुरूप उत्साहानें व नेटानें कसा करावा हें समजण्यास श्रीसमर्थचरित्र आदर्शभूत होईल असें वाटल्यावरून आम्हीं हें श्रीसमर्थचरित्र जनीजनार्दनापुढें ठेविलें आहे. शेवटीं वाचकांना पुढील प्रार्थना करून श्रीसमर्थचरित्र संपवितों:—

उत्तिष्ठत ! जाग्रत ! ! प्राप्य वरान्निबोधत ! ! !

( कठोपनिषत् )

उठा ! जागे व्हा !! व श्रीसमर्थांसारख्या श्रेष्ठ महात्म्यांकडे जाऊन ज्ञान प्राप्त करून घ्या !!! व त्याप्रमाणें कृति करून आपल्या राष्ट्राचा उद्धार करा.

जय जय रघुवीर समर्थ

ॐ तत्सत्

# परिशिष्टें

---

## परिशिष्ट ( अ )

## श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांचें श्रीसमर्थांना पत्र

श्री

श्रीरघुपति
श्रीमारुति

श्रीसद्गुरुवर्य श्रीसकल तीर्थरूप श्रीकैवल्यधाम श्रीमहाराज श्रीस्वामी स्वामींचे सेवेसी

चरणरज शिवाजीराजे यांनीं चरणांवरी मस्तक ठेऊन विज्ञापना जे मजवर कृपा करुनु सनाथ केले आज्ञा केली कीं, तुमचा मुख्य धर्म राज्यसाधन करुनु धर्मस्थापना देव ब्राह्मणाची सेवा प्रजेची पीडा दूर करून पाळण रक्षण करावे, हें व्रत संपादून त्यांत परमार्थ करावा तुह्मी जें मनीं धराल तें श्री सिद्धीस पाववील, त्याजवरून जो जो उद्योग केला व दुष्ट दुराढे लोकांचा नाश करावा, विपुल द्रव्य करुनु राज्यपरंपरा अक्षई चालेल ऐशीं स्थळें दुर्घट करावीं ऐसें जें जें मनीं धरिले तें तें स्वामींनीं आशीर्वादप्रतापें मनोरथ पूर्ण केले. या उपरी राज्य सर्व संपादिलें तें चरणीं अर्पण करुनु सर्व काळ सेवा घडावी ऐसा विचार मनीं आणिला तेव्हां आज्ञा जाहाली कीं, तुम्हांस पूर्वी धर्म सांगितले तेच करावेत तीच सेवा होय ऐसे आज्ञापिले. यावरून निकट वास घडुनु वारंवार दर्शन घडावें श्रींची स्थापना कोठेंतरी होऊनु सांप्रदाय शिष्य व भक्ति दिगंत विस्तीर्ण घडावी ऐसी प्रार्थना केली तेही आसमंतांत गिरिगव्हरीं वास करुनु चाफळीं श्रींची स्थापना करुनु सांप्रदाय शिष्य दिगंत विस्तीर्णता त्यास चाफळीं श्रींची पूजा मोहोछाव, ब्राह्मण-भोजन, अतिथि, इमारत सर्व यथा-सांग घडावें जेथें जेथें श्रींच्या मूर्ति स्थापना तेथें उछाव पूजा घडावी. यास राज्य संपादिलें यांतील ग्रामभूमी कोठें काय नेमावी ते आज्ञा व्हावी, तेव्हां आज्ञा जाहाली कीं, विशेष उपाधीचें कारण काय तथापी तुमचे मनीं श्रींची सेवा घडावी हा निश्चय जाहाला त्यास येथाअवकाश जेथें जें नेमावेसें वाटेल तें नेमावें व पुढें जसा सांप्रदायाचा व राज्याचा व वंशाचा विचार होईल तैसें करावें या प्रकारें आज्ञा जाहाली या वरुनु देशांतरीं सांप्रदाय व श्रीसंनिध चाफळीं एकशें एकवीस गांव सर्वमान्य व एकशे एकवीस गांवीं अकरा बिघे प्रमाणें भूमी व अकरा स्थळीं श्रींची स्थापना जाहाली; तेथें नैवेद्य पूजेस भूमी अकरा बिघेप्रमाणें नेमिले आहेती

ऐसा संकल्प केला आहे. तो सिद्धीस नेहण्याविषयीं विनंति केली तेव्हां संकल्प केला तो परंपरेनें शेवटास न्याहावा ऐसी आज्ञा जाहाली. त्यावरून सांप्रत गाऊ व भूमी नेमिले...

......तपशील

{ येथें तेहतीस गांवें, ४१९ विघे जमीन, एक कुरण व १२१ खण्डी धान्य यांचा सविस्तर तपशील आहे. }

येकूण दरोबस्त सर्वमान्य गांऊ तेहेतीस व जमीन विघे गाऊगना चारशें येकोणीस व कुर्ण येक व गल्ला खण्डी १२१ श्रींचे पूजा उछाहाबद्दल संकल्पांतील सांप्रत नेमिले व उछाहाचे दिवसांस व इमारतीस नक्ती ऐवज व धान्य समयाचे समयास प्रविष्ट करीन येणे करोन अक्षई उछाहादि चालविण्याविषयीं आज्ञा असावीं. राज्याभिषेक ५ काल-युक्ताक्षी नाम संवत्सरे आश्विन शु॥ १० दशमी बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

# परिशिष्ट ( आ )

## सद्गुरु-स्तवन—अष्टकें

( १ ) " नमस्कार माझा सद्गुरू रामदासा ॥ "

शुकासारिखें पूर्ण वैराग्य ज्याचें। वसिष्ठापरी ज्ञान योगेश्वराचें ॥ कवी वाल्मिकासारिखा मान्य ऐसा। नमस्कार माझा सद्‌गुरू रामदासा ॥ १ ॥ उपदेश ज्याला असे राघवाचा। श्रवणीं जसा गूण परीक्षितीचा ॥ विवेकी विरागी जगीं पूर्ण ठसा। नमस्कार माझा सद्गुरू रामदासा ॥ २ ॥ करी कीर्तन नारदा-सारिखेंची। कदर्यूपरी शान्ति ज्याची सुखाची ॥ जया वाटतें कांचन केर जैसा। नमस्कार माझा सद्गुरू रामदासा ॥ ३ ॥ स्मरणीं जसा शंकर प्रल्हाद। चकोरापरी आठवी रामचंद्र ॥ रमा सेवि पादांबुजें जाण तैसा। नमस्कार माझा सद्गुरू रामदासा ॥ ४ ॥ पृथूसारिखा अर्चनीं वाट पाहे। खरा अक्रुराच्या सम वन्दिताहे ॥ नसे गर्व कांहीं अणूमात्र ऐसा। नमस्कार माझा सद्गुरू रामदासा ॥ ५ ॥ खरी भक्ति त्या हो जगीं मारुतीची। असे रामदासा जगीं मारुतीची ॥ नसे भेद दोघां, जळीं गार जैसा। नमस्कार माझा सद्गुरू रामदासा ॥ ६ ॥ जेणें अर्जुनासारिखें सख्य केलें। मुळींहून त्या द्वैत निःशेष गेलें ॥ सितानायका दृढ केला कुवासा। नमस्कार माझा सद्गुरू रामदासा ॥ ७ ॥ बळें आत्म-नीवेदनीं पूर्ण झाला। विदेही-पणें दास तैसा मिळाला ॥ म्हणे उद्धवसूत वर्णू मि कैसा। नमस्कार माझा सद्गुरू रामदासा ॥ ८ ॥

( २ ) " समर्था मला पूर्ण वैराग्य द्यावें ॥ "

तुला मागतों रामदासा दयाळा। दिनाकारणें देई आतां कृपाळा ॥ घडे भक्ति तूझी असें त्वां करावें। समर्था, मला पूर्ण वैराग्य द्यावें ॥ १ ॥ नको वासना

१. ' तया ' पाठभेद.

विषयीं होऊं देऊं । परद्रव्य देखोनियां तृप्त भाऊ ॥ अहं दंडवृत्तीहि त्वां नसावें । समर्था, मला पूर्ण० ॥ २ ॥ नको काम हा क्रोध चाण्डाळ पापी । नको मोह तैसा मदक्रूरकर्मी ॥ मना कल्पने-पासुनी सोडवावें । समर्था, मला पूर्ण० ॥ ३ ॥ सदा सर्वदा शान्ति वीरक्ति राहे । हरी-कीर्तनीं चित्त माझें वसो हें ॥ अखंडीत अध्यात्म कर्णी पडावें । समर्था, मला पूर्ण० ॥ ४ ॥ असें मूढ मी, कांहिं मातें कळेना । कधीं दास्य दास्यत्व तूझें घडेना ॥ शिरीं हस्त ठेवोनि दुःखा रहावें । समर्था, मला पूर्ण० ॥ ५ ॥ सदा संगती सज्जनाची असावी । मती दुर्मती कांहीं कोठें नसावी ॥ मनीं लोचनीं रामरूपा पहावें । समर्था, मला पूर्ण० ॥ ६ ॥ असे आवडी अन्तरीं दर्शनाची । परी भाग्यहीना मला भेट कैंची ॥ करीं प्रार्थना दीनवाणी स्वभावें । समर्था, मला पूर्ण ॥ ७ ॥ खरा दासबोधीं असे भाव माझा । मना-माजी हा लागला ध्यास तूझा ॥ म्हणे उद्धव-सुत हातीं धरावें । समर्था, मला पूर्ण वैराग्य द्यावें ॥ ८ ॥

### ( ३ ) " महाराजया सद्गुरू रामदासा ॥ "

गुरू राजया ब्रह्मरूपा दयाळा । दयासागरा धांव वेगें कृपाळा ॥ अनाथा दिनाकारणें तूं कुवासा । महाराजया सद्गुरू रामदासा ॥१॥ तुझें रूप पाहावया आस मोठी । तरी दाखवीं रूप तत्काळ दृष्टी ॥ जसी बाळका माय तूं धांव तैसा । महाराजया सद्गुरू० ॥२॥ चकोरें जसा चन्द्रमा चिन्तिताहे । वनीं गाय, घरीं वत्स तें वाट पाहे ॥ तसें ध्यान तुझें मला चिद्विलासा । महाराजया सद्गुरू०॥३॥ नसे सूत्र संसार हा घोर मोठा । जसा सिंह हस्तासि मारी चपेटा ॥ अशा संकटीं सोडवीं राज-हंसा । महाराजया सद्गुरू० ॥ ४ ॥ नको अंत पाहूंच माया हरावी । तुझी भक्ति वीरक्ति शांती हि द्यावी ॥ वरा अन्तरीं लावि वैराग्यठसा । महाराजया सद्गुरू० ॥ ५ ॥ जरी ब्रीद तुझें असे साचकोरें । प्रचीती मला दाखवीं शीघ्र कीं रे ॥ पतीतासि आधार[3] पाहेन कैचा । महाराजया सद्गुरू० ॥ ६ ॥ मला वाटतें अन्तरीं त्वां असावें । तुझ्या दासबोधासि त्वां बोधवावें ॥ अपल्यापरी पाजि तूं प्रेमरसा । महाराजया सद्गुरू० ॥ ७ ॥ मना इंद्रिया कामक्रोधासि मारीं । मदें मत्सरें वासना हे निवारीं ॥ जळा-वेगळा तळमळे मीन जैसा ॥ महाराजया सद्गुरू० ॥ ८ ॥ म्हणे उद्धवासि त्वां हातीं धरावें । सदासर्वदा अंतरीं प्रेमभावें ॥ उपेक्षूं नये स्वामि दासानुदासा । महाराजया सद्गुरू रामदासा ॥ ९ ॥

### ( ४ ) " तयें दासबोधासि वाचीत जावें "

जया आवडीं राम डोळां पहावा । निराकार निर्गुण कैसा कळावा ॥ सदा सर्वदा पूर्ण वैराग्य व्हावें । तयें दासबोधासि वाचीत जावें ॥ १ ॥

---

१. ' हो कुवासा ' पाठभेद. २. खरें. ३. ' हा हेत आधार जैसा ॥ ' पाठभेद. ४. उद्धवसुत.

जया पाहिजे शान्ति वीरक्तिभक्ति। कळावें कसें ज्ञान सायुज्य-मुक्ती ॥ मनीं वाटतें कीं कवित्वा करावें। तयें दासबोधासि वाचीत जावें ॥ २॥ कसा बद्ध मूमुक्षु साधक सिद्ध। कसें ध्यान पूजा करावी प्रसिद्ध ॥ कसा तत्व-झाडा असे तें पहावें। तयें दासबोधासि० ॥ ३॥ कुणें निर्मिलीं पञ्चभूतें जगासीं। असे कोण कर्ता खरें निश्चयेंसी ॥ बरें गूज वेदान्तिचें तें वसावें। तयें दासबोधासि० ॥ ४॥ कसें ब्रह्म माया अनात्मा व आत्मा। कसे पिंडब्रह्मांण्ड आणी दुरात्मा ॥ खरा देव तो कोण त्यातें भजावें। तयें दासबोधासि० ॥ ५॥ परब्रह्म तेंची सगूणासि आलें। असें बोलती पाहिजे पाहियेलें ॥ कळावें कसें कीर्तनासी करावें। तयें दासबोधासि० ॥ ६॥ पुराणें इतिहास ते चार वेद। असें सर्व गीता नसे कांहिं भेद ॥ जया संशयो काय कैसें वदावें। तयें दासबोधासि० ॥ ७॥ निशीमाजिं हा सर्व हो ग्रंथ केला। सख्या मारुतीनें बरा शोधियेला ॥ म्हणोनि अतां आदरें सर्व-भावें। तयें दासबोधासि वाचीत जावें ॥ ॥ ८॥

## ( ५ ) " गुरू रामदासासि आधीं भजावें ॥ "

सदा सर्वदा रामरूपीं मिळाला। अहंभाव ज्याचा समूळीं गळाला ॥ तयाचे मुखीं नाम आखंड ध्यावें। गुरू रामदासासि आधीं भजावें ॥ १॥ कशी भक्ति केली तया मारुतीची। तियें दिव्य काया जह्याली जयाची ॥ असें साजरें रूप हें आठवावें। गुरू राम०॥ २॥ कसें ज्ञानविज्ञान सामर्थ्य ज्याचें। खरें पूर्ण वैराग्य शोभे तयाचें ॥ तयाचे पदीं प्रेमभावें लवावें। गुरू रामदासासि आधीं भजावें ॥ ३॥ जया अन्तरीं काम ना लोभ नाहीं। देहाकार भासे परी तो विदेही ॥ अशा ब्रह्मरूपासि ध्यानीं धरावें। गुरू राम० ॥ ४॥ जयें वेदवेदान्त तो शोधियेला। विवेकें विचारें बरा बोधियेला ॥ तया दासबोधा बरें वीवरावें। गुरू राम०॥ ५॥ बहू चांगले श्लोक केले मनाचे। जिथें भाव आभाव गेले मनाचे ॥ बहू शान्ति वीरक्ति येते स्वभावें। गुरू राम० ॥ ६॥ जया आठवितां गळा दाटताहे। मला वाटतें तेंचि तें ब्रह्म पाहे ॥ नसे संशयो, नित्य चिन्तीत जावें। गुरू राम०॥ ७॥ नसे भेद या रामदासासि रामा। धरीं भाव तूं पावसी नीजधामा ॥ विभक्तीसि सांडूनि भक्ती भजावें। गुरू रामदासासि आधीं भजावें ॥ ॥ ८॥

## ( ६ ) " घडो भेटि कृष्णातिरीं स्वामियाची ॥ "

उदासीन हें जाहलें चित्त माझें। मनीं वाटलें सर्व संसार ओझें ॥ उठे मानसीं प्रीति हे दर्शनाची। घडो भेटि कृष्णातिरीं स्वामियाची ॥ १॥ बहूसाल या वैभवीं चाड नाहीं। जनीं राघवेंवीण तो शीण पाहीं ॥ असे सोडिली आस सर्वे जनाची। घडो भेटि कृष्णा० ॥ २॥ क्रमेना घरीं, आवडे रान चित्ता। असे बोधिला जीव हा सर्व आतां ॥ करूं सांडि या पुत्रदारादिकांची। घडो भेटि० ॥ ३॥ मनीं एक हें ध्यातसें वाटताहे। मनिं खान्ति तो कण्ठ तो दाटताहे ॥ जळें लोटलीं दाटलीं डोळयांचीं। घडो भेटि० ॥ ४॥

जनीं भातले वातले कामरीतें । तयाची कथा गोष्टि आतां न सांगे ॥ तुटो संगती सर्व ही दुर्जनाची । घडो भेटि० ॥ ५ ॥ तरी पारखीं पारखीं दीसताती । जनासारिखीं सारिखी भासताती ॥ मनीं बैसली मूर्ति सर्वोत्तमाची । घडो भेटि० ॥ ६ ॥ कितीयेक लोकीक सांडूनि सारे । फिराहें प्रभूच्या सवें मागमागें ॥ बहू ऐकिली कीर्ति हे उत्तमाची । घडो भेटि० ॥ ७ ॥ शुकासारिका चातका चक्रवाका । चकोरा हका जेवुका आणि काका ॥ शकूनालि हे शुद्धि सांगा तयाची । घडो० ॥ ८ ॥ मनीं ध्यास तैसेंचि हें स्वप्न देखे । जनीं सांगतां बोलती सर्व लोकें ॥ नसे आत कोणीच माझ्या जिवाची । घडो भेटि० ॥ ९ ॥ उदासें कसें चित्त हें वेधिलेसें । परत्रैक हें चित्त हे वोधिलेसें ॥ चरित्रें विचित्रें वरीं गाउं त्यांचीं । घडो भेटि कृष्णातिरीं स्वामियाची ॥ १० ॥ मनीं वेध हा खेदसा वाटतो रे । घडीनें घडी कंठ हा दाटतो रे ॥ विवेकेंचि हे सांडि होते मनाची । घडो भेटि० ॥ ११ ॥ बसेनाचि मत्तांतरीं चित्त माझें । कसें चित्त हें वेधिलें योगिराजें ॥ कथाकीर्तनीं आवडे मूर्ति त्यांची । घडो भेटि० ॥ १२ ॥ ध्वनी नाद कल्होळ स्वप्नांत येती । घडीनें घडी जय-जयाकार होती ॥ मनीं बैसली रामनौमी तयांची । घडो भेटि कृष्णा० ॥ १३ ॥ मनीं वाटतें अवचितें स्वामि आले । रघूवीरसे शब्द सर्वत्र झाले ॥ ध्वनी ऐकिली रम्य श्लोकाक्षरांची । घडो भेटि० ॥ १४ ॥ हरीभक्त वीरक्त येती, तयांतें । पुसे आवडीनें तया स्वामियातें ॥ मनासारिखीं कीर्तनें होत ज्यांची । घडो भेटि० ॥ १५ ॥ सनथें सुखें स्वप्न हे दाविलेंसे । शिरीं हस्त ठेऊनि संबोधिलेंसे ॥ सभामंडपीं दाटि हे सज्जनांची । घडो भेटि० ॥ १६ ॥ असें काय मी चाळऊं केंवि चित्ता । निघो दर्शना एक वेळेचि आतां ॥ असो कायसी लाज या लौकिकाची । घडो भेटि० ॥ १७ ॥ भवस्वर्ग हें तुच्छ वाटे मनातें । कृपें दाखवी सीघ्र नीरंजनातें ॥ कसी काय तें शुद्धि सांगा प्रभूची । घडो भेटि० ॥१८॥ निघा रे निघा सर्व संसार वांया । चला रे चला सर्व विश्रांति ठायां ॥ करा रे करा सांडि या वैभवाची । घडो भेटि कृष्णातिरीं स्वामियाची ॥ १९ ॥ उदासी गिरी सर्व धुंडित गेले । तयालागि ते स्वामि संतुष्ट झाले । पदें बूतसे नित्य कृष्णा तयांची । घडो भेटि कृष्णातिरीं स्वामियाची ॥ २० ॥

## (७) " धांव रे रामदासा । गुरुवर्या सर्वेशा ॥ "

धांव रे रामदासा । गुरुवर्या सर्वेशा ॥ पडलों भवडोहीं । काढीं आपुल्या दासा ॥ ध्रु० ॥ नरदेहीं येउनीयां । नाहीं केलें सार्थक । भुललों विषयामाजीं । कैंचा होईल विवेक । कृपाळुया दिनानाथा । तारकची तूं एक ॥ धांव रे रामदासा । गुरुवर्या सर्वेशा ॥ १ ॥ चौऱ्यांसी फिरतां बा । बहु श्रम पावलों । विश्रांतीचा लेश नाहीं । दुःखार्णवीं लोटलों । सुखकर्ता संकटहर्ता । बहु शिणलों भागलों ॥ धांव रे रामदासा । गुरुवर्या सर्वेशा ॥ २ ॥ सद्गुरु श्रीस्वामीराया । कल्याणरूपा अद्वया । ' जगज्जीवन ' प्रभो स्वामी । तारीं तारीं सखया । जन्ममृत्यु दूर करीं । नेईं निजपद ठाया ॥ धांव रे रामदासा ॥ गुरुवर्या सर्वेशा ॥ ३ ॥

## (८) रघुनाथ-पंडितकृत रामदासवर्णन

आम्हांतुम्हांस [1]भववारिविमाजिं तारूं ॥ जे वाचितां परिसितां मग होय [2]तारूं ॥ ते दासबोध-रचना घडली जयाला । वंदूं निरंतर तया गुरु-राजयाला ॥ १ ॥ वैराग्य-भाग्य भरलें असतां, अनन्यां[3] । आल्या जयाप्रति चतुर्विध मुक्तिकन्या ॥ चौथी[4] तयांत वरिली, उरल्या न पाहे । तो आमुचा समर्थ समर्थ आहे ॥ २ ॥ श्रीरामदास-गुरु शांति-वधूस अंगीं । अंगीकरूनि मिरवे स्वसुखांत रंगीं ॥ रंगीं उभा, कर उभारुनि वंदनाचे । नाचे सुखीं, गुण वदे रघुनंदनाचे ॥ ३ ॥ खेळावयास हनुमंत गडी जयाचा । जो या महीवरि वसंत जितेंद्रियांचा ॥ ज्याचीं पदें प्रणमिताति कवींद्र राजे । श्रीरामदास गुरु तो अमुचा विराजे ॥ ४ ॥ जो डोंगरीं गिरिदरीं फिरतां न भागे । ज्याची पवित्र घनकीर्ति जनीं विभागे ॥ जो तत्त्वबोध कविता करितां न मोजी । तो रामदास गुरुवर्य नमो नमोजी ॥ ५ ॥ शोभे शतद्वय समास समास भारी । जो दासबोध निजबोध-सुखा उभारी ॥ त्या शेवटीं दशक जोडित जो विसावा । श्रीरामदास गुरु तो अमुचा विसावा ॥ ६ ॥ चिद्बोध-सेज [5]अरुवार नव्या फुलांची । सायुज्य-मुक्ति ललना असतां जयाची ॥ तो रामदास [6]अकलत्र कसें गणावें । अज्ञान होत जन, काय तयां म्हणावें ॥ ७ ॥ जो लेखणीसहित कागद दौति वाहे । तो दंड सद्गुण उदंड जयांत आहे ॥ हस्तीं तयासि मिरवी फिरवी विनोदें । श्रीरामदास गुरु तो नमिला प्रमोदें[7] ॥ ८ ॥ जो भर्जरी सरस पाटलवर्ण[8] चेलें[9] । शोभे जयास लघुसे निटळीं[10] अवाळें ॥ बोले समर्थ रघुवीर समर्थ ऐसें । तो मी स्तवीन निज सद्गुरु वाग्विलासें ॥ ९ ॥ जेणें प्रशिष्य[11] निजशिष्य अनेक केले । देतां प्रसाद कफनी, कफ नीट झाले ॥ लोकाभिराम गुण बोलत रामकर्ता । साष्टांग वंदन करीन तया समर्था ॥ १० ॥ श्रीरामदास-गुरु-वर्णन-रूप पद्यें । वृत्तें 'वसंततिलका' सज्जनैक[12]हृद्यें ॥ संख्या करूनि दशकावरि एकतेनें[13] । केली अपूर्व रघुनायक पंडितानें ॥ ११ ॥

## (९) अनंतकृत रामदास-स्तुति

निर्माणस्थळ [14]गौतमी, परि महाकृष्णातिरीं जो वसे । कांतासंग नसे, प्रपंचहि नसे, आशा दुराशा नसे ॥ ज्याला उत्तम रामदास म्हणती त्रैलोक्य वंदीतसे । ऐसा सद्गुरु हा अनंत कविचा, बद्धास तारीतसे ॥ १ ॥ वस्त्रें भर्जरी पट कुळें माथां चिराही दिसे । काया सुंदर गौरवर्ण विलसे, भाळीं अवाळू असे ॥ स्वामीचा कविता-समुद्र अवघा कल्याण लीहीतसे । ऐसा सद्गुरु हा अनंत कवीचा, बद्धास तारीतसे ॥ २ ॥ ज्याची

---

१. संसार-समुद्र. २. तारक. ३. एकनिष्ठ होत्सात्या. ४. सायुज्यमुक्ति. ५. मृदु. ६. अविवाहित, स्त्रीविरहित. ७. आनंदानें. ८. भगव्या रंगाच्या. ९. वस्त्रांनीं. १०. कपाळावर. ११. प्रमुख शिष्य अगर शिष्यांचे शिष्य. १२. सज्जनांना अत्यंत आवडणारी. १३. दहा आणि एक. १४. गोदावरी.

कूपें तळ्याहि सज्जनगडीं गुप्त-प्रकारें असे । पादुकांवरि शेष-शोभत असे, दोन्हीकडे आरसे ॥ ज्याची पुण्यतिथी सुदीन नवमी उत्साह होतो असे । ऐसा सद्गुरु हा अनंत कविचा बद्धास तारीतसे ॥ ३ ॥ जेणें सात्विक राजसादिहि तिन्ही आत्मस्थितीं आटले । ॐकारादि कळलि अष्ट देह विदेहें निराकर्णिले ॥ विज्ञानी भवसिंधुपार तरले जिंकोनि साही वरा । ऐसा सद्गुरु हा अनंत कवीचा बद्धास तारीतसे ॥ ४ ॥ ज्याची गाढ उपासना जरि असे जाणे अयोध्यापती । नेणे त्याहुनि अन्य दैवत असे, ऐशी जयाची स्थिती ॥ ज्याचा शुभ विचार ही परि असे नारी नरा लेंकुरां । ऐसा सद्गुरु हा अनंत कवीचा बद्धास तारीतसे ॥ ५ ॥ सह्याद्रीगिरिचा विभाग विलसे मंदार शृंगापरी । नामें सज्जन जो, नृपें वसविला श्रीउर्वशीचे तिरीं ॥ साकेताधिपती कपी भगवती, हे देव ज्याचे शिरीं । तेथें जागृत रामदास विलसे, जो या जना उद्धरी ॥ ६ ॥

## ( १० ) गोविंद-विरचित श्रीरामदास-स्तोत्र

( यांत एकंदर ७७ श्लोक आहेत, त्यांपैकीं फक्त २१ येथें घेतले आहेत. )

महाराजया रामदासा दयाळा । किती आठवूं तूजला वेळवेळां ॥ भरोनी स्वयें माझिया अंतरीं हो । सदा सर्वदा आपलें रूप राहो ॥ २ ॥ प्रभो तूं परब्रह्म देवावतारी । अती प्रेमळू भाविकां हीतकारी ॥ भवाब्धींतुनी पार या पाववीता । नमो तूजला तूंचि गा मोक्षदाता ॥ ३ ॥ तुझें प्रेम वर्णावया शब्द नाहीं । तुझें रूप जाणावया ज्ञान नाहीं ॥ स्वरूपें तुझी वर्णनातीत बापा । पडे मौन आलक्षितां त्वत्स्वरूपा ॥ ४ ॥ बहुतापरीं शीणलासी दयाळा । जना वाहिला देह तूं लोकपाळा ॥ महा-मूढ ते तारिले ज्ञानयोगें । किती आठवूं तुजला लागवेगें ॥ ३ ॥ पित्याचे परी भार चिंता वहासी । सदा दक्ष तूं मानसीं पुण्यराशी ॥ भवें गांजिलीं देखतां अज्ञ बाळें । उडी घालिसी तत्क्षणीं हे दयाळे ! ॥ ५ ॥ जगीं मातलें बंड नाना मतांचें । उगा कष्टती दास हे मत्सराचे ॥ परी सेव्य त्या सद्गुरु जाहलासी । जशा निम्नगा[1] सेविती सागरासी ॥ ६ ॥ तुवां मत्सरू मूळ निर्मूळ केला । तुवां दंभ हाणोनियां पाडियेला ॥ तुवां जाळिला काम कैलासनाथा । तुवां सोडिला क्रोध कीं एकनाथा ॥ ७ ॥ तुवां मांडिलें थोर हें ज्ञानसत्र । सुधा-सिंधु हा दासबोधू पवित्र ॥ अधीकार ही दीधला सर्व लोकां । पहा रे पहा वीसरा सर्व शोका ॥ ८ ॥ जया संशयो ऊठती एकएक । नसे निश्चयो स्थिर नाहीं विवेक ॥ सदा बावरा, धावतो सैर बेटा । तया ग्रंथ हा दाखवी चोख वाटा ॥ ९ ॥ जया लागला सर्वथा शास्त्रभार । नसे स्वात्मबुद्धी, सदा पारतंत्र्य ॥ करी व्यर्थ कल्लोळ तो धीट मोठा । तया भेटवा जी अहो ग्रंथ-श्रेष्ठा ॥१०॥ जया देहबुद्धी न सोडी कदापी । सदा भूलला मीपणें मूढ पापी ॥ करीं वेगळा त्यासि हा ग्रंथ-राज । असे शक्ति हीं ! धन्य तूं स्वामिराज ॥ ११ ॥ महाराज, तूं सज्जनांच्या समाजीं ॥ जगीं चंद्रमा जेंवि नक्षत्रराजीं ॥ तुझीं संतवृंदें पदें सेवितातो । यशोदुंदुभी नित्य हे गाजताती ॥ १२ ॥

---

१. नद्या.

तुवां त्यागिली सर्व संचार-चेष्टा । मिठी घातली रामपायीं वरिष्ठा ॥ परी व्याप हा वाढवीला अपार । उठाठेव ही केवढी दुर्निवार ॥ १३ ॥ द्विजीं नेणतां बोलितां सावधान । तुवां गांठिलें तत्पदाचें निधान ॥ पडे नोवरी बावरी ते तशीच । महा मोह तूं त्यागिला एकदांच ॥ १४ ॥ रिघोनी त्वरें तीर गोदावरीचें । अनुष्ठान गा मांडिलेंसी तपाचें ॥ तपोनी स्वयें ध्यायिला दीनबंधू । तुझा लाडका राम कारुण्य-सिंधु ॥ १५ ॥ तया ऊपरी लक्षिला देश सारा । जया कारणें जन्मलासी उदारा ॥ महाभाग्य हें श्रीमती आर्यभूचें । असे मोहरे जन्म घेती प्रभूचे ॥ १६ ॥ तुवां मानवी देह घेवोनि बा रे । क्षिती लक्षिली तीर्थयात्राप्रकारें ॥ महा थोर तीं पुण्यकारें पवित्रें । वनें पावनें पट्टणें तीं विचित्रें ॥ १७ ॥ गिरीकंदरें सेविलीं घोरघोरें । महारण्य हीं किर्र जेथें तरारें ॥ गुहा भासुरा ध्यानरूपा प्रशांत । तुवां शोधिल्या काढिला काळ तेथ ॥ १८ ॥ तुवां ते स्थळीं निश्चयो स्थीर केला । परानंद तो अंतरीं सांठविला ॥ चळेनाचि जो वैभवाचेनि योगें । प्रपंचू-भयें गौरवें वीतरागें ॥ १९ ॥ भवीं बूडतां सद्गुरो धांवलासी ॥ धरोनि करें काढिलें पुण्यराशी ॥ तुवां चक्रवर्तीहुनी थोर केलें । जयाकारणें सूख अत्यंत झालें ॥ २० ॥ असो, स्वामिराया दया पूर्ण ठेवा । जगीं क्षीणतां अंतरीं धीर द्यावा ॥ वरी कोसळे दुःखराशी अपार । परी अंतरीं बैस तूं वज्रधार ॥ २१ ॥

## ( १० ) श्रीसमर्थाष्टकम्

श्रुतिपथमवतीर्णैः सावधानेति वर्णै–रवहितहृदयो यो मोहमुज्झांचकार ॥ स्थिरमतिरतिघोरं यस्तपश्चापि तेपे । कृतजगदुपकारं तं समर्थं नमामि ॥ १ ॥ गुरुविनयवतापि स्वीयशिष्येण दत्तम् । न समकनकलोष्ठो राज्यमङ्गीचकार ॥ अकुरुत जयचिह्नं चेति काषायकेतुम् । कृतजगदुपकारं तं समर्थं नमामि ॥ २ ॥ यवननिकृतराष्ट्रं धर्महीनं विलोक्य । नरवरशिवरायं क्षात्रधर्मे न्ययुङ्क्त ॥ अलभत गतलक्ष्मीं यत्प्रभावेण लोकः । कृतजगदुपकारं तं समर्थं नमामि ॥ ३ ॥ न खलु वननिवासोऽपेक्ष्यते मोक्षहेतो । रघुपतिचरणाब्जे भक्तिरस्ति स्थिरा चेत् ॥ इति सुलभमकार्षीद्यः कृती नाममन्त्रम् । कृतजगदुपकारं तं समर्थं नमामि ॥४॥ निरयगतिरपीष्टा पारतन्त्र्यं न युक्तम् । न भुवि बलविहीनाः सन्त्वमी भारतीयाः ॥ उपदिशति चरित्रं यस्य चैवं सदैव । कृतजगदुपकारं तं समर्थं नमामि ॥ ५ ॥ यदपि वननिवासो लौकिकज्ञस्तथापि । यदपि शमिततृष्णो लोकधुर्यस्तथापि ॥ विदितसकलविद्यो यः परं गर्वशून्यः । कृतजगदुपकारं तं समर्थं नमामि ॥ ६ ॥ विमलमपि निमित्तीकृत्य चेतः स्वकीयम् । विषयरतजनान् यो बोधयामास धर्मम् ॥ स्मरणमपि यदीयं हन्ति दोषाननेकान् । कृतजगदुपकारं तं समर्थं नमामि ॥ ७ ॥ अतुलबलसमेतो ब्रह्मचारी विरागी । रघुपतिपदभक्तो यो महात्मा स्वकृत्यैः ॥ सपदि हनुमदंशं लब्धवान् सर्वमान्यः । कृतजगदुपकारं तं समर्थं नमामि ॥ ८ ॥ मुकुंदरचितं स्तोत्रं यः पठेदिदमादरात् । देशभक्तः स जायेत रामदासप्रभावतः ॥ ९ ॥

(११) श्रीवामनपंडितविरचितं रामदासस्तोत्रम् ।

यं प्राहुः शिवनिर्विशेषमनिशं ब्रह्मेति वेदांतिनः । कर्तारं कुशलाः प्रमाणपटवः सद्युक्तिभिस्तार्किकाः ॥ अन्ये स्वाभिमतं वदन्ति बहुधा सांख्याः प्रधानं परम् । तस्मै सद्गुरवेऽति सन्तु नतयः श्रीरामदासाय मे ॥ १ ॥ लोकानामिह संसृतावभिनिमग्नानाम-संचेसाम् । तेषामुद्धरणाय येन परमां प्रज्ञामधिष्ठाय वै ॥ आद्यन्तात्परमागतेन निकृतः सारावतारोऽव्ययम् ॥ तस्मै सद्गुरवेऽति सन्तु नतयः श्रीरामदासाय मे ॥ २ ॥ वैराग्ये कृतवानतीव जगतां तादृक्प्रवृत्यैव यः । कांतारांतरसंचरैक-निरतौ नीताः कियद्वासराः ॥ पश्चाल्लोकदयापरेण हि पुराश्चापाहसं सेविताः ॥ तस्मै सद्गुरवेऽति सन्तु नतयः श्रीरामदासाय मे ॥ ३ ॥ नाना देवमहोमहा विरचितास्तीर्थाटणान्यादरात् । अन्तःप्रेमभरेण येन बहुधा मूर्तिप्रतिष्ठापनाः । ग्रंथाश्चापि जगत्प्रबोधपटवः संसारमाशंसिनः । तस्मै सद्गुरवेऽति सन्तु नतयः श्रीरामदासाय मे ॥ ४ ॥ यः सं मंगलमंगलं वरमनं सर्वादिभूतं परम् । यत्सान्निध्यमवाप्य वाक्प्रभृति सद्योजातमावर्तते ॥ अंतःप्रांतदुरागमः किमिति हो वाक्पारदूरे स्थितम् । तस्मै सद्गुरवेऽति सन्तु नतयः श्रीरामदासाय मे ॥५॥ ह. स्वा.ची बखर पान ३०३ (कांहीं चरणांतील शब्दांचा अर्थ नीट समजत नाहीं. कदाचित् दुसऱ्या प्रतींत बरोबर पाठ असतील.)

---

# परिशिष्ट (इ)

## श्रीसमर्थांचें रघुनाथभट गोसावी यांस पत्र

(मूळ पत्र मोडी लिपींत आहे.)

श्रीरामसमर्थ (शके १५९९)

उत्तम गुणालंकृत रघुनाथभक्ति परायेण परोपकार राजमान्य राजश्री रघुनाथ भट गोसावी यांसी स्नेहपूर्वक सूचना तुमचा निरोप घेऊन हेलवाकीहून स्वार जालों ते सुखरूप चाफळास पावलों. संकल्पाची समारादना ही जाली. पुढें शरीराचा उपचारही हळू हळू होतो तुमचें मन मजपाशीं बहुत आहे ते तुमचे आवडीच्या गुणें कल्याण होईल असें नेमस्त चिन्ह दिसते आपणे जे कर्कष सीतलाईमध्यें बहुतची श्रम पावलों तो माझा सकळ श्रम घेऊन मज निरोप दिधला तो उपकार देव जाणें येविसी चीत चमत्कारलें ते पत्रीं किती म्हणोन लिहावें माझें अरिष्ट तुम्ही घेऊन मजला उष्ण देशाशीं पाठविले हा उपकार श्रीरघुनाथजीस जाला मज रघुनाथजी वेगळें कोणी जिवलग नाहीं आपण जाला समाचार रघुनाथीस विदित केला या उपरी माझे ठायीं तुम्ही आहा रघुनाथ कृपेचा प्रत्यये तुम्हांस आलीयावरी प्रचितीसीं कळों येईल बहुत काय लेहावें वेदमूर्ती दिवाकरभट गोसावी तेथें आलियावरी तुम्ही माझा समाचार घेयासी ये प्रांतीं आले पाहिजे. स्नेह बहुत असों दीजे हा पत्रार्थ. हे इतुके म्या आवडीच्या कळवळ्यानें लिहिलें आहे मनोमन साक्ष असेल परंतु तुम्हास उप-

चारसा वाटोन रंजीस होत तरी न होणें. जैसा दिवाकरभट तैसे तुम्ही हा इत्यर्थ आहे वरें कळलें पाहिजे तुमचा आमचा एकांत प्रसंग जालियावरी मग ऐसें लिहिता नये म्हणौनि ये संधीमधें प्रसंग फावला पुढें फावेना ह्मणौनि लांबे करून लिहिलें वरकड इतर भाव मनामधें असेल तरी रघुनाथ साक्ष असे तुम्ही रंजीस न होणें आणि जे आहे ते लिहिलें यामध्यें मिथ्या स्तुति नाहीं तुम्ही सर्वज्ञ आहां तुमचें जें कांहीं आहे तें सकलचि माझें आहे. म्या मज माझ्या मनास येईल तैसें लिहिलें येथें तुमचें काय गेलें कांहीं चिंता न कीजे तुम्ही आमचेचि आहां तुह्मी आम्ही सकल देवाचे आहों शरीर भेदावरी न जाणें अंतर स्थिति पाहिल्यावर कळों येईल.

# परिशिष्ट ( ई )

## वाकेनिशी व ह. स्वा. च्या बखरींतील शकांचें टिप्पण

ज्या गोष्टींच्यापुढें कंसांत ( १ ), ( २ ) असें लिहिलें आहे, त्या गोष्टींचें सविस्तर वर्णन उद्धव गोसावी प्रभृति भक्त मंडळींनीं आलाहिदा केलेलें आहे. अशा गोष्टी १२ आहेत.

अंताजी गोपाळ कुडाळकर यांनीं माघ वद्य १३ शके १६०३ रोजीं केलेल्या समर्थ वाकेनिशींतील शकांचें क्रमवार टिप्पणः—

| | | |
|---|---|---|
| १ | शके १४९० | सूर्याजीपंतांचा जन्म. |
| २ | शके १५२५ | माघ शुद्ध सप्तमी. सूर्याजीपंतांस दोन पुत्र होतील म्हणून श्रीसूर्यवर. |
| ३ | शके १५२६ | क्रोधीनाम संवत्सर चैत्र शुद्ध अष्टमीस मध्यरात्रीं मारुतीचे देवालयांत सूर्याजीपंतास श्रीराम-लक्ष्मणदर्शन. |
| ४ | शके १५२७ | विश्वावसुनाम संवत्सर मार्गशीर्ष शुद्ध १३ गंगाधर ऊर्फ श्रेष्ठांचा जन्म. |
| ५ | शके १५३० | कीलकनाम संवत्सरीं चैत्र शुद्ध नवमी रामजन्मसमयीं नारायण ऊर्फ रामदासस्वामींचा जन्म. |
| ६ | शके १५३२ | श्रेष्ठांचा व्रतबंध. |
| ७ | शके १५३४ | श्रेष्ठांचें लग्न. |
| ८ | शके १५३५ | समर्थांचा व्रतबंध. |
| ९ | शके १५३६ | आनंदनाम संवत्सर फाल्गुन शुद्ध ११ मध्यरात्रीं श्रेष्ठांस अनुग्रह. |
| १० | शके १५३७ | राक्षसनाम संवत्सर मार्गशीर्ष शुद्ध ९ सूर्याजीपंत परंधामाप्रत गेले. |
| ११ | शके १५३८ | नलनाम संवत्सर श्रावण शुद्ध ९ माध्यान्हीं दोन प्रहरीं समर्थांना श्रीरामचंद्राचा अनुग्रह. |
| १२ | शके १५४२ | समर्थ लग्नमंडपांतून पळाले. |

१३ शके १५४५ रुधिरोद्गारीनाम संवत्सर वैशाख शुद्ध दशमी उद्धव गोसावी यांचे वडील दशकपंचक गांवचे कुळकर्णी यांचें शेत उठविलें.

१४ शके १५५४ ( १ ) कुष्णाची गोष्ट.

( २ ) फाल्गुनमासीं शुद्धपक्षीं अंगीरानाम संवत्सरीं समर्थ पृथ्वी-प्रदक्षणेस गेले.

१५ शके १५६६ ( १ ) तारणनाम संवत्सरीं बारा वर्षे तीर्थयात्रा करून पंचवटीस श्रींचें दर्शन करून श्रीकृष्णातीरीं आले. तीर्थयात्रेंतील लीलांचा विस्तार उद्धवगोसावी यांनीं लिहिला आहे. ( १ )

१६ ( २ ) महाबळेश्वरीं व वाईस मारुतींची स्थापना. माहुलीसंगमीं व जरंड्यावर राहणें:—तेथें जयराम, तुकाराम, रंगनाथस्वामी प्रभृतीं-चीं दर्शनें झालीं. त्या लीलांचा विस्तार आलाहिदा बाजीपंतांनीं लिहिला आहे. ( २ )

१७ शके १५६७ पार्थिव संवत्सरीं:—( १ ) मसूर येथें श्रींच्या उत्सवास प्रारंभ झाला.

( २ ) अंबाजींचें नांव कल्याण ठेवलें.*

( ३ ) विहिरींत भीमाजीबावास अनुग्रह. तपशील आलाहिदा दिला आहे. ( ३ )

१८ शके १५६९ अंगापूरचे डोहांतून मूर्ति आणल्या.

१९ शके १५७० सर्वधारीनाम संवत्सरीं चाफळीं श्रींच्या उत्सवास प्रारंभ.

२० शके १५६७ पासून शके १५७२ पर्यंत अकरा मारुतींची स्थापना. डोळेगांवचे मारुतिसुद्धां. त्याचें वर्णन वेणूबाईनीं वर्णिलें आहे. ( ४ )

२१ शके १५७१ ( १ ) वैशाख शुद्ध नवमी-गुरुवारीं शिवाजीमहाराजांस शिंगण-वाडीचे बागेंत अनुग्रह झाला. वरकड शिवछत्रपति प्रकरण आला-हिदा लिहिलें आहे. ( ५ )

( २ ) कब्यांत भोजन घातलें व तुकाराममहाराजांकडे पाठवून तेथें भोजन घालविलें.

( ३ ) पंढरपुरास आषाढमासीं गमन.

२२ शके १५७२ विकृतिनाम संवत्सर कार्तिक मास परळीस नेहमीं राहणें.

२३ शके १५७३ ( १ ) खरनाम संवत्सर—वैशाख मास विंझ्याची गोष्ट.

( २ ) रंगनाथस्वामींचें चारित्र—रेड्याची गोष्ट.

२४ शके १५७४ नंदननाम संवत्सर चैत्र शुद्ध दशमी—जांबेस श्रींचे उत्सवांत तुपाच्या घागरीचें चरित्र.

२५ शके १५७५ मातापुराहून सारंगपुरास गमन व मारुतीचें चरित्र.

२६ शके १५७६ सारंगपुराहून कृष्णातीरीं आले.

( २ ) श्रीरघुपतींनीं वेणाबाईच्या गळ्यांत माळ घातली.

२७ शके १५७७ ( १ ) एकनाथपंतांचें चरित्र.

( २ ) वैशाख शुद्ध द्वितीया मन्मथनाम संवत्सर–शिवाजी-महाराजांनीं समर्थांच्या झोळींत राज्याची चिठी टाकली ती गोष्ट.

( ३ ) रामेश्वरास गमन.

( ४ ) कार्तिकमासीं चंदावरीं एकोजीराजास अनुग्रह.

( ५ ) वेणुबाईची मिरजमठांत स्थापना.

( ६ ) ज्येष्ठ शुद्ध तृतीया–मातोश्रीचे अंतकाळीं परळीहून जांबेस गमन.

( ७ ) कल्याण गोसावी यांस तोडतों म्हणून धांवले.

२८ शके १५७८ ( १ ) श्रावणमासीं कोहिना नदींत समर्थ बुडाल्याची गोष्ट.

( २ ) माघ वद्य प्रतिपदेस वडगांवीं रंगनाथस्वामींचा घोडा उठविल्याची गोष्ट.

( ३ ) जहाजाचें चरित्र.

२९ शके १५७९ ( १ ) चैत्र वैद्यांत निरंजनस्वामींची गोष्ट.

( २ ) माघ शुद्ध चतुर्थी त्यांना अनुग्रह.

३० शके १५८० विलंबी संवत्सरः—

( १ ) देहगांवीं हुरड्याची गोष्ट.

( २ ) शीतज्वराची गोष्ट.

( ३ ) सदाशिवशास्त्री येवलेकर यांची गोष्ट.

३१ शके १५८१ विकारीनाम संवत्सरीं श्रेष्ठांचे दर्शनास शिवछत्रपति जांबेस गेले.

३२ शके १५८२ शार्वरी संवत्सरीं चैत्र वद्य ५स उद्धव गोसावी यांनीं चाफळीं श्रींच्या-पुढें कीर्तन केलें, मागें मारुतींनीं टाळ वाजविला, तें चरित्र.

३३ शके १५८८ पराभव नाम संवत्सर–आश्विन शुद्ध दशमी–ब्रह्मनाळीं समर्थ गेले, तेव्हां रघुनाथस्वामींचें वृंदावन डोललें.

३४ शके १५९५ प्रमादीनाम संवत्सरीं शिवछत्रपति कर्नाटकांत स्वारीस गेले–तेथें तपश्चर्येस राहण्याची इच्छा–यांचें चरित्र आलाहिदा आहे. ( ६ )

३५ शके १५९६ आनंदनाम संवत्सरः–( १ ) ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशी–सिंहासनाधीश्वर शिवछत्रपति यांस राज्याभिषेक–( २ ) नंतर दीड महिना श्रीपाशीं समारंभ राज्याभिषेक–तपशील बाजीपंत यांनीं लिहिला आहे. (७)

३६ शके १५९९ पिंगलनाम संवत्सरः–( १ ) फाल्गुन वद्य त्रयोदशीस श्रेष्ठ निजधामास गेले.

( २ ) आमावास्येस श्रेष्ठ पत्नी पार्वतीबाई परधामाप्रति गेल्या— हें चरित्र व श्रेष्ठांचें आजन्म चरित्र त्रिंबक गोसावी मठ भालगांव यांनीं वर्णिलें आहे. ( ८ )

३७ शके १६०० कालयुक्ताक्षि संवत्सरः—

( १ ) चैत्र वद्य चतुर्दशी वेणाबाई परंधामास गेल्या.

( २ ) वैशाखमासीं श्रेष्ठपुत्र रामचंद्रबांबा व शामजीबाबा यांस जांबेहून दर्शनास आणिलें.

( ३ ) देवीच्या दर्शनास समर्थ प्रतापगडीं गेले.

( ४ ) येकोजीराजे समर्थांस चंदावरीं घेऊन गेले. त्या वेळीं मल्हार निंबदेव येलूरकर यांस चवदा मणांच्या मूर्ति तयार करण्यास सांगून आले.

( ५ ) भाद्रपदमासीं पन्हाळ्यास जाण्यास छत्रपति आले.

( ६ ) आश्विन शुद्ध दशमीस ( सनद ) पत्र करून स्वामींपाशीं ठेविलें.

( ७ ) मार्गशीर्षमासीं कल्याण गोसावी यांसी डोमगांवीं रवाना केलें.

शके १६०० सालचीं हीं चरित्रें भक्तमंडळींनीं आलाहिदा लिहून ठेविलीं आहेत. ( ९ )

३८ शके १६०१ सिद्धार्थीनाम संवत्सरीं पौष शुद्ध नवमीस शिवछत्रपति आले ते माघ शुद्ध पौर्णिमेस आज्ञा घेऊन रायगडास गेले. हें सविस्तर चरित्र उद्धवगोसावी यांनीं लिहून ठेविलें आहे. ( १० )

३९ शके १६०२ रौद्रनाम संवत्सरीं चैत्र शुद्ध पौर्णिमेस रविवारीं शिवछत्रपति परंधामास गेले.

४० शके १६०३ दुर्मतीनाम संवत्सरीं:—

( १ ) वैशाखमासीं शिवछत्रपतींनीं नूतन गृह केलें त्यांत प्रवेश.

( २ ) ज्येष्टमासीं श्रीशंभुछत्रपति रामचंद्रपंतासुद्धां दर्शनास येऊन आठ दिवस राहून आज्ञा घेऊन गेले. नंतर कांहीं चरित्रें झालीं तीं भक्तमंडळींनीं लिहून ठेविलीं आहेत. ( ११ )

( ३ ) माघ शुद्ध अष्टमीस मल्हार निंबदेव व केशवगोसावी चंदावराहून मूर्ति घेऊन आले.

( ४ ) माघ वद्य पंचमीस श्रीराममूर्तींची पूजा समर्थांनीं केली व पांच दिवसांचा अवकाश आहे म्हणून सांगितलेल्या वेळचीं भाषणें भक्तमंडळींनीं व दिवाकरगोसावी यांनीं आलाहिदा लिहून ठेविलीं आहेत. ( १२ )

(५) माघ० वद्य नवमीस शनिवारीं समर्थ परंधामाप्रति गेले. अनेक प्रकारचीं चरित्रें श्रींनीं केलीं; भक्तमंडळींनीं कांहीं लिहून ठेविलीं आहेत.

(६) दिवाकरगोसावी यांणीं अंताजी गोपाळ वांकेनीस कुडाळकर यास लिहून ठेवायास सांगितलेवरून त्यांनीं माघ वद्य १३ सौम्य वासरे हें समर्थ वांकेनिशीटिप्पण लिहिलें.

(७) फाल्गुन शुद्ध पंचमीस वरील प्रतीवरून गोपाळ अंबाजी शहापूरकर यांनीं लिहिलेलें हें टिप्पण आहे.

अनंत गोपाळ कुडाळकरकृत समर्थवांकेनिशीपेक्षां हनुमंतस्वामींच्या बखरींत असलेल्या अधिक शकांचें व कांहीं शकांत अधिक दिलेल्या गोष्टींचें टिप्पणः—

(१) ×शके १५२१ सौम्यनाम संवत्सरीं फाल्गुन वद्य ६ स श्रीएकनाथ यांनीं समाधि घेतली.

(२) ×शके १५४२ माघ शुद्ध ७ रौद्रनाम संवत्सरीं टाकळींत बारा वर्षांत तेरा कोटी जपसंख्या करण्याचा समर्थांनीं निश्चय केला.

(३) शके १५४५ माघ शुद्ध पौर्णिमेस जयरामस्वामींचे गुरु कृष्णा आप्पा यांनीं वडगांव येथें जिवंत समाधि घेतली.

(४) शके १५४९ वैशाख शुद्ध तृतीयेस शिवाजीमहाराजांचा जन्म.

(५) शके १५७० सर्वधारीनाम संवत्सरीं चिंचवड येथें मोरयादेवांचे घरीं समर्थ व तुकारामांचें आगमन. भोजनकालीं त्रिवर्गांच्या आराध्यदेवतांचें भोजनास आगमन.

(६) शके १५७१ (१) ज्येष्ठ शुद्ध नवमी विरोधीनाम संवत्सरीं शिवाजीमहाराजांनीं समर्थांचा अनुग्रह झाल्याची व त्यांनीं प्रसाद दिल्याची गोष्ट मातोश्रींना व राण्यांना सांगितली.

(२) समर्थांची छाटी वाऱ्यानें उडाली, ती आणण्याकरितां कल्याणगोसावी यांनीं तटाखालीं उडी टाकली ती गोष्ट.

(३) ज्येष्ठ वद्य पक्षांत एका भोळ्या ब्राह्मणानें समर्थांचा अनुग्रह घेतला व नंतर तो तुकारामबावांकडे अनुग्रहास गेला व त्यांनीं त्यांस समर्थांकडे पाठविलें ती गोष्ट.

(४) तुकारामांनीं शिवाजीमहाराजांना सहा अभंगांचें पत्र पाठविलें त्यांत समर्थांनाच शरण जाण्यास सांगितलें होतें तरी महाराज सिंहगडाहून पुणें येथें शिरोळे देशमुखांचे घरीं तुकारामांच्या

कीर्तनास आले. कीर्तनानंतर तुकारामांना विनंति केली तेव्हां ते म्हणाले:–"समर्थांनीं जें सांगितलें व मी जें सांगणार त्यांत भिन्नता नाहीं."

( ५ ) विकारीनाम संवत्सरीं मार्गशीर्ष शुद्ध ५ शुक्रवारीं शिवाजी-महाराजांनीं प्रतापगडावर अफझुलखानास ठार मारलें.

( ६ ) नंतर मार्गशीर्ष महिन्यांतच महाराज समर्थांना रामघळींत भेटण्यास गेले त्या वेळीं समर्थांनीं १८व्या दशकांतील सहाव्या 'उत्तम पुरुषनाम' समासांत महाराजांचें वर्णन करून तो समाप्त केला. या टिपणांत शके १५८१चे ऐवजीं चुकून शके १५७१ असें पडलें आहे. अफझुलखानास मारल्याचें संवत्सर व महिना बरोबर आहे. "स्वामींच्या कृपेनें अफझुलखानाच्या तावडींतून सुटलों व अफझुल-खानासारखे त्या समयीं शतशः असले तरी नरडीचा घोटच घेतों असा त्या वेळचा आवेश होता," असें ह. स्वा. बखरींत वर्णन आहे.

( ७ ) शके १५७२ विक्रमनाम संवत्सरीं—

( १ ) शिवाजीमहाराज रंगमहालांत गोमांतकी आंबे खात अस-तांना समर्थांची आठवण होतांच समर्थ किल्ल्याच्या तटावरून आले व गेले.

( २ ) उरमोडी कांठीं सरकारी बागेंत महाराजांनीं समर्थांकरितां संध्या मठ बांधण्यास सांगितलें, त्या वेळीं समर्थांनीं बागप्रकरणावर स्फुट समास सांगितला.

( ३ ) सामानगड किल्ल्यावर समर्थांनीं महाराजांचा गर्वपरिहार करण्याकरितां खडक फोडून बेडकी दाखविली. त्या वेळीं इमारत-प्रकरणावरील स्फुट समास सांगितला व "आम्हीं काय कुणाचें खातों रे। तो राम आम्हांला देतो रे।" हें पद केलें.

( ८ ) शके १५७३ संवत्सरीं:—

( १ ) श्रेष्ठांचें समर्थांना ओंवीबद्ध पत्र व समर्थांचें त्यांना ओंवी-बद्ध उत्तर.

( २ ) समर्थांनीं महाराजांस पुढील तीन गोष्टी करण्यास सांगितल्या:– ( अ ) श्रावणमासीं कोटि पार्थिवलिंगें करणें, ( आ ) याच महिन्यांत दरवर्षी ब्राह्मणांना दक्षिणा देणें, व ( इ ) हिंदुराज्यांत जोहारच्या ऐवजीं "राम राम" म्हणणें.

( ३ ) सातापूर येथें श्रीदत्तात्रयाचे देवळांत समर्थ गेले तेव्हां कांहीं ब्राह्मण श्रीदत्तदर्शनार्थ अनुष्ठान करीत होते. श्रीदत्तांनीं त्यांची समर्थकल्याणांसमोर परीक्षा घेतल्याची गोष्ट.

( ४ ) फाल्गुन वद्य १३ पाडळी गांवीं कमाविसदारानें समर्थ-शिष्यांच्या कुबड्या व झोळ्या घेतल्यावर गांवाला आग लागल्याची गोष्ट.

( ९ ) शके १५७७ पत्रळीवर वेणाबाई समर्थांच्या खोलीत नैवेद्याचें ताट ठेवून आल्यावर विसरलेला पदार्थ नेण्यास वेणाबाई पुन्हा आंत जातांना मारुतीनीं फुसुःकार केल्यावर वेणाबाई मूर्च्छित पडल्याची गोष्ट.

(१० ) शके १५७८ इंदूरमठांत महादेव गोसावी यांची स्थापना करून उद्धव गोसावी देशीं आले.

(११ ) शके १५७९ हेमलंबी नाम संवत्सरीं समर्थ 'रामबाण' घोड्यावर बसून सज्जनगडाहून चाफळास गेले.

(१२)× शके १५८३ ( १ ) वासुदेव पंडित यांनीं त्रयोदशाक्षरी मंत्रावर अविश्वास ठेवल्याबद्दल त्यांची वाचा गेल्याची व समर्थकृपेनें ती पुन्हा आल्याची गोष्ट.

( २ ) प्लवनाम संवत्सरीं शिवरामस्वामींच्या पंचीकरण ग्रंथाच्या शेवटीं समर्थांनीं पांच ओंव्या घातल्याची गोष्ट.

( ३ ) सातारच्या रानांत शिकारींत मेलेल्या चिलण्या अग्नि पेट-वून उठविल्याची गोष्ट.

(१३)× शके १५८४ गारोड्यांच्या खेळांतील सर्प वासुदेव पंडितांस चावल्याची गोष्ट.

(१४)× शके १५८५ शोभकृन्नाम संवत्सरीं शिवाजीचें रूप घेऊन श्रीखंडोबांनीं समर्थांना जेजूरीस नेल्याची गोष्ट.

(१५)× शके १५८६ पौष वद्य ३०–चंद्रगिरीच्या डोंगरावर रंगनाथस्वामींकडून धार मारून उठविल्याची गोष्ट.

(१६)× शके १५८७ विश्वावसुनाम संवत्सरीं पारगांवच्या मौनिबुवांचे शिष्य समर्थांच्या महंतपणाची परीक्षा घेणेस आले असतां कल्याणांकडून मेलेल्या गाईची धार काढल्याची गोष्ट.

( १७ ) शके १५८८ पराभवनाम संवत्सरीं:—( १ ) समर्थ वडगांवीं गेले असतां जयरामस्वामींनीं मृत मूल उठविलें, तेव्हां त्यांना विहिरींत उडी टाकण्यास सांगितल्याची गोष्ट.

( २ ) समर्थांची व्यथा घालविण्याकरितां शिवाजीमहाराजांनीं वाघिणीचें दूध काढल्याची गोष्ट.

(१८) × शके १५९० (१) वाहेगांवच्या ज्योतिषांच्या वृद्ध स्त्रीचें रेडकू श्वापदांनीं खाल्यावर समर्थांनीं म्हशीच्या पाठीवर हात मारल्यावर ती मरेपर्यंत दुप्पट दुध देऊं लागल्याची गोष्ट.

(२) उंब्रजेस समर्थ कृष्णा नदींत बुडाल्यावर श्रीमारुतींनीं हात देऊन वर काढल्याची गोष्ट.

(१९) × शके १५९१ सौम्यनाम संवत्सरीं भागानगरीं आनंदीबाईचे घरीं समर्थ-पंचायतन जेवल्याची गोष्ट.

(२०) × शके १५९२ पौष शुद्ध १० परळीहून चाफळास जातांना खंडोबाच्या जत्रेच्या वेळीं दोन फडांच्या शाहिरांचा तंटा चालला असतां 'किती पृथ्वीचें वजन' हें डफगाणें समर्थांनीं म्हटल्याची गोष्ट.

(२१) × शके १५९३ कल्याणांनीं समर्थांचें करट चोखल्याची गोष्ट.

(२२) × शके १५९४ परीधावीनाम संवत्सरीं रामनवमीच्या उत्सवांत पवाराच्या निगडीचे रंगोबा गोसावी यांस कीर्तनानंतर दुर्व्यसनापासून मुक्त केल्याची गोष्ट.

(२३) शके १५९५ (१) चाफळाच्या मठांत चोर आल्याची व कल्याणांनीं त्यांना समर्थांच्या आज्ञेप्रमाणें न मारतां अडविल्याची गोष्ट.

(२) समर्थांच्या राम बोकयाच्या डोळ्यांत एका शागीर्दानें तिखट घातल्याची गोष्ट.

(२४) × शके १५९७ राक्षसनाम संवत्सरीं कपिलाषष्ठीच्या पर्वणीस माहुलीच्या ब्राह्मणांस समर्थांनीं नदींतील गोटे दक्षिणा दिले व त्यांचें सोनें झाल्याची गोष्ट.

(२५) शके १६०० अधिक शुद्ध १० शिवाजीमहाराजांनीं मनाचे श्लोक श्रवण केले व १२१ खंडी हरजिनसा धान्याची नेमणूक करून दिल्याची गोष्ट.

(२६) शके १६०२ चाफळ येथें रामनवमीच्या उत्सवांत शहापूरकर व शिराळकर यांचा मानाबद्दल तंटा झाला.

(२७) शके १६०३ (१) दुर्मतीनाम संवत्सर. श्रींच्या उत्सवास समर्थ चाफळास आले. श्रीमारुतीजयंती झाल्यावर देवालय व दीपमाळ बांधण्याकरितां कारभारी यांनीं शिवरायांकडून आलेले होन व जवाहीर समर्थांपाशीं आणून यादी करूं लागले. तो विषय समर्थ ब्राह्मणांस वाटूं लागल्याची गोष्ट.

(२) चैत्र शुद्ध त्रयोदशी दिवशीं चाफळाहून परत जातांना श्रींची आज्ञा घेतांना प्रार्थना केली "हा देह उत्पन्न करून सेवा घेतली ती केली, पुढें जे आपली सेवा करतील त्यांचें कल्याण करावें." नंतर समर्थांची व मारुतींची आज्ञा घेऊन सज्जनगडीं आले.

ज्या शकांच्या मागें × अशी खूण आहे ते शक ह. स्वा.च्या बखरींत अधिक आहेत म्हणजे पुढील तेरा शक ह. स्वा.बखरींत अधिक आहेत:—( १ ) १५२१, (२) १५४९, ( ३ ) १५८३, ( ४ ) १५८४, ( ५ ) १५८५, ( ६ ) १५८६, (७) १५८७, ( ८ ) १५९०, ( ९ ) १५९१, ( १० ) १५९२, ( ११ ) १५९३, ( १२ ) १५९४, ( १३ ) १५९७.

( १ ) पुढील गोष्टींचे शक निरनिराळे आहेत:—( १ ) वेणाबाईच्या गळ्यांत श्रीरघुपतींनीं माळ घातल्याचा शक वांकेनिशींत १५७६ आहे व ह. स्वा. बखरींत १५७५ आहे. ( २ ) एकनाथपंतांच्या गोष्टींचा वांकेनिशींत शके १५७७ आहे व ह. स्वा. बखरींत शक १५७६ आहे.

( २ ) जहाजाच्या गोष्टीचा शक वांकेनिशींत १५७८ आहे व ह. स्वा. बखरींत शक १५८१ विकारीनाम संवत्सरीं पौष वद्य ५ आहे.

( ३ ) कल्याणस्वामींस समर्थ तोडतो म्हणून धांवल्याचा शक वांकेनिशींत १५७७ आहे व ह. स्वा.च्या बखरींत १५८१ माघ वद्य ५ ते ९ पर्यंत आहे.

( ४ ) चाफळच्या उत्सवांत उद्धवगोसावी यांच्या कीर्तनाच्या वेळीं श्रीमारुतींनीं टाळ वाजविल्याचा शक वांकेनिशींत १५८२ आहे व ह. स्वा. बखरींत १५८१ आहे.

( ५ ) समर्थ ब्रह्मनाळास गेले असतांना श्रीरघुनाथस्वामींचें वृंदावन डोलल्याचा शक वांकेनिशींत १५८८ आश्विन शुद्ध दशमी आहे व ह. स्वा. बखरींत १५८९ प्लवंगनाम संवत्सर असा आहे.

पुढील गोष्टींच्या तिथींत फरक आहे:—( १ ) श्रेष्ठांच्या जन्माची तिथी वांकेनिशींत शके १५२७ मार्गशीर्ष शुद्ध १३ आहे व ह. स्वा. बखरींत मार्गशीर्ष वद्य १३ आहे.

( २ ) समर्थांना अनुग्रह झाल्याची तिथी वांकेनिशींत शके १५३८ श्रावण शुद्ध ९ आहे व ह. स्वा. बखरींत अष्टमी आहे.

( ३ ) श्रेष्ठांच्या निधनाची तिथि वांकेनिशींत शके १५९९ फाल्गुन वद्य १३ आहे व ह. स्वा. बखरींत १३ सह चतुर्दशी अशी आहे.

(४) श्रेष्ठनिधनानंतर त्यांचे पुत्र रामचंद्रबुवा व रामजीबुवा यांना वैशाखमासीं जांबेहून आणले, ते संवत्सरपर्यंत होते असें वांकेनिशींत आहे. व ह. स्वा.च्या बखरींत चैत्र शुद्ध १३स उद्धव त्यांना आणण्यास जांबेस गेले; तेथें आठ दिवस राहून घेऊन आले असें आहे व नंतर माघ कृष्ण १स उद्धवाबरोबर परत पाठविलें असें आहे.

( ५ ) शके १६०१ मध्यें शिवाजीमहाराज पौष शुद्ध ९स आले, अनेक संवाद झाले व माघ शुद्ध पौर्णिमेपर्यंत होते नंतर रायगडास गेले, असें वांकेनिशींत आहे. ह. स्वा. बखरींत हें चरित्र शके १६०१ सिद्धार्थीनाम संवत्सर माघ शुद्ध १५ दिवशीं झालें, एवढाच उल्लेख आहे.

एका गोष्टींत फक्त एक महिन्याचा फरक आहे. ती गोष्ट समर्थांनीं शिवाजी-महाराजांच्या सैन्यास कड्यांत भोजनांत घातल्याची व तुकारामांकडे पाठवून तेथें भोजनास घालविल्याची होय. बाकेनिशींत या गोष्टीचा महिना ज्येष्ठ आहे व ह. स्वा. बखरींत आषाढ आहे.

पुरुषार्थाच्या 'शिवाजी अंकां'त बाकेनिशी–टिप्पण ह. स्वा. बखरीवरून केलें आहे, असें डॉ. मा. स. केळकर म्हणतात. दोन्हींमधील वर दिलेल्या शकांवरून, शकांत घडलेल्या गोष्टी दिल्या आहेत त्यांवरून व कांहीं गोष्टींच्या भिन्न शकांवरून व भिन्न मितींवरून डॉ. केळकर यांचें म्हणणें खरें नाहीं हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल.

---

## परिशिष्ट ( उ )

### "आनंदवनभुवन"

जन्मदुःखें, जरादुःखें, । नित्य दुःखें, पुन्हपुन्हां ॥ संसार त्यागणें जाणें । आनंदवनभूवना. ॥ १ ॥ वेधलें चित्त, जाणावें । रामवेधीं निरंतरीं; ॥ रागें हो, वीतरागें हो, । आनंदवनभूवना. ॥ २ ॥ संसार वोढितां दुःखें, । ज्याचें त्यासींच ठाउकें ॥ परंतु, एकदां जावें । आनंदवनभूवना ॥ ३ ॥ न सोसे, दुख तें होतें । दुख्ख, शोक, परोपरीं ॥ एकाकी, एकदां जावें । आनंदवनभूवना. ॥ ४ ॥ कष्टलों, कष्टलों, देवा । पुरे, संसार जाहला ॥ देहेत्यागासि येणें हो । आनंदवनभूवना. ॥ ५ ॥ जन्म तें सोसिलें मोठें, । अपाय बहुतां परीं, ॥ उपायें धाडिलें देवें, । आनंदवनभूवना. ॥ ६ ॥ स्वप्नीं जें देखिलें रात्रीं, । तें तें तैसें चि होतसे ॥ हिंडतां फिरतां गेलों । आनंदवनभूवना. ॥ ७ ॥ हे साक्ष देखिली दृष्टीं, । किती कल्लोळ उठिले ॥ विघ्नमा प्राथिलें, गेलों । आनंदवनभूवना. ॥ ८ ॥ स्वधर्मा आड जें विघ्नें, । तें तें सर्वत्र उठिलीं ॥ लाटिलीं कूटिलीं देवें । दापिलीं कापिलीं, बहु ॥ ९ ॥ विघ्नाच्या उठिल्या फौजा, । भीम त्यावरि लोटला ॥ घर्डिलीं, चिर्डिलीं, रागें । रडविलीं, बडविलीं बळें ॥ १० ॥ हांकिलीं, टाकिलीं, तेणें । आनंदवनभूवनीं ॥ हांक, बोंब, बहु जाली । पुढें सत्तत्र मांडिलें ॥ ११ ॥ खौळले लोक देवांचे । मुख्य देव चि उठिला ! ॥ कळेना काय रे होतें, आनंदवनभूवनीं. ॥ १२ ॥ स्वर्गींची लोटली जेथें । रामगंगा महा नदी, ॥ तीर्थासी तूळणा नाहीं । आनंदवनभूवनीं. ॥ १३ ॥ ग्रंथीं जे वर्णिली मागें, । गुप्त गंगा महा नदी, ॥ जळांत रोकडे प्राणी । आनंदवनभूवनीं. ॥ १४ ॥ सकळ देवांची साक्षी । गुप्त उदंड भूवनें ॥ सौख्य चि पावणें, जाणें । आनंदवनभूवना. ॥ १५ ॥ त्रैलोक्य चालिलें तेथें । देव, गंधर्व, मानवी, ॥ ऋषी, मुनी, महा योगी । आनंदवनभूवनीं. ॥ १६ ॥ "अक्का, अक्का," बहू अक्का । काय "अक्का," कळेंचिना ! ॥ गुप्त तें गुप्त जाणावें, । आनंदवनभूवनीं. ॥ १७ ॥




( पान ४७० )

[ श्री. वा. वा. तगारे, नवीन समर्थ विद्यालय. ]

त्रैलोक्य चालिल्या फौजा । सौख्य बंधविमोचनें ॥ मोहीम मांडली मोठी । आनंदवनभूवनीं. ॥ १८ ॥ सुरेश ऊठिला आंगें, । सुर-सेना परोपरी ॥ विकटें, कर्कशें, यानें । शस्त्रपाणी महा बळी ॥ १९ ॥ देव देव बहू देव । नाना देव परोपरी ॥ दाटणी जाहली मोटी । आनंदवनभूवनीं. ॥ २० ॥ दिग्पती चालिले सर्वै, । नाना सेना परोपरीं ॥ वेष्टीत चालिले सकळे, । आनंदवनभवनीं. ॥ २१ ॥ मंगळें वाजती वाद्यें । महा गण समागमें ॥ आरंभीं चालिला पूढें । आनंदवनभूवनीं. ॥ २२ ॥ रामें राखिलीं मागें, । तेणें रागें चि चालिला ! ॥ सर्वत्र पाठिलीं फौजा, । आनंदवनभूवनीं. ॥ २३ ॥ आनेक वाजती वाद्यें, । ध्वनी कल्लोळ ऊठिला ॥ छेबीनें डोलती ढाला, आनंदवनभूवनीं. ॥२४॥ विजयी दीस जो आहे, । ते दीसीं सर्व ऊठती ! ॥ अनर्थ मांडला मोठा । आनंदवनभूवनीं. ॥ २५ ॥ देव ची तुष्टला होता, । त्याचे भक्तीस भूलला ॥ मागुता, क्षोभला दुखें । आनंदवनभूवनीं. ॥ २६ ॥ कल्पांत मांडला मोठा । म्लेंछ दैत्य बुडावया ॥ कैपक्ष घेतला देवीं । आनंदवनभूवनीं. ॥ २७ ॥ बुडाले सर्व ही पापी, । हिंदुस्थान बळावलें ! ॥ अभक्तांचा क्षयो जाला, । आनंदवनभूवनीं ! ॥ २८ ॥ पूर्वी, जे मारिले होते, । ते ची आतां बळावले; ॥ कोपला देव देवांचा, । आनंदवनभूवनीं ! ॥ २९ ॥ त्रैलोक्य गांजिलें मागें । ठाऊकें विवेकी जनां ॥ कैपक्ष घेतला रामें, । आनंदवनभूवनीं ! ॥ ३० ॥ भीम ची धाडिला देवें । वैभवें धांव घेतली ॥ लांगूळ चालिलें पूढें । आनंदवनभवनीं. ॥ ३१ ॥ येथून वाढला धर्मु, । रमाधर्म समागमें ॥ संतोष मांडला मोठा । आनंदवनभूवनीं. ॥ ३२ ॥ बुडाला औरंग्या पापी । म्लेंच-संव्हार जाहाला ॥ मोडलीं मांडलीं छत्रें । आनंदवनभूवनीं ! ॥ ३३ ॥ बुडाले भेदवाही ते, । नष्ट चांडाळ पातकी ॥ ताडिले पाडिले देवें । आनंदवनभूवनीं ! ॥ ३४ ॥ गळाले, पळाले, मेले, । जाले देशाधडी पुढें ॥ निर्मळ जाहाली पृथ्वी, । आनंदवनभूवनीं. ॥३५॥ उदंड जाहलें पाणी, । स्नान संध्या करावया ॥ जप तप अनुष्ठानें । आनंदवनभूवनीं. ॥ ३६ ॥ नाना तपें, पुरश्चर्णें नाना धर्म, परोपरीं ॥ गाजली भक्ति हे मोटी, । आनंदवनभूवनीं. ॥ ३७ ॥ लिहीला प्रत्ययो आला । मोटा आनंद जाहला ॥ चढता वाढता प्रेमा, । आनंदवनभूवनीं. ॥३८॥ बंड पाषांड, ऊडालें; । शुद्ध आध्यात्म वाढलें ॥ राम कर्ता, राम भोक्ता, । आनंदवनभूवनीं ! ॥ ३९ ॥ देवालयें, दिपमाळा । रंगमाळा, बहूविधा, ॥ पुजीला देव देवांचा । आनंदवनभूवनीं. ॥ ४० ॥ रामवरदायनी माता, । गर्द घेऊनी ऊठिली ! ॥ मर्दिले पूर्वीचे पापी । आनंदवनभूवनीं. ॥ ४१ ॥ प्रत्यक्ष चालिली, राया, । मूळमाया, समागमें, ॥ नष्ट चांडाळ ते खाया, । आनंदवनभूवनीं. ॥ ४२ ॥ भक्तांसी रक्षिलें मागें । आतां ही रक्षिते पाहा ॥ भक्तांसी दीधलें सर्वै, । आनंदवनभूवनीं. ॥ ४३ ॥ आरोग्य जाहली काया । वैभवें सांडिली सीमा ॥ सार सर्वस्व देवांचें । आनंदवनभूवनीं. ॥ ४४ ॥ देव सर्वस्व भक्तांचा; । देव, भक्त, दुजें नसे ! ॥ संदेह तुटला मोठा, । आनंदवनभूवनीं.

॥ ४५ ॥ देव, भक्त, येक जाले । मिळाले जीव सर्व हीं । संतोष पावले तेथें, । आनंद-वनभूवनीं ! ॥ ४६ ॥ सामर्थ्यें यशकीर्तीचीं, । प्रतापें, सांडिली सीमा ॥ कीर्तीनें दीधली सर्वें, । आनंदवनभूवनीं. ॥ ४७ ॥ राम कर्ता, राम भोक्ता, । रामराज्य भूमंडळीं । सर्वस्व मी च देवाचा । माझा देव कसा म्हणों ? ॥ ४८ ॥ हें चि शोधूनि पाहावें । राहावें निश्चळीं सदा । सार्थक, श्रवणें होतें । आनंदवनभूवनीं. ॥ ४९ ॥ वेद, शास्त्र, धर्म चर्चा । पुराणें, महात्में, किती ॥ कवित्वें नूतनें, जीर्णें । आनंदवनभूवनीं. ॥ ५० ॥ गीत-संगीत-सामर्थ्यें, । वाद्य कल्लोळ उठिला, ॥ मिळाले सर्व आर्थार्थी । आनंदवन-भूवनीं. ॥ ५१ ॥ वेद तो मंद जाणावा । सिद्ध आनंदभूवनीं ॥ अतूळ महिमा तेथें । आनंदवनभूवनीं. ॥ ५२ ॥ मनासीं प्रचीत आली । शब्दीं विश्वास वाटला ॥ कामना पुरती सर्वें । आनंदवनभूवनीं. ॥ ५३ ॥ येथुनी वांचती सर्वे । ते, ते, सर्वत्र देखती ॥ सामर्थ्य काय बोलावें । आनंदवनभूवनीं. ॥ ५४ ॥ उदंड ठेविलीं नामें, । आत्मस्तुती च मांडिली । ऐसें हें बोलणें नाहीं । आनंदवनभूवनीं. ॥ ५५ ॥ बोलणें वाउगें होतें । चालणें पाहिजे बरें ॥ पुढें घडेल तें खरें, । आनंदवनभूवनीं. ॥ ५६ ॥ स्मरलें लीहिलें आहे ! । बोलता चालता, हरी ॥ काय होईल पाहावें । आनंदवनभूवनीं. ॥ ५७ ॥ महिमा तो वर्णवेना । विशेष बहुतां परीं, ॥ "विद्यापीठ" तें आहे । आनंदवनभूवनीं. ॥ ५८ ॥ सर्वस्वा कळा, विद्या, । न भूतो न भविष्यति ॥ वैराग्य जाहालें सर्वें । आनंदवनभूवनीं. ॥ ५९ ॥

॥ जयजय रघुवीर समर्थ ॥

---

## श्रीसमर्थप्रार्थना

### पद ( राग सारंग; ताल धुमाळी. )

कल्याण करी देवराया । जनहित विवरी ॥ ध्रु० ॥ तळमळ तळमळ होतचि आहे । हे जन हातीं धरी ॥ १ ॥ अपराधी जन चुकत गेले । तुझा तूंची सांवरी ॥ २ ॥ कठीण त्यावरि कठीण झालें । आतां न दिसे उरी ॥ ३ ॥ कोठें जावें काय करावें । आरंभिली बोहरी[१] ॥ ४ ॥ दास म्हणे आम्ही केलें पावलों । दयेसि नाहीं सरी ॥ ५ ॥

---

## वरयाचना

### ( १ )

पावन भिक्षा दे रामा । अर्धारोहण दे रामा ॥ ध्रु० ॥ अभेदभक्ति दे रामा । दीनदयाळा दे रामा ॥ १ ॥ तद्रूपता मज दे रामा । आत्मनिवेदन दे रामा ॥ २ ॥ सज्जन-संगति दे रामा । अलिप्तपण मज दे रामा ॥ ३ ॥ ब्रह्मानुभव दे रामा । अनन्यसेवा दे रामा ॥ ४ ॥ मजविण तुज मज दे रामा । दास म्हणे मज दे रामा ॥ ५ ॥

---

१. नाश.

(२)

कोमलवाचा दे रामा। विमल करणी दे रामा ॥ ध्रु० ॥ प्रसंग-ओळखी दे रामा। धूर्त कळा मज दे रामा ॥ १ ॥ अंतरपारख दे रामा। बहुजनमैत्री दे रामा ॥ २ ॥ विद्यावैभव दे रामा। उदासीनता दे रामा, ॥ ४ ॥ मागों नेणें दे रामा। मज न कळे तें दे रामा ॥ ५ ॥ तुझी आवडी दे रामा। दास म्हणे रे गुणधामा ॥ ६ ॥

(३)

संगीत गायनें दे रामा। आलापगोडी दे रामा ॥ ध्रु० ॥ धाता माता दे रामा। अनेक धाटी दे रामा ॥ १ ॥ रसाळ मुद्रा दे रामा। जाड कथा मज दे रामा ॥ २ ॥ प्रबंधसरळी दे रामा। शब्द मनोहर दे रामा ॥ ३ ॥ दस्तक टाळी दे रामा। नृत्यकळा मज दे रामा ॥४॥ सावधपण मज दे रामा। बहु पाठांतर दे रामा ॥ ५ ॥ दास म्हणे रे गुणधामा। उत्तम गुण मज दे रामा ॥ ६ ॥

---

## श्रीसमर्थांची इच्छा

देवें दयाळें करुणा करावी। भक्ताभिमानें भरणी भरावी ॥ हे रामनामीं तरणी[1] तरावी। दासांसमस्तां वरणी[2] बरावी ॥ १ ॥ रघुनाथदासा कल्याण व्हावें। अति सौख्य व्हावें आनंदवावें ॥ उद्वेग नासो वरशत्रू नासो। नानाविलासें मग तो विलासो ॥ २ ॥ कोठें नको रे कलहो नको रे। कापट्य कर्मी सहसा नको रे॥ निर्वाण-चिंता निरसीं अनंता। शरणांगता दे बहु धातमाता ॥ ३ ॥ अजयो न हो रे जयवंत हो रे। आपदा नको रे बहु भाग्य हो रे ॥ श्रीमंतकारी जनहीतकारी। परउपकारी हरिदास तारी ॥ ४ ॥ तुझा भिक्षूक दातया रामचंद्रा। सदा स्वस्थ चिंतीतसे गा महिंद्रा ॥ राजाधीश देशा उरपूर्ण द्यावें। भवदैन्य हें देशधाडी करावें ॥ ५ ॥

---

## श्रीसमर्थांची आरती

आरती रामदासा। सद्गुरू सर्वेशा ॥ काया वाचा मनोभावें। ओंवाळू परेशा ॥ ध्रु० ॥ रामदास मूर्तिमंत। रामचंद्रअवतार ॥ कलियुगीं अवतरोनी। केला भक्तांचा उद्धार ॥ १ ॥ वैराग्य भक्तिज्ञान। शांति क्षमा विरक्ति ॥ विवेक सालंकृत। क्षमा दया सर्वभूतीं ॥ २ ॥ सच्चिदानंद घन। रामदास केवळ ॥ दिनकर कृपायोगें। रामचंद्र निर्मळ ॥ ३ ॥

जय जय रघुवीर समर्थ

ॐ तत्सत्

---

१. नौका. २. पूजेची पाळी.

# सूची

( आंकडे पृष्ठांचे आहेत. )

**ध**



**न**



**प**

---

प्रकाशकः—**सदाशिव खंडो आळतेकर**, बी. ए., एलएल्. बी., कऱ्हाड.
मुद्रकः—**सदाशिव रामचंद्र सरदेसाई**, बी. ए., एलएल्. बी., नवीन समर्थ विद्यालयाचा 'समर्थ भारत' छापखाना, ९४७ सदाशिव पेठ, पुणें २.

## पुस्तकें मिळण्याचीं ठिकाणें

१. मुंबई—परचुरे, पुराणिक आणि मंडळी, माधवबाग.

२. पुणें—नवीन किताबखाना, बुधवार पेठ.

समर्थ भारत छापखाना, ९४७ सदाशिव पेठ.

३. कोल्हापूर—श्रीयुत गोळवलकर, पुस्तक-दुकानदार.

४. नागपूर—भिसे बंधु, पुस्तक-दुकानदार, सीताबर्डी.

५. सांगली—श्रीयुत गोळवलकर, पुस्तक-दुकानदार.

## श्री. सदाशिव खंडो आळतेकर यांनीं प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें

| पुस्तकाचें नांव | किंमत रुपये |
|---|---|
| १. सुलभ दासबोध ... ...(शि. ना.) | १-०-० |
| २. समर्थ-रत्न-संग्रह ... ... | १-४-० |
| ३. श्रीसमर्थ-चरित्र ... ... | २-८-० |
| **बालबोध समर्थवाङ्मयमाला—** | |
| पुष्प १ लें—समर्थांची करुणापर कविता (शि. ना.) | ०-६-० |
| पुष्प २ रें—समर्थ-सुभाषित | ०-८-० |
| पुष्प ३ रें—समर्थांचें आत्मचरित्र | ०-६-० |
| पुष्प ४ थें—मनोबोध | ०-५-० |